।। रामकृष्णहरी ।।

# ।। तुका झालासे कळस ।।

संकल्पना

**कै. पद्माकर विठ्ठल कुलकर्णी**

संकलन आणि संपादन

**ह. भ. प. श्री. चकोर श्रीकृष्ण बावीस्कर**

**श्री. आदेश वसंत अत्रे**

अद्वैत पब्लिकेशन्स्
बिल्डींग नं. ८, फ्लॅट नं. ६, आनंद पार्क सोसायटी, शंकरशेट रस्ता, पुणे ४११ ०३७.
दूरध्वनी : ०२०–२६४५७९६६ – www.advaitgroup.com - publications@advaitgroup.com
अधिक माहितीसाठी संपर्क: श्री. आदेश वसंत अत्रे – ९९२११३४५९५५



विठ्ठल आमचें जीवन। आगम निगमाचें स्थान। विठ्ठल सिद्धीचें साधन। विठ्ठल ध्यानविसावा।।१।।
विठ्ठल कुळींचें दैवत। विठ्ठल वित्त गोत चित्त। विठ्ठल पुण्य पुरुषार्थ। आवडे मात विठ्ठलाची।।२।।
विठ्ठल विस्तारला जनीं। सप्तही पाताळें भरुनि। विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं। विठ्ठल मुनि मानसीं।।३।।
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा। विठ्ठल कृपेचा कोंवळा। विठ्ठल प्रेमाचा पुतळा। लावियला चाळा विश्व विठ्ठलें।।४।।
विठ्ठल बाप माय चुलता। विठ्ठल भगिनी आणि भ्राता। विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता। तुका म्हणे आतां नाहीं दुसरें।।५।।

।। तुका झालासे कळस ।।

तुकाराम गाथा – शब्द अभंग सूची



आम्ही वैकुंठवासी। आलों याचि कारणासी।  बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया।।१।।
झाडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग।  उच्छिष्टाचा भाग। शेष उरला तो सेवूं।।२।।
अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें।  विषयलोभीं मनें। साधन हें बुडविलें।।३।।
पिटूं भक्तीचा डांगोरा। कळीकाळासी दरारा।  तुका म्हणे करा। जयजयकार आनंद।।४।।

अद्वैत पब्लिकेशन्स्, पुणे. दूरध्वनी : ०२०–२६४५७९६६

## निळोबारायकृत श्रीतुकोबारायांची आरती

प्रपंचरचना सर्वही भोगुनि त्यागिली । अनुतापाचें ज्वाळीं देहबुद्धि हविली ।
वैराग्याचीं निष्ठा प्रगटुनि दाखविली । अहंता ममता दवडुनि निजशांती वरिली ।।१।।
जयजयाजी सद्गुरु स्वामी तुकया दातारा । तारक तूं सकळांचा जिवलग सोयरा ।।धृ।।
हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला । विरक्ती ज्ञानाचा ठेवा उघडिला ।
जगदोद्धारालागीं उपाय सुचविला । निंदक दुर्जनांचा संदेह निरसिला ।।२।।
तेरा दिवस वह्या रक्षुनियां उदकीं । कोरड्याचि काढूनि दाखविल्या शेखी ।
अपार कविता शक्ति मिरवुनि विधि अंकीं । कीर्तन श्रवणें तुमच्या तरिजे जन लोकीं ।।३।।
बाळवेष घेउनि श्रीहरी भेटला । विधिचा जनिता तूंचि आठव हा दिधला ।
तेणें ब्रह्मानंदें प्रेमा रूढविला । न तुके म्हणूनि तुका नामें गौरविला ।।४।।
प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें । कलिच्या काळामाजी अद्भुत वर्तलें ।
मानव देह घेऊनि निजधामा गेले । निळा म्हणे सकळ संतां तोषविलें ।।५।।

## रामेश्वरकृत श्रीतुकोबारायांची आरती

आरती तुकारामा । स्वामी सद्गुरु धामा । सच्चिदानंद मूर्ति । पाय दाखवी आम्हां ।।१।।
राघवें सागरांत । पाषाण तारियेले । तैसे तुकोबाचें । अभंग रक्षिलें ।।२।।
तुकिता तुळणेसी । ब्रह्म तुकासी आलें । म्हणोनि रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ।।३।।

# ।। आशीर्वचन ।।

जगद्गुरु तुकाराम महाराजांच्या अभंगाच्या प्रस्तुत सूचीमुळे अभ्यासक, कीर्तन प्रवचनकार आणि भाविक यांच्यासाठी एक स्वतंत्र दालनच खुले होत आहे. विशेष म्हणजे इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञानाच्या यथायोग्य उपयोगामुळे हे दालन अगदी अत्याधुनिक बनले आहे.

मराठी भाषेच्या सामर्थ्याचा आणि क्षमतांचा प्रत्यय घ्यायचा असेल तर तुकोबारायांच्या गाथेसारखे दुसरे साधन नाही. पारमार्थिकांसाठी, साधकांसाठी महाराजांचे अभंग मार्गदर्शकाचे काम करतात हे वेगळे सांगायची गरजच नाही. गेली तीन साडेतीन शतके वारकरी संप्रदायाने याचे जणू प्रात्यक्षिकच दाखविले आहे. वारकरी संप्रदायाची दीक्षा न घेता स्वतंत्रपणे भक्तिमार्गाची वाटचाल करणारे श्री. रानडे श्री. भांडारकरांसारखे प्रार्थना समाजिष्ट काय, तुकोबांच्या नैतिक शिकवणुकीमुळे प्रभावित झालेले सर ॲलेक्झांडर ग्रँट सारखे ब्रिटिश विद्वान काय किंवा सामाजिक सुधारणांना धार्मिक बैठक देऊ पाहणारे महात्मा फुले काय, सर्वच प्रकारच्या महानुभावांना गाथा शिरोधार्य ठरली. साहित्यिक, पत्रकार, वक्ते यांना तिने जणू एक न संपणारी शिदोरीच उपलब्ध करून दिली. सर्वसामान्य मराठी माणसाला जीवन जगण्याचे तत्वज्ञान दिले.

अगदी अलिकडच्या काळात प्रसिद्ध कवयित्री आसावरी काकडे यांनी म्हणल्याप्रमाणे कविता हे ईश्वर शोधाचे साधन होऊ शकते तशी कवितेची आस्वादप्रक्रिया सुद्धा ईश्वरशोधाच्या वाटेने घेऊन जाऊ शकते. काकडे फक्त असे एक शक्यतावाचक मोघम विधान करुन थांबत नाहीत. त्या पुढे म्हणतात, ‘‘कविता ‘त्याचा’ शोध लावते.’’ हे विधान ज्यांच्या संदर्भात शंभर टक्के सार्थ ठरते ते कवी म्हणजे संत तुकाराम. ज्या कवितेला तत्वज्ञानाशी सममूल्य मानता येईल ते मूल्य असलेली कविता म्हणजे तुकारामांचे अभंग आणि ईशावास्य उपनिषदांत ‘कवी’ हे ज्याचे लक्षण सांगितले गेले आहे, असा आत्मज्ञानी पुरुष म्हणजे संत तुकाराम !’’

एवढे ज्यांच्या कवित्वाचे सामर्थ्य आहे, त्यांच्या अशा अभंगांचा सूक्ष्म अभ्यास अनेक प्रकारच्या लोकांना वेगवेगळ्या प्रकारे लाभदायक ठरेल, यात शंका नाही. त्यातील एक प्रकार म्हणजे सूची. सूचीचे महत्त्व वेगळे सांगायची गरज नाही. कोणत्याही प्रकाशित गाथेला अभंगांच्या सुरुवातीच्या – पहिल्या कडव्याच्या आद्याक्षराच्या अनुषंगाने म्हणजेच अकारविल्हे सूची जोडलेली असतेच. त्यामुळे वाचक आपल्याला पाहिजे असलेला अभंग शोधू शकतो. मात्र पहिले चरण ठाऊक नसेल, तर मात्र त्याची अडचण होते. ह.भ.प. श्री. भाऊसाहेब महाराज वरोलीकर आणि ह.भ.प. श्री. रामचंद्र महाराज ठाकरे यांनी हा प्रयोग विस्तारून गाथेतील अभंगांच्या सर्वच कडव्यांची सूची तयार केली होती.

प्रस्तुत सूची याहीपेक्षा अधिक व्यापक, परिपूर्ण व महत्त्वाकांक्षी आहे. गाथेत आलेल्या सर्वच शब्दांची ही सूची आहे. एखादा शब्द गाथेत कोठे आला आहे हे पाहायचे असेल, तर एक 'क्लिक' पुरेशी आहे. क्षणार्धात तो शब्द ज्या ज्या कडव्यांत महाराजांनी वापरला आहे ती सर्व कडवी वाचकापुढे अवतीर्ण होतात. आधुनिक तंत्रज्ञानाचा हा अतिशय सात्विक आणि समर्पक उपयोग असून त्यासाठी सूचीच्या कर्त्यांना जेवढे धन्यवाद द्यावेत, तेवढे थोडेच आहेत. त्यांनी सर्वच तुकारामप्रेमी साधक वाचक अभ्यासकांना कायमचे उपकृत करुन ठेवले आहे. आपण केवळ एक कळ दाबून जे प्राप्त करू शकतो त्यामागे या मंडळींची केवढी मेहनत आहे, हे या माध्यमाच्या व तंत्रज्ञानाच्या जाणकारांना वेगळे सांगावयाची गरज नाही. कायम स्मरणात ठेवावे असेच हे परिश्रम आहेत.

तुकाराम महाराजांचे अभंग ही स्फुट रचना आहे. ती काही एखादा विषय घेऊन केलेली सलग मांडणी नव्हे. अर्थात तरीसुध्दा बऱ्याच अभंगांमध्ये एक विशिष्ट ओळ अथवा क्रम आहे. त्याचे काही गट आहेत व त्या त्या गटातील अभंग एकमेकांशी संबंधित असून अर्थ लावताना हा संबंध उपयोगी ठरतो. याची जाणीव तुकोबांच्या पश्चात कान्होबारायांसारखे, संताजी जगनाड्यांसारखे वारकरी लेखक जपून होते. त्यांनी महाराजांच्या अभंगांचे काही प्रमाणात तसे संपादनही केले होते. हा मुद्दा अलिकडच्या काळात तुकारामगाथेचे साक्षेपी अभ्यासक बॅ. बाबाजी गणेश परांजपे यांनी प्रकर्षाने पुढे आणला. तुकाराम अभ्यासक्षेत्रात त्याला फार महत्त्व आहे.

प्रस्तुतचा प्रकल्प सुध्दा हा एक महत्त्वाचा टप्पा आहे. अर्थपूर्ण वाक्यरचनेचा शब्द हा अंतिम घटक असतो. त्यासाठी शब्दांचा सूक्ष्म अभ्यास व्हायला हवा. ही गरज पूर्ण करणाराच हा उपक्रम आहे. महाराजांचे हे 'शब्दधन' नीटपणे मांडल्याबद्दल पुनश्च अभिनंदन व संतसाहित्याची अशी आणखी सेवा घडावी, यासाठी शुभेच्छा !

डॉ. श्री. सदानंद मोरे,
तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ,
पुणे, ४११ ००७.

# ।। मनोगत ।।

श्रावण कृष्ण अष्टमी,
शुक्रवार, शके १९३४.
दिनांक : १०/८/२०१२.

विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ
पुंडलिकवरदे हरि विठ्ठल ऽऽ श्री ज्ञानदेव तुकाराम ऽऽ
पंढरीनाथ भगवान की ऽऽ जय ।।
माउली ज्ञानेश्वर महाराज की ऽऽ जय ।।
जगद्गुरू तुकाराम महाराज की ऽऽ जय ।।
विठ्ठलऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ

श्रीपांडुरंगाची आणि सकल संत मांदियाळीची अपरंपार कृपा म्हणून ‘तुका झालासे कळस’ ही जगद्गुरू श्रीतुकाराम महाराज यांच्या गाथ्याची ‘शब्द-कडवे-अभंग सूची’ प्रकाशित होत आहे.

वैकुंठवासी हरिभक्तिपरायण श्रीमन् पद्माकर विठ्ठल कुलकर्णी (उपाख्य: श्री.पीव्ही) यांच्या माध्यमातून ही कृपा आपणा सर्वांपर्यन्त पोहोचते आहे, म्हणून त्यांचे सदोदित जागते स्मरण या प्रसंगी प्रकर्षाने होणे, हा आमच्या कृतज्ञतेच्या विनम्र आविष्काराचा एक अंशमात्र भाग आहे. श्री.पीव्हींच्या केवळ स्मरणानेही सर्व सात्विक भाव मनात दाटून-उचंबळून येतात. माउली हृदय अंतर्बाह्य जाणून ज्ञानेश्वरीमय झालेले व्यक्तिमत्व, नव्हे विभूतितत्व म्हणजे श्री.पीव्ही आणि त्यांचे जणू बहिश्चर हृदय म्हणजे श्री.आदेशजी अत्रे (उपाख्य: श्री.शेखर काका).

श्री.पीव्ही आणि श्री.शेखरकाका यांनी अनेकानेक वर्षांच्या साधनेने, तपस्येने सिद्ध केलेली 'तो वाग्यज्ञु म्हणिजे' ही ज्ञानेश्वरीची 'शब्द–ओवी–सूची' एका मंगलप्रसंगी मला प्राप्त झाली आणि जगण्याचा जणू आयामच बदलला. घराण्याच्या प्रदीर्घ वारकरी सांप्रदायिक परंपरेमुळे आणि आईवडिलांच्या संस्कारांमुळे आळंदी येथे वास्तव्य घडले. आरंभी व्यक्तिगत श्रद्धेतून भाबडेपणाने सुरू झालेले संतसाहित्याचे अवलोकन, पुढे कीर्तन प्रवचनांच्या कार्यक्रमांमुळे अनिवार्य झाले आणि त्याहीपुढे अनिवार आवडीचे झाले खरे, पण अनंत अपार महदाकाश मशकाच्या मुठीत कसे आकळावे? एखाद्या वेळी विशिष्ट विषयावरचा अगदी हवाच असलेला नेमका संदर्भ संतसाहित्यसागरातून अचूकपणे शोधून काढताना होणारी दमछाक हतबल करायची. अशा एका एका संदर्भासाठी संपूर्ण ज्ञानेश्वरी, संपूर्ण गाथा, संपूर्ण नाथभागवत, इतर संतांचे साहित्य किती किती वेळा शोधन करणार? तसे करण्याचे पारमार्थिक लाभ काय व्हायचे ते होवोत. पण बऱ्याचदा ज्या कारणासाठी ती ओवी, एखाद्या अभंगाचा एखादा चरण हवा असायचा, तो संदर्भ शोधता शोधता त्या कारणाची वेळ टळून गेलेली असायची.

आजच्या काळात तितिक्षापूर्ण व्यासंग आणि तोही आमच्या पिढीकडून? अगदीच अशक्य नसला, तरी अवघड आहे ! एका एका संदर्भासाठी कधी दिवसेंदिवस; तर कधी महिनोन् महिने; तर कधी वर्षानुवर्षे सातत्यपूर्ण चिकाटीने कधी सफल तर बऱ्याचदा असफल शोधप्रयत्न निष्ठावंत समभावाने आणि तोही आजच्या गतिमान युगात? त्यापेक्षा... जाऊ द्या ! मग सर्वच संतांच्या सर्वच साहित्याचे समग्र पाठांतर? बापरे !!

या आणि अशांसारख्या, व्यक्तिगत आणि प्रातिनिधिक, दुर्धर आणि दुष्पूर समस्या अचूक आणि क्षणार्धात, समूळ आणि सहज, ससंदर्भ आणि विनामूल्य सोडविण्याचा अमूल्य उपाय उपलब्ध करून दिला, तो श्री.पीव्ही आणि श्री.शेखरकाकांच्या 'ज्ञानेश्वरी शब्द–ओवी–सूची'ने आणि त्यांचे सश्रद्ध सहकारी श्री.समीर कुसुरकर यांच्या संगणक ज्ञानाने! या सर्वांनी विकसित, वितरित केलेल्या या सूचीची संपृक्त तबकडी (Compact Disc) ज्यांच्या ज्यांच्या संग्रहात आणि वापरात आहे, त्या सर्वांची भावना या त्रयीविषयी, 'काय द्यावें त्यांसीं व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ।।' अशाच स्वरूपाची आहे, हे निर्विवाद आहे. संतसाहित्याची इतकी निरपेक्ष आणि प्रचंड उपकारक सेवा या मंडळींनी केली आहे की, 'यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ।।'

श्रीकृष्णोक्तीचा भलाथोरला कवळ साधक बालकांच्या प्रज्ञामुखात जाणार नाही, हे जाणून माउलींनी त्या घासाचे विसाठायी भाग केले आणि 'शब्द–ओवी–सूची'ने त्या प्रत्येक घासाचा अक्षरशः कण अन् कण सुटा केला. औषधशास्त्राच्या दृष्टीने रसायन जेवढे सूक्ष्म, तेवढे ते अधिक सुसेव्य आणि अधिक परिणामकारकही. वेद–उपनिषदे–श्रीमद्‌भगवद्गीता–ज्ञानेश्वरी–सकल संतगाथा म्हणजे असाध्य भवरोगावरचे रामबाण औषध उत्तरोत्तर

सुसेव्य आणि परिणामकारक करण्याचा सफल उपाय आहे. अशा वाङ्मयाची शब्दसूची म्हणजे अत्यंत छोट्या छोट्या,अनेकविध रंगा–चवींच्या आकर्षक गोळ्यांतून हे औषध सतत चघळत राहता येईल; अशी मधुर–सुंदर सोय आहे! त्यातून होणारे निखळ पारमार्थिक आणि अगदी व्यावहारिकही लाभ वाढवता येतील तितके वाढणारे आहेत. (या उपक्रमांतून व्यावहारिक लाभाचा या मंडळींचा लवमात्र उद्‌देश नाही.) वापर करणाऱ्याच्या उद्‌देशांवर सर्व अवलंबून आहे. कोणत्याही उद्‌देशाने कशाही प्रकारचे लोखंड परिसाला झगटले, तरी माउली म्हणतात, हरकत नाही; पण झगटावे.

श्री.पीव्ही आणि श्री.शेखरकाका या उभयतांना त्यांच्या डोंगराएवढ्या कामाची उपयुक्तता माहिती होतीच. ज्ञानेश्वरीची वेगवेगळ्या पैलूंनी करता येईल तेवढी 'मनें कायें वाचा' सेवा करीत त्यातून येणाऱ्या स्वानंदसाम्राज्याच्या सुखाचा भरभरून आस्वाद आणि रसास्वाद ते दोघे आकंठ घेत होते, एकमेकांना देतही होते. श्री.पीव्ही आणि श्री.शेखरकाका ही दोन्ही जवळिकेची सरोवरे परस्परांत कालवत असत, तेव्हा माझ्या अंगावर उडालेल्या चार–दोन तुषारांनीही मला धन्यता वाटत असे. प्रामुख्याने त्यांच्या संवादसुखाच्या अनुभूतीतून ज्ञानेश्वरीच्या 'शब्द–ओवी–सूची'चे महत्त्व आणि उपयुक्तता ध्यानी येताच मीही अगदी अंतर्बाह्य थरारलो. सर्वच संत वाङ्मयाची अशी सूची झाली तर..... या कल्पनेनेही अगदी कोंदून गेलो.

एका प्रसन्न क्षणी जाणवले, अरे, 'ळळेयांचे ळळे' सरते करणारे आणि 'मनोरथांचे मनौरे' पुरवणारे हे श्रीमंत माहेर आहे. इथे जर भिडेने, संकोचाने सलगी करायला भ्यायलो, तर मग पूर्ण तृप्ती मिळणार नाही. श्री.पीव्हींना आणि श्री.शेखरकाकांना अगदी अवचित साकडे घातले, 'जशी ज्ञानेश्वरीची 'शब्द–ओवी–सूची' केलीत, तशी तुकारामगाथेचीही करा ना!' मी एरव्ही जरी उनाड वासरू असलो, तरी त्यावेळी कल्पवृक्षांच्या सावलीत बांधलो गेलो होतो आणि माझी गाउली–माउली कामधेनू आहे, याची शाश्वती आहे. श्री.पीव्ही आणि श्री.शेखरकाकांची वेडी प्रसन्नता 'हो' म्हणाली आणि त्यांनी तुकारामगाथेच्या सूचीच्या या कामाला सुरुवातही केली.

ज्ञानेश्वरीच्या 'शब्द–ओवी–सूची'साठी परमपूज्य गुरुनांगुरू ह.भ.प.श्रीमन् सोनोपंत दांडेकर (उपाख्यः श्री. मामासाहेब) यांनी संपादित केलेल्या ज्ञानेश्वरीची पहिली आवृत्ती वापरली होती. तेव्हा गाथेसाठीही श्री.मामासाहेबांनीच संपादित केलेल्या तुकारामगाथेची १९२५ सालची पहिली आवृत्ती आधाराला घ्यायची, असे आमचे ठरले. संतसाहित्याचे महाराष्ट्रातील विचक्षण आणि साक्षेपी अभ्यासक व चिकित्सक संपादक आदरणीय श्री.रा.शं.नगरकर यांनी त्यांच्या संग्रहातील ती, गाथेच्या प्रथमावृत्तीची प्रत आम्हास नेहमीप्रमाणे उदारपणे दिली. संपूर्ण गाथेचे छायामुद्रांकित तीन संच करवून घेऊन, पैकी एक संच श्री.पीव्हींनीच नेहमीच्या संगणक मुद्रकास दिला, तो त्याने त्याच्या पद्धतीने मुद्रितही करून दिला. काम पुढे सरकू लागले.

वडिलांच्या ताटात बसलेल्या बालकाने अधून–मधून वडिलांनाही घास भरवण्याचा प्रयत्न करावा आणि वडिलांनीही आनंदाने तो घास स्वीकारावा, तसे आमचे सुरू झाले. कारण अधूनमधून श्री.पीव्ही आणि श्री.शेखरकाका मला काही विचारत असत आणि मीही काहीतरी सांगत असे. असा सगळा आनंदकल्लोळ चालू असता श्री.पीव्हींच्या आधी–व्याधींनी उचल खाल्ली. त्यांच्या राहात्या घरी, एका सुन्न दुपारी तुकारामगाथेचे मुद्रित बाड आणि त्यावर 'तुकाराम महाराज जन्म चतु:शताब्दी निमित्ता'ने काढण्यात आलेले चांदीचे भले मोठे नाणे, सावकाश चालत येऊन श्रीपीव्हींनी माझ्या हाती ठेवले आणि म्हणाले, ''घ्या. आता हे तुम्हाला सांभाळायचे आहे''. त्यानंतर आठच दिवसांत श्री.पीव्ही वैकुंठवासी झाले. श्रीतुकाराम महाराजांच्या निर्वाणानंतर त्यांचे धाकटे बंधू श्रीकान्होबाराय यांनी देवाशी जो काही आकांत मांडला. . . .

मग एकेक कल्पित–अकल्पित अडचणींची मालिकाच सुरू झाली. मी मेहकर, जि.बुलडाणा येथे. श्री.शेखरकाका आणि श्री.समीरजी पुणे येथे. त्यांचा आणि त्यांच्यापेक्षा जास्त माझ्या कामांचा व्याप–ताप. संगणक प्रणाली शिकण्यापासूनची माझी सुरुवात. मग गाथेचे मुद्रितशोधन. प्रापंचिक पसारा आणि कार्यालयीन कार्यबाहुल्य यांच्या भरीला येणाऱ्या नवनवीन समस्या अगदी कस पहात होत्या. आधीच मुद्रितशोधनाचे काम. त्यातून गाथेचे. ऱ्हस्व–दीर्घ, शब्दांच्या जोडण्या–तोडण्या, दंड–विसर्ग यात तर अडचणी येत होत्याच. शिवाय, ही सूचीची गाथा मुद्रित करणाऱ्यांनी अभंगातले अनुच्चारित/अर्धोच्चारित अनुस्वार अभावानेच दिले होते. अरे देवा !

आधारासाठी गाथेची जी आवृत्ती घेतली होती, त्यातही अगदी उघड उघड पाठभेदाच्या काही चुका राहून गेल्या होत्या. त्यांचा समावेश शुद्धिपत्रकातही नाही. काही अभंग अकारण पुनरुक्त होते. ते तसेच ठेवायचे की वगळायचे, यावरही खल झाला. पुनरुक्त शब्दांचा व पर्यायाने ते ते शब्द असलेल्या कडव्यांचा समावेश सूचीत करण्याने काहीच साध्य होणार नाही, या विचाराने मग पुनरुक्त अभंग वगळण्याचा (म्हणजे ते एकेकदाच घेण्याचा) निर्णय सर्वानुमते घेतला.

आधारासाठी घेतलेल्या गाथेत अर्थहानी करणारे पाठभेद ज्या–ज्या ठिकाणी जाणवले, त्या–त्या ठिकाणी शब्द निश्चितीसाठी, पाठनिश्चितीसाठी इतर अनेक गाथे पाहिले. एकेका अभंगातल्या एकेका कडव्याशी, एकेका शब्दाशी झोंबी चालली. हे असे. ते तसे. हे असे, तसे का नको आणि ते तसे, असे का हवे, याच्या निश्चितीसाठी इतर गाथ्यांचा शोध. त्यात संप्रदायात विशेष प्रचलित असलेल्या देवडीकर, जोग महाराज, प्र.न.जोशी, खंदारकर महाराज, देहू संस्थान, देहूकर माउली पंढरपूर संस्थान, या आणि अशांसारख्या प्रभृतींनी आयुष्याची आहूती देऊन सिद्ध व संपादित केलेल्या अनेकानेक गाथ्यांचा आधार घेतला.

त्यातूनही एक बाब जाणवली. या उपरोल्लिखित सर्वच पूजनीय विभूतींचा पारमार्थिक क्षेत्रातील अधिकार निर्विवाद श्रेष्ठ आहेच. मात्र मुळातच तुकाराम गाथेचा विस्तार मोठा आहे. त्यातून अभंगांचा अमूकच असा निश्चित क्रम ठरलेला नाही. अभंगांची संख्यानिश्चिती नाही. काही अभंग बऱ्याच गाथ्यांत क्षेपक म्हणून सारखेच असले, तरी सर्वच क्षेपक अभंगांबाबत एकवाक्यता नाही. त्या–त्या संपादकांच्या व्यक्तिमत्वाचा, विचारतत्वांचा आणि व्यक्तिगत धारणांचाही परिणाम त्या–त्या गाथेच्या संपादनावर झाल्याचे जाणवते. विषेशतः अलिकडच्या काळात संपादित–प्रकाशित झालेल्या गाथ्यांतून तर हे अधिक प्रकर्षाने जाणवते.

थोडक्यात, जवळपास प्रत्येकच गाथ्यात उघड उघड अर्थहानी करणाऱ्या शुद्धलेखनाच्या आणि पाठभेदाच्या काहीएक त्रुटी राहून गेल्या आहेत. मात्र त्यामुळे त्या–त्या संपादकांच्या पारमार्थिक श्रेष्ठत्त्वास अगदी कणभरही बाध दूरन्वयेही येत नाही. ‘आम्ही संपादित केलेला(च) गाथा अगदी शंभर टक्के अचूक व निर्दोष आहे व म्हणून तोच प्रमाणभूत आहे’, असा दावा कोणीही संपादक कधीही करणार नाहीत. असे न करण्यात श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगांच्या चिंतन सातत्याचा परिणाम म्हणून आलेल्या विनयाचा जसा भाग असणार आहे, त्याही पेक्षा परखड वास्तवाची रास्त जाणीव जास्त असणार आहे.

माझ्यापुरते व्यक्तिगत बोलायचे झाले, तर वय, ज्येष्ठता–योग्यता, ज्ञान–ध्यान, जप–तप, मनन–आचरण, क्षमता–पात्रता आदिकरून कोणताही अधिकार मुळी सुद्धा नसताना या कार्यास प्रवृत्त झालो, ते केवळ ‘वोहोळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें ।’ याच एका भावनेने. हे गाथेचे काम सुरू झाल्यापासून आतापर्यंत लौकिक–पारलौकिक स्वरूपाच्या अनेकानेक अडचणी आल्या. पण ज्याचे हे काम आहे, तोच कृपाळूपणे अल्प धारिष्ट्य पाहातो आहे, ह्या भावनेने धीर धरला. शिवाय, श्री.पीव्हींच्या शब्दांचे स्मरण होतेच. ‘जो पर्यंत असे काम करण्यास आपण थोडेफार तरी पात्र होत नाही, तो पर्यंत असे कार्य करण्यास आपण प्रवृत्तच होणार नाही. प्रवृत्त झालो, तर कार्य सुरू होणार नाही. सुरू झाले, तर निर्वेध होणार नाही आणि शेवटी ज्यांचे ते कार्य आहे, त्यांची संमती नसेल, तर ते कार्य कधीच पूर्णही होणार नाही’ – असे श्री.पीव्ही म्हणत असत व त्यास प्रमाण म्हणून ज्ञानेश्वरीच्या सूचीच्या वेळी त्यांना आलेल्या काही अनुभवांचे दाखले देत असत. त्यांच्या शब्दांचा आधार मानून आणि अनुभव घेत घेत जमेल तसे कार्य चालू ठेवले.

ही सूची आता प्रकाशित होते आहे, ती हे कार्य परिपूर्ण झाल्यामुळे नव्हे. ‘या बालकांना आणखी किती तिष्ठवायचे’ – असा विचार बहुदा भगवतांने आणि श्रीतुकाराम महाराजांनी केला असावा आणि आमचे धैर्य अगदीच संपण्यापूर्वी हा ठेवा, फारशी काही सेवा न घडताच प्रकट झाला. त्यात

श्री.शेखरकाका आणि श्री.समीरजी कुसुरकर यांचे सर्व श्रेय आहे. श्री.शेखरकाकांची एकविध भावाने चाललेली तपस्या आणि श्री.समीरजींच्या अविरत तंत्रकुशलतेची भक्कम साधना यामुळे श्री.पीव्हींच्या प्रेरणेचे हे बळ आणि फळ आज मूर्त रूपात साकार होते आहे. श्री.पीव्हींच्या पत्नी प्रफुल्ल वहिनींची प्रेमळ विचारणा संप्रेरक ठरत गेली. 'पतिचिया मता । अनुसरोनि पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटेचि ते ।।'... ही माउलींची ओवी श्रीमती प्रफुल्ल वहिनींच्या रूपाने अनुभवता येते. 'पाहा पां अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे । ते पतीहीहूनि काय न वर्णिजे । पतिव्रता ।।'

अध्यात्म, तत्वज्ञान, धर्म, नीती, वेगवेगळी शास्त्रे, विज्ञान, कला, साहित्य, काव्य, भाषा, समाजरचना, इतिहास, निसर्ग, जीव–सृष्टी संबंध, मानवाचे अंतिम प्राप्तव्य, त्यासाठीची साधने आणि साधना, स्वतःचे सुख, समाजाचे व संपूर्ण विश्वाचे कल्याण या आणि अशा अनेकानेक परिप्रेक्ष्यांतून आज संतसाहित्याबद्द्ल ममत्व वाटणाऱ्यांचे आणि संतसाहित्याचा अभ्यास करणाऱ्यांचे प्रमाण वाढते आहे. अशा सश्रद्ध सुहृदांची आणि चिकित्सक अभ्यासकांची सोय व्हावी, ही या 'सूची'च्या निर्मितीमागची भूमिका आहे आणि ही भूमिका सतत ध्यानी ठेवणे गरजेचे आहे. तसेच, शुद्धलेखनाच्या किंवा पाठप्रामाण्याच्याही दृष्टीने हे संपादन जास्तीत जास्त निर्दोष करण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला असला, तरी तो पूर्ण झालेला नाही, होणे शक्यही नाही आणि पाठप्रामाण्याच्या दृष्टीने हे संपादन कोणी पाहूही नये, अशी आमची नम्र विनंती आहे. या संपादनाचा उद्द्देशच वेगळा आहे. ही 'शब्द–कडवे–अभंग–सूची' म्हणजे तुकारामगाथेचे विषयवार वर्गीकरणही नव्हे. तर, जगद्गुरू श्रीतुकाराम महाराजांच्या गाथ्यात असलेल्या अभंगांतील सर्व शब्दांची अकारविल्ह्यांनुसार असलेली ही यादी आहे.

कोणत्याही दृष्टीने ज्या कुणास तुकारामगाथेचा अभ्यास करावयाचा आहे, आनंद घ्यायचा आहे, त्यांस 'एक दिशादर्शक सोय' एवढाच या उपक्रमामागचा उद्द्देश आहे. अमुक एक शब्द गाथेत आहे काय, असल्यास कुठे कुठे, कोणकोणत्या संदर्भात, कोणकोणत्या अभंगात आहे, हे चटकन कळावे–मिळावे – ही या सुचीच्या संपादनाची उपयुक्तता आहे व एवढाच त्यामागचा उद्द्देशही आहे. म्हणून त्या त्या शब्दापुढे ते ते कडवे दिल्यानंतर ज्या अभंगात ते कडवे आहे, त्या अभंगाचा क्रमांक व नंतर कडव्याचाही क्रमांक दिला आहे. म्हणजे प्रत्येक शब्द आणि चरण / कडवे समोरासमोर पाहता येईल. ज्या कुणास अधिक संदर्भासाठी तो संपूर्ण अभंग पहावयाचा आहे, तो त्या क्रमांकाचा अभंग सूचीच्या आधी दिलेल्या संपूर्ण गाथेत त्या क्रमांकाने आहे. तो पहाता येईल.

या सूची मागील उद्द्देश साध्य व्हावेत , म्हणून अर्थातच शब्दांच्या अकारविल्ह्यांचा क्रम प्राधान्याने पाळला आहे. अर्थाचा नव्हे. उदाहरणार्थ 'अंघोळ' आणि 'आंघोळ' हे दोन्ही शब्द मराठी बोलीभाषेत प्रचलित आहेत. गाथेतही हे दोन्ही शब्द आहेत . काही अभंगात 'अंघोळ' तर काही अभंगांत

‘आंघोळ’ असा शब्द आहे. दोघांचा अर्थ एकच आहे. तरीही अकारविल्ह्यानुसार सूचीत हे दोन्ही शब्द एकमेकांपासून दूर अंतरावर आहेत. त्यामुळे कुणास अंघोळ–आंघोळ, या अर्थाने गाथेतले संदर्भ शोधायचे असतील आणि तो शोधक जर या दोन पैकी कुठल्यातरी एकाच शब्दापाशी आला आणि थांबला, तर साहजिकच दुसऱ्या शब्दाच्या संदर्भापासून तो शोधक वंचित राहील. थोडक्यात, त्यांनी ‘अंघोळ’ आणि ‘आंघोळ’ हे दोन्ही शब्द पहायला हवेत. तीच बाब ‘अंग’ आणि ‘आंग’ याही शब्दांची. प्रमाण मराठीत केवळ ‘अंघोळ’ व ‘अंग’ हे शब्द प्रचलित असले, तरी बोलीभाषेत ‘अंघोळ’ आणि ‘आंघोळ’ असे आणि ‘अंग’ आणि ‘आंग’ असे दोन्ही पाठ प्रचलित आहेत आणि गाथेत बोली भाषेतील शब्द खूप मोठ्या प्रमाणात आहेत. त्या शब्दांचे आपण प्रमाणीकरण करणे शक्य नाही, आणि योग्य तर मुळीच नाही. म्हणून मग सूचीत असे एकाच अर्थाचे वेगवेगळे शब्द वेगवेगळ्या ठिकाणी येणे अगदी स्वाभाविक आहे. ‘अंघोळ–आंघोळ’ हे तरी तसे जवळजवळचे शब्द आहेत. पण ‘अलंकार’ आणि‘भूषण’ हे समानार्थी शब्द असूनही सूचीत एकमेकांपासून खूप लांबवर आहेत. थोडक्यात, जर कुणास ‘दागिना’ या अर्थाचे गाथेतील संदर्भ शोधायचे असतील, तर त्याने त्या शब्दाच्या समानार्थी असलेल्या सर्व शब्दांपर्यंत पोहचले पाहिजे.

ही सूची विषयवर्गवारीने नसली तरी, विशिष्ट विषयांच्या दृष्टीने संदर्भ शोधण्याकरिताही ही सूची वापरता येईल. ‘सेवा’ विषयाशी संबंधित, सेवक, चाकर, नोकर, शिपाई, किंकर, दास, पाईक, असे शब्द पाहता येतील. तसेच सेवा कुणाची? तर मालक, स्वामी यांची. मग तेही शब्द पाहता येतील. भिकारी, याचक, मागता (मागणारा) यांचे प्रतियोगी/विरुद्धार्थी शब्द म्हणून दाता, दानशूर – असेही शब्द पाहता येतील. ही उदाहरणे देण्याचे कारण म्हणजे ही सूची जास्तीत जास्त प्रकारे उपयोगात आणता येणे शक्य आहे, हे दर्शविणे आहे. तशी ती आणली पाहिजे. तरच तीमागचा उद्देश अधिक सफल होईल.

अर्थात, गाथेशी, गाथेच्या भाषेशी जितका अधिक परिचय असेल आणि होईल, तितका या सूचीचा वापर सुलभ आणि जास्त होईल. कुणाला ‘पांडुरंग’ हा संदर्भ शोधायचा असेल, तर त्यासोबत ‘विठ्ठल’ हाही शब्द पाहावा लागेल. पण प्रत्येकवेळी केवळ समानार्थी शब्द पाहून वा प्रतियोगी/विरुद्धार्थी शब्द पाहून सर्वच संदर्भ मिळतील, असेही नाही. प्रत्येकच शब्दाला समानार्थी व/वा विरुद्धार्थी शब्द असतीलच असेही नाही. ‘विठ्ठल’, ‘पांडुरंग’ ‘पंढरिराया’ ‘विठोबा’ ‘विठाबाई’, या आणि अशा शब्दांपुढचे सर्व कडवे पाहूनही सर्वच संदर्भ हाती आले, असे होणार नाही. पंढरपूरला कमरेवर हात ठेऊन, विटेवर उभ्या असलेल्या त्या भगवंताचे वर्णन करणाऱ्या, ‘सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ।’... या अभंगाशिवाय ते संदर्भ पूर्ण होणार नाहीत. पण या अभंगात तर, ज्याचे हे वर्णन आहे त्या देवाचे कोणतेच नाव नाही, केवळ वर्णन आहे. पण श्रीविठ्ठलाशी संबंधित गाथेतील संदर्भ

शोधताना हा अभंग सोडून कसे चालेल? तेव्हा या अभंगात कोणत्याही नावाचा उल्लेख नसला, तरी ज्याच्याशी संबंधित संदर्भ आपण शोधतो आहोत, त्याच्याशीच संबंधित हा एक अत्यंत महत्त्वाचा अभंग आहे, एवढे ध्यानात येण्याइतका तरी परिचय गाथेशी असणे आवश्यक आहे.

वर दिलेले उदाहरण खूपच ढोबळ आहे. ‘संत’ या विषयाशी संबंधित अनेक अभंग असे आहेत, की त्यात ‘संत’ वा त्या संकल्पनेच्या समानार्थी शब्द नाही, पण त्या अभंगात मात्र संतलक्षणे पूर्ण वर्णिलेली आहेत. उदाहरणार्थ ‘साधनें आमुचिं आज्ञेचि धारके । प्रमाण सेवकें स्वामिसत्ता ।। १।।’ हा पूर्ण अभंग. यात वर्णन संतांचे आहे, पण संत वा तत्समानार्थी कुठलाच शब्द या संपूर्ण अभंगात नाही. पण संत या संकल्पनेशी संबद्ध संदर्भ शोधत असताना हा अभंग नाही घेतला गेला, तर संतलक्षणे आणि संतकार्य वर्णन करणारा एक महत्त्वाचा अभंग सुटेल.

जाणकार, जिज्ञासु, अभ्यासक, संशोधक, कीर्तनकार, प्रवचनकार, व्याख्याते, शिक्षक, अध्यापक, आस्वादक अशांसारख्या सर्वांनाच गाथेचा जास्तीत जास्त उपयोग व्हावा, करता यावा म्हणून वरील उदाहरणे दिली आहेत. तसा तो होण्यात ही सूची अंशाल्पांशानेही का होईना, साहाय्यभूत झाली, तरी या सूचीचा उददे्श सफल झाल्याचे म्हणता येईल. ‘अद्वैत प्रकाशना’च्या या आणि अशासारख्या अनेकानेक उपक्रमांशी प्रत्यक्ष–अप्रत्यक्षपणे जे जे संबंधित आहेत, त्या–त्या सर्वांसही समाधान लाभेल. अक्षरांचा केलेला हा श्रम फळाला येईल.

हा खेळ एकट्याचा नव्हेच, म्हणून सर्व मेळ जमणे आवश्यक आहे. या उपक्रमास अनेकानेक सुहृदांचे सहकार्य लाभले आहे. त्या प्रत्येकाचा नामोल्लेख केवळ अशक्य आहे. शिवाय त्यातील बहुतेक, ‘माझें नांवरूप हारपो’ अशाच विचारांचे असल्यामुळे त्यांचा नामोल्लेख केलेला त्यांनाही कदाचित रुचणार नाही. पण त्या सर्व सुहृद सज्जनांच्या स्नेहाचे ऋण; लेणं म्हणून मिरवण्यात आम्हाला धन्यता आहे. या सर्व सोयऱ्यांचे स्नेहसंचित ही आमची मिरास आहे.

त्यापैकी सर्वात ज्येष्ठ व श्रेष्ठ म्हणजे विद्यावाचस्पती श्रीमन् सदानंदजी मोरे. ते केवळ ‘शहाणे पंडित’ असते, तर श्रीतुकोबारायांच्या मनास आले नसते. पण श्री.सदानंदजी भक्तीचा जिव्हाळा जाणणारेही आहेत. ते साक्षात् जगद्गुरू श्रीतुकोबारायांचे वंशज आहेत, म्हणून याही अंगाने ‘दैवाचे पुतळे’ आहेत. तेव्हा या तुकारामगाथेच्या ‘शब्द–कडवे–अभंग–सूची’ला प्रास्ताविकपर आशीर्वादाचे मंगलाचरण आळविण्यास त्यांच्याशिवाय दुसरे अधिकारी कोण? श्रीतुकोबारायांवर आमचा वंशपरंपरा पैतृक अधिकार आहे, म्हणून तो श्री.सदानंदजी मोरेंवरही आहे. मुख्य म्हणजे त्यांच्यावरील आमचा अधिकार

त्यांनाही सहर्ष मान्य आहे. त्याच प्रेमापोटी डॉ.सदानंदजी मोरे यांनी प्रस्तावना लिहून दिली. आम्हास उदास न करता आमची आस पुरविली. 'तुका म्हणे काय होऊं उतराई । जीव ठेवूं पायीं संतांचिये ।।' त्यांच्या ऋणात रहाण्यातच आमचे भाग्य आहे.

या उपक्रमामागील सर्व ज्ञात–अज्ञात कारण घटकांना एकत्र आणणाऱ्या विश्वचालक श्रीपांडुरंगाची अमर्याद अगाध कृपालीला काय जाणावी? काय वर्णावी? त्याची असीम, अनंत, शाश्वत, अखंड व अभंग स्वरूपाची कृपा जगद्गुरू श्रीमन् तुकाराम महाराजांच्या आणि त्यांच्या गाथेच्या रूपाने या महाराष्ट्रदेशी प्रकटली आहे. आम्हा वारकऱ्यांसाठी भगवंत, संत आणि त्यांचे ग्रंथ या बाबी पृथक् नाहीतच. या सर्वांचेच विलोभनीय अद्वैत आहे. त्यात सर्व संतांचे पुन्हा परस्परांशी अद्वैत आहे. श्रीपांडुरंगाचा, श्रीमहाविष्णुचा अवतार म्हणजे श्रीज्ञानेश्वर माउली आणि 'तुका विष्णु नाहीं दुजा' असे विष्णुमय महावैष्णव श्रीतुकोबाराय. पाया आणि कळस भिन्न नाहीतच. भागवत धर्माच्या भव्य–दिव्य, उदात्त–उन्नत इमारतीचे हे एकरूप अन् सर्व शुभंकर रूप आहे. कधी त्या इमारतीच्या आसपास, तर कधी त्या इमारतीत वावरणाऱ्या एखाद्या धुलीकणाची जरी पात्रता प्राप्त झाली, तरी जीवन उजळून निघेल. त्यांच्या पसायकृपेने हे व्हावे, हे मागून आणि त्यांनीच करवून घेतलेली ही सेवा त्यांनी गोड करून घ्यावी, हे विनवून थांबतो.

विठ्ठलऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ
पुंडलिकवरदे हरि विठ्ठल ऽऽ श्री ज्ञानदेव तुकाराम ऽऽ
माउली ज्ञानेश्वर महाराज की ऽऽ जय ।।
जगद्गुरू तुकाराम महाराज की ऽऽ जय ।।
सब संतन् की ऽऽ जय ।। पंढरीनाथ भगवान की ऽऽ जय ।।
विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ विठ्ठल ऽऽ

श्री. चकोर श्रीकृष्ण बावीस्कर

।। तुका झालासे कळस ।।

## प्रकाशकीय मनोगत

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ।।

आज गोकुळाष्टमी. भगवान श्रीकृष्णजन्माच्या या सुमंगल सुमुहूर्तावर अद्वैत प्रकाशनाची ''तुका झालासे कळस'' ही संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांच्या गाथेची ''शब्द अभंग सूची'' प्रकाशित करताना ''आनंदाचे डोही, आनंद तरंग'' अशी अवस्था झाली आहे.

''ज्ञानदेवें रचिला पाया, तुका झालासे कळस.'' अद्वैत प्रकाशनाचे प्रथम पुष्प ज्ञानेश्वरीच्या ''तो वाग्यज्ञु म्हणिजे'' या सीडीच्या रुपात फुलून आले. तेव्हाच ''पायाबरोबरच कळसाचाही'' विचार झाला होताच. तो आज भगवंत, माउली आणि तुकोबारायांच्या कृपाशीर्वादाने पूर्णत्वास येत आहे. ''लोकीं तरी आथी ऐसें । जे दुरुनी कळसु दिसे । आणि भेटीची हातवसे । देवतेची तिये ।।'' (ज्ञा. १८–३१) तुकोबारायरुपी कळस देवतेचे अभंग दर्शन आज घडत आहे.

''आम्ही वैकुंठवासी । आलो याच कारणासी । बोलिले जे ऋषि । साच भावे वर्ताया ।।'' असे स्वत:च आपले जीवितकार्य वर्णन करणाऱ्या तुकोबारायांचा जन्म सधन घराण्यात, बोल्होबा आणि कनकाई या मातापित्यांच्या उदरी शके १५३० मध्ये झाला; त्यांची घरची महाजनकी होती, व्यवसायाने ते वैश्य (वाणी) होते; त्यांचे मालकीचे पांडुरंगाचे मंदिर होते; त्यांचे कुळी आषाढी कार्तिकीची वारी परंपरा होती; गीता, भागवत, ज्ञानेश्वरीचे संस्कार झाले होते; विवाहोत्तर माता, पिता, प्रथम पत्नी, मुलगा, वडीलबंधु, वहिनी या सर्वांचा वियोग झाला; दुष्काळाशी सामना करावा लागला; त्यातूनच एकांतवास, अखंड भक्ती, अखंड चिंतन, अखंड नामस्मरण होत गेले; जीवनाचा अर्थबोध झाला; शके १५५४ मध्ये गुरु उपदेश घडला; संत नामदेवरायांचा अभंग करण्याचा आदेश झाला; निंदेचा सामना करावा लागला; इंद्रायणीतून अभंग तरुन आले आणि अखेरीस सदेह वैकुंठगमन झाले – हे तुकोबारायांचे संक्षिप्त लौकिक चरित्र महाराष्ट्रातील सर्वच भक्त भाविकजनांना ज्ञात आहेच.

तथापि, तुकाराम महाराज समस्त मराठी भाविकांच्या हृदयात निवास करुन आहेत, ते त्यांच्या अभंगवाणीतून ! ज्ञानेश्वरीची भाषा 'शके बाराशे बारोत्तरे'' या काळातील. तुकोबांची भाषा तद्नंतर तीन साडेतीन शतकानंतरची. त्यामुळे ती जास्त सुगम आहे. त्यांचा एकेक अभंग म्हणजे एकेक 'सुभाषित'च आहे. वानगीदाखल –

''साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ।''
''शुद्ध बिजापोटी । फळें रसाळ गोमटी ।''
''नम्र झाला भूतां । तेणे कोंडिले अनंता ।''
''लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा।''
''ज्याचे अंगी मोठेपण । तया यातना कठीण।''
''नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ।''
''मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचे कारण ।''

अशी अनंत उदाहरणे देता येतील. ''सहज बोलणे हित उपदेश'' असेही खूप अभंगांत आहे. जसे ''जोडोनियां धन उत्तम वेव्हारें।'' आणि ''सुख पाहता जवापाडे । दु:ख पर्वताएवढे ।'' तसेच, ''तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणासी ।''

अशा सुमारे ४५०० अभंगांचा रसास्वाद घेत घेत साधारण दोन लाख शब्दांची अभंग सूची साकारण्याचे धनुष्य उचलणे ''येरा गबाळ्याचे'' काम नव्हते. या प्रकल्पाची मूळ संकल्पना वै.श्री. पद्माकर विठ्ठल कुलकर्णी यांची आणि त्याची मुहूर्तमेढही त्यांच्याच हयातीत झाली. श्री. पीव्हींचे पश्चात् या अभंगगाथेच्या संपादनाची जबाबदारी ह.भ.प. श्री. चकोर श्रीकृष्ण बावीस्कर महाराजांनी लीलया पेलली. याठिकाणी माउली ज्ञानेश्वरांच्या काही ओव्यांचा आधार घ्यावासा वाटतो. ''वाचस्पतीचेनी पाडे । सर्वज्ञता तरी जोडे।।'' असे ज्ञान श्री. बावीस्करांनी संपादन केलेले आहे. श्रीभगवद्गीतेतील ''शुचिनां श्रीमतां गेहे।'' या श्लोकास अनुसरुन कीर्तन प्रवचनाची परंपरा जपणाऱ्या घराण्यात त्यांचा जन्म आहे. कीर्तन, प्रवचन आणि वारी करणारी त्यांची पाचवी पिढी आहे. ''सततं कीर्तयन्तो मां ।'' या गीतोपदेशानुसार बावीस्कर महाराज जेव्हा एकतानतेने रसाळ प्रवचन–कीर्तन करतात तेव्हा ''पुढां स्नेह पाझरे । मागां चालती अक्षरें।'' याची प्रचिती येते. ''ऐसे माझेनि नाम घोषे । नाहीची करिती विश्वाची दु:खे । अवघे जगची महासुखे । दुमदुमीत भरले ।'' हेच जणू श्री. बावीस्कर महाराजांचे जीवितकार्य आहे, हे प्रकर्षाने जाणवते. त्यांची कीर्तन प्रवचन सेवा ऐकताना ''मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखे ।''

अशी त्यांची अवस्था होते आणि श्रोते सुद्धा महाराजांप्रमाणे तल्लीन, तद्रूप, तन्मय होऊन जातात. श्री. बावीस्कर महाराजांचा हा आध्यात्मिक अधिकार आहे. तसेच, लौकिकातही आहे. आज नाशिक येथे प्रमुख न्यायाधीश म्हणून ते सेवा कार्यरत आहेत. म्हणूनच ''ते चालते ज्ञानाचे बिंब ।'' असेच त्यांच्या विचार–आचरणांतून जाणवते. त्यामुळेच जगद्‌गुरु संत तुकाराम महाराजांच्या या सूची सेवाकार्यात त्यांचा प्रमुख सहभाग मिळणे, हे अद्वैत प्रकाशनाचे महद्‌भाग्य म्हणता येईल.

''आम्हां घरी धन शब्दांचीच रत्नें । शब्दांचीच शस्त्रें यत्न करुं ।'' या तुकोबारायांच्या शब्दप्रेमास भुलून आम्हीही अभंगांतील शब्दांचा सूची प्रकल्पाचा खेळ खेळण्याचा मोह टाळू शकलो नाही. या सूचीची उपयुक्तता, महत्त्व आणि उपयोग यांचे सविस्तर विवेचन श्री. बावीस्कर महाराजांनी त्यांच्या मनोगतात दिलेले आहेच. संत सद्‌गुरु तुकाराम महाराजांचे वंशज प्रा.श्री. सदानंदजी मोरे म्हणजे ''जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि घाले । जे शांतीसी आले । पालव नवे।'' या ओवीचे सगुण साकार रुपडेच जणू ! श्री. मोरे सरांनी या प्रकल्पास आशीर्वचन दिलेले आहे. आम्ही त्यांचे सदैव ऋणी आहोत. तद्वतच मुद्रणाचे काम करुन देणारे श्री. देव आणि श्री. अविनाश कढे, आर्टिस्ट श्री. दीक्षित आणि सीडी तयार करुन देणारे श्री. रानडे या सर्वांचे, त्यांना रुचणार नसले तरी, आभार मानणे आमचे कर्तव्य आहे.

अद्वैत प्रकाशनाच्या यामागील प्रकल्पांप्रमाणेच याही 'शब्द अभंग सूची' प्रकल्पाचे भक्त, भाविक, साधुजन स्वागत करतील, अशी आशा आहे. ''उणे ते मज देयावे ।'' या न्यायाने ''न्यून तें पुरते । अधिक तें सरते ।'' करुन घ्यावे, ही विनम्र प्रार्थना.

''किंबहुना तुमचें केले । धर्मकीर्तन हें सिद्धी गेले ।
येथे माझें जी उरले । पाईकपण ।।''

प्रकाशक

## अद्वैत पब्लिकेशन्स्

# प्रकल्प

‘ऐसीं नानावर्णें रूपडीं’ –श्री ज्ञानेश्वरी – दृष्टांत सिद्धांत रूप चतुरंगातील पारायण प्रत
‘तो वाग्यज्ञु म्हणिजे’ – श्री ज्ञानेश्वरी – शब्द ओवी सूची
‘ते हे मंत्ररहस्य गीता’ –श्रीमद् भगवद्गीता – शब्द श्लोक सूची
‘हे गीतासागर तरंग’ – श्रीमद् भगवद्गीता पठण – दृक श्राव्य प्रकल्प
‘तुका झालासे कळस’ – श्री तुकाराम गाथा – शब्द अभंग सूची
‘हे शब्द रत्नांचे सागर’ – श्रीमद् दासबोध – शब्द ओवी सूची
‘शब्दब्रह्में होसी आकळा’ – श्री ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग सूची
‘नाचू कीर्तनाचे रंगी’ – श्री नामदेव गाथा – शब्द अभंग सूची
‘श्रीकृष्णकीर्तीचे एकेक अक्षर’ – श्री एकनाथी भागवत – शब्द ओवी सूची
‘तयाचे बिसाट शब्द’ – श्री ज्ञानदेव हरिपाठ – शब्द अभंग सूची

## ।। अनुक्रमणिका (अक्षरवार शब्दसंख्या) ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | २०६३८ | १२ | ड | ५८१२९ | ४५६ | २४ | य | १३७४३३ | २९८३ |
| २ | क | २०६३९ | १५६४५ | १३ | ढ | ५८५८५ | ६७ | २५ | र | १४०४१६ | ३५३३ |
| ३ | ख | ३६२८४ | १५३१ | १४ | त | ५८६५२ | १७९०१ | २६ | ल | १४३९४९ | ३००७ |
| ४ | ग | ३७८१५ | ३८३७ | १५ | थ | ७६५५३ | ५१० | २७ | व | १४६९५६ | ९४५० |
| ५ | घ | ४१६५२ | २४५२ | १६ | द | ७७०६३ | ८२२८ | २८ | श | १५६४०६ | १९२० |
| ६ | च | ४४१०४ | ३२३६ | १७ | ध | ८५२९१ | २६८० | २९ | श्र | १५८३२६ | ३५६ |
| ७ | छ | ४७३४० | २०५ | १८ | न | ८७९७१ | १२६६० | ३० | ष | १५८६८२ | १३ |
| ८ | ज | ४७५४५ | ७५०० | १९ | प | १००६३१ | १०७०७ | ३१ | स | १५८६९५ | ११५५८ |
| ९ | झ | ५५०४५ | १३८० | २० | फ | १११३३८ | १०२५ | ३२ | ह | १७०२५३ | ६४६३ |
| १० | ट | ५६४२५ | २६३ | २१ | ब | ११२३६३ | ४८०२ | ३३ | क्ष | १७६७१६ | ३३२ |
| ११ | ठ | ५६६८८ | १४४१ | २२ | भ | ११७१६५ | ५१४२ | ३४ | ज्ञ | १७७०४८ | ९२ |
|  |  |  |  | २३ | म | १२२३०७ | १५१२६ |  |  |  |  |

# अ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १ | ॐ | १ | ५ | |
| २ | अ | ६ | ५६२० | |
| ३ | आ | ५६२६ | ८२९३ | |
| ४ | इ | १३९११ | ३५७ | |
| ५ | ई | १४२७६ | ५ | |
| ६ | उ | १४२८१ | २८९३ | |
| ७ | ऊ | १७१७४ | २५ | |
| ८ | ऋ | १७१९९ | ७४ | |
| ९ | ए | १७२७३ | १५८० | |
| १० | ऐ | १८८५३ | १४१६ | |
| ११ | ओ | २०२६९ | ३५१ | |
| १२ | औ | २०६२० | १९ | |
| | अ | | | २०६३८ |

# क

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १३ | क | २०६३९ | ५५२२ | | २१ | कै | ३३८९९ | ५४४ | |
| १४ | का | २६१६१ | ४८७६ | | २२ | को | ३४४४३ | १६५२ | |
| १५ | कि | ३१०३७ | २४५ | | २३ | कौ | ३६०९५ | ७० | |
| १६ | की | ३१२८२ | २९३ | | २४ | क्र | ३६१६५ | ३ | |
| १७ | कु | ३१५७५ | ४१३ | | २५ | क्रि | ३६१६८ | ४४ | |
| १८ | कू | ३१९८८ | १२ | | २६ | क्री | ३६२१२ | २३ | |
| १९ | कृ | ३२००० | ५८६ | | २७ | क्रो | ३६२३५ | ४२ | |
| २० | के | ३२५८६ | १३१३ | | २८ | क्ले | ३६२७७ | ७ | |
| | | | | | | क | | | १३२६० |

# ख

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २९ | ख | ३६२८४ | ५१६ | |
| ३० | खा | ३६८०० | ३८५ | |
| ३१ | खि | ३७१८५ | १२ | |
| ३२ | खी | ३७१९७ | ६ | |
| ३३ | खु | ३७२०३ | १०७ | |
| ३४ | खू | ३७३१० | ३९ | |
| ३५ | खे | ३७३४९ | २४८ | |
| ३६ | खै | ३७५९७ | २ | |
| ३७ | खो | ३७५९९ | १९८ | |
| ३८ | ख्या | ३७७९७ | १८ | |
| | ख | | | १५३१ |

# ग

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३९ | ग | ३७८१५ | ६७६ | |
| ४० | गा | ३८४९१ | ८५६ | |
| ४१ | गि | ३९३४७ | ५२ | |
| ४२ | गी | ३९३९९ | ६२ | |
| ४३ | गु | ३९४६१ | ५२४ | |
| ४४ | गू | ३९९८५ | ६ | |
| ४५ | गृ | ३९९९१ | ७ | |
| ४६ | गे | ३९९९८ | ३९० | |
| ४७ | गो | ४०३८८ | ११०१ | |
| ४८ | गौ | ४१४८९ | ८२ | |
| ४९ | ग्र | ४१५७१ | १४ | |
| ५० | ग्रा | ४१५८५ | २५ | |
| ५१ | ग्वा | ४१६१० | ४२ | |
| | ग | | | ३८३७ |

# घ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ५२ | घ | ४१६५२ | ८४६ | |
| ५३ | घा | ४२४९८ | ७१९ | |
| ५४ | घु | ४३२१७ | १८ | |
| ५५ | घृ | ४३२३५ | ४ | |
| ५६ | घे | ४३२३९ | ५७३ | |
| ५७ | घो | ४३८१२ | १०१ | |
| ५८ | घ्या | ४३९१३ | १८९ | |
| ५९ | घ्रा | ४४१०२ | २ | |
| | घ | | | २४५२ |

# च

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ६० | च | ४४१०४ | ७६७ | |
| ६१ | चा | ४४८७१ | ८१९ | |
| ६२ | चि | ४५६९० | ११०३ | |
| ६३ | ची | ४६७९३ | ९ | |
| ६४ | चु | ४६८०२ | २१३ | |
| ६५ | चू | ४७०१५ | ३ | |
| ६६ | चे | ४७०१८ | ६४ | |
| ६७ | चै | ४७०८२ | ८ | |
| ६८ | चो | ४७०९० | १८९ | |
| ६९ | चौ | ४७२७९ | ६१ | |
| | च | | | ३२३६ |

# छ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ७० | छ | ४७३४० | १४३ | |
| ७१ | छा | ४७४८३ | ४० | |
| ७२ | छे | ४७५२३ | २२ | |
| | छ | | | २०५ |

# ज

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ७३ | ज | ४७५४५ | २१८१ | |
| ७४ | जा | ४९७२६ | २३३९ | |
| ७५ | जि | ५२०६५ | ३११ | |
| ७६ | जी | ५२३७६ | १००७ | |
| ७७ | जु | ५३३८३ | ३५ | |
| ७८ | जे | ५३४१८ | ५३९ | |
| ७९ | जै | ५३९५७ | २१० | |
| ८० | जो | ५४१६७ | ५०२ | |
| ८१ | ज्या | ५४६६९ | ३३८ | |
| ८२ | ज्यो | ५५००७ | १७ | |
| ८३ | ज्व | ५५०२४ | ३ | |
| ८४ | ज्वा | ५५०२७ | १८ | |
| | ज | | | ७५०० |

# झ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ८५ | झ | ५५०४५ | १०२ | |
| ८६ | झा | ५५१४७ | ११८९ | |
| ८७ | झि | ५६३३६ | ३ | |
| ८८ | झी | ५६३३९ | १ | |
| ८९ | झु | ५६३४० | ३८ | |
| ९० | झे | ५६३७८ | ८ | |
| ९१ | झो | ५६३८६ | ३९ | |
| | झ | | | १३८० |

# ट

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ९२ | ट | ५६४२५ | २३ | |
| ९३ | टा | ५६४४८ | १८३ | |
| ९४ | टि | ५६६३१ | २२ | |
| ९५ | टी | ५६६५३ | ३ | |
| ९६ | टे | ५६६५६ | ७ | |
| ९७ | टो | ५६६६३ | २५ | |
| | ट | | | २६३ |

# ठ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ९८ | ठ | ५६६८८ | ७६ | |
| ९९ | ठा | ५६७६४ | ९०८ | |
| १०० | ठि | ५७६७२ | ४ | |
| १०१ | ठु | ५७६७६ | २ | |
| १०२ | ठे | ५७६७८ | ४४१ | |
| १०३ | ठो | ५८११९ | १० | |
| | ठ | | | १४४१ |

# ड

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १०४ | ड | ५८१२९ | १३ | |
| १०५ | डा | ५८१४२ | ५० | |
| १०६ | डि | ५८१९२ | ९ | |
| १०७ | डु | ५८२०१ | २२ | |
| १०८ | डो | ५८२२३ | ३५७ | |
| १०९ | डौ | ५८५८० | ५ | |
| | ड | | | ४५६ |

# ढ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ११० | ढ | ५८५८५ | ११ | |
| १११ | ढा | ५८५९६ | १२ | |
| ११२ | ढि | ५८६०८ | १ | |
| ११३ | ढी | ५८६०९ | २ | |
| ११४ | ढु | ५८६११ | १२ | |
| ११५ | ढे | ५८६२३ | १४ | |
| ११६ | ढो | ५८६३७ | १५ | |
| | ढ | | | ६७ |

# त

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११७ | त | ५८६५२ | २१०६ | | १२६ | तो | ७२९९९ | १८२० | |
| ११८ | ता | ६०७५८ | ४१६ | | १२७ | त्य | ७४८१९ | १९ | |
| ११९ | ति | ६११७४ | २१७ | | १२८ | त्या | ७४८३८ | १५५१ | |
| १२० | ती | ६१३९१ | २५२ | | १२९ | त्र | ७६३८९ | २ | |
| १२१ | तु | ६१६४३ | ७२४८ | | १३० | त्रा | ७६३९१ | ३० | |
| १२२ | तू | ६८८९१ | ४२१ | | १३१ | त्रि | ७६४२१ | ८९ | |
| १२३ | तृ | ६९३१२ | ६९ | | १३२ | त्रै | ७६५१० | १६ | |
| १२४ | ते | ६९३८१ | ३०४८ | | १३३ | त्व | ७६५२६ | १० | |
| १२५ | तै | ७२४२९ | ५७० | | १३४ | त्वा | ७६५३६ | १७ | |
| | | | | | | त | | | १७९०१ |

# थ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १३५ | थ | ७६५५३ | ३० | |
| १३६ | था | ७६५८३ | ८३ | |
| १३७ | थि | ७६६६६ | ३६ | |
| १३८ | थु | ७६७०२ | ३२ | |
| १३९ | थे | ७६७३४ | ५ | |
| १४० | थो | ७६७३९ | ३२४ | |
| | थ | | | ५१० |

# द

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १४१ | द | ७७०६३ | ५९९ | | १५२ | द्या | ८४८५२ | २५६ | |
| १४२ | दा | ७७६६२ | ११२० | | १५३ | द्यु | ८५१०८ | २ | |
| १४३ | दि | ७८७८२ | ७६५ | | १५४ | द्र | ८५११० | ४५ | |
| १४४ | दी | ७९५४७ | १९४ | | १५५ | द्रु | ८५१५५ | २ | |
| १४५ | दु | ७९७४१ | ११६३ | | १५६ | द्रो | ८५१५७ | १ | |
| १४६ | दू | ८०९०४ | ९४ | | १५७ | द्रौ | ८५१५८ | १२ | |
| १४७ | दृ | ८०९९८ | १५६ | | १५८ | द्व(द्व्य सह) | ८५१७० | ७ | |
| १४८ | दे | ८११५४ | ३२१५ | | १५९ | द्वा | ८५१७७ | ७१ | |
| १४९ | दै | ८४३६९ | ८९ | | १६० | द्वि | ८५२४८ | १७ | |
| १५० | दो | ८४४५८ | ३९३ | | १६१ | द्वे | ८५२६५ | १५ | |
| १५१ | दौ | ८४८५१ | १ | | १६२ | द्वै | ८५२८० | ११ | |
| | | | | | | द | | | ८२२८ |

# ध

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १६३ | ध | ८५२९१ | १६३६ | |
| १६४ | धा | ८६९२७ | ५३३ | |
| १६५ | धि | ८७४६० | ३७ | |
| १६६ | धी | ८७४९७ | १५९ | |
| १६७ | धु | ८७६५६ | ५९ | |
| १६८ | धू | ८७७१५ | १३ | |
| १६९ | धे | ८७७२८ | १८ | |
| १७० | धै | ८७७४६ | ८ | |
| १७१ | धो | ८७७५४ | ३४ | |
| १७२ | ध्या | ८७७८८ | १६८ | |
| १७३ | ध्ये | ८७९५६ | १ | |
| १७४ | ध्रु | ८७९५७ | ४ | |
| १७५ | ध्व | ८७९६१ | १० | |
| | ध | | | २६८० |

# न

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १७६ | न | ८७९७१ | ४४४३ | |
| १७७ | ना | ९२४१४ | ४८७८ | |
| १७८ | नि | ९७२९२ | १९२१ | |
| १७९ | नी | ९९२१३ | १३५ | |
| १८० | नु | ९९३४८ | ८३ | |
| १८१ | नृ | ९९४३१ | ४ | |
| १८२ | ने | ९९४३५ | १०६९ | |
| १८३ | नै | १००५०४ | १२ | |
| १८४ | नो | १००५१६ | ३३ | |
| १८५ | न्या | १००५४९ | ५८ | |
| १८६ | न्यू | १००६०७ | ९ | |
| १८७ | न्हा | १००६१६ | १५ | |
| | न | | | १२६६० |

# प

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८८ | प | १००६३१ | २८१९ | | १९७ | पो | १०९७२२ | ४९७ | |
| १८९ | पा | १०३४५० | ४१४८ | | १९८ | प्या | ११०२१९ | १३ | |
| १९० | पि | १०७५९८ | २५७ | | १९९ | प्र | ११०२३२ | ५२३ | |
| १९१ | पी | १०७८५५ | १२९ | | २०० | प्रा | ११०७५५ | १८२ | |
| १९२ | पु | १०७९८४ | १३२१ | | २०१ | प्रि | ११०९३७ | १४ | |
| १९३ | पू | १०९३०५ | २३० | | २०२ | प्री | ११०९५१ | ८४ | |
| १९४ | पृ | १०९५३५ | ३५ | | २०३ | प्रे | १११०३५ | ३०० | |
| १९५ | पे | १०९५७० | ७३ | | २०४ | प्रौ | १११३३५ | ३ | |
| १९६ | पै | १०९६४३ | ७९ | | | प | | | १०७०७ |

# फ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २०५ | फ | १११३३८ | ३०९ | |
| २०६ | फा | १११६४७ | २५३ | |
| २०७ | फि | १११९०० | १५४ | |
| २०८ | फु | ११२०५४ | १४० | |
| २०९ | फू | ११२१९४ | ४ | |
| २१० | फे | ११२१९८ | ९९ | |
| २११ | फो | ११२२९७ | ६६ | |
| | फ | | | १०२५ |

# ब

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २१२ | ब | ११२३६३ | १६८३ | |
| २१३ | बा | ११४०४६ | ८९३ | |
| २१४ | बि | ११४९३९ | ४५ | |
| २१५ | बी | ११४९८४ | १०५ | |
| २१६ | बु | ११५०८९ | ३२४ | |
| २१७ | बे | ११५४१३ | ४१ | |
| २१८ | बै | ११५४५४ | ३२३ | |
| २१९ | बो | ११५७७७ | ९८२ | |
| २२० | बौ | ११६७५९ | ३ | |
| २२१ | ब्र | ११६७६२ | ३०१ | |
| २२२ | ब्रा | ११७०६३ | ४१ | |
| २२३ | ब्रि | ११७१०४ | ७ | |
| २२४ | ब्री | ११७१११ | ५४ | |
| | ब | | | ४८०२ |

# भ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २२५ | भ | ११७१६५ | १५१९ | |
| २२६ | भा | ११८६८४ | १६८३ | |
| २२७ | भि | १२०३६७ | १९९ | |
| २२८ | भी | १२०५६६ | १५८ | |
| २२९ | भु | १२०७२४ | १५९ | |
| २३० | भू | १२०८८३ | २९५ | |
| २३१ | भृ | १२११७८ | १ | |
| २३२ | भे | १२११७९ | ४८० | |
| २३३ | भै | १२१६५९ | २ | |
| २३४ | भो | १२१६६१ | ५१४ | |
| २३५ | भौ | १२२१७५ | १ | |
| २३६ | भ्या | १२२१७६ | ३१ | |
| २३७ | भ्र | १२२२०७ | ९० | |
| २३८ | भ्रा | १२२२९७ | १० | |
| | भ | | | ५१४२ |

# म

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २३९ | म | १२२३०७ | ३०४९ | | २४७ | मै | १३१५४८ | २३ | |
| २४० | मा | १२५३५६ | ४०८८ | | २४८ | मो | १३१५७१ | ५२३ | |
| २४१ | मि | १२९४४४ | ३६३ | | २४९ | मौ | १३२०९४ | २७ | |
| २४२ | मी | १२९८०७ | ५४४ | | २५० | म्या | १३२१२१ | ९३ | |
| २४३ | मु | १३०३५१ | ७०६ | | २५१ | म्ह | १३२२१४ | ५१५९ | |
| २४४ | मू | १३१०५७ | २१३ | | २५२ | म्हा | १३७३७३ | ४ | |
| २४५ | मृ | १३१२७० | ७० | | २५३ | म्हू | १३७३७७ | ३४ | |
| २४६ | मे | १३१३४० | २०८ | | २५४ | म्है | १३७४११ | २२ | |
| | | | | | | म | | | ९२४१ |

# य

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २५५ | य | १३७४३३ | २०९ | |
| २५६ | या | १३७६४२ | ११९७ | |
| २५७ | यु | १३८८३९ | ५९ | |
| २५८ | ये | १३८८९८ | १४०९ | |
| २५९ | यो | १४०३०७ | १०८ | |
| २६० | यौ | १४०४१५ | १ | |
| | य | | | २९८३ |

# र

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २६१ | र | १४०४१६ | ६५७ | |
| २६२ | रा | १४१०७३ | १६१० | |
| २६३ | रि | १४२६८३ | १८१ | |
| २६४ | री | १४२८६४ | ३६ | |
| २६५ | रु | १४२९०० | १३७ | |
| २६६ | रू | १४३०३७ | २२२ | |
| २६७ | रे | १४३२५९ | ५६९ | |
| २६८ | रो | १४३८२८ | १२१ | |
| | र | | | ३५३३ |

# ल

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २६९ | ल | १४३९४९ | ६२९ | |
| २७० | ला | १४४५७८ | १४५४ | |
| २७१ | लि | १४६०३२ | ५९ | |
| २७२ | ली | १४६०९१ | ३५ | |
| २७३ | लु | १४६१२६ | ३७ | |
| २७४ | ले | १४६१६३ | १७६ | |
| २७५ | लो | १४६३३९ | ५३७ | |
| २७६ | लौ | १४६८७६ | ६८ | |
| २७७ | ल्या | १४६९४४ | १२ | |
| | ल | | | ३००७ |

# व

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| २७८ | व | १४६९५६ | १६३३ | |
| २७९ | वा | १४८५८९ | २६४७ | |
| २८० | वि | १५१२३६ | २७३७ | |
| २८१ | वी | १५३९७३ | ५८ | |
| २८२ | वृ | १५४०३१ | १०० | |
| २८३ | वे | १५४१३१ | ९५३ | |
| २८४ | वै | १५५०८४ | ३३८ | |
| २८५ | वो | १५५४२२ | ४८५ | |
| २८६ | व्य | १५५९०७ | ९७ | |
| २८७ | व्या | १५६००४ | १५७ | |
| २८८ | व्यु | १५६१६१ | १ | |
| २८९ | व्यो | १५६१६२ | १ | |
| २९० | व्र | १५६१६३ | ४३ | |
| २९१ | व्हा | १५६२०६ | २०० | |
| | व | | | ९४५० |

# श

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
| --- | --- | --- | --- | --- |
| २९२ | श | १५६४०६ | ६२७ | |
| २९३ | शा | १५७०३३ | १२९ | |
| २९४ | शि | १५७१६२ | ३२६ | |
| २९५ | शी | १५७४८८ | १६१ | |
| २९६ | शु | १५७६४९ | २५९ | |
| २९७ | शू | १५७९०८ | ९३ | |
| २९८ | शृ | १५८००१ | २४ | |
| २९९ | शे | १५८०२५ | १७४ | |
| ३०० | शो | १५८१९९ | १२४ | |
| ३०१ | शौ | १५८३२३ | १ | |
| ३०२ | श्या | १५८३२४ | २ | |
| | श | | | १९२० |

# श्र

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३०३ | श्र | १५८३२६ | १०५ | |
| ३०४ | श्रा | १५८४३१ | १ | |
| ३०५ | श्रि | १५८४३२ | २ | |
| ३०६ | श्री | १५८४३४ | १३१ | |
| ३०७ | श्रु | १५८५६५ | ३९ | |
| ३०८ | श्रे | १५८६०४ | १६ | |
| ३०९ | श्रो | १५८६२० | ११ | |
| ३१० | श्ला | १५८६३१ | ३ | |
| ३११ | श्ले | १५८६३४ | १ | |
| ३१२ | श्व | १५८६३५ | २ | |
| ३१३ | श्वा | १५८६३७ | ४४ | |
| ३१४ | श्वे | १५८६८१ | १ | |
| | श्र | | | ३५६ |

# ष

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
| --- | --- | --- | --- | --- |
| ३१५ | ष | १५८६८२ | १३ | |
| | ष | | | १३ |

।। तुका झालासे कळस ।।

तुकाराम गाथा – शब्द अभंग सूची

# स

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | | भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३१६ | स | १५८६९५ | ५०२६ | | ३२८ | स्तु | १६९४७४ | ४९ | | ३४० | स्प | १६९७३८ | १४ | |
| ३१७ | सा | १६३७२१ | २९६७ | | ३२९ | स्तो | १६९५२३ | १ | | ३४१ | स्फ | १६९७५२ | ११ | |
| ३१८ | सि | १६६६८८ | २२७ | | ३३० | स्त्र | १६९५२४ | ६ | | ३४२ | स्फी | १६९७६३ | ६ | |
| ३१९ | सी | १६६९१५ | ११७ | | ३३१ | स्त्रि | १६९५३० | १० | | ३४३ | स्फु | १६९७६९ | ९ | |
| ३२० | सु | १६७०३२ | १०९० | | ३३२ | स्त्री | १६९५४० | ७ | | ३४४ | स्फू | १६९७७८ | १ | |
| ३२१ | सू | १६८१२२ | ५४ | | ३३३ | स्थ | १६९५४७ | ३८ | | ३४५ | स्फो | १६९७७९ | १ | |
| ३२२ | सृ | १६८१७६ | १० | | ३३४ | स्था | १६९५८५ | २१ | | ३४६ | स्म | १६९७८० | ७० | |
| ३२३ | से | १६८१८६ | ४५८ | | ३३५ | स्थि | १६९६०६ | ८८ | | ३४७ | स्व | १६९८५० | २३१ | |
| ३२४ | सै | १६८६४४ | १३ | | ३३६ | स्थी | १६९६९४ | ३ | | ३४८ | स्वा | १७००८१ | १६७ | |
| ३२५ | सो | १६८६५७ | ७५३ | | ३३७ | स्थू | १६९६९७ | ५ | | ३४९ | स्वी | १७०२४८ | ४ | |
| ३२६ | सौ | १६९४१० | २१ | | ३३८ | स्ना | १६९७०२ | २३ | | ३५० | स्वे | १७०२५२ | १ | |
| ३२७ | स्त | १६९४३१ | ४३ | | ३३९ | स्ने | १६९७२५ | १३ | | | स | | | ११५५८ |

# ह

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३५१ | ह | १७०२५३ | ९४५ | |
| ३५२ | हा | १७११९८ | १६४० | |
| ३५३ | हि | १७२८३८ | ३३४ | |
| ३५४ | ही | १७३१७२ | १६९ | |
| ३५५ | हु | १७३३४१ | ५१ | |
| ३५६ | हृ | १७३३९२ | १२० | |
| ३५७ | हे | १७३५१२ | १५८६ | |
| ३५८ | हो | १७५०९८ | १६१६ | |
| ३५९ | ह्या | १७६७१४ | २ | |
| | ह | | | ६४६३ |

# क्ष

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३६० | क्ष | १७६७१६ | १९५ | |
| ३६१ | क्षा | १७६९११ | ४ | |
| ३६२ | क्षि | १७६९१५ | ६ | |
| ३६३ | क्षी | १७६९२१ | ५५ | |
| ३६४ | क्षु | १७६९७६ | १३ | |
| ३६५ | क्षे | १७६९८९ | ४३ | |
| ३६६ | क्षो | १७७०३२ | १६ | |
| | क्ष | | | ३३२ |

# ज्ञ

| भाग | अक्षर | शब्द क्रमांक | शब्दसंख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| ३६७ | ज्ञा | १७७०४८ | ९२ | |
| | ज्ञ | | | ९२ |

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ।।तु.गा.०००१.००१।।
तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ।।तु.गा.०००१.००२।।
मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ।।तु.गा.०००१.००३।।
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ।।तु.गा.०००१.००४।।
राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशीकळा लोपलिया ।।तु.गा.०००२.००१।।
कस्तुरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ।।तु.गा.०००२.००२।।
मुकुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ।।तु.गा.०००२.००३।।
कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयांनो ।।तु.गा.०००२.००४।।
सकळही तुम्हीं व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ।।तु.गा.०००२.००५।।
गरुडाचें वारिकें कासे पितांबर । सांवळें मनोहर कैं देखेन ।।तु.गा.०००३.००१।।
बरविया बरवंटा घनमेघसांवळा । वैजयंती माळा गळां शोभे ।।तु.गा.०००३.००२।।
मुगुट माथां कोटी सूर्याचा झल्लाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ।।तु.गा.०००३.००३।।
ओंतीव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ।।तु.गा.०००३.००४।।
उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ।।तु.गा.०००३.००५।।
तुका म्हणे नव्हे आणिकांसारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ।।तु.गा.०००३.००६।।
धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टीं न्याहाळितां ।।तु.गा.०००४.००१।।
बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ।।तु.गा.०००४.००२।।
सकळ मंगळाचें सार । मुख सिद्धीचें भांडार ।।तु.गा.०००४.००३।।
तुका म्हणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ।।तु.गा.०००४.००४।।
राहों आतां हेंचि ध्यान । डोळा मन लंपट ।।तु.गा.०००५.००१।।
कोंडकोंडुनि धरीन जीवें । देहभावें पूजीन ।।तु.गा.०००५.००२।।
होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ।।तु.गा.०००५.००३।।
तुका म्हणे गोजिरीया । विठोबा पायां पडों द्या ।।तु.गा.०००५.००४।।

आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ।।तु.गा.०००६.००१।।
आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहें । जों मी तुज पाहें पांडुरंगा ।।तु.गा.०००६.००२।।
लांचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडीं ऐसें झालें ।।तु.गा.०००६.००३।।
तुका म्हणे आम्ही मागावी लडिवाळी । पुरवावी आळी मायबापा ।।तु.गा.०००६.००४।।
गुणा आला विटेवरी । पितांबरधारी सुंदर जो ।।तु.गा.०००७.००१।।
डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हें ।।तु.गा.०००७.००२।।
निवारोनि जाय माया । ऐसी छाया जयाची ।।तु.गा.०००७.००३।।
तुका म्हणे समध्यान । ते हे चरण सुकुमार ।।तु.गा.०००७.००४।।
स्वप्नीं तोही कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ।।तु.गा.०००८.००१।।
चतुर्भुज माळा रुळे येकावळी । कस्तुरी निढळीं रेखिलीसे ।।तु.गा.०००८.००२।।
शंखचक्रगदा रूळे वैजयंती । कुंडलें तळपति श्रवणीं दोन्ही ।।तु.गा.०००८.००३।।
तुका म्हणे स्वप्नीं दावीं आतां पाय । पांडुरंग माय कृपावंते ।।तु.गा.०००८.००४।।
देवा आदिदेवा जगत्रयजीवा । परियेसी केशवा विनंति माझी ।।तु.गा.०००९.००१।।
माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम । ऐसें देईं प्रेम कांहीं कळा ।।तु.गा.०००९.००२।।
कळा तुजपाशीं आमुचें जीवन । उचित करून देईं आम्हां ।।तु.गा.०००९.००३।।
आम्हां शरणांगतां तुझाचि आधार । तूं तंव सागर कृपासिंधु ।।तु.गा.०००९.००४।।
सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जळतील कर्में दुस्तरें तीं ।।तु.गा.०००९.००५।।
तें फळ उत्तम तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ।।तु.गा.०००९.००६।।
सेविलिया रामकृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ।।तु.गा.०००९.००७।।
संसार तो काय तृणवतमय । अग्नि त्यासी खाय क्षणमात्रें ।।तु.गा.०००९.००८।।
क्षणमात्रें जाळी दोषांचिया रासी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ।।तु.गा.०००९.००९।।
करी ब्रीद साचें आपलें आपण । पतितपावन दीनानाथ ।।तु.गा.०००९.०१०।।
नाथ अनाथांचा पति गोपिकांचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ।।तु.गा.०००९.०११।।

चित्तीं जें धरावें तुका म्हणे दासीं । पुरविता होसी मनोरथ ।।तु.गा.०००९.०१२।।
मनोरथ जैसें गोकुळींच्या जना । पुरवावी वासना तयापरी ।।तु.गा.००१०.००१।।
ऋण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी ।।तु.गा.००१०.००२।।
सीण झाला वसुदेव देवकीस । वधी बाळें कंस दुराचारी ।।तु.गा.००१०.००३।।
दुराचारियासी नाहीं भूतदया । आपपर तया पापपुण्य ।।तु.गा.००१०.००४।।
पुण्यकाळ त्यांचा राहिलासे उभा । देवकीच्या गर्भा देव आले ।।तु.गा.००१०.००५।।
गर्भासी तयांच्या आले नारायण । तुटलीं बंधनें आपोआप ।।तु.गा.००१०.००६।।
आपोआप बेड्या तुटल्या श्रृंखळा । बंदाच्या आर्गळा कुलपें कोंडें ।।तु.गा.००१०.००७।।
कोंडमार केला होता बहु दिस । सोडवी निमिष न लगतां ।।तु.गा.००१०.००८।।
न कळे तो तया सांगितला भाव । आपणासी ठाव नंदाघरीं ।।तु.गा.००१०.००९।।
नंदाघरीं जातां येतां वसुदेवा । नाहीं जाला गोवा सवें देव ।।तु.गा.००१०.०१०।।
सवें देव तया आड नये कांहीं । तुका म्हणे नाहीं भय चिंता ।।तु.गा.००१०.०११।।
चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरीं केला देवें ।।तु.गा.००११.००१।।
देव आला घरा नंदाचिया गांवा । धन्य त्याच्या दैवा दैव आलें ।।तु.गा.००११.००२।।
आलें अविनाश धरूनि आकार । दैत्यांचा संहार करावया ।।तु.गा.००११.००३।।
करावया भक्तजनांचें पाळण । आलें रामकृष्ण गोकुळासी ।।तु.गा.००११.००४।।
गोकुळीं आनंद प्रगटलें सुख । निर्भर ते लोक घरोघरीं ।।तु.गा.००११.००५।।
घरोघरीं जाला लक्षुमीचा वास । दैन्यदारिद्र्यास त्रास आला ।।तु.गा.००११.००६।।
आला नारायण तयांच्या अंतरां । दया क्षमा नरां नारी लोकां ।।तु.गा.००११.००७।।
लोकां गोकुळींच्या झालें ब्रह्मज्ञान । केलियांवाचून जपतपें ।।तु.गा.००११.००८।।
जपतप काय करावीं साधनें । जे त्या नारायणें कृपा केली ।।तु.गा.००११.००९।।
केली नारायणें आपुलीं अंकीत । तोचि त्यांचें हित सर्व जाणे ।।तु.गा.००११.०१०।।
सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाहीं नाहीं ।।तु.गा.००११.०११।।

नाहीं भक्ता दुजें तिहीं त्रिभुवनीं । एका चक्रपाणीवांचूनि त्या ।।तु.गा.००११.०१२।।
त्याच्या सुखासंगें घेती गर्भवास । तुका म्हणे आस त्यजूनियां ।।तु.गा.००११.०१३।।
त्यांच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारी खेळविला ।।तु.गा.००१२.००१।।
खेळविला जिहीं अंतर्बाह्य सुखें । मेळवूनि मुखें चुंबन दिलें ।।तु.गा.००१२.००२।।
दिलें सुख त्यांसी अंतरींचें देवें । जिहीं एका भावें जाणितला ।।तु.गा.००१२.००३।।
जाणितला तिहीं कामातुरा नारी। कृष्ण भोगावरी चित्त ज्यांचें ।।तु.गा.००१२.००४।।
ज्यांचें कृष्णीं तन मन जालें रत । गृह पति सुत विसरल्या ।।तु.गा.००१२.००५।।
विष तयां जालें धन मान जन । वसविती वन एकांत त्या ।।तु.गा.००१२.००६।।
एकांतीं त्या जाती हरिसी घेवूनि । भोग इच्छा धणी फेडावया ।।तु.गा.००१२.००७।।
वयाच्या संपन्ना तैसा त्यांकारणें । अंतरींचा देणें इच्छाभोग ।।तु.गा.००१२.००८।।
भोग त्याग नाहीं दोन्ही जयापासीं । तुका म्हणे जैसी स्फटिक शिळा ।।तु.गा.००१२.००९।।
शिळा स्फटिकाची न पालटे भेदें । दाऊनियां छंदें जैसी तैसी ।।तु.गा.००१३.००१।।
जैसा केला तैसा होय क्षणक्षणा । फेडावी वासना भक्तिभावें ।।तु.गा.००१३.००२।।
फेडावया आला अवघियांची धणी । गोपाळ गौळणी मायबाप ।।तु.गा.००१३.००३।।
मायबापा सोडविलें बंदीहुनी । चाणूर मर्दनी कंसादिक ।।तु.गा.००१३.००४।।
दिक नाहीं देणें अरिमित्रा एक । पूतना कंटक मुक्त केली ।।तु.गा.००१३.००५।।
मुक्त केला मामा कंस महादोषी । बाळहत्या राशी पातकांच्या ।।तु.गा.००१३.००६।।
पाप कोठें राहे हरी आठवितां । भक्ती द्वेषें चिंता जैसा तैसा ।।तु.गा.००१३.००७।।
साक्षी तयापाशीं पूर्वील कर्माच्या । बांधला सेवेच्या ऋणी देव ।।तु.गा.००१३.००८।।
देव भोळा धांवें भक्ता पाठोवाठीं । उच्चारितां कंठीं मागें मागें ।।तु.गा.००१३.००९।।
मानाचा कंटाळा तुका म्हणे त्यासी । धांवतो घरासी भाविकांच्या ।।तु.गा.००१३.०१०।।
चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । बांधवीं तो हातीं गौळणींच्या ।।तु.गा.००१४.००१।।
गौळणीं त्या गळां बांधिती धारणीं । पायां चक्रपाणी लागे तया ।।तु.गा.००१४.००२।।

तयाघरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतूनी शिरे माजीं ।।तु.गा.००१४.००३।।
माजी शिरोनीयां नवनीत खाय । कवाड तें आहे जैसें तैसें ।।तु.गा.००१४.००४।।
जैसा तैसा आहे अंतर्बाह्यात्कारीं । म्हणऊनि चोरी न संपडे ।।तु.गा.००१४.००५।।
न संपडे तया करितां खटपट । वाउगें बोभाट वर्माविण ।।तु.गा.००१४.००६।।
वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसतील वाटा निरोधूनि ।।तु.गा.००१४.००७।।
निवांत राहिल्या निःसंग होऊनी । निश्चळ त्या ध्यानीं कृष्णध्यानें ।।तु.गा.००१४.००८।।
न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणीं भाविका त्या ।।तु.गा.००१४.००९।।
भाविका तयांसी येतो काकुलती । शहाण्या मरती न संपडे ।।तु.गा.००१४.०१०।।
नलगे वेंचावी टोली धनानांवें। तुका म्हणे भावें चाड एका ।।तु.गा.००१४.०११।।
चाड अनन्याची धरी नारायण । आपणासमान करी रंका ।।तु.गा.००१५.००१।।
रंक होती राजे यमाचिये घरीं । आचरणें बरीं नाहीं म्हूण ।।तु.गा.००१५.००२।।
न संपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां । अभिमानें एका तिळमात्रें ।।तु.गा.००१५.००३।।
तिळमात्र जरी होय अभिमान । मेरू तो समान भार देवा ।।तु.गा.००१५.००४।।
भार पृथिवीचा वाहिला सकळ । जड होती खळ दुष्ट लोक ।।तु.गा.००१५.००५।।
दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ।।तु.गा.००१५.००६।।
यमदूत त्यांसी करिती यातना । नाहीं नारायणा भजले जे ।।तु.गा.००१५.००७।।
जे नाहीं भजले एका भावें हरी । तया दंड करी यमधर्म ।।तु.गा.००१५.००८।।
यमधर्म म्हणे तया दोषियांसी । कां रे केशवासी चुकलेती ।।तु.गा.००१५.००९।।
चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुम्हां कान डोळे मुख ।।तु.गा.००१५.०१०।।
कान डोळे मुख संतांची संगति । न धराच चित्तीं सांगितलें ।।तु.गा.००१५.०११।।
सांगितलें संतीं तुम्हां उगवुनी । गर्भासी येऊनी यमदंड ।।तु.गा.००१५.०१२।।
दंडूं आम्हीं रागें म्हणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनांचा ।।तु.गा.००१५.०१३।।
दुर्जनांचा येणें करूनी संहार । पूर्ण अवतार रामकृष्ण ।।तु.गा.००१५.०१४।।

रामकृष्णनामें रंगले जे नर । तुका म्हणे घर वैकुंठीं त्या ।।तु.गा.००१५.०१५।।
वैकुंठींच्या लोकां दुर्लभ हरिजन । तया नारायण समागमें ।।तु.गा.००१६.००१।।
समागम त्यांचा धरिला अनंतें । जिहीं चित्तवित्तें समर्पिलीं ।।तु.गा.००१६.००२।।
समर्थ ते गाती हरीचे पवाडे । येर ते बापुडे रावराणे ।।तु.गा.००१६.००३।।
रामकृष्णें केलें कवतुक गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारी ।।तु.गा.००१६.००४।।
गाई चारी मोहोरी पावां वाहे पाठीं । धन्य जाळी काठी कांबळी ते ।।तु.गा.००१६.००५।।
काय गौळियांच्या होत्या पुण्यराशी । आणिक त्या म्हैसी गाई पशु ।।तु.गा.००१६.००६।।
सुख तें अमुप लुटिलें सकळीं । गोपिका गोपाळीं धणीवरी ।।तु.गा.००१६.००७।।
धणीवरी त्यांसी सांगितली मात । ज्याचें जैसें आर्त तयापरी ।।तु.गा.००१६.००८।।
परी याचे तुम्ही आइका नवल । दुर्गम जो खोल साधनासी ।।तु.गा.००१६.००९।।
शिक लावुनियां घालिती बाहेरी । पाहाती भीतरीं सर्वेंचि तो ।।तु.गा.००१६.०१०।।
तोंडाकडे त्यांच्या पाहे कवतुकें । शिव्या देतां सुखें हांसतसे ।।तु.गा.००१६.०११।।
हांसतसे शिव्या देतां त्या गौळणी । मरतां जपध्यानीं न बोले तो ।।तु.गा.००१६.०१२।।
तो जें जें करी तें दिसें उत्तम । तुका म्हणे वर्म दावी सोपें ।।तु.गा.००१६.०१३।।
वर्म दावी सोपें भाविकां गोपाळां । वाहे त्यांच्या गळां पाले माळा ।।तु.गा.००१७.००१।।
मान देती आधीं मागतील डाव । देव ते गौरव सुखें मानी ।।तु.गा.००१७.००२।।
मानती ते मंत्र हमामा हुंबरी । सिंतोडिती वरी स्नान तेणें ।।तु.गा.००१७.००३।।
वस्त्रें घोंगडिया घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ।।तु.गा.००१७.००४।।
तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना । तो धांवे गोधना वळतियां ।।तु.गा.००१७.००५।।
त्यांच्या वचनाची पुष्पें वाहे शिरीं । नैवेद्य त्यां करीं कवळ मागे ।।तु.गा.००१७.००६।।
त्यांचिये मुखींचें हरोनियां घ्यावें । उच्छिष्ट तें खावें धणीवरी ।।तु.गा.००१७.००७।।
वरी माथां गुंफे मोरपिसां वेटी । नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ।।तु.गा.००१७.००८।।
छंदें नाचतील जयासवें हरी । देहभाव वरी विसरलीं ।।तु.गा.००१७.००९।।

विसरलीं वरी देहाची भावना । तेचि नारायणा सर्वपूजा ।।तु.गा.००१७.०१०।।
पूजा भाविकांची न कळतां घ्यावी । न मागतां दावी निज ठाव ।।तु.गा.००१७.०११।।
ठाव पाहावया हिंडे मागें मागें । तुका म्हणे संगें भक्तांचिया ।।तु.गा.००१७.०१२।।
भक्तजनां दिलें निजसुख देवें । गोपिका त्या भावें आळंगिल्या ।।तु.गा.००१८.००१।।
आळंगिल्या गोपी गुणवंता नारी । त्यांच्या जन्मांतरीं हरि ऋणी ।।तु.गा.००१८.००२।।
रुसलिया त्यांचें करी समाधान । करविता आपण क्रिया करी ।।तु.गा.००१८.००३।।
क्रिया करी तुम्हां न वजे पासुनी । अवघिया जणीं गोपिकांसी ।।तु.गा.००१८.००४।।
गोपिकांसी म्हणे वैकुंठींचा पति । तुम्ही माझ्या चित्तीं सर्व भावें ।।तु.गा.००१८.००५।।
भाव जैसा माझ्या ठायीं तुम्ही धरा । तैसाचि मी खरा तुम्हांलागीं ।।तु.गा.००१८.००६।।
तुम्हांसी कळों द्या माझा साच भाव । तुमचाचि जीव तुम्हां ग्वाही ।।तु.गा.००१८.००७।।
ग्वाही तुम्हां आम्हां असे नारायण । आपुलीच आण वाहतसे ।।तु.गा.००१८.००८।।
सत्य बोले देव भक्तिभाव जैसा । अनुभव सरसा आणूनियां ।।तु.गा.००१८.००९।।
त्यासी बुझावितो वेगळाल्या भावें । एकीचें तें ठावें नाहीं एकी ।।तु.गा.००१८.०१०।।
एक क्रिया नाहीं अवघियांचा भाव । पृथक ते देव देतो तैसें ।।तु.गा.००१८.०११।।
तैसें कळों नेदी जो मी कोठें नाहीं। अवघियांचे ठायीं जैसा तैसा ।।तु.गा.००१८.०१२।।
जैसा मनोरथ जया चित्तीं काम । तैसा मेघश्याम पुरवितो ।।तु.गा.००१८.०१३।।
पुरविले मनोरथ गोपिकांचे । आणिक लोकांचे गोकुळींच्या ।।तु.गा.००१८.०१४।।
गोकुळींच्या लोकां लावियेला छंद । बैसला गोविंद त्यांचे चित्तीं ।।तु.गा.००१८.०१५।।
चित्तें चोरुनियां घेतलीं सकळां । आवडी गोपाळांवरी तयां ।।तु.गा.००१८.०१६।।
तयांसि आवडे वैकुंठनायक । गेलीं सकळीक विसरोनी ।।तु.गा.००१८.०१७।।
निंदा स्तुति कोणी न करी कोणाची । नाहीं या देहाची शुद्धि कोणा ।।तु.गा.००१८.०१८।।
कोणासी नाठवे कन्या पुत्र माया । देव म्हणूनिया चुंबन देती ।।तु.गा.००१८.०१९।।
देती टाकूनियां भ्रतारांसी घरीं । लाज ते अंतरीं आथींच ना ।।तु.गा.००१८.०२०।।

नाहीं कोणा धाक कोणासी कोणाचा । तुका म्हणे वाचा काया मनें ।।तु.गा.००१८.०२१।।
मनें हरिरुपीं गुंतल्या वासना । उदास त्या सुना गौळियांच्या ।।तु.गा.००१९.००१।।
त्यांच्या भ्रतारांचीं धरूनियां रूपें । त्यांच्या घरीं त्यांपें भोग करी ।।तु.गा.००१९.००२।।
करी कवतुक त्यांचें तयापरी । एका दिसे हरि एका लेंक ।।तु.गा.००१९.००३।।
एक भाव नाहीं सकळांच्या चित्तीं । म्हणवूनि प्रीति तैसें रूप ।।तु.गा.००१९.००४।।
रूप याचें आहे अवघेंचि एक । परि कवतुक दाखविलें ।।तु.गा.००१९.००५।।
लेंकरूं न कळे स्थूळ कीं लहान । खेळे नारायण कवतुकें ।।तु.गा.००१९.००६।।
कवतुक केलें सोंग बहुरूप । तुका म्हणे बाप जगाचा हा ।।तु.गा.००१९.००७।।
जगाचा हा बाप दाखविलें मायें । माती खातां जाय मारावया ।।तु.गा.००२०.००१।।
मारावया तिनें उगारिली काठी । भुवनें त्या पोटीं चौदा देखे ।।तु.गा.००२०.००२।।
देखे भयानक झांकियेलें डोळे । मागुता तो खेळे तियेपुढें ।।तु.गा.००२०.००३।।
पुढें रिघोनियां घाली गळां कव । कळों नेदी भाव मायावंत ।।तु.गा.००२०.००४।।
मायावंत हरीरूप काय जाणे । माझें माझें म्हणे देवा बाळ ।।तु.गा.००२०.००५।।
बाळपणीं रिठा रगडिला दाढे । मारियेले गाढे कागबग ।।तु.गा.००२०.००६।।
गळा बांधूनियां उखळासीं दावें । उन्मळीं त्या भावें विमळार्जून ।।तु.गा.००२०.००७।।
न कळे जुनाट जगाचा जीवन । घातलें मोहन गौळियांसी ।।तु.गा.००२०.००८।।
शिंकी उतरूनि खाय नवनीत । न कळे बहुत होय तरी ।।तु.गा.००२०.००९।।
तरी दूध डेरे भरले रांजण । काय ते भरून दावी दुणी ।।तु.गा.००२०.०१०।।
दुणी झाले त्याचा मानिती संतोष । दुभत्याची आस धरुनियां ।।तु.गा.००२०.०११।।
आशाबद्धा देव असोनी जवळी । नेणती ते काळीं स्वार्थामुळें ।।तु.गा.००२०.०१२।।
मूळ यांचा देव न कळे तयासी । चित्त आशापाशीं गोवियेलें ।।तु.गा.००२०.०१३।।
लेंकरूं आमचें म्हणे दसवंती । नंदाचिये चित्तीं तोचि भाव ।।तु.गा.००२०.०१४।।
भाव दावावया चरित्र दाखवी । घुसळितां रवी डेरियांत ।।तु.गा.००२०.०१५।।

डेरियांत लोणी खादलें रिघोनी । पाहे तों गौळणी हातीं लागे ।।तु.गा.००२०.०१६ ।।
हातीं धरूनियां काढिला बाहेरी । देखोनियां करी चोज त्यासी ।।तु.गा.००२०.०१७ ।।
शिकवी विचार नेणें त्याची गती । होता कोणे रीतीं डेरियांत ।।तु.गा.००२०.०१८ ।।
त्यांसी पुत्रलोभें न कळे हा भाव । कळों नेदी माव देव त्यांसी ।।तु.गा.००२०.०१९ ।।
त्यांसी मायामोहजाळ घालीत फांसा । देव आपणसा कळों नेदी ।।तु.गा.००२०.०२० ।।
नेदी भाव राहों लोभिकांचे चित्तीं । जाणतांचि होतीं आंधळीं तीं ।।तु.गा.००२०.०२१ ।।
आंधळीं तीं तुका म्हणे संसारीं । जिंहीं नाहीं हरी ओळखिला ।।तु.गा.००२०.०२२ ।।
ओळखी तयांसी होय एकाभावें । दुसरिया देवें न पविजे ।।तु.गा.००२१.००१ ।।
न पविजे कदा उन्मत्त झालिया । दंभ तोचि वायां नागवण ।।तु.गा.००२१.००२ ।।
वनवास देवा कारणें एकांत । करावीं हीं व्रततपें याग ।।तु.गा.००२१.००३ ।।
व्रत याग यांसी फळलीं बहुतें । होतीं या संचितें गौळियांचीं ।।तु.गा.००२१.००४ ।।
यांसी देवें तारियेलें न कळतां । मागील अनंता ठावें होतें ।।तु.गा.००२१.००५ ।।
होतें तें द्यावया आला नारायण । मायबापां ऋण गौळियांचें ।।तु.गा.००२१.००६ ।।
गौळियांचे सुख दुर्लभ आणिकां । नाहीं ब्रह्मादिकां तुका म्हणे ।।तु.गा.००२१.००७ ।।
नेणतियांसाठीं नेणता लहान । थिंकोनी भोजन मागे माये ।।तु.गा.००२२.००१ ।।
माया दोनी यास बाप नारायणा । सारखी भावना तयांवरी ।।तु.गा.००२२.००२ ।।
तयांवरी त्याचा समचित्त भाव । देवकी वसुदेव नंद दोघे ।।तु.गा.००२२.००३ ।।
घेउनियां एके ठायीं अवतार । एकीं केला थोर वाढवूनी ।।तु.गा.००२२.००४ ।।
उणा पुरा यासी नाहीं कोणी ठाव । सारिखाचि देव अवघियांसी ।।तु.गा.००२२.००५ ।।
यासी दोनी ठाव सारिखे अनंता । आधील मागुता वाढला तो ।।तु.गा.००२२.००६ ।।
वाढला तो सेवाभक्तिचिया गुणें । उपचार मिष्टान्नें करूनियां ।।तु.गा.००२२.००७ ।।
करूनी सायास मेळविलें धन । तेंही कृष्णार्पण केलें तिहीं ।।तु.गा.००२२.००८ ।।
कृष्णासी सकळ गाई घोडे म्हैसी । समर्पिलें दासीं जीवें भावें ।।तु.गा.००२२.००९ ।।

जीवेंभावें त्याची करितील सेवा । न विसंबती नांवा क्षणभरी ।।तु.गा.००२२.०१०।।
क्षणभरी होतां वेगळा तयांस । होती कासावीस प्राण त्यांचे ।।तु.गा.००२२.०११।।
त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरि । देह काम करी चित्त त्यापें ।।तु.गा.००२२.०१२।।
त्याचेंचि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ।।तु.गा.००२२.०१३।।
कृष्ण आला घरा कृष्ण गेला दारा । कृष्ण हा सोयिरा भेटों कृष्ण ।।तु.गा.००२२.०१४।।
कृष्ण गाती ओंव्या दळणीं कांडणीं । कृष्ण हा भोजनीं पाचारिती ।।तु.गा.००२२.०१५।।
कृष्ण तयां ध्यानीं आसनीं शयनीं । देखती त्या स्वप्नीं कृष्णरूप ।।तु.गा.००२२.०१६।।
कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चितां । धन्य माता पिता तुका म्हणे ।।तु.गा.००२२.०१७।।
कृष्ण हा परिचारी कृष्ण हा व्यवहारी । कृष्ण घ्या वो नारी आणिकी म्हणे ।।तु.गा.००२३.००१।।
म्हणे कृष्णाविण कैसें तुम्हां गमे । वेळ हा करमे वायांविण ।।तु.गा.००२३.००२।।
वायांविण तुम्ही पिटितां चावटी । घ्या गे जगजेठी क्षणभरी ।।तु.गा.००२३.००३।।
क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा । पाहा एक वेळां घेऊनियां ।।तु.गा.००२३.००४।।
याचें सुख तुम्हां कळलियावरी । मग दारोदारीं न फिराल ।।तु.गा.००२३.००५।।
लटिकें हें तुम्हां वाटेल खेळणें । एका कृष्णाविणें अवघेंचि ।।तु.गा.००२३.००६।।
अवघ्याच तुम्ही टाकाल सांगात । घेऊनी अनंत जाल राना ।।तु.गा.००२३.००७।।
नावडे हें तुम्हां आणिक बोलिलें । मग हें लागलें हरिध्यान ।।तु.गा.००२३.००८।।
न करा हा मग या जीवा वेगळा । टोंकवाल बाळा आणिक ही ।।तु.गा.००२३.००९।।
आणिक ही तुम्हां येती काकुलती । जवळी इच्छिती क्षण बैसों ।।तु.गा.००२३.०१०।।
बैसों चला पाहों गोपाळांचें मुख । एकी एक सुख सांगतील ।।तु.गा.००२३.०११।।
सांगे जंव ऐसी मात दसवंती । तंव त्या धरिती चित्तीं बाळा ।।तु.गा.००२३.०१२।।
बाळा येती घरा घेऊनियां जाती । नाहीं त्या परती तुका म्हणे ।।तु.गा.००२३.०१३।।
तुका म्हणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासीं खेळतां दिवस गमे ।।तु.गा.००२४.००१।।
दिवस राती कांहीं नाठवे तयांसी । पाहातां मुखासी कृष्णाचिया ।।तु.गा.००२४.००२।।

याच्या मुखें नये डोळ्यांसी वीट । राहिले हे नीट तटस्थचि ।।तु.गा.००२४.००३।।
तटस्थ राहिलें सकळ शरीर । इंद्रियें व्यापार विसरलीं ।।तु.गा.००२४.००४।।
विसरलीं तहान भूक घरदार । नाहीं हा विचार असों कोठें ।।तु.गा.००२४.००५।।
कोठें असो कोण झाला वेळ काळ । नाठवे सकळ विसरल्या ।।तु.गा.००२४.००६।।
विसरल्या आम्ही कोणी ये जातीच्या । वर्णाही चहूंच्या एक झाल्या ।।तु.गा.००२४.००७।।
एक झाल्या तेव्हां कृष्णाचिया सुखें । निःशंक भातुकें खेळतील ।।तु.गा.००२४.००८।।
खेळती भातुकें कृष्णाच्या सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ।।तु.गा.००२४.००९।।
चित्तीं तो गोविंद लटिकें दळण । करिती हें जन करिती तैसें ।।तु.गा.००२४.०१०।।
जन करी तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करूनियां ।।तु.गा.००२४.०११।।
करूनी आपला अवघा गोविंद । जना साच छंद लटिका त्यां ।।तु.गा.००२४.०१२।।
त्यांनीं केला हरि सासुरें माहेर । बंधु हे कुमर दीर भावें ।।तु.गा.००२४.०१३।।
भावना राहिली एकाचिया ठायीं । तुका म्हणे पायीं गोविंदाचे ।।तु.गा.००२४.०१४।।
गोविंद भ्रतार गोविंद मूळहारी । नामें भेद परि एकचि तो ।।तु.गा.००२५.००१।।
एकाचींच नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावें जावें ।।तु.गा.००२५.००२।।
जावें यावें तिहीं घरींचिया घरीं । येथींची सिदोरी तेथें न्यावी ।।तु.गा.००२५.००३।।
विचारितां दिसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोकां ऐसें ।।तु.गा.००२५.००४।।
लोक करूनियां साच वर्तताती । तैशा त्या खेळती लटिक्याची ।।तु.गा.००२५.००५।।
लटिकें करिती मंगळदायकें । लटिकींच एकें एकां व्याही ।।तु.गा.००२५.००६।।
व्याही भाई हरि सोयरा जावई । अवघियांच्या ठायीं केला एक ।।तु.गा.००२५.००७।।
एकाशींच पावें जें कांहीं करिती । उपचार संपत्ती नाना भोग ।।तु.गा.००२५.००८।।
भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ।।तु.गा.००२५.००९।।
लटिकाची त्यांनीं केला संवसार । जाणती साचार वेगळा त्या ।।तु.गा.००२५.०१०।।
त्यांनीं मृत्तिकेचे करूनी अवघे । खेळतील दोघे पुरुषनारी ।।तु.गा.००२५.०११।।

पुरुषनारी त्यांनीं ठेवियेलीं नांवें । कवतुक भावें विचरती ।।तु.गा.००२५.०१२।।
विचरती जैसें साच भावें लोक । तैसें नाहीं सुख खेळती त्या ।।तु.गा.००२५.०१३।।
त्यांनीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वायां खेळतों तें ।।तु.गा.००२५.०१४।।
खेळतों तें आम्ही नव्हों नारीनर । म्हणोनी विकार नाहीं तयां ।।तु.गा.००२५.०१५।।
तयां ठावें आहे आम्ही अवघीं एक । म्हणोनी निःशंक खेळतील ।।तु.गा.००२५.०१६।।
तयां ठावे नाहीं हरिचिया गुणें । आम्ही कोणकोण काय खेळों ।।तु.गा.००२५.०१७।।
काय खातों आम्ही कासया सांगातें । कैसें हें लागतें नेणों मुखीं ।।तु.गा.००२५.०१८।।
मुखीं चवी नाहीं तोंवरी अंगीं लाज । वर्ण यातीकाज न धरिती ।।तु.गा.००२५.०१९।।
न धरिती कांहीं संकोच त्या मना । हांसतां या जना नाइकती ।।तु.गा.००२५.०२०।।
नाइकती बोल आणिकांचे कानीं । हरि ध्यानीं मनीं बैसलासे ।।तु.गा.००२५.०२१।।
बैसलासे हरि जयांचिया चित्तीं । तयां नावडती मायबापें ।।तु.गा.००२५.०२२।।
मायबापें त्यांची नेति पाचारूनी । बळें परी मनीं हरि वसे ।।तु.गा.००२५.०२३।।
वसतील बाळा आपुलाले घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ।।तु.गा.००२५.०२४।।
गोविंदाचें ध्यान निजलीया जाग्या । आणिक वाउग्या न बोलती ।।तु.गा.००२५.०२५।।
न बोलती निजलिया हरिविण । जागृति स्वप्न एक जालें ।।तु.गा.००२५.०२६।।
एकविध सुख घेतील त्या बाळा । भ्रमर परिमळालागीं जैसा ।।तु.गा.००२५.०२७।।
जैसा ज्याचा भाव घेतला त्यांपरी । तुका म्हणे हरि बाळलीला ।।तु.गा.००२५.०२८।।
लीलाविग्रही तो लेववी खाववी । यशोदा बैसवी मांडीवरी ।।तु.गा.००२६.००१।।
मांडीवरी भार पुष्पाचिये परी । बैसोनियां करी स्तनपान ।।तु.गा.००२६.००२।।
नभाचाही साक्षी पाताळापरता । कुर्वाळिते माता हातें त्यासी ।।तु.गा.००२६.००३।।
हातें कुर्वाळूनि मुखीं घाली घास । पुरे म्हणे तीस पोट धालें ।।तु.गा.००२६.००४।।
पोट धालें मग देतसे ढेंकर । भक्तीचें तें फार तुळसीदळ ।।तु.गा.००२६.००५।।
तुळसीदळ भावें सहित देवा पाणी । फार तें त्याहुनी क्षीरसागर ।।तु.गा.००२६.००६।।

क्षीराचा कांटाळा असे एक वेळ । भक्तीचें तें जळ गोड देवा ।।तु.गा.००२६.००७।।
देवा भक्त जिवांहुनी आवडती । सकळही प्रीति त्यांच्या ठायीं ।।तु.गा.००२६.००८।।
त्यांचा हा अंकित सर्व भावें हरी । तुका म्हणे करी सर्व काज ।।तु.गा.००२६.००९।।
जियेवेळीं चोरूनियां नेलीं वत्सें । तयालागीं तैसें होणें लागे ।।तु.गा.००२७.००१।।
लागे दोहों ठायीं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ।।तु.गा.००२७.००२।।
माय झाला हरी अवघ्या वत्सांची । घरीं वत्सें जीचीं तैसा झाला ।।तु.गा.००२७.००३।।
झाला तैसा जैसें घरींचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पांवें ।।तु.गा.००२७.००४।।
मोहरी पांवें सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहळा ब्रह्मादिकीं ।।तु.गा.००२७.००५।।
ब्रह्मादिकां सुख स्वप्नीं तेंहि नाहीं । तैसें दोहीं ठायीं वोसंडलें ।।तु.गा.००२७.००६।।
वोसंडल्या क्षीर अमुप त्या गायी । जैसी ज्याची आई तैसा जाला ।।तु.गा.००२७.००७।।
लाघव कळलें ब्रह्मयासी याचें । परब्रह्म साचें अवतरलें ।।तु.गा.००२७.००८।।
तरले हे जन सकळही आतां । ऐसें तो विधाता बोलियेला ।।तु.गा.००२७.००९।।
लागला हे स्तुति करूं अनंताची । चतुर्मुखें वाची भक्तिस्तोत्रें ।।तु.गा.००२७.०१०।।
भक्तिकाजें देवें केला अवतार । पृथिवीचा भार फेडावया ।।तु.गा.००२७.०११।।
पृथिवी दाटिली होती या असुरीं । न साहावे वरी भार तये ।।तु.गा.००२७.०१२।।
तया काकुळती आपल्या दासांची । तयांलागी वेंची सर्वस्वही ।।तु.गा.००२७.०१३।।
स्वहित दासांचें करावयालागीं । अव्यक्त हें जगीं व्यक्ती आलें ।।तु.गा.००२७.०१४।।
लेखा कोण करी त्यांचिया पुण्याचा । जयांसवें वाचा बोले हरी ।।तु.गा.००२७.०१५।।
हरी नाममात्रें पातकांच्या रासी । तो आला घरासी गौळियांच्या ।।तु.गा.००२७.०१६।।
गौळियें अवघीं झालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ।।तु.गा.००२७.०१७।।
तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहुत ज्यापाशीं होईल पाप ।।तु.गा.००२७.०१८।।
पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तोचि पाहे कृष्णमुख ।।तु.गा.००२७.०१९।।
मुख माझें काय जो मी वर्णूं पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ।।तु.गा.००२७.०२०।।

ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासी हाचि देव ।।तु.गा.००२७.०२१।।
देवचि अवघा जालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्सें तेथें ।।तु.गा.००२७.०२२।।
तेथें जें पाहाणें आणिक दुसरें । मूर्ख त्या नंतरें दुजा नाहीं ।।तु.गा.००२७.०२३।।
दुजाभाव तुका म्हणे जया चित्तीं । रवरव भोगिती कुंभपाक ।।तु.गा.००२७.०२४।।
कुंभपाक लागे तयासी भोगणें । अवघाचि नेणें देव ऐसा ।।तु.गा.००२८.००१।।
देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासी यातना यम करी ।।तु.गा.००२८.००२।।
कळला हा देव तयासींच खरा । गाई वत्सें घरा धाडी ब्रह्मा ।।तु.गा.००२८.००३।।
ब्रह्मांदिकां देव ऐसा अगोचर । कैसा त्याचा पार जाणवेल ।।तु.गा.००२८.००४।।
जाणवेल देव गौळियांच्या भावें । तुका म्हणे व्हावें संचित हें ।।तु.गा.००२८.००५।।
संचित उत्तम भूमि कसूनियां । जाऊं नेदी वायां पेरिल्याचें ।।तु.गा.००२९.००१।।
त्याचिया पिकासी आलिया घुमरी । आल्या गाईवरी आणिक गाई ।।तु.गा.००२९.००२।।
गाई दवडूनि घालिती बाहेरी । तंव म्हणे हरी बांधा त्याही ।।तु.गा.००२९.००३।।
त्याही तुम्ही बांधा तुमच्या सारिख्या । भोवंडा पारिख्या वाड्यांतूनि ।।तु.गा.००२९.००४।।
पारिख्या न येती कोणाचिया घरा । सूत्रधारी खरा नारायण ।।तु.गा.००२९.००५।।
नारायण नांदे जयाचिये ठायीं । सहज तेथें नाहीं घालमेली ।।तु.गा.००२९.००६।।
मेलीं हीं शहाणीं करितां सायास । नाहीं सुखलेश तुका म्हणे ।।तु.गा.००२९.००७।।
तुका म्हणे सुख घेतलें गोपाळीं । नाचती कांबळीं करूनी ध्वजा ।।तु.गा.००३०.००१।।
करूनियां टिरी आपुल्या मांदळ । वाजविती टाळ दगडांचे ।।तु.गा.००३०.००२।।
दगडांचे टाळ कोण त्यांचा नाद । गीतीं गातां छंद ताल नाहीं ।।तु.गा.००३०.००३।।
ताल नाहीं गातां नाचतां गोपाळां । घननीळ सांवळा तयांमध्यें ।।तु.गा.००३०.००४।।
मध्यें जयां हरी तें सुख आगळें । देहभाव काळें नाहीं तयां ।।तु.गा.००३०.००५।।
तयांसी आळंगी आपुलिया करीं । जाती भूमीवरी लोटांगणी ।।तु.गा.००३०.००६।।
निजभाव देखे जयांचिये अंगीं । तुका म्हणे संगीं क्रीडे तया ।।तु.गा.००३०.००७।।

तयांसवें करी काला दहींभात । सिदोऱ्या अनंत मेळवूनि ।।तु.गा.००३१.००१।।
मेळवूनि अवघियांचे एके ठायीं । मागें पुढें कांहीं उरों नेदी ।।तु.गा.००३१.००२।।
नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें । आपलें ही साचें द्यावें तेथें ।।तु.गा.००३१.००३।।
द्यावा दहीं भात आपला प्रकार । तयांचा व्यवहार सांडवावा ।।तु.गा.००३१.००४।।
वांटी सकळांसी हातें आपुलिया । जैसें मागे तया तैसें द्यावें ।।तु.गा.००३१.००५।।
द्यावें सांभाळूनि समतुक भावें । आपणहि खावें त्यांचे तुकें ।।तु.गा.००३१.००६।।
तुक सकळांचें गोविंदाचे हातीं । कोण कोणें गति भला बुरा ।।तु.गा.००३१.००७।।
राखी त्यास तैसें आपुलाल्या भावें । विचारूनि द्यावें जैसें तैसें ।।तु.गा.००३१.००८।।
तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिलें भाविकां गोपाळांसी ।।तु.गा.००३१.००९।।
गोपाळांचे मुखीं देऊनि कवळ । घांस माखे लाळ खाय त्यांची ।।तु.गा.००३१.०१०।।
त्यांचिये मुखींचे हिरोनियां घांस । झोंबती हातांस खाय बळें ।।तु.गा.००३१.०११।।
बळें जयाचिया ठेंगणें सकळ । तयांतें गोपाळ पाडितील ।।तु.गा.००३१.०१२।।
पाठीं उचलूनि वाहतील खांदीं । नाचतील मांदीं मेळवूनि ।।तु.गा.००३१.०१३।।
मांदीं मेळवूनि धणी दिली आम्हां । तुका म्हणे जमा केल्या गाई ।।तु.गा.००३१.०१४।।
केला पुढें हरि अस्तमाना दिसे । मागें त्यासरिसे थाट चाले ।।तु.गा.००३२.००१।।
थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्ण राम तयां सोयी ।।तु.गा.००३२.००२।।
सोयी लागलिया देवाची आवर्ती । न बोलवितां येती मागें तयां ।।तु.गा.००३२.००३।।
तयांचिये चित्तीं बैसला अनंत । घेती नित्य नित्य तेंचि सुख ।।तु.गा.००३२.००४।।
सुख नाहीं कोणा हरीच्या वियोगें । तुका म्हणे जुगें घडी जाय ।।तु.गा.००३२.००५।।
जाय फांकोनियां निवडोनि गाई । आपलाले सोयी घराचिये ।।तु.गा.००३३.००१।।
घराचिये सोयी अंतरला देव । गोपाळांचा जीव गोविंदापें ।।तु.गा.००३३.००२।।
गोविंदें वेधिलें तुका म्हणे मन । वियोगेंही ध्यान संयोगाचें ।।तु.गा.००३३.००३।।
संयोग सकळां असे सर्वकाळ । दुश्चित्त गोपाळ आला दिसे ।।तु.गा.००३४.००१।।

गोपाळ गुणाचा म्हणे गुणमय । निंबलोण मायें उतरिलें ।।तु.गा.००३४.००२।।
उतरूनि हातें धरी हनुवटी । ओंवाळूनि दिठी सांडियेली ।।तु.गा.००३४.००३।।
दिठी घाली माता विश्वाच्या जनका । भक्तीचिया सुखा गोडावला ।।तु.गा.००३४.००४।।
लहान हा थोर जीवजंतु भूतें । आपण दैवतें जाला देवी ।।तु.गा.००३४.००५।।
देवी म्हैसासुर मुंजिया खेचर । लहान हा थोर देव हरि ।।तु.गा.००३४.००६।।
हरि तुका म्हणे अवघा एकला । परि हा धाकुला भक्तीसाठीं ।।तु.गा.००३४.००७।।
भक्तीसाठीं करी यशोदेसी आळी । थिंकोनियां चोळी डोळे देव ।।तु.गा.००३५.००१।।
देव गिळूनियां धरिलें मौन । माये म्हणे कोण येथें दुजें ।।तु.गा.००३५.००२।।
दुजें येथें कोणी नाहीं कृष्णाविण । निरुतें जाणोन पुसे देवा ।।तु.गा.००३५.००३।।
देवापाशीं पुसे देव काय झाला । हांसें आलें बोला याचें हरि ।।तु.गा.००३५.००४।।
यांचे मी जवळी देव तो नेणती । लटिकें मानिती साच खरें ।।तु.गा.००३५.००५।।
लटिकें तें साच साच तें लटिकें । नेणती लोभिकें आशाबद्ध ।।तु.गा.००३५.००६।।
सांग म्हणे माय येरू वासी तोंड । तंव तें ब्रह्मांड देखे माजीं ।।तु.गा.००३५.००७।।
माजीं जया चंद्र सूर्य तारांगणें । तो भक्तांकारणें बाळलीळा ।।तु.गा.००३५.००८।।
लीला कोण जाणे याचें महिमान । जगाचें जीवन देवा देव ।।तु.गा.००३५.००९।।
देवें कवतुक दाखविलें तयां । लागती ते पायां मायबाप ।।तु.गा.००३५.०१०।।
मायबाप म्हणे हाचि देव खरा । आणीक पसारा लटिका तो ।।तु.गा.००३५.०११।।
तोहि त्यांचा देव दिला नारायणें । माझें हें करणें तोहि मीच ।।तु.गा.००३५.०१२।।
मीच म्हणऊनि जें जें जेथें ध्याती । तेथें मी श्रीपति भोगिता तें ।।तु.गा.००३५.०१३।।
तें मज वेगळें मी तया निराळा । नाहीं या सकळा ब्रह्मांडांत ।।तु.गा.००३५.०१४।।
तद्भावना इच्छा भावितसे त्यांचें । फळ देता सांचे मीच एक ।।तु.गा.००३५.०१५।।
मीच एक खरा बोले नारायण । दाविलें निर्वाण निजदासां ।।तु.गा.००३५.०१६।।
निजदासां खूण दाविली निरुती । तुका म्हणे भूतीं नारायण ।।तु.गा.००३५.०१७।।

नारायण भूतीं न कळे जयांसी । तयां गर्भवासीं येणें जाणें ॥तु.गा.००३६.००१॥
येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें । न कळतां खरें देव ऐसा ॥तु.गा.००३६.००२॥
देव ऐसा जया कळला सकळ । गेली तळमळ द्वेषबुद्धी ॥तु.गा.००३६.००३॥
बुद्धीचा पालट नव्हे कदा काळीं । हरि जळीं स्थळीं तयां चित्तीं ॥तु.गा.००३६.००४॥
चित्त तें निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजीं ॥तु.गा.००३६.००५॥
तयामाजीं हरि जाणिजे त्या भावें । आपुलें परावें सारिखेंचि ॥तु.गा.००३६.००६॥
चिंतनें जयाच्या तरती अनेक । जो हें सकळीक देव देखे ॥तु.गा.००३६.००७॥
देव देखे तोही देव कैसा नव्हे । उरला संदेह काय त्यासी ॥तु.गा.००३६.००८॥
काया वाचा मनें पूजावे वैष्णव । म्हणऊनी भाव धरूनियां ॥तु.गा.००३६.००९॥
यांसी कवतुक दाखविलें रानीं । वोणवा गिळूनि गोपाळांसी ॥तु.गा.००३६.०१०॥
गोपाळांचे डोळें झांकविले हातें । धरिलें अनंतें विश्वरूप ॥तु.गा.००३६.०११॥
पसरूनि मुख गिळियेले ज्वाळ । पाहाती गोपाळ बोटां सांदीं ॥तु.गा.००३६.०१२॥
संधि सारुनियां पाहिलें अनंता । म्हणती ते आतां कळलासी ॥तु.गा.००३६.०१३॥
कळला हा तुझा देह नव्हे देवा । गिळिला वोणवा आणिक तो ॥तु.गा.००३६.०१४॥
तो तयां कळला आरुष गोपाळां । दुर्गम सकळां साधनांसी ॥तु.गा.००३६.०१५॥
सीण उरे तुका म्हणे साधनाचा । भाविकांसी साचा भाव दावी ॥तु.गा.००३६.०१६॥
भाव दावी शुद्ध देखोनियां चित्त । आपल्या अंकित निजदासां ॥तु.गा.००३७.००१॥
सांगे गोपाळांसी काय पुण्य होतें । वांचलों जळते आगीहातीं ॥तु.गा.००३७.००२॥
आजी आम्हां येथें वांचविलें देवें । नाहीं तरी जीवें न वांचतों ॥तु.गा.००३७.००३॥
न वांचत्या गाई जळतों सकळें । पूर्वपुण्यबळें वांचविलें ॥तु.गा.००३७.००४॥
पूर्वपुण्य होतें तुमचिया गांठीं । बोले जगजेठी गोपाळांसी ॥तु.गा.००३७.००५॥
गोपाळांसी म्हणे वैकुंठनायक । भले तुम्ही एक पुण्यवंत ॥तु.गा.००३७.००६॥
करी तुका म्हणे करवी आपण । द्यावें थोरपण सेवकांसी ॥तु.गा.००३७.००७॥

काय आम्हां चाळविसी वायांविण । म्हणती दुरून देखिलासी ।।तु.गा.००३८.००१।।
लावूनियां डोळें नव्हतों दुश्चित । तुज परचित्त माव होती ।।तु.गा.००३८.००२।।
होती दृष्टी आंत उघडी आमची । बाहेरी ते वायांचि कुची झांकूं ।।तु.गा.००३८.००३।।
जालासी थोरला थोरल्या तोंडाचा । गिळियेला वाचा धूर आगी ।।तु.गा.००३८.००४।।
आगी खातो ऐसा आमचा सांगाती । आनंदें नाचती भोंवतालीं ।।तु.गा.००३८.००५।।
भोंवतीं आपणा मिळविलीं देवें । तुका म्हणे ठावें नाहीं ज्ञान ।।तु.गा.००३८.००६।।
नाहीं त्याची शंका वैकुंठनायका । नेणती ते एकाविण दुजा ।।तु.गा.००३९.००१।।
जाणतियां सर्वे येऊं नेदी हरि । तर्कवादी दुरी दुरावले ।।तु.गा.००३९.००२।।
वादियांसीं भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दुराविले ।।तु.गा.००३९.००३।।
दुराविले दूर आशाबद्ध देवा । करितां या सेवा कुटुंबाची ।।तु.गा.००३९.००४।।
चित्तीं द्रव्यदारा पुत्रादिसंपत्ति । समान ते होती पशु नर ।।तु.गा.००३९.००५।।
नरक साधिला विसरोनि देवा । बुडाले ते भवा नदीमाजीं ।।तु.गा.००३९.००६।।
जिहीं हरिसंग केला संवसारीं । तुका म्हणे खरी खेप त्यांची ।।तु.गा.००३९.००७।।
खेळीमेळीं आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ।।तु.गा.००४०.००१।।
मातेपाशीं एक नवल सांगती । जाली तैसी ख्याति वोणव्याची ।।तु.गा.००४०.००२।।
ओंवाळिलें तिनें करूनि आरती । पुसे दसवंती गोपाळांसी ।।तु.गा.००४०.००३।।
पुसे पडताळूनि मागुती मागुती । गोपाळ सांगती कवतूक ।।तु.गा.००४०.००४।।
कवतूक कानीं आइकतां त्यांचें । बोलतां ये वाचे वीट नये ।।तु.गा.००४०.००५।।
नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ।।तु.गा.००४०.००६।।
तेव्हां कवतूक कळों आलें कांहीं । हळूहळू दोहीं मायबापां ।।तु.गा.००४०.००७।।
हळूहळू त्यांचें पुण्य जालें वाड । वारलें हें जाड तिमिराचें ।।तु.गा.००४०.००८।।
तिमिर हें येथें राहों शके कैसें । जालिया प्रकाशें गोविंदाच्या ।।तु.गा.००४०.००९।।
दावी तुका म्हणे देव ज्या आपणा । पालटे तो क्षणामाजी एका ।।तु.गा.००४०.०१०।।

काय आतां यासी म्हणावें लेंकरूं । जगाचा हा गुरु मायबाप ।।तु.गा.००४१.००१।।
माय याची यासी राहिली लपून । कळों नये क्षण एक होतां ।।तु.गा.००४१.००२।।
क्षण एक होतां विसरली त्यासी । माझें माझें ऐसें करी बाळा ।।तु.गा.००४१.००३।।
करूनि कवतुक कळों नेदी कोणा । योजूनि कारणा तेंचि खेळे ।।तु.गा.००४१.००४।।
तें सुख लुटिलें घरींचिया घरीं । तुका म्हणे परी आपुलाल्या ।।तु.गा.००४१.००५।।
आपुलाल्यापरी करितील सेवा । गीत गाती देवा खेळवूनि ।।तु.गा.००४२.००१।।
खेळ मांडियेला यमुनेपाबळीं । या रे चेंडूफळी खेळूं आतां ।।तु.गा.००४२.००२।।
आणविल्या डांगा चवगुणांतु काठी । बैसोनियां वांटी गडियां गडी ।।तु.गा.००४२.००३।।
गडी जंव पाहे आपणासमान । नाहीं नारायण म्हणे दुजा ।।तु.गा.००४२.००४।।
जाणोनि गोविंदें सकळांचा भाव । तयांसी उपाय तोचि सांगे ।।तु.गा.००४२.००५।।
सांगे सळकांसी व्हारे एके ठाईं । चेंडू राखा भाई तुम्ही माझा ।।तु.गा.००४२.००६।।
मज हा नलगे आणीक सांगाती । राखावी बहुतीं हाल माझी ।।तु.गा.००४२.००७।।
माझे हाकें हाक मेळवा सकळ । नवजा बरळ एकमेकां ।।तु.गा.००४२.००८।।
एका समतुकें अवघेचि रहा । जाईल तो पहा धरा चेंडू ।।तु.गा.००४२.००९।।
चेंडू धरा ऐसें सांगतों सकळां । आपण निराळा एकलाचि ।।तु.गा.००४२.०१०।।
चिंतूनियां चेंडू हाणे उर्ध्वमुखें । ठेलीं सकळीक पाहतचि ।।तु.गा.००४२.०११।।
पाहतचि ठेलीं न चलतां कांहीं । यारे लवलाहीं म्हणे धरा ।।तु.गा.००४२.०१२।।
धरावा तयानें त्याचें बळ ज्यासी । येरां आणिकांसी लाग नव्हे ।।तु.गा.००४२.०१३।।
नव्हे काम बळ बुद्धि नाहीं त्याचे । न धरावे निचे उंचाविण ।।तु.गा.००४२.०१४।।
विचारीं पडले देखोनि गोपाळ । या म्हणे सकळ माझ्यामागें ।।तु.गा.००४२.०१५।।
मार्ग देवावीण न दिसे आणिकां । चतूर होत कां बहुत जन ।।तु.गा.००४२.०१६।।
चतूर चिंतिती बहुत मारग । हरि जाय माग पाहोनियां ।।तु.गा.००४२.०१७।।
यामागें जे गेले गोविंदा गोपाळ । ते नेले सीतळ पंथें ठाया ।।तु.गा.००४२.०१८।।

आपुलिया कानां ठेवूनियां हात । सकळीं निमित्त टाळियेलें ।।तु.गा.००४३.०१२।।
निमित्याकारणें रचिलें कारण । गेला नारायण खांदीवरी ।।तु.गा.००४३.०१३।।
खांदीवरी पाव ठेवियेला देवें । पाडावा त्या भावें चेंडू तळीं ।।तु.गा.००४३.०१४।।
तळील नेणती तुका म्हणे भाव । अंतरींचें देव कळों नेदी ।।तु.गा.००४३.०१५।।
नेदी कळों केल्याविण तें कारण। दाखवी आणून अनुभवा ।।तु.गा.००४४.००१।।
न पुरेसा हात घाली चेंडूकडे । म्हणितलें गडे सांभाळावें ।।तु.गा.००४४.००२।।
सांभाळ करिता सकळां जीवांचा । गोपाळासी वाचा म्हणे बरें ।।तु.गा.००४४.००३।।
बरें विचारूनि करावें कारण । म्हणे नारायण बऱ्या बरें ।।तु.गा.००४४.००४।।
बरें म्हणूनियां तयांकडे पाहे । सांडविला जाय चेंडूतळा ।।तु.गा.००४४.००५।।
तयासवें उडी घातली अनंतें । गोपाळ रडत येती घरा ।।तु.गा.००४४.००६।।
येतां त्यांचा लोकीं देखिला कोल्हाळ । सामोरीं सकळ आलीं पुढें ।।तु.गा.००४४.००७।।
पुसती ते मात तया गोपाळांसी । हरिदु:खें त्यांसी न बोलवें ।।तु.गा.००४४.००८।।
न बोलवें हरि बुडालासें मुखें । कुटितील दु:खें ऊर माथे ।।तु.गा.००४४.००९।।
मायबापें तुका म्हणे न देखती । तैसें दु:ख चित्तीं गोपाळांच्या ।।तु.गा.००४४.०१०।।
गोपाळां उभडू नावरे दु:खाचा । कुंठित हे वाचा जाली त्यांची ।।तु.गा.००४५.००१।।
जालें काय ऐसें न कळे कोणासी । म्हणती तुम्हांपाशीं देव होता ।।तु.गा.००४५.००२।।
देवासवें दु:ख न पवतें ऐसें । कांहीं अनारिसें दिसे आजी।।तु.गा.००४५.००३।।
आजी दिसे हरि फांकला यांपाशीं । म्हणऊनी ऐशी परी जाली ।।तु.गा.००४५.००४।।
जाणविल्याविण कैसें कळे त्यांसी । शहाणे तयासी कळों आलें ।।तु.गा.००४५.००५।।
कळों आलें तिहीं स्फुंद शांत केला । ठायींचाच त्याला थोडा होता ।।तु.गा.००४५.००६।।
होता तो विचार सांगितला जनां । गोपाळ शहाणा होता त्यानें ।।तु.गा.००४५.००७।।
सांगे आतां हरी तुम्हां आम्हां नाहीं । बुडालासें डोहीं यमुनेच्या ।।तु.गा.००४५.००८।।
यासी अवकाश नव्हेचि पुसतां । जालिया अनंता कोण परी ।।तु.गा.००४५.००९।।

परी त्या दु:खाची काय सांगों आतां । तुका म्हणे माता लोकपाळा ।।तु.गा.००४५.०१०।।
पाषाण फुटती तें दु:ख देखोनि । करितां गौळणी शोक लोकां ।।तु.गा.००४६.००१।।
काय ऐसें पाप होतें आम्हांपाशीं । बोलती एकाशीं एक एकां ।।तु.गा.००४६.००२।।
एकाचिये डोळां असूं बाह्यात्कारीं । नाहीं तीं अंतरीं जळतील ।।तु.गा.००४६.००३।।
जळतील एकें अंतर्बाह्यात्कारें । टाकिलीं लेंकुरें कडियेहूनि ।।तु.गा.००४६.००४।।
निवांतचि एकें राहिलीं निश्चिंत । बाहेरी ना आंत जीव त्यांचे ।।तु.गा.००४६.००५।।
त्यांचे जीवावरि आले त्या सकळां । एका त्या गोपाळा वांचूनियां ।।तु.गा.००४६.००६।।
वांचणें तें आतां खोटें संवसारीं । नव्हे भेटी जरी हरीसवें ।।तु.गा.००४६.००७।।
सवें घेऊनियां चाललीं गोपाळां । अवघींच बाळा नर नारी ।।तु.गा.००४६.००८।।
नर नारी नाहीं मनुष्याचें नांव । गोकुळ हें गांव सांडियेलें ।।तु.गा.००४६.००९।।
सांडियेलीं अन्नें संपदा सकळ । चित्तीं तो गोपाळ धरूनि जाती ।।तु.गा.००४६.०१०।।
तिरीं माना घालूनियां उभ्या गाई । तटस्थ या डोहीं यमुनेच्या ।।तु.गा.००४६.०११।।
यमुनेच्या तिरीं झाडें वृक्ष वल्ली । दु:खें कोमाइली कृष्णाचिया ।।तु.गा.००४६.०१२।।
यांचें त्यांचें दु:ख एक जालें तिरीं । मग शोक करी मायबाप ।।तु.गा.००४६.०१३।।
मायबाप तुका म्हणे सहोदर । तोंवरीच तीर न पवतां ।।तु.गा.००४६.०१४।।
तीर देखोनियां यमुनेचें जळ । कांठींच कोल्हाळ करिताती ।।तु.गा.००४७.००१।।
कइवाड नव्हे घालावया उडी । आपणासी ओढी भय मागें ।।तु.गा.००४७.००२।।
मागें सरे माय पाऊलापाऊलीं । आपलेंच घाली धाकें अंग ।।तु.गा.००४७.००३।।
अंग राखोनियां माय खेद करी । अंतरीं हें हरी जाणवलें ।।तु.गा.००४७.००४।।
जाणवलें मग देवें दिली बुडी । तुका म्हणे कुडी भावना हे ।।तु.गा.००४७.००५।।
भावनेच्या मुळें अंतरला देव । शिरला संदेह भय पोटीं ।।तु.गा.००४८.००१।।
पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलिल्या सरिसें न करवें ।।तु.गा.००४८.००२।।
न करवें त्याग जीवाचा या नास । नारायण त्यास अंतरला ।।तु.गा.००४८.००३।।

अंतरला बहु बोलतां वाउगें। अंतरीच्या त्यागेंविण गोष्टी ।।तु.गा.००४८.००४।।
गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें । कोण कोण्याभावें रडती तीं ।।तु.गा.००४८.००५।।
तीं गेलीं घरासी आपल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक माय ।।तु.गा.००४८.००६।।
मायबापांची तो ऐसी जाली गति । तुका म्हणे अंतीं कळों आलें ।।तु.गा.००४८.००७।।
आला त्यांचा भाव देवाचिया मना । अंतरीं कारणासाठीं होता ।।तु.गा.००४९.००१।।
होता भाव त्यांचा पाहोनि निराळा । नव्हता पाताळा गेला आधीं ।।तु.गा.००४९.००२।।
आधीं पाठीमोरीं झालीं तीं सकळें । मग या गोपाळें बुडी दिली ।।तु.गा.००४९.००३।।
दिली हाक त्यानें जाऊनि पाताळा । जागविलें काळा भुजंगासी ।।तु.गा.००४९.००४।।
भुजंग हा होता निजला मंदिरीं । निर्भर अंतरीं गर्वनिधी ।।तु.गा.००४९.००५।।
गर्व हरावया आला नारायण । मिस या करून चेंडुवाचें ।।तु.गा.००४९.००६।।
चेंडुवाचे मिसें काळया नाथावा । तुका म्हणे देवा कारण हें ।।तु.गा.००४९.००७।।
काळ्याचे मागे चेंडु पत्नीपाशीं । तेज:पुंजराशी देखियेला ।।तु.गा.००५०.००१।।
लावण्यपुतळा मुखप्रभाराशी । कोटि रवि शशी उगवले ।।तु.गा.००५०.००२।।
उगवला खांब कर्दळीचा गाभा । ब्रीदें वांकी नभा देखें पायीं ।।तु.गा.००५०.००३।।
पाहिला सकळ तिनें न्याहाळूनि । कोण या जननी विसरली ।।तु.गा.००५०.००४।।
विसरू हा तीस कैसा याचा जाला । जीवाहुनी वाल्हा दिसतसे ।।तु.गा.००५०.००५।।
दिसतसे रुप गोजिरें लहान । पाहतां लोचन सुखावले ।।तु.गा.००५०.००६।।
पाहिलें परतोनि काळा दुष्टाकडे । मग म्हणे कुडें जालें आतां ।।तु.गा.००५०.००७।।
आतां उठोनियां खाईल या बाळा । देईल वेल्हाळा माय जीव ।।तु.गा.००५०.००८।।
जीव याचा कैसा वांचे म्हणे नारी । मोहिली अंतरीं हरिरुपें ।।तु.गा.००५०.००९।।
रुपें अनंताचीं अनंत अपार । नकळे साचार तुका म्हणे ।।तु.गा.००५०.०१०।।
म्हणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलों पुरवाया कोड त्याचें ।।तु.गा.००५१.००१।।
त्याचें आइकोन निष्ठुर वचन । भयभीत मन झालें तिचें ।।तु.गा.००५१.००२।।

तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरलीं वेगीं ।।तु.गा.००५१.००३।।
वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आलें कांहीं आम्हांवरी ।।तु.गा.००५१.००४।।
वरी उदकासी नाहीं अंत पार । अक्षोभ सागर भरलासे ।।तु.गा.००५१.००५।।
संचार करूनि कोण्या वाटें आला । ठायींच देखिला अवचितां ।।तु.गा.००५१.००६।।
अवचितां नेणों येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ।।तु.गा.००५१.००७।।
मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवूनि काळ जागा ।।तु.गा.००५१.००८।।
जागविलें काळसर्पा तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचिये ।।तु.गा.००५१.००९।।
यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळया कृतांत धुधुकारें ।।तु.गा.००५१.०१०।।
कारणें ज्या येथें आला नारायण । जालें दरुषण दोघांमध्यें ।।तु.गा.००५१.०११।।
दोघांमध्यें झाले बोल परस्परें । प्रसंग उत्तरें युद्धाचिया ।।तु.गा.००५१.०१२।।
चिंतावला चित्तीं तोंडें बोले काळ । करीन सकळ ग्रास तुझा ।।तु.गा.००५१.०१३।।
झाला सावकाश झेंप घाली वरी । तंव हाणे हरि मुष्टिघातें ।।तु.गा.००५१.०१४।।
तेणें काळें त्यासी दिसे काळ तैसा । हरावया जैसा जीव आला ।।तु.गा.००५१.०१५।।
आठवलें काळा हाकारिलें गोत । मिळालीं बहुत नागकुळें ।।तु.गा.००५१.०१६।।
कल्हारीं संघांनीं वेष्टियेला हरी । अवघा विखारीं व्यापियेला ।।तु.गा.००५१.०१७।।
यास तुका म्हणे नाहीं भक्ताविण । गरुडाचें चिंतन केलें मनीं ।।तु.गा.००५१.०१८।।
निजदास उभा तात्काळ पायापें । स्वामी देखे सर्पे वेष्टियेला ।।तु.गा.००५२.००१।।
लहानथोरें होतीं मिळालीं अपारें । त्याच्या धुधुकारें निवारलीं ।।तु.गा.००५२.००२।।
निघातें आपटी धरूनि घांवांमधीं । एकातेचि वधी माथां पाय ।।तु.गा.००५२.००३।।
एकीं जीव दिले येतांच त्या धाकें । येतील तीं एकें काकूलती ।।तु.गा.००५२.००४।।
यथेष्ट भक्षिलें पोट धायेवरी । तंव म्हणे हरि पुरे आतां ।।तु.गा.००५२.००५।।
आतां करूं काम आलों जयासाठीं । हरि घाली मिठी काळयासी ।।तु.गा.००५२.००६।।
यासी नाथूनियां नाकीं दिली दोरी । चेंडू भार शिरीं कमळांचा ।।तु.गा.००५२.००७।।

चालविला वरी बैसे नारायण । गरुडा आळंगूनि बहुडविलें ।।तु.गा.००५२.००८।।
विसरू न पडे संवगड्या गाई । यमुनेच्या डोहीं लक्ष त्यांचें ।।तु.गा.००५२.००९।।
त्यांच्या गोष्टी कांठीं बैसोनि सांगती । बुडाला दाविती येथें हरि ।।तु.गा.००५२.०१०।।
हरिचें चिंतन करितां आठव । तुका म्हणे देव आला वरी ।।तु.गा.००५२.०११।।
अवचिता त्यांनीं देखिला भुजंग । पळतील मग हाउ आला ।।तु.गा.००५३.००१।।
आला घेऊनियां यमुनेबाहेरी । पालवितो हरी गडियांसी ।।तु.गा.००५३.००२।।
गडियांसी म्हणे वैकुंठनायक । या रे सकळीक मजपाशीं ।।तु.गा.००५३.००३।।
मजपाशीं तुम्हां भय काय करी । जवळी या दुरी जाऊं नका ।।तु.गा.००५३.००४।।
कानीं आइकिले गोविंदाचे बोल । म्हणती नवल चला पाहों ।।तु.गा.००५३.००५।।
पाहों आले हरि जवळ सकळ । गोधनें गोपाळ आलिंगिले ।।तु.गा.००५३.००६।।
आल्या गाई वरी घालितील माना । वोसरलें स्तना क्षीर लोटे ।।तु.गा.००५३.००७।।
लोटती सकळें एकावरी एक । होऊनि पृथक कुर्वाळलीं ।।तु.गा.००५३.००८।।
कुर्वाळलीं आनंदें घेती चारापाणी । तिहीं चक्रपाणी देखियेला ।।तु.गा.००५३.००९।।
त्यांचपाशीं होता परी केली माव । न कळे संदेह पडलिया ।।तु.गा.००५३.०१०।।
याति वृक्ष वल्ली होत्या कोमेलिया । त्यांसी कृष्णें काया दिव्य दिली ।।तु.गा.००५३.०११।।
दिलें गोविंदें त्या पदा नाहीं नाश । तुका म्हणे आस निरसली ।।तु.गा.००५३.०१२।।
आस निरसली गोविंदाचे भेटी । संवसारा तुटी पुढिलिया ।।तु.गा.००५४.००१।।
पुढें पाठविलें गोविंदें गोपाळ । देऊनि चपळ हातीं गुढी ।।तु.गा.००५४.००२।।
हाका आरोळिया देऊनि नाचती । एक सादाविती हरि आला ।।तु.गा.००५४.००३।।
आरंभीं पडिलीं होतीं तया घरीं । संकीर्ण त्या नारी नर लोकां ।।तु.गा.००५४.००४।।
लोकां भूक तान नाहीं निद्रा डोळां । रुप वेळोवेळां आठविती ।।तु.गा.००५४.००५।।
आहाकटा मग करिती गेलिया । आधीं ठावा तयां नाहीं कोणा ।।तु.गा.००५४.००६।।
आधीं चुकी मग घडे आठवण । तुका म्हणे जन परिचयें ।।तु.गा.००५४.००७।।

जननी हे म्हणे आहा काय जालें । शरीर रक्षिलें काय काजें ।।तु.गा.००५५.००१।।
काय काज आतां हरिविण जिणें । नित्य दु:ख कोणे सोसावें हें ।।तु.गा.००५५.००२।।
हें दु:ख न सरे हरि न भेंटे तों । त्यामार्गेचि जातों एका वेळे ।।तु.गा.००५५.००३।।
एक वेळ जरी देखतें मी आतां । तरी जीवापरता न करितें ।।तु.गा.००५५.००४।।
करितां हे मात हरिचें चिंतन । शुभ तो शकून तुका म्हणे ।।तु.गा.००५५.००५।।
शुभ मात तिहीं आणिली गोपाळीं । चेंडू वनमाळी घेऊनि आले ।।तु.गा.००५६.००१।।
आली दारा देखे हरुषाची गुढी । सांगितली पुढें हरुषें मात ।।तु.गा.००५६.००२।।
हरुषली माता केलें निंबलोण । गोपाळांवरून कुरवंडी ।।तु.गा.००५६.००३।।
गोपाळां भोंवतें मिळालें गोकूळ । अवघीं सकळ लहान थोर ।।तु.गा.००५६.००४।।
थोर सुख झालें ते काळीं आनंद । सांगती गोविंद वरी आला ।।तु.गा.००५६.००५।।
आले वरी बैसोनियां नारायण । काळ्या नाथून वहन केलें ।।तु.गा.००५६.००६।।
नगराबाहेरी निघाले आनंदें । लावूनियां वाद्यें नाना घोष ।।तु.गा.००५६.००७।।
नारायणापुढें गोपाळ चालती । आनंदें नाचती गाती गीत ।।तु.गा.००५६.००८।।
तंव तो देखिला वैकुंठींचा पति । लोटांगणीं येती सकळही ।।तु.गा.००५६.००९।।
सकळही एका भावें आलिंगिले । अवघियां झाले अवघे हरि ।।तु.गा.००५६.०१०।।
हरि आलिंगूनि हरिरुप झालीं । आप विसरलीं आपणास ।।तु.गा.००५६.०११।।
सकळांसी सुख एक दिलें देवें । मायबापाभावें लोकपाळा ।।तु.गा.००५६.०१२।।
मायबापा देवा नाहीं लोकपाळ । सारिखीं सकळ तुका म्हणे ।।तु.गा.००५६.०१३।।
नेणें वर्ण धर्म जीं आलीं सामोरीं । अवघींच हरि आलिंगिली ।।तु.गा.००५७.००१।।
हरि लोकपाळ आले नगरांत । सकळांसहित मायबाप ।।तु.गा.००५७.००२।।
पारणें तयांचें जालें एक वेळे । देखिलें सांवळें परब्रह्म ।।तु.गा.००५७.००३।।
ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढिया उभविती घरोघरीं ।।तु.गा.००५७.००४।।
घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंगमाळा चौक दारीं ।।तु.गा.००५७.००५।।

दारीं वृंदावनें तुळसीचीं बनें । रामकृष्ण गाणें नारायण ।।तु.गा.००५७.००६।।
नारायण तिहीं पूजिला बहुतीं । नाना पुष्पयाती करूनियां ।।तु.गा.००५७.००७।।
यांचें ऋण नाहीं फिटलें मागील । पुढें भांडवल जोडिती हीं ।।तु.गा.००५७.००८।।
हीं नव्हतीं कधीं या देवावेगळीं । केला वनमाळी सेवाऋणी ।।तु.गा.००५७.००९।।
सेवाऋणें तुका म्हणे रुप धरी । भक्तांचा कैवारी नारायण ।।तु.गा.००५७.०१०।।
नारायण आलें निजमंदिरांसी । जावया लोकांसी बहुडविले ।।तु.गा.००५८.००१।।
बहुडविले बहु केलें समाधान । विसरूं हा क्षण नका माझा ।।तु.गा.००५८.००२।।
मात सांगितली सकळ वृत्तांत । केलें दंडवत सकळांनीं ।।तु.गा.००५८.००३।।
सकळां भातुकें वांटिल्या साखरा । आपुलाल्या घरा लोक गेले ।।तु.गा.००५८.००४।।
लोक गेले कामा गाईंपें गोपाळ । वारली सकळ लोभासाठीं ।।तु.गा.००५८.००५।।
लोभ दावूनियां आपला विसर । पाडितो कुमर धन आशा ।।तु.गा.००५८.००६।।
आशेचे बांधले तुका म्हणे जन । काय नारायण ऐसा जाणे ।।तु.गा.००५८.००७।।
झाला कवतुक करिता रोकडें । आणीकही पुढें नारायण ।।तु.गा.००५९.००१।।
येऊनियां पुढें धरिला मारग । हरावया भाग इंद्रयाजीं ।।तु.गा.००५९.००२।।
इंद्रा दहीं दूध तूप नेतां लोणी । घेतलें हिरोनि वाटे त्यांचें ।।तु.गा.००५९.००३।।
हिरोनि घेतल्या कावडी सकळा । म्हणती गोपाळा बरें नव्हे ।।तु.गा.००५९.००४।।
नव्हे तेंचि करी न भे कळिकाळा । तुका म्हणे लीळा खेळे देव ।।तु.गा.००५९.००५।।
खेळ नव्हे बरा इंद्र कोपलिया । देव म्हणे तयां भीऊं नका ।।तु.गा.००६०.००१।।
नका धरूं भय धाक कांहीं मनीं । बोले चक्रपाणि गौळियांसी ।।तु.गा.००६०.००२।।
गौळियांसी धीर नाहीं या वचनें । आशंकित मनें वेडावलीं ।।तु.गा.००६०.००३।।
वेडावलीं त्यांस न कळतां माव । देव आदिदेव नोळखतां ।।तु.गा.००६०.००४।।
नोळखतां दु:खें वाहतील शिरीं । तुका म्हणे वरी भारवाही ।।तु.गा.००६०.००५।।
भारवाही नोळखती या अनंता । जवळी असतां अंगसंगें ।।तु.गा.००६१.००१।।

अंगसंगें तयां न कळे हा देव । कळोनि संदेह मागुताला ॥तु.गा.००६१.००२॥
मागुती पडती चिंतेचिये डोहीं । जयाची हे नाहीं बुद्धि स्थिर ॥तु.गा.००६१.००३॥
बुद्धि स्थिर राहों नेदी नारायण । आशाबद्ध जन लोभिकांची ॥तु.गा.००६१.००४॥
लोभिकां न साहे देवाचें करणें । तुका म्हणे तेणें दु:खी होती ॥तु.गा.००६१.००५॥
दु:खी होती लोभी करावें तें काई । बुडतील गाई म्हैसी आतां ॥तु.गा.००६२.००१॥
आणिकही कांहीं होईल अरिष्ट । नाइके हा धीट सांगितलें ॥तु.गा.००६२.००२॥
सांगों चला याच्या मायबापांपाशीं । निघाली घरासी देवा रागें ॥तु.गा.००६२.००३॥
रागें काला देतां न घेती कवळ । टोकवी गोपाळ क्रोधियांसी ॥तु.गा.००६२.००४॥
क्रोध देवावरी धरियेला राग । तुका म्हणे भाग न लाभती ॥तु.गा.००६२.००५॥
भाग त्या सुखाचे वांकड्या बोबड्या । आपुलिया गड्यां भाविकांसी ॥तु.गा.००६३.००१॥
भारवाही गेले टाकूनी कावडी । नवनीत गोडी भाविकांसी ॥तु.गा.००६३.००२॥
काला करूनियां वांटिती सकळां । आनंदें गोपाळांमाजी खेळे ॥तु.गा.००६३.००३॥
खेळींमेळीं दहीं दूध लोणी खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥तु.गा.००६३.००४॥
कवणाचें चाले तुका म्हणे बळ । जयासी गोपाळ साह्य झाले ॥तु.गा.००६३.००५॥
जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वांकुल्या गोपाळ दाविताती ॥तु.गा.००६४.००१॥
तातडीनें मेघां आज्ञा करी राव । गोकुळींचा ठाव उरों नेदा ॥तु.गा.००६४.००२॥
नेदाविया गाई म्हसी वांचों लोक । पुरावे सकळीक सिळाधारीं ॥तु.गा.००६४.००३॥
धाक नाहीं माझा गौळियांच्या पोरां । सकळीक मारा म्हणे मेघां ॥तु.गा.००६४.००४॥
म्हणविती देव आपणां तोंवरी । नाहीं जंववरी कोपलों मी ॥तु.गा.००६४.००५॥
मीपणें हा देव न कळेचि त्यांसी । अभिमान रासी गर्वाचिया ॥तु.गा.००६४.००६॥
अभिमानराशी जयाचिये ठायीं । तुका म्हणे तईं देव दुरी ॥तु.गा.००६४.००७॥
देव त्यां फावला भाविकां गोपाळां । नाहीं तेथें कळा अभिमान ॥तु.गा.००६५.००१॥
नाडलीं आपल्या आपणचि एकें । संदेहदायकें बहु फार ॥तु.गा.००६५.००२॥

फार चाळविलीं कळों नेदी माव । देवाआदिदेव विश्वंभर ।।तु.गा.००६५.००३।।
विश्वासावांचूनि कळों नये खरा । अभक्तां अधिरां जैसा तैसा ।।तु.गा.००६५.००४।।
जैसा भाव तैसा जवळी त्या दुरी । तुका म्हणे हरि देतो घेतो ।।तु.गा.००६५.००५।।
तो या साच भाव न कळेचि इंद्रा । म्हणऊनि धारा घाली मेघा ।।तु.गा.००६६.००१।।
घाली मेघ धारी कडाडिल्या माथा । वरी अवचिता देखियेला ।।तु.गा.००६६.००२।।
देखिती पाऊस वोळला गोपाळ । भ्याले हे सकळ विचारती ।।तु.गा.००६६.००३।।
विचारीं पडलीं विसरलीं खेळ । अन्याय गोपाळ म्हणती केला ।।तु.गा.००६६.००४।।
लागलेंसे गोड न कळे त्या काळीं । भेणें वनमाळी आठविती ।।तु.गा.००६६.००५।।
आतां काय कैसा करावा विचार । गोधनासी थार आपणिया ।।तु.गा.००६६.००६।।
यांचिया विचारें होणार तें काई । तुका म्हणे ठायीं वेडावलीं ।।तु.गा.००६६.००७।।
वेडावलीं काय करावें या काळीं । म्हणे वनमाळी गोपाळांसी ।।तु.गा.००६७.००१।।
गोवर्धन धरूं शिरीं उचलूनि । म्हणे तुम्ही कोणी भिऊं नका ।।तु.गा.००६७.००२।।
नका सांडूं कोणी आपला आवांका । मारितां या हाका आरोळिया ।।तु.गा.००६७.००३।।
आशंकित चित्तें न वाटे त्यां खरें । धाकेंच ते बरें म्हणती चला ।।तु.गा.००६७.००४।।
चित्तीं धाक परि जवळी अनंत । तुका म्हणे घात होऊं नेदी ।।तु.गा.००६७.००५।।
नेदी दुःख देखों दासां नारायण । ठेवी निवारून आल्या आधीं ।।तु.गा.००६८.००१।।
आधीं पुढें शुद्ध करावा मारग । दासांमागें मागें सुखरूप ।।तु.गा.००६८.००२।।
पर्वतासी हात लाविला अनंतें । तों जाय वरतें आपेंआप ।।तु.गा.००६८.००३।।
आपल्याआपण उचलिला गिरी । गोपाळ हे करी निमित्यासी ।।तु.गा.००६८.००४।।
निमित्य करूनि करावें कारण । करितां आपण कळों नेदी ।।तु.गा.००६८.००५।।
दीनाचा कृपाळू पतितपावन । हें करी वचन साच खरें ।।तु.गा.००६८.००६।।
सांगणें नलगे सुखदुःख दासा । तुका म्हणे ऐसा कृपावंत ।।तु.गा.००६८.००७।।
कृपावंतें हाक दिली सकळिकां । माजि या रे नका राहों कोणी ।।तु.गा.००६९.००१।।

निघाले या भेणें पाऊसाच्या जन । देखे गोवर्धन उचलिला ।।तु.गा.००६९.००२।।
लाविले गोपाळ फेरीं चहूंकडे । हांसे फुंदे रडे कोणी धाकें ।।तु.गा.००६९.००३।।
धाकें हीं सकळ निघालीं भीतरीं । उचलिला गिरी तयाखालीं ।।तु.गा.००६९.००४।।
तयाखालीं गाई वत्सें आलीं लोक । पक्षी सकळीक जीवजाति ।।तु.गा.००६९.००५।।
जिहीं म्हणविलें हरिचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी ।।तु.गा.००६९.००६।।
जाति कुळ नाहीं तयासी प्रमाण । अनन्या अनन्य तुका म्हणे ।।तु.गा.००६९.००७।।
म्हणविती भक्त हरीचे अंकित । करितो अनंत हित त्यांचें ।।तु.गा.००७०.००१।।
त्यांसी राखे बळें आपुले जे दास । कळिकाळासी वास पाहों नेदी ।।तु.गा.००७०.००२।।
पाऊस न येतां केली यांची थार । लागला तुषार येऊं मग ।।तु.गा.००७०.००३।।
येऊनि दगड बैसतील गिरी । वरुषला धारीं शिळांचिये ।।तु.गा.००७०.००४।।
शिळांचिया धारीं वरुषला आकांत । होता दिवस सात एकसरें ।।तु.गा.००७०.००५।।
एकसरें गिरी धरिला गोपाळीं । होता भाव बळी आम्हीं ऐसा ।।तु.गा.००७०.००६।।
ऐसें कळों आलें देवाचिया चित्ता । म्हणे तुम्ही आतां हात सोडा ।।तु.गा.००७०.००७।।
हांसती गोपाळ करूनि नवल । ऐकोनियां बोल गोविंदाचे ।।तु.गा.००७०.००८।।
दावितील डोया गुडघें कोपर । फुटले ते भार उचलितां ।।तु.गा.००७०.००९।।
भार आम्हांवरी घालूनि निराळा । राहिलासी डोळा चुकवूनि ।।तु.गा.००७०.०१०।।
निमित्य अंगुळी लावियेली वरी । पाहों कैसा गिरि धरितोसी ।।तु.गा.००७०.०११।।
सिणले हे होते ठायींच्या त्या भारें । लटिकेंचि खरें मानूनियां ।।तु.गा.००७०.०१२।।
यांणीं अंत पाहों आदरिला याचा । तुका म्हणे वाचा वाचाळ ते ।।तु.गा.००७०.०१३।।
वाचाळ लटिके अभक्त जे खळ । आपुलें तें बळ वाखाणावें ।।तु.गा.००७१.००१।।
बळें हुंबरती सत्य त्यां न कळे । नुघडती डोळे अंधळ्यांचे ।।तु.गा.००७१.००२।।
आसुडिल्या माना हात पाय नेटें । तंव भार बोटें उचलिला ।।तु.गा.००७१.००३।।
लटिकाचि आम्हीं सीण केला देवा । कळों आलें तेव्हां सकळांसी ।।तु.गा.००७१.००४।।

आलें कळों तुका म्हणे अनुभवें । मग अहंभावें सांडवले ।।तु.गा.००७१.००५।।
सांडवले सकळांचे अभिमान । आणले शरण लोटांगणीं ।।तु.गा.००७२.००१।।
लोटांगणीं आले होऊनियां दीन । मग नारायण म्हणे भलें ।।तु.गा.००७२.००२।।
भला आज तुम्हीं केला साच पण । गिरी गोवर्धन उचलिला ।।तु.गा.००७२.००३।।
लागती चरणा सकळ ते काळीं । आम्हांमध्यें बळी तूंचि एक ।।तु.गा.००७२.००४।।
एका तुजविण न यों आम्हीं कामा । कळों कृष्णा रामा आलें आजी ।।तु.गा.००७२.००५।।
आजिवरी आम्हां होता अभिमान । नेणतां चरणमहिमा तुझा ।।तु.गा.००७२.००६।।
तुझा पार आम्हीं नेणों नारायणा । नखीं गोवर्धना राखियेलें ।।तु.गा.००७२.००७।।
राखियेलें गोकुळ आम्हां सकळांसी । दगडांच्या राशी वरुषतां ।।तु.गा.००७२.००८।।
वर्णावें तें काय तुझें महिमान। धरिती चरण सकळही ।।तु.गा.००७२.००९।।
सकळही तहान विसरली भूक । सकळही सुख दिलें त्यांसी ।।तु.गा.००७२.०१०।।
त्यांसी कळों आला वैकुंठनायक । तुका म्हणे लोक निर्भर ते ।।तु.गा.००७२.०११।।
लोकां कळों आला देव आम्हांमधीं । टाकिली उपाधि तिहीं शंका ।।तु.गा.००७३.००१।।
शंका नाहीं थोरां लहानां जीवांसी । कळला हृषीकेशी तेव्हां मग ।।तु.गा.००७३.००२।।
मग मनीं झालें निर्भर सकळ । संगें लोकपाळ कृष्णाचिया ।।तु.गा.००७३.००३।।
कृष्णाचिया ओंव्या गाणें गाती गीत । कृष्णमय चित्त झालें त्यांचे ।।तु.गा.००७३.००४।।
त्यांसी ठावा नाहीं बाहेरील भाव । अंतरींच वाव सुख झालें ।।तु.गा.००७३.००५।।
सुखें तया दिस न कळे हे राती । अखंड या ज्योति गोविंदाची ।।तु.गा.००७३.००६।।
चिंतनेंचि धालीं नलगे अन्नपाणी । तुका म्हणे मनीं समाधान ।।तु.गा.००७३.००७।।
समाधान त्यांचीं इंद्रियें सकळ । जयां तो गोपाळ समागमें ।।तु.गा.००७४.००१।।
गोविंदाचा जाला प्रकाश भीतरीं । मग त्या बाहेरी काय काम ।।तु.गा.००७४.००२।।
काज काम त्यांचे सरले व्यापार । नाहीं आपपर माझें तुझें ।।तु.गा.००७४.००३।।
माया सकळांची सकळांही वरी । विषम तें हरि दिसों नेदी ।।तु.गा.००७४.००४।।

दिसे तया आपपरावें सारिखें । तुका म्हणे सुखें कृष्णाचिया ।।तु.गा.००७४.००५।।
कृष्णाचिया सुखें भूक नाहीं तान । सदा समाधान सकळांचें ।।तु.गा.००७५.००१।।
कळलेंचि नाहीं झाले किती दिस । बाहेरील वास विसरलीं ।।तु.गा.००७५.००२।।
विसरू कामाचा तुका म्हणे झाला । उद्वेग राहिला जावें यावें ।।तु.गा.००७५.००३।।
जावें बाहेरी हा नाठवे विचार । नाहीं समाचार ठावा कांहीं ।।तु.गा.००७६.००१।।
कांहीं न कळे तें कळों आलें देवा । मांडिला रिघावा कवतुक ।।तु.गा.००७६.००२।।
कवतुकासाठीं भक्त देहावरी । आणिताहे हरि बोलावया ।।तु.गा.००७६.००३।।
यासी नांव रूप नाहीं हा आकार । कळला साचार भक्तांमुखें ।।तु.गा.००७६.००४।।
मुखें भक्तांचिया बोलतो आपण । अंगसंगें भिन्न नाहीं दोघां।।तु.गा.००७६.००५।।
दोघे वेगळाले लेखील जो कोणी । तयाचा मेदिनी बहुभार ।।तु.गा.००७६.००६।।
तयासी घडलीं सकळही पापें । भक्तांचिया कोपें निंदा द्वेषें ।।तु.गा.००७६.००७।।
द्वेषियांचा संग न घडावा कोणा । विष जेवीं प्राणा नाश करी ।।तु.गा.००७६.००८।।
करितां जो आइके निंदा या संतांची । तया होती तेचि अध:पात ।।तु.गा.००७६.००९।।
पतन उद्धार संगाचा महिमा । त्यजावें अधमा संत सेवीं ।।तु.गा.००७६.०१०।।
सेवीं संत जोडे महा लाभरासी । तुका म्हणे यासी नाश नाहीं ।।तु.गा.००७६.०११।।
नाहीं नाश हरि आठवितां मुखें । जोडतील सुखें सकळही ।।तु.गा.००७७.००१।।
सकळही सुखें वोळलीं अंतरीं । मग त्या बाहेरी काय काज ।।तु.गा.००७७.००२।।
येऊं विसरलीं बाहेरी गोपाळें । तल्लीन सकळ कृष्णसुखें ।।तु.गा.००७७.००३।।
सुख तें योगियां नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशू जीवां ।।तु.गा.००७७.००४।।
वारला पाऊस कोणा नाहीं ठावा । तुका म्हणे देवावांचूनियां ।।तु.गा.००७७.००५।।
यांसीं समाचार सांगतों सकळां । चलावें गोपाळा म्हणे देव ।।तु.गा.००७८.००१।।
देव राखे तयां आडलिया काळें । देव सुखफळें देतो दासां ।।तु.गा.००७८.००२।।
दासां दु:ख देखों नेदी आपुलिया । निवारी आलिया न कळतां ।।तु.गा.००७८.००३।।

नाहीं मेघ येतां जातां देखियला । धारीं वरूषला शिळांचिये ।।तु.गा.००७८.००४।।
एवढें भक्तांचें सांकडें अनंता । होय निवारिता तुका म्हणे ।।तु.गा.००७८.००५।।
काकुलती एकें पाहाती बाहेरी । तया म्हणे हरि वोसरला ।।तु.गा.००७९.००१।।
वोसरला मेघ आला होता काळ । बाहेरी सकळ आले लोक ।।तु.गा.००७९.००२।।
कवतुक झालें तें काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ।।तु.गा.००७९.००३।।
भावें तयापुढें नाचती सकळें । गातील मंगळें ओंव्या गीत ।।तु.गा.००७९.००४।।
गीत गाती ओंव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहरी वाहाती पांवे ।।तु.गा.००७९.००५।।
वत्सें गाई पशु नाचती आनंदें । वेधलिया छंदें गोविंदाच्या ।।तु.गा.००७९.००६।।
चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोण तें दैवाचें तयाहुनी ।।तु.गा.००७९.००७।।
तयाहुनी कोणी नाहीं भाग्यवंत । अखंड सांगात गोविंदाचा ।।तु.गा.००७९.००८।।
गोविंदाचा संग तुका म्हणे ध्यान । गोविंद ते जन गोकुळींचे ।।तु.गा.००७९.००९।।
गोकुळींची गति कोण झाली परी । पाहों आला वरी इंद्रराव ।।तु.गा.००८०.००१।।
इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करूनि आलों ।।तु.गा.००८०.००२।।
आतां जीव नाहीं सांगाया त्या रानीं । पुरिलें पाषाणीं शिळाधारीं ।।तु.गा.००८०.००३।।
रिता कोठें नाहीं उरों दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ।।तु.गा.००८०.००४।।
न कळतां देव बळें हुंबरती । साच ते पावती अपमान ।।तु.गा.००८०.००५।।
माव न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टी पहावया ।।तु.गा.००८०.००६।।
पाहातां तें आहे जैसें होतें तैसें । नाचती विशेषें तुका म्हणे ।।तु.गा.००८०.००७।।
नाचतां देखिलीं गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ।।तु.गा.००८१.००१।।
लागला पाऊस शिळांचिये धारीं । वांचलीं हीं परी कैसीं येथें ।।तु.गा.००८१.००२।।
येथें आहे नारायण संदेह नाहीं । विघ्न केलें ठायीं निर्विघ्न तें ।।तु.गा.००८१.००३।।
विचारितां उचलिला गोवर्धन । अवतार पूर्ण कळों आला ।।तु.गा.००८१.००४।।
आला गौळियांच्या घरा नारायण । करितो स्तवन इंद्र त्यांचे ।।तु.गा.००८१.००५।।

त्यांच्या पुण्या पार कोण करी लेखा । नोहे चतुर्मुखा ब्रह्मयासी ।।तु.गा.००८१.००६।।
सीणतां जो ध्याना न ये एकवेळा । तो तयां गोपाळा समागमें ।।तु.गा.००८१.००७।।
समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुर्वाळितां अंगसंग ।।तु.गा.००८१.००८।।
संग जाला मायबापां लोकपाळां । आलिंगितां गळा कंठाकंठ ।।तु.गा.००८१.००९।।
करिते हे झाले स्तुति सकळिक । देव इंद्रादिक गोविंदाची ।।तु.गा.००८१.०१०।।
करितील वृष्टि पुष्पवरूषाव । देवाआदिदेव पूजियेला ।।तु.गा.००८१.०११।।
पुष्पांजुळी मंत्रघोष जयजयकार । दुमदुमी अंबर तेणें नादें ।।तु.गा.००८१.०१२।।
नामाचा गजर गंधर्वांचीं गाणीं । आनंद त्रिभुवनीं न समाये ।।तु.गा.००८१.०१३।।
तो सुखसोहळा अनुपम्य रासी । गोकुळीं देवासी दोन्हीं ठायीं ।।तु.गा.००८१.०१४।।
दोहीं ठायीं सुख दिलें नारायणें । गेला दरुषणें वैरभाव ।।तु.गा.००८१.०१५।।
भावना भेदाची जाय उठाउठी । तुका म्हणे भेटी गोविंदाचे ।।तु.गा.००८१.०१६।।
गोविंदाचें नाम गोड घेतां वाचे। तेथें राहे कइंचे वैरभाव।।तु.गा.००८२.००१।।
भावें नमस्कार घातला सकळीं। लोटांगणें तळीं महीवरी।।तु.गा.००८२.००२।।
वरी हात बाहे उभारिली देवें। कळलिया भावें सकळांच्या।।तु.गा.००८२.००३।।
सकळही वरी बहुडविलें स्थळा। चलावें गोपाळां म्हणे घरा।।तु.गा.००८२.००४।।
राहिलीं हीं नाचों गोविंदाच्या बोलें। पडलिया डोल छंदें होतीं।।तु.गा.००८२.००५।।
छंद तो नावरे आपणां आपला। आनंदाचा आला होता त्यांसी।।तु.गा.००८२.००६।।
त्यांसी तुका म्हणे आनंद सकळां। ठेंगण्या गोपाळां समागमें।।तु.गा.००८२.००७।।
समागमें असे हरि नेणतियां। नेदी जाऊं वायां अंकितासी।।तु.गा.००८३.००१।।
अंकिता सावध केलें नारायणें। गोपाळ गोधनें सकळही।।तु.गा.००८३.००२।।
सकळही जन आले गोकुळासी। आनंद मनासीं सकळांच्या।।तु.गा.००८३.००३।।
सकळांचा केला अंगीकार देवें। न कळतां भावें वांचवी त्यां।।तु.गा.००८३.००४।।
त्यां झाला निर्धार हरि आम्हापासीं। निवांत मानसीं निर्भर तीं।।तु.गा.००८३.००५।।

निर्भर हे जन गोकुळींचे लोक ।केले सकळीक नारायणें ।।तु.गा.००८३.००६ ।।
नारायण भय येऊं नेदी गांवा। तुका म्हणे नांवा अनुसरे त्यां ।।तु.गा.००८३.००७ ।।
अनुसरे तया फिरों नेदी मागें। राहे अंगसंगें समागमें ।।तु.गा.००८४.००१ ।।
अंगसंगें असे कर्मसाक्ष देव। जैसा ज्याचा भाव तैसें फळ ।।तु.गा.००८४.००२ ।।
फळपाकीं भोग देतील प्राणीये। तुका म्हणे नये सवें कांहीं ।।तु.गा.००८४.००३ ।।
ये दशे चरित्र केलें नारायणें। रांगतां गोधनें राखिताहे ।।तु.गा.००८५.००१ ।।
हें सोंग सारिलें या रुपें अनंतें। पुढेंही बहुतें करणें आहे ।।तु.गा.००८५.००२ ।।
आहे तुका म्हणे धर्मसंस्थापनें। केला नारायणें अवतार ।।तु.गा.००८५.००३ ।।
अवतार केला संहाराया दुष्ट। करिती हे नष्ट परपीडा ।।तु.गा.००८६.००१ ।।
परपीडा करी दैत्य कंसराव। पुढें तोही भाव आरंभिला ।।तु.गा.००८६.००२ ।।
लाविलें लाघव पाहोनियां संधि। सकळांही वधी दुष्टजन ।।तु.गा.००८६.००३ ।।
दुष्टजन परपीडक जे कोणी। ते या चक्रपाणी न सहती ।।तु.गा.००८६.००४ ।।
न साहावें दु:ख भक्तांचें या देवा। अवतार घ्यावा लागे रूप ।।तु.गा.००८६.००५ ।।
रूप हें चांगलें राम कृष्ण नाम। हरे भवश्रम उच्चारितां ।।तु.गा.००८६.००६ ।।
उच्चारितां नाम कंस वैरभावें। हरोनियां जीवें कृष्ण केला ।।तु.गा.००८६.००७ ।।
कृष्णरूप त्यासी दिसे अवघें जन। पाहे तों आपण कृष्ण झाला ।।तु.गा.००८६.००८ ।।
पाहिलें दर्पणीं आधिल्या मुखासी। चतुर्भुज त्यासी तोचि झाला ।।तु.गा.००८६.००९ ।।
झालीं कृष्णरूप कन्या पुत्र भाज। तुका म्हणे राज्य सैन्य जन ।।तु.गा.००८६.०१० ।।
सैन्य जन हांसे राया जालें काई। वासपे तो ठायीं आपणासी ।।तु.गा.००८७.००१ ।।
आपणा आपण जाय सती जैसी। वैरभाव ज्यांसी भक्ति नाहीं ।।तु.गा.००८७.००२ ।।
नाहीं याचा त्याचा भाव एकविध। म्हणऊनि छंद वेगळाले ।।तु.गा.००८७.००३ ।।
वेगळाल्या भावें ते तया हांसती। तयास दिसती अवघीं हरि ।।तु.गा.००८७.००४ ।।
हरिला कंसाचा जीवभाव देवें। द्वेषाचिया भावें तुका म्हणे ।।तु.गा.००८७.००५ ।।

द्वेषाचिया भावें हरिरूप झाले। भाव हरपले देहादिक ।।तु.गा.००८८.००१ ।।
देहादिक कर्मे अभिमान वाढे। तया कैसा जोडे नारायण ।।तु.गा.००८८.००२ ।।
नारायण जोडे एकविध भावें। तुका म्हणे जीवें जाणें लागें ।।तु.गा.००८८.००३ ।।
जीवभाव त्याचा गेला अभिमान। म्हणऊनि जन हांसे कंसा ।।तु.गा.००८९.००१ ।।
सावध करितां नये देहावरी। देखोनियां दूरी पळे जन ।।तु.गा.००८९.००२ ।।
जन वन हरि झालासे आपण। मग हे लोचन झांकियेले ।।तु.गा.००८९.००३ ।।
झांकूनि लोचन मौन्येंचि राहिला। नाहीं आतां बोलायाचें काम ।।तु.गा.००८९.००४ ।।
बोलायासी दुजें नाहीं हें राहिलें। जन कृष्ण झालें स्वयें रूप ।।तु.गा.००८९.००५ ।।
रूप पालटलें गुण नाम याति। तुका म्हणे भूतीं देव झाला ।।तु.गा.००८९.००६ ।।
झालों स्वयें कृष्ण आठव हा चित्तीं। भेद भयवृत्ति उरली आहे ।।तु.गा.००९०.००१ ।।
उरली आहे रूप नांव दिसे भिन्न। मी आणि कृष्ण आठवतो ।।तु.गा.००९०.००२ ।।
तोंवरी हा देव नाहीं तयापासीं। आला दिसे त्यासी तोचि देव ।।तु.गा.००९०.००३ ।।
देवरूप त्याची दिसे वरी काया। अंतरीं तो भयाभीत भेदें ।।तु.गा.००९०.००४ ।।
भेदें तुका म्हणे अंतरे गोविंद। साचविण छंद वायां जाय ।।तु.गा.००९०.००५ ।।
वायां तैसे बोल हरिसी अंतर। केले होते चार भयभेदें ।।तु.गा.००९१.००१ ।।
भेदभय गेलें नोळखे आपणा। भेटी नारायणा कंसा झाली ।।तु.गा.००९१.००२ ।।
झाली भेटी कंसा हरिशीं निकट। सन्मुखाची नीट येरयेरां ।।तु.गा.००९१.००३ ।।
येरयेरां भेटी युद्धाच्या प्रसंगीं। त्याचे शस्त्र अंगीं हाणितलें ।।तु.गा.००९१.००४ ।।
त्याचें वर्म होतें ठावें या अनंता। तुका म्हणे सत्तानायक हा ।।तु.गा.००९१.००५ ।।
नारायणें कंस चाणूर मर्दिले। राज्यीं स्थापियेलें उग्रसेना ।।तु.गा.००९२.००१ ।।
उग्रसेन स्थापियेला शरणागत। पुरविला अंत अभक्तांचा ।।तु.गा.००९२.००२ ।।
अवघेंचि केलें कारण अनंतें। आपुलिया हातें सकळही ।।तु.गा.००९२.००३ ।।
सकळही केलीं आपुलीं अंकित। राहे गोपीनाथ मथुरेसी ।।तु.गा.००९२.००४ ।।

मथुरेसी आला वैकुंठनायक । झालें सकळही एक राज्य ।।तु.गा.००९२.००५ ।।
राज्य दिलें उग्रसेना शरणागता । सोडविलीं मातापिता दोन्हीं ।।तु.गा.००९२.००६ ।।
सोडवणें धांवे भक्तांच्या कैवारें । तुका म्हणे करें शस्त्र धरी ।।तु.गा.००९२.००७ ।।
धरी दोहीं ठायीं सारखाची भाव । देवकी वसुदेव नंद दोघे ।।तु.गा.००९३.००१ ।।
दोघे एके ठायीं केलीं नारायणें । वाढविला तिणें आणि व्याली ।।तु.गा.००९३.००२ ।।
व्याला वाढला हा आपल्या आपण । निमित्या कारणें मायबाप ।।तु.गा.००९३.००३ ।।
माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासी ।।तु.गा.००९३.००४ ।।
कोण जाणे याचे अंतरींचा भाव । तुका म्हणे माव कळों नेदी ।।तु.गा.००९३.००५ ।।
दीनाचा कृपाळू दुष्टजना काळ । एकला सकळ व्यापक हा ।।तु.गा.००९४.००१ ।।
हांसे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये प्राकृत म्हणों यासी ।।तु.गा.००९४.००२ ।।
यासी कळावया एक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव धांडोळितां ।।तु.गा.००९४.००३ ।।
धांडोळितां श्रुति राहिल्या निश्चित । तो करी संकेत गोपींसवें ।।तु.गा.००९४.००४ ।।
गोपिकांची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखतां ।।तु.गा.००९४.००५ ।।
न देखतां त्यांसी उठे बैसे पाहे । वेडावला राहे वेळोवेळां ।।तु.गा.००९४.००६ ।।
वेळोवेळां पाहे पंथ गोपिकांचा । तुका म्हणे वाचा नातुडे तो ।।तु.गा.००९४.००७ ।।
तो बोले कोमल निष्ठुर साहोनि । कोपतां गौळणी हास्य करी ।।तु.गा.००९५.००१ ।।
करावया दास्य भक्तांचें निर्लज्ज । कवतुकें रज माथां वंदी ।।तु.गा.००९५.००२ ।।
दिलें उग्रसेना मथुरेचें राज्य । सांगितलें काज करी त्याचें ।।तु.गा.००९५.००३ ।।
त्यासी होतां कांहीं अरिष्ट निर्माण । निवारी आपण शरणागतां ।।तु.गा.००९५.००४ ।।
शरणागतां राखे सर्वभावें हरि । अवतार धरी तयांसाठीं ।।तु.गा.००९५.००५ ।।
तयांसाठीं वाहे सुदर्शन गदा । उभा असे सदा सांभाळीत ।।तु.गा.००९५.००६ ।।
तळमळ नाहीं तुका म्हणे चित्ता । भक्तांचा अनंता भार माथां ।।तु.गा.००९५.००७ ।।
मारिले असुर वाढल्या मेदिनी । होते कोणा कोणी पीडित ते ।।तु.गा.००९६.००१ ।।

तया नारायण पाठवी अघोरा। संतांच्या मत्सरा घातावरी ।।तु.गा.००९६.००२ ।।
वारिले ते दूतीं यमाचिये दंडीं। नुच्चारितां तोंडीं नारायण ।।तु.गा.००९६.००३ ।।
नारायणनाम नावडे जयांसी। ते झाले मिरासी कुंभपाकीं ।।तु.गा.००९६.००४ ।।
कुंभपाकीं सेल मान तो तयांचा। तुका म्हणे वाचा संतनिंदा ।।तु.गा.००९६.००५ ।।
वास नारायणें केला मथुरेसी। वधूनि दुष्टांसी तया ठायीं ।।तु.गा.००९७.००१ ।।
ठायीं पितयाचे मानी उग्रसेना। प्रतिपाळीं जनांसहित लोकां ।।तु.गा.००९७.००२ ।।
लोकां दु:ख नाहीं मागील आठव। देखियेला देव दृष्टी त्यांनीं ।।तु.गा.००९७.००३ ।।
देखोनियां देवा विसरलीं कंसा। ठावा नाहीं ऐसा होता येथें ।।तु.गा.००९७.००४ ।।
येथें दुजा कोणी नाहीं कृष्णाविणें। ऐसें वाटे मनें काया वाचा ।।तु.गा.००९७.००५ ।।
काया वाचा मनें कृष्णीं रत झालें। सकळां लागलें कृष्णध्यान ।।तु.गा.००९७.००६ ।।
ध्यान गोविंदाचें लागलेंसे लोकां। निर्भर हे तुका म्हणे चित्तीं ।।तु.गा.००९७.००७ ।।
चिंतिलें पावलीं जया कृष्णभेटी। एरवीं ते आटी वायांविण ।।तु.गा.००९८.००१ ।।
वासना धरिती कृष्णाविणें कांहीं। सीण केला तिहीं साधनांचा ।।तु.गा.००९८.००२ ।।
चाळविलीं दंभें एक अहंकारें। भोग जन्मांतरें न चुकती ।।तु.गा.००९८.००३ ।।
न चुकती भोग तपें दानें व्रतें। एका त्या अनंतेंवांचूनियां ।।तु.गा.००९८.००४ ।।
चुकवूनि जन्म दाखवी आपणा। भजा नारायणा तुका म्हणे ।।तु.गा.००९८.००५ ।।
भजल्या गोपिका सर्वभावें देवा। नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं ।।तु.गा.००९९.००१ ।।
दुजा छंद नाहीं तयांचिये मनीं। जागृति स्वप्नीं कृष्णध्यान ।।तु.गा.००९९.००२ ।।
ध्यान ज्यां हरिचें हरीसी तयांचें। चित्त ग्वाही ज्याचें तैशा भावें ।।तु.गा.००९९.००३ ।।
भाग्यें पूर्वपुण्यें आठविती लोक ।अवघे सकळीक मथुरेचे ।।तु.गा.००९९.००४ ।।
मथुरेचे लोक सुखी केले जन। तेथें नारायण राज्य करी ।।तु.गा.००९९.००५ ।।
राज्य करी गोपीयादवांसहित। क्रमिले बहुत काळ तेथें ।।तु.गा.००९९.००६ ।।
तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां। रचिली द्वारका तुका म्हणे ।।तु.गा.००९९.००७ ।।

रचियेला गांव सागराचे पोटीं। जडोनि गोमटीं नानारत्नें ।।तु.गा.०१००.००१ ।।
रत्नें खणोखणीं सोनियाच्या भिंती। लागलिया ज्योति नानाकळा ।।तु.गा.०१००.००२ ।।
कळा सकळही गोविंदाचे हातीं। मंदीरें निगुतीं उभारिलीं ।।तु.गा.०१००.००३ ।।
उभारिलीं दुर्गें दारवंटे फांजी। कोटि चर्या माजीं शोभलिया ।।तु.गा.०१००.००४ ।।
शोभलें उत्तम गांव सागरांत। सकळांसहित आले हरि ।।तु.गा.०१००.००५ ।।
आले नारायण द्वारकानगरा। उदार या शूरां मुगुटमणी ।।तु.गा.०१००.००६ ।।
निवडीना यादि समानचि केली। टणक धाकुलीं नारायणें ।।तु.गा.०१००.००७ ।।
नारायणें दिली अक्षई मंदिरें। अभंग साचारें सकळांसी ।।तु.गा.०१००.००८ ।।
सकळही धर्मशीळ पुण्यवंत। पवित्र विरक्त नारीनर ।।तु.गा.०१००.००९ ।।
रचिलें तें देवें न मोडे कवणा। बळियांचा राणा नारायण ।।तु.गा.०१००.०१० ।।
बळबुद्धिनितीं देवाचसारिखीं। तुका म्हणे मुखीं गाती ओंव्या ।।तु.गा.०१००.०११ ।।
गाती ओंव्या कामें करितां सकळें। हालवितां बाळें देवावरी ।।तु.गा.०१०१.००१ ।।
ऋद्धिसिद्धि दासी दारीं ओळंगती। सकळ संपत्ति सर्वां घरीं ।।तु.गा.०१०१.००२ ।।
घरीं बैसलिया जोडलें निधान। करिती कीर्तन नारीनर ।।तु.गा.०१०१.००३ ।।
नारीनर लोक धन्य त्यांची याति। जयांसी संगति गोविंदाची ।।तु.गा.०१०१.००४ ।।
गोविंदें गोविंद केले लोकपाळ। चिंतनें सकळ तुका म्हणे ।।तु.गा.०१०१.००५ ।।
कांहीं चिंता कोणा नाहीं कोणेविशीं। करी द्वारकेसी राज्य देवा ।।तु.गा.०१०२.००१ ।।
द्वारकेसी राज्य करी नारायण। दुष्ट संहारून धर्म पाळी ।।तु.गा.०१०२.००२ ।।
पाळी देव आज्ञा ब्राह्मणांचा मान। अतीतपूजन वैष्णवांचें ।।तु.गा.०१०२.००३ ।।
अतीत अलिप्त अवघियां वेगळा। नाहीं या गोपाळा अभिमान ।।तु.गा.०१०२.००४ ।।
अभिमान नाहीं तुका म्हणे त्यासी। नेदी आणिकासी धरूं देव ।।तु.गा.०१०२.००५ ।।
धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथी। परब्रह्म क्षितीं उतरलें ।।तु.गा.०१०३.००१ ।।
उत्तम हें नाम राम कृष्ण जगीं। तरावयालागीं भवनदी ।।तु.गा.०१०३.००२ ।।

दीनानाथ ब्रीदें रुळती चरणीं। वंदितील मुनि देव ऋषि।।तु.गा.०१०३.००३।।
ऋषीं मुनी भेटी दिली नारायणें। आणिक कारणें बहु केलीं।।तु.गा.०१०३.००४।।
बहु कासाविस झाला भक्तांसाठीं। तुका म्हणे आटी सोसियेली।।तु.गा.०१०३.००५।।
सोसियेली आटी गर्भवास फेरे। आयुधांचे भारे वागवितां।।तु.गा.०१०४.००१।।
वाहोनि सकळ आपुलिये माथां। भार दासां चिंता वाहों नेदी।।तु.गा.०१०४.००२।।
नेदी काळाचिये हातीं सेवकांसी। तुका म्हणे ऐसी ब्रीदावळी।।तु.गा.०१०४.००३।।
ब्रीदावळी ज्याचे रुळते चरणीं। पाउलें मेदिनी सुखावे त्या।।तु.गा.०१०५.००१।।
सुखावे मेदिनी कृष्णाचिये चालीं। कुंकुमें शोभलीं होय रेखा।।तु.गा.०१०५.००२।।
होऊनि भ्रमर पाउलांचें सुख। घेती भक्त मुख लावूनियां।।तु.गा.०१०५.००३।।
याचसाठीं धरियेला अवतार। सुख दिलें फार निजदासां।।तु.गा.०१०५.००४।।
निजसुख तुका म्हणे भक्तां ठावें। तिहींच जाणावें भोगूं त्यासी।।तु.गा.०१०५.००५।।
भोगिला गोपिकां यादवां सकळां। गौळणीं गोपाळां गाईं वत्सां।।तु.गा.०१०६.००१।।
गाती धणीवरी केला अंगसंग। पाहिला श्रीरंग डोळेभरी।।तु.गा.०१०६.००२।।
भक्ति नवविधा तयांसी घडली। अवघींच झालीं कृष्णरूप।।तु.गा.०१०६.००३।।
रूप दाखविलें होतां भिन्न भाव। भक्त आणि देव भिन्न नाहीं।।तु.गा.०१०६.००४।।
नाहीं राहों दिलें जातां निजधामा। तुका म्हणे आम्हांसहित गेला।।तु.गा.०१०६.००५।।
गेला कोठें होता कोठूनियां आला। सहज व्यापला आहे नाहीं।।तु.गा.०१०७.००१।।
आहे साच भावें सकळव्यापक । नाहीं अभाविक लोकां कोठें।।तु.गा.०१०७.००२।।
कोठें नाहीं ऐसा नाहीं रिता ठाव। अनुभवी देव स्वयें झाले।।तु.गा.०१०७.००३।।
जातों येतों आम्ही देवाचे सांगात। तुका म्हणे गात देवनाम।।तु.गा.०१०७.००४।।
मना वाटे तैसीं बोलिलों वचनें। केली धीटपणें सलगी देवा।।तु.गा.०१०८.००१।।
वाणी नाहीं शुद्ध याति एक ठाव। भक्ति नेणें भाव नाहीं मनीं।।तु.गा.०१०८.००२।।
नाहीं झालें ज्ञान पाहिलीं अक्षरें। मानिजेसी थोर थोरी नाहीं।।तु.गा.०१०८.००३।।

नाहीं मनीं लाज धरिली आशंका। नाहीं भ्यालों लोकां चतुरांसी।।तु.गा.०१०८.००४।।
चतुरांच्या राया मी तुझे अंकित। जालों शरणागत देवदेवा।।तु.गा.०१०८.००५।।
देवा आतां करीं सरती हीं वचनें। तुझ्या कृपादानें बोलिलों ती।।तु.गा.०१०८.००६।।
तुझें देणें तुझ्या समर्पूनी पायीं। झालों उतराई पांडुरंगा।।तु.गा.०१०८.००७।।
रंकाहूनी रंक दास मी दासांचें। सामर्थ्य मज कैचें बोलावया।।तु.गा.०१०८.००८।।
बोलावया पुरे माझी वाचा कायी। तुका म्हणे पायीं ठाव द्यावा।।तु.गा.०१०८.००९।।
विचार करिती बैसोनि गौळणी। ज्या कृष्णकामिनी कामातुरा।।तु.गा.०१०९.००१।।
एकांतीं एकल्या एकाच सुखाच्या। आवडती त्यांच्या गोष्टी त्याला।।तु.गा.०१०९.००२।।
तर्कवितर्किणी दुराविल्या दुरी। मौन त्या परि चोरी आरंभिली।।तु.गा.०१०९.००३।।
कुशळा कवित्या कथित्या लोभिका। त्याही येथें नका आम्हांपाशीं।।तु.गा.०१०९.००४।।
बोलक्या वाचाळा कृष्णरता नाहीं। त्यां चोरोनि तिहीं खेट केली।।तु.गा.०१०९.००५।।
भेऊनियां जना एकींसवा जाल्या। वाती विझविल्या दाटो बळें।।तु.गा.०१०९.००६।।
कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं। निंदिती त्या त्यासी कृष्णरता।।तु.गा.०१०९.००७।।
तो नये जवळी देखोनि कोल्हाळ। म्हणऊनि समेळ मेळविला।।तु.गा.०१०९.००८।।
अंतरीं कोमळा बाहेरी निर्मळा। तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं।।तु.गा.०१०९.००९।।
हरिरूपीं दृष्टी कानीं त्याची गोष्टी। आळंगिति कंठीं एकाएकीं।।तु.गा.०१०९.०१०।।
न साहे वियोग करिती रोदना। भ्रमिष्ट भावना देहाचिया।।तु.गा.०१०९.०११।।
विसरल्या मागें गृह सुत पती। अवस्था याचिती गोविंदाची।।तु.गा.०१०९.०१२।।
अवस्था लागोनि निवळचि ठेल्या। एकाएकीं जाल्या कृष्णरुपा।।तु.गा.०१०९.०१३।।
कृष्ण म्हणवूनि देती आळिंगण। विरहताप तेणें निवारेना।।तु.गा.०१०९.०१४।।
ताप कोण वारी गोविंदावांचूनि। साच तो नयनीं न देखतां।।तु.गा.०१०९.०१५।।
न देखतां त्यांचा प्राण रिघों पाहे। आजी कामा सये उशीर केला।।तु.गा.०१०९.०१६।।
रित्या ज्ञानगोष्टी तयां नावडती। आळिंगणप्रीति कृष्णाचिया।।तु.गा.०१०९.०१७।।

मागें आम्ही कांहीं चुकलों त्याची सेवा। असेल या देवा राग आला ।।तु.गा.०१०९.०१८ ।।
आठविती मागें पापपुण्यदोष। परिहार एकीस एक देती ।।तु.गा.०१०९.०१९ ।।
अनुतापें झाल्या संतप्त त्या बाळा। टाकिती विव्हळा धरणीं अंग ।।तु.गा.०१०९.०२० ।।
जाणोनि चरित्र जवळीच होता। आली त्या अनंता कृपा मग ।।तु.गा.०१०९.०२१ ।।
होऊनि प्रगट दाखविलें रूप। तापत्रयताप निवविलें ।।तु.गा.०१०९.०२२ ।।
निवाल्या देखोनि कृष्णाचें श्रीमुख। शोक मोह दुःख दुरावला ।।तु.गा.०१०९.०२३ ।।
साच भाव त्यांचा आणूनियां मना। आळंगितो राणा वैकुंठींचा ।।तु.गा.०१०९.०२४ ।।
हरिअंगसंगें हरिरूप जाल्या। बोलों विसरल्या तया सुखा ।।तु.गा.०१०९.०२५ ।।
व्यभिचारभावें भोगिलें अनंता। वर्तोनि असतां घराचारी ।।तु.गा.०१०९.०२६ ।।
सकळां चोरोनि हरि जया चित्तीं। धन्य त्या नांदती तयामध्यें ।।तु.गा.०१०९.०२७ ।।
उणें पुरें त्यांचें पडों नेदीं कांहीं। राखे सर्वांठायीं देव तयां ।।तु.गा.०१०९.०२८ ।।
न कळे लाघव ब्रह्मादिकां माव। भक्तिभावें देव केला तैसा ।।तु.गा.०१०९.०२९ ।।
तुका म्हणे त्यांचा धन्य व्यभिचार। साधिलें अपार निजसुख ।।तु.गा.०१०९.०३० ।।
स्वयें सुखाचे झाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव । अवघ्या अवघा हा कैसा नवलाव । सर्वसाक्षी तेथेंचि त्याचा जीव वो ।।तु.गा.०११०.००१ ।।
आपआपणाशीं करिती नवल। परि वादावाद न संडिती बोल। एका मेघश्यामें जलधर वोंल। रसीं उतावीळ हृदय सखोल वो ।।तु.गा.०११०.००२ ।।
एक विषय तो सकळांचा हरि। त्याच्या आवडीनें आवडी इतरी। अंध बहिर हे प्रेतलोकाचारी। त्यांची कीर्ती गाइली पुराणांतरीं वो ।।तु.गा.०११०.००३ ।।
स्तुति पराविया मुखें रुचिकर। प्रीतिपात्राचा गौरवीं आदर। परस्परें हें सादरासादर। योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ।।तु.गा.०११०.००४ ।।
भक्तिवालभ न तुटे चराचरीं। आप्त अनाप्त हें ऐशी नाहीं उरी। दुरी जवळी संचिता ऐसे धरी। रंगा रंगा ऐसें होणें लागे हरि वो ।।तु.गा.०११०.००५ ।।
तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन। आला बाहेरी प्रेमें वोसंडून। कानीं पडिलें त्या जीवाचें जतन। धरी एका भावें हृदयीं चरण वो ।।तु.गा.०११०.००६ ।।
आजी कां वो तूं दिससी दुश्चित्ती। म्हणिये काम नलगे तुझ्या चित्तीं। दिलें ठेवूं तें विसरसी हातीं। नेणो काय बैसला हरि चित्तीं वो ।।तु.गा.०१११.००१ ।।
सर सर परती झालीस आतां भांड। कैसें दाखविसी जगासी या तोंड। व्याली माय ते लाजविली रांड। नाहीं थारा दो ठायीं झाला खंड वो ।।तु.गा.०१११.००२ ।।

होतें तैसें तें उमटलें वरी। बाह्य संपादणी अंतरींची चोरी। नाहीं मर्यादा नि:संग बावरी। मन हें गोविंदीं देह काम करी वो।।तु.गा.०१११.००३।।
नाहीं करीत उत्तर कोणासवें। पराधीन भोजन दिलें खावें। नाहीं अचळ सावरावा ठावें। देखो उदासीन तुझे गे देहभाव वो।।तु.गा.०१११.००४।।
कोठें नेणों हा फावला एकांत। सदा किलकिल भोंवतीं बहुत। दोघे एकवत बोलावया मात। नाहीं लाज धरिली दिला हात वो।।तु.गा.०१११.००५।।
करी कवतुक खेळ खेळे कान्हा। दावी लाघव भांडवी सासुसूना। पराभक्ति हे शुद्ध तुम्हीं जाणा। तुका म्हणे ऐसें कळों यावें या जना वो।।तु.गा.०१११.००६।।
भरिला उलंडूनी रिता करी घट। मिस पाणियाचें गोविंदाची चट। चाले झडझडां उसंतूनी वाट। पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो।।तु.गा.०११२.००१।।
चाळा लवियेला गोप गोपीनाथें। जाणें आवडीचें रूप जेथें तेथें। दावी बहुतांच्या बहुवेषपंथें। गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो।।तु.गा.०११२.००२।।
मनीं आवडे तें करावें उत्तर। कांहीं निमित्ताचा पाहोनि आधार। उगा राहे कां मारिसी कंकर। मात वाढविसी उत्तरा उत्तर वो।।तु.गा.०११२.००३।।
धरिली खोडी दे टाकोनियां मागें। न ये विनोद हा कामा मशी संगें। मिठी घालीन या जीवाचिया त्यागें। नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें वो।।तु.गा.०११२.००४।।
सुख अंतरींचें बाह्य ठसठसी। म्हणे विनोद हा काय सोंग यासी। तुज मज काय सोयरीक ऐसी। नंदानंदन या थोरपणें जासी रे।।तु.गा.०११२.००५।।
करी कारण तें कळों नेदी कोणा। सुख अंतरींचें बाह्य रंग जना। मन मिनलें रे तुका म्हणे मना। भोग अंतरींचा पावे नारायणा वो।।तु.गा.०११२.००६।।
आजी नवल मी आलें येणें रानें। भेटी अवचिती नंदाचिया कान्हें। गोवी सांगती वो सकळही जन। होतें संचित आणियेलें तेणें वो।।तु.गा.०११३.००१।।
गेलें होऊनि न चले आतां कांहीं। साद घालितां जवळी दुजें नाहीं। अंगीं जडला मग उरलें तें कांयीं। आतां राखतां गुमान भलें बाई वो।।तु.गा.०११३.००२।।
बहुत कामें मज नाहीं आराणूक ।एक सारितां तों पुढें उभें एक। आजी मी टाकोनी आलें सकळीक।तंव रचिलें आणीक कवतुक वो।।तु.गा.०११३.००३।।
चिंता करितां हरिली नारायणें। अंगसंगें मिनतां दोघेंजणें। सुखें निर्भर झालियें त्याच्या गुणें। तुका म्हणे खुंटलें येणें जाणें वो।।तु.गा.०११३.००४।।
मै भुली घरजानी बाट। गोरस बेचन आयें हाट।।तु.गा.०११४.००१।।
कान्हा रे मनमोहन लाल। सबही बिसरूं देखें गोपाल।।तु.गा.०११४.००२।।
काहां पग डारूं देखे आनेरा। देखे तों सब वोहिने घेरा।।तु.गा.०११४.००३।।
हुं तो थकित भई रे तुका। भागा रे सब मनका धोका।।तु.गा.०११४.००४।।
हरिबिन रहियां न जाये जिहिरा। कबकी ठाडी देखें राहा।।तु.गा.०११५.००१।।
क्या मेरे लाल कवन चुकी भई। क्या मोहिपासिती बेर लगाई।।तु.गा.०११५.००२।।

कोई सखी हरी जावे बुलावन। बारही डारूं उसपर तन ।।तु.गा.०११५.००३ ।।

तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं।।तु.गा.०११५.००४ ।।

भलो नंदाजीको डिकरो। लाज राखीलीन हमारो ।।तु.गा.०११६.००१ ।।

आगळ आवो देवजी कान्हा। मैं घर छोडी आये मान्हा ।।तु.गा.०११६.००२ ।।

उनसुं कलना नव्हे तो भला। खसम अहंकार दादुला ।।तु.गा.०११६.००३ ।।

तुका प्रभु परबली हरी। छेपी आहे हुं जगाथी न्यारी ।।तु.गा.०११६.००४ ।।

नका कांहीं उपचार माझ्या शरीरा। करूं न साहावे मज बहु होतो उबारा। मनोजन्य व्यथा वेध जाला अंतरा। लवकरी आणा नंदाचिया कुमरा वो ।।तु.गा.०११७.००१ ।।

सखिया वेशिया तुम्ही प्राणवल्लभा। निवेदिला भाव आर्तभूत या लोभा। उमटली अंगीं वो सांवळी प्रभा। साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा वो ।।तु.गा.०११७.००२ ।।

कळों नेदावी हे दुजियासी मात। घडावा तयासी उत्कंठा एकांत। एकाएकीं साक्षी येथें आपुलें चित्त। कोण्या काळें होईल नेणों भाग्य उदित वो ।।तु.गा.०११७.००३ ।।

स्वाद सीण देहभान निद्रा खंडण। पाहिले ताटस्थ उन्मळित लोचन। अवघें वोसाऊन उरले ते चरण। तुका म्हणे दर्शनापें आलें जीवन वो ।।तु.गा.०११७.००४ ।।

पडिली भूली धांवती सैराट। छंद गोविंदाचा चोजविती वाट। मागें सारुनि सकळ बोभाट। वंदीं पदांबुजें ठेवूनि ललाट वो ।।तु.गा.०११८.००१ ।।

कोणी सांगा या गोविंदाची शुद्धि। होतें वाहिलें लपाला आतां खांदी। कोठें आड आली हे देहबुद्धि । धांवा आळवा करुणा कृपानिधी वो ।।तु.गा.०११८.००२ ।।

मागें बहुतांचा अंतरला संग। मुळें जयाचिया तेणें केला त्याग। पैल पाहातां ते हरपलें अंग। खुंटली वाट नाहींसें झालें जग वो ।।तु.गा.०११८.००३ ।।

शोक वियोग घडला सकळांचा। गेल्या शरण हा अन्याय आमुचा। केला उच्चार घडल्या दोषांचा। झाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ।।तु.गा.०११८.००४ ।।

काय उणें कां करितोसी चोरी। किती सांगों तूं नाइकसी हरी। परेपरता तूं पळोनि जासी दुरी। अनावर या लौकिका बाहेरी वो ।।तु.गा.०११९.००१ ।।

माया करुणा हे करिते बहुत। किती सोसूं या जगाचे आघात। न पुरे अवसरू हेंचि नित्यानित्य। तूंचि सोडवीं करूनि स्थिर चित्त वो ।।तु.गा.०११९.००२ ।।

बहुत कामें मी गुंतलिये घरीं। जासी डोळा तूं चुकवूनि हरि। करितां लाग न येसी चपळ भारी। नाहीं सायासाची उरों दिली उरी वो ।।तु.गा.०११९.००३ ।।

तुज म्हणीये मी न संगें अनंता। नको जाऊं या डोळियां परता। नलगे जोडी हे तुजविण आतां। तुकया स्वामी कान्होबा गुण भरिता वो ।।तु.गा.०११९.००४ ।।

आलिये धांवती धांवती भेट होईल म्हूण। तंव ते टळली वेळ वो माझा उरला सीण ।।तु.गा.०१२०.००१ ।।

आतां काय करूं सांगा वो मज भेटेल कैसा। हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ।।तु.गा.०१२०.००२ ।।

लाविती उशीर बहु ओढिती ओढा। सांभाळितां सांग असांग दुःख पावल्यें पीडा ।।तु.गा.०१२०.००३ ।।

जळो आतां संसारु वो कईं शेवट पुरे। तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ।।तु.गा.०१२०.००४ ।।

घाली कवाड टळली वाढ राती। कामें व्यापिली कां पडिली दुश्चित्ती। कोणे लागला गे सदैवेचे हातीं। आजी शून्य शेजे नाहीं दिसे पति वो ।।तु.गा.०१२१.००१ ।।

बोले दूतिकेशीं राधा हें वचन। मशीं लाघव दाखवी नारायण। म्हणे कोमळ परि बहु गे निर्गुण। याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ।।तु.गा.०१२१.००२ ।।

धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता। तैं पाचारिलें होऊनि ये वो सीता। लाजिन्नली रूप न ये पालटितां। झाला भीमकी आपण राम सीता वो ।।तु.गा.०१२१.००३ ।।

सत्यभामा दान करी नारदासी। तैं कळला वो मज हृषीकेशी। तुळे घालितां वो न ये कनकरासी। सम तुकें एक पान तुळसी वो ।।तु.गा.०१२१.००४ ।।

मज भुली पडली कैशापरी। आम्हां भोगूनि म्हणे मी ब्रह्मचारी। दिली वाट यमुनें माये खरी। तुम्हां आम्हां न कळे अद्यापवरी वो ।।तु.गा.०१२१.००५ ।।

जाणे जीवींचें सकळ नारायण। असे व्यापूनि परी न दिसे लपून। राधा संबोखिली प्रीति आळिंगून। तुका म्हणे येथें भावचि कारण वो ।।तु.गा.०१२१.००६ ।।

मिळोनि गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं। दहीं दूध तूप लोणी शिंकां नुरे कांहीं। मेळवूनी पोरें तेथें रिघे एकसरें। वेगीं आणोनी सामोरें तेथें लोणी खाय ।।तु.गा.०१२२.००१ ।।

हरि सोंकला वो हरि सोंकला वो। सोंकला तो वारी तुज लाज नाहीं तरी। आम्हां सापडतां उरी तुज मज नाहीं ।।तु.गा.०१२२.००२ ।।

तुज वाटतसे कोड यासी लागतसे गोड। काय हांसतेसी वेड तुज लागलें वो। आम्हीं जाऊं तुजवरी पोरें चाळविल्या पोरी। काय सांगो भांडखोरी लाज वाटे आम्हांसी ।।तु.गा.०१२२.००३ ।।

मुख मळिण वदन उभा हाडतिये घोणे। तंव दसवंती म्हणे आणा शीक लावूं। थोर आणिला कांटाळा घरींदारीं लोकपाळां। डेरा रिघोनि घुसळा तेथें लोणी खाय ।।तु.गा.०१२२.००४ ।।

मिळोनियां सकळां दावें लावूनियां गळां। कैशा बांधिती उखळा येथें राहे उगा। बरा सांपडलासी हरी आजिच्यानें करिसिल चोरी। डोळे घालूनियां येरी येरीकडे हांसे ।।तु.गा.०१२२.००५ ।।

फांकल्या सकळा उपडूनियां उखळा। मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही। उठिला गजर दसवंती नव्हे धीर। धांवे तुकयाचा दातार आळंगिला वेगीं ।।तु.गा.०१२२.००६ ।।

आंत हरि बाहेर हरि। हरिनें घरीं कोंडिलें ।।तु.गा.०१२३.००१ ।।

हरिनें कामा घातला चिरा। वित्तवरा मुकविलें ।।तु.गा.०१२३.००२ ।।

हरिनें जीवें केली साटी। पाडिली तुटी सकळांसी ।।तु.गा.०१२३.००३ ।।

तुका म्हणे वेगळा नव्हे। हरि हा भावें भोंवताला ।।तु.गा.०१२३.००४ ।।

हरिनें माझें हरिलें चित्त। भार वित्त विसरलें ।।तु.गा.०१२४.००१ ।।

आतां कैसी जाऊं घरा। नव्हे बरा लौकिक ।।तु.गा.०१२४.००२ ।।

पारखियांसी सांगतां गोष्टी। घरची कुटी खातील ।।तु.गा.०१२४.००३ ।।

तुका म्हणे निवांत राहीं। पाहिलें पाहीं परतोनी ।।तु.गा.०१२४.००४ ।।

बाळपणीं हरि। खेळे मथुरेमाझारीं। पायीं घागरिया सरी। कडदोरा वांकी। मुख पाहे माता। सुख न समाये चित्ता। धन्य मानवे संचिता। वोढवलें आजी ।।तु.गा.०१२५.००१ ।।

बाळ चांगलें वो। बाळ चांगलें वो। म्हणतां चांगलें। वेळ लागे तया बोलें। जीवापरीस तें वाल्हें। मज आवडतें ।।तु.गा.०१२५.००२ ।।

मिळोनियां याती। येती नारी कुमारी बहुती। नाहीं आठव त्या चित्तीं। देहभाव कांहीं। विसरल्या घरें। तान्हीं पारठीं लेंकुरें। धाक सांडोनियां येरें। ताहान भूक नाहीं ।।तु.गा.०१२५.००३ ।।

एकी असतील घरीं। चित्त तयापासीं परी। वेगीं करोनि वोसारी। तेथें जाऊं पाहे। लाज सांडियेली वोज। नाहीं फजितीचे काज। सुख सांडोनियां सेज। तेथें धांव घाली ।।तु.गा.०१२५.००४ ।।

वेधियेल्या बाळा। नर नारी या सकळां। बाळा खेळती अबला। त्याही विसरल्या। कुमर कुमरी। नाहीं भाव हा शरीरीं। दृष्टी न फिरे माघारी। तया देखताही ।।तु.गा.०१२५.००५ ।।

वैरभाव नाहीं। आप पर कोणी कांहीं। शोक मोह दुःख ठायीं। तया निरसलीं। तुका म्हणे सुखी। केलीं आपणासारिखीं। स्वामी माझा कवतुकीं । बाळवेषें खेळें ।।तु.गा.०१२५.००६ ।।

होतें बहुत दिवस मानसीं। आजी नवस फळले नवसीं। व्हावी भेटी ते जाली गोविंदासी। आतां सेवा करीन निश्चयेसीं वो।।तु.गा.०१२६.००१।।

स्थिर स्थिर मजसि साहे करा। बहु कष्ट सोसिल्या येरझारा। येथें आड मज न साहावे वारा। देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो।।तु.गा.०१२६.००२।।

मूळ सत्ता हे सायासाची जोडी। नेदी वेगळें होऊं एकी घडी। नाहीं लौकिक स्मरला आवडी। आतां येणें काळें या लोभें वेडी वो।।तु.गा.०१२६.००३।।

उदयीं उदयो साधिला अवकाश। निश्चिंतीनें निश्चिंती सावकाश। धरिये गोडी बहुत आला रस। तुका म्हणे हा मागुता नये दिवस वो।।तु.गा.०१२६.००४।।

एकली राना गोविंदा सवें। गेलें ठावें तें झालें।।तु.गा.०१२७.००१।।

मज न म्हणा न म्हणा शिंदळी। नाहीं विषम जवळी आतळलें।।तु.गा.०१२७.००२।।

नव्हती देखिली म्यां वाट। म्हणोनि हा धीट संग केला।।तु.गा.०१२७.००३।।

सलगी धरी पयोधर। साहाते कुरमुर सवें।।तु.गा.०१२७.००४।।

भेणें मिठी दिधली गळां। सेजेजवळा दडालें।।तु.गा.०१२७.००५।।

आहेव मी गर्भीणपणें। हें सांगणें कां लागे।।तु.गा.०१२७.००६।।

तुका म्हणे सेवटा नेलें। संपादिलें उभयतां।।तु.गा.०१२७.००७।।

गोरस घेऊनि सातें निघाल्या गौळणी। तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें। झाला पानसरा मिठी घातली पदरा। आधीं दान माझें सारा मग चाला पंथें।।तु.गा.०१२८.००१।।

सर जाऊं दे रे । सर जाऊं दे रे। सर जाऊं दे परता। मुळीं भेटलासी आतां। नाट लागलें संचिता। खेपा खुंटलिया।।तु.गा.०१२८.००२।।

आसुडी पदरा धरी आणीक दुसरा। येरी झोंबतील करा काय वेडा होसी। आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा। सर परता गोवळा काय बोलतोसी।।तु.गा.०१२८.००३।।

आम्हीं येथें अधिकारी मागें केली तुम्ही चोरी। आतां कळलियावरी मागें केलें तयाचें। बोलिल्या हांसूनि आम्ही सासुरवासिनी। कां रे झोंबसी दुरूनि करी मात कांहीं।।तु.गा.०१२८.००४।।

वायां परनारी कैसा धरिसी पदरीं। तयां कळलिया उरी तुज मज नाहीं। जडला जिव्हारीं फांको नेदी तया नारी। जेथें वर्म तेथें धरी जाऊं पाहे तियेचें।।तु.गा.०१२८.००५।।

तया हातीं सांपडल्या हाटीं पाटीं चुकविल्या। कृष्णमिळणीं मिळाल्या त्याही न फिरती। तुका म्हणे खंती वायां न धरावी चित्तीं। होतें तुमच्या संचितीं वोढवलें आजी।।तु.गा.०१२८.००६।।

हरी तुझी कांति रे सांवळी। मी रे गोरी चांपेकळी। तुझ्या दर्शनें होईन काळीं। मग हें वाळी जन मज।।तु.गा.०१२९.००१।।

उगला राहें न करी चाळा। तुज किती सांगों रे गोवळा। तुझा खडबड कांबळा। अरे नंद बाळा आलगटा।।तु.गा.०१२९.००२।।

तुझिये अंगीं घुरट घाणी। बहु खासी दूध तूप लोणी। घरिचें बाहेरील आणोनी। मी रे चांदणी सुकुमार।।तु.गा.०१२९.००३।।

मज ते हांसतील जन। धि:कारिती मज देखोन। अंगींचें तुझें देखोनि लक्षण। मग विटंबणा होईल रे।।तु.गा.०१२९.००४।।

तुज तंव लाज भय शंका नाहीं। मज तंव सज्जन पिशुन व्याही। आणीक मात बोलूं कांहीं। कसी भीड नाहीं तुज माझी।।तु.गा.०१२९.००५।।

वचन मोडी नेदी हात। कळलें न साहेची मात। तुकयास्वामी गोपीनाथ। जीवन्मुक्त करूनि भोगी।।तु.गा.०१२९.००६।।

सात पांच गौळणी आलिया मिळोनि यशोदे गाऱ्हाणें देती कैसें। काय व्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळेंचि कैसें। दहीं दूध तूप लोणी शिंका नुरेचि कांहीं कवाड जैसेंची तैसें। चाळवूनि नाशिलीं कन्याकुमरें आमच्या सुनांसी लाविलें पिसें गे बाईये।।तु.गा.०१३०.००१।।

अझुनी तरी यासी सांगे बरव्या परी। नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटी। मिळोनि सकळै जणी करूं वाखा। सेखीं तुज मज होईल तुटी गे बाइये।।तु.गा.०१३०.००२।।

नेणों आपपर लौकिक वेव्हार। भलतें ठायीं भलतें करी। पाळतुनी घरीं आम्हीं नसतां। तेथ आपण संचार करी। सोगया चुंबन देतो आळिंगण । आमच्या लोळे सेजाबाजावरी। शिंकीं कडाडा फोडी गोरसाचे डेरे। धरितां न सांपडे करीं गे बाईये।।तु.गा.०१३०.००३।।

आतां याची चाड नाहीं आम्हां भीड। सांपडतां कोड पुरवूं मनींचें। सोसिलें बहु दिस नव्हता केला निस । म्हणवूनि एकुलतें तुमचें। चरण खांबीं बांधेन जीवें सरिसा । जंव न चले कांहीं याचें। अर्थ प्राण देतां न सोडी सर्वथा। भलतें हो या जिवाचें गे बाईये।।तु.गा.०१३०.००४।।

घेऊनि जननी हातीं चक्रपाणि । देतसे गौळणी वेळोवेळां। निष्ठुर वाद झणीं बोलाल सकळा। क्षोभ जाइल माझ्या बाळा। जेथें लागे हात वाढतें नवनीत । अमृताच्या कल्लोळा। देखोनि तुकयास्वामी देश देहभान । विसरल्या सकळा गे बाइये।।तु.गा.०१३०.००५।।

विरहतापें फुंदे छंद करित जाती। हा गे तो गे सावधान सर्वेचि दुश्चिती। न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं। वेगळीच पडों पाहे कुळाहुनि याती वो।।तु.गा.०१३१.००१।।

खुंटलीसी झाली येथें अवघियांची गती। आपले परावे कोणी नेणों भोंवतीं। त्यांच्या नांवें बोभे बोभे हाहो श्रीपति। नवलाव हा येरां वाटोनियां हांसती।।तु.गा.०१३१.००२।।

बाहेरीच धांवे राना न धरीच घर। ना कळे बंधना झाला तेणें संचार। विसरूनि गेली सासुरें कीं माहेर। एक अवलोकी एका पडिला विसर।।तु.गा.०१३१.००३।।

तुका म्हणे तुम्ही अवघ्या रहा निश्चळा। नये आतां येऊं येथें सर्वथा बळा। त्याचा त्याच्या मुखें अवघियांचा निर्वाळा। बहुतां मतें येथें तर्कवाद निराळा वो।।तु.गा.०१३१.००४।।

ये रे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें ।मिळालिया बाळा एके ठायीं कवतुकें । कळों नेदी माया त्यासच तें ठाऊकें ।खेळतोसें दावी लक्षलक्षापें मुकें ।।तु.गा.०१३२.००१ ।।

अखंडित चटे त्यांनीं लावियेला कान्हा। आवडे तयाचे संकल्प वाहाती मना। काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना। एकांताचें सुख जाती घेऊनियां राना।।तु.गा.०१३२.००२।।

अवघियांचा जाणें झाला मेळासा हरि। मिळोनियां जावें तेथें तयाभीतरी। कळों नेदी घरिंच्या करी गोवूनियां चोरी। हातोहातें नेती परेपरत्या दुरी।।तु.गा.०१३२.००३।।

आनंदें निर्भय आपणाशीं आपण। क्रीडतील बाळा त्यजिलें पारखें जन। एकाएकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न। तुका म्हणे एका नारायणावांचून।।तु.गा.०१३२.००४।।

खेळतां मुरारी जाय सरोवरातिरीं। तंव नग्नचि नारी तेथें देखियेल्या। मांडिलें विंदान ख्याल सुखाचें संधान। अंग लपवूनी मान पिलंगत चाले।।तु.गा.०१३३.००१ ।।

ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे। पायां पडतां न सोडी नेदी साउलां रे।।तु.गा.०१३३.००२।।

साड्या साउली पातळें गोंडे कसणियाच्या चोळ्या। बुंथी घेऊनि सकळां कळंबावरी पळे। खांदी घालुनियां करीं दृष्टि घालोनि सामोरी। बैसे पाला ओढी वरी खदखदां हांसे।।तु.गा.०१३३.००३।।

आनंदें कल्लोळा बाळा खेळती सकळा। देती उलटिया चपळा एकी एकीहूनि। म्हैस वेले सुरकाडी एकी नागविती कोडीं। नाना परीच्या विकडी खेळ मांडियेला।।तु.गा.०१३३.००४।।

एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारी। म्हणे नाहीं नेलें चोरी काय जाणो केव्हां। केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा। आतां म्हणतील घरा जावे कैशापरी।।तु.गा.०१३३.००५।।

तंव हांसे वनमाळी वरी पाहोनि सकळी। लाजा रिघालिया जळीं मागें पुढें हात। लाज राखावी गोपाळा आम्हांजणींची सकळां। काय मागसी ये वेळां देऊं गुळवाटी।।तु.गा.०१३३.००६ ।।

जोडोनियां कर या गे सकळी समोर। वायां न बोलावें फार बडबड कांहीं। भातुकें भूषण नाहीं चाड नेघें धन। करा एक चित्त मन या गे मजपाशीं।।तु.गा.०१३३.००७।।

एक एकीकडे पाहे लाज सांडुनियां राहे। म्हणे चला आतां सये जाऊं तयापाशीं। जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत। तुका म्हणे केली मात लाज राखिली तयांची।।तु.गा.०१३३.००८।।

धरिला पालव न सोडी माझा येणें। कांहीं करितां या नंदाचिया कान्हें। एकली न येतें मी ऐसें काय जाणें। कोठें भरलें या अवघड रानें रे।।तु.गा.०१३४.००१ ।।
सोडीं पालव जाऊं दे मज हरी। वेळ लागल्या रे कोपतील घरीं। सासू दारुण सासरा आहे भारी। तुज मज सांगतां नाहीं उरी रे।।तु.गा.०१३४.००२।।
सखया वेशिया होत्या मजपाशीं। तुज फांवलें रे फांकतां तयांसी। होतें अंतर तैं सापडतें कैसी। एकाएकीं अंगीं जडलासी रे।।तु.गा.०१३४.००३।।
ऐसी भागली हें करितां उत्तर। शक्ति मावळल्या आसुडितां कर। स्वामी तुकयाचा भोगिता चतुर। भोग भोगी त्यांचा राखे लोकाचार वो।।तु.गा.०१३४.००४।।
गाई गोपाळ यमुनेचे तटीं। येती पाणिया मिळोनि जगजेठी। चेंडु चौगुणा खेळती वाळवंटीं। चला चला म्हणती पाहूं दृष्टीं वो ।।तु.गा.०१३५.००१ ।।
ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी। चित्त विव्हळतें देखावया हरी। मिस पाणियाचें करितील घरीं। बारा सोळा मिळोनि परस्परीं वो।।तु.गा.०१३५.००२।।
चिरें चोळिया त्या धुतां विसरती। उर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्तीं। कोणा नाठवे हा कोण कुळ याति। झाल्या तटस्थ सकळां नेत्रपातीं वो।।तु.गा.०१३५.००३।।
दंतधावनाचा मुखामाजी हात। वाद्यें वाजती नायके जनमात। करी श्रवण श्रीकृष्णवेणुगीत। स्वामी तुकयाचा पुरवी मनोरथ वो।।तु.गा.०१३५.००४।।
कोठें मी तुझा धरूं गेलें संग। लावियेलें जग माझ्या पाठीं।।तु.गा.०१३६.००१ ।।
सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा। नको लावूं चाळा खोटा येथें।।तु.गा.०१३६.००२।।
रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ति। न देखें भोंवतीं मी तें माझी।।तु.गा.०१३६.००३।।
तुकयाचा स्वामी माझे जीवींच बैसला। बोलींच अबोला करूनियां।।तु.गा.०१३६.००४।।
गोड लागे परी सांगतांचि नये। बैसे मिठी सये आवडीची।।तु.गा.०१३७.००१ ।।
वेधलें वो येणें श्रीरंगरंगे। मी हे माझीं अंगें हारपलीं।।तु.गा.०१३७.००२।।
परतेचि ना दृष्टि बैसली ते ठायीं। विसांवोनि पायीं ठेलें मन।।तु.गा.०१३७.००३।।
तुकयाच्या स्वामीसवें झाली भेटी। तेव्हां झाली तुटी मागिलाची।।तु.गा.०१३७.००४।।
पाहावया माजी नभा। दिसे शोभा चांगली।।तु.गा.०१३८.००१ ।।
बैसला तो माझें मनीं। नका कोणीं लाजवूं।।तु.गा.०१३८.००२।।
जीवीं आवडे जीवाहूनि। नव्हे क्षण वेगळा।।तु.गा.०१३८.००३।।
झाली विश्वंभरा ऐसी। तुकया दासी स्वामीची।।तु.गा.०१३८.००४।।

कोणी एकी भुलली नारी। विकितां गोरस घ्या म्हणे हरि।।तु.गा.०१३९.००१।।
देखिला डोळां बैसला मनीं। तोचि वदनीं उच्चारी।।तु.गा.०१३९.००२।।
आपुलियाचा विसरभोळा। गोविंदा कळा कौतुकें ।।तु.गा.०१३९.००३।।
तुका म्हणे हांसे जन। नाहीं कान ते ठायीं ।।तु.गा.०१३९.००४।।
करूनि आइती सत्यभामा मंदिरीं। वाट पाहे तंव टळोनि गेली रात्री। न येचि देव येती कामलहरी। पडिली दुश्चिती तंव तो कवाड टिमकारी वो।।तु.गा.०१४०.००१।।
सर परता कळला तुझा भाव। कार्यापुरतें दाविसी लाघव। बोल बोलतोसी ते अवघी तुझी माव। जाणोनि आलासी उजडता समयो रे।।तु.गा.०१४०.००२।।
मीच वेडी तुजलागी बोल नाहीं। दानावेळे विटंबना झाली काई। मागुती रुद्रासी भेटी दिली तईं। विश्वास तो तुझ्या बोला अजूनि तरी नाहीं रे।।तु.गा.०१४०.००३।।
भ्रम होता तो अवघा कळों आला। मानवत होतें मी भला भला । नष्टा क्रिया नाहीं मा तुझिया बोला। तुकयाबंधु स्वामी कानड्या कौसाल्या रे।।तु.गा.०१४०.००४।।
तंव तो हरि म्हणे निजांगने वो। लइ नीच कां देसील दोलहणे वो। मजपें दुजें आलें तें देव जाणे वो। शब्द काय हे बोलसी ते उणें वो।।तु.गा.०१४१.००१।।
पाहा मनीं विचारूनि आधीं वो। सांडुनि देह भ्रांति करीं स्थिर बुद्धि वो। तंट केलें हें माझें तुझें उपाधी वो। उघडीं डोळे अझूनि तरी धरीं शुद्धि वो।।तु.गा.०१४१.००२।।
कोठें तरी दुनियांत वर्तलें वो। स्त्रियांनीं भ्रतारा दानासी दिलें वो। कैसा मी भला नव्हे तें सोसिलें वो। रुससीं तें तूं उफराटे नवल झालें वो।।तु.गा.०१४१.००३।।
काय सांग म्यां दैन्य केली कैसी वो। तुझ्या गर्वें आणिलें हनुमंतासी वो। कष्टी केलें मज गरुडा भीमकीसी वो। तुकयाबंधु म्हणे खरें खोटें नव्हे यासी वो।।तु.गा.०१४१.००४।।
तंव ते म्हणें ऐका हृषीकेशी वो। नावाजिलें तुम्ही म्हणा आपणांसी वो। तरी कां वंचतुक सुमनासि वो। नट नाट्य बरें संपादू जाणसी वो।।तु.गा.०१४२.००१।।
सर परता आतां वो हरी। म्हणे सत्राजिताची कुमरी। जाणतें मी या शब्दाच्या कुसरी। ऐसेंच करून ठकविलें आजिवरी वो।।तु.गा.०१४२.००२।।
भावें गेलें म्हूण न व्हावा वियोग। मनींचे आर्त जन्मांतरीं व्हावा संग। तंव त्वां केलें पाठमोरें हें जग। ऐसें काय जाणें वो तुझे रंग।।तु.गा.०१४२.००३।।

काय करूं मज या नागविलें कामें। लागलें तयास्तव इतुकें सोसावें। नाहीं तरी कां नव्हतीं ठायीं तुझीं वर्में। परद्वारींसा हाकलिती प्रसिद्ध नांमें वो ।।तु.गा.०१४२.००४।।
काय किती सांगावे तुझे गुण। न फुटे वाणी ऐसा निष्ठुर निर्गुण। आपपर न म्हणसी माय बहीण। सासुसुनांस लावूनी पाहासी भांडण वो ।।तु.गा.०१४२.००५।।
इतुकियावरी म्हणे वैकुंठींचा राणा। होऊन गेलें तें नयें आणूं मना। आतां न करीं तैसें करीं क्रिया आणा। भक्तवत्सल म्हणे तुकयाबंधु कान्हा वो ।।तु.गा.०१४२.००६।।
कान्हो एकली रे तुजसवें चुकलें रे। भय वाटे जनीं मज अबळा धाकली रे।।तु.गा.०१४३.००१।।
निघतां घरीं आई बा वारी। तुजसवें कां आलियें हरी।।तु.गा.०१४३.००२।।
लोक वाटा सांगती खोटा । परी मी चटा लागलियें।।तु.गा.०१४३.००३।।
पिकल्या बोरी झालें सामोरी। काय जाणों कोठें राहिला हरी।।तु.गा.०१४३.००४।।
आड खुंट झालिया जाळी। काय जाणों कान्हें मांडिली रळी।।तु.गा.०१४३.००५।।
तुका म्हणे जाऊं आलिया वाटा। पाहों हरि पायीं न मोडे कांटा।।तु.गा.०१४३.००६।।
क्याला मज आयो वारितेसी घरा। खेळतों सोकरा नंदाचा मी।।तु.गा.०१४४.००१।।
बहु दिसीं झाली यासीं मज भेटी। आतां वाटे तुटी न परावी।।तु.गा.०१४४.००२।।
कोंवळें बोलतो मना आवरतें। डोळियाचें पातें ढापवेना।।तु.गा.०१४४.००३।।
आजी सकळांसी आलें चोलूनियां। कां गो पाठी वायां पुलविली।।तु.गा.०१४४.००४।।
तुमचें तें काय खोलंबलें काज। बल्या कां गो मज कोंडा घरीं।।तु.गा.०१४४.००५।।
तुकयाचा धनी वैकुंठनायक । सरा कांहीं एक बोलतों मी।।तु.गा.०१४४.००६।।
आतां न ये मागें। मी आलें याच्या रागें। काय माझें जगें। कोपोनियां करावें।।तु.गा.०१४५.००१।।
कां गो कलित्यां कोल्हाळ। तुम्ही भलत्याच सकळ। वेचाल ते बोल। झुटे होती बोलिले।।तु.गा.०१४५.००२।।
याचे भेटीं माझें मन। स्वरूपीं ठाकले लोचन। वेंगळे तें क्षण। आतां होऊं नावरे।।तु.गा.०१४५.००३।।
काज काम नको झालें। बीजें नावरे बोलिलें। याचिया भेदिलें। कामबाणें अंतर।।तु.गा.०१४५.००४।।
या वेगळें होणें। आतां जळो तैसें जिणें। घेतलें तें मनें। आतां मागें न फिरे।।तु.गा.०१४५.००५।।

आतां मोटी वार। माझी नका धरूं चार। सर्वे तुकयाचा दातार। शेजे तो मी सुतलों ।।तु.गा.०१४५.००६ ।।
हरिरता चपळा नारी। लागवरी न रिघती ।।तु.गा.०१४६.००१ ।।
अवघ्या अंगें सर्वोत्तम। भोगी काम भोगता ।।तु.गा.०१४६.००२ ।।
वाचा वाच्यत्वासी न ये। कोठें काय करावें ।।तु.गा.०१४६.००३ ।।
तुका म्हणे देवा ऐशा। देवपिशा उदारा ।।तु.गा.०१४६.००४ ।।
धन्य बाया ऐशा नारी। घरीं दारीं नांदती ।।तु.गा.०१४७.००१ ।।
चोरूनियां तुजपाशीं। येती त्यांसी न कळतां ।।तु.गा.०१४७.००२ ।।
दोन्हीं ठायीं समाधान। सम कठिण बहुतांसी ।।तु.गा.०१४७.००३ ।।
तुका म्हणे जीवासाठीं। दुर्लभ भेटी ते देवा ।।तु.गा.०१४७.००४ ।।
उदासीना पावल्या वेगीं। अंगा अंगीं जडलिया ।।तु.गा.०१४८.००१ ।।
वेटाळिला भोंवता हरि। मयूरफेरीं नाचती ।।तु.गा.०१४८.००२ ।।
मना आले करिती चार। त्या फार हा एकला ।।तु.गा.०१४८.००३ ।।
तुका म्हणे नारायणीं। निरंजनी मीनलिया ।।तु.गा.०१४८.००४ ।।
विषमाची शंका वाटे। सारिखें भेटे तरी सुख ।।तु.गा.०१४९.००१ ।।
म्हणऊनि चोरिलें जना। आल्या रानां एकांतीं ।।तु.गा.०१४९.००२ ।।
दुजियासी कळों नये। जया सोय नाहीं हे ।।तु.गा.०१४९.००३ ।।
तुका म्हणे मोकळें मन। नारायण भोगासी ।।तु.गा.०१४९.००४ ।।
आळिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ।।तु.गा.०१५०.००१ ।।
न घडे मागें परतें मन। नारायण संभोगी ।।तु.गा.०१५०.००२ ।।
वचनासी वचन मिळे। रिघती डोळे डोळियांत ।।तु.गा.०१५०.००३ ।।
तुका म्हणे अंतर ध्यानीं। जीव जीवनीं विराल्या ।।तु.गा.०१५०.००४ ।।
कोणी सुना कोणी लेंकी। कोणी एकी सतंता ।।तु.गा.०१५१.००१ ।।
अवघियांची जगनिंद। झाली धिंद सारखी ।।तु.गा.०१५१.००२ ।।

अवघ्या अवघ्या चोरा। विना वरा मायबापा ।।तु.गा.०१५१.००३ ।।
तुका म्हणे करा सेवा। आलें जीवावरी तरी ।।तु.गा.०१५१.००४ ।।
येथील जे एक घडी। तये जोडी पार नाहीं ।।तु.गा.०१५२.००१ ।।
किती त्याचा सासुरवास। कैंचा रस हा तेथें ।।तु.गा.०१५२.००२ ।।
अवघे दिवस गेले कामा। नाहीं जन्मा खंडण ।।तु.गा.०१५२.००३ ।।
तुका म्हणे रतल्या जणीं। सोडा झणीं कान्होबा ।।तु.गा.०१५२.००४ ।।
कोंडिला गे माज। निरोधुनि द्वार। राखण तें बरें। येथें करा कारण ।।तु.गा.०१५३.००१ ।।
हा गे हा गे हरि। करितां सांपडला चोरी। घाला गांठीं धरी। जीवें माया त्रासाया ।।तु.गा.०१५३.००२ ।।
तेंचि पुढें आड। तिचा लोभ तिला नाड। लावुनि चरफड। हात गोउनी पळावें ।।तु.गा.०१५३.००३ ।।
संशयाचें बिरडें। याचे निरसलें भेटी। घेतली तें तुटी। आतां देतां घेतां फावेल ।।तु.गा.०१५३.००४ ।।
तुका येतो काकुळती। वाउगिया सोड। यासीची निवाड । आम्ही भारवाहिका ।।तु.गा.०१५३.००५ ।।
लावूनियां गोठी । चुकवूं आदरिली दिठी । देउनियां मिठी । पडे महिया माथुले ।।तु.गा.०१५४.००१ ।।
पुढें तेंचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । उरवी चरफड । हात गोऊनि पळावें ।।तु.गा.०१५४.००२ ।।
आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडें माती । फिरतां मागें कैंचा तो ।।तु.गा.०१५४.००३ ।।
तुका म्हणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हे सेवा । सुखें तुम्हां नार्पिती ।।तु.गा.०१५४.००४ ।।
गौळणी आल्या वाज। म्हणती या गे राखों आज। सांपडवूनि माज। घरांत धरुं कोंडूनि ।।तु.गा.०१५५.००१ ।।
उभें कवाड। उभ्या काळोशाचे आड। साता पांचा एक भीड। मौनेंचि ठेल्या ।।तु.गा.०१५५.००२ ।।
नित्य सोंकवला। नेदी सांगों चित्त बोला। आतां सांपडतां याला। कोण सोडी जीवें ।।तु.गा.०१५५.००३ ।।
जाणोनियां हरी। त्याच घरा आला चोरी। गडिया ठेवूनी बाहेरी। पूर्वद्वारें शिरें ।।तु.गा.०१५५.००४ ।।
त्यांच्या भयाभीत चाले। पिलंगत भोंवतालें। पाहें तंव देखियेलें। नवनीत पुढें ।।तु.गा.०१५५.००५ ।।
उतरोनी सिंकें । पाहें चाखोनियां निकें । गोड तेंचि एका एकें । हातीं लांबवितो ।।तु.गा.०१५५.००६ ।।
जाणे राखती तयांसी। तेथें अधिकचि नासी। मग लावी हात पुसी। चोरी जाणावया ।।तु.गा.०१५५.००७ ।।
जाणोनियां नारी। मूळ वर्मद्वार धरी। माज कोंडूनी भीतरीं। घरांत धरियेला ।।तु.गा.०१५५.००८ ।।

कां रे नागविसि । माझे मुळीं लागलासी । आतां आणवीन तुजपासीं । मागें खादलें तें ।।तु.गा.०१५५.००९ ।।

दोहीं संधी बाहे । धरूनि नेती माते पाहे । काय नासी केली आहे । घरांमाजी येणें ।।तु.गा.०१५५.०१० ।।

तुका म्हणे मुख । त्याचें वाटों नेदी दु:ख । दसवंती कवतुक । करूनि रंजविल्या ।।तु.गा.०१५५.०११ ।।

जीव खादला दैवतें । माझा येणें महाभूतें । झोंबलें निरुतें । कांहीं करितां न सुटे ।।तु.गा.०१५६.००१ ।।

आतां करूं काय । न चले करितां उपाय । तुम्हां आम्हां सये । विघडाविघड केली ।।तु.गा.०१५६.००२ ।।

बोलतां दुश्चिती । मी वो पडियलें भ्रांति । आठव हा चित्तीं । न ये म्हणतां मी माझें ।।तु.गा.०१५६.००३ ।।

भलतेंचि चावळे । जना अवघिया वेगळे । नाठवती बाळें । आपपर सारिखें ।।तु.गा.०१५६.००४ ।।

नका बोलों सये । मज वचन न साहे । बैसाल त्या राहें । उग्या वाचा खुंटोनी ।।तु.गा.०१५६.००५ ।।

तुम्हां आम्हां भेटी । नाहीं झाली जीवेंसाठीं । तुका म्हणे दृष्टि । पाहा जवळी आहे तों ।।तु.गा.०१५६.००६ ।।

जैशा तुम्ही दुरी आहां । तैशा राहा अंतरें ।।तु.गा.०१५७.००१ ।।

नका येऊं देऊं आळ । अंगीं गोपाळ जडलासे ।।तु.गा.०१५७.००२ ।।

अवघा हाचि राखा काळ । विक्राळचि भोंवता ।।तु.गा.०१५७.००३ ।।

तुका म्हणे मज ऐशा । होतां पिशा जगनिंद्य ।।तु.गा.०१५७.००४ ।।

भोजनाच्या काळीं । कान्हो मांडियेली आळी । काला करी वनमाळी । अन्नें एकवटा । देईं निवडूनी । माते म्हणतो जननी । हात निपटूनी मेदिनी । वरी अंग घाली ।।तु.गा.०१५८.००१ ।।

कैसा आळी घेसी । नव्हे तेंचि करिसी । घेईं दुसरें तयेसी । वारी म्हणे नको ।।तु.गा.०१५८.००२ ।।

आतां काय करूं । नये यासी हाणूं मारूं ।नव्हे बुझावितां स्थिरू । कांहीं करितांही । हातेंचि केलें एके ठायीं । आतां निवडूनी खाईं । आम्हां जाचितोसी काईं । हरिसी म्हणे माता ।।तु.गा.०१५८.००३ ।।

त्याचें तयाकुन । करवितां तुटे भान । तंव झालें समाधान । उठोनियां बैसे । मातें बरें जाणविले । अंग चोरूनी आपुलें । तोडियेलें एका बोलें । कैसें सुखदु:ख ।।तु.गा.०१५८.००४ ।।

ताट पालवें झाकिलें । होतें तैसें तेथें केलें । भिन्नभिन्न निवडिलें । अन्नें वेगळालीं । विस्मित जननी । भाव देखोनियां मनीं । म्हणे नाहीं ऐसा कोणी । तुज सारिखा रे ।।तु.गा.०१५८.००५ ।।

हरुषली माये। सुख अंगीं न समाये। कवळूनी बाहे। देती आलिंगन। आनंद भोजनीं। तेथे फिटलीसे धणी। तुका म्हणे कोणी। सांडा शेष मज ।।तु.गा.०१५८.००६ ।।
मुख डोळां पाहे। तैशीच ते उभी राहे ।।तु.गा.०१५९.००१ ।।
केल्याविण नव्हे हातीं। धरोनी आरती परती ।।तु.गा.०१५९.००२ ।।
न धरिती मनीं। कांहीं संकोच दाटणी ।।तु.गा.०१५९.००३ ।।
तुका म्हणे देवें। ओस केल्या देहभावें ।।तु.गा.०१५९.००४ ।।
या हो या चला जाऊं सकळा। पाहों हा सोहळा आजि वृंदावनींचा ।।तु.गा.०१६०.००१ ।।
वाहिला गोपाळें वेणुनाद पडे कानीं । धीर नव्हे मनीं चित्त झालें चंचळ ।।तु.गा.०१६०.००२ ।।
उरलें तें सांडा काम नका करूं गोवी। हीच वेळ ठावी मज कृष्णभेटीची ।।तु.गा.०१६०.००३ ।।
निवतील डोळे याचें श्रीमुख पाहातां। बोलती तें आतां घरींचें सोसूं वाईट ।।तु.गा.०१६०.००४ ।।
कृष्णभेटी आड कांहीं नावडे आणिक । लाज तरी लोक मन झालें उदास ।।तु.गा.०१६०.००५ ।।
एकाएकीं चालिल्या सादावित सवें। तुका म्हणे देवें रूपें केल्या तन्मय ।।तु.गा.०१६०.००६ ।।
सोडियेल्या गांठी। दरुषणें कृष्णभेटी ।।तु.गा.०१६१.००१ ।।
करिती नारी अक्षयवाणें। जीवभाव देती दानें ।।तु.गा.०१६१.००२ ।।
उपजल्या काळें। रूपें मोहिल्या सकळें ।।तु.गा.०१६१.००३ ।।
तुका तेथें वारी। एकी आडोनी दुसरी ।।तु.गा.०१६१.००४ ।।
अझुनि कां थीर पोरा न म्हणसी कीर। धरूनियां धीर लाजे बुर निघाला ।।तु.गा.०१६२.००१ ।।
मोकळा होतासी कां रे पडलासी डाईं। वरिलांचा भार आतां उतरेसा नाहीं ।।तु.गा.०१६२.००२ ।।
मेळवूनि मेळा एकएकीं दिली मिठी। कवळिलें एक बहु बैसविलीं पाठीं ।।तु.गा.०१६२.००३ ।।
तळील तें वरी वरील तें येतें तळा। न सुटे तोंवरी येथें गुंतलियां खेळा ।।तु.गा.०१६२.००४ ।।
सांडितां ठाव पुढें सईल धरी हात। चढेल तो पडेल ऐसी ऐका रे मात ।।तु.गा.०१६२.००५ ।।
तुका म्हणे किती आवरावे हात पाय। न खेळावें तोंच बरे वरी न ये डाय ।।तु.गा.०१६२.००६ ।।
अंतरली खुटी मेटी। भय धरूनियां पोटीं। म्हणतां जगजेठी। धांवें करुणाउत्तरीं ।।तु.गा.०१६३.००१ ।।

बाप बळिया शिरोमणी। उताविळ या वचनीं। पडलिया कानीं। धांवा न करी आळस।।तु.गा.०१६३.००२।।
बळ दुनी शरणागतां । स्वामी वाहों नेदी चिंता। आइतेंचि दाता। पंगतीस बैसवी।।तु.गा.०१६३.००३।।
वाहे खांदी पाववी घरा। त्याच्या करी येरझारा। बोबड्या उत्तरा। स्वामी तुकया मानवें।।तु.गा.०१६३.००४।।
अधिकाचा मज कांटाळा। तुम्हां गोपाळा संगती।।तु.गा.०१६४.००१ ।।
काय नाहीं तुम्हांपाशीं। सकळांविशीं संपन्न।।तु.गा.०१६४.००२।।
उद्वेगाचा नेघे भार। भागल्या सार पुरतें।।तु.गा.०१६४.००३।।
तुका म्हणे अधीर जिणें। नारायणें न करावें।।तु.गा.०१६४.००४।।
अनंत ब्रह्मांडें उदरीं। हरि हा बाळक नंदाघरीं।।तु.गा.०१६५.००१।।
नवल केव्हडें केव्हडें। न कळें कान्होबाचें कोडें।।तु.गा.०१६५.००२।।
पृथ्वी जेणें तृप्त केली। त्यासी यशोदा भोजन घाली।।तु.गा.०१६५.००३।।
विश्वव्यापक कमळापती। त्यासी गौळणी कडिये घेती।।तु.गा.०१६५.००४।।
तुका म्हणे नटधारी। भोग भोगून ब्रह्मचारी।।तु.गा.०१६५.००५।।
अवघियां दिला गोर। मजकरे पाहीना।।तु.गा.०१६६.००१ ।।
फुंदे गोपाळ डोळे चोळी। ढुंगा थापली हाणे तोंडा।।तु.गा.०१६६.००२।।
आवडती थोर मोटे। मी रे पोरटें दैन्यवाणे।।तु.गा.०१६६.००३।।
तुका म्हणे जाणों भाव। जीवींचा देव बुझावूं।।तु.गा.०१६६.००४।।
अवघीं मिळोनि कोल्हाळ केला। आतां होता म्हणती गेला।।तु.गा.०१६७.००१ ।।
आपुल्याला रडती भावें। जयासवें जयापरी।।तु.गा.०१६७.००२।।
चुकलों आम्ही खेळतां खेळ। गेला गोपाळ हातींचा।।तु.गा.०१६७.००३।।
तुका म्हणे धांवती थडी। न घली उडी आतां कोणी।।तु.गा.०१६७.००४।।
अवघें अवघीकडे। दिलें पाहें मजकडे। अशा सवंगडे। सहित थोरी लागली।।तु.गा.०१६८.००१।।
कां रे धरिला अबोला। माझा वांटा देईं मला। सिदोरिचा केला। झाडा आतां निवडेना।।तु.गा.०१६८.००२।।
भूक लागली अनंता। कां रे नेणसी जाणतां। भागलों वळितां। गाई सैरा ओढाळा।।तु.गा.०१६८.००३।।

तुका करुणा भाकी। हरि पाहे गोळा टाकी। घेतां झाला सुखी। भीतरीं वांटी आणिकां।।तु.गा.०१६८.००४।।

अवघें गोपाळ म्हणती या रे करूं काला। काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला। नका कांहीं मागें पुढें ठेवूं रे तुम्ही खरेंच बोला। वंची वंचला तोचि रे येथें भोवंडा त्याला ।।तु.गा.०१६९.००१।।

घेतल्यावांचून झाडा रे नेदी आपुलें कांहीं। एकां एक ग्वाही बहुत देती मोकळें नाहीं। ताक सांडी येक रे येक रे काला भात भाकरी दहीं। आलें घेतो मध्यें बैसला नाहीं आणवीत तें ही।।तु.गा.०१६९.००२।।

एका नाहीं धीर तांतडी दिल्या सोडोनि मोटा। एक सोडितील गांठी रे एक चालती वाटा। एक उभा भार वाहोनि पाहे उगाचि खोटा। एक ते करूनि आराले आतां ऐसेंचि घाटा।।तु.गा.०१६९.००३।।

एकीं स्थिरावल्या गाई रे एक वळत्या देती। एकांच्या फांकल्या वोढाळा फेरें भोंवतीं घेती। एक चाराबोरा गुंतले नाहीं जीवन चित्तीं। एक एका चला म्हणती एक हुंबरी घेती।।तु.गा.०१६९.००४।।

एकी एके वाटा लाविलीं भोळीं नेणतीं मुलें। आपण घरींच गुंतले माळा नासिलीं फुले। गांठींचें तें सोडूं नावडे खाय आइतें दिलें। सांपडलें वेठी वोढी रे भार वाहतां मेलें।।तु.गा.०१६९.००५।।

एक ते माया गुंतले घरीं बहुत कामें। वार्ता ही नाहीं तयाची तया कांहींच ठावें। जैसें होतें शिळें संचित तैसें लागलें खावें। हातोहातीं गेले वेचुनीं मग पडिलें ठावें।।तु.गा.०१६९.००६।।

एका हातीं पायीं पट्टे रे अंगीं लाविल्या राखा। एक ते सोलिव बोडके सपाट केल्या शिखा। एक ते आळशी तळीं रे वरी वाढिल्या काखा। सीदोरी वांचून बुद्धि रे केल्या अवघ्या वाखा।।तु.गा.०१६९.००७।।

तुका म्हणे आतां कान्होबा आम्हां वांटोनि द्यावें । आहे नाहीं आम्हांपाशीं तें तुज अवघेंचि ठावें । मोकलितां तुम्हीं शरण आम्हीं कवणासी जावें । कृपावंतें कृपा केली रे पोट भरे तों खावें ।।तु.गा.०१६९.००८।।

अवघेंचि गोड झालें। मागीलिये भरी आलें ।।तु.गा.०१७०.००१।।

साह्य झाला पांडुरंग। दिला अभ्यंतरीं संग।।तु.गा.०१७०.००२।।

थडिये पावतां तो वाव। मागें पाहतां तो ठाव।।तु.गा.०१७०.००३।।

तुका म्हणे गेलें । स्वप्नीचें जागें झालें।।तु.गा.०१७०.००४।।

आचरती कर्में। ते ते काळें धर्माधर्में ।।तु.गा.०१७१.००१।।

खेळे गोवळियांसवें। करिती तें त्यांचें साहावें।।तु.गा.०१७१.००२।।

यज्ञमुखें घांस। मंत्रपूजेसी उदास।।तु.गा.०१७१.००३।।
तुका म्हणे चोरी। योगियांही सवें करी।।तु.गा.०१७१.००४।।
आजी ओस अमरावती। काला पाहावया येती। देव विसरती। देहभाव आपुला।।तु.गा.०१७२.००१।।
आनंद न समाये मेदिनी। चारा विसरल्या पाणी। तटस्थ त्या ध्यानीं। गाई जाल्या श्वापदें।।तु.गा.०१७२.००२।।
जें देवांचे दैवत। उभें आहे या रंगांत। गोपाळांसहित। क्रीडा करी कान्होबा।।तु.गा.०१७२.००३।।
जया सुखाची शिराणी। तींच पाउलें मेदिनी। तुका म्हणे मुनी। धुंडितांही न लभती।।तु.गा.०१७२.००४।।
आणिकें काय थोडीं। परि तीं फार खोटीं कुडीं।।तु.गा.०१७३.००१।।
सदा मोकळींच गुरें। होतीं फजीत तीं पोरें।।तु.गा.०१७३.००२।।
सदा घालिती हुंबरी। एक एकाचें न करी।।तु.गा.०१७३.००३।।
तुका म्हणे घरीं। माय वेळोवेळां मारी।।तु.गा.०१७३.००४।।
आतां ऐसें करूं। दोघां धरूनियां मारूं।।तु.गा.०१७४.००१।।
मग टाकितील हे खोडी। तोंडीं लागली ते गोडी।।तु.गा.०१७४.००२।।
कोंडूं घरामधीं। न बोलोनी जागो बुद्धी।।तु.गा.०१७४.००३।।
बोलावितो देवा। तुका गडियांचा मेळावा।।तु.गा.०१७४.००४।।
आतां हेंचि जेऊं। सवें घेऊं सिदोरी।।तु.गा.०१७५.००१।।
हरिनामाचा खिचडी काला। प्रेमें मोहिला साधनें।।तु.गा.०१७५.००२।।
चवीं चवीं घेऊं घास। ब्रह्मरस आवडी।।तु.गा.०१७५.००३।।
तुका म्हणे गोड लागे। तों तों मागे रसना।।तु.गा.०१७५.००४।।
आम्हां निकट वासें। कळों आलें जैसें तैसें। नाहीं अनारिसें। कान्होबाचे अंतरीं।।तु.गा.०१७६.००१।।
पीडती आपुलाल्या भावना। जैसी जयाची वासना। कर्माचा देखणा। पाहे लीळा कौतुक।।तु.गा.०१७६.००२।।
खेळ खेळे न पडे ठाईं। ज्याचा भार त्याच्या ठायीं। कोणी पडतील डाईं। कोणी कोडीं उगविती।।तु.गा.०१७६.००३।।
तुका म्हणे कवळ। हातीं घेऊनी गोपाळ। देतों ज्याचें बळ। त्यासी तैसा विभाग।।तु.गा.०१७६.००४।।
आम्हीं गोवळीं रानटें। नव्हों जनांतील धीटें।।तु.गा.०१७७.००१।।

सिदोरीचा करूं काला। एक वांटितो एकाला ।।तु.गा.०१७७.००२ ।।
खेळों आपआपणाशीं। आमचीं तीं आम्हांपाशीं ।।तु.गा.०१७७.००३ ।।
म्हणे मिळालें नेणतें। तुका कान्होबा भोंवते ।।तु.गा.०१७७.००४ ।।
उपजोनियां पुढती येऊं । काला खाऊं दहींभात ।।तु.गा.०१७८.००१ ।।
वैकुंठीं तों ऐसें नाहीं। कवळ कांहीं काल्याचे ।।तु.गा.०१७८.००२ ।।
एकमेकां देऊं मुखीं। सुखी घालूं हुंबरी ।।तु.गा.०१७८.००३ ।।
तुका म्हणे वाळवंट। बरवें नीट उत्तम ।।तु.गा.०१७८.००४ ।।
एकाचिया धाट्या टोके । एका फिके उपचार ।।तु.गा.०१७९.००१ ।।
ऐसी सवे गोवळिया। भाव तया पढियंता ।।तु.गा.०१७९.००२ ।।
एकाचें तें उष्टें खाय। एका जाय ठकूनि ।।तु.गा.०१७९.००३ ।।
तुका म्हणे बहु सोपें। बहु रूपें अनंता ।।तु.गा.०१७९.००४ ।।
कवळाचिया सुखें। परब्रह्म झालें गोरखें। हात गोवूनि खाय मुखें। बोटांसांदीं लोणचीं ।।तु.गा.०१८०.००१ ।।
कोण जाणे तेथें कोण लाभ। कां तें ब्रह्मादिकां दुर्लभ ।।तु.गा.०१८०.००२ ।।
घाली हमामा हुंबरी। पांवा वाजवी मोहरी। गोपाळांचे फेरी। हरि छंदें नाचतसे ।।तु.गा.०१८०.००३ ।।
काय नव्हतें त्या घरीं खावया। रिघे लोणी चोराया। तुका म्हणे सवें तया। आम्हीही सोंकलों ।।तु.गा.०१८०.००४ ।।
कंठीं धरिला कृष्णमणी। अवघा जनीं प्रकाश ।।तु.गा.०१८१.००१ ।।
काला वांटूं एकमेकां। वैष्णव निका संभ्रम ।।तु.गा.०१८१.००२ ।।
वांकुलिया ब्रह्मादिकां । उत्तम लोकां दाखवूं ।।तु.गा.०१८१.००३ ।।
तुका म्हणे भूमंडळीं। आम्ही बळी वीर गाढे ।।तु.गा.०१८१.००४ ।।
काकुलती येतो हरी। क्षणभरी निवडितां ।।तु.गा.०१८२.००१ ।।
तुमची मज लागली सवे। ठायींचें नवे नव्हों गडी ।।तु.गा.०१८२.००२ ।।
आणीक बोलाविती फार। बहु थोर नावडती ।।तु.गा.०१८२.००३ ।।
भाविकें त्यांची आवडी मोठी। तुका म्हणे मिठी घाली जिवें ।।तु.गा.०१८२.००४ ।।

कान्होबा आतां तुम्ही आम्हीच गडे। कोणाकडे जाऊं नेदूं।।तु.गा.०१८३.००१ ।।
वाहीन तुझी भारशिदोरी। वळतीवरी येऊं नेदूं।।तु.गा.०१८३.००२ ।।
ढवळे गाईचें दूध काढूं। एकल्या एक ठोंबे मारूं ।।तु.गा.०१८३.००३ ।।
तुका म्हणे टोकवूं त्याला। जे तुझ्या बोला मानिती ना ।।तु.गा.०१८३.००४ ।।
कान्होबा तूं आलगट। नाहीं लाज बहु धीट। पाहिलें वाईट। बोलोनियां वोखटें।।तु.गा.०१८४.००१ ।।
परि तूं न संडिसी खोडी। करिसी केली घडीघडी। पाडिसी रोकडी। तुटी माये आम्हांसी।।तु.गा.०१८४.००२ ।।
तूं ठायींचा गोवळ। अविचारी अनर्गळ। चोरटा शिंदळ। ऐसा पिटूं डांगोरा।।तु.गा.०१८४.००३ ।।
जरी तुझी आई। आम्ही घालूं सर्वां ठायीं। तुका म्हणे तेंही। तुज वाटे भूषण।।तु.गा.०१८४.००४ ।।
काम सारूनी सकळ। आले अवघे गोपाळ। झाली आतां वेळ। म्हणती आणा सिदोऱ्या।।तु.गा.०१८५.००१ ।।
देती आपुलाला झाडा। गाई बैसविल्या वाडां। दोंदिल बोबडा। वाकड्याचा हरि मेळीं।।तु.गा.०१८५.००२ ।।
आपुलाली ये आवडी। मुदा बांधल्या परवडी। निवडूनि गोडी। हरि मेळवी त्यांत तें।।तु.गा.०१८५.००३ ।।
भार वागविला खांदीं। नव्हती मिळाली तों मांदीं। सकळांचे संधी। ओझीं अवघीं उतरलीं।।तु.गा.०१८५.००४ ।।
मागे जो तांतडी। त्यासी रागा येती गडी। तुझी कां रे कुडी। येथें मिथ्या भावना।।तु.गा.०१८५.००५ ।।
एक एकाच्या संवादें। कैसे धाले ब्रह्मानंदें। तुका म्हणे पदें। या रे वंदूं हरीचीं।।तु.गा.०१८५.००६ ।।
कामें पीडिलों माया। बहू मारी नाहीं दया।।तु.गा.०१८६.००१ ।।
तुझ्या राहिलों आधारें। झालें अवघेंचि बरें।।तु.गा.०१८६.००२ ।।
तुझे लागलों संगती। आतां येतों काकुलती।।तु.गा.०१८६.००३ ।।
तुका म्हणे तुझ्या भिडा। कान्होबा हे गेली पीडा।।तु.गा.०१८६.००४ ।।
कां रे गमाविल्या गाई। आली वळती तुझी जाई। मागें झालें काई। एका तें कां नेणसी।।तु.गा.०१८७.००१ ।।
केलासी फजित। मागें पुढेंही बहुत। लाज नाहीं नित्य। नित्य दंड पावतां।।तु.गा.०१८७.००२ ।।
बोला खोडा खिळ गाढी। ऐसा कोण तया काढी। धांवले कापडी। तुझी आधीं ओढाळा।।तु.गा.०१८७.००३ ।।
चालें चाल धांवें। मीही येतों तुजसवें । तुका म्हणे जंव। तेथें नाहीं पावली।।तु.गा.०१८७.००४ ।।
काल्याचिये आसे। देव जळीं जालें मासे। पुसोनियां हांसें। टिरीसांगातें हात।।तु.गा.०१८८.००१ ।।

लाजे त्यासी वांटा नाहीं। जाणे अंतरींचें तें ही। दीन होतां कांहीं। होऊं नेदी वेगळें।।तु.गा.०१८८.००२।।
उपाय अपाय यापुढें। खोटे निवडितो कुडें। जोडूनियां पुढें। हात उभे नुपेक्षी।।तु.गा.०१८८.००३।।
तें घ्या रे सावकाशें। जया फावेल तें तैसें। तुका म्हणे रसें। प्रेमाचिया आनंदें।।तु.गा.०१८८.००४।।
काळिया नाथूनी आला वरी। पैल हरी दाखविती।।तु.गा.०१८९.००१।।
दुसरिया भावें न कळे कोणा। होय नव्हेसा संदेह मना।।तु.गा.०१८९.००२।।
रूपा भिन्न पालट झाला। गोरें सांवळेंसा पैं देखिला।।तु.गा.०१८९.००३।।
आश्वासीत आला करें। तुका खरें म्हणे देवा।।तु.गा.०१८९.००४।।
कृष्ण गोकुळीं जन्मला। दुष्टां चळकांप सुटला।।तु.गा.०१९०.००१।।
होतां कृष्णाचा अवतार। आनंद करिती घरोघर।।तु.गा.०१९०.००२।।
सदा नाम वाचे गाती। प्रेमें आनंदें नाचती।।तु.गा.०१९०.००३।।
तुका म्हणे हरती दोष। आनंदानें करिती घोष।।तु.गा.०१९०.००४।।
गडी गेले रडी। कान्हो नेदीच तूं चढी।।तु.गा.०१९१.००१।।
आम्ही न खेळों न खेळों। आला भाव तुझा कळों।।तु.गा.०१९१.००२।।
न साहावें भार। बहु लागतो उशीर।।तु.गा.०१९१.००३।।
तुका आला रागें। येऊं नेदी मागें मागें।।तु.गा.०१९१.००४।।
गाईन ते लीळा चरित्र पवाडे। राखिले सवंगडे सहित गाई।।तु.गा.०१९२.००१।।
चोरिलें नवनीत बांधविला गळा। जे तुम्हीं गोपाळा छंद केले।।तु.गा.०१९२.००२।।
मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें। केली ते गोविंदें क्रीडा गाऊं।।तु.गा.०१९२.००३।।
मायबापा लाडें दाविलें कौतुक। तें या आणूं सुख अंतरासी।।तु.गा.०१९२.००४।।
निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी। ऐसा म्हणों बळी आमुचा स्वामी।।तु.गा.०१९२.००५।।
तुका म्हणे सरसी असों येणें बोधें। जाणोनी संबंध सर्वकाळ।।तु.गा.०१९२.००६।।
गोकुळींच्या सुखा। अंतपार नाहीं लेखा।।तु.गा.०१९३.००१।।
बाळकृष्ण नंदा घरीं। आनंदल्या नरनारी।।तु.गा.०१९३.००२।।

गुढिया तोरणें। करिती कथा गाती गाणें ।।तु.गा.०१९३.००३ ।।

तुका म्हणे छंदें। येणे वेधिलीं गोविंदें ।।तु.गा.०१९३.००४ ।।

गोपाळ म्हणती कान्होबा या रे कांहीं मागों। आपुलाले आम्हीं जीवींचें तया आवडी सांगों। एक म्हणती उगे रे उगे रे उगे मागेंचि लागों। निजों नका कोणी घरीं रे आजी अवघेचि जागों ।।तु.गा.०१९४.००१ ।।

जाणोनि नेणता हरि रे मध्यें उगाचि बैसे। नाइकोनि बोल आइके कोण कोणाचें कैसे। एक एकाच्या संवादें जाणे न मिळती ऐसें। पोटांतील होटा आणवी देतो तयांसी तैसें ।।तु.गा.०१९४.००२ ।।

एक म्हणती बहु रे आम्हीं पीडियलों माया। नेदी दहींभातसिदोरी ताक घालिती पिया। तापलों वळितां गोधनें नाहीं जीवन छाया। आतां मागों पोटभरी रे याच्या लागोनि पायां ।।तु.गा.०१९४.००३ ।।

एक म्हणती तुमचें अरे पोट तें किती। मागों गाई म्हैसी घोडे रे धन संपत्ति। हातीं देव गडी कान्होबा आमुचा आम्हां काय विपत्ति। कन्याकुमरें दासी रे बाजावरी सुपती ।।तु.गा.०१९४.००४ ।।

एक म्हणती बेटे हो कोण करी जतन। गाढव तैसेंचि घोडें रे कोण तयाचा मान। लागे भवरोग खांदीं वाहतां चवघे जण। हातीं काठ्या डोया बोडक्या हिंडो मोकळें रान ।।तु.गा.०१९४.००५ ।।

एक म्हणती रानीं रे बहु सावजें फार। फाडफाडूं खाती डोळे रे पाय नेतील कर। राखोनि राखे आपणां ऐसा कईंचा शूर। बैसोनि राहों घरीं रे कोण करी हे चार ।।तु.गा.०१९४.००६ ।।

घरीं बैसलिया बहुतें बहु सांगती कामें। रिकामें कोणासी नावडे ऐसें आम्हासी ठावें। चौघांमध्यें बरें दिसे तेथें नेमक व्हावें। लपोनि खेळतां सहज भलें गडियासवें ।।तु.गा.०१९४.००७ ।।

एक म्हणती गडी ते भले मिळती मता। केली तयावरी चाले रे बरी आपुली सत्ता। नसावे तेथें तैसें रे खेळ हाणिती लाता। रडी एकाएकीं गेलिया गोंधळ उडती लाता ।।तु.गा.०१९४.००८ ।।

एक म्हणे खेळतां उगीं राहती पोरें। ऐसें घडों शके रे कोणी लहान थोरें। अवघीं येती रागा एक म्हणती बरें। संगें वाढे कलह करावा एकाएकींच खरें ।।तु.गा.०१९४.००९ ।।

एक म्हणती एकाला रे तूं जासील कोठें। सांडी मांडी हें वाउगें तुझें बोलचि खोटें। ठायीं राहा उगे ठायींच कां रे सिणसी वाटे। अवघियांची सिदोरी तुझी बरी भरियेली मोट ।।तु.गा.०१९४.०१० ।।

तुका म्हणे अरे काहण्या काय सांगाल गोष्टी। चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं। जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ ताटीं। धाले गडी तुका ढेकर देतो विठ्ठल कंठीं।।तु.गा.०१९४.०११।।

गौळणी बांधिती धारणासी गळा। खेळे त्या गोपाळांमाजी ब्रह्म।।तु.गा.०१९५.००१।।

धांवोनियां मागे यशोदें भोजन। हिंडे रानोरान गाईपाठीं।।तु.गा.०१९५.००२।।

तुका म्हणे सर्व कळा ज्याचे अंगीं। भोळेपणा लागीं भीक मागे।।तु.गा.०१९५.००३।।

घेती पाण्यासी हुंबरी। त्यांचें समाधान करी।।तु.गा.०१९६.००१।।

ऐशीं गोपाळांची सवे। जाती तिकडे मागें धांवे।।तु.गा.०१९६.००२।।

स्थिरावली गंगा। पांगविली म्हणे उगा।।तु.गा.०१९६.००३।।

मोहरी पांवा काठी। तुका म्हणे याजसाठीं।।तु.गा.०१९६.००४।।

घ्या रे भोंकरें भाकरी। दहींभाताची सिदोरी। ताक सांडा दुरी। असेल तें तयापें।।तु.गा.०१९७.००१।।

येथें द्यावें तैसें घ्यावें। थोडें परि निरें व्हावें। सांगतों हें ठावें। असों द्या रे सकळां।।तु.गा.०१९७.००२।।

माझें आहे तैसें पाहे। नाहीं तरी घरा जाये। चोरोनियां माये। नवनीत आणावें।।तु.गा.०१९७.००३।।

तुका म्हणे घरीं । माझें कोणी नाहीं हरी। नका करूं दुरी। मज पायां वेगळें।।तु.गा.०१९७.००४।।

चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं। मांडियेला काला भोंवतीं गोपाळांची दाटी।।तु.गा.०१९८.००१।।

आनंदें कवळ देती एकामुखीं एक । न म्हणती सान थोर अवघीं सकळिक ।।तु.गा.०१९८.००२।।

हमामा हुंबरी पावा वाजविती मोहरी। घेतलासे फेरा माजी घालूनियां हरी।।तु.गा.०१९८.००३।।

लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती। विसरल्या देहभाव शंका नाहीं चित्तीं।।तु.गा.०१९८.००४।।

पुष्पांचा वरुषाव झाली आरतियांची दाटी। तुळसी गुंफोनियां माळा घालितील कंठीं।।तु.गा.०१९८.००५।।

यादवांचा राणा गोपी मनोहर कान्हा। तुका म्हणे सुख वाटे देखोनियां मना।।तु.गा.०१९८.००६।।

चला वळूं गाई। बैसो जेऊं एके ठायीं।।तु.गा.०१९९.००१।।

बहु केली वणवण। पायपिटी जाला सिण।।तु.गा.०१९९.००२।।

खांदीं भार पोटीं भूक । काय खेळायाचें सुख।।तु.गा.०१९९.००३।।

तुका म्हणे धांवें। मग अवघें बरवें।।तु.गा.०१९९.००४।।

झाली झडपणी खडतर देवता। संचरली आतां निघों नये।।तु.गा.०२००.००१।।
मज उपचार झणी आतां करा। न साहे दुसरा भार कांहीं।।तु.गा.०२००.००२।।
नेऊनियां घाला चंद्रभागे तिरीं। जीवा नाहीं उरी कांहीं आतां।।तु.गा.०२००.००३।।
तुका म्हणे कळों आलें वर्तमान। माझें तों वचन आच्छादलें।।तु.गा.०२००.००४।।
झालों आतां एके ठायीं। न वंचूं कांहीं एकमेकां।।तु.गा.०२०१.००१।।
सरलों हें गे देऊनि मोट। कटकट काशाची।।तु.गा.०२०१.००२।।
सोडोनियां गांठी पाहें। काय आहे त्यांत तें।।तु.गा.०२०१.००३।।
तुका म्हणे झालों निराळा। आतां गोपाळा देऊं बोभा।।तु.गा.०२०१.००४।।
झेला रे झेला वरचेवरी झेला। हातिचें गमावी तो पाठीसी खाय टोला।।तु.गा.०२०२.००१।।
त्रिगुणांचा चेंडू हातें झुगारी निराळा। वरिलियां मुखें मन लावी तेथें डोळां।।तु.गा.०२०२.००२।।
आगळा होऊनि धरी वरिचिया वरी। चपळ तो जिंके गांढ्या ठके येरझारीं।।तु.गा.०२०२.००३।।
हातीं सांपडलें उभें बैसों नेदी कोणी। सोरीमागें सोरी घेती ओणवें करूनी।।तु.गा.०२०२.००४।।
डाईं पडिलिया सोसी दु:खाचे डोंगर। पाठीवरीं भार उभा भोंवताही फेर।।तु.गा.०२०२.००५।।
तुका म्हणे सुख पाहे तयाचें आगळें। जिंकी तो हरीसी कोणी एका तरी काळें।।तु.गा.०२०२.००६।।
तुजसवें येतां हरी। आम्हां लाज नाहीं तरी। उचलिला गिरी। चांग तईं वांचलों।।तु.गा.०२०३.००१।।
मोडा आतां खेळ । गाई गेल्या झाला वेळ। फांकल्या ओढाळ। नाहीं तोचि आवरा।।तु.गा.०२०३.००२।।
चांग दैवें यमुनेसी। वांचलों बुडतां। निलाजिरीं आम्ही नाहीं। भय धाक या अनंता।।तु.गा.०२०३.००३।।
खातों आगी माती। आतां पुरे हा सांगाती। भोंवतां भोवेल। आम्हां वाटतें हें चित्तीं।।तु.गा.०२०३.००४।।
तुका म्हणे उरी नाहीं तुजसवें। शाहाणिया दुरी छंद भोळियां भावें।।तु.गा.०२०३.००५।।
तुझिये संगती। झाली आमुची निश्चिंती।।तु.गा.०२०४.००१।।
नाहीं देखिलें तें मिळे। भोग सुखाचे सोहळे।।तु.गा.०२०४.००२।।
घरीं ताकाचें सरोवर। येथें नवनीताचे पूर।।तु.गा.०२०४.००३।।
तुका म्हणे आतां । आम्ही न वजों दडवितां।।तु.गा.०२०४.००४।।

त्यांनीं धणीवरी संग केला हरीसवें। देऊनी आपुलें तोचि देईल तें खावें ।।तु.गा.०२०५.००१ ।।
न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला। बहु दिस संग हाचि निर्धार त्याला ।।तु.गा.०२०५.००२ ।।
कान्होबा तूं जेवीं घासोघासीं। आरुष गोपाळें त्यांची बहु देवा प्रीति ।।तु.गा.०२०५.००३ ।।
तुका म्हणे आतां जाऊं आपुलिया घरा। तोयें वांचविलें ऐसें सांगों रे दातारा ।।तु.गा.०२०५.००४ ।।
देखिलासी माती खातां। दावियानें बांधी माता ।।तु.गा.०२०६.००१ ।।
जाळी घेउनि कांबळी काठी। गाई वळी वेणू पाठीं ।।तु.गा.०२०६.००२ ।।
मोठें भावार्थाचें बळ। देव झाला त्याचें बाळ ।।तु.गा.०२०६.००३ ।।
तुका म्हणे भक्तासाठीं। देव धांवें पाठोवाटीं ।।तु.गा.०२०६.००४ ।।
धन्य तीं गोधनें कांबळी काष्टिका। मोहरी पांवा निका ब्रीद वांकी ।।तु.गा.०२०७.००१ ।।
धन्य तें गोकुळ धन्य तें गोपाळ। नर नारी सकळ धन्य झाल्या ।।तु.गा.०२०७.००२ ।।
धन्य तें देवकी जसवंती दोहींचें। वसुदेवनंदाचें भाग्य झालें ।।तु.गा.०२०७.००३ ।।
धन्य त्या गोपिका सोळा सहस्त्र बाळा। यादवां सकळां धन्य झालें ।।तु.गा.०२०७.००४ ।।
धन्य म्हणे तुका जन्मा तींचि आली। हरिरंगीं रंगली सर्वभावें ।।तु.गा.०२०७.००५ ।।
धालें मग पोट। केला गड्यांनीं बोभाट ।।तु.गा.०२०८.००१ ।।
ये रे ये रे नारायणा। बोलों अबोलण्या खुणा ।।तु.गा.०२०८.००२ ।।
खांद्यावरी भार। तीं शिणती बहु फार ।।तु.गा.०२०८.००३ ।।
तुकयाच्या दातारें। नेलीं सुखी केलीं पोरें ।।तु.गा.०२०८.००४ ।।
धांव कान्होबा गेल्या गाई। न म्हणें मी कोणा काई ।।तु.गा.०२०९.००१ ।।
आपुलियांचें वचन देवा। गोड सेवा करीतसे ।।तु.गा.०२०९.००२ ।।
मागतां आधीं द्यावा डाव। बळिया मी तो नाहीं भाव ।।तु.गा.०२०९.००३ ।।
तुका म्हणे ऐशा सवें। अनुसरावें जीवेंभावें ।।तु.गा.०२०९.००४ ।।
नको आम्हासवें गोपाळा। येऊं ओढाळा तुझ्या गाई ।।तु.गा.०२१०.००१ ।।
कोण धांवें त्यांच्या लागें। मागें मागें येरझारी ।।तु.गा.०२१०.००२ ।।

न बैसती एके ठायीं। धांवती दाही दाहा वाटां ।।तु.गा.०२१०.००३।।
तुका म्हणे तूं राख मनेरी। मग त्या येरी आम्ही जाणों।।तु.गा.०२१०.००४।।
नेणती तयांसी साच भाव दावी हरी। लाज नाहीं नाचे पांवा वाजवी मोहरी।।तु.गा.०२११.००१।।
चला रे याच्या पायां लागो आतां। राखिलें जळतां महा आगीपासूनी।।तु.गा.०२११.००२।।
कैसी रे कान्होबा एवढी गिळियेली आगी। न देखों पोळला तुज तोंडीं कोठें अंगीं।।तु.गा.०२११.००३।।
तुका म्हणे कां रे तुम्ही करितां नवल। आमची सिदोरी खातो त्याचें आलें बळ।।तु.गा.०२११.००४।।
नेणों वेळ काळ। धालों तुझ्यानें सकळ।।तु.गा.०२१२.००१।।
नाहीं नाहीं रे कान्होबा भय आम्हांपाशीं। वळूनी पुरविसी गाई पोटा खावया।।तु.गा.०२१२.००२।।
तुजपाशीं भय। हें तों बोलों परी नये।।तु.गा.०२१२.००३।।
तुका म्हणे बोल। आम्हां अनुभवें फोल।।तु.गा.०२१२.००४।।
पळाले ते भ्याड। त्यांसी येथें झाला नाड।।तु.गा.०२१३.००१।।
धीट घेती धणीवरी। शिंकीं उतरितो हरी।।तु.गा.०२१३.००२।।
आपुलिया मतीं। पडलीं विचारीं तीं रितीं।।तु.गा.०२१३.००३।।
तुका म्हणे घ्या रे पया। कैं पावाल या ठाया।।तु.गा.०२१३.००४।।
पाहातां गोवळी। खाय त्यांची उष्टावळी।।तु.गा.०२१४.००१।।
करिती नामाचें चिंतन। गडी कान्होबाचें ध्यान।।तु.गा.०२१४.००२।।
आली द्यावी डाई। धांवे वळत्या मागें गाई।।तु.गा.०२१४.००३।।
एके ठायीं काला। तुका म्हणे भाविकाला।।तु.गा.०२१४.००४।।
पाहाती गौळणी। तंव ती पालथी दुधाणी।।तु.गा.०२१५.००१।।
म्हणती नंदाचिया पोरें। आजी चोरी केली खरें।।तु.गा.०२१५.००२।।
त्याविण हे नासी। नव्हे दुसरिया ऐसी।।तु.गा.०२१५.००३।।
सवें तुकया मेला। त्यानें अगुणा आणिला।।तु.गा.०२१५.००४।।
पैल आली आगी कान्हो काय रे करावें। नकळे तें कैसें आजी वांचों आम्हीं जीवें।।तु.गा.०२१६.००१।।

धांव रे हरी सांपडलों संधी। वोणव्याचे मधीं बुद्धि काय करावी ।।तु.गा.०२१६.००२ ।।
अवचितां ज्वाळा येतां देखिल्या वरी। परतोनि पाहातां अवघे होतों पाठमोरी ।।तु.गा.०२१६.००३ ।।
सभोवतां फेर रीघ न होय पळतां। तुका म्हणे जाणसी तें करावें अनंता ।।तु.गा.०२१६.००४ ।।
फिरविलीं दोनी। कन्या आणि चक्रपाणी ।।तु.गा.०२१७.००१ ।।
जाला आनंदी आनंद। अवतरले गोविंद ।।तु.गा.०२१७.००२ ।।
तुटलीं बंधनें। वसुदेवदेवकीचीं दर्शनें ।।तु.गा.०२१७.००३ ।।
गोकुळासी आलें। ब्रह्म अव्यक्त चांगलें ।।तु.गा.०२१७.००४ ।।
नंद दसवंती। धन्य देखिले श्रीपती ।।तु.गा.०२१७.००५ ।।
निशीं जन्मकाळ। आले अष्टमी गोपाळ ।।तु.गा.०२१७.००६ ।।
आनंदली मही। भार गेला सकळही ।।तु.गा.०२१७.००७ ।।
तुका म्हणे कंसा। आठ भोविला वळसा ।।तु.गा.०२१७.००८ ।।
बहु काळीं बहु काळीं। आम्ही देवाचीं गोवळीं ।।तु.गा.०२१८.००१ ।।
नाहीं विट देतो भाते। जेवूं बैसवूं सांगातें ।।तु.गा.०२१८.००२ ।।
बहु काळें बहु काळें। माझें पांघरे कांबळें ।।तु.गा.०२१८.००३ ।।
तुका म्हणे नाहीं नाहीं। त्याचें आमचेंसें कांहीं ।।तु.गा.०२१८.००४ ।।
बहुतांचे संगती। बहु पावलों फजिती ।।तु.गा.०२१९.००१ ।।
बरें केलें नंदबाळें। मागिलांचें तोंड काळें ।।तु.गा.०२१९.००२ ।।
माझा करितील तंटा। लपती आलिया बोभाटा ।।तु.गा.०२१९.००३ ।।
तुका म्हणे काई। किती म्हणों बाप आई ।।तु.गा.०२१९.००४ ।।
बहु बरा बहु बरा। या सांगातें मिळे चारा ।।तु.गा.०२२०.००१ ।।
म्हणोनि जीवेंसाठीं। घेतली कान्होबाची पाठी ।।तु.गा.०२२०.००२ ।।
बरवा बरवा दिसे। समागम याचा निमिषें ।।तु.गा.०२२०.००३ ।।
पुढती पुढती तुका। सोंकला सोंकवितो लोकां ।।तु.गा.०२२०.००४ ।।

बैसवूनि फेरी। गडिया मध्यभागीं हरी।  अवघियांचें करी। समाधान सारिखें ।।तु.गा.०२२१.००१ ।।
पाहे तो देखे समोर। भोगी अवघे प्रकार।  हरुषें झेली कर। कवळ मुखीं देती ते।।तु.गा.०२२१.००२ ।।
बोले बोलतिया सवें। देतील तें त्यांचें घ्यावें।  एक एका ठावें। येर येरा अदृश्य।।तु.गा.०२२१.००३ ।।
तुका म्हणे देवा। बहु आवडीचा हेवा।  कोणाचिया जीवा। वाटों नेदी विषम।।तु.गा.०२२१.००४ ।।
ब्रह्मादिकां न कळे खोळ। ते हे आकळ धरियेली।।तु.गा.०२२२.००१ ।।
मोहरी पांवा वाहे काठी। धांवे पाठीं गाईचे।।तु.गा.०२२२.००२ ।।
उच्छिष्ट जें न लभे देवा। तें हें सदैवां गोवळ्यां।।तु.गा.०२२२.००३ ।।
तुका म्हणे जोडी झाली। ते हे माउली आमुची।।तु.गा.०२२२.००४ ।।
भिऊं नका बोलें झांकुनियां राहा डोळे। वांचविल देव धाक नाहीं येणे वेळे।।तु.गा.०२२३.००१ ।।
बापरे हा देवांचाही देव। कळों नेदी माव काय करी करवितो।।तु.गा.०२२३.००२ ।।
पसरूनि मुख विश्वरूप खाय ज्वाळ। सारूनियां संधि अवघे पाहाती गोपाळ।।तु.गा.०२२३.००३ ।।
तुका म्हणे आम्हीं मागें भ्यालों वायांविण। कळों आलें आतां या सांगातें नाहीं शिण।।तु.गा.०२२३.००४ ।।
भ्यालीं जिवा चुकलीं देवा। नाहीं ठावा जवळी तो।।तु.गा.०२२४.००१ ।।
आहाकटा करिती हाय। हात डोकीं पिटिती पाय।।तु.गा.०२२४.००२ ।।
जवळी होतां न कळे आम्हां। गेल्या सीमा नाहीं दुःखा।।तु.गा.०२२४.००३ ।।
तुका म्हणे हा लाघवी मोटा। पाहे खोटा खरा भाव।।तु.गा.०२२४.००४ ।।
मागायास गेलों सिदोरी। तुझ्या मायेघरीं गांजियेलों।।तु.गा.०२२५.००१ ।।
तुजविणें ते नेदी कोणा। सांगतां खुणा जिवें गेलों।।तु.गा.०२२५.००२ ।।
वायांविण केली येरझार। आतां पुरे घर तुझी माया।।तु.गा.०२२५.००३ ।।
तुका म्हणे तूं आम्हां वेगळा। राहे गोपाळा म्हणऊनी।।तु.गा.०२२५.००४ ।।
माझे गडी कोण कोण। निवडा भिन्न यांतुनी।।तु.गा.०२२६.००१ ।।
आपआपणामध्यें मिळों। एक खेळों एकाशीं।।तु.गा.०२२६.००२ ।।
घाबरियांच्या मोडा काड्या। धाडा भ्याडां वळतियां।।तु.गा.०२२६.००३ ।।

तुका म्हणे देवापाशीं। विटाळशी नसावी ।।तु.गा.०२२६.००४ ।।
मेळवूनि सकळ गोपाळ। कांहीं करिती विचार ।।तु.गा.०२२७.००१ ।।
जाऊं चोरूं लोणी। आजी घेऊं चंद्रधणी। चला वेळु लाविला अझुनी। काय करितां गडे हो ।।तु.गा.०२२७.००२ ।।
वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळांची मांदी ।।तु.गा.०२२७.००३ ।।
अवघाचि वावरे। कळों नेदी कोणां खरें ।।तु.गा.०२२७.००४ ।।
घर पाहोनि एकांताचें। नवविधा नवनीताचें ।।तु.गा.०२२७.००५ ।।
रिघे आपण भीतरी। पुरवी माथुलियाच्या हरी ।।तु.गा.०२२७.००६ ।।
बोलों नेदी म्हणे स्थीर। खुणा दावी खा रे क्षीर ।।तु.गा.०२२७.००७ ।।
जोगावल्यावरी। तुका करितो चाकरी ।।तु.गा.०२२७.००८ ।।
म्हणती धालों धणीवरी। आतां नलगे शिदोरी। नयें क्षणभरी। आतां यास विसंबों ।।तु.गा.०२२८.००१ ।।
चाल चाल रे कान्होबा। खेळ मांडूं रानीं। बैसवूं गोठणी। गाई जमा करूनि ।।तु.गा.०२२८.००२ ।।
न लगे जावें घरा। चुकलिया येरझारा। सज्जन सोयरा। मायबाप तूं आम्हां ।।तु.गा.०२२८.००३ ।।
तुका म्हणे धालें पोट। आतां काशाचा बोभाट। पाहाणें ते वाट। मागें पुढें राहिली ।।तु.गा.०२२८.००४ ।।
यमुने पाबळीं। गडियां बोले वनमाळी। आणा सिदोऱ्या सकळी। काला करूं आजी ।।तु.गा.०२२९.००१ ।।
अवघें एके ठायीं। करूनी स्वाद त्याचा पाहीं। मजपाशीं आहे तेंही। तुम्हांमाजी देतों ।।तु.गा.०२२९.००२ ।।
म्हणती बरवें गोपाळ। म्हणती बरवें गोपाळ। वाहाती सकळ। मोहरी पांवे आनंदें ।।तु.गा.०२२९.००३ ।।
खडकीं सोडियेल्या मोटा। अवघा केला एकवटा। काला करूनियां वांटा। गडियां देतो हरि ।।तु.गा.०२२९.००४ ।।
एकापुढें एक । घाली हात पसरी मुख। गोळा पांवे तया सुख। अधिकचि वाटे ।।तु.गा.०२२९.००५ ।।
म्हणती गोड झालें। म्हणती गोड झालें। आणिक देईं धालें। नाहीं पोट आमुचें ।।तु.गा.०२२९.००६ ।।
हात नेता मुखापासीं। येर आशा तोंड वासी। खाय आपण तयासी। दावी वांकुलिया ।।तु.गा.०२२९.००७ ।।
देऊनियां मिठी। पळे लागतील पाठीं। धरूनि काढितील ओठीं। मुखामाजी खाती ।।तु.गा.०२२९.००८ ।।
म्हणती ठकडा रे कान्हा। लावी घांस भरी राना। दुम करि तो शाहणा। पाठोवाठीं तयाच्या ।।तु.गा.०२२९.००९ ।।
अवघियांचे खाय। कवळ कृष्ण माझी माय। सुरवर म्हणती हाय हाय। सुखा अंतरलों ।।तु.गा.०२२९.०१० ।।

एक एका मारी। ढुंगा पाठी तोंडावरी। गोळा न साहावे हरि। म्हणे पुरें आतां।।तु.गा.०२२९.०११।।
येतो काकुलती। गोळा न साहावे श्रीपती। म्हणे खेळों आतां नीती। सांगों आदरिलें।।तु.गा.०२२९.०१२।।
आनंदाचे फेरी। माजीं घालूनियां हरी। एक घालिती हुंबरी। वाती सिंगें पांवें।।तु.गा.०२२९.०१३।।
वांकडे बोबडे। खुडे मुडे एक लुडे। कृष्णा आवडलहर पुढें। बहु भाविक तहर।।तु.गा.०२२९.०१४।।
करी कवतुक । त्यांचें देखोनियां मुख। हरीसी वाटतें सुख। खदखदां हांसे।।तु.गा.०२२९.०१५।।
एक एकाचें उच्छिष्ट । खातां न मानिती वीट। केलीं लाजतांही धीट। आपुलिया संगें।।तु.गा.०२२९.०१६।।
नाहीं गेली ज्याची भूक । त्याचें पसरवितो मुख। अवघियां देतो सुख। सारिखें हरी।।तु.गा.०२२९.०१७।।
म्हणती भला भला हरी। तुझी संगती रे बरी। आतां चाळविसी तरी। न वजों आणिकां सवें।।तु.गा.०२२९.०१८।।
गाई विसरल्या चार। पक्षी श्वापदांचें भार। झालें यमुनेचें स्थिर। जळ वाहों ठेलें।।तु.गा.०२२९.०१९।।
देव पाहाती सकळ। मुखें घोटूनियां लाळ। धन्य म्हणती गोपाळ। धिग झालों आम्ही।।तु.गा.०२२९.०२०।।
म्हणती कैसें करावें। म्हणती कैसें करावें। यमुनाजळीं व्हावें। मत्स्य शेष घ्यावया।।तु.गा.०२२९.०२१।।
सुरवरांचें थाट। भरलें यमुनेचे तट। तंव अधिकचि होंट। मटमटा वाजती।।तु.गा.०२२९.०२२।।
आनंदें गोपांसहित। क्रीडा करी गोपीनाथ। म्हणे यमुनेंत हात। नका धुऊं कोणी।।तु.गा.०२२९.०२३।।
म्हणती जाणे जीवींचें । लाजे त्यास येथें कैंचें। शेष या कृष्णाचें। लाभे थोरिवे।।तु.गा.०२२९.०२४।।
धन्य दिवस काळ। आजी फावला गोपाळ। म्हणती धालों रे सकळ । तुझियानी हातें।।तु.गा.०२२९.०२५।।
मानवले गडी। एक एकांचे आवडी। दहीं खादलें परवडी। धणीवरी आजी।।तु.गा.०२२९.०२६।।
तुझा संग बरवा। नित्य आम्हांसी द्यावा। ऐसें करूनियां जीवा। नित्य देवा चालावें।।तु.गा.०२२९.०२७।।
तंव म्हणे वनमाळी। घ्यारे काठिया कांबळी। आतां जाऊं खेळीमेळीं। गाई चारावया।।तु.गा.०२२९.०२८।।
आजी झाला आनंदु । न वर्णवे ब्रह्मानंदु। चाले परमानंदु । सवें आम्हांसहित।।तु.गा.०२२९.०२९।।
तुका म्हणे प्रेमें धालीं। कोणा न साहवे चाली। गाई गोपाळांसी केली। आपणयांसरी।।तु.गा.०२२९.०३०।।
या रे करूं गाई। जमा निजलेति काई। बोभाट्यानें आई। घरा गेल्या मारील।।तु.गा.०२३०.००१।।
घाला घाला रे कुकारे। ज्याची तेणेंचि मोहरे। एवढेचि पुरे। केलियानें सावध।।तु.गा.०२३०.००२।।
नेणोनियां खेळा। समय समयाच्या वेळा। दुश्चिताजवळा। मिळाले ते दुश्चित।।तु.गा.०२३०.००३।।

तुका म्हणे शीक । न धरितां लागे भीक । धरा सकळिक । मनेरी धांवा वळतियां ।।तु.गा.०२३०.००४।।
याल तरी या रे लागें। अवघे माझ्या मागें मागें ।।तु.गा.०२३१.००१ ।।
आजी देतों पोटभरी। पुरे म्हणाल तोंवरी ।।तु.गा.०२३१.००२ ।।
हळूहळू चाला। कोणी कोणाशीं न बोला ।।तु.गा.०२३१.००३ ।।
तुका म्हणे सांडा घाटे। तेणें नका भरूं पोटें ।।तु.गा.०२३१.००४ ।।
येईल तें घेईन भागा। नव्हे जोगा दुसरिया ।।तु.गा.०२३२.००१ ।।
आवडी ते तुम्ही जाणा। बहु गुणांसारिखी ।।तु.गा.०२३२.००२ ।।
मज घेती डांगवरी। सवें हरि नसलिया ।।तु.गा.०२३२.००३ ।।
तुका म्हणे राबवा देवा। करीन सेवा सांगितली ।।तु.गा.०२३२.००४ ।।
वरता वेंघोनि घातली उडी। कळंबाबुडीं यमुनेसी ।।तु.गा.०२३३.००१ ।।
हरि बुडाला बोंब घाला। घरचीं त्याला ठावा नाहीं ।।तु.गा.०२३३.००२ ।।
भवनदीचा न कळे पार। काळिया माजी थोर विखार ।।तु.गा.०२३३.००३ ।।
तुका म्हणे काय वाउग्या हाका। हातींचा गमावुनि थिंका ।।तु.गा.०२३३.००४ ।।
वळी गाई धांवे घरा। आमच्या करी येरझारा ।।तु.गा.०२३४.००१ ।।
नांव घेतां तो जवळी। बहु भला कान्हो बळी ।।तु.गा.०२३४.००२ ।।
नेदी पडों उणें पुरें। म्हणे अवघेंचि बरें ।।तु.गा.०२३४.००३ ।।
तुका म्हणे चित्ता। वाटे न व्हावा परता ।।तु.गा.०२३४.००४ ।।
विटंबिले भट। दिला पाठीवरी पाट।।तु.गा.०२३५.००१ ।।
खोटें जाणोनि अंतर। न साहेचि विश्वंभर ।।तु.गा.०२३५.००२ ।।
तेंचि करी दान। जैसें आइके वचन ।।तु.गा.०२३५.००३ ।।
तुका म्हणे देवें। पूतना शोषियली जीवें ।।तु.गा.०२३५.००४ ।।
वोळलीचा दोहूं पान्हां। मज कान्हा सांगितलें ।।तु.गा.०२३६.००१ ।।
घ्या जी हेंगे क्षीर हातीं। निगुतीनें वाढावें ।।तु.गा.०२३६.००२ ।।

केलें सांगितलें काम। नव्हे धर्म सत्तेचा।।तु.गा.०२३६.००३।।
तुका म्हणे नवें जुनें। ऐसें कोणें सोसावें।।तु.गा.०२३६.००४।।
शिंकें लावियेलें दुरी। होतों तिघांचे मी वरी।।तु.गा.०२३७.००१।।
तुम्ही व्हा रे दोहींकडे। मुख पसरूनि गडे।।तु.गा.०२३७.००२।।
वाहाती त्या धारा। घ्यारे दोहींच्या कोंपरा।।तु.गा.०२३७.००३।।
तुका म्हणे हातीं टोका। अधिक उणें नेदी एका।।तु.गा.०२३७.००४।।
हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळ्या गळा मेळवूनि।।तु.गा.०२३८.००१।।
भाविकें त्यांची आवडी मोठी। सांगे गोष्टी जीवींचिया।।तु.गा.०२३८.००२।।
योगियांच्या ध्याना नये। भाकरी त्यांच्या मागोनी खाय।।तु.गा.०२३८.००३।।
तुका म्हणे असे शाहाणियां दुरी। बोबडिया दासां हाका मारी।।तु.गा.०२३८.००४।।
हा गे माझे हातीं। पाहा कवळ सांगती।।तु.गा.०२३९.००१।।
देवें दिला खातों भाग। कराल तरी करा लाग।।तु.गा.०२३९.००२।।
धालें ऐसें पोट। वरी करूनियां बोभाट।।तु.गा.०२३९.००३।।
तुका म्हणे घरीं। मग कैंच्या या परी।।तु.गा.०२३९.००४।।
हुंबरती गाय तयांकडे कान। कैवल्यनिधान देऊनी ठाके ।।तु.गा.०२४०.००१।।
गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी। तेणें वनमाळी सुखावला।।तु.गा.०२४०.००२।।
चोरोनियां खाय दूध दहीं लोणी। भावें चक्रपाणि गोविला तो ।।तु.गा.०२४०.००३।।
निष्काम तो झाला कामासी लंपट। गोपिकांची वाट पाहात बैसे।।तु.गा.०२४०.००४।।
जगदानी इच्छी तुळसी एक दळ। भावाचा सकळ विकिला तो।।तु.गा.०२४०.००५।।
तुका म्हणे हेंचि चैतन्य सांवळें। व्यापूनी निराळें राहिलेंसे।।तु.गा.०२४०.००६।।
हेचि अनुवाद सदा सर्व काळ। करूनि गोपाळकाला सेवूं।।तु.गा.०२४१.००१।।
वोरसलें कामधेनूचें दुभतें। संपूर्ण आईतें गगनभरी।।तु.गा.०२४१.००२।।
संत सनकादिक गोमट्या परवडी। विभाग आवडी इच्छेचिये।।तु.गा.०२४१.००३।।

तुका म्हणे मधीं घालूं नारायण। मग नव्हे सीण कोणा खेळें।।तु.गा.०२४१.००४।।

एके घाईं खेळतां न पडसी डाईं। दुचाळ्यानें ठकसील भाई रे। त्रिगुणांचे फेरी थोर कष्टी होसी। या चौघांची तरी धरीं सोई रे।।तु.गा.०२४२.००१।।

खेळ खेळोनियां निराळाचि राहीं। सांडीं या विषयाची घाईं रे। येणेंचि खेळे बसवंत होसी। ऐसें सत्य जाण माझ्या भाई रे।।तु.गा.०२४२.००२।।

सिंपियाचा पोर एक खेळिया नामा। तेणें विठ्ठल बसवंत केला रे। आपुल्या सवंगडिया सिकवूनि घाईं। तेणें सतत फड जागविला रे। एक घाईं खेळतां न चुकेचि कोठें। तया संत जन मानवले रे।।तु.गा.०२४२.००३।।

ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा। सोपान आनंदें खेळती रे। कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला। आपण भोंवतीं नाचती रे। सकळिकां मिळोनि एकचि घाईं। त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे।।तु.गा.०२४२.००४।।

रामा बसवंत कबिर खेळिया। जोडा बरवा मिळाला रे।  पांचा सवंगडियां एकचि घाईं। तेथें नाद बरवा उमटला रे।  ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनी। तो ही खेळिया निवडिला रे।।तु.गा.०२४२.००५।।

ब्राह्मणाचा पोर खेळिया एका भला। तेणें जन खेळकर केला रे। जनार्दन बसवंत करूनियां तेणें । वैष्णवांचा मेळ मेळविला रे। एकचि घाईं खेळतां खेळतां। आपणचि बसवंत जाला रे।।तु.गा.०२४२.००६।।

आणीक खेळिये होऊनियां गेले। वर्णावया वाचा मज नाहीं रे। तुका म्हणे गडे हो हुशारूनि खेळा। पुढिलांची धरूनियां सोई रे। एकचि घाईं खेळतां जो चुकला। तो पडे संसारडाईं रे।।तु.गा.०२४२.००७।।

खेळ मांडियेला वाळवंटीं घाईं। नाचती वैष्णव भाई रे। क्रोध अभिमान केला पावटणी। एक एका लागतील पायीं रे।।तु.गा.०२४३.००१।।

नाचती आनंदकल्लोळीं। पवित्र गाणें नामावळी रे। कळिकाळावरि घातली कास। एक एकाहुनी बळी रे।।तु.गा.०२४३.००२।।

गोपीचंदनउटी तुळशीच्या माळा। हार मिरवती गळां रे। टाळ मृदंग घाईं पुष्पांचा वरुषाव। अनुपम्य सुखसोहळा रे।।तु.गा.०२४३.००३।।

लुब्धलीं नादीं लागली समाधि। मूढ जन नर नारी लोकां रे। पंडित ज्ञानी योगी महानुभाव। एकचि सिद्धसाधकां रे।।तु.गा.०२४३.००४।।

वर्णाभिमान विसरली याति। एक एकां लोटांगणी जाती रे। निर्मळ चित्तें झाली नवनीतें। पाषाणा पाझर सुटती रे।।तु.गा.०२४३.००५।।

होतो जयजयकार गर्जत अंबर। मातले वैष्णव वीर रे। तुका म्हणे सोपी केली पायवाट। तरावया भवसागर रे।।तु.गा.०२४३.००६।।

दोन्ही टिपरीं एकचि नाद। सगुण निर्गुण नाहीं भेद रे। कुसरी अंगें मोडितील परी। मेळविती एकएका छंदें रे।।तु.गा.०२४४.००१।।

कांहींच न वजे वायां रे खेळिया। एकचि बसवंत अवघियां रे। सम विषम तेथें होऊंच नेदी। जाणऊनि आगळिया रे।।तु.गा.०२४४.००२।।

संत महंत सिद्ध खेळतील घाई। तेच सांभाळी माझ्या भाई रे। हात राखोन हाणिती टिपऱ्या टिपरी। मिळोनि जाय त्याची सोई रे।।तु.गा.०२४४.००३।।

वितालाचें अवघें जाईल वायां। काय ते शृंगारूनि काया रे। निवडूनि बाहेर काढिती निराळा। जो न मिळे संतांचियां घाई रे।।तु.गा.०२४४.००४।।

प्रकाराचें काज नाहीं सोडीं लाज। नि:शंक होऊनियां खेळें रे। नेणतीं नेणतींच एकें पावलीं मान। विठ्ठल नामाचिया बळें रे।।तु.गा.०२४४.००५।।
रोमांच गुडिया डोलविती अंगें। भावबळें खेळविती सोंगें रे। तुका म्हणे कंठ सद्गदित दाटे। या विठोबाच्या अंगसंगें रे।।तु.गा.०२४४.००६।।
बाराही सोळा गडियांचा मेळ। सतरावा बसवंत खेळिया रे। जतिस्पद राखों जाणें टिपरिया घाईं। अनुहात वाय मांदळा रे।।तु.गा.०२४५.००१।।
नाचत पंढरिये जाऊं रे खेळिया। विठ्ठल रखुमाई पाहूं रे।।तु.गा.०२४५.००२।।
सा चहूं वेगळा अठरा निराळा। गाऊं वाजवूं एक चाळा रे। विसरती पक्षी चारा नेघे पाणी। तारुण्य देहभाव बाळा रे।।तु.गा.०२४५.००३।।
आनंद तेथींचा मुकियासी वाचा। बहिरे ऐकती कानीं रे। आंधळ्यांसी डोळे पांगुळांसी पाय। तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे।।तु.गा.०२४५.००४।।
भीमातीरीं एक वसविलें नगर। त्याचें नांव पंढरपूर रे। तेथील मोकासी चार भुजा त्यासी। बाइला सोळा हजार रे।।तु.गा.०२४६.००१।।
नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया। सुख देईल विसांवा रे। पुढें गेले ते निघाई झाले। वाणितील त्याची सीमा रे।।तु.गा.०२४६.००२।।
बळियां आगळा पाळी लोकपाळां। रिघ नाहीं कळिकाळा रे। पुंडलिक पाटील केली कुळवाडी। तो झाला भवदु:खा वेगळा रे।।तु.गा.०२४६.००३।।
संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जे जया पाहिजे तें आहे रे। भुक्ति मुक्ति फुकाच साठीं। कोणी तयाकडे न पाहे रे।।तु.गा.०२४६.००४।।
दोन्हीच हाट भरले घनदाट। अपार मिळाले वारकरी रे। न वजों म्हणती आम्ही वैकुंठा। जिहीं देखिली पंढरी रे।।तु.गा.०२४६.००५।।
बहुत दिस होती मज आस। आजी घडलें सायासी रे। तुका म्हणे होय तुमचेनी पुण्यें। भेटी तया पायांसी रे।।तु.गा.०२४६.००६।।
या रे गडे हो धरूं घाई जाणतांही नेणतां।  नाम गाऊं टाळी वाहूं आपुलिया हिता।।तु.गा.०२४७.००१।।
फावलें तें घ्यारे आतां प्रेमदाता पांडुरंग।  आजी दिवस सोनियाचा वोडवला रंग।।तु.गा.०२४७.००२।।
हिंडती रानोरान भुजंग ते कांट्यावन।  सुख तयांहून आम्हां गातां नाचतां रे।।तु.गा.०२४७.००३।।
तुका म्हणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा।  आजी येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं।।तु.गा.०२४७.००४।।
सारा विटीदांडू। आणीक कांहीं खेळ मांडूं।।तु.गा.०२४८.००१।।
बहु अंगा आले डाव। स्थिर नाहीं कोठें पाव।।तु.गा.०२४८.००२।।
कोली हाणे टोला। झेली तेणें तो गोविला।।तु.गा.०२४८.००३।।
एकमेकां हाका मारी। शेल जाळी एक धरी।।तु.गा.०२४८.००४।।
राजी आलें नांव। फेरा न चुकेचि धांव।।तु.गा.०२४८.००५।।
पुढें एक पाठी। एक एका दोघां आटी।।तु.गा.०२४८.००६।।
एका सोस पोटीं। एक धांवे हात पिटी।।तु.गा.०२४८.००७।।

तुका म्हणे आतां। खेळ मोडावा परता।।तु.गा.०२४८.००८।।
डाईं घालूनियां पोरें। त्यांचीं गुरें चुकविलीं।।तु.गा.०२४९.००१।।
खेळ खेळतां फोडिल्या डोया। आपण होय निराळा।।तु.गा.०२४९.००२।।
मारिती माया घेती जीव। नाहीं कींव अन्याया।।तु.गा.०२४९.००३।।
तुका कान्होबा मागें। तया अंगें कळों आलें।।तु.गा.०२४९.००४।।
पाहा रे तमासा तुमचा नव्हे येथें लाग। देईन तो भाग आलियाचा बाहेरी।।तु.गा.०२५०.००१।।
जागा रे गोपाळानों ठायीं ठायीं जागा। चाहुलीनें भागा दूर मजपासूनी।।तु.गा.०२५०.००२।।
न रिघतां ठाव आम्हां ठावा पाळतियां। भयाभीत वायां तेथें काय चांचपाल।।तु.गा.०२५०.००३।।
तुका म्हणे हातां चढे जीवाचिये साटीं। मिटक्या देतां गोड मग लागतें शेवटीं।।तु.गा.०२५०.००४।।
मागें पुढें पाहें सांभाळूनि दोनी ठाय। चुकावूनी जाय गडी राखे गडियांसी।।तु.गा.०२५१.००१।।
मुरडे दंडा दोहीं तोंडा गडियां सावध करी। भेडतियासंगें तया हाल तुजवरी।।तु.गा.०२५१.००२।।
गडियां गडी वांटुनि देईं ज्याचा सोडी तेचि ठायीं। आगळ्या बळें करील काय तुज देणें लागे डाय।।तु.गा.०२५१.००३।।
नवां घरीं पाऊला करीं सांपडे तो तेथें धरीं। जिंकोनी डाव करीं ठाव सत्ता आणिकांवरी।।तु.गा.०२५१.००४।।
सांपडोनि डाईं बहु काळ गुंतलासी। बळिया गडी फळी फोडी न धरितां त्यांसी।।तु.गा.०२५१.००५।।
चुकांडी जो खाय मिळोनि अंगीं जाय। गुंतलासी काय तुका म्हणे अझूनि।।तु.गा.०२५१.००६।।
बळें डाईं न पडे हरी। बुद्धि करी शाहाणा तो।।तु.गा.०२५२.००१।।
मोकळें देवा खेळों द्यावें। सम भावें सांपडावया।।तु.गा.०२५२.००२।।
येतो जातो वेळोवेळां। न कळे कळा सांपडती।।तु.गा.०२५२.००३।।
तुका म्हणे धरा ठायींच्या ठायीं। मिठी जीवें पायीं घालूनियां।।तु.गा.०२५२.००४।।
यमुनेतटीं मांडियेला खेळ। म्हणे गोपाळ गडियांसी।।तु.गा.०२५३.००१।।
हाल मांडा हाल मांडा। वाउगी सांडा मोकळी।।तु.गा.०२५३.००२।।
नांवें ठेवूनि वांटा गडी। न वजे रडी मग कोणी।।तु.गा.०२५३.००३।।
तुका म्हणे कान्हो तिळया–तांदळ्या। जिंके तो करी आपुला खेळ्या।।तु.गा.०२५३.००४।।

तुशीं कोण घाली हुंबरी। साही पांगल्या अठरा चारी। सहस्त्र मुखावरी हरी। शेष शिणविलें।।तु.गा.०२५४.००१ ।।
चेंडुवासवें घातली उडी। नाथिला काळिया देऊनि बुडी।।तु.गा.०२५४.००२ ।।
अशुद्ध पीतां करुणा नाहीं। तुवां आपुली माउशीही मारियेलीं।।तु.गा.०२५४.००३ ।।
रावणाचें घर बुडविलें सारे। त्याचीं रांडापोरें मारियेलीं।।तु.गा.०२५४.००४ ।।
जाण तूं ठावा आहेसी आम्हां। तुवां आपुला मामा मारियेला।।तु.गा.०२५४.००५ ।।
याशीं खेळतां नाश थोरू। तुकया स्वामी सारंगधरू ।।तु.गा.०२५४.००६ ।।
मशीं पोरा घे रे बार। तुझे बुजीन खालील द्वार।।तु.गा.०२५५.००१ ।।
पोरा हमामा रे हमामा रे।।तु.गा.०२५५.००२ ।।
मशीं हमामा तूं घालीं। पोरा वरी सांभाळीं खालीं।।तु.गा.०२५५.००३ ।।
तरीच मशीं बोल। पोरा जिव्हाळ्याची ओल।।तु.गा.०२५५.००४ ।।
मशीं घेतां भाष। जीवा मीतूंपणा नास।।तु.गा.०२५५.००५ ।।
मजसवें खरा। पण जाऊं नेदीं घरा।।तु.गा.०२५५.००६ ।।
आमुचिये रंगीं। दुजें तगेना ये संगीं।।तु.गा.०२५५.००७ ।।
तुकयासवें भास। हरी जीवा करी नास।।तु.गा.०२५५.००८ ।।
हमामा रे पोरा हमामा रे हमामा घालितां ठकलीं पोरें। करी येरझार चौऱ्याशींची।।तु.गा.०२५६.००१ ।।
पहिले पहारा रंगासी आलें। सोहं सोहंसे बार घेतलें। देखोनि गडी तें विसरलें। डाईं पडिलें आपणचि।।तु.गा.०२५६.००२ ।।
दुसऱ्या पहारा महाआनंदें। हमामा घाली छंदछंदें। दिसे वाढे तों गोड वाटे। परि पुढें नेणें पोर काय होतें तें।।तु.गा.०२५६.००३ ।।
तिसऱ्या पहारा घेतला बार। अहंपणें पाय न राहे स्थिर। सोसे सोस करितां डाईं पडसी। सत्य जाणें हा निर्धार।।तु.गा.०२५६.००४ ।।
चौथ्या पहारा हमामा घालीसी। कांपविसी हातपाय। सुऱ्यापाटिलाचा पोर यम्या। त्याचे पडसील डाईं रे।।तु.गा.०२५६.००५ ।।
हमामा घालितां भ्याला तुका। त्यानें सांडिली गड्याची सोई। यादवाचा मूल एक विठोबा। त्यासवें चारितो गाई रे।।तु.गा.०२५६.००६ ।।
फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे। लाज सांडोनि एक एकी पाहे।।तु.गा.०२५७.००१ ।।
फुगडी गे अवघें मोडी गे। तरीच गोडी गे संसार तोडी गे।।तु.गा.०२५७.००२ ।।
मागें जें शिकलीस होती पोटीं। तेचि विचारूनि आतां उच्चारी ओठीं।।तु.गा.०२५७.००३ ।।

त्रिगुणांची वेणी तुझे उडते पाठीं। सावरूनि धरी घाली मूळबंदीं गांठी ।।तु.गा.०२५७.००४ ।।
आगळें पाउल जिंकी एकाएक । पावसी मान हें मानवती तिन्ही लोक ।।तु.गा.०२५७.००५ ।।
तुका म्हणे तुजमजमध्यें एक भाव। सम तुकें बार घेऊं पावों उंच ठाव ।।तु.गा.०२५७.००६ ।।
फुगडी फू सवती माझे तूं। हागुनी भरलें धू तुझ्या ढुंगा तोंडावरी थू ।।तु.गा.०२५८.००१ ।।
फुगडी घेतां आली हरी। ऊठ जा वो जगनोवरी ।।तु.गा.०२५८.००२ ।।
हात पाय बेंबळ जाती। ढुंगण घोळितां लागे माती ।।तु.गा.०२५८.००३ ।।
सात पांच आणिल्या हरी। वांचूनी काय तगसी पोरी ।।तु.गा.०२५८.००४ ।।
सरला दम पांगले पाय। अझुनि तरी घोळिसी काय ।।तु.गा.०२५८.००५ ।।
तुका म्हणे अझुन तरी। सांगितलें तें गधडी करीं ।।तु.गा.०२५८.००६ ।।
लये लये लखोटा। मूळबंदी कासोटा। भावा केलें साहे । आतां माझें पाहें ।।तु.गा.०२५९.००१ ।।
हातोहातीं गुंतली। जीवपणा मुकली। धीर माझा निका। सांडीं बोला फिका ।।तु.गा.०२५९.००२ ।।
अंगीकारी हरि। नको पडों फेरी। लाज धरीं भांडे। जगझोडी रांडे ।।तु.गा.०२५९.००३ ।।
बैस भावापाठीं। ऐेक माझ्या गोष्टी। केला सांडीं गोहो। धरीं येथें मोहो ।।तु.गा.०२५९.००४ ।।
पाठिमोरा डोल। आवरीं ते बोल। पांगलीस बाळा। पुढें अवकळा ।।तु.गा.०२५९.००५ ।।
आतां उभी ठायीं। उभाउभीं पाहीं। नको होऊं डुकरी। पुढें गाढव कुतरी ।।तु.गा.०२५९.००६ ।।
नाम केलें खरें। आपुलें म्यां बरें। तुका म्हणे येरी। पांगविल्या पोरी ।।तु.गा.०२५९.००७ ।।
शुद्धीचें सारोनि भरियेली पाळी। भरडोनि वोंगळी नाश केला ।।तु.गा.०२६०.००१ ।।
आडसोनि शुद्ध करीं वो साजणी। सिद्ध कां पापिणी नासियेलें ।।तु.गा.०२६०.००२ ।।
सुपीं तोंचि पाहें धड उगटिलें। नव्हता नासिलें जग झोडी ।।तु.गा.०२६०.००३ ।।
सुपीं तोंचि आहे तुज तें आधीन। दळिल्या जेवण जैसें तैसें ।।तु.गा.०२६०.००४ ।।
सुपीं तोंचि संग घेई धडफुडी। एकसा गधडी नास केला ।।तु.गा.०२६०.००५ ।।
दळितां आदळे तुज कां न कळे। काय गेले डोळे कान तुझे ।।तु.गा.०२६०.००६ ।।
सुपीं तोंचि वोज न करितां सायास । पडसी सांदीस तुका म्हणे ।।तु.गा.०२६०.००७ ।।

शुद्ध दळणाचें सुख सांगों काईं। मानवत असे सई बाई।।तु.गा.०२६१.००१।।
शुद्ध तें वळण लवकरी पावे। डोलवितां निवें अष्टांग तें ।।तु.गा.०२६१.००२।।
शुद्ध हें जेवितां तन निवें मन। अल्प त्या इंधन बुडा लागे।।तु.गा.०२६१.००३।।
शुद्ध त्याचा पाक शुद्धचित्त चांगला। अविट तयाला नाश नाहीं।।तु.गा.०२६१.००४।।
तुका म्हणे शुद्ध आवडे सकळां। भ्रतार वेगळा न करी जीवें।।तु.गा.०२६१.००५।।
सावडीं कांडण ओंवी नारायण। निवडे आपण भूस सार।।तु.गा.०२६२.००१।।
मुसळ आधारीं आवरूनि धरीं। सांवरोनी थोरी घाव घालीं।।तु.गा.०२६२.००२।।
वाजती कांकणें अनुहात गजरें। छंद माहियेरे गाऊं गीतीं।।तु.गा.०२६२.००३।।
कांडितां कांडण नव्हे भाग शीण। तुजमजपण निवडे तो।।तु.गा.०२६२.००४।।
तुका म्हणे रूप उमटे आरिसा। पाक त्या सरिसा सिद्ध झाला।।तु.गा.०२६२.००५।।
सिद्ध करूनियां ठेविलें कांडण। मज सांगातीण शुद्ध बुद्धि गे।।तु.गा.०२६३.००१।।
आठव हा धरीं मज जागें करी। मागिले पहारीं सेवटींचा गे।।तु.गा.०२६३.००२।।
सम तुकें घाव घालीं वो साजणी। मी तुज मिळणी जिवें मिळें।।तु.गा.०२६३.००३।।
एक कशी पाखडी दुसरी निवडी। निःशेष ते सडी ओज करी।।तु.गा.०२६३.००४।।
सरलें कांडण पाकसिद्धि करी। मेळवण क्षिरीसाकरेचें।।तु.गा.०२६३.००५।।
उद्धव अक्रूर बंधु दोघेजण। बाप नारायण जेवणार।।तु.गा.०२६३.००६।।
तुका म्हणे मज माहेरीं आवडी। म्हणोनि तांतडी मूळ केलें ।।तु.गा.०२६३.००७।।
जननिया बाळका रे घातलें पाळणा। पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा। अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा। वैखरी धरूनि हातीं भाव दावी खेळणा।।तु.गा.०२६४.००१।।
निजीं रें निजीं आतां म्हणोनि परिये दे माता। खेळतां कष्टलासी बाळा तूं रे नेणतां।।तु.गा.०२६४.००२।।
खेळतां बाहेरी रे मुला लोकांच्या सवें। बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें। खेळतां दुश्चिता रे देखोनि तें न्यावें। म्हणोनि सांगे तुज शीघ्र वचन पाळावें।।तु.गा.०२६४.००३।।

संचित मागें शुद्ध तुज होतें सांगाती। तेणें तुज वांचविलें वेरझारिया हातीं। आणीक नेलीं मागें काय जाणों तीं किती। आलासी येथवरी थोर पुण्यें बहूतीं ।।तु.गा.०२६४.००४ ।।

खेळतां शुक देवा खोरे लागला पाठीं। लपाला वरुषे बारा तिये मातेचे पोटीं। रिघतां बाहेरी रे पळे घेऊनि कासोटी। तेचि परी जाली स्वामी भेणें रिघें कपाटीं ।।तु.गा.०२६४.००५ ।।

खेळतां चक्रवर्ती जनका लागला धाक । पडिलासे अग्निमाजी पाव जळत एक । भरलासे कांप अंगीं सुख नाठवे दुःख। आप पर तें ही नाहीं देहभाव सकळीक ।।तु.गा.०२६४.००६ ।।

सिबीया चक्रवर्ती कव पडिली अवचिती। धीट तो नभे तया मांस कापिलें हातीं। टाकिलें तयावरी खुणें गोविला अंतीं। पावला मायबाप हिरोन घेतला हातीं ।।तु.गा.०२६४.००७ ।।

बांधलें अजामेळा वेश्यागणिका कैसीं। मारिली हाक धाकें कळलें मायबापासी। घातली धांव नेटें वेगीं पावला त्यासी। हिरोनि नेलीं दोघें आपणयां तीं पासीं ।।तु.गा.०२६४.००८ ।।

धरूनि आठवूं रे बाळा राहे निश्चळ। खेळतां दुश्चिता रे नको जाऊं बरळ। टोंकताहे तुजलागीं दिवस लेखूनि काळ। मग नेदी आठवूं रे नेत्रीं घालीं पडळ ।।तु.गा.०२६४.००९ ।।

ऐसी तीं कृपावंतें बाळा मोहिलें चित्त। सुस्वरें कंठ गाये मधुर आणि संगीत। तेणें तें चित्त राहे होऊनियां निवांत। पावती तुका म्हणे नाहीं विश्वास ते घात ।।तु.गा.०२६४.०१० ।।

अभय उत्तरीं संतीं केलें दान। झालें समाधान चित्त तेणें ।।तु.गा.०२६५.००१ ।।

आतां प्रेमरसें न घडे खंडण। द्यावें कृपादान नारायणा ।।तु.गा.०२६५.००२ ।।

आलें जें उचित देहविभागासीं। तेणें पायांपासीं उभीं असों ।।तु.गा.०२६५.००३ ।।

तुका म्हणे करी पूजन वैखरी। बोबड्या उत्तरीं गातों गीत ।।तु.गा.०२६५.००४ ।।

असो मंत्रहीन क्रिया। नका चर्या विचारूं ।।तु.गा.०२६६.००१ ।।

सेवेमधीं जमा धरा। कृपा करा शेवटीं ।।तु.गा.०२६६.००२ ।।

विचारूनी ठाया ठाव। येथें भाव राहिला ।।तु.गा.०२६६.००३ ।।

आतां तुकयापाशीं हेवा। नाहीं देवा तांतडी ।।तु.गा.०२६६.००४ ।।

आशीर्वाद तया जाती। आवडी चित्तीं देवाची ।।तु.गा.०२६७.००१ ।।

कल्याण तीं असो क्षेम। वाढो प्रेम आगळें।।तु.गा.०२६७.००२।।
भक्तिभाग्य गांठी धन। त्या नमन जीवासी।।तु.गा.०२६७.००३।।
तुका म्हणे हरिचे दास। तेथें आस सकळ।।तु.गा.०२६७.००४।।
जीवेंसाठीं यत्नभाव। त्याची नाव बळकट।।तु.गा.०२६८.००१।।
पैल तीरा जातां कांहीं। संदेह नाहीं भवनदी।।तु.गा.०२६८.००२।।
विश्वासाची धन्य जाती। तेथें वस्ती देवाची।।तु.गा.०२६८.००३।।
तुका म्हणे भोळियांचा। देव साचा अंकित।।तु.गा.०२६८.००४।।
तया साठीं वेचूं वाणी। आइकों कानीं वार्ता त्या।।तु.गा.०२६९.००१।।
क्षेम माझे हरिजन। समाधान पुसतां त्यां।।तु.गा.०२६९.००२।।
परत्रींचे जे सांगाती। त्यांची याती न विचारीं।।तु.गा.०२६९.००३।।
तुका म्हणे धैर्यवंतें। निर्मळ चित्तें सखीं तीं।।तु.गा.०२६९.००४।।
आजी आनंदु रे एकी परमानंदु रे। जया श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे।।तु.गा.०२७०.००१।।
विठोबाचीं वेडीं आम्हां आनंदु सदा। गाऊं नाचूं वाहूं टाळी रंजवूं गोविंदा।।तु.गा.०२७०.००२।।
सदा सण सांत आम्हां नित्य दिवाळी। आनंदें निर्भय आमचा कैवारी बळी।।तु.गा.०२७०.००३।।
तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक । संत सनकादिक हे तों आमचें कवतुक ।।तु.गा.०२७०.००४।।
आजी दिवस झाला। धन्य सोनियाचा भला।।तु.गा.०२७१.००१।।
झालें संतांचे पंगती। बरवें भोजन निगुती।।तु.गा.०२७१.००२।।
रामकृष्णनामें। बरवीं मोहियेलीं प्रेमें।।तु.गा.०२७१.००३।।
तुका म्हणे आला। चवी रसाळ हा काला।।तु.गा.०२७१.००४।।
आली लळिताची वेळ। असा सावध सकळ।।तु.गा.०२७२.००१।।
लाहो करा वेगीं स्मरा। टाळी वाहोनि विश्वंभरा।।तु.गा.०२७२.००२।।
जालिया अवसान। न संपडती चरण।।तु.गा.०२७२.००३।।
तुकयाबंधु म्हणे थोडे। अवधि उरली आहे पुढें।।तु.गा.०२७२.००४।।

उभारिला हात। जगीं जाणविली मात ।।तु.गा.०२७३.००१ ।।
देव बैसले सिंहासनीं। आल्या याचकासी पुरे धनी ।।तु.गा.०२७३.००२ ।।
एकाच्या कैवाडें। उगवे बहुतांचें कोडें ।।तु.गा.०२७३.००३ ।।
दोहीं ठायीं तुका। नाहीं पडों देत चुका ।।तु.गा.०२७३.००४ ।।
गळित झाली काया। हेंचि ललित पंढरीराया ।।तु.गा.०२७४.००१ ।।
आलें अवसानापासीं। रूप राहिलें मानसीं ।।तु.गा.०२७४.००२ ।।
वाहिला कळस। तेथें स्थिरावला रस ।।तु.गा.०२७४.००३ ।।
तुका म्हणे गोड झालें। नारायणीं पोट धालें ।।तु.गा.०२७४.००४ ।।
तुम्ही ये तरी सांगा कांहीं। आम्हांविशीं रखुमाबाई ।।तु.गा.०२७५.००१ ।।
कांहीं उरलें तें ठायीं। वेगीं पाठवूनि देईं ।।तु.गा.०२७५.००२ ।।
टोंकत बैसलों देखा। इच्छितसें ग्रासा एका ।।तु.गा.०२७५.००३ ।।
प्रेम देऊनि बहुडा झाला। तुका म्हणे विठ्ठल बोला ।।तु.गा.०२७५.००४ ।।
न कळे हो माव मुनि मागें एकी अंतुरीं। साठी संवत्सरा जन्म तया उदरीं ।।तु.गा.०२७६.००१ ।।
कैसा आकळ वो माय चपळ वो। त्रिभुवनव्यापक हरि सकळ वो ।।तु.गा.०२७६.००२ ।।
हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा। गरुडा विटंबना रूपा सत्यभामेचा ।।तु.गा.०२७६.००३ ।।
द्रौपदीचा भेद पुरविला समयीं। ऋषी फळ वनीं देंठीं लावितां ठायीं ।।तु.गा.०२७६.००४ ।।
अर्जुनाच्या रथीं कपिध्वज स्तंभीं ठेविला। दोहीं पैज तेथें गर्व हरी हा दादुला ।।तु.गा.०२७६.००५ ।।
भावभक्ति सत्वगुण झाला दुर्जना। तुका म्हणे सकळां छंदें खेळे आपणा ।।तु.गा.०२७६.००६ ।।
रत्नजडित सिंहासन। वरी बैसले आपण ।।तु.गा.०२७७.००१ ।।
कुंचे ढळती दोहीं बाहीं। जवळी राही रखुमाई ।।तु.गा.०२७७.००२ ।।
नाना उपचारीं। सिद्धि वोगळती कामारी ।।तु.गा.०२७७.००३ ।।
हातीं घेऊनि पादुका। उभा बंदिजन तुका ।।तु.गा.०२७७.००४ ।।
हिरा शोभला कोंदणीं। जडित माणिकांची खाणी ।।तु.गा.०२७८.००१ ।।

तैसा दिसे नारायण। मुख सुखाचें मंडण।।तु.गा.०२७८.००२।।

कोटि चंद्रलीळा। पूर्णिमेच्या पूर्णकळा।।तु.गा.०२७८.००३।।

तुका म्हणे दृष्टि धाये। परतोनि माघारी ते न ये।।तु.गा.०२७८.००४।।

अवघ्या ज्येष्ठा देवी। कोण पूजनाचा ठाव। धरितांचि भाव। कोठें नाहींसें झालें।।तु.गा.०२७९.००१।।

दिसे सारिखें सारिखें। परि तें कारणीं पारिखें। तळीं गेलें देखें। वरी टोले न साहाती।।तु.गा.०२७९.००२।।

पट एका शिरीं। यथाविधिनें त्या येरी। बसकोळ्या घागरी। डेरे रांझण गाडगीं।।तु.गा.०२७९.००३।।

तुका म्हणे माना। येथें कोणी रुसावें ना। आपुलाल्या स्थानां। जेथें त्याचि शोभल्या।।तु.गा.०२७९.००४।।

खेचर खडतर। काळ कांपती असुर। नांदे भीमातीर। पंढरपुरपाटणीं।।तु.गा.०२८०.००१।।

आतां करी कां रे हाकारा। सहस्त्रनामें एकसरा। दवडिते खेचरा। अंगसंगें धरूनी।।तु.गा.०२८०.००२।।

सीते झाली झडपणी। राहणें वासुगीच्या बनीं। पावलीं जननी। झोंटि मोकळीयां केशीं।।तु.गा.०२८०.००३।।

लाविलें कावरें। प्रल्हादासी म्हैसासुरें। आली येकसरे। दांत खात रंगासी।।तु.गा.०२८०.००४।।

वसुदेवाचीं बाळे। सात खादलीं ज्या काळें। आली भोगवेळे। तया कारणें तेथें।।तु.गा.०२८०.००५।।

पांडवें बापुडीं। वांज केलीं फिरती वेडीं। धांवोनियां काढी। अंगसंगें त्राहाटविलीं।।तु.गा.०२८०.००६।।

नामाचें चिंतन। तेथें धांवते आपण। न विचारितां हीण। भाव देखे जयाचा।।तु.गा.०२८०.००७।।

कुळींची कुळदेवता। तुका म्हणे आम्हां माता। काय भय भूतां। काळ यमदूतांचे।।तु.गा.०२८०.००८।।

चौक भरियेला आसनीं। पाचारिली कुळस्वामिनी। वैकुंठवासिनी। ये धांवोनि झडकरी।।तु.गा.०२८१.००१।।

रंगा येईं वो विठाई। सांवळिये डोळसे। तुझें श्रीमुख साजिरें। तें मी केधवां देखेन।।तु.गा.०२८१.००२।।

रजतम धुपारती। पंचप्राणांची आरती। अवघी सारोनि आइती। ये धांवती झडकरी।।तु.गा.०२८१.००३।।

मन मारोनि मेंढा मुठीं। आशा मनसा तृष्णा सुटी। भक्तिभाव नैवेद्य ताटीं। भरोनि केला हाकारा।।तु.गा.०२८१.००४।।

डाका अनुहात गजरें। येऊनि अंगासी संचरे। आपुला घेऊनि पुरस्कार। आरोग्य करी तुकयासी।।तु.गा.०२८१.००५।।

देवी देव झाले भोग सरले यावरी। सांगाया दुसरी ऐसी नाहीं उरली।।तु.गा.०२८२.००१।।

हरिनाम देवनाम तुम्ही गाऊनियां जागा। पेंठवणी मागा नका ठेवूं लिगाड।।तु.गा.०२८२.००२।।

शेवटीं सुताळी बरवी वाजवावी डांक । ताळा घाली एक सरलियाचे शेवटीं।।तु.गा.०२८२.००३।।

गुंडाळा देव्हारा मान नेती मानकरी। तुका म्हणे बरीं आजी कोडीं उगविलीं।।तु.गा.०२८२.००४।।
पुढें येते देवी। तिची जती चालों द्यावी। मागील झाडावी। झाडा मान आसडी।।तु.गा.०२८३.००१।।
एकवीरा आली अंगा। आतां निवारील रोगा। माझ्या भक्तापाशीं सांगा। पूजा भावें करावी।।तु.गा.०२८३.००२।।
मेंढा मारावा लोहाळ। पूजा पावली सकळ। तुम्हीं केलें बळ। मग मी ठायीं न पडें।।तु.गा.०२८३.००३।।
तुका म्हणे मुळीं। लागली ते आली कुळीं। वंदूनि सकळीं। जीवें भावें ओवाळा।।तु.गा.०२८३.००४।।
माझा देव्हारा साचा। नाहीं आणीक कोणाचा। त्रिभुवनीं याचा। ठसा नलगे पुसावें।।तु.गा.०२८४.००१।।
या रे लोटांगणीं। कांहीं करा विनवणी। करील झाडणी। भूत काढील संसार।।तु.गा.०२८४.००२।।
पडिले विषयांचे गोंधळी। ते त्रिगुण आकळी। हरिनाम आरोळी। कानीं पडतां ते उठी।।तु.गा.०२८४.००३।।
घेतला अहंकारें। काम क्रोध या मत्सरें। पळती प्रेमभरें। अवघी ठाव सांडूनी ।।तु.गा.०२८४.००४।।
घेतलासे पुरा। माया ममता आसरा। अवघ्या एक सरा। पळती रंग देखोनी।।तु.गा.०२८४.००५।।
तुका म्हणे द्यावा भाव। फिटेल मनींचा संदेह। आणीक नलगे ठाव। कांहीं कोठें हिंडावें।।तु.गा.०२८४.००६।।
विनंति घातली अवधारीं। मज देईं वो अभय करीं। पीडिलों खेचरीं। आणिका वारी नांवांची।।तु.गा.०२८५.००१।।
रंगा येईं वो एकला। रंग वोढवला। हरिनामें उठिला। गजर केला हाकारा।।तु.गा.०२८५.००२।।
देवांचें दैवतें। तुज नमिलें आदिनाथे। ये वो कृपावंतें। भोगा माझ्या धांवत।।तु.गा.०२८५.००३।।
न लवीं आतां वेळ। आइती सारिली सकळ। तुका म्हणे कुळ। आमुचिये दैवते।।तु.गा.०२८५.००४।।
साच माझा देव्हारा। भाक ठेवा भाव खरा। त्रिगुणांचा फुलवरा। आणा विनंती सांगतों।।तु.गा.०२८६.००१।।
माझें दैवत हें रंगीं। नाचे वैष्णवांच्या संगीं। भरलें मग अंगीं। निवाड करीं दोहींचा।।तु.गा.०२८६.००२।।
तुझें आहे तुजपाशीं। परि तूं जागा चुकलासी। चिवडूनियां नासी। तुझ्या घरिच्यांनीं केली।।तु.गा.०२८६.००३।।
आतां न पडे ठावें। वांचूनियां माझ्या देवें। अंधकार व्हावें । नासु ठाव शोधावा।।तु.गा.०२८६.००४।।
आंधळ्यासी डोळे। देते पांगुळासी पाय। वांजा पुत्र होय। नवस पुरविते विठाई।।तु.गा.०२८६.००५।।
उगविलीं कोडीं। मागें कित्येकांची बापुडीं। तुका म्हणे घडी। न लगे नवस द्या आधीं।।तु.गा.०२८६.००६।।
ऐक बाई तुज वो कांहीं सांगतें शकुन। निजलिया भुर होसी जागें म्हणऊन।।तु.गा.०२८७.००१।।
मान्य माझें केलें सांगतें एका बोलें। न येतां हें भलें कळों कोणा लोकांसी।।तु.गा.०२८७.००२।।

सांगतें गुण जीवींची खूण ऐक माझी मात। बैस एका भावें माझें हातीं दे वो हात ।।तु.गा.०२८७.००३ ।।
बरवा घराचार तुज सांपडला ठाव। फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ।।तु.गा.०२८७.००४ ।।
आहे तुझे हातीं एका नवसाचें फळ। भावा करी साह्य चहूं अठरांच्या बळें ।।तु.गा.०२८७.००५ ।।
करी लागपाठ चित्त वित्त नको पाहों। अखई तो चुडा तुज भोगईल नाहो ।।तु.गा.०२८७.००६ ।।
कुळींची हे मुळीं तुझे लागलीसे देवी। पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ।।तु.गा.०२८७.००७ ।।
तुका म्हणे नांद सुखें धरीं आठवण। माझे येती कोणी त्यांचा राखे बहु मान ।।तु.गा.०२८७.००८ ।।
राजस सुंदर बाळा पाहों आलिया सकळा वो। बिंबीं बिंबोनी ठेली माझी परब्रह्म वेल्हाळा वो। कोटि रविशशि जिच्या अंगींचिया किळा हो ।।तु.गा.०२८८.००१ ।।
राजस विठाबाई माझें ध्यान तुझें पायीं वो। त्यजूनियां चौघासी लावी आपुलिये सोई वो ।।तु.गा.०२८८.००२ ।।
सुकुमार साजिरी कैसीं पाउलें गोजिरीं वो। कंठीं तुळसीमाळा उभी भीवरेच्या तिरीं वो। दंत हिरया ज्योति शंखचक्र मिरवे करीं वो ।।तु.गा.०२८८.००३ ।।
निर्गुण निराकार वेदां न कळेचि आकार वो। शेषादिक श्रमले श्रुती न कळे तुझा पार वो। उभारोनि बाहे भक्तां देत अभयकर वो ।।तु.गा.०२८८.००४ ।।
येऊनि पंढरपुरा अवतरली सारंगधरा वो। देखोनि भक्ति भाव वोरसली अमृतधारा वो। देऊनि प्रेमपान्हा तुकयास्वामीनें किंकरा वो ।।तु.गा.०२८८.००५ ।।
सुदिन सुवेळ तुझा मांडिला गोंधळ वो। पंच प्राण दिवटे दोनी नेत्रांचे हिल्लाळ वो ।।तु.गा.०२८९.००१ ।।
पंढरपुरनिवासे तुझे रंगीं नाचत असें वो। नवस पुरवीं माझा मनींची जाणोनियां इच्छा वो ।।तु.गा.०२८९.००२ ।।
मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवनामाझारी वो। चौक साधियेला नाभिकळस ठेविला वरी वो ।।तु.गा.०२८९.००३ ।।
बैसली देवता पुढें वैष्णवाचें गाणें वो। उद्गारें गर्जती कंठीं तुळसीचीं भूषणें वो ।।तु.गा.०२८९.००४ ।।
स्वानंदाचे ताटीं धूप दीप पंचारती वो। ओवाळिली माता विठाबाई पंचभूतीं वो ।।तु.गा.०२८९.००५ ।।
तुझें तुज पावलें माझा नवस पुरवीं आतां वो। तुका म्हणे राखें आपुलिया शरणागता वो ।।तु.गा.०२८९.००६ ।।
सुंदर मुख साजिरें कुंडलें मनोहर गोमटीं वो। नागर नागखोपा केशर कस्तुरी मळवटीं वो। विशाळ व्यंकट नेत्र वैजयंती तळपे कंठीं वो। कास पितांबराची चंदन सुगंध साजे उटी वो ।।तु.गा.०२९०.००१ ।।
अतिबरवंटा बाळा आली सुलक्षणा गोंधळा वो। राजस तेजोराशी मिरवे शिरोमणी वेल्हाळा वो। कोटि रविशशिप्रभा तेजें लोपल्या सकळा वो। न कळे ब्रह्मादिकां अनुपम्य इची लीळा वो ।।तु.गा.०२९०.००२ ।।

सांवळी सकुमार गोरी भुजा शोभती चारी वो।  सखोल वक्षस्थळ सुढाळ पदक झळके वरी वो। कटीं क्षुद्र घंटिका शब्द करिताती माधुरी वो। गर्जती चरणीं वाकी अभिनव संगीत नृत्य करी वो।।तु.गा.०२९०.००३।।

अष्टांगीं मंडित काय वर्णावी रूपठेवणी वो।  सोलिव शुद्ध रसाची ओतिव लावण्याची खाणी वो।  सर्वकळासंपन्न मंजुळ बोले हास्यवदनी वो।  बहु रूपें नटली आदिशक्ति नारायणीं वो।।तु.गा.०२९०.००४।।

घटस्थापना केली पंढरपुरमहानगरीं वो।  अस्मानी मंडप दिला तिन्ही तालांवरी वो। आरंभिला गोंधळ इनें चंद्रभागेतिरीं वो।  आली भक्तिकाजा कृष्णाबाई योगेश्वरी वो।।तु.गा.०२९०.००५।।

तेहतीस कोटि देव चामुंडा अष्ट कोटि भैरव वो।  आरत्या कुरवंड्या करिती पुष्पांचा वरुषाव वो। नारद तुंबर गायन ब्रह्मानंद करिती गंधर्व वो।  वंदी चरणरज तेथें तुकयाचा बांधव वो।।तु.गा.०२९०.००६।।

पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा। सांपडला तो साधा आजि मुहूर्त बरा। गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा। आळस नका करूं लहाना सांगतों थोरां।।तु.गा.०२९१.००१।।

या हो या हो बाइयांनो निघाले हरी। सिलंगणा वेगीं घेऊनि आरत्या करीं। ओवाळूं श्रीमुख वंदूं पाऊलें शिरीं। आम्हां दैव आलें येथें घरिंच्या घरीं।।तु.गा.०२९१.००२।।

अक्षय मुहूर्त औटामध्यें साधतें। मग येरी गर्जे जैसें तैसें होत जातें। म्हणोनि मागें पुढे कोणी न पाहावें येथें। सांडा परतें काम जाऊं हरी सांगातें।।तु.गा.०२९१.००३।।

बहुतां बहुतां रीतीं चित्तीं धरा हे मनीं। नका गई करूं आईकाल ज्या कानीं। मग हें सुख तुम्ही कधीं न देखाल स्वप्नीं। उरेल हायहाय मागें होईल काहाणी।।तु.गा.०२९१.००४।।

ऐेसियास वंचता त्याच्या अभाग्या पार। नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार। मग हे वेळ घटिका न ये अजरामर। कळलें असों द्या मग पडतील विचार।।तु.गा.०२९१.००५।।

जयासाठीं ब्रह्मादिक झाले ते पिसे। उच्छिष्टाकारणें देव जळीं झाले मासे। अर्धांगीं विश्वमाता लक्ष्मी वसे। तो हा तुकयाबंधु म्हणे आलें अनायासें।।तु.गा.०२९१.००६।।

आणिकां उपदेशूं नेणें नाचों आपण। मुंडा वायां मार गेली वायां हांसे जन।।तु.गा.०२९२.००१।।

तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा। पुढिलांच्या कळा कवतुक जाणोनी।।तु.गा.०२९२.००२।।

बाहिरल्या वेषे आंत जैसें तैसें। झांकलें तों बरें पोट भरे तेणें वेसें।।तु.गा.०२९२.००३।।

लाज भय शंका जनीं नाहीं तजियेलीं दोन्ही।  फिरविला वेष नव्हों कोणाचींच कोणी ।।तु.गा.०२९७.००५ ।।
तुका म्हणे हा वेष दिला आम्हां जेणें।  जना प्रतीत सवें असो एकपणें ।।तु.गा.०२९७.००६ ।।
सातें चला काजळ घाला तेल फणी करा।  दिवाण दारीं बैसले पारीं नाचों फेर धरा ।।तु.गा.०२९८.००१ ।।
या साहेबाचें झालें देणें वेळोवेळां न लगे येणें।  आतां हाटीं कशासाठीं हिंडों पाटी दुकानें ।।तु.गा.०२९८.००२ ।।
अवघ्या जणी मुंडा धणी नाचों एके घाईं।  सरसावलें सुख कैसा चाळा एके ठायीं ।।तु.गा.०२९८.००३ ।।
म्हणे तुका वोळगें एका तोड चिंता माया।  देउनियां उद्गार जाऊं मुळींचिया ठाया ।।तु.गा.०२९८.००४ ।।
सौरी सुर झालें दूर डौर घेतला हातीं।  माया मोह सांडवलें तीहीं लोकीं झालें सरती ।।तु.गा.०२९९.००१ ।।
चाल विठाबाई अवघी पांच देहीं।  न धरीं गुज कांहीं वाळवंटी सांपडतां ।।तु.गा.०२९९.००२ ।।
हिंडोनि चौऱ्यांशीं घरें आलें तुझ्या दारा।  एक्या रुक्यासाठीं आंचवलें संसारा ।।तु.गा.०२९९.००३ ।।
लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं।  भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां कैंची उरी ।।तु.गा.०२९९.००४ ।।
झालें भांडी जागा सांडीं नाहीं भीड चाड। घालीन चरणीं मिठी पुरवीन जीवींचें तें कोड।।तु.गा.०२९९.००५ ।।
तुका म्हणे रुका करी संसारतुटी।  आतां तुम्हां आम्हां कैसी झाली जीवें साठीं ।।तु.गा.०२९९.००६ ।।
वाळो जन मज म्हणोत शिंदळी। परि हा वनमाळी न विसंबें ।।तु.गा.०३००.००१ ।।
सांडूनि लौकिक झालियें उदास। नाहीं भय आस जीवित्वाची ।।तु.गा.०३००.००२ ।।
नाइकें वचन बोलतां या लोकां। म्हणे झालें तुका हरिरत ।।तु.गा.०३००.००३ ।।
आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा। म्हणोनि व्यभिचारा टेकलियें ।।तु.गा.०३०१.००१ ।।
रात्रंदिवस मज पाहिजे जवळी। क्षण त्या निराळी न गमे घडी ।।तु.गा.०३०१.००२ ।।
नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां। रातले अनंता तुका म्हणे ।।तु.गा.०३०१.००३ ।।
हाचि नेम आतां न फिरें माघारी। बैसलें शेजारीं गोविंदाचे ।।तु.गा.०३०२.००१ ।।
घररिघी झालें पट्टराणी बळें। वरिलें सांवळें परब्रह्म ।।तु.गा.०३०२.००२ ।।
बळियाचा अंगसंग झाला आतां। नाहीं भय चिंता तुका म्हणे ।।तु.गा.०३०२.००३ ।।
नाहीं काम माझें काज तुम्हांसवें। होतें गुप्त ठावें केलें आतां ।।तु.गा.०३०३.००१ ।।
व्यभिचार माझा पडिला ठाऊका। न सरती लोकांमाजी झालें ।।तु.गा.०३०३.००२ ।।

न धरावा लोभ कांहीं माझेविशीं। झालें देवपिशी तुका म्हणे ।।तु.गा.०३०३.००३ ।।
विसरलें कुळ आपुला आचार। पति भावें दीर घर सोय ।।तु.गा.०३०४.००१ ।।
सांडिला लौकिक लाज भय चिंता। रातलें अनंता चित्त माझें ।।तु.गा.०३०४.००२ ।।
मज आतां कोणी आळवाल झणी। तुका म्हणे कानीं बहिर झालें ।।तु.गा.०३०४.००३ ।।
न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ।।तु.गा.०३०५.००१ ।।
सासुरें माहेर मज नाहीं कोणी। एक केलें दोन्ही मिळोनियां ।।तु.गा.०३०५.००२ ।।
आळ आला होता आम्ही भांडखोरी। तुका म्हणे खरी केली मात ।।तु.गा.०३०५.००३ ।।
दुजा ऐसा कोण बळी आहे आतां। हरि या अनंतापासूनियां ।।तु.गा.०३०६.००१ ।।
बळियाच्या आम्ही झालों बळिवंता। करूं सर्व सत्ता सर्वांवरी ।।तु.गा.०३०६.००२ ।।
तुका म्हणे आम्ही जिवाच्या उदारा। झालों प्रीतिकरा गोविंदासी ।।तु.गा.०३०६.००३ ।।
क्षणभरी आम्ही सोसिलें वाईट। साधिलें अवीट निजसुख ।।तु.गा.०३०७.००१ ।।
सांडीमांडी मागें केल्या भरोवरी। अधिकचि परी दुःखाचिया ।।तु.गा.०३०७.००२ ।।
तुका म्हणे येणें जाणें नाहीं आतां। राहिलों अनंताचिये पायीं ।।तु.गा.०३०७.००३ ।।
आम्हां आम्ही आतां वडील धाकुटीं। नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ।।तु.गा.०३०८.००१ ।।
फावला एकांत एकविध भाव। हरि आम्हांसवें सर्व भोगी ।।तु.गा.०३०८.००२ ।।
तुका म्हणे अंगसंग एके ठायीं। असों जेथें नाहीं दुजें कोणी ।।तु.गा.०३०८.००३ ।।
सर्व सुख आम्ही भोगूं सर्व काळ। तोडियेलें जाळ मोहपाश ।।तु.गा.०३०९.००१ ।।
याचसाठीं सांडियेलें भरतार। रातलों या परपुरुषाशीं ।।तु.गा.०३०९.००२ ।।
तुका म्हणे आतां गर्भ नये धरूं। औषध जें करूं फळ नव्हे ।।तु.गा.०३०९.००३ ।।
एका जीवें आतां जिणें जालें दोहीं। वेगळीक कांहीं नव्हे आतां ।।तु.गा.०३१०.००१ ।।
नारायणा आम्हां नाहीं वेगळीक । पूर्वील हे भाक सांभाळिली ।।तु.गा.०३१०.००२ ।।
तुका म्हणे झालें सायासाचें फळ। सरली ते वेळ काळ दोन्ही ।।तु.गा.०३१०.००३ ।।
हासों रुसों आतां वाढवूं आवडी। अंतरींची गोडी अवीट ते ।।तु.गा.०३११.००१ ।।

सेवा सुखें करूं विनोदवचन। आम्ही नारायण एकाएकीं ।।तु.गा.०३११.००२ ।।
तुका म्हणे आम्ही झालों उदासीन। आपुल्या आधीन केला पति ।।तु.गा.०३११.००३ ।।
मजसवें आतां येऊं नका कोणी। सासुरवासिनी बाइयांनो ।।तु.गा.०३१२.००१ ।।
न साहावे तुम्हां या जनाची कूट। बोलतां वाईट ओखटें तें ।।तु.गा.०३१२.००२ ।।
तुका म्हणे झालों उदास मोकळ्या। विचरों गोवळ्यासवें आम्ही ।।तु.गा.०३१२.००३ ।।
शिकविलें तुम्ही तें राहें तोंवरी। मज आणि हरी वियोग तो ।।तु.गा.०३१३.००१ ।।
प्रसंगीं या नाहीं देहाची भावना। तेथें या वचना कोण मानी ।।तु.गा.०३१३.००२ ।।
तुका म्हणे चित्तीं बैसला अनंत। दिसों नेदी नित्य अनित्य तें ।।तु.गा.०३१३.००३ ।।
सांगतों तें तुम्ही आइकावें कानीं। आमुचे नाचणीं नाचूं नका ।।तु.गा.०३१४.००१ ।।
जोंवरी या तुम्हां मागिलांची आस। तोंवरी उदास होऊं नका ।।तु.गा.०३१४.००२ ।।
तुका म्हणे काय वायांविण धिंद। पति ना गोविंद दोन्ही नाहीं ।।तु.गा.०३१४.००३ ।।
आजीवरी तुम्हां आम्हां नेणपणें। कौतुकें खेळणें संग होता ।।तु.गा.०३१५.००१ ।।
आतां अनावर झालों अगुणाची। करूं नये तेंचि करूं सुखें ।।तु.गा.०३१५.००२ ।।
तुका म्हणे आतां बुडविलीं दोन्ही। कुळें एक मनीं नारायण ।।तु.गा.०३१५.००३ ।।
सासुरियां वीट आला भरतारा। इकडे माहेरा स्वभावेचि ।।तु.गा.०३१६.००१ ।।
सांडवर कोणी न धरिती हातीं। प्रारब्धाची गति भोगूं आतां ।।तु.गा.०३१६.००२ ।।
न व्हावी ते झाली आमुची भंडाई। तुका म्हणे काई लाजों आतां ।।तु.गा.०३१६.००३ ।।
मरणाही आधीं राहिलों मरोनि। मग केलें मनीं होतें तैसें ।।तु.गा.०३१७.००१ ।।
आतां तुम्ही पहा आमुचें नवल। नका वेचूं बोल वायांविण ।।तु.गा.०३१७.००२ ।।
तुका म्हणे तुम्ही भयाभीत नारी। कैसी संग सरी तुम्हां आम्हां ।।तु.गा.०३१७.००३ ।।
परपुरुषाचें सुख भोगे तरी। उतरोनि करीं घ्यावें सीस ।।तु.गा.०३१८.००१ ।।
संवसारा आगी आपुलेनि हातें। लावूनि मागुतें पाहूं नये ।।तु.गा.०३१८.००२ ।।
तुका म्हणे व्हावें तयापरी धीट। पतंग हा नीट दीपा सोई ।।तु.गा.०३१८.००३ ।।

आइकाल परी ऐसें नव्हे बाई। न संडावी सोई भ्रताराची।।तु.गा.०३१९.००१ ।।
नव्हे आराणूक लौकिकापासून। आपुल्या आपण गोविलें तें।।तु.गा.०३१९.००२ ।।
तुका म्हणे मन कराल कठीण। त्या या निवडोन मजपाशीं।।तु.गा.०३१९.००३ ।।
आहाच वाहाच आंत वरी दोन्ही। न लगा गडणी आम्हां तैश्या।।तु.गा.०३२०.००१ ।।
भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा। आवरूनि मना बंद द्यावा।।तु.गा.०३२०.००२ ।।
तुका म्हणे कांहीं अभ्यासावांचूनि। नव्हे हे करणी भलतीची।।तु.गा.०३२०.००३ ।।
बहुतांच्या आम्ही न मिळों मतासी। कोणी कैसी कैसी भावनेच्या।।तु.गा.०३२१.००१ ।।
विचार करितां वायां जाय काळ। लटिकें तें मूळ फजितीचें।।तु.गा.०३२१.००२ ।।
तुका म्हणे तुम्ही करा घटापटा। नका जाऊं वाटा आमुचिया।।तु.गा.०३२१.००३ ।।
त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा। कठीण हें जिवा तोंचिवरी।।तु.गा.०३२२.००१ ।।
मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा। अंतर हें सांगा नेदी पुढें।।तु.गा.०३२२.००२ ।।
तुका म्हणे सर्वविशीं हा संपन्न। जाणती महिमान श्रुति ऐसें।।तु.गा.०३२२.००३ ।।
न राहे रसना बोलतां आवडी। पायीं दिली बुडी माझ्या मनें।।तु.गा.०३२३.००१ ।।
मानेल त्या तुम्ही आईका स्वभावें। मी तों माझ्या भावें अनुसरलें।।तु.गा.०३२३.००२ ।।
तुका म्हणे तुम्हीं फिरावें बहुती। माझी तों हे गति झाली आतां।।तु.गा.०३२३.००३ ।।
न बोलतां तुम्हां कळों न ये गुज। म्हणऊनि लाज सांडियेली।।तु.गा.०३२४.००१ ।।
आतां तुम्हां पुढें जोडीतसें हात। नका कोणी अंत पाहों माझा।।तु.गा.०३२४.००२ ।।
तुका म्हणे आम्ही बैसलों शेजारीं। करील ते हरी पाहों आतां।।तु.गा.०३२४.००३ ।।
जग जोगी जग जोगी। जागेजागे बोलती।।तु.गा.०३२५.००१ ।।
जागता जगदेव। राखा कांहीं भाव।।तु.गा.०३२५.००२ ।।
अवघा क्षेत्रपाळ। पूजावा सकळ।।तु.गा.०३२५.००३ ।।
पूजापत्र कांहीं। फल पुष्प तोय।।तु.गा.०३२५.००४ ।।
बहुतां दिसां फेरा। आला या नगरा।।तु.गा.०३२५.००५ ।।

नका घेऊं भार। धर्म तोचि सार।।तु.गा.०३२५.००६।।

तुका मागे दान। द्यावें जी अनन्य।।तु.गा.०३२५.००७।।

ऐका गा ए भाई। सरवदा सांगतो काई। येथें नाडेल माई। दोघां पुत्रांची।।तु.गा.०३२६.००१।।

ते करिती तिची विटंबना। अवघ्या प्रसिद्ध जना। एक न मारितां शाहाणा। तो जाणा सुख न पवे।।तु.गा.०३२६.००२।।

आणीक ऐका गा ये। सरवदा सांगतो काय। खरें बोले तो जाय। नरकामध्यें अधोगती।।तु.गा.०३२६.००३।।

हें चौघांच्या मुखें। मना आणावें सुखें। अवघीं चुकतील दुःखें। खोटें बोला नरनारी।।तु.गा.०३२६.००४।।

आणीक नाडेल एक जाण। सरवदा बोलतो वचन। जागें माझें चित्त म्हणोन। पडिलें खान तया घरीं।।तु.गा.०३२६.००५।।

म्हणोन न म्हणा माझें कांहीं। निजीं निजा सुखें ठायीं। यत्न होईल तईं। चोराठायीं विश्वास।।तु.गा.०३२६.००६।।

आणीक एकी परी। सरवदा सांगतो थोरी। दुःख पावेल नारी। पतिव्रता यामध्यें।।तु.गा.०३२६.००७।।

पांचांनी दिधली हातीं। म्हणोनि न मनावी निश्चिंती। परपुरुषीं होय रती। सुखगती ते पावे।।तु.गा.०३२६.००८।।

आणीक एकी परी। सरवदा सांगतो तें करीं। दान देतां जो वारी। नव्हे भला भला तो।।तु.गा.०३२६.००९।।

तुका म्हणे आई। येथें नांव काई। सांगसी तें ठायीं। मरो रांडेचें।।तु.गा.०३२६.०१०।।

नजर करे सोहि जिंके बाबा दुरथी तमासा देख। लकडी फांसा लेकर बैठा आगले ठकण भेख।।तु.गा.०३२७.००१।।

काहे भुला एक देखत। आंखो मारतडांगो बाजार।।तु.गा.०३२७.००२।।

दमरी चमरी जो नर भुला। सोत आघो हिलत खाय।।तु.गा.०३२७.००३।।

नहि बुलावत किसे बाबा आप हि मत जाय। कहे तुका उस असाके संग फिरफिर गोते खावे।।तु.गा.०३२७.००४।।

अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज। गाऊं बछरे तिस चलावे यारी बाघो न सात।।तु.गा.०३२८.००१।।

ख्याल मेरा साहेबका बाबा हुवा करतार। व्हांटे आघे चढे पीठ आपे हुवा असिवार।।तु.गा.०३२८.००२।।

जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्या अंदर भेस। कहे तुका जो नर बुझे सोहि भया दरवेस।।तु.गा.०३२८.००३।।

तम भज्याय ते बुरा जिकिर तै करे। सीर काटे ऊर कुटे ताहां झडकरे।।तु.गा.०३२९.००१।।

ताहां एक तु ही ताहां एक तु ही। ताहा एक तुही रे बाबा हम तुम्ह नहीं।।तु.गा.०३२९.००२।।

दिदार देखो भले नहीं किसे पछाने कोय। सच्चा नहीं पकड सके झुटा झुटे रोय।।तु.गा.०३२९.००३।।

किसे कहे मेरा किन्हे सती लिया भास। नहीं मेलों मिले जीवना झुटा किया नास।।तु.गा.०३२९.००४।।

सुनो भाई कैसा तो ही होय तैसा होय। बाट खाना अल्ला कहना एकबारां तो हे।।तु.गा.०३२९.००५।।
भला लिया भेक मुंढे आपना नफा देख। कहे तुका सो ही सखा हाक अल्ला एक ।।तु.गा.०३२९.००६।।
अल्ला देवे अल्ला दिलावे। अल्ला दारु अल्ला खिलावे। अल्ला बिगर नहीं कोय। अल्ला करे सोहि होय।।तु.गा.०३३०.००१।।
मर्द होय वो खडा फीर। नामर्दकूं नहीं धीर। आपने दिलकूं करना खुसी। तीन दामकी क्या खुमासी।।तु.गा.०३३०.००२।।
सब रसोंका किया मार। भजनगांली एक हि सार। इमान तो सबहीं सखा। थोडी तोभी लेकर ज्या।।तु.गा.०३३०.००३।।
जिन्हो पास नीत सोय। वो हि बसकर ते रोवे। सांतो पांचो मार लगावे। उतार सो पीछे खावे।।तु.गा.०३३०.००४।।
सब ज्वानी निकल जावे। पीछे गधडी मटी खावे। गांवढाल सो क्या लेवे। हगवनी भरी नहीं धोवे।।तु.गा.०३३०.००५।।
मेरी दारु जिन्हें खाया। दिदार दरगां सो हि पाया। तल्हे मुंढी घाल जावे। बिगारी सोवे क्या लेवे।।तु.गा.०३३०.००६।।
बजारका बुझे भाव। वो हि पुसत आवे ठाव। फुकट बाटु कहे तुका। लेवे सोहि लेवो सखा।।तु.गा.०३३०.००७।।
आवल्ल नाम आल्ला बडा लेते भुल न जाये। इलाम त्याकालजमुपरताही तुंब बजाये।।तु.गा.०३३१.००१।।
आल्ला एक तुं नबी एक तुं। काटतें सिर पावों हातें नहीं जीव डराये।।तु.गा.०३३१.००२।।
आगले देखो पिछे बुझो। आपे हजुर आय।।तु.गा.०३३१.००३।।
सब सबरी नचाव म्याने खडा आपनी सात। हात पाव रखते जबाब नहीं आगली बात।।तु.गा.०३३१.००४।।
सुनो भाई बजार नहीं सबहि नर चलावे। नन्हा बडा नहीं कोये एक ठोर मिलावे।।तु.गा.०३३१.००५।।
एक तरि नहीं प्यार जीवतनकी आस। कहे तुका सो हि मुंढा राखलिये पायेनपास।।तु.गा.०३३१.००६।।
सब संबाल म्याने लौंडे खडा केऊं गुंग। मदिरथी माता हुवा भुलि पाडी भंग।।तु.गा.०३३२.००१।।
आपसकुं संबाल आपसकुं संबाल मुंढे खुब राख ताल। मुथिवोहि बोला नहीं तो करूंगा हाल।।तु.गा.०३३२.००२।।
आबलका तो पीछें नहीं मुदल बिसर जाय। फिरते नहीं लाज रंडी गद्धी गोते खाय।।तु.गा.०३३२.००३।।
जिन्हो खातिर इतना होता सो नहीं दुजे बेकाम। उचा जोरो लिया तुंबा तुंबा बुरा काम।।तु.गा.०३३२.००४।।
निकल जावे चिकल जोरा मुंढे दिलदारी। जबानीकी छोड दे बात फिर एक तारी।।तु.गा.०३३२.००५।।
कहे तुका पिसल रुका मरेको तो दान देख। पक्कड धका गांडगुढधी मार चलाऊं आलेख।।तु.गा.०३३२.००६।।
संबाल यारा उपर तलें दोन्हों मारकी चोट। नजर करे सो ही राखे पश्चा जावे लुट।।तु.गा.०३३३.००१।।
प्यार खुदाई प्यार खुदाई प्यार खुदाई। प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई।।तु.गा.०३३३.००२।।

तुका चालवितो कावडी। प्रवृत्ती निवृत्ती चोखडी। पुढती पुढती अधिक गोडी। भरूनि कळस भजन आवडी। केशवदास नटतसे।।तु.गा.०३३७.०१०।।

आहा आहा रे भाई हें अन्नदानाचें सत्र। पव्हे घातली सर्वत्र। पंथीं अवघे पंथ मात्र। इच्छाभोजनाचें आर्त पुरवावया।।तु.गा.०३३८.००१।।

यावें तेणें घ्यावें। न सरेसें केलें सदाशिवें। पात्र शुद्ध पाहिजे बरवें। मंगळभावें सकळ हर म्हणा रे।।तु.गा.०३३८.००२।।

नव्हे हें कांहीं मोकळें। साक्षी चौघांचिया वेगळें। नेदी नाचों मताचिया बळें। अणु अणोरणीया आगळें। महदि महदा साक्षित्वें हर म्हणा रे।।तु.गा.०३३८.००३।।

हे हरिनामाची आंबिली। जगा पोटभरी केली। विश्रांती कल्पतरूची साउली। सकळां वर्णां सेवितां भली। म्हणा हर हर महादेव।।तु.गा.०३३८.००४।।

तुका हरिदास तराळ। अवघे हाकारी सकळ। या रे वंदू शिखरातळ। चैत्रमास पर्वकाळ महादेवदर्शनें।।तु.गा.०३३८.००५।।

आहा आहा रे भाई तयावरी माझी ब्रींदावळी। भ्रष्ट ये कली क्रियाहीन।।तु.गा.०३३९.००१।।

थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी। वाणिली ते थोरी दवडा वायां बाहेरी।।तु.गा.०३३९.००२।।

बाइलेचा दास पित्रांस उदास। भीक भिकाऱ्यास नये दारा।।तु.गा.०३३९.००३।।

विद्याबळें वाद करूनियां छळी। आणिकांसी फळी मांडोनियां।।तु.गा.०३३९.००४।।

गांवींचिया देवा नाहीं दंडवत। ब्राह्मण अतीत घडेचि ना।।तु.गा.०३३९.००५।।

सर्वकाळ करी संताचिया निंदा। स्वप्नींही गोविंदा आठवीना।।तु.गा.०३३९.००६।।

खाचेमध्यें धन पोटासि बंधन। नेणें ऐसा दानधर्म कांहीं।।तु.गा.०३३९.००७।।

तुका म्हणे नटें दावूनियां सोंग। लवों नेदीं अंग भक्तिभावें।।तु.गा.०३३९.००८।।

आहा आहा रे भाई नमो उदासीन झाले देहभावा। आळविती देवा तया नमो।।तु.गा.०३४०.००१।।

नमो तीर्थपंथें चालती तयांसी। येती बोळवित त्यांसी नमो।।तु.गा.०३४०.००२।।

नमो तया संतवचनीं विश्वास। नमो भावें दास्य गुरुचें त्या।।तु.गा.०३४०.००३।।

नमो तयां मातापित्यांचें पाळण। नमो त्यां वचन सत्य वदे।।तु.गा.०३४०.००४।।

नमो तया जाणे आणिकांचें सुख दुःख। राखे तहान भूक तया नमो।।तु.गा.०३४०.००५।।

परोपकारी नमो पुण्यवंता। नमो त्या दमित्या इंद्रियांसी।।तु.गा.०३४०.००६।।

तुका म्हणे नमो हरीचिया दासा। तेथें सर्व इच्छा पुरलीसे।।तु.गा.०३४०.००७।।

आहा आहा रे भाई गंगा नव्हे जळ। वृक्ष नव्हे वड पिंपळ। तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ। श्रेष्ठ तनु देवाचिया।।तु.गा.०३४१.००१।।

समुद्र नदी नव्हे पैं गा। पाषाण म्हणो नये लिंगा। संत नव्हती जगा। माणसा त्या सारिखे।।तु.गा.०३४१.००२।।
काठी म्हणों नये वेतु। अन्न म्हणों नये सातु। राम राम हे मातु। नये म्हणों हे शब्द।।तु.गा.०३४१.००३।।
चंद्र सूर्य नव्हती तारांगणें । मेरु तो नव्हे पर्वतासमान। शेष वासुकी सर्प नव्हे जाण। विखाराच्या सारिखे।।तु.गा.०३४१.००४।।
गरुड नव्हे पाखरूं । ढोर नव्हे नंदिकेश्वरु। झाड नव्हे कल्पतरु। कामधेनु गाय न म्हणावी।।तु.गा.०३४१.००५।।
कूर्म नव्हे कासव। डुकर नव्हे वराह। ब्रह्मा नव्हे जीव। स्त्री नव्हे लक्ष्मी।।तु.गा.०३४१.००६।।
गवाक्ष नव्हे हाड। पाटाव नव्हे कापड। परीस नव्हे दगड। सगुण ते ईश्वराचे।।तु.गा.०३४१.००७।।
सोनें नव्हे धातु। मीठ नव्हे रेतु। नाहीं नाहीं चर्माआतु। कृष्णाजिन व्याघ्रांबर।।तु.गा.०३४१.००८।।
मुक्ताफळें नव्हेती गारा। खड्याऐसा नव्हे हिरा। जीव नव्हे सोइरा। बोळवीजे स्वइच्छेनें।।तु.गा.०३४१.००९।।
गांव नव्हे द्वारावती। रणछोड नव्हे मूर्ति। तीर्थ नव्हे गोमती। मोक्ष घडे दर्शनें।।तु.गा.०३४१.०१०।।
कृष्ण नव्हे भोगी। शंकर नव्हे जोगी। तुका पांडुरंगीं। हा प्रसाद लाधला।।तु.गा.०३४१.०११।।
मनु राजा ऐक देहपुरी। असे नांदतु त्यासी दोघी नारी। पुत्रपौत्र संपन्न भारी। तेणें कृपा केली आम्हांवरी गा।।तु.गा.०३४२.००१।।
म्हणऊनि आलों या देशा। होतों नाहीं तरी भुललों दिशा। दाता तोही मज भेटला इच्छा। येउनि मारग दाविला सरिसा गा।।तु.गा.०३४२.००२।।
सवें घेऊनि चौघेजण। आला कुमर सुलक्षण। कडे चुकवूनि कांटे वन। ऐका आणिली ती कोणकोण गा।।तु.गा.०३४२.००३।।
पुढें भक्तिनें धरिलें हातीं। मागें ज्ञान वैराग्य धर्म येती। स्थिर केलीं जीं आचपळें होतीं। सिद्ध आणुनि लाविली पंथी गा।।तु.गा.०३४२.००४।।
केले उपकार सांगों काय। बाप न करी ऐसी माय। धर्में त्याच्या हे देखियले पाय। दिलें अखय अभय दान गा।।तु.गा.०३४२.००५।।
होतों पीडित हिंडतां गांव। पोट न भरे न राहावया ठाव। तो येणें अवघा संदेह। म्हणे फेडियेला तुकयाचा बांधव गा।।तु.गा.०३४२.००६।।
गातों वासुदेव मी ऐका। चित्त ठायीं ठेवूनि भावें एका। डोळे झांकूनि रात्र करूं नका। काळ करीत बैसलासे लेखा गा।।तु.गा.०३४३.००१।।
रामराम स्मरा आधीं। लाहो करा गांठ घाला मूळबंदीं। सांडा वाऊगिया उपाधी। लक्ष लावूनि राहा गोविंदीं गा।।तु.गा.०३४३.००२।।
अल्प आयुष्य मानव देह। शत गणिलें तें अर्ध रात्र खाय। मध्यें बालत्व पीडा रोग क्षय। काय भजनासी उरलें तें पाहें गा।।तु.गा.०३४३.००३।।
क्षणभंगुर नाहीं भरंवसा। व्हा रे सावध तोडा माया आशा। कांहीं न चले पडेल मग गळां फासा। पुढें हुशार थोर आहे ओळसा गा।।तु.गा.०३४३.००४।।
कांहीं थोडा बहुत लागपाठ। करा भक्तिभाव धरा बळकट। तन मन ध्यान द्या लावूनियां नीट। जरी असेल करणें गोड शेवट गा।।तु.गा.०३४३.००५।।
विनवितों सकळां जनां। कर जोडोनि थोरां लहानां। दान इतुलें द्या मज दीनां। म्हणे तुकया बंधु राम म्हणा गा।।तु.गा.०३४३.००६।।
गेले टळले पहार तीन। काय निदसुरा अझून। जागे होऊनि करा कांहीं दान। नका ऐकों झांकुनी लोचन गा।।तु.गा.०३४४.००१।।

हरी राम कृष्णा। वासुदेव जाणवितसे जना। चिपळ्या टाळ हातीं विणा। मुखीं घोष नारायणा गा।।तु.गा.०३४४.००२।।

जे ठाकेल कोणा कांहीं। फळ पुष्प अथवा तोयी। द्या परी मीस घेऊं नका भाई। पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा।।तु.गा.०३४४.००३।।

देवाकारणें भाव तस्मात। द्यावें न लगे फारसे वित्त। झालें एक चित्त तरी बहुत। येवढ्यासाठीं नका करुं वाताहात गा।।तु.गा.०३४४.००४।।

आलों येथवरी बहु सायास। करितां दान हेंचि मागावयास। नका भार घेऊं करूं निरास। धर्म सारफळ संसारास गा।।तु.गा.०३४४.००५।।

आतां मागुता येईल फेरा। हें तों न घडे या नगरा। म्हणे तुकया बंधु राम धरा। ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा।।तु.गा.०३४४.००६।।

राम राम दोनी अक्षरें। सुलभ आणि सोपारें। जागा मागिले पहारें। सेवटिचें गोड तेंचि खरें गा।।तु.गा.०३४५.००१।।

राम कृष्ण वासुदेवा। जाणवितसे जनासी । वाजवी चिपळिया। टाळ घागऱ्या घोंषें गा।।तु.गा.०३४५.००२।।

गाय वासुदेव वासुदेवा। भिन्न नाहीं आणिकां नांवा। दान जाणोनियां करीं हावा। न ठेवीं उरी कांहीं ठेवा गा।।तु.गा.०३४५.००३।।

नीज घेऊनियां फिरती। एक वेळां जाणविती। धरूनियां राहा चित्तीं। नेघें भार सांडी कामा हातीं गा।।तु.गा.०३४५.००४।।

सुपात्रीं सर्व भाव। मी तो सर्व वासुदेव। जाणती कृपाळू संत महानुभाव। जया भिन्न भेद नाहीं ठावा गा।।तु.गा.०३४५.००५।।

शूर दान जीवें उदार। नाहीं वासुदेवीं विसर। कीर्ती वाढे चराचर। तुका म्हणे तया नमस्कार गा।।तु.गा.०३४५.००६।।

बोल अबोलणें बोले। जागें बाहेर आंत निजेलें। कैसें घरांत घरकुल केलें। नेणों अंधार ना उजेडलें गा।।तु.गा.०३४६.००१।।

वासुदेव करितो फेरा। वाडियांत बाहेर दारा। कोणी कांहीं तरी दान पुण्य करा। जाब नेदा तरी जातों माघारा गा।।तु.गा.०३४६.००२।।

हातीं टाळ दिंडी मुखीं नाम गाणें। गजर होतो बहु मोठ्यानें। नाहीं निवडिलीं थोर लहानें। नका निजों भिकेच्या भेणें गा।।तु.गा.०३४६.००३।।

मी वासुदेव तत्त्वतां। कळों येईल विचारितां। आहे ठाउका सभाग्य संतां। नाहीं दुजा आणीक मागता गा।।तु.गा.०३४६.००४।।

कांहीं जागा कीं निजलासी। सुनें जागवूनि दारापासीं। तुझ्या हितापाठीं करी वसवसी। भेटी न घेसी वासुदेवासी गा।।तु.गा.०३४६.००५।।

ऐसें जागविलें अवघें जन। होतें संचित तिहीं केलें दान। तुका म्हणे दुबळीं कोणकोण। गेलीं वासुदेवासी विसरून गा।।तु.गा.०३४६.००६।।

राम कृष्ण गीतीं गात। टाळ चिपळ्या वाजवीत। छंदें आपुलिया नाचत। नीज घेऊनि फिरत गा।।तु.गा.०३४७.००१।।

जनीं वनीं अवघा देव। वासनेचा पुसावा ठाव। मग वोळगा तो वासुदेव। ऐसा मनीं वसूं द्या भाव गा।।तु.गा.०३४७.००२।।

निज दानाची थोर आवडी। वासुदेवासी लागली गोडी। मुखीं नाम उच्चारी घडोघडीं। ऐसी करा वासुदेवी जोडी गा।।तु.गा.०३४७.००३।।

अवघा सारूनि सेवट झाला। प्रयत्न न चले कांहीं केला। जागा होईं सांडुनि झोपेला। दान देईं वासुदेवाला गा।।तु.गा.०३४७.००४।।

तुका म्हणे धन्य त्याचें जिणें। जिहीं वासुदेवीं घातलें दान। त्या न लगे येणें जाणें। झालें वासुदेवीं राहणें गा।।तु.गा.०३४७.००५।।

पांगुळ झालों देवा नाहीं हात ना पाय। बैसलों जयावरी सैराट तें जाय। खेटितां कुंप कांटी खुंट दरडी न पाहे। आधार नाहीं मज कोणी बाप ना माय।।तु.गा.०३४८.००१।।

दाते हो दान करा जाते पंढरपुरा। न्या मज तेथवरी अखमाचा सोयरा।।तु.गा.०३४८.००२।।

हिंडतां गव्हाणें गा शिणलों येरझारी। न मिळेचि दाता कोणी जन्मदु:ख निवारी। कीर्ति हे संतांमुखीं तोचि दाखवा हरी। पांगुळा पाय देतो नांदे पंढरपुरीं।।तु.गा.०३४८.००३।।

या पोटाकरणें गा झालों पांगिला जना। न सरेचि मायबाप भीकें नाहीं खंडणा। पुढारा म्हणती एक तया नाहीं करुणा। श्वान हे लागे पाठी आशा बहु दारुणा।।तु.गा.०३४८.००४।।

काय मी चुकलों गा मागें नेणवेचि कांहीं। न कळेच पापपुण्य येथें आठव नाहीं। मी माजी भुललों गा दीप पंतगासोयी। द्या मज जीवदान संत महानुभाव कांहीं।।तु.गा.०३४८.००५।।

दुरोनि आलों मी गा दु:ख झालें दारुण। यावया येथवरी होतें हेंचि कारण। दुर्लभ भेटी तुम्हां पायीं झालें दरुषण। विनविती तुका संतां दोन्ही कर जोडून।।तु.गा.०३४८.००६।।

देश वेष नव्हे माझा सहज फिरत आलों। करूं सत्ता कवणावरी कोठें स्थिर राहिलों। पाय डोळे म्हणतां माझे तिहीं कैसा मोकलिलों। परदेशी नाहीं कोणी अंध पांगुळ झालों।।तु.गा.०३४९.००१।।

आतां माझीं करीं चिंता दान देईं भगवंता। पाठीं पोटीं नाहीं कोणी निरवीं सज्जन संतां।।तु.गा.०३४९.००२।।

चालतां वाट पुढें भय वाटतें चित्तीं। बहुत जन गेले नाहीं आले मागुती। न देखों काय झालें कान तरी ऐकती। बैसलों संधिभागीं तुज धरूनि चित्तीं।।तु.गा.०३४९.००३।।

भाकितों करुणा गा जैसा सांडिला ठाव। न भरेचि पोट कधीं नाहीं निश्चळ पाव। हिंडतां भागलों गा लक्ष चौऱ्याशीं गांव। धरूनि राहिलों गा हाचि वसतां ठाव।।तु.गा.०३४९.००४।।

भरंवसा काय आतां कोण आणी अवचिता। तैसीच झाली किर्ती तया मज बहुतां। म्हणऊनि मारी हाका सोयी पावें पुण्यवंता। लागली भूक थोरी तूंचि कृपाळू दाता।।तु.गा.०३४९.००५।।

संचित सांडवलें कांहीं होतें तें जवळीं। वित्त गोत पुत माया तुटली हे लागावळी। निष्काम झालों देवा होतें माझे कपाळीं। तुका म्हणे तूंचि आतां माझा सर्वस्वें बळी।।तु.गा.०३४९.००६।।

देखत होतों आधीं मागें पुढें सकळ। मग हे दृष्टि गेली वरी आलें पडळ। तिमिर कोंदलेंसे वाढे वाढतां प्रबळ। भीत मी झालों देवा काय ज्याल्याचें फळ।।तु.गा.०३५०.००१।।

आतां मज दृष्टि देईं पांडुरंगा मायबापा। शरण मी आलों तुज निवारूनियां पापा। अंजन लेववूनी करीं मारग सोपा। जाईन सिद्धपंथें अवघ्या चुकतील खेपा।।तु.गा.०३५०.००२।।

होतसे खेद चित्ता कांहीं नाठवे विचार। जात होतों जनामागें तोहि सांडिला आधार। हा ना तो ठाव झाला अवघा पडिला अंधार। फिरलीं माझीं मज कोणी न देती आधार।।तु.गा.०३५०.००३।।

जोंवरीं चळण गा तोंवरीं म्हणती माझा। मानिती लहान थोर देहसुखाचिया काजा। इंद्रियें मावळलीं आला बागुल आजा। कैसा विपरीत झाला तोचि देह नव्हे दुजा।।तु.गा.०३५०.००४।।

गुंतलों या संवसारें कैसा झालोंसे अंध। मी माझें वाढवूनी मायातृष्णेचा बाध। स्वहित न दिसेचि केला आपुला वध। लागले काळ पाठीं सवें काम हे क्रोध।।तु.गा.०३५०.००५।।

लागती चालतां गा गुणदोषाच्या ठेंसा। सांडिली वाट मार्ग झालों निराळा कैसा। पाहातों वास तुझी थोर करूनी आशा। तुका म्हणे वैद्यराजा पंढरीच्या निवासा।।तु.गा.०३५०.००६।।

आंधळ्यापांगळ्यांचा एक विठोबा दाता। प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता। घडी मोडी हेळामात्रें पापपुण्यसंचिता। भवदु:ख कोण वारी तुजवांचुनि चिंता।।तु.गा.०३५१.००१।।

धर्म गा जागो तुझा तूंचि कृपाळू राजा। जाणसी जीवींचें गा न सांगतां सहजा।।तु.गा.०३५१.००२।।

घातली लोळणी गा पुंडलिकें वाळवंटीं। पंढरी पुण्य ठाव नीरे भींवरे तटीं। न देखें दुसरें गा झाली अदृश्य दृष्टि। वोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टि।।तु.गा.०३५१.००३।।

आणिक उपमन्यु एक बाळ धाकुटें। न देखे न चलवे जना चालते वाटे। घातली लोळणीं गा हरिनाम बोभाटे। पावला त्याकारणें धांव घातली नेटें।।तु.गा.०३५१.००४।।

बैसोनि खोळी शुक राहे गर्भीं आंधळा। शीणला येरझारीं दु:ख आठवी वेळा। मागील सोसिलें तें ना भीं म्हणे गोपाळा। पावला त्याकारणें लाज राखिली कळा।।तु.गा.०३५१.००५।।

न देखे जों या जना तया दावी आपणा। वेगळा सुखदु:खा मोहो नाठवी धना। आपपर तेंही नाहीं बंधुवर्ग सज्जना। तुकया तेचि परी झाली पावें नारायणा।।तु.गा.०३५१.००६।।

सहज मी आंधळा गा निजनिराकार पंथें। वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें। मी माझें हारपलें ठायीं जेथींच्या तेथे। अदृश्य तेंचि झालें कांहीं दृश्य जें होतें ।।तु.गा.०३५२.००१ ।।

सुखें मी निजलों गा शून्य सारुनि तेथें। त्रिकुटशिखरीं गा दान मिळे आइतें ।।तु.गा.०३५२.००२ ।।

टाकिली पात्र झोळी धर्म अधर्म आशा। कोल्हाळ चुकविला त्रिगुणांचा वोळसा। न मागें भीक आतां हाचि झाला भरंवसा। वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ।।तु.गा.०३५२.००३ ।।

ऊर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद। अरूप जागविला दाता घेऊनी छंद। घेऊनि आला दान निजतत्त्व निजबोध। स्वरूपीं मेळविलें नांव ठेवियला भेद ।।तु.गा.०३५२.००४ ।।

शब्द हा बहुसार उपकाराची राशी। म्हणोनि चालविला मागें येतील त्यांसी। मागोनि आली वाट सिद्ध ओळीची तैसी। तरले तरती गा आणिकही विश्वासी ।।तु.गा.०३५२.००५ ।।

वर्म तें एक आहे दृढ धरावा भाव। जाणीव नागवण नेदी लागो ते ठाव। म्हणोनि संग टाकीं सेवीं अद्वैत भाव। तुका म्हणे हाचि संतीं मागें केला उपाव ।।तु.गा.०३५२.००६ ।।

भगवंता तुजकारणें मेलों जीताचि कैसी। निष्काम बुद्धि ठेली चळण नाहीं तयेसी। न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी। जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ।।तु.गा.०३५३.००१ ।।

विठोबा दान दे गा तुझ्या सारिखें नामा। किर्ती हे वाखाणिली थोर वाढली सीमा ।।तु.गा.०३५३.००२ ।।

भुक्ति मुक्ति तूंचि एक होसी सिद्धीचा दाता। म्हणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता। सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां। कृपादान देईं देवा येउनि सामोरा आतां ।।तु.गा.०३५३.००३ ।।

संसारसागरु गा भवदु:खाचें मूळ। जनवाद अंथरूण माजी केले इंगळ। इंद्रियें वज्रघातें तपें उष्ण वरी ज्वाळ। सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ।।तु.गा.०३५३.००४ ।।

तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा। वेंघलो वरि खोडा भाव धरुनि टेंका। जाणवी नरनारी जागो धर्म लोकां। पावती पुण्यवंत सोई आमुचिये हाका ।।तु.गा.०३५३.००५ ।।

नाठवे आपपर आतां काय बा करूं । सारिखा दोहीसवा हारपला विचारू । घातला योगक्षेम तुज आपुला भारू । तुकया शरणागता देईं अभयकरू ।।तु.गा.०३५३.००६ ।।

करावा कैवाड। नाहीं तरी आला नाड।।तु.गा.०३५४.००१ ।।

भविष्याचे माथां। भजन नेदावे सर्वथा।।तु.गा.०३५४.०२५।।
माग लागला न संडीं। आळस माती घालीं तोंडीं।।तु.गा.०३५४.०२६।।
यश कीर्ति मान। तरी जोडे नारायण।।तु.गा.०३५४.०२७।।
रवि लोपे तेजें। जरी हारपे हें दुजें।।तु.गा.०३५४.०२८।।
लकार लाविला। असतां नसतांचि उगला।।तु.गा.०३५४.०२९।।
वासनेची धाडी। बंद खोड्या नाड्या बेडी।।तु.गा.०३५४.०३०।।
सार तें न कळे। काय झांकियेले डोळे।।तु.गा.०३५४.०३१।।
खंती ते न धरा। होणें गाढव कुतरा।।तु.गा.०३५४.०३२।।
सायासाची जोडी। पिकें काढिलिया पडी।।तु.गा.०३५४.०३३।।
हातीं हित आहे। परि न करिसी पाहें।।तु.गा.०३५४.०३४।।
अळंकार लेणें। तुळसी मुद्रांची भूषणें।।तु.गा.०३५४.०३५।।
ख्याति केली विष्णुदासीं। तुका म्हणे पाहा कैसी।।तु.गा.०३५४.०३६।।
पांडुरंगा करूं प्रथम नमन। दुसरें चरणा संतांचिया।।तु.गा.०३५५.००१।।
त्यांच्या कृपादानें कथेचा विस्तारु। बाबाजी सद्गुरु दास तुका।।तु.गा.०३५५.००२।।
काय माझी वाणी मानेल संतांसी। रंजवूं चित्तासी आपुलिया।।तु.गा.०३५५.००३।।
या मनासी लागो हरिनामाचा छंद। आवडी गोविंद गावयासी।।तु.गा.०३५५.००४।।
शीण झाला मज संसारसंभ्रमें। सीतळ या नामें झाली काया।।तु.गा.०३५५.००५।।
या सुखा उपमा नाहीं द्यावयासी। आला आकारासी निर्विकार।।तु.गा.०३५५.००६।।
नित्य धांवे तेथें नामाचा गजर। घोष जयजयकार आइकतां।।तु.गा.०३५५.००७।।
तांतडी ते काय हरिगुण गाय। आणीक उपाय दुःखमूळ।।तु.गा.०३५५.००८।।
मूळ नरकाचें राज्य मदें मातें। अंतरें बहुत देव दुरी।।तु.गा.०३५५.००९।।
दुरी अंतरला नामनिंदकांसी। जैसें गोचिडासी क्षीर राहे।।तु.गा.०३५५.०१०।।
हे वाट गोमटी वैकुंठासी जातां। रामकृष्णकथा दिंडी ध्वजा।।तु.गा.०३५५.०११।।

जाणते तयांनीं सांगितलें करा। अहंतेसी वारा आडूनियां।।तु.गा.०३५५.०१२।।
यांसी आहे ठावें परी अंध होती। विषयांची खंती वाटे जना।।तु.गा.०३५५.०१३।।
नाहीं त्या सुटलीं द्रव्य लोभ माया। भस्म दंड छाया तरुवराची।।तु.गा.०३५५.०१४।।
चित्त ज्याचे पुत्रपत्नीबंधुवरी। सुटेल हा परि कैसें जाणा।।तु.गा.०३५५.०१५।।
जाणते नेणते करा हरिकथा। तराल सर्वथा भाक माझी।।तु.गा.०३५५.०१६।।
माझी मज असे घडली प्रचित। नसेल पतित ऐसा कोणी।।तु.गा.०३५५.०१७।।
कोणी तरी कांहीं केलें आचरणें। मज या कीर्तनेंविण नाहीं।।तु.गा.०३५५.०१८।।
नाहीं भक्ता भय तराया पोटाचें। देवासी तयाचें करणें लागे।।तु.गा.०३५५.०१९।।
लागे पाठोवाटी पाहे पायांकडे। पीतांबरें खडे वाट झाडी।।तु.गा.०३५५.०२०।।
डिंकोनियां काय राहिले हे लोक । हेंचि कवतुक वाटे मज।।तु.गा.०३५५.०२१।।
जयानें तारिले पाषाण सागरीं। तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा।।तु.गा.०३५५.०२२।।
माझिया जीवाची केली सोडवण। ऐसा नारायण कृपाळू हा।।तु.गा.०३५५.०२३।।
हाचि माझा नेम हाचि माझा धर्म। नित्य वाचे नाम विठोबाचें।।तु.गा.०३५५.०२४।।
चेतवला अग्नि तापत्रयजाळ। तो करी शीतळ रामनाम।।तु.गा.०३५५.०२५।।
मना एक करी चित्तीं दृढ धरीं। तारील श्रीहरि मायबाप।।तु.गा.०३५५.०२६।।
बाप हो कृपाळू भक्तां भाविकांसी। घरीं होय दासी कामारी त्या।।तु.गा.०३५५.०२७।।
त्याचा भार माथां चालवी आपुला। जिहीं त्या दिधला सर्व भाव।।तु.गा.०३५५.०२८।।
भावेंविण नाहीं तयाची ते प्राप्ति। पुराणें बोलती ऐसी मात।।तु.गा.०३५५.०२९।।
मात त्याची सदा आवडे जयासी। तया गर्भवासीं नाहीं येणें।।तु.गा.०३५५.०३०।।
यावें विष्णुदासीं तरीच गर्भवासीं। उद्धार लोकांसी पूज्य होती।।तु.गा.०३५५.०३१।।
होती आवडतें जीवाचे ताइत। त्यां घडी अच्युत न विसंबे।।तु.गा.०३५५.०३२।।
भेदाभेद कांहीं चिंता दु:ख नाहीं। वैकुंठ त्या ठायीं सदा वसे।।तु.गा.०३५५.०३३।।
वसे तेथें देव सदा सर्वकाळ। करिती निर्मळ नामघोष।।तु.गा.०३५५.०३४।।

संपदा तयांची न सरे कल्पांतीं । मेळविला भक्तीं देवलाभ ।।तु.गा.०३५५.०३५ ।।
लाभ तयां झाला संसारा येऊनि। भगवंत ऋणी भक्तीं केला ।।तु.गा.०३५५.०३६ ।।
लागलेंसे पिसे काय मूढ जनां। काय नारायणा विसरलीं ।।तु.गा.०३५५.०३७ ।।
विसरलीं तयां थोर झाली हाणी। पचतील खाणी चौऱ्यांशीच्या ।।तु.गा.०३५५.०३८ ।।
शिकवितां तरी नाहीं कोणा लाज। लागलीसे भाज धन गोड।।तु.गा.०३५५.०३९ ।।
गोड एक आहे अविट गोविंद। आणीक ते छंद नाशिवंत ।।तु.गा.०३५५.०४० ।।
तळमळ त्याची कांहीं तरी करा। कां रे निदसुरा बुडावया ।।तु.गा.०३५५.०४१ ।।
या जनासी भय यमाचें कां नाहीं। सांडियेलीं तिहीं एकीं राज्य ।।तु.गा.०३५५.०४२ ।।
जेणें अग्निमाजीं घातलासे पाव। नेणतां तो राव जनक होता ।।तु.गा.०३५५.०४३ ।।
तहान भूक जिहीं साहिले आघात। तयां पाय हात काय नाहीं ।।तु.गा.०३५५.०४४ ।।
नाहीं ऐसा तिहीं केला संवसार। दुःखाचे डोंगर तोडावया ।।तु.गा.०३५५.०४५ ।।
याच जन्में घडे देवाचें भजन। आणीक हें ज्ञान नाहीं कोठें।।तु.गा.०३५५.०४६ ।।
नाहीं पुढें कोठें घ्यावया विसांवा। फिरोनि या गांवा आल्याविण ।।तु.गा.०३५५.०४७ ।।
विनवितां दिवस बहुत लागती। म्हणऊनि चित्तीं देव धरा ।।तु.गा.०३५५.०४८ ।।
धरा पाय तुम्ही संतांचे जीवेंसी। वियोग देवासी तयां नाहीं ।।तु.गा.०३५५.०४९ ।।
नाहीं चाड देवा आणिका सुखाची। आवडी तयाची त्याची तया ।।तु.गा.०३५५.०५० ।।
त्याचीच उच्छिष्ट बोलतों उत्तरें। सांगितलें खरें व्यासादिकीं ।।तु.गा.०३५५.०५१ ।।
व्यासें सांगितलें भक्ति हेंचि सार। भवसिंधु पार तरावया ।।तु.गा.०३५५.०५२ ।।
तरावया जन केलें भागवत। गोवळे गोपी भक्त माता पिता ।।तु.गा.०३५५.०५३ ।।
तारूनियां खरें नेलीं एकसरें। निमित्तें उत्तरें ऋषीचिया ।।तु.गा.०३५५.०५४ ।।
यासी वर्म ठावें भक्त तरावया। जननी बाळ माया राखे तान्हें ।।तु.गा.०३५५.०५५ ।।
तान्हेलें भुकेलें म्हणे वेळोवेळां। न मागतां कळा जाणोनियां ।।तु.गा.०३५५.०५६ ।।
जाणोनियां वर्म देठ लावियला। द्रौपदीच्या बोलासवें धांवें ।।तु.गा.०३५५.०५७ ।।

धांवें सवें तान्ही धेनु जैसी वत्सा। भक्तालागीं तैसा नारायण ।।तु.गा.०३५५.०५८ ।।
नारायण व्हावा हे हांव जया जीवा। धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ।।तु.गा.०३५५.०५९ ।।
नाहीं पार सुखा तें दिलें तयासी। अखंड वाचेसी रामराम ।।तु.गा.०३५५.०६० ।।
रामराम दोनी उत्तम अक्षरें। भवानीशंकरें उपदेशिलीं ।।तु.गा.०३५५.०६१ ।।
उपदेश करी विश्वनाथ कानीं। वाराणसी प्राणी मध्यें मरे ।।तु.गा.०३५५.०६२ ।।
मरणाचे अंतीं राम म्हणे जरी। नलगे यमपुरी जावें तया ।।तु.गा.०३५५.०६३ ।।
तयासी उत्तम ठाव पैं वैकुंठीं। वसे नाम कंठीं सर्वकाळ ।।तु.गा.०३५५.०६४ ।।
सर्वकाळ वसे वैष्णवांच्या घरीं। नसे क्षणभरी स्थिर कोठें ।।तु.गा.०३५५.०६५ ।।
कोठें नका पाहों करा हरिकथा। तेथें अवचिता सांपडेल ।।तु.गा.०३५५.०६६ ।।
सांपडे हा देव भाविकांचे हातीं। शाहाणे मरती तरी नाहीं ।।तु.गा.०३५५.०६७ ।।
नाहीं भक्ति भली केलियांवांचूनि। अहंता पापिणी नागवण ।।तु.गा.०३५५.०६८ ।।
नागवला म्हणे देव मी आपणा। लाभ दिला जना ठकला तो ।।तु.गा.०३५५.०६९ ।।
तोचि देव येर नव्हे ऐसें कांहीं। जनार्दन ठायीं चहूं खाणी ।।तु.गा.०३५५.०७० ।।
खाणी भरूनियां राहिलासे आंत। बोलावया मात ठाव नाहीं ।।तु.गा.०३५५.०७१ ।।
ठाव नाहीं रिता कोणी देवाविण। ऐसी ते सज्जन संतवाणी ।।तु.गा.०३५५.०७२ ।।
वाणी बोलोनियां एक गेले पुढें। तयासी वांकुडे जातां ठके ।।तु.गा.०३५५.०७३ ।।
ठकला नाहीं अर्थ ठाउका वेदांचा। होऊनि भेदाचा दास ठेला ।।तु.गा.०३५५.०७४ ।।
दास ठेला पोट अर्थ दंभासाठीं। म्हणऊनि तुटी देवासवें ।।तु.गा.०३५५.०७५ ।।
सवें देव द्विजातीही दुराविला। आणिकांचा आला कोण पाड ।।तु.गा.०३५५.०७६ ।।
पाड करूनियां नागविलीं फार। पंडित वेव्हार खळवादी ।।तु.गा.०३५५.०७७ ।।
वादकां निंदकां देवाचें दर्शन। नव्हे झाल्या पूर्ण षडकर्मी ।।तु.गा.०३५५.०७८ ।।
षडकर्म हीन रामनाम कंठीं। तयासवें भेटी सत्य देवा ।।तु.गा.०३५५.०७९ ।।
देवासी आवडे भाविक जो भोळा। शुद्ध त्या चांडाळा करुनि मानी ।।तु.गा.०३५५.०८० ।।

मानियेला नाहीं उधार या बोला। नाम घेतां मला युक्ति थोडी ।।तु.गा.०३५५.०८१ ।।
युक्ति थोडी माझी दुर्बळाची वाचा। प्रताप नामाचा बोलावया ।।तु.गा.०३५५.०८२ ।।
बोलतां पांगल्या श्रुति नेति नेति। खुंटलिया युक्ति पुढें त्याच्या ।।तु.गा.०३५५.०८३ ।।
त्याचा पार पुढें न कळेचि जातां। पाऊलें देखतां ब्रह्मादिकां ।।तु.गा.०३५५.०८४ ।।
काय भक्ति पिसें लागलें देवासी। इच्छा ज्याची जैसी तैसा होय ।।तु.गा.०३५५.०८५ ।।
होय हा सगुण निर्गुण आवडी। भक्तिप्रिय गोडी फेडावया ।।तु.गा.०३५५.०८६ ।।
माय बापापाशीं बाळ बोले लाडें। करूनि वांकुडें मुख तैसे ।।तु.गा.०३५५.०८७ ।।
तैसें याचकाचें समाधान दाता। होय हो राखतां सत्त्वकाळीं ।।तु.गा.०३५५.०८८ ।।
सत्त्वकाळीं कामा न येती आयुधें। सोयरीं संबंधें सैन्य लोक ।।तु.गा.०३५५.०८९ ।।
सैन्य लोक तया दाखवी प्रताप। लोटला हा कोप कोपावरी ।।तु.गा.०३५५.०९० ।।
कोपा मरण नाहीं शांत होय त्यासी। प्रमाण भल्यासी सत्त्वगुण ।।तु.गा.०३५५.०९१ ।।
सत्त्वरजतम आपण नासती। करितां या भक्ति विठोबाची ।।तु.गा.०३५५.०९२ ।।
चित्त रंगलिया चैतन्यचि होय। तेथें उणें काय निजसुखा ।।तु.गा.०३५५.०९३ ।।
सुखाचा सागरू आहे विटेवरी। कृपादान करी तोचि एक ।।तु.गा.०३५५.०९४ ।।
एक चित्त करूं विठोबाचे पायीं । तेथें उणें कांहीं एक आम्हां ।।तु.गा.०३५५.०९५ ।।
आम्हांसी विश्वास त्याचिया नामाचा। म्हणऊनि वाचा घोष करूं ।।तु.गा.०३५५.०९६ ।।
करूं हरिकथा सुखाची समाधि। आणिकाची बुद्धि दुष्ट नासे ।।तु.गा.०३५५.०९७ ।।
नासे संवसार लोभमोहो माया। शरण जातां या विठोबासी ।।तु.गा.०३५५.०९८ ।।
सिकविलें मज मूढा संतजनीं। दृढ या वचनीं राहिलोंसें ।।तु.गा.०३५५.०९९ ।।
राहिलोंसें दृढ विठोबाचे पायीं। तुका म्हणे कांहीं न लगे आतां ।।तु.गा.०३५५.१०० ।।
गाईन ओंविया पंढरीचा देव। आमुचा तो जीव पांडुरंग ।।तु.गा.०३५६.००१ ।।
रंगलें हें चित्त माझें तया पायीं। म्हणऊनि घेई हाचि लाहो ।।तु.गा.०३५६.००२ ।।
लाहो करीन मी हाचि संवसारीं। राम कृष्ण हरि नारायण ।।तु.गा.०३५६.००३ ।।

नारायण नाम घालितां तुकासी। न येती या रासी तप तीर्थे ।।तु.गा.०३५६.००४ ।।
तीर्थे माथां रज वंदिती संतांचे। जे गाती हरीचे गुणवाद ।।तु.गा.०३५६.००५ ।।
गुणवाद ज्याचे गातां पूज्य झाले। बडिवार बोले कोण त्यांचा ।।तु.गा.०३५६.००६ ।।
त्यांचा नाहीं पार कळला वेदांसी। आणीकही ऋषि विचारितां ।।तु.गा.०३५६.००७ ।।
विचारितां तैसा होय त्यांच्या भावें। निजरूप ठावें नाहीं कोणा ।।तु.गा.०३५६.००८ ।।
कोणा कवतुक न कळे हे माव। निजलिया जीव करी धंदा ।।तु.गा.०३५६.००९ ।।
करूनि कवतुक खेळे हाचि लीळा। व्यापूनि वेगळा पाहतसे ।।तु.गा.०३५६.०१० ।।
सेवटीं आपण वेगळाचि खरा। सोंग हा पसारा नट केला ।।तु.गा.०३५६.०११ ।।
लावियेलें चाळा मीपणें हें जन। भोग तया कोण भोगवितो ।।तु.गा.०३५६.०१२ ।।
विषयीं गुंतलीं विसरलीं तुज। कन्या पुत्र भाज धनलोभें ।।तु.गा.०३५६.०१३ ।।
लोभें गिळी फांसा आमिषाच्या आशा। सांपडोनि मासा तळमळी ।।तु.गा.०३५६.०१४ ।।
तळमळ त्यांची तरीच शमेल। जरी हा विठ्ठल आठविती ।।तु.गा.०३५६.०१५ ।।
आठवे तरी देव संतांच्या सांगातें। किंवा हें संचित जन्मांतर ।।तु.गा.०३५६.०१६ ।।
जन्मांतरें तीन भोगितां कळती। केलें तें पावती करितां पुढे ।।तु.गा.०३५६.०१७ ।।
पुढें जाणोनियां करावें संचित। पूजावे अतीत देव द्विज ।।तु.गा.०३५६.०१८ ।।
जन्म तुटे ऐसें नव्हे तुम्हां जनां। पुढिल्या पावना धर्म करा ।।तु.गा.०३५६.०१९ ।।
करा जप तप अनुष्ठान याग। संतीं जे मारग स्थापियेले ।।तु.गा.०३५६.०२० ।।
लावियेले कर्मीं शुद्ध आचरणीं। कोणा एका जन्मीं केलें पावें ।।तु.गा.०३५६.०२१ ।।
पावले सत्वर निष्काम उद्धार। जिंकिली अपार वासना हे ।।तु.गा.०३५६.०२२ ।।
वासनेचें मूळ छेदिल्यावांचूनि। तरलोंसे कोणी न म्हणावें ।।तु.गा.०३५६.०२३ ।।
न म्हणावें झालों पंडित वाचक । करुनि मंत्रघोष अक्षरांचा ।।तु.गा.०३५६.०२४ ।।
चाळविलीं एकें तेचि आवडीनें। लोक दंभमानें देहसुखें ।।तु.गा.०३५६.०२५ ।।
सुख तरीच घडे भजनाचें सार। वाचें निरंतर रामनाम ।।तु.गा.०३५६.०२६ ।।

राम हा उच्चार तरिच बैसे वाचे। अनंता जन्माचें होईल पुण्य ।।तु.गा.०३५६.०२७ ।।
पुण्य ऐसें काय रामनामापुढें। काय ते बापुडे यागयज्ञ ।।तु.गा.०३५६.०२८ ।।
यागयज्ञ तप संसारदायके । न सुटे एके नामेंविण ।।तु.गा.०३५६.०२९ ।।
नामेंविण भवसिंधु पावे पार। अइसा हा विचार नाहीं दुजा ।।तु.गा.०३५६.०३० ।।
जाणती हे भक्तराज महामुनि। नाम सुखधणी अमृताची ।।तु.गा.०३५६.०३१ ।।
अमृताचें सार निजतत्त्व बीज। गुह्याचें तें गुज रामनाम ।।तु.गा.०३५६.०३२ ।।
नामें असंख्यात तारिले अपार। पुराणीं हें सार प्रसिद्ध हे ।।तु.गा.०३५६.०३३ ।।
हेंचि सुख आम्ही घेऊं सर्वकाळ। करूं हे निर्मळ हरिकथा ।।तु.गा.०३५६.०३४ ।।
कथाकाळीं लागे सकळा समाधि। तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ।।तु.गा.०३५६.०३५ ।।
नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया। गातां गुण तया विठोबाचें ।।तु.गा.०३५६.०३६ ।।
विठोबाचें गुण मज आवडती। आणिक हे चित्तीं नलगे कांहीं ।।तु.गा.०३५६.०३७ ।।
कांहीं कोणी नका सांगों हा उपाव। माझ्या मनीं भाव नाहीं दुजा ।।तु.गा.०३५६.०३८ ।।
जाणोनियां आम्हीं दिला जीवभाव। दृढ याचे पाव धरियेले ।।तु.गा.०३५६.०३९ ।।
धरियेले आतां न सोडीं जीवेसीं। केला हा सेवेसीं निरधार ।।तु.गा.०३५६.०४० ।।
निरधारें आम्हीं राहिलों ये नेटीं। संवसारतुटी करूनियां ।।तु.गा.०३५६.०४१ ।।
येणें अंगीकार केला पांडुरंगें। रंगविलें रंगें आपुलिया ।।तु.गा.०३५६.०४२ ।।
आपुली पाखर घालूनियां वरी। आम्हांसी तो करी यत्न देव ।।तु.गा.०३५६.०४३ ।।
देव राखे तया आणिकांचें काय। करितां उपाय चाले तेथें ।।तु.गा.०३५६.०४४ ।।
तेथें नाहीं रिघ कळिकाळासी येतां। दास म्हणवितां विठोबाचे ।।तु.गा.०३५६.०४५ ।।
विठोबाचे आम्ही लाडिके डिंगर। कांपती असुर काळ धाकें ।।तु.गा.०३५६.०४६ ।।
धाक तिहीं लोकीं जयाचा दरारा। स्मरण हें करा त्याचें तुम्ही ।।तु.गा.०३५६.०४७ ।।
तुम्ही निदसुरे नका राहूं कोणी। चुकवा जाचणी गर्भवास ।।तु.गा.०३५६.०४८ ।।
गर्भवासीं दुःख यमाचें दंडण। थोर होय शीण येतां जातां ।।तु.गा.०३५६.०४९ ।।

तहान भूक पीडा जीतां हे आघात। मेल्या यमदूत जाच करिती ।।तु.गा.०३५६.०५०।।
जाच करिती हें म्हणसी कोणा ठावें। नरकीं कौरवें बुडी दिली ।।तु.गा.०३५६.०५१।।
बुडी दिली कुंभपाकीं दुर्योधनें। दाविना लाजेनें मुख धर्मा ।।तु.गा.०३५६.०५२।।
धर्म हा कृपाळू आलासे जवळी। बैसला पाताळीं वरी नये ।।तु.गा.०३५६.०५३।।
न ये वरी कांहीं करितां उपाव। भोगवितो देव तेंचि त्यासी ।।तु.गा.०३५६.०५४।।
त्यासी अभिमान गर्व या देहाचा। नुच्चारिती वाचा नारायण ।।तु.गा.०३५६.०५५।।
नारायण जे विसरलीं संवसारीं। तयांसी अघोरीं वास सत्य ।।तु.गा.०३५६.०५६।।
सत्य मानूनियां संतांच्या वचना। जा रे नारायणा शरण तुम्ही ।।तु.गा.०३५६.०५७।।
तुम्ही मानूं नका कोणी हा विश्वास। पुत्र पत्नी आस धन वित्त ।।तु.गा.०३५६.०५८।।
धन वित्त लोभ माया मोहपाश। मांडियेले फांसे यमदूतीं ।।तु.गा.०३५६.०५९।।
दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण। वाचे नारायण येऊं नेदी ।।तु.गा.०३५६.०६०।।
नेदी शुद्धबुद्धि आतळों चित्तासी। नाना कर्मे त्यासी दुरावती ।।तु.गा.०३५६.०६१।।
दुराविलीं एकें जाणतींच फार। निंदा अहंकार वादभेद ।।तु.गा.०३५६.०६२।।
वादभेद निंदा हे फंद काळाचे। गोवितील वाचे रिकामिकें ।।तु.गा.०३५६.०६३।।
रिकामिक देहा होय नव्हे मना। चिंतेचिये घाणा जुंपिजेसी ।।तु.गा.०३५६.०६४।।
सेवटीं हे गळां लावूनियां दोरी। सांभाळ ये करीं वासनेचा ।।तु.गा.०३५६.०६५।।
वासनेचा संग होय अंतकाळीं। तरी तपोबळी जन्म धरी ।।तु.गा.०३५६.०६६।।
धरूनियां देव राहतील चित्तीं। आधींलिया गती आठवावा ।।तु.गा.०३५६.०६७।।
आठवावा देव मरणाचे काळीं। म्हणऊनि बळी जीव दिले ।।तु.गा.०३५६.०६८।।
दिले टाकूनियां भोग ऋषेश्वरीं। खाती वनांतरीं कंदमूळें ।।तु.गा.०३५६.०६९।।
मुळें सुखाचिया देव अंतरला। अल्पासाठीं गेला अधोगती ।।तु.गा.०३५६.०७०।।
गति हे उत्तम व्हावया उपाव। आहे धरा पाव विठोबाचे ।।तु.गा.०३५६.०७१।।
विठोबाचे पायीं राहिलीया भावें। न लगे कोठें जावें वनांतरा ।।तु.गा.०३५६.०७२।।

तरती दुबळीं विठोबाच्या नांवें। संचित ज्या सवें नाहीं शुद्ध ।।तु.गा.०३५६.०७३ ।।
शुद्ध तरायाचें काय तें नवल। म्हणतां विठ्ठल वेळोवेळां ।।तु.गा.०३५६.०७४ ।।
वेळकाळ नाहीं कवणाचे हातीं। न कळे हे गति भविष्याची ।।तु.गा.०३५६.०७५ ।।
भविष्य न सुटे भोगिल्यावांचूनि। संचित जाणोनि शुद्ध करा ।।तु.गा.०३५६.०७६ ।।
करावे सायास आपुल्या हिताचे। येथें आलियाचें मनुष्यपण ।।तु.गा.०३५६.०७७ ।।
मनुष्यपण तरी साधीं नारायण। नाहीं तरी हीन पशुहूनि ।।तु.गा.०३५६.०७८ ।।
पशु पाप पुण्य काय हे जाणती। मनुष्या या रीती ठाउकिया ।।तु.गा.०३५६.०७९ ।।
ठाउकें हें असे पाप पुण्य लोकां। देखतील एकां भोगतिया ।।तु.गा.०३५६.०८० ।।
भोगतील एक दुःख संवसारीं। काय सांगों परी वेगळाल्या ।।तु.गा.०३५६.०८१ ।।
ल्यावें खावें बरें असावें सदैव। हेचि करी हांव संवसारीं ।।तु.गा.०३५६.०८२ ।।
संवसारें जन गिळिले सकळ। भोगितील फळें गर्भवास ।।तु.गा.०३५६.०८३ ।।
वासनेचें मूळ छेदिल्यावांचून। नव्हे या खंडण गर्भवासा ।।तु.गा.०३५६.०८४ ।।
सायास केलियावांचूनि तें नाहीं। भविष्यावरी कांहीं घालूं नये ।।तु.गा.०३५६.०८५ ।।
नये बळें धड घालूं कांट्यावरी। जाय जीवें धरी सर्प हातीं ।।तु.गा.०३५६.०८६ ।।
हातीं आहे हित करील तयासी। म्हणऊनि ऋषीं सांगितलें ।।तु.गा.०३५६.०८७ ।।
सांगितलें लोकां फजित करूनि। आपण जे कोणी तरले ते ।।तु.गा.०३५६.०८८ ।।
तेणें वाळवंटीं उभारिला कर। कृपेचा सागर पांडुरंगा ।।तु.गा.०३५६.०८९ ।।
गंगाचरणीं करी पातकांची धुनी। पाउलें तीं मनीं चिंतिलियां ।।तु.गा.०३५६.०९० ।।
चिंतनें जयाच्या तरती पाषाण। उद्धरी चरण लावूनियां ।।तु.गा.०३५६.०९१ ।।
लावूनियां टाळी नलगे बैसावें। प्रेमसुख घ्यावें संतसंगें ।।तु.गा.०३५६.०९२ ।।
संतसंगें कथा करावें कीर्तन। सुखाचें साधन रामनाम ।।तु.गा.०३५६.०९३ ।।
मग कोठें देव जाऊं न सके दुरी। बैसोनि भीतरीं कंठीं राहे ।।तु.गा.०३५६.०९४ ।।
राहे व्यापुनियां सकळ शरीर। आपुला विसर पडों नेदी ।।तु.गा.०३५६.०९५ ।।

नेदी दु:ख देखों आपुलिया दासा। वारी गर्भवासा यमदूता ।।तु.गा.०३५६.०९६ ।।
तहान भूक त्यासी वाहों नेदी चिंता। दुश्चित हे घेतां नाम होती ।।तु.गा.०३५६.०९७ ।।
होती जीव त्याचे सकळही जंत। परि ते अंकित संचिताचे ।।तु.गा.०३५६.०९८ ।।
चेवले जे कोणी देहअभिमानें। त्यांसी नारायणें कृपा केली ।।तु.गा.०३५६.०९९ ।।
कृपाळू हा देव अनाथा कोंवसा। आम्ही त्याच्या आशा लागलोंसे ।।तु.गा.०३५६.१०० ।।
लावियेलें आसे येणें पांडुरंगें। तुका म्हणे संगें भक्तांचिया ।।तु.गा.०३५६.१०१ ।।
वोणव्या सोंकरीं। सेत खादलें पाखरीं ।।तु.गा.०३५७.००१ ।।
तैसा खाऊं नको दगा। निदसुरा राहूनि जागा ।।तु.गा.०३५७.००२ ।।
चोरासवें वाट। चालोनि केलें तळपट ।।तु.गा.०३५७.००३ ।।
डोळे झाकूनि राती। कूपीं पडे दिवसा जोती ।।तु.गा.०३५७.००४ ।।
पोसी वांझ गाय। तेथें कैंची दूध साय ।।तु.गा.०३५७.००५ ।।
फुटकी सांगडी। तुका म्हणे न पवे थडी ।।तु.गा.०३५७.००६ ।।
सेत आलें सुगी सांभाळावें चारी कोन। पीक आलें परी केलें पाहिजे जतन ।।तु.गा.०३५८.००१ ।।
सोंकरीं सोंकरीं सोहंकरी। विसावा तोंवरीं नको उभें आहे तों ।।तु.गा.०३५८.००२ ।।
गोफणीसी गुंडा घालीं पागोऱ्याच्या नेटें। पळती आहाकारे अवघीं पाखरांची थाटें ।।तु.गा.०३५८.००३ ।।
पेटवूनी आगटी राहें जागा पालटूनी। पडिलिया मानी बळ बुद्धि व्हावी दोनी ।।तु.गा.०३५८.००४ ।।
खळे दातें विश्वसुखी करीं होतां रासी। सारा सारूनियां ज्याचे भाग देई त्यासी ।।तु.गा.०३५८.००५ ।।
तुका म्हणे मग नाहीं आपुलें कारण। निज आलें हातां भूस सांडिलें निकण ।।तु.गा.०३५८.००६ ।।
सेत करा रे फुकाचें। नाम विठोबारायाचें ।।तु.गा.०३५९.००१ ।।
नाहीं वेठी जेवा सारा। जाहाती नाहीं म्हणियारा। सरिक नाहीं दुसरा। धनी सारा तुझा तूं ।।तु.गा.०३५९.००२ ।।
जपतप नांगरणी। न लगे आटी दुनवणी ।।तु.गा.०३५९.००३ ।।
कर्म कुळवणी। न लगे धर्मपाळी दोन्ही ।।तु.गा.०३५९.००४ ।।
ज्ञान पाभारी तीफणी। न लगे करावी पेरणी ।।तु.गा.०३५९.००५ ।।

बीज न लगे संचिताचें। पीक पिकलें ठायींचें।।तु.गा.०३५९.००६।।
नाहीं यमाचें चोरटें। विठ्ठल पागोऱ्याच्या नेटें।।तु.गा.०३५९.००७।।
पीक न वजे हा भरवसा। करी उद्वेग तो पिसा।।तु.गा.०३५९.००८।।
सराई सर्व काळ। वायां न वजे घटिकापळ।।तु.गा.०३५९.००९।।
प्रेम पिकलें अपार। नाहीं सांठवावया थार।।तु.गा.०३५९.०१०।।
ऐसिये जोडी जो चुकला। तुका म्हणे धिग त्याला।।तु.गा.०३५९.०११।।
ठकिलें काळा मारिली दडी। दिली कुडी टाकोनि।।तु.गा.०३६०.००१।।
पांघरलों बहु काळें। घोंगडें बळें सांडवलें।।तु.गा.०३६०.००२।।
नये ऐसा लाग वरी। परतें दुरी लपालें।।तु.गा.०३६०.००३।।
तुका म्हणे आड सेवा। लाविला हेवा धांदली।।तु.गा.०३६०.००४।।
घोंगडियांचा पालट केला। मुलांमुलां आपुल्यांत।।तु.गा.०३६१.००१।।
कान्होबा तो मीच दिसें। लाविलें पिसें सवंगडियां।।तु.गा.०३६१.००२।।
तो बोले मी उगाच बैसें। अनारिसें न दिसे।।तु.गा.०३६१.००३।।
तुका म्हणे दिलें सोंग। नेदी व्यंग जाऊं देऊं ।।तु.गा.०३६१.००४।।
खेळों लागलों सुरकवडी। माझी घोंगडी हारपली।।तु.गा.०३६२.००१।।
कान्होबाचे पडिलों गळां। घेईं गोपाळा देईं झाडा।।तु.गा.०३६२.००२।।
मी तों हागे उघडा जालों। अवघ्या आलों बाहेरी।।तु.गा.०३६२.००३।।
तुका म्हणे बुद्धि काची। नाहीं ठायींची मजपाशीं।।तु.गा.०३६२.००४।।
घोंगडियांची एकी राशी। त्याजपाशीं तेंही होतें।।तु.गा.०३६३.००१।।
माझियाचा माग दावा। केला गोवा उगवूं द्या।।तु.गा.०३६३.००२।।
व्हावें ऐसें निसंतान। घेईन आण तुजपाशीं।।तु.गा.०३६३.००३।।
तुका म्हणे लहान मोठा। सांडा ताठा हा देवा।।तु.गा.०३६३.००४।।
नाहीं तुझे उगा पडत गळां। पुढें गोपाळा जाऊं नको।।तु.गा.०३६४.००१।।

घोंगडें नेलें सांगों मी कोणा। दुबळें माझें नाणीती मना।।तु.गा.०३७०.००१।।
पुढें तें मज न मिळे आतां। जवळी सत्ता दाम नाहीं।।तु.गा.०३७०.००२।।
शेटे महाजन ऐका कोणी। घोंगडियाची करा शोधणी।।तु.गा.०३७०.००३।।
घोंगडियाचा करा बोभाट। तुका म्हणे जंव भरला हाट।।तु.गा.०३७०.००४।।
माझें घोंगडें पडिलें ठायीं। माग तया पायीं सांपडला।।तु.गा.०३७१.००१।।
चोर तो भला चोर तो भला। पाठिसी घातला पुंडलिकें ।।तु.गा.०३७१.००२।।
चोर कुठोरी एकेचि ठायीं। वेगळें पाहावें न लगे कांहीं।।तु.गा.०३७१.००३।।
आणिकांची चोरलीं आधीं। माझें तयामधीं मेळविलें।।तु.गा.०३७१.००४।।
आपल्या आपण शोधिलें तिहीं। करीन मीही तेचि परी।।तु.गा.०३७१.००५।।
तुका म्हणे माझें हितचि झालें। फाटकें जाऊन धडकें आलें।।तु.गा.०३७१.००६।।
पाईकपणें जोतिला सिद्धांत। शूर धरी मात वचन चित्तीं।।तु.गा.०३७२.००१।।
पाईकीवांचून नव्हे कधीं सुख। प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा।।तु.गा.०३७२.००२।।
तरि व्हावें पाईक जिवाचे उदार। सकळ त्यांचा भार स्वामी वाहे।।तु.गा.०३७२.००३।।
पाइकींचें सुख जयां नाहीं ठावें। धिग त्यांनी ज्यावें वायांविण।।तु.गा.०३७२.००४।।
तुका म्हणे एका क्षणाचा करार। पाईक अपार सुख भोगी।।तु.गा.०३७२.००५।।
पाईकीचें सुख पाईकासी ठावें। म्हणोनियां जीवें केली साटी।।तु.गा.०३७३.००१।।
येतां गोळ्या बाण साहिले भडिमार। वर्षतां अपार वृष्टि वरी।।तु.गा.०३७३.००२।।
स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण। मग त्या मंडण शोभा दावी।।तु.गा.०३७३.००३।।
पाईकांनीं सुख भोगिलें अपार। शूर आणि धीर अंतर्बाहीं।।तु.गा.०३७३.००४।।
तुका म्हणे याही सिद्धांताच्या खुणा। जाणे तो शहाणा करी तो भोगी।।तु.गा.०३७३.००५।।
पाईक तो जाणे पाइकीचा भाव। लागबग ठाव चोरवाट।।तु.गा.०३७४.००१।।
आपणां राखोनि ठकावें आणीक । घ्यावें सकळीक हिरूनियां।।तु.गा.०३७४.००२।।
येऊं नेदी लाग लागों नेदी माग। पाईका त्या जग स्वामी मानी।।तु.गा.०३७४.००३।।

ऐसें जन केलें पाइकें पाईक । जया कोणी भीक न घालिती ।।तु.गा.०३७४.००४ ।।
तुका म्हणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाईक त्रैलोकींचा ।।तु.गा.०३७४.००५ ।।
पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांठा मोडोनियां ।।तु.गा.०३७५.००१ ।।
पारखिये ठायीं घेऊनियां खाण । आपलें तें जन राखियेलें ।।तु.गा.०३७५.००२ ।।
आधारेंविण जें बोलतां चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ।।तु.गा.०३७५.००३ ।।
सांडितां मारग मारिती पाईक । आणिकांसी शीक लागावया ।।तु.गा.०३७५.००४ ।।
तुका म्हणे विश्वा घेऊनि विश्वास । पाईक तयास सुख देती ।।तु.गा.०३७५.००५ ।।
पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टा ।।तु.गा.०३७६.००१ ।।
तो एक पाईक पाईकां नाईक । भाव सकळीक स्वामिकाजीं ।।तु.गा.०३७६.००२ ।।
तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाईका त्या भिन्न नाहीं स्वामी ।।तु.गा.०३७६.००३ ।।
विश्वासावांचूनि पाईकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोललिया ।।तु.गा.०३७६.००४ ।।
तुका म्हणे नये स्वामी उणेपण । पाईक जतन करी त्यासी ।।तु.गा.०३७६.००५ ।।
धनी ज्या पाईका मानितो आपण । तया भितें जन सकळिक ।।तु.गा.०३७७.००१ ।।
जिवाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणी ।।तु.गा.०३७७.००२ ।।
आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव । भोगिती गौरव सकळसुख ।।तु.गा.०३७७.००३ ।।
कमाईची हीणें पडिली उदंड । नाहीं तया खंड येती जाती ।।तु.गा.०३७७.००४ ।।
तुका म्हणे तरी पाईकीच भली । थोडीबहु केली स्वामीसेवा ।।तु.गा.०३७७.००५ ।।
पाईकपणे खरा मुशारा । पाईक तो खरा पाइकीनें ।।तु.गा.०३७८.००१ ।।
पाईक तों जाणे मारितें अंग । पाइकासी भंग नाहीं तया ।।तु.गा.०३७८.००२ ।।
एके दोहीं घरीं घेतली खाणें । पाईक तो पणें निवडला ।।तु.गा.०३७८.००३ ।।
करूनि कारण स्वामी यश द्यावें । पाईका त्या नांवें खरेपण ।।तु.गा.०३७८.००४ ।।
तुका म्हणे ठाव पाइका निराळा । नाहीं स्वामिस्थळा गेल्याविण ।।तु.गा.०३७८.००५ ।।
उंच नीच कैसी पाईकाची ओळी । कोण गांढ्या बळी निवडला ।।तु.गा.०३७९.००१ ।।

स्वामिकाजीं एक सर्वस्वें तत्पर। एक ते कुचर आशाबद्ध।।तु.गा.०३७९.००२।।
प्रसंगावांचूनि आणिती आविर्भाव। पाईक तो नांव मिरवी वायां।।तु.गा.०३७९.००३।।
गणतीचे एक उंच नीच फार। तयांमध्यें शूर विरळा थोडा।।तु.गा.०३७९.००४।।
तुका म्हणे स्वामी जाणे त्यांचा मान। पाईक पाहोन मोल करी।।तु.गा.०३७९.००५।।
एकाच स्वामीचे पाईक सकळ। जैसें तैसें बळ मोल तया।।तु.गा.०३८०.००१।।
स्वामिपदीं एकां ठाव उंच स्थळीं। एक तीं निराळी जवळी दुरी।।तु.गा.०३८०.००२।।
हीन कमाईचा हीन आन ठाव। उंचा सर्व भाव उंच पद।।तु.गा.०३८०.००३।।
पाईकपणें तो सर्वत्र सरता। चांग तरी परता गांढ्या वाव।।तु.गा.०३८०.००४।।
तुका म्हणे मरण आहे या सकळां। भेणें अवकळा अभयें मोल।।तु.गा.०३८०.००५।।
प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाठीं एक जैसे तैसे।।तु.गा.०३८१.००१।।
आगळें पाऊल आणिकासी तारी। पळती माघारीं तोडिजेती।।तु.गा.०३८१.००२।।
पाठीवरी घाय म्हणती फटमर। निधडा अंगें शूर मान पावे।।तु.गा.०३८१.००३।।
घेईल दरवडा देहा तो घाईक । मारी सकळिक सर्व हरी।।तु.गा.०३८१.००४।।
तुका म्हणे नव्हे बोलाचें कारण। कमाईचा पण सिद्धी पावे।।तु.गा.०३८१.००५।।
जातीचा पाईक ओळखे पाईका। आदर तो एका त्याचे ठायीं।।तु.गा.०३८२.००१।।
धरितील पोटासाठीं हतियारें। कळती तीं खरें वेठीचींसीं।।तु.गा.०३८२.००२।।
जातीचें तें असें खरें घायडाय। पारखिया काय पाशीं लोपे।।तु.गा.०३८२.००३।।
तुका म्हणे नमूं देव म्हूण जना। झालियांच्या खुणा जाणतसों।।तु.गा.०३८२.००४।।
काय धर्म नीत। तुम्हां शिकवावें हित।।तु.गा.०३८३.००१।।
अवघें रचियेलें हेळा। लीळा ब्रह्मांड सकळा।।तु.गा.०३८३.००२।।
नाम महादेव। येथें निवडला भाव।।तु.गा.०३८३.००३।।
तुका म्हणे वेळे। माझें तुम्हां कां न कळे।।तु.गा.०३८३.००४।।
भांडावें तें गोड। पुरे सकळही कोड।।तु.गा.०३८४.००१।।

ऐसा घरिचिया मोळा। ठावा निकटां जवळां ।।तु.गा.०३८४.००२ ।।
हांक देतां दारीं। येती जवळी सामोरीं ।।तु.गा.०३८४.००३ ।।
तुका म्हणे शिवें। मागितलें हातीं द्यावें ।।तु.गा.०३८४.००४ ।।
रामा वनवास। तेणें वसे सर्व देश ।।तु.गा.०३८५.००१ ।।
केलें नामाचे जतन। समर्थ तो नव्हे भिन्न ।।तु.गा.०३८५.००२ ।।
वनांतरी रडे। ऐसे पुराणीं पवाडे ।।तु.गा.०३८५.००३ ।।
तुका म्हणे ऋषिनेम। ऐसा कळोनि कां भ्रम ।।तु.गा.०३८५.००४ ।।
राम म्हणे वाट चाली। यज्ञ पाउलापाउलीं ।।तु.गा.०३८६.००१ ।।
धन्य धन्य तें शरीर। तीर्थव्रतांचें माहेर ।।तु.गा.०३८६.००२ ।।
राम म्हणे करितां धंदा। सुखसमाधि त्या सदा ।।तु.गा.०३८६.००३ ।।
राम म्हणे ग्रासोग्रासीं। तोचि जेविला उपवासी ।।तु.गा.०३८६.००४ ।।
राम म्हणे भोगीं त्यागीं। कर्म न लिंपे त्या अंगीं ।।तु.गा.०३८६.००५ ।।
ऐसा राम जपे नित्य। तुका म्हणे तो जीवन्मुक्त ।।तु.गा.०३८६.००६ ।।
तारी ऐसे जड। उदकावरी तो दगड ।।तु.गा.०३८७.००१ ।।
तो हा न करी तें काई। कां रे लीन व्हाना पायीं ।।तु.गा.०३८७.००२ ।।
शिळा मनुष्य झाली। ज्याच्या चरणाचे चाली ।।तु.गा.०३८७.००३ ।।
वानरां हातीं लंका। घेवविली म्हणे तुका ।।तु.गा.०३८७.००४ ।।
राम म्हणतां रामचि होइजे। पदीं बैसोन पदवी घेइजे ।।तु.गा.०३८८.००१ ।।
ऐसें सुख वचनीं आहे। विश्वासें अनुभव पाहें ।।तु.गा.०३८८.००२ ।।
रामरसाचिया चवी। आन रस रुचती केवीं ।।तु.गा.०३८८.००३ ।।
तुका म्हणे चाखोनि सांगें। मज अनुभव आहे अंगें ।।तु.गा.०३८८.००४ ।।
रामराम उत्तम अक्षरें। कंठीं धरिलीं आपण शंकरें ।।तु.गा.०३८९.००१ ।।
कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां। हळाहळ शीतळ केलें शिवा देखा ।।तु.गा.०३८९.००२ ।।

हाचि मंत्र उपदेश भवानी। तिच्या चुकल्या गर्भांधयोनि।।तु.गा.०३८९.००३।।
जुनाट नागर नीच नवें। तुका म्हणे म्यां धरिलें जीवें भावें।।तु.गा.०३८९.००४।।
राम म्हणतां तरे जाणता नेणता। हो का यातिभलता कुळहीन।।तु.गा.०३९०.००१।।
राम म्हणतां न लगे आणिक सायास। केले महादोष तेही जळती।।तु.गा.०३९०.००२।।
राम म्हणे तया नये जवळी भूत। कैंचा यमदूत म्हणतां राम।।तु.गा.०३९०.००३।।
राम म्हणतां तरे भवसिंधुपार। चुके येरझार म्हणतां राम।।तु.गा.०३९०.००४।।
तुका म्हणे हेंचि सुखाचें साधन। सेवीं अमृतपान एका भावें।।तु.गा.०३९०.००५।।
पैल आला राम रावणासी सांगती। काय निदसुरा निजलासी भूपति।।तु.गा.०३९१.००१।।
अवघे लंकेमाजीं झाले रामाचे दूत। व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत।।तु.गा.०३९१.००२।।
अवघे अंगलग तुझे वधियेले वीर। होईं शरणागत किंवा युद्धासी सादर।।तु.गा.०३९१.००३।।
तुका म्हणे एक्या भावें रामासी भेटी। करूनी घेईं आतां या संबंधेंशीं तुटीं।।तु.गा.०३९१.००४।।
समरंगणा आला। रामें रावण देखिला।।तु.गा.०३९२.००१।।
कैसे भिडतील दोन्ही। नांव सारूनियां रणीं।।तु.गा.०३९२.००२।।
प्रेमसुखाचें संधान। बाणें निवारिती बाण।।तु.गा.०३९२.००३।।
तुकयास्वामी रघुनाथ। वर्म जाणोनि केली मात।।तु.गा.०३९२.००४।।
केला रावणाचा वध। अवघा तोडिला संबंध।।तु.गा.०३९३.००१।।
लंकाराज्य बिभीषणा। केली चिरकाळ स्थापना।।तु.गा.०३९३.००२।।
औदार्याची सीमा। काय वर्णूं रघुरामा।।तु.गा.०३९३.००३।।
तुका म्हणे माझा दाता। रामें सोडविली सीता।।तु.गा.०३९३.००४।।
रामरूप केली। रामें कौसल्या माउली।।तु.गा.०३९४.००१।।
राम राहिला मानसीं। ध्यानीं चिंतनीं जयासी। राम होय त्यासी। संदेह नाहीं भरंवसा।।तु.गा.०३९४.००२।।
अयोध्येचे लोक। राम झाले सकळीक।।तु.गा.०३९४.००३।।
स्मरतां जानकी। रामरूप झाले कपि।।तु.गा.०३९४.००४।।

रावणेंशीं लंका। राम आपण झाला देखा।।तु.गा.०३९४.००५ ।।
ऐसा नित्य राम ध्याय। तुका वंदी त्याचे पाय।।तु.गा.०३९४.००६ ।।
आनंद झाला अयोध्येसी आला रघुनाथ। अवघा जयजयकार आळंगिला भरत।।तु.गा.०३९५.००१ ।।
आनंदले लोक नरनारी परिवार। शंखभेरीतुरें वाद्यांचे गजर।।तु.गा.०३९५.००२ ।।
करिती अक्षयवाणें ओंवाळिती रघुवीरा। लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा।।तु.गा.०३९५.००३ ।।
झालें रामराज्य आनंदलीं सकळें। तुका म्हणे गाईवत्सें नरनारी बाळें।।तु.गा.०३९५.००४ ।।
झालें रामराज्य काय उणें आम्हांसी। धरणी धरी पीक गाई वोळल्या म्हैसी।।तु.गा.०३९६.००१ ।।
राम वेळोवेळां आम्ही गाऊं ओविये। दळितां कांडितां जेवितां गे बाइये।।तु.गा.०३९६.००२ ।।
स्वप्नींही दु:ख कोणी न देखे डोळां। नामाच्या गजरें भय सुटलें कळिकाळा।।तु.गा.०३९६.००३ ।।
तुका म्हणे रामें सुख दिलें आपलें। तयां गर्भवासीं येणें जाणें खुंटलें।।तु.गा.०३९६.००४ ।।
अहल्या जेणें तारिली रामें। गणिका परलोका नेली नामें।।तु.गा.०३९७.००१ ।।
रामहरे रघुराजहरे। रामहरे महाराजहरे।।तु.गा.०३९७.००२ ।।
कंठ शीतळ जपतां शूळपाणी। राम जपे अविनाश भवानी।।तु.गा.०३९७.००३ ।।
तारक मंत्र श्रवण काशी। नाम जपतां वाल्मिक ऋषि।।तु.गा.०३९७.००४ ।।
नामजप बीजमंत्र नळा। सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा।।तु.गा.०३९७.००५ ।।
नामजप जीवन मुनिजना। तुकयास्वामी रघुनंदना।।तु.गा.०३९७.००६ ।।
मी तों अल्प मतिहीन। काय वर्णूं तुझे गुण। उदकीं तारिले पाषाण। हें महिमान नामाचें।।तु.गा.०३९८.००१ ।।
नाम चांगलें चांगलें। माझे कंठीं राहों भलें। कपिकुळ उद्धरिलें। मुक्त केलें राक्षसां।।तु.गा.०३९८.००२ ।।
द्रोणागिरि कपिहातीं। आणविला सीतापती। थोर केली ख्याती। भरतभेटीसमयीं।।तु.गा.०३९८.००३ ।।
शिळा होती मनुष्य झाली। थोर कीर्ति वाखाणिली। लंका दहन केली। हनुमंतें काशानें।।तु.गा.०३९८.००४ ।।
राम जानकीजीवन। योगियांचें निजध्यान। राम राजीवलोचन। तुका चरण वंदितो।।तु.गा.०३९८.००५ ।।
केली सीताशुद्धि। मूळ रामायणा आधीं।।तु.गा.०३९९.००१ ।।
ऐसा प्रतापी गहन। सकळ भक्तांचें भूषण।।तु.गा.०३९९.००२ ।।

जाऊनि पाताळा। केली देवीची अवकळा ।।तु.गा.०३९९.००३ ।।
राम लक्षुमण। नेले आणिलें चोरून ।।तु.गा.०३९९.००४ ।।
जोडूनियां कर। उभा सन्मुख समोर ।।तु.गा.०३९९.००५ ।।
तुका म्हणे जपें। वायुसुतां जातीं पापें ।।तु.गा.०३९९.००६ ।।
काम बांदवडी। काळ घातला तोडरीं ।।तु.गा.०४००.००१ ।।
तया माझे दंडवत। कपिकुळीं हनुमंत ।।तु.गा.०४००.००२ ।।
शरीर वज्राऐसें । कवळीं ब्रह्मांड जो पुच्छें ।।तु.गा.०४००.००३ ।।
रामाच्या सेवका। शरण आलों म्हणे तुका ।।तु.गा.०४००.००४ ।।
हनुमंत महाबळी। रावणाची दाढी जाळी ।।तु.गा.०४०१.००१ ।।
तया माझा नमस्कार। वारंवार निरंतर ।।तु.गा.०४०१.००२ ।।
करोनि उड्डाण। केलें लंकेचें शोधन ।।तु.गा.०४०१.००३ ।।
जाळियली लंका। धन्य धन्य म्हणे तुका ।।तु.गा.०४०१.००४ ।।
शरण शरण जी हनुमंता। तुज आलों रामदूता ।।तु.गा.०४०२.००१ ।।
काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ।।तु.गा.०४०२.००२ ।।
शूर आणि धीर। स्वामिकाजी तूं सादर ।।तु.गा.०४०२.००३ ।।
तुका म्हणे रुद्रा। अंजनीचिया कुमरा ।।तु.गा.०४०२.००४ ।।
गजेंद्र तो हस्ती सहस्त्र वरुषें। जळामाजी नक्रें पीडिलासे ।।तु.गा.०४०३.००१ ।।
सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे। अंतीं वाट पाहे विठो तुझी ।।तु.गा.०४०३.००२ ।।
कृपेच्या सागरा माझ्या नारायणा। तया दोघांजणां तारियेलें ।।तु.गा.०४०३.००३ ।।
तुका म्हणे नेले वाहूनि विमानीं। मीही आइकोनि विश्वासलो ।।तु.गा.०४०३.००४ ।।
गजइंद्र पशु आप्तें मोकलिला। तो तुज स्मरला पांडुरंगा ।।तु.गा.०४०४.००१ ।।
त्यासाठीं गरुड सांडुनि धांवसी। माया झळंबसी दीनानाथा ।।तु.गा.०४०४.००२ ।।
धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी। तैसें गजेंद्रासी सोडविलें ।।तु.गा.०४०४.००३ ।।

तुका म्हणे ब्रीद बांधला यासाठीं। भक्तांसी संकटीं रक्षावया ।।तु.गा.०४०४.००४ ।।
व्यभिचारिणी गणिका असतां कुंटणी। विश्वास तिचे मनीं राघोबाचा ।।तु.गा.०४०५.००१ ।।
ऐसीही पापिणी वाहिली विमानीं। अचळ भुवनीं ठेवियेली ।।तु.गा.०४०५.००२ ।।
पतितपावन तिहीं लोकीं ठसा। कृपाळू कोंवसा अनाथांचा ।।तु.गा.०४०५.००३ ।।
तुका म्हणे धरा विठोबाची सोय। आणिक उपाय नेणों किती ।।तु.गा.०४०५.००४ ।।
टंवकारूनि दृष्टि लावूनियां रंग। दावी झगमग डोळ्यापुढें।।तु.गा.०४०६.००१ ।।
म्हणती शिष्यासी लागली समाधि। लटकीच उपाधि झकवितीं।।तु.गा.०४०६.००२ ।।
दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज। उपदेश सांजरात्रीमाजी ।।तु.गा.०४०६.००३ ।।
रांगोळिया चौक श्रृंगारूनि वोजा। आवरणपूजा यंत्र करी ।।तु.गा.०४०६.००४ ।।
पडदा लावोनियां दीप चहूं कोनी । बैसोनि आसनीं मुद्रा दावी ।।तु.गा.०४०६.००५ ।।
नैवेद्यासी म्हणे करावें पक्वान्न। पात्रासी दिव्यान्न परवडी ।।तु.गा.०४०६.००६ ।।
झाला उपदेश कवळ घ्या रे मुखीं। आपोशन शेखीं बुडविलें ।।तु.गा.०४०६.००७ ।।
पाषांड करोनि मांडिली जीविका। बुडवी भाविकां लोकांप्रति ।।तु.गा.०४०६.००८ ।।
कायावाचामनें सोडवी संकल्प। गुरु गुरु जप प्रतिपादी ।।तु.गा.०४०६.००९ ।।
शुद्ध परमार्थ बुडविला तेणें। गुरुत्वभूषणें भग भोगी ।।तु.गा.०४०६.०१० ।।
विधीचाही लोप बुडविला वेद। शास्त्रांचाही बोध हरविला ।।तु.गा.०४०६.०११ ।।
योगाची धारणा नाहीं प्राणायाम। सांडी यम नेम नित्यादिक ।।तु.गा.०४०६.०१२ ।।
वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप। वाढविलें पाप मतिलंडें ।।तु.गा.०४०६.०१३ ।।
तुका म्हणे गेलें गुरुत्व गुखाडी। पूर्वजांसी धाडी नरकवासा ।।तु.गा.०४०६.०१४ ।।
गुरुमार्गामुळें भ्रष्ट झाले सकळ। म्हणती यातीकुळ नाहीं ब्रह्मीं ।।तु.गा.०४०७.००१ ।।
पवित्राला म्हणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ।।तु.गा.०४०७.००२ ।।
डोहोर लोहार दासी बलुती बारा। उपदेशिती फारा रांडापोरें ।।तु.गा.०४०७.००३ ।।
कांहीं टाण्या टोंण्या विप्रशिष्य होती। उघडी फजिती स्वधर्माची ।।तु.गा.०४०७.००४ ।।

नसता करूनि होम खाती एके ठायीं। म्हणती पाप नाहीं मोक्ष येणें।।तु.गा.०४०७.००५।।
इंद्रियांचे पेटे भला कौल देती। मर्यादा जकाती माफ केली।।तु.गा.०४०७.००६।।
नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणें। उपदेशून घेणें द्रव्य कांहीं।।तु.गा.०४०७.००७।।
तुका म्हणे ऐसे गुरुशिष्य जाण। विठोबाची आण नरका जाती।।तु.गा.०४०७.००८।।
शाक्त गधडा जये देशीं। तेथें राशी पापाच्या।।तु.गा.०४०८.००१।।
सुकृताचा उदो केला। गोंधळ घाला इंद्रियें।।तु.गा.०४०८.००२।।
क्रोधरूपें वसे काम। तिचें नाम जपतसे।।तु.गा.०४०८.००३।।
मद्यभक्षण मांगिणजाती। विटाळ चित्तीं सांठविला।।तु.गा.०४०८.००४।।
स्तवूनियां पूजी रांड। न लगे भांड दाढीसी।।तु.गा.०४०८.००५।।
तुका म्हणे भगवती। नेइल अंतीं आपणापें।।तु.गा.०४०८.००६।।
राजा प्रजा द्वाड देश। शाक्त वास करितो तो।।तु.गा.०४०९.००१।।
अधर्माचें उघड पीक। धर्म रंक ते गांवीं।।तु.गा.०४०९.००२।।
न पिके भूमि कांपें भारें। मेघ वारें पीतील।।तु.गा.०४०९.००३।।
तुका म्हणे अवघीं दुःखें। येती सुखें वस्तीसी।।तु.गा.०४०९.००४।।
ऐका कलींचें हें फळ। पुढें होइल ब्रह्मघोळ।।तु.गा.०४१०.००१।।
चारी वर्ण अठरा याती। भोजन करिती एके पंक्ती।।तु.गा.०४१०.००२।।
पूजिती असुरा रांडा। मद्य प्राशितील पेंडा।।तु.गा.०४१०.००३।।
वाम कवळ मार्जन। जन जाईल अधःपतन।।तु.गा.०४१०.००४।।
तुका हरिभक्ती करी। शक्ति पाणी वाहे घरीं।।तु.गा.०४१०.००५।।
ऐसें कलियुगाच्या मुळें। झालें धर्माचें वाटोळें।।तु.गा.०४११.००१।।
सांडूनियां रामराम। ब्राह्मण म्हणती दोम दोम।।तु.गा.०४११.००२।।
शिवों नये तीं निळीं। वस्त्रें पांघरती काळीं।।तु.गा.०४११.००३।।
तुका म्हणे वृत्ति। सांडुनि गदा मागत जाती।।तु.गा.०४११.००४।।

अवघ्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ।।तु.गा.०४१२.००१ ।।
त्याचा विटाळ नको अंगा। पांडुरंगा माझिया ।।तु.गा.०४१२.००२ ।।
काम क्रोध मद्य अंगीं। रंगला रंगीं अवगुणी ।।तु.गा.०४१२.००३ ।।
करितां पाप न धरी शंका। म्हणे तुका कोणीही ।।तु.गा.०४१२.००४ ।।
वारितां बळें धरितां हातीं। जुलुमें जाती नरकामधीं ।।तु.गा.०४१३.००१ ।।
रंडीदासाप्रति कांहीं। उपदेश तोही चालेना ।।तु.गा.०४१३.००२ ।।
जन्म गेला वाताहात। थोर घात ते ठायीं ।।तु.गा.०४१३.००३ ।।
तुका म्हणे पंढरीनाथा। तुझी कथा दूषीती ।।तु.गा.०४१३.००४ ।।
शाक्ताची शूकरी माय। विष्ठा खाय बिदीची ।।तु.गा.०४१४.००१ ।।
तिची त्या पडली सवे। मागें धांवे म्हणोनि ।।तु.गा.०४१४.००२ ।।
शाक्ताची गाढवी माय। भुंकत जाय वेसदारा ।।तु.गा.०४१४.००३ ।।
तुका म्हणे सिंदळीचे। बोलतां वाचे निंद्य ते ।।तु.गा.०४१४.००४ ।।
हरिहर सांडूनि देव। धरिती भाव क्षुल्लकीं ।।तु.गा.०४१५.००१ ।।
ऐका त्याची विटंबना। देवपणा भक्तांची ।।तु.गा.०४१५.००२ ।।
अंगीं कवडे घाली गळां। परडी कळाहीन हातीं ।।तु.गा.०४१५.००३ ।।
गळा गाठा हिंडे द्वारीं। मनुष्य परी कुतरीं तीं ।।तु.गा.०४१५.००४ ।।
माथां सेंदुर दांत खाती। जेंगट हातीं सटवीचे ।।तु.गा.०४१५.००५ ।।
पूजिती विकट दोंद। पशु सोंड गजाची ।।तु.गा.०४१५.००६ ।।
ऐशा छंदें चुकलीं वाटा। भाव खोटा भजन ।।तु.गा.०४१५.००७ ।।
तुका म्हणे विष्णु शिवा। वांचूनि देवा भजती ते ।।तु.गा.०४१५.००८ ।।
कांद्यासाठीं झालें ज्ञान। तेणें जन नाडिलें ।।तु.गा.०४१६.००१ ।।
कामक्रोध बुचबुची। भुंके पुची व्यालीची ।।तु.गा.०४१६.००२ ।।
पूजेलागीं द्रव्य मागे। काय सांगे शिष्यातें ।।तु.गा.०४१६.००३ ।।

तुका म्हणे कैंचें ब्रह्म। अवघा भ्रम विषयांचा ।।तु.गा.०४१६.००४ ।।
सांडूनिया पंढरीराव। कवणाते म्हणों देव ।।तु.गा.०४१७.००१ ।।
बहु लाज वाटे चित्ता। आणिकांतें देव म्हणतां ।।तु.गा.०४१७.००२ ।।
सांडूनियां हिरा। कोणें वेचाव्या त्या गारा ।।तु.गा.०४१७.००३ ।।
तुका म्हणे हरिहर। ऐसी सांडूनियां धुर ।।तु.गा.०४१७.००४ ।।
बहुत गेलीं वायां । न भजतां पंढरीराया ।।तु.गा.०४१८.००१ ।।
करिती कामिकांची सेवा। लागोन मागोन खात्या देवा ।।तु.गा.०४१८.००२ ।।
अवघियांचा धनी। त्यासी गेली विसरोनि ।।तु.गा.०४१८.००३ ।।
तुका म्हणे अंतीं। पडती यमाचिया हातीं ।।तु.गा.०४१८.००४ ।।
असो आतां ऐसा धंदा। तुज गोविंदा आठवूं ।।तु.गा.०४१९.००१ ।।
रक्षिता तूं होसी जरी। तरी काय येरी करावें ।।तु.गा.०४१९.००२ ।।
काया वाचा मन पायीं। राहे ठायीं करूं तें ।।तु.गा.०४१९.००३ ।।
तुका म्हणे गाइन गीतीं। रूप तें चित्तीं धरूनियां ।।तु.गा.०४१९.००४ ।।
नाहीं आम्ही विष्णुदास। करीत आस कोणाची ।।तु.गा.०४२०.००१ ।।
कां हे नष्ट करिती निंदा। नेणों सदा आमुची ।।तु.गा.०४२०.००२ ।।
असों भलते ठायीं मनें। समाधानें आपुल्या ।।तु.गा.०४२०.००३ ।।
तुका म्हणे करूं देवा। तुझी सेवा धंदा तो ।।तु.गा.०४२०.००४ ।।
तुजवांचुनि मागणें काय कोणा। महीमंडळीं व्यापक विश्व जाणा। जीवभावना पुरवूं कोण जाणे। तुजवांचुनि होत कां रावराणे ।।तु.गा.०४२१.००१ ।।
नसे मोक्षदाता तिहींमाजि लोकां। भवतारकु तुजवांचूनि एका। मनीं मानसीं चिंतितां रूपनाम। पळे पाप ताप भयें नासे काम ।।तु.गा.०४२१.००२ ।।
हरी नाम हें साच तुझें पुराणी। हरी हातिचें काळगर्भादियोनी। करूं मुखवाणी कसी देशधाडी। तुजवांचुनि वर्णितां व्यर्थ गोडी ।।तु.गा.०४२१.००३ ।।
भवभंजना व्यापका लोक तिन्ही। तुज वर्णिता शीणला शेषफणी। असो जीव भाव तुझ्या सर्व पायीं। दुजें मागणें आणिक व्यर्थ काई ।।तु.गा.०४२१.००४ ।।
दीनानाथ हे साक्ष तुझी जनासी। दीनें तारिलीं पातकी थोर दोषी। तुका राहिला पायीं तो राख देवा। असें मागतों तुमची पादसेवा ।।तु.गा.०४२१.००५ ।।

उभा भींवरेच्या तिरीं राहिलाहे। असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे। पळे पाप महा सुटे कांप थोर। कसे गर्जती घोष हे नामवीर।।तु.गा.०४२२.००१।।
गुणगंभीर धीर हा हास्यमुख। वदे वदनीं अमृत सर्वसुख। मुनि लागिं लागे बहू गोड चित्तीं। देहभावना तुटलियाचि खंती।।तु.गा.०४२२.००२।।
ठसा घातला ये भूमिमाजी थोर। इच्छादान तें द्यावयासी उदार। सिद्धि वोळंगती जया सर्वठायीं। तुझें नाम हें चांगलें गे विठाई।।तु.गा.०४२२.००३।।
असे उघडा हा विटेवरी उभा। धरूनि कटसूत्र हें भक्तिलोभा। पुढें वाट दावी भवसागराची। विठो माउली सिद्ध हे साधकांची।।तु.गा.०४२२.००४।।
करा वेगु होता धरा पंथ आधीं। जया पार नाहीं सुखा तेंच साधीं। म्हणे तुका पंढरीये सर्व आलें। असे विश्व हें जीवनें त्याच ज्यालें।।तु.गा.०४२२.००५।।
धना गुंतलें चित्त माझें मुरारी। मन घेऊनि हिंडवी दारोदारीं। मन हिंडतां न पुरे यासी कांहीं। मही ठेंगणी परि तें तृप्ति नाहीं।।तु.गा.०४२३.००१।।
पाहतां न दिसे निज शुद्ध मती। पुढें पडिलों इंद्रियां थोर घातीं। जिवा नास त्या संगती दंड बेडी। हरी शीघ्र या दुष्टसंगासि तोडी।।तु.गा.०४२३.००२।।
अशीं आणिकें काय सांगों अनंता। मोहो पापिणी दुष्टमाया ममता। काम क्रोधही यातना थोर करी। तुजवांचुनि सोडवी कोण हरी।।तु.गा.०४२३.००३।।
निजदेखतां निज हे दूरि जाये। निज आळस दंभ या भीत आहे। तयां वस्ति देहीं नको देऊं देवा। तुजवांचुनि आणिक नास्ति हेवा।।तु.गा.०४२३.००४।।
करीं घातपात भय लाज थोरी। असे सत्य भाव बहू भक्ति दूरी। नको मोकलूं दीनबंधु अनाथा। तुका विनवी ठेवुनि पायीं माथा।।तु.गा.०४२३.००५।।
पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें। शिरीं तुंबिलीं साजिरीं मोरपिसें। हरे त्यासि देखतां ताप माया। भजा रे भजा यादवा योगिराजा।।तु.गा.०४२४.००१।।
जया कामिनी लुब्धल्या सहस्त्रसोळा। सुकुमार त्या गोपिका दिव्य बाळा। शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी। रुपा मीनली साजिरी माळ कंठीं।।तु.गा.०४२४.००२।।
तया यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणि। जया वंदिती कोटि तेहतीस तिन्ही। महाकाळ हे कांपती दैत्य ज्यासी। पाहा सांवळें रूप हें पाप नासी।।तु.गा.०४२४.००३।।
कशी पाउलें साजिरी कुंकुमाची। कशी वीट हे लागली दैवाची। जया चिंतितां अग्नी हा शांति नीवे। धरावा मानसीं आपल्या दृढभावें।।तु.गा.०४२४.००४।।
मुनी देखतां मूख हें चित्त माये। देह मांडला भाव हा बाप माय। तुक्या लागलें मानसीं देवपिसें। चित्त चोरटें सांवळें रूप कैसें।।तु.गा.०४२४.००५।।
असे नांदतु हा हरी सर्वजीवीं। असे व्यापुनि अग्नि काष्ठांत तेवीं। घटीं बिंबलें बिंब हें ठायिंठायीं। तया संगती नासु हा त्यासि नाहीं।।तु.गा.०४२५.००१।।
तृण वाटितां क्षीर हें होत नाहीं। पशू भक्षितां पालटे तेंचि देहीं। तया वर्म तों जाणता एक आहे। असे व्यापक व्यापुनि अंतर्बाहे।।तु.गा.०४२५.००२।।
फळ कर्दळीं सेवटीं येत आहे। असे शोधितां पोकळीमाजि काये। धीर नाहीं तें वाउगें धीग झालें। फळ पुष्प ना यत्न ते व्यर्थ गेले।।तु.गा.०४२५.००३।।
असे नाम हें दर्पणें सिद्ध केलें। असे बिंब तें या मळाआड ठेलें। कसें शुद्ध नाहीं दिसे माजि रूप। नका वाढवूं सीण हा पुण्यपाप।।तु.गा.०४२५.००४।।
करा वर्म ठावें नका सोंग वायां। तुका विनवितो पडों काय पायां। त्यजी पुत्र दारा धन वासना हे। मग ऊरलें शेवटीं काय पाहें।।तु.गा.०४२५.००५।।
मना सांडि हे वासना दुष्ट खोडी। मतीं मानसीं एक हें व्यर्थ गोडी। असे हीत माझें तुज कांहीं एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें पायीं सुख।।तु.गा.०४२६.००१।।

असा सर्वभावें तुज शरण आलों। देहदु:ख हें भोगितां फार भ्यालों। भवतारितें दुसरें नाहीं कोणी। गुरु होत कां देव आणीक तिन्ही ।।तु.गा.०४२६.००२ ।।

जना वासना हे धना थोरि आहे। तुज लागली संगती तेचि सोये। करी सर्व संगीं परित्यागु ठायीं। तुका विनवी ठेवूनि शीर पायीं ।।तु.गा.०४२६.००३ ।।

ऐका संतजन उत्तर माझे बोबडे बोल। करीं लाड तुम्हांपुढें हो कोणी झणी कोपाल ।।तु.गा.०४२७.००१ ।।

उपाय साधन आइका कोण गति अवगति। दृढ बैसोनि सादर तुम्हीं धरावें चित्तीं ।।तु.गा.०४२७.००२ ।।

धर्म तयासीच घडे रे ज्याचे स्वाधीन भाज। कर्म तयासी जोडे रे भीत नाहीं लाज ।।तु.गा.०४२७.००३ ।।

पुण्य तें जाणा रे भाईंनों परोपकाराचें। परपीडा परनिंदा रे खरें पाप तयाचें ।।तु.गा.०४२७.००४ ।।

लाभ तयासीच झाला रे मुखीं देव उच्चारी। प्रपंचा पाठीं गुंतला रे हानी तयासी थोरी ।।तु.गा.०४२७.००५ ।।

सुख ते जाणा रे भाइंनों संतसमागम। दु:ख तें जाणा रे भाइंनों सम तेथें विषम ।।तु.गा.०४२७.००६ ।।

साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धि। पराधीना आहे घात रे थोर जाण संबंधी ।।तु.गा.०४२७.००७ ।।

मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें राखे। अपमानी तो अधररसस्वाद चाखे ।।तु.गा.०४२७.००८ ।।

जाणता तयासी बोलती जाणे सारलक्षण। नेणता तया बोलिजे वाद करी भूषण ।।तु.गा.०४२७.००९ ।।

भला तोचि एक जाणा रे गयावर्जन करी। बुरा नष्ट धन मेळवी परद्वार जो करी ।।तु.गा.०४२७.०१० ।।

आचारी अन्न काढी रे गाई अतितविभाग। अनाचारी करी भोजन ग्वाही नसतां संग ।।तु.गा.०४२७.०११ ।।

स्वहित तेणेचि केलें रें भूतीं देखिला देव। अनहित तयाचें झालें रे आणी अहंभाव ।।तु.गा.०४२७.०१२ ।।

धन्य तेचि जन्मा आले रे एक हरीचे दास। धिग ते विषयीं गुंतलें केला आयुष्या नाश ।।तु.गा.०४२७.०१३ ।।

जोहरी तोचि एक जाणा रे जाणे सिद्धलक्षणें। वेडसरु तो भुले रे वरदळभूषणें ।।तु.गा.०४२७.०१४ ।।

बळियाढा तोचि जाणा रे भक्ति दृढ शरीरीं। गांढ्या तयासी बोलिजे एक भाव न धरी ।।तु.गा.०४२७.०१५ ।।

खोल तो वचन गुरुचें जो गिळूनि बैसे। उथळ धीर नाहीं अंगीं रे म्हणे होईल कैसें ।।तु.गा.०४२७.०१६ ।।

उदार तोचि जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं। कृपण तयासी बोलिजे पडे उपाधिठाईं ।।तु.गा.०४२७.०१७ ।।

चांगलेपण तेंचि रे ज्यांचें अंतर शुद्ध। ओंगळ मळीन अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ।।तु.गा.०४२७.०१८ ।।

गोड तेंचि एक आहे रे सार विठ्ठलनाम। कडू तो संसार रे लक्षचौऱ्यांशीं जन्म ।।तु.गा.०४२७.०१९ ।।

तुका म्हणे मना धरीं रे संतसंगतिसोई। नलगे कांहीं करावें राहें विठ्ठलपायीं ।।तु.गा.०४२७.०२० ।।

तुका बस्तर बिचारा क्या करो रे। अंतर भगवान होय। भीतर मैला कब मिटो रे। मरे उपर धोय ।।तु.गा.०४२८.००१ ।।

रामराम कहे रे मन। औरसुं नहिं काज। बहुत उतारे पार। आगें राखे तुकाकी लाज।।तु.गा.०४२८.००२।।

लोभीके चित्त धन बैठे। कामिनीके चित्त काम। माताके चित्त पूत बैठें। तुकाके मन राम।।तु.गा.०४२८.००३।।

तुका पंखि बहिर न मानुं। वोहि जनावर बाग। असंतनकुं संतन मानुं। जे वर्मकु दाग।।तु.गा.०४२८.००४।।

तुका राम बहुत मिठा रे। भर राखु शरीर। तनकी करूं नावरि। उतारुं पैल तीर।।तु.गा.०४२८.००५।।

संत पन्हयां ले खडा। राहूं ठाकुरद्वार। चलत पाछें हुं फिरों। रज उडत लेऊं सीर।।तु.गा.०४२८.००६।।

तुका प्रभु बडो न मनूं न मानूं बडो। जिसपास बहु दाम। बलिहारि उस मुखकी। जिस्ते निकसे राम।।तु.गा.०४२८.००७।।

राम कहे सो मुख भलारे। खाये खीर खांड। हरिबिन मुखमो धूल परी रे। क्या जनी उस रांड।।तु.गा.०४२८.००८।।

राम कहे सो मुख भला रे। बिन रामसे बीख। अब न जानूं मते बेरों। जब काल लगावे सीख।।तु.गा.०४२८.००९।।

कहे तुका मैं सवदा बेचूं। लेवेके तन हार। मिठा साधुसंतजन रे । मूरखके सिर मार।।तु.गा.०४२८.०१०।।

तुका दास तिनका रे। रामभजन निरास। क्या बिचारे पंडित करो रे। हात पसारे आस।।तु.गा.०४२८.०११।।

तुका प्रीत रामसुं। तैसी मिठा राख। पतंग जाय दीपपरे। करे तनकी खाक ।।तु.गा.०४२८.०१२।।

कहे तुका जग भुला रे। कह्या न मानत कोय। हात परे जब कालके । मारत फोरत डोय।।तु.गा.०४२८.०१३।।

तुका सुरा नहिं सबदका रे। जब कमाई न होय। चोट साहे घनकी रे। हिरा नीबरे तोय।।तु.गा.०४२८.०१४।।

तुका सुर बहुत कहावे। लडत बिरला कोय। एक पावे ऊंच पदवी। एक खौंसा जोय।।तु.गा.०४२८.०१५।।

तुका माऱ्या पेटका। और न जाने कोय। जपतां कछु रामनाम। हरिभगतनकी सोय।।तु.गा.०४२८.०१६।।

काफर सोही आपन बुझे। अल्ला दुनियां भर। कहे तुका तुम्ही सुनो रे भाई। हिरदा जिन्हका कठोर।।तु.गा.०४२८.०१७।।

भीस्त न पाइये मालथी। पढिया लोक रिझाये। निचा जथें कमतारिव। सोही सो फल खाये।।तु.गा.०४२८.०१८।।

फल पाया तो सुख भया। किन्होसो न करे विवाद। वान न देखे मिरगी । चित्त मिलाया नाद।।तु.गा.०४२८.०१९।।

तुका दास रामका । मनमे एक हि भाव। तो न पालट आव। ये हि तन जाव।।तु.गा.०४२८.०२०।।

तुका रामसुं चित्त बांधराखो। तैसा आपने हात। धेनु बछरा छोर जावे। प्रेम न सुटे सात।।तु.गा.०४२८.०२१।।

चित्तसुं चित्त जब मिले। तब तन थंडा होय। तुका मिलना जिन्हेसुं। ऐसा बिरला कोय।।तु.गा.०४२८.०२२।।

चित्त मिले तो सब मिले। नहिं तो फुकट संग। पानी पाथर एक ठोर। कोरा न भिजे अंग।।तु.गा.०४२८.०२३।।

तुका संगत तिनसें कहिये। जिनसें सुख दुनाय। दुर्जन तेरा मुख काला। थीता प्रेम घटाये।।तु.गा.०४२८.०२४।।

तुका मिलना तो भला। मनसुं मन मिल जाय। उपर उपर मट्टी घसनी। उनकी कोन बऱ्हाई।।तु.गा.०४२८.०२५।।
तुका कुटुंब छोरे रे। लरके जोरों सिर मुंदाय। जब थे इच्छा नहिं मुई। तब तूं किया काय।।तु.गा.०४२८.०२६।।
तुका इच्छा मिटाई तो। काहा करे जट खाक। मथीया गोला डारदिया तो। नहिं मिले फेरन ताक।।तु.गा.०४२८.०२७।।
ब्रीद मेरे साइयाके। तुका चलावे पास। सुरा सु हि लरे हमसें। छोरे तनकी आस।।तु.गा.०४२८.०२८।।
कहे तुका भला भया। हम हूं संतनका दास। क्या जानूं केते मरते। वो न मिटती मनकी आस।।तु.गा.०४२८.०२९।।
तुका और मिठाई क्या करूं रे। पाले विकार पिंड। राम कहावे सो भली रुखी। माखन खीर खांड।।तु.गा.०४२८.०३०।।
क्या गाऊं कोई सुननेवाला। देखें तो सब जगही भुला।।तु.गा.०४२९.००१।।
खेलों आपने रामहिसात। जैसी वैसी कर रहूं मात।।तु.गा.०४२९.००२।।
काहांसे लाऊं मधुरा बानी। रीझे ऐसी लोक बिरानी।।तु.गा.०४२९.००३।।
गिरिधर लाल तो भावका भुका। राग कला नहिं जानत तुका।।तु.गा.०४२९.००४।।
छोडे धन मंदिर बन बसाया। मांगत टुका घरघर खाया।।तु.गा.०४३०.००१।।
तीनसों हम करवों सलाम। ज्यामुख बैठा राजाराम।।तु.गा.०४३०.००२।।
तुलसीमाला बभूत चऱ्हावे। हरजीके गुण निर्मल गावे।।तु.गा.०४३०.००३।।
कहे तुका जो साईं हमारा। हिरनकश्यप जिन्हे मारहि डारा।।तु.गा.०४३०.००४।।
मंत्रतंत्र नहिं मानत साखी। प्रेमभाव नहिं अंतर राखी।।तु.गा.०४३१.००१।।
राम कहे त्याके पग हूं लागूं। देखत कपट अभिमान दूर भागूं।।तु.गा.०४३१.००२।।
अधिक जाती कुल नहिं जानूं। जाने नारायण सो प्राणी मानूं।।तु.गा.०४३१.००३।।
कहे तुका जीव तन धन डारू वारी। राम उपासहुं बलियारी।।तु.गा.०४३१.००४।।
हरिसूं मिल दे एकही बेर। पाछे तूं फेर नावे घर।।तु.गा.०४३२.००१।।
मात सुनों दुति आवे मनावन। जाया करती भर जोबन।।तु.गा.०४३२.००२।।
हरिसुख मोहि कहिया न जाय। तब तूं बुझे आगो पाय।।तु.गा.०४३२.००३।।
देखहि भाव कछु पकरी हात। मिलाई तुका प्रभुसात।।तु.गा.०४३२.००४।।
क्या कहूं नहिं बुझत लोका। लिजावे जम मारत धका।।तु.गा.०४३३.००१।।

क्या जीवनकी पकरी आस। हातों लिया नहिं तेरा घास।।तु.गा.०४३३.००२।।

किसे दिवाने कहता मेरा। कछु जावे तब तूं सब ल्या न्यारा।।तु.गा.०४३३.००३।।

कहे तुका तूं भया दिवाना। आपना विचार करले जना।।तु.गा.०४३३.००४।।

कब मरूं पाऊं चरन तुम्हारे। ठाकुर मेरे जीवन प्यारे।।तु.गा.०४३४.००१।।

जग डरे ज्याकुं सो मोहि मीठा। मीठा दर आनंदसाहि पैठा।।तु.गा.०४३४.००२।।

भला पाऊं जनम इन्हे बेर। सब मायाके असंग फेर।।तु.गा.०४३४.००३।।

कहे तुका धन मानहि दारा। वोहि लिये गुंडली पसारा।।तु.गा.०४३४.००४।।

दासों पाछें दौरे राम। सोवे खडा आपे मुकाम।।तु.गा.०४३५.००१।।

प्रेम रसडी बांधी गले। खैच चले तब मोही उधर।।तु.गा.०४३५.००२।।

आपने जनसुं भुल न देवे। करहि धर आगे बाट बतावे।।तु.गा.०४३५.००३।।

तुका प्रभु दीनदयाला। वारि रे तुज पर हुं गोपाला।।तु.गा.०४३५.००४।।

ऐसा कर घर आवे राम। और धंदा सब छोर हि काम।।तु.गा.०४३६.००१।।

इतने गोते काहे खातां। जब तूं आपना भूल न होता।।तु.गा.०४३६.००२।।

अंतरजामी जानत साचा। मनमें एक उपर बाचा।।तु.गा.०४३६.००३।।

तुका प्रभु देशबिदेश। भरिया खालीं नहि लेस।।तु.गा.०४३६.००४।।

मेरे रामको नाम जो लेवे बारोबार। त्याके पाऊं मेरे तनकी पैंजार।।तु.गा.०४३७.००१।।

हांसत खेलत चालत वाट। खाना खातें सोतें खाट।।तु.गा.०४३७.००२।।

जातनसुं मुझें कछु नहिं प्यार। असतके नहिं हिंदु धेड चंभार।।तु.गा.०४३७.००३।।

ज्याका चित्त लगा मेरे रामको नाम। कहे तुका मेरा चित्त लगा त्याके पाव।।तु.गा.०४३७.००४।।

आप तरे त्याकी कोन बऱ्हाई। औरनकुं भलो नाम धराई।।तु.गा.०४३८.००१।।

काहे भूमि इतना भार राखे। दुभत धेनु नहिं दुध चाखे।।तु.गा.०४३८.००२।।

बरसत मेघ फलतहि बिरखा। कोन काम आपनीं उन्हो तिरखा।।तु.गा.०४३८.००३।।

काहे चंदा सुरज खावे फेरा। खिन एक बैठ न पावत घेरा।।तु.गा.०४३८.००४।।

काहे परिस कंचन करे धातु। नहिं मोल तुटत पावत घातु ।।तु.गा.०४३८.००५ ।।

कहे तुका उपकार हि काज। सब कर रहिया रघुराज ।।तु.गा.०४३८.००६ ।।

जग चले उस घाट कोन जाय। नहिं समजत फिर फिर गोंते खाय ।।तु.गा.०४३९.००१ ।।

नहिं एक दो सब संसार। जो बुझे सो आगला स्वार ।।तु.गा.०४३९.००२ ।।

उपर स्वार बैठे तृष्णापीठ। नहिं वाचे कोई जावे लूट ।।तु.गा.०४३९.००३ ।।

देखहि डर फेर बैठा तुका। जोवत मारग रामहि एका ।।तु.गा.०४३९.००४ ।।

भले रे भाई जिन्हें किया चीज। अछा नहिं मिलत वीज ।।तु.गा.०४४०.००१ ।।

फीरतफीरत पाया सारा। मीठत लोले धन किनारा ।।तु.गा.०४४०.००२ ।।

तीरथ बरत फिर पाया जोग। नहिं तलमल तुटत भवरोग ।।तु.गा.०४४०.००३ ।।

कहे तुका मैं ताको दास। नहिं सिरभार चलावें पास ।।तु.गा.०४४०.००४ ।।

लाल कंबली वोढे पेनाये। मोसु हरिथे कैसें बनाये ।।तु.गा.०४४१.००१ ।।

कहे सखि तुझें करीते सोर। हिरदा हरिका कठिन कठोर ।।तु.गा.०४४१.००२ ।।

नहिं क्रिया सरम कछु लाज। और सुनाऊं बहुत हे भाज ।।तु.गा.०४४१.००३ ।।

और नामरूप नहिं गोवलिया। तुका प्रभु माखन खाया ।।तु.गा.०४४१.००४ ।।

राम कहो जीवना फल सो ही। हरिभजनसुं विलंब न पाई ।।तु.गा.०४४२.००१ ।।

कवनका मंदिर कवनकी झोपरी। एक रामबिन सबहि फुकरी ।।तु.गा.०४४२.००२ ।।

कवनकी काया कवनकी माया। एक रामबिन सबहि जाया ।।तु.गा.०४४२.००३ ।।

कहे तुका सबही चलनार। एक रामबिन नहिं वोसार ।।तु.गा.०४४२.००४ ।।

काहे भुला धनसंपत्ती घोरे। रामनाम सुन गाऊं हो बापु रे ।।तु.गा.०४४३.००१ ।।

राजे लोक सब कह तूं आपना। जब काल नहिं पाया ठाना ।।तु.गा.०४४३.००२ ।।

माया मिथ्या मनका सब धंदा। तेजो अभिमानू भजो गोविंदा ।।तु.गा.०४४३.००३ ।।

राना रंक डोंगरकी राई। कहे तुका कर हिलाई ।।तु.गा.०४४३.००४ ।।

काहे रोवे आगले मरना। गंव्हार तूं भुला आपना ।।तु.गा.०४४४.००१ ।।

केते मालुम नहिं पडे। नन्हे बडे गये सो।।तु.गा.०४४४.००२।।
बाप माई लेखा नहिं। पाछें तूं हि चलनार।।तु.गा.०४४४.००३।।
काले बाल सोपत भये। खबर पकरो तुका कहे।।तु.गा.०४४४.००४।।
क्या मेरे राम कवन सुख सारा। कहकर दे पुछूं दास तुम्हारा।।तु.गा.०४४५.००१।।
तनजोबनकी कोन बऱ्हाई। व्याधिपीडा दिस काटहि खाई।।तु.गा.०४४५.००२।।
कीर्त बधाऊं तो नाम न मेरा। काहे झुटा पछताऊं घेरा।।तु.गा.०४४५.००३।।
कहे तुका नहिं समजत मात। तुम्हारे शरन जोरत ही हात।।तु.गा.०४४५.००४।।
देखत अखों झुटा कोरा। तो काहे छोरा घरबार।।तु.गा.०४४६.००१।।
मनसुं किया चाहिये पाख। उपर खाक पसारा।।तु.गा.०४४६.००२।।
कामक्रोधसो संसार। वो सिरभार चलावे।।तु.गा.०४४६.००३।।
कहे तुका सो संन्यास। छोडे आस तनकी हि।।तु.गा.०४४६.००४।।
रामभजन सब सार मिठाई। हरि संताप जनमदुख राई।।तु.गा.०४४७.००१।।
दुधभात घृत साकरपारे। हरते भुक नहि अंततारे।।तु.गा.०४४७.००२।।
खावते जुग सब चलिजावे। खाटमिठा फिर परचत आवे।।तु.गा.०४४७.००३।।
कहे तुका रामरस जो पावे। बहुरी फेरा वो कबहु न खावे।।तु.गा.०४४७.००४।।
बारबार काहे मरत अभागी। बहुरी मरनसे क्या तोरे भागी।।तु.गा.०४४८.००१।।
ये हि तन करते क्या ना होय। भजन भगति कर वैकुंठ जाय।।तु.गा.०४४८.००२।।
रामनाम मोल नहिं बेचे कबरि। वो हि सब माया छुरावत झगरी।।तु.गा.०४४८.००३।।
कहे तुका मनसुं मिल राखो। रामरस जिव्हा नित चाखो।।तु.गा.०४४८.००४।।
करूनि विनवणी पायीं ठेवितों माथा। परिसावी विनंती माझी पंढरीनाथा।।तु.गा.०४४९.००१।।
अखंडित असावेसें वाटतें पायीं। साहोनि संकोच ठाव थोडासा देईं।।तु.गा.०४४९.००२।।
असो नसो भाव आलों तुझिया ठाया। कृपादृष्टी पाहे मजकडे पंढरीराया।।तु.गा.०४४९.००३।।
तुका म्हणे तुझीं आम्ही वेडीं वाकुडीं। नामें भवपाश हातें आपुल्या तोडी।।तु.गा.०४४९.००४।।

बोलोनियां दाऊं कां तुम्ही नेणां जी देवा। ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन।।तु.गा.०४५०.००१।।
पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय। म्हणऊनि पाय जीवीं धरूनि राहिलों।।तु.गा.०४५०.००२।।
त्याग भोग दु:ख काय सांडावें मांडावें। ऐसी धरियेली जीवें माझ्या थोर आशंका।।तु.गा.०४५०.००३।।
तुका म्हणे माता बाळ चुकलिया वनीं। न पवतां जननी दु:ख पावे विठ्ठले।।तु.गा.०४५०.००४।।
ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ। कांहो कळवळा तुम्हां उमटेचि ना।।तु.गा.०४५१.००१।।
अहो पांडुरंगे पंढरीचे निवासे। लावूनियां आसे चाळवूनि ठेविलें।।तु.गा.०४५१.००२।।
काय जन्मा येऊनियां केली म्यां जोडी। ऐसें घडोघडी चित्ता येते आठवूं।।तु.गा.०४५१.००३।।
तुका म्हणे खरा न पवेचि विभाग। धिक्कारितें जग हेंचि लाहें हिशोबें।।तु.गा.०४५१.००४।।
माझें चित्त तुझे पायीं। राहे ऐसें करीं कांहीं। धरोनियां बाहीं। भव हा तारीं दातारा।।तु.गा.०४५२.००१।।
चतुरा तूं शिरोमणि। गुणलावण्याचि खाणी। मुगुट सकळां मणि। धन्य तूंचि विठोबा।।तु.गा.०४५२.००२।।
करीं तिमिरांचा नाश। उदयो होउनि प्रकाश। तोडीं आशापाश। करीं वास हृदयीं।।तु.गा.०४५२.००३।।
पाहें गुंतलों नेणतां। माझी असो तुम्हा चिंता। तुका ठेवी माथा। पायीं आतां राखावें।।तु.गा.०४५२.००४।।
कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन। काय तुझी हीन शक्ति जालीसे दिसे।।तु.गा.०४५३.००१।।
लाज येते मना तुझा म्हणवितां दास। गोडी नाहीं रस बोलिलीयासारिखी।।तु.गा.०४५३.००२।।
लाजविलीं मागें संतांचीं ही उत्तरें। कळों येते खरें दुजें एकावरूनि।।तु.गा.०४५३.००३।।
तुका म्हणे माझी कोणीं वदविली वाणी। प्रसादावांचूनि तुमचिया विठ्ठला।।तु.गा.०४५३.००४।।
जळो माझें कर्म वायां केली कटकट। झालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा।।तु.गा.०४५४.००१।।
आतां पुढें धीर काय देऊं या मना। ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे।।तु.गा.०४५४.००२।।
गुणवंत केलों दोष जाणायासाठीं। माझें माझें पोटीं बळकट दूषण।।तु.गा.०४५४.००३।।
तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा। बरवा हा ळळा पाळियेला शेवटीं।।तु.गा.०४५४.००४।।
कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख। बहु वाटे दु:ख फुटों पाहे हृदय।।तु.गा.०४५५.००१।।
कां गा सासुरवासी मज केलें भगवंता। आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं।।तु.गा.०४५५.००२।।
प्रभातेसी वाटे तुमच्या यावें दर्शना। येथें न चले चोरी उरली राहे वासना।।तु.गा.०४५५.००३।।

येथें अवघे वायां गेले दिसती सायास। तुका म्हणे नास दिसे झाल्या वेचाचा।।तु.गा.०४५५.००४।।
जळोत तीं येथें उपजविती अंतराय। सायासाची जोडी माझी तुमचे पाय।।तु.गा.०४५६.००१।।
आतां मज साह्य येथें करावे देवा। तुझी घेईं सेवा सकळ गोवा उगवूनि।।तु.गा.०४५६.००२।।
भोगें रोगा जोडोनियां दिले आणिकां। अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनि।।तु.गा.०४५६.००३।।
तुका म्हणे असो तुझें तुझें मस्तकी। नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें।।तु.गा.०४५६.००४।।
न सांगतां तुम्हां कळों येतें अंतर। विश्वीं विश्वंभर परिहारचि नलगे।।तु.गा.०४५७.००१।।
परि हे अनावर आवरितां आवडी। अवसान ते घडी पुरों एकी देत नाहीं।।तु.गा.०४५७.००२।।
काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं। पोटा आलों तईंपासूनियां समर्थे।।तु.गा.०४५७.००३।।
तुका म्हणे अवघी आवरिली वासना। आतां नारायणा दुसरियापासुनि।।तु.गा.०४५७.००४।।
तुजसवें आम्ही अनुसरलों अबळा। नको अंगीं कळा राहों हरी हीन देऊं ।।तु.गा.०४५८.००१।।
सासुरवासा भीतो जीव ओढे तुजपाशीं। आतां दोहींविशीं लज्जा राखें आमुची।।तु.गा.०४५८.००२।।
न कळतां संग झाला सहज खेळतां। प्रवर्तली चिंता मागिलाचि यावरी।।तु.गा.०४५८.००३।।
तुका म्हणे असतां जैसें तैसें बरवे। वचन या भावें वेचूनियां विनटलों।।तु.गा.०४५८.००४।।
तुझें दास्य करूं आणिका मागों खावया। धिग् झालें जिणें माझें पंढरीराया।।तु.गा.०४५९.००१।।
काय गा विठोबा तुज आतां म्हणावें। शुभाशुभ गोड तुम्हां थोरांच्या दैवें।।तु.गा.०४५९.००२।।
संसाराचा धाक निरंतर आम्हांसी। मरण भलें परि काय अवकळा ऐसी।।तु.गा.०४५९.००३।।
तुझा शरणागत शरण जाऊं आणिकांसी। तुका म्हणे लाज कवणा हें कां नेणसीं।।तु.गा.०४५९.००४।।
झाली पाकसिद्धि वाट पाहे रखुमाई। उदक तापलें डेरां चीकसा मर्दूद्या पाईं।।तु.गा.०४६०.००१।।
उठा पांडुरंगा उशीर झाला भोजनीं। उभ्या आंचवणा गोपिका कळस घेऊनि।।तु.गा.०४६०.००२।।
अवघ्या सावचित्त सेवेलागीं सकळा। उद्धव अक्रूर आले पाचारूं मूळा।।तु.गा.०४६०.००३।।
सावरिली सेज सुमनयाति सुगंधा। रत्नदीप ताटी वाळा विडिया विनोदा।।तु.गा.०४६०.००४।।
तुका विनंति करी पाहे पंढरीराणा। असा सावचित्त सांगे सकळ जनां।।तु.गा.०४६०.००५।।
उठा सकळ जन उठिले नारायण। आनंदले मुनिजन तिन्ही लोक ।।तु.गा.०४६१.००१।।

करा जयजयकार वाद्यांचे गजर। मृदंग अपार टाळ घोळ।।तु.गा.०४६१.००२।।
जोडोनियां कर मुख पाहा सादर। पायांवरी शिर ठेवूनियां।।तु.गा.०४६१.००३।।
तुका म्हणे काय पढियें तें तें मागा। आपुलालें सांगा सुखदु:ख।।तु.गा.०४६१.००४।।
घडिया घालूनि तळीं चालती वनमाळी। उमटती कोवळीं कुंकमाचीं।।तु.गा.०४६२.००१।।
वंदा चरणरज अवघे सकळ जन। तारियेले पाषाण उदकीं जेणें।।तु.गा.०४६२.००२।।
पैस धरूनि चाला ठाकत ठायीं ठायीं। मौन्य धरूनि कांहीं न बोलावें।।तु.गा.०४६२.००३।।
तुका अवसरु जाणवितो पुढें। उघडली महाल मंदिरें कवाडें।।तु.गा.०४६२.००४।।
भीतरी गेले हरि राहा क्षणभरी। होइल फळ धींर करावा।।तु.गा.०४६३.००१।।
न करीं त्वरा ऐकें मात। क्षण एक निवांत बैसावें।।तु.गा.०४६३.००२।।
करूनियां मर्दन सारिलें पाणी। न्हाले देव अंग पुसी भवानी।।तु.गा.०४६३.००३।।
नेसला सोनसळा विनवी रखुमाई। वाढिलें आतां ठायीं चलावें जी।।तु.गा.०४६३.००४।।
करूनियां भोजन घातलें आंचवण। आनंदें नारायण पहुडले।।तु.गा.०४६३.००५।।
तुका मात जाणवी आतां। सकळां बहुतां होती चित्तीं।।तु.गा.०४६३.००६।।
द्या जी आम्हां कांहीं सांगा जी रखुमाई। शेष उरलें तें ठायीं सनकादिकां।।तु.गा.०४६४.००१।।
टोकत बाहेरी बैसलों आशा। पुराया ग्रासा एकमेकां।।तु.गा.०४६४.००२।।
येथवरी आलों तुझिया नांवें। आस करूनि आम्ही दातारा।।तु.गा.०४६४.००३।।
प्रेम देऊनि बहुडा दिला। तुका म्हणे आतां विठ्ठल बोला।।तु.गा.०४६४.००४।।
बहुडविले जन मन झालें निश्चळ। चुकवूनि कोल्हाळ आला तुका।।तु.गा.०४६५.००१।।
पर्यंकीं निद्रा करावें शयन। रखुमाई आपण समवेत।।तु.गा.०४६५.००२।।
घेऊनियां आलों हातीं टाळ वीणा। सेवेसी चरणा स्वामीचिया।।तु.गा.०४६५.००३।।
तुका म्हणे आतां परिसावी सादरे। बोबडीं उत्तरें पांडुरंगा।।तु.गा.०४६५.००४।।
नाचे गाणें माझा जवळील ठाव। निरोपिन भाव होईल तो।।तु.गा.०४६६.००१।।
तुम्हां निद्रा मज आज्ञा ते स्वभावें। उतरूनि जिवें जाइन लोण।।तु.गा.०४६६.००२।।

एकाएकीं बहु करीन सुस्वरें। मधुर उत्तरें आवडीनें।।तु.गा.०४६६.००३ ।।
तुका म्हणे तूं जगदानी उदार। फेडशील भार एक वेळे।।तु.गा.०४६६.००४ ।।
पावला प्रसाद आतां उठोनि जावें। आपुलाले श्रम कळों येताती भावें।।तु.गा.०४६७.००१ ।।
आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा। पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा।।तु.गा.०४६७.००२ ।।
तुम्हांसी जागवूं आम्ही आपुलिया चाडा। शुभाशुभ कर्मे दोष हरावया पीडा।।तु.गा.०४६७.००३ ।।
तुका म्हणे दिलें उच्छिष्टाचें भोजन। नाहीं निवडिलें आम्हां आपणा भिन्न।।तु.गा.०४६७.००४ ।।
शब्दांचिया रत्नें करूनि अलंकार। तेणें विश्वंभर पूजियेला।।तु.गा.०४६८.००१ ।।
भावाच्या उपचारें करूनि भोजन। तेणें नारायण जेवविला।।तु.गा.०४६८.००२ ।।
संवसारा हातीं दिलें आंचवण। मुखशुद्धी मन समर्पिलें।।तु.गा.०४६८.००३ ।।
रंगली इंद्रियें सुरंग तांबुलें। माथां तुळसीदळ समर्पिलें।।तु.गा.०४६८.००४ ।।
एकभावदीप करूनि निरांजन। देऊनी आसन देहाचें या।।तु.गा.०४६८.००५ ।।
न बोलोनि तुका करी चरणसेवा। निजविलें देवा माजघरीं।।तु.गा.०४६८.००६ ।।
उठोनियां तुका गेला निजस्थळा। उरले राउळामाजी देव।।तु.गा.०४६९.००१ ।।
नेउल झालें सेवका स्वामींचे। आज्ञे करूनि चित्त समाधान।।तु.गा.०४६९.००२ ।।
पहुडले हरी अनंत शयनावरी। तेथें नाहीं उरी कांहीं काम।।तु.गा.०४६९.००३ ।।
अवघियां बाहेर घालूनि गेला तुका। सांगितलें लोकां निजले देव।।तु.गा.०४६९.००४ ।।
तुम्हीं जावें निजमंदिरा। आम्ही जातों आपुल्या घरा।।तु.गा.०४७०.००१ ।।
विठोबा लोभ असों देईं। आम्ही असों तुमचे पाईं।।तु.गा.०४७०.००२ ।।
चित्त करी सेवा। आम्ही जातों आपुल्या गांवा।।तु.गा.०४७०.००३ ।।
तुका म्हणे दिशा भुललों। फिरोन पायापाशीं आलों।।तु.गा.०४७०.००४ ।।
पाहें प्रसादाची वाट। द्यावें धोवोनियां ताट।।तु.गा.०४७१.००१ ।।
शेष घेऊनि जाईन। तुमचे झालिया भोजन।।तु.गा.०४७१.००२ ।।
झालों एकसवा। तुम्हां आडूनियां देवा।।तु.गा.०४७१.००३ ।।

तुका म्हणे चित्त। करूनि राहिलों निश्चिंत।।तु.गा.०४७१.००४।।
केली कटकट गाऊं नाचों नेणतां। लाज नाहीं भय आम्हां पोटाची चिंता।।तु.गा.०४७२.००१।।
बैसा सिणलेती पाय रगडूं दातारा। जाणवूं द्या वारा उब झाली शरीरा।।तु.गा.०४७२.००२।।
उशीरा उशीर किती काय म्हणावा। जननिये बाळका कोप कांहीं न धरावा।।तु.गा.०४७२.००३।।
तुझिये संगती आम्ही करूं कोल्हाळ। तुका म्हणे बाळें अवघे मिळोन गोपाळ।।तु.गा.०४७२.००४।।
आरुष शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं। लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई।।तु.गा.०४७३.००१।।
देईं गे विठाबाई प्रेमभातुकें। अवघियां कवतुकें लहानां थोरां सकळां।।तु.गा.०४७३.००२।।
सांडूनियां भीड धीटपणातें वाणी। घेतलें पाहिजे केलें लेंकुरें तें कानीं।।तु.गा.०४७३.००३।।
तुका म्हणे थोड्यासाठीं काशाची अटि। झाली असे भेटी धुरेसंवसाटी।।तु.गा.०४७३.००४।।
आड केलें देवद्वार। व्यर्थ काय करकर।।तु.गा.०४७४.००१।।
आतां चला जाऊं घरा। नका करूं उजगरा।।तु.गा.०४७४.००२।।
देवा लागलीसे निज। येथें उभ्या काय काज।।तु.गा.०४७४.००३।।
राग येतो देवा। तुका म्हणे नेघे सेवा।।तु.गा.०४७४.००४।।
गाऊं नाचूं विठो तुझा करूं अनुवाद। जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद।।तु.गा.०४७५.००१।।
आनंद रे विठोबा झाला माझे मनीं। देखिलीं लोचनीं विटेसहित पाउलें।।तु.गा.०४७५.००२।।
न करीं तपसाधन मुक्तीचे सायास। हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस।।तु.गा.०४७५.००३।।
तुका म्हणे आम्हां प्रेमा उणें तें काई। पंढरीचा राणा सांठविला हृदयीं।।तु.गा.०४७५.००४।।
कनकाच्या परियेळीं उजळुनि आरती। रत्नदीपप्रभा कैशा पाजळल्या ज्योती।।तु.गा.०४७६.००१।।
ओंवाळूं गे माये सबाह्य साजिरा। राहिरखुमाई सत्यभामेच्या वरा।।तु.गा.०४७६.००२।।
मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें। श्रीमुखाची शोभा पाहतां तेज फांकलें।।तु.गा.०४७६.००३।।
वैजयंती माळ गळां शोभे श्रीमंत। शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत।।तु.गा.०४७६.००४।।
सांवळा सकुमार जैसा कर्दळीगाभा। चरणींचीं नेपुरे वांकी गर्जती नभा।।तु.गा.०४७६.००५।।
ओवाळितां मन हें उभें ठाकलें ठायीं। समदृष्टि समान तुकया लागला पायीं।।तु.गा.०४७६.००६।।

जगदीश जगदीश तुज म्हणती। परि या जनामाजी असशील युक्ति । पुण्यपापाविरहित सकळां अधिपती। द्रष्टा परी नळणी अलिप्त गति ।।तु.गा.०४७७.००१ ।।

जय देव जय देव जय पंढरीनाथा श्रीपंढरीनाथा। नुरे पाप विठ्ठल म्हणतां सर्वथा ।।तु.गा.०४७७.००२ ।।

आगम निगम तुज नेणती कोणी। परि तूं भाव भक्ति जवळीच दोन्ही। नेणतां विधियुक्त ईश्वरातें पूजनीं। न माये ब्रह्मांडीं तो संपुष्टासनीं ।।तु.गा.०४७७.००३ ।।

असुरां काळ भासे विक्राळ पुढें। पसरीं मुख एक चावितों धुडें। भक्ता शरणागता चालतों पुढें। दावी वाट जाऊं नेदी वाकुडें ।।तु.गा.०४७७.००४ ।।

एकाएकीं बहु विस्तरला सुखें। खेळे त्याची लीला तोचि कवतुकें । तेथें हे नरनारी कवण बाळकें। काय पापपुण्य कवण सुखदु:खें ।।तु.गा.०४७७.००५ ।।

सकळ वर्मा तूंचि जाणशी एक । बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदु:ख। जाणों म्हणतां तुज ठकलीं बहुतेक । तुका म्हणे शरण आलों मज राख ।।तु.गा.०४७७.००६ ।।

दैत्यभारें पीडिली पृथ्वी बाळा। म्हणोनि तुज येणें झालें गोपाळा। भक्तिप्रतिपाळक उत्सव सोहळा। मंगळें तुज गाती अबळा बाळा ।।तु.गा.०४७८.००१ ।।

जय देव जय देव जय गरुडध्वजा। आरती ओवाळूं तुज भक्तिकाजा ।।तु.गा.०४७८.००२ ।।

गुण रूप नाम नाहीं जयासी। चिंतितांचि तैसा होसी तयांसी। मत्स्य कूर्म वराह नरसिंह झालासी। असुरां काळ मुनी ठाके ध्यानासी ।।तु.गा.०४७८.००३ ।।

सहस्त्र रूपें नाम सांवळा ना गोरा। श्रुति नेति म्हणती तुज विश्वंभरा। जीवना जीवन तूंचि होसी दातारा। न कळे पार ब्रह्मादिकां सुरवरां ।।तु.गा.०४७८.००४ ।।

संतां महंतां घरीं म्हणवी म्हणियारा। शंख चक्र गदा आयुधांचा भारा। सुदर्शन घरटी फिरे अवसरा। सकुमार ना स्थूळ होसी गोजिरा ।।तु.गा.०४७८.००५ ।।

भावेंविण तुझें न घडे पूजन। सकळही गंगा झाल्या तुजपासून। उत्पत्ति प्रलय तूंचि करिसी पालन। धरूनि राहिला तुका निश्चयें चरण ।।तु.गा.०४७८.००६ ।।

काय तुझा महिमा वर्णूं मी किती। नाममात्रें भवपाश तुटती। पाहातां पाउलें हे विष्णुमूर्ती। कोटिकुळांसहित जडजीव उद्धरती ।।तु.गा.०४७९.००१ ।।

जय देव जय देव जय पंढरिराया श्रीपंढरिराया। करूनियां कुरुवंडी सांडीन काया ।।तु.गा.०४७९.००२ ।।

मंगळआरतीचा थोर महिमा। आणीक द्यावया नाहीं उपमा। श्रीमुखासहित देखे जो कर्मा । पासुन सुटे जैसा रवि नासी तमा ।।तु.गा.०४७९.००३ ।।

धन्य व्रतकाळ हे एकादशी। जागरण उपवास घडे जयांसी। विष्णूचें पूजन एक भावेंसी। नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकांसी ।।तु.गा.०४७९.००४ ।।

न वजे वायां काळ जे तुज ध्याती। अखंड तुझा वास तयांच्या चित्तीं।  धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती। तीर्थें मलीन वास तयांचा पाहाती ।।तु.गा.०४७९.००५ ।।

देव भक्त तूंचि झालासी दोन्ही। वाढावया सुख भक्ति हे जनीं।  जड जीवां उद्धार व्हावया लागोनि। शरण तुका वंदीं पाउलें दोन्ही ।।तु.गा.०४७९.००६ ।।

पंढरी पुण्यभूमी भीमा दक्षिणवाहिनी। तीर्थ हे चंद्रभागा महापातकां धुनी।  उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ।।तु.गा.०४८०.००१ ।।

जय देवा पांडुरंगा जय अनाथनाथा। आरति ओंवाळीन तुम्हां लक्ष्मीकांता ।।तु.गा.०४८०.००२ ।।

नित्य नवा सोहळा हो महावाद्यांचें गजर। सन्मुख गरुडपारीं उभा जोडुनियां कर।  मंडितचतुर्भुज कटीं मिरवती कर ।।तु.गा.०४८०.००३ ।।

हरिनाम कीर्तन हो आनंद महाद्वारीं। नाचती प्रेमसुखें नर तेथींच्या नारी।  जीवन्मुक्त लोक नित्य पाहाती हरी ।।तु.गा.०४८०.००४ ।।

आषाढी कार्तिकी हो गरुडटकयांचे भार। गर्जती नामघोषें महावैष्णववीर।  पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ।।तु.गा.०४८०.००५ ।।

हें सुख पुंडलिकें कैसें आणिलें बापें। निर्गुण साकारलें आम्हांलागीं हें सोपें।  म्हणोनि चरण धरोनि तुका राहिला सुखें ।।तु.गा.०४८०.००६ ।।

अवतार गोकुळीं हो जन तारावयासी। लावण्यरूपडें हें तेज:पुंजाळरासी।  उगवतां कोटि बिंबें रवि लोपले शशी। उत्साव सुरवरां मही थोर मानसीं ।।तु.गा.०४८१.००१ ।।

जय देवा कृष्णनाथा जय रुक्मिणीकांता। आरती ओंवाळीन तुम्हां देवकीसुता।  जय देवा कृष्णनाथा ।।तु.गा.०४८१.००२ ।।

वसुदेवदेवकीची बंद फोडिली शाळ। होऊनि विश्वजनिता तया पोटींचें बाळ।  दैत्य हे त्रासियेले समूळ कंसासी काळ। राज्यया उग्रसेना केला मथुरापाळ ।।तु.गा.०४८१.००३ ।।

राखतां गोधनें हो इंद्र कोपला भारी। मेघ जो कडाडिला शिळा वर्षतां धारीं।  राखिलें गोकुळ हें नखीं धरूनियां गिरी। निर्भय लोकपाळ अवतरले हरी ।।तु.गा.०४८१.००४ ।।

कवतुक पहावया माव ब्रह्मयानें केली। वत्सेंही चोरूनियां सत्यलोकासी नेली।  गोपाळ गाईवत्सें दोन्हीं ठायीं राखीली। सुखाचा प्रेमसिंधु अनाथांची माउली ।।तु.गा.०४८१.००५ ।।

तारिलें भक्तजना दैत्य निर्दाळूनि। पांडवां साह्यकारी आडल्या निर्वाणीं।  गुण मी काय वर्णू मती येवढी वाणी। विनवितो दास तुका ठाव मागे चरणीं ।।तु.गा.०४८१.००६ ।।

सुंदर अंगकांती मुख भाळ सुरेख। बाणली उटी अंगीं टिळा साजिरा रेख।  मस्तकीं मुगुट कानीं कुंडलें तेज फांके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ।।तु.गा.०४८२.००१ ।।

जय देवा चतुर्भुजा जय लावण्यतेजा। आरती ओंवाळीन भवतारि हा वोजा ।।तु.गा.०४८२.००२ ।।

उदार जुंझार हा जया वाणिती श्रुति। परतल्या नेति म्हणती तयां न कळे गति। भाट हा चतुर्मुखें अनुवाद करिती। पांगलीं साही अठरा रूप न कळे गति।।तु.गा.०४८२.००३।।

ऐकोनि रूप ऐसें तुजलागीं धुंडिती। बोडके नग्न एक निराहार यति। साधनें योग नाना तपें दारुण किती। सांडिलें सुख दिलें संसाराची त्या शांति।।तु.गा.०४८२.००४।।

भरूनि माजी लोकां तिहीं नांदसी एक । कामिनीमनमोहना रूप नाम अनेक । नासती नाममात्रें भवपातकें शोक । पाउलें वंदिताती सिद्ध आणि साधक ।।तु.गा.०४८२.००५।।

उपमा द्यावयासी दुजें काय हें तुज। तत्त्वासी तत्त्वसार मूळ झालासी बीज। खेळसी बाळलीला अवतार सहज। विनवितो दास तुका कर जोडुनि तुज।।तु.गा.०४८२.००६।।

मागणें तें एक तुजप्रति आहे। देशी तरि पाहें पांडुरंगा।।तु.गा.०४८३.००१।।

या संतासी निरवीं हेंचि मज देईं। आणिक दुजें कांहीं न मागें तुज।।तु.गा.०४८३.००२।।

तुका म्हणे आतां उदार तूं होई। मज ठेवी पायीं संतांचिया।।तु.गा.०४८३.००३।।

करूनि आरती। आतां ओवाळूं श्रीपती।।तु.गा.०४८४.००१।।

आजी पुरले नवस। धन्य काळ हा दिवस।।तु.गा.०४८४.००२।।

पाहा वो सकळां। पुण्यवंता तुम्ही बाळा।।तु.गा.०४८४.००३।।

तुका वाहे टाळी। होता सन्निध जवळीं।।तु.गा.०४८४.००४।।

सत्य गुरुरायें कृपा मज केली। परि नाहीं घडली सेवा कांहीं।।तु.गा.०४८५.००१।।

सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना। मस्तकीं तो जाणा ठेविला कर।।तु.गा.०४८५.००२।।

भोजना मागती तूप पावशेर। पडिला विसर स्वप्नामाजीं।।तु.गा.०४८५.००३।।

काय कळे उपजला अंतराय। म्हणोनियां काय त्वरा झाली।।तु.गा.०४८५.००४।।

राघवचैतन्य केशवचैतन्य। सांगितली खूण माळिकेची।।तु.गा.०४८५.००५।।

बाबाजी आपुलें सांगितलें नाम। मंत्र दिला राम कृष्ण हरि।।तु.गा.०४८५.००६।।

माहो शुद्ध दशमी पाहुनि गुरुवार। केला अंगीकार तुका म्हणे।।तु.गा.०४८५.००७।।

माझिये मनींचा जाणोनियां भाव। तो करी उपाव गुरुरावो।।तु.गा.०४८६.००१।।

आवडीचा मंत्र सांगितला सोपा। जेणें नोहे गुंफा कांहीं कोठें।।तु.गा.०४८६.००२।।
जाती पुढें एक उतरले पार। हा भवसागर साधुसंत।।तु.गा.०४८६.००३।।
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी। उतार सांगडी तापे पेटे।।तु.गा.०४८६.००४।।
तुका म्हणे मज दावियेला तारू। कृपेचा सागरु पांडुरंग।।तु.गा.०४८६.००५।।
घालूनियां भार राहिलों निश्चिंती। निरविलें संतीं विठोबासी।।तु.गा.०४८७.००१।।
लावूनियां हात कुरवाळिला माथा। सांगितलें चिंता न करावी।।तु.गा.०४८७.००२।।
कटीं कर सम चरण साजिरे। राहिला भीवरेंतीरीं उभा।।तु.गा.०४८७.००३।।
खुंटले सायास आणीक या जीवा। धरिले केशवा पाय तुझें।।तु.गा.०४८७.००४।।
तुज वाटे आतां तें करीं अनंता। तुका म्हणे संतां लाज माझी।।तु.गा.०४८७.००५।।
माझिये मनींचा जाणा हा निर्धार। जिवासी उदार झालों आतां।।तु.गा.०४८८.००१।।
तुजविण दुजें न धरीं आणिका। भय लज्जा शंका टाकियेली।।तु.गा.०४८८.००२।।
ठायींचा संबंध तुज मज होता। विशेष अनंता केला संतीं।।तु.गा.०४८८.००३।।
जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं। हेचि आतां नाहीं लाज तुम्हां।।तु.गा.०४८८.००४।।
तुका म्हणे संतीं घातला हवाला। न सोडीं विठ्ठला पाय तुझें।।तु.गा.०४८८.००५।।
नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें। सवें पांडुरंगें येऊनियां।।तु.गा.०४८९.००१।।
सांगितलें काम करावें कवित्व। वाउगें निमित्य बोलों नको।।तु.गा.०४८९.००२।।
माप टाकी सळे धरिली विठ्ठलें। थापटोनि केलें सावधान।।तु.गा.०४८९.००३।।
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी। उरले ते शेवटीं लावी तुका।।तु.गा.०४८९.००४।।
द्याल ठाव तरी राहेन संगती। संतांचे पंगतीं पायांपाशीं।।तु.गा.०४९०.००१।।
आवडीचा ठाव आलोंसें टाकून। आतां उदासीन न धरावें।।तु.गा.०४९०.००२।।
शेवटील स्थळ नीच माझी वृत्ति। आधारें विश्रांती पावईन।।तु.गा.०४९०.००३।।
नामदेवापायीं तुकया स्वप्नीं भेटी। प्रसाद हा पोटीं राहिलासे।।तु.गा.०४९०.००४।।
भूतबाधा आम्हां घरीं। हें तों आश्चर्य गा हरी।।तु.गा.०४९१.००१।।

झाला भक्तीचा कळस। आले वसतीस दोष।।तु.गा.०४९१.००२।।
जागरणाचें फळ। दिली जोडोनि तळमळ।।तु.गा.०४९१.००३।।
तुका म्हणे देवा। आहाच कळों आली सेवा।।तु.गा.०४९१.००४।।
करूं कवित्व आतां काय नाहीं लाज। मज भक्तराज हांसतील।।तु.गा.०४९२.००१।।
आतां आला एका निवाड्याचा दिस। सत्याविण रस विरसला।।तु.गा.०४९२.००२।।
अनुभवाविण कोण करी पाप। रितेचि संकल्प लाज लावी।।तु.गा.०४९२.००३।।
तुका म्हणे आतां न धरवे धीर। नव्हे जीव स्थिर माझा मज।।तु.गा.०४९२.००४।।
पावावे संतोष। तुम्हीं यासाठीं सायास।।तु.गा.०४९३.००१।।
करीं आवडी वचनें। पालटूनि क्षणक्षणें।।तु.गा.०४९३.००२।।
द्यावें अभयदान। भूमी न पडावें वचन।।तु.गा.०४९३.००३।।
तुका म्हणे परस्परें। कांहीं वाढवी उत्तरें।।तु.गा.०४९३.००४।।
कांहींच न लगे आदि अवसान। बहुत कठिण दिसतसां।।तु.गा.०४९४.००१।।
अवघ्याच माझ्या वेचविल्या शक्ति। न चलेसी युक्ति झाली पुढें।।तु.गा.०४९४.००२।।
बोलिलें वचन हारपलें नभीं। उरलों तों उभीं आहों तैसीं।।तु.गा.०४९४.००३।।
तुका म्हणे कांहीं न करावेंसें झालें। थकितची ठेलें चित्त उगें।।तु.गा.०४९४.००४।।
केल्यापुरती आळी। कांहीं होते टाळाटाळी।।तु.गा.०४९५.००१।।
सत्यसंकल्पाचें फळ। होतां न दिसेचि बळ।।तु.गा.०४९५.००२।।
दळणाच्या ओंव्या। रित्या खड्या मापें घ्याव्या।।तु.गा.०४९५.००३।।
जातीं उखळें चाटूं। तुका म्हणे राज्य घाटूं।।तु.गा.०४९५.००४।।
स्तुति तरी काय करूं कोणापाशीं। कीर्ति तरी कैसी वाखाणावी।।तु.गा.०४९६.००१।।
खोट्या तंव नाहीं अनुवादाचें काम। उरला तो भ्रम वरी बरा।।तु.गा.०४९६.००२।।
म्हणवावें त्याची खूण नाहीं हातीं। अवकळा फजिती सावकाश।।तु.गा.०४९६.००३।।
तुका म्हणे हें गे तुमचें माझें तोंड। होऊनियां लंड आळवितों।।तु.गा.०४९६.००४।।

मागितल्यास पसरी कर। पळतां भरी वाखती।।तु.गा.०४९७.००१ ।।
काय आम्ही नेणों वर्म। केला श्रम नेणतां।।तु.गा.०४९७.००२।।
बोलतां बरें येतां रागा। कठीणा लागा मागें मागें।।तु.गा.०४९७.००३।।
तुका म्हणे येथें बोली। असे चाली उफराटी।।तु.गा.०४९७.००४।।
कशासाठीं बैसों करूनियां हाट। वाउगा बोभाट डांगोरा हा।।तु.गा.०४९८.००१ ।।
काय आलें एका जीवाच्या उद्धारें। पावशी उच्चारें काय हो तें।।तु.गा.०४९८.००२।।
नेदी पट्ट परी अन्नें तो न मारी। आपुलिये थोरीसाठीं राजा।।तु.गा.०४९८.००३।।
तुका म्हणे आतां अव्हेरिलें तरी। मग कोणा करी दुकान हा।।तु.गा.०४९८.००४।।
सांगा दास नोहे तुमचा मी कैसा। ऐसें पंढरीशा विचारूनि।।तु.गा.०४९९.००१ ।।
कोणासाठीं केली प्रपंचाची होळी। या पायां वेगळी मायबापा।।तु.गा.०४९९.००२।।
नसेल तों द्यावा सत्यत्वासी धीर। नये भाजूं हीर उफराटे।।तु.गा.०४९९.००३।।
तुका म्हणे आम्हां आहिक्य परत्रीं। नाहीं कुळगोत्रीं तुजविण।।तु.गा.०४९९.००४।।
असो तुझें तुजपाशीं। आम्हां त्यासी काय चाड।।तु.गा.०५००.००१ ।।
विरोधें कां कोंडूं मन। समाधान असोनि।।तु.गा.०५००.००२।।
करावा तो उरे आट। खटपट वाढतसे।।तु.गा.०५००.००३।।
तुका म्हणे येऊनि रागा। कां मी विभागा मुकेन।।तु.गा.०५००.००४।।
अनन्यासी ठाव एक सर्वकाज। एकाविण दुजें नेणें चित्त।।तु.गा.०५०१.००१ ।।
न पुरतां आळी देशधडी व्हावें। हें काय बरवें दिसतसे।।तु.गा.०५०१.००२।।
लेंकराचा भार माउलीचे शिरीं। निढळ तें दुरी धरिलिया।।तु.गा.०५०१.००३।।
तुका म्हणे किती घातली लांबणी। समर्थ होऊनि केवढ्यासाठीं।।तु.गा.०५०१.००४।।
आहे तेंचि पुढें पाहों । बरें आहों येथेंचि।।तु.गा.०५०२.००१ ।।
काय वाढवूनि काम। उगाच श्रम तृष्णेचा।।तु.गा.०५०२.००२।।
स्थिरावतां ओघीं बरें। चाली पुरें पडेना।।तु.गा.०५०२.००३।।

तुका म्हणे वळितां मन। आम्हां क्षण न लगे।।तु.गा.०५०२.००४।।
नाहीं जों वेचलों जिवाचिया त्यागें। तोंवरी वाउगें काय बोलों।।तु.गा.०५०३.००१।।
जाणवलें आतां करीं ये उद्देश। जोडी किंवा नाश तुमची जीवें।।तु.गा.०५०३.००२।।
ठायींचेचि आलें होतें ऐसें मना। जावें ऐसें वना दृढ झालें।।तु.गा.०५०३.००३।।
तुका म्हणे मग वेचीन उत्तरें। उद्देशिलें खरें झाल्यावरी।।तु.गा.०५०३.००४।।
कांहीं मागणें हें आम्हां अनुचित। वडिलांची रीत जाणतसों।।तु.गा.०५०४.००१।।
देह तुच्छ झालें सकळ उपाधी। सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे।।तु.गा.०५०४.००२।।
शब्द तो उपाधि अचळ निश्चय। अनुभव हा काय नाहीं अंगीं।।तु.गा.०५०४.००३।।
तुका म्हणे देह फांकिला विभागीं। उपकार अंगीं उरविला।।तु.गा.०५०४.००४।।
माझा मज नाहीं। आला उबग तो कांहीं।।तु.गा.०५०५.००१।।
तुमच्या नामाचें जतन। नव्हतां थोर वाटे सीण।।तु.गा.०५०५.००२।।
न पडावी निंदा। कानीं स्वामीची गोविंदा।।तु.गा.०५०५.००३।।
तुका म्हणे लाज। आम्हां स्वामीचें तें काज।।तु.गा.०५०५.००४।।
बोलतां वचन असा पाठमोरे। मग भाव बरे कळों आले।।तु.गा.०५०६.००१।।
मागितलें नये अरुचीनें हातां। नाहीं वरी सत्ता आदराची।।तु.गा.०५०६.००२।।
समाधानासाठीं लाविलासे कान। चोरलेंसे मन दिसतसां।।तु.गा.०५०६.००३।।
तुका म्हणे आम्हां तुमचेचि फंद। वरदळ छंद कळों येती।।तु.गा.०५०६.००४।।
रूपीं गोवियेलें चित्त। पायीं राहिलें निश्चिंत।।तु.गा.०५०७.००१।।
तुम्ही देवा अवघेचि गोमटे। मुख देखतां दुःख न भेटे।।तु.गा.०५०७.००२।।
झाली इंद्रियां विश्रांति। भ्रमतां पीडित होती।।तु.गा.०५०७.००३।।
तुका म्हणे भेटी। सुटली भवबंदाची गांठी।।तु.गा.०५०७.००४।।
नोहे तुम्हां जरी। येवढें कारण मुरारी।।तु.गा.०५०८.००१।।
मग जैसा तैसा काळ। दाट सारावा पातळ।।तु.गा.०५०८.००२।।

स्वामीचें तें सांडें। पुत्र होतां काळतोंडें।।तु.गा.०५०८.००३।।
शब्दा नाहीं रुची। मग कोठें तुका वेंची।।तु.गा.०५०८.००४।।
नाहीं आइकत तुम्ही माझे बोल। कासया हें फोल उपणूं भूस।।तु.गा.०५०९.००१।।
येसी ते करीन बैसलिया ठाया। तूंचि बुझावया जवळी देवा।।तु.गा.०५०९.००२।।
करावे ते केले सकळ उपाय। आतां पाहों काय अझुनी वास।।तु.गा.०५०९.००३।।
तुका म्हणे आला आज्ञेसी शेवट। होऊनियां नीट पायां पडें।।तु.गा.०५०९.००४।।
थोर अन्याय केला। तुझा अंत म्यां पाहिला। जनाचिया बोला। साठीं चित्त क्षोभविलें।।तु.गा.०५१०.००१।।
भागविलासी केला सीण। अधम मी यातीहीन। झांकूनि लोचन। दिवस तेरा राहिलों।।तु.गा.०५१०.००२।।
अवघें घालूनियां कोडें। तहानभुकेचें सांकडें। योगक्षेम पुढें। तुज करणें लागलें।।तु.गा.०५१०.००३।।
उदकीं राखिले कागद। चुकविला जनवाद। तुका म्हणे ब्रीद। साच केलें आपुलें।।तु.गा.०५१०.००४।।
तेरा दिवस झाले निश्चक्र करितां। न पवसी अनंता मायबापा।।तु.गा.०५११.००१।।
पाषाणाची खोळ घेऊनि बैसलासी। काय हृषीकेशी झालें तुज।।तु.गा.०५११.००२।।
तुजवरी आतां प्राण मी त्यजीन। हत्या मी घालीन पांडुरंगा।।तु.गा.०५११.००३।।
फार विठाबाई धरिली तुझी आस। करीन जीवा नाश पांडुरंगा।।तु.गा.०५११.००४।।
तुका म्हणे आतां मांडिले निर्वाण। प्राण हा सांडीन तुजवरी।।तु.गा.०५११.००५।।
नव्हती आली सीसा सुरी। अथवा घाय पाठीवरी। तों म्यां केला हरी। एवढा तुम्हां आकांत।।तु.गा.०५१२.००१।।
वांटिलासी दोहीं ठायीं। मजपाशीं आणि डोहीं। लागों दिला नाहीं। येथें तेथें आघात।।तु.गा.०५१२.००२।।
जीव घेती मायबापें। थोड्या अन्यायाच्या कोपें। हें तों नव्हे सोपें। साहों त्वांचि जाणितलें।।तु.गा.०५१२.००३।।
तुका म्हणे कृपावंता। तुज ऐसा नाहीं दाता। काय वाणूं आतां। वाणी माझी खुंटली।।तु.गा.०५१२.००४।।
कापो कोणी माझी मान। सुखें पीडोत दुर्जन। तुज होय सीण। तें मी न करीं सर्वथा।।तु.गा.०५१३.००१।।
चुकी झाली एकवेळा। मजपासूनि चांडाळा। उभें करोनियां जळा। माजी वह्या राखविल्या।।तु.गा.०५१३.००२।।
नाहीं केला हा विचार। माझा कोण अधिकार। समर्थासी भार। न कळे कैसा घालावा।।तु.गा.०५१३.००३।।
गेलें होऊनियां मागें। नये बोलों तें वाउगें। पुढिलिया प्रसंगें। तुका म्हणे जाणावें।।तु.गा.०५१३.००४।।

तूं कृपाळू माउली। आम्हां दीनांची साउली। न संवरित आली। बाळवेषें जवळी।।तु.गा.०५१४.००१।।
माझें केलें समाधान। रूप गोजिरें सगुण। निववलें मन। आलिंगन देऊनि।।तु.गा.०५१४.००२।।
कृपा केली जना हातीं। पायीं ठाव दिला संतीं। कळों नये चित्तीं। दु:ख कैसें आहे तें।।तु.गा.०५१४.००३।।
तुका म्हणे मी अन्यायी। क्षमा करीं वो माझें आई। आतां पुढें काई। तुज घालूं सांकडें।।तु.गा.०५१४.००४।।
काय जाणें मी पामर। पांडुरंगा तुझा पार। धरिलीया धीर। काय एक न करिसी।।तु.गा.०५१५.००१।।
उतावीळ झालों आधीं। मतिमंद हीन बुद्धि। परि तूं कृपानिधि। नाहीं केला अव्हेर।।तु.गा.०५१५.००२।।
तूं देवाचाही देव। अवघ्या ब्रह्मांडाचा जीव। आम्हां दासा कींव। कां भाकणें लागली।।तु.गा.०५१५.००३।।
तुका म्हणे विश्वंभरा। मी तों पतितचि खरा। अन्याय दुसरा। दारीं धरणें बैसलों।।तु.गा.०५१५.००४।।
तूं माउलीहून मायाळ। चंद्राहूनी शीतळ। पाणियाहूनि पातळ। कल्लोळ प्रेमाचा।।तु.गा.०५१६.००१।।
देऊं काशाची उपमा। दुजी तुज पुरुषोत्तमा। ओंवाळूनि नामा। तुझ्यावरुनि टाकिलों।।तु.गा.०५१६.००२।।
तुवां केलें रे अमृता। गोड त्याही तूं परता। पांचां तत्त्वांचा जनिता। सकळ सत्तानायक ।।तु.गा.०५१६.००३।।
कांहीं न बोलोनि आतां। उगाच चरणीं ठेवितों माथा। तुका म्हणे पंढरीनाथा। क्षमा करीं अपराध।।तु.गा.०५१६.००४।।
मी अवगुणी अन्यायी। किती म्हणोन सांगों काई। आतां मज पायीं। ठाव देईं विठ्ठले।।तु.गा.०५१७.००१।।
पुरे पुरे हा संसार। कर्म बळिवंत दुस्तर। राहों नेदी स्थिर। एके ठायीं निश्चळ।।तु.गा.०५१७.००२।।
अनेक बुद्धिचे तरंग। क्षणक्षणा पालटती रंग। धरूं जातां संग। तंव तो होतो बाधक ।।तु.गा.०५१७.००३।।
तुका म्हणे आतां। अवघी तोडीं माझी चिंता। येऊनि पंढरीनाथा। वास करीं हृदयीं।।तु.गा.०५१७.००४।।
काय ज्ञानेश्वरीं उणें। तिहीं पाठविलें धरणें।।तु.गा.०५१८.००१।।
ऐकोनियां लिखित। म्हूण जाणविली हे मात।।तु.गा.०५१८.००२।।
जरी जाणे धणी। वदे सेवकाची वाणी।।तु.गा.०५१८.००३।।
तुका म्हणे ठेवा। होतां सांभाळावा देवा।।तु.गा.०५१८.००४।।
ठेवूनियां डोई। पायीं झालों उतराई।।तु.गा.०५१९.००१।।
कारण तें तुम्ही जाणां। मी तराळ नारायणा।।तु.गा.०५१९.००२।।
प्रसंगीं वचन। दिलें तेंचि खावें अन्न।।तु.गा.०५१९.००३।।

तुका म्हणे भार। तुम्ही जाणां थोडा फार।।तु.गा.०५१९.००४।।
श्रीपंढरीशा पतितपावना। एक विज्ञापना पायांपाशीं।।तु.गा.०५२०.००१।।
अनाथां जीवांचा तूं काजकैवारी। ऐसी चराचरीं ब्रीदावळी।।तु.गा.०५२०.००२।।
न सांगतां कळे अंतरींचें गुज। आतां तुझी लाज तुज देवा।।तु.गा.०५२०.००३।।
आळिकर त्याचें करिसी समाधान। अभयाचें दान देऊनियां।।तु.गा.०५२०.००४।।
तुका म्हणे तूंचि खेळें दोहीं ठायीं। नसेल तो देईं धीर मना।।तु.गा.०५२०.००५।।
अगा ये उदारा अगा विश्वंभरा। रखुमाईच्या वरा पांडुरंगा।।तु.गा.०५२१.००१।।
अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा। अगा मेघश्यामा विश्वजनित्या।।तु.गा.०५२१.००२।।
अगा कृपावंता जीवदान तूं दाता। अगा सर्वसत्ता धरतिया।।तु.गा.०५२१.००३।।
अगा सर्वजाणा अगा नारायणा। करुणा वचना चित्त द्यावें।।तु.गा.०५२१.००४।।
तुका म्हणे नाहीं अधिकार तैसी। सरती पायांपाशीं केली मागें।।तु.गा.०५२१.००५।।
नोहे दास खरा। परि हा झालासे डांगोरा।।तु.गा.०५२२.००१।।
यासी काय करूं आतां। तूं हें सकळ जाणता।।तु.गा.०५२२.००२।।
नाहीं पुण्य गांठीं। जें हें वेचूं कोणासाठीं।।तु.गा.०५२२.००३।।
तुका म्हणे कां उपाधि। वाढविली कृपानिधि।।तु.गा.०५२२.००४।।
तुजविण सत्ता। नाहीं वाचा वदविता।।तु.गा.०५२३.००१।।
ऐसें आम्ही जाणों दास। म्हणोनि जालों उदास।।तु.गा.०५२३.००२।।
तुम्ही दिला धीर। तेणें मन झालें स्थिर।।तु.गा.०५२३.००३।।
तुका म्हणे आड। केलें मी हें तुझें कोड।।तु.गा.०५२३.००४।।
काय मी जाणता। तुम्हांहूनी जी अनंता।।तु.गा.०५२४.००१।।
जो हा करूं अतिशय। कांहो तुम्हां दया नये।।तु.गा.०५२४.००२।।
काय तुज नाहीं कृपा। विश्वाचिया मायबापा।।तु.गा.०५२४.००३।।
तुका म्हणे वाणी। माझी वदे तुम्हांहूनी।।तु.गा.०५२४.००४।।

नको कांहीं पडो ग्रंथाचिये भरी। शीघ्रवत करीं हेंचि एक ।।तु.गा.०५२५.००१ ।।
देवाचिये चाडे आळवावे देवा। ओस देहभावा पाडोनियां ।।तु.गा.०५२५.००२ ।।
साधनें घालिती काळाचिये मुखीं। गर्भवास सेखीं न चुकती ।।तु.गा.०५२५.००३ ।।
उधाराचा मोक्ष होय नोहे ऐसा। पतनाची इच्छा आवश्यक ।।तु.गा.०५२५.००४ ।।
रोकडी पातली अंगसंगें जरा। आतां उजगरा कोठवरी ।।तु.गा.०५२५.००५ ।।
तुका म्हणे घाली नामासाठीं उडी। पांडुरंग थडी पाववील ।।तु.गा.०५२५.००६ ।।
नाहीं देवापाशीं मोक्षाचें गाठोळें। आणूनि निराळें द्यावें हातीं ।।तु.गा.०५२६.००१ ।।
इंद्रियांचा जय साधुनियां मन। निर्विषय कारण असे तेथें ।।तु.गा.०५२६.००२ ।।
उपवास पारणीं अक्षरांची आटी। सत्कर्मा शेवटीं असे फळ ।।तु.गा.०५२६.००३ ।।
आदरें संकल्प वारीं अतिशय। सहज तें काय दु:ख जाणें ।।तु.गा.०५२६.००४ ।।
स्वप्नींचिया घायें विवळसी वायां। रडे रडतियासवें मिथ्या ।।तु.गा.०५२६.००५ ।।
तुका म्हणे फळ आहे मूळापाशीं। शरण देवासी जाय वेगीं ।।तु.गा.०५२६.००६ ।।
त्यजिलें भेटवीं आणूनि वासना। दाविल्याचें जना काय काज ।।तु.गा.०५२७.००१ ।।
आळवावें देवा भाकूनि करुणा। आपुलिया मना साक्ष करीं ।।तु.गा.०५२७.००२ ।।
नाहीं यावें जावें दुरूनि लागत। आहे साक्षभूत अंतरींचा ।।तु.गा.०५२७.००३ ।।
तुका म्हणे हा तो आहे कृपासिंधु। तोडी भवबंधु तात्काळिक ।।तु.गा.०५२७.००४ ।।
गोविंद गोविंद। मना लागलिया छंद ।।तु.गा.०५२८.००१ ।।
मग गोविंद ते काया। भेद नाहीं देवा तया ।।तु.गा.०५२८.००२ ।।
आनंदलें मन। प्रेमें पाझरती लोचन ।।तु.गा.०५२८.००३ ।।
तुका म्हणे आळी। जीवें नुरेचि वेगळी ।।तु.गा.०५२८.००४ ।।
ज्याचें जया ध्यान। तेंचि होय त्याचें मन ।।तु.गा.०५२९.००१ ।।
म्हणऊनि अवघें सारा। पांडुरंग दृढ धरा ।।तु.गा.०५२९.००२ ।।
सम खुण ज्याचे पाय। उभा व्यापक विटें ठाय ।।तु.गा.०५२९.००३ ।।

तुका म्हणे नभा। परता अणूचाही गाभा।।तु.गा.०५२९.००४।।
पाहूनियां ग्रंथ करावें कीर्तन। तेव्हां आलें जाण फळ त्याचें।।तु.गा.०५३०.००१।।
नाहीं तरी वायां केली तोंडपिटी। उरी ते शेवटीं उरलीसे।।तु.गा.०५३०.००२।।
पढोनियां वेद हरिगुण गावे। ठावें तें जाणावें तेव्हां जालें।।तु.गा.०५३०.००३।।
तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धी। स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं।।तु.गा.०५३०.००४।।
यागयज्ञादिक काय दानधर्म। तरी फल नाम कंठीं राहें।।तु.गा.०५३०.००५।।
तुका म्हणे नको काबाडाचे भरी। पडों सार धरी हेंचि एक ।।तु.गा.०५३०.००६।।
सुखें खावें अन्न। त्याचें करावें चिंतन।।तु.गा.०५३१.००१।।
त्याचें दिलें त्यासी। पावे फळ आपणासी।।तु.गा.०५३१.००२।।
आहे हा आधार। नाम त्याचें विश्वंभर।।तु.गा.०५३१.००३।।
नाहीं रिता ठाव। तुका म्हणे पसरीं भाव।।तु.गा.०५३१.००४।।
संकोचोनि काय झालासी लहान। घेईं आपोशन ब्रह्मांडाचें।।तु.गा.०५३२.००१।।
करोनि पारणें आंचवूं संसारा। उशीर उशीरा लावूं नको।।तु.गा.०५३२.००२।।
घरकुलीनें होता पाडिला अंधार। तेणें केलें फार कासावीस।।तु.गा.०५३२.००३।।
झुगारूनि दुरी लपविलें काखें। तुका म्हणे वाखे कौतुकाचे।।तु.गा.०५३२.००४।।
माझ्या बापें मज दिधलें भातुकें। म्हणोनि कवतुकें क्रीडा करीं ।।तु.गा.०५३३.००१।।
केली आळी पुढें बोलिलों वचन। उत्तम हे गुण आले त्याचे।।तु.गा.०५३३.००२।।
घेऊनि विभाग जावें लवलाह्या। आलेती त्या ठाया आपुलिया।।तु.गा.०५३३.००३।।
तुका म्हणे ज्ञानदेवीं समुदाय। करावा मी पाय येईन वंदूं।।तु.गा.०५३३.००४।।
ज्ञानियांचा गुरू राजा महाराव। म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें।।तु.गा.०५३४.००१।।
मज पामरा हें काय थोरपण। पायींची वाहाण पायीं बरी।।तु.गा.०५३४.००२।।
ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणें। इतर तुळणें काय पुढें।।तु.गा.०५३४.००३।।
तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली। म्हणोनि ठेविली पायीं डोई।।तु.गा.०५३४.००४।।

बोलिलीं लेकुरें। वेडीं वांकुडीं उत्तरें।।तु.गा.०५३५.००१ ।।
करा क्षमा अपराध। महाराज तुम्ही सिद्ध।।तु.गा.०५३५.००२।।
नाहीं विचारिला। अधिकार म्यां आपुला।।तु.गा.०५३५.००३।।
तुका म्हणे ज्ञानेश्वरा। राखा पायांपें किंकरा।।तु.गा.०५३५.००४।।
काय तुम्ही जाणा। करूं अव्हेर नारायणा।।तु.गा.०५३६.००१ ।।
तरी या लटिक्याची ग्वाही। निवडिली दुसरें ठायीं।।तु.गा.०५३६.००२।।
कळों अंतरींचा गुण। नये फुटल्यावांचून।।तु.गा.०५३६.००३।।
आणिलें अनुभवा। जनांच्या हें ज्ञानदेवा।।तु.गा.०५३६.००४।।
आणिक कोणी भिती। त्यांच्या चिंतनें विश्रांति।।तु.गा.०५३६.००५।।
तुका म्हणे बीज पोटीं। फळ तैसेंची शेवटीं।।तु.गा.०५३६.००६ ।।
अविश्वासीयाचें शरीर सुतकी। विटाळ पातकी भेदा वाहे।।तु.गा.०५३७.००१ ।।
काय त्याचा वेल जाईल मांडवा। होता तैसा ठेवा आला पुढें।।तु.गा.०५३७.००२।।
मातेचा संकल्प व्हावा राजबिंडा। कपाळींचा धोंडा उभा ठाके ।।तु.गा.०५३७.००३।।
तुका म्हणे जैसा कुचराचा दाणा। परिपाकीं जाणा खोटा तैसा।।तु.गा.०५३७.००४।।
तामसाची तपें पापाची सिदोरी। तमोगुणें भरी घातलेंसे।।तु.गा.०५३८.००१ ।।
राज्यपदा आड सुखाची संपत्ति। उल्लंघूनि जाती निरयगांवा।।तु.गा.०५३८.००२।।
इंद्रियें दमिलीं इच्छा जीती जीवीं। नागविती ठावीं नाहीं पुढें।।तु.गा.०५३८.००३।।
तुका म्हणे हरिभजनावांचून। करिती तो सीण पाहों नये।।तु.गा.०५३८.००४।।
हरिकथेविण इच्छिती स्वहित। हरिजन चित्त न घला तेथें।।तु.गा.०५३९.००१ ।।
जाईल भंगोन आपुला विश्वास। अवघिया नास कारणांचा।।तु.गा.०५३९.००२।।
ज्याचिया बैसावें भोजना पंगती। त्याचिया संगती तैसें खावें।।तु.गा.०५३९.००३।।
तुका म्हणे काय झालेती जाणते। देवाही परते थोर तुम्ही।।तु.गा.०५३९.००४।।
सेवकें करावें स्वामीचें वचन। त्यासी हूंतूपण कामा नये।।तु.गा.०५४०.००१ ।।

घेईल जीव कां सारील परतें। भंगलिया चित्तें सांदीजेना ।।तु.गा.०५४०.००२ ।।
खद्योतें दावावी रवी केवीं वाट। आपुलें तें नीट उसंतावें ।।तु.गा.०५४०.००३ ।।
तुका म्हणे तो आहे ज्ञानाचा सागर। परि नेदी अगर भिजों भेदें ।।तु.गा.०५४०.००४ ।।
जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ। अंगीं ऐसें बळ रेडा बोले ।।तु.गा.०५४१.००१ ।।
करील तें काय नव्हे महाराज। परि पाहें बीज शुद्ध अंगीं ।।तु.गा.०५४१.००२ ।।
जयानें घातली मुक्तीची गवांदी। मेळविली मांदी वैष्णवांची ।।तु.गा.०५४१.००३ ।।
तुका म्हणे तेथें सुखा काय उणें। राहे समाधानें चित्ताचिया ।।तु.गा.०५४१.००४ ।।
बहुतां छंदांचें बहु असें जन। नये वांटूं मन त्यांच्या संगें ।।तु.गा.०५४२.००१ ।।
करावा जतन आपुला विश्वास। अंगा आला रस आवडीचा ।।तु.गा.०५४२.००२ ।।
सुखाची समाधि हरिकथा माउली। विश्रांति साउली सिणलियांचि ।।तु.गा.०५४२.००३ ।।
तुका म्हणे बुडे बांधोनि दगड। तेथें काय कोड धांवयाचें ।।तु.गा.०५४२.००४ ।।
हरिकथे नाहीं। विश्वास ज्याचे ठायीं ।।तु.गा.०५४३.००१ ।।
त्याची वाणी अमंगळ। कान उंदराचें बीळ ।।तु.गा.०५४३.००२ ।।
सांडूनि हा रस। करिती आणीक सायास ।।तु.गा.०५४३.००३ ।।
तुका म्हणे पिसीं। वायां गेलीं किती ऐसीं ।।तु.गा.०५४३.००४ ।।
प्रेम अमृताची धार। वाहे देवाचे समोर ।।तु.गा.०५४४.००१ ।।
उर्ध्ववाहिनी हरिकथा। मुकुटमणि सकळां तीर्थां ।।तु.गा.०५४४.००२ ।।
शिवाचें जीवन। जाळी महादोष कीर्तन ।।तु.गा.०५४४.००३ ।।
तुका म्हणे हरि। इची स्तुति वाणी थोरी ।।तु.गा.०५४४.००४ ।।
आतां माझ्या मना। इची घडो उपासना ।।तु.गा.०५४५.००१ ।।
ऐसें करी गा पांडुरंगा। प्रेम वोसंडेसें अंगा ।।तु.गा.०५४५.००२ ।।
सर्व काळ नये। वाचे वीट आड भये ।।तु.गा.०५४५.००३ ।।
तुका वैष्णवांसंगती। हेंचि भोजनपंगती ।।तु.गा.०५४५.००४ ।।

उपास कराडी। तिहीं करावी बापुडीं।।तु.गा.०५४६.००१ ।।
आम्ही विठोबाचे दास। चिंता झुगारिली आस।।तु.गा.०५४६.००२ ।।
भक्तीच्या उत्कर्षे। नाहीं मुक्तीचें तें पिसें।।तु.गा.०५४६.००३ ।।
तुका म्हणे बळ। अंगीं आमुच्या सकळ।।तु.गा.०५४६.००४ ।।
करविली तैसी केली कटकट। वांकडें कीं नीट देव जाणे।।तु.गा.०५४७.००१ ।।
कोणाकारणें हें झालेंसे निर्माण। देवाचें कारण देव जाणे।।तु.गा.०५४७.००२ ।।
तुका म्हणे मी तो अभिमाना वेगळा। घालूनि गोपाळा भार असें।।तु.गा.०५४७.००३ ।।
तुम्हीं येथें पाठविला धरणेकरी। त्याची झाली परी आइका ते।।तु.गा.०५४८.००१ ।।
आतां काय पुढें वाढवूं विस्तार। झाला समाचार आइका तो।।तु.गा.०५४८.००२ ।।
देवाचें उचित एकादश अभंग । महाफळ त्याग करूनि गेला।।तु.गा.०५४८.००३ ।।
तुका म्हणे सेवा समर्पूनि पायीं। झालों उतराई ठावें असो।।तु.गा.०५४८.००४ ।।
परिसें वो माते माझी विनवणी। मस्तक चरणीं ठेवीतसें।।तु.गा.०५४९.००१ ।।
भागीरथी महादोषनिवारणी। सकळां स्वामिनी तीर्थांचिये।।तु.गा.०५४९.००२ ।।
जितां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तीरीं। अहिक्यपरत्रीं सुखरूप।।तु.गा.०५४९.००३ ।।
तुका विष्णुदास संतांचें पोसणें। वाग्पुष्प तेणें पाठविलें।।तु.गा.०५४९.००४ ।।
तुम्ही विश्वनाथ। दीन रंक मी अनाथ।।तु.गा.०५५०.००१ ।।
कृपा कराल ते थोडी। पायां पडिलों बराडी।।तु.गा.०५५०.००२ ।।
काय उणें तुम्हांपाशीं। मी तों अल्पचि संतोषी।।तु.गा.०५५०.००३ ।।
तुका म्हणे देवा। कांहीं भातुकें पाठवा।।तु.गा.०५५०.००४ ।।
पिंड पदावरी। दिला आपुलिये करीं।।तु.गा.०५५१.००१ ।।
माझें जालें गयावर्जन। फिटलें पितरांचें ऋण।।तु.गा.०५५१.००२ ।।
केलें कर्मांतर। बोंब मारिली हरिहर।।तु.गा.०५५१.००३ ।।
तुका म्हणे माझें। भार उतरलें ओझें।।तु.गा.०५५१.००४ ।।

तुम्ही संतजनीं। माझी करा विनवणी ।।तु.गा.०५५२.००१ ।।
काय तुक्याचा अन्याय। त्यासी अंतरले पाय ।।तु.गा.०५५२.००२ ।।
भाका बहुतां रीती। माझी कींव काकुलती ।।तु.गा.०५५२.००३ ।।
न देखें पंढरी। तुका चरण विटेवरी ।।तु.गा.०५५२.००४ ।।
येती वारकरी। वाट पाहातों तोंवरी ।।तु.गा.०५५३.००१ ।।
घालूनियां दंडवत। पुसेन निरोपाची मात ।।तु.गा.०५५३.००२ ।।
पत्र हातीं दिलें। तयां तेथें पाठविलें ।।तु.गा.०५५३.००३ ।।
तुका म्हणे येती। जाईन सामोरा पुढती ।।तु.गा.०५५३.००४ ।।
रुळे महाद्वारीं। पायांखालील पायरी ।।तु.गा.०५५४.००१ ।।
तैसें माझें दंडवत। निरोप सांगतील संत ।।तु.गा.०५५४.००२ ।।
पडे दंडकाठी। देह भलतीसवा लोटी ।।तु.गा.०५५४.००३ ।।
तुका म्हणे बाळ। लोळे न धरितां सांभाळ ।।तु.गा.०५५४.००४ ।।
होईल कृपादान। तरी मी येईन धांवोन ।।तु.गा.०५५५.००१ ।।
होतिल संतांचिया भेटी। आनंदें नाचों वाळवंटीं ।।तु.गा.०५५५.००२ ।।
रिघेन मातेपुढें। स्तनपान करीन कोडें ।।तु.गा.०५५५.००३ ।।
तुका म्हणे ताप। हरती देखोनियां बाप ।।तु.गा.०५५५.००४ ।।
परिसोनि उत्तर। जाब देईजे सत्वर ।।तु.गा.०५५६.००१ ।।
जरी तूं होसी कृपावंत। तरी हा बोलावीं पतित ।।तु.गा.०५५६.००२ ।।
नाणीं कांहीं मना। करूनि पापाचा उगाणा ।।तु.गा.०५५६.००३ ।।
तुका म्हणे नाहीं। काय शक्ति तुझे पायीं ।।तु.गा.०५५६.००४ ।।
कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात। चाल तुज पंढरिनाथ बोलावितो ।।तु.गा.०५५७.००१ ।।
मग मी न धरीं आस मागील बोभाट। वेगीं धरीन वाट माहेराची ।।तु.गा.०५५७.००२ ।।
निलाजिरें चित्त करी तळमळ। केधवां देखती मूळ आलें डोळे ।।तु.गा.०५५७.००३ ।।

तुका म्हणे कईं भाग्याची उजरी। होईल पंढरी देखावया।।तु.गा.०५५७.००४।।
समर्पक वाणी। नाहीं ऐकिजेसी कानीं।।तु.गा.०५५८.००१।।
आतां भावें करूनि साचा। पायां पडिलों विठोबाच्या।।तु.गा.०५५८.००२।।
न कळे उचित। करूं समाधान चित्त।।तु.गा.०५५८.००३।।
तुका म्हणे विनंती। विनविली धरा चित्तीं।।तु.गा.०५५८.००४।।
कैंचा मज धीर। कोठें बुद्धि माझी स्थिर।।तु.गा.०५५९.००१।।
जें या मनासीं आवरूं। आंत पोटीं वाव धरूं।।तु.गा.०५५९.००२।।
कैंची शुद्ध मति। भांडवल असे हातीं।।तु.गा.०५५९.००३।।
तुका म्हणे अंगा। कोण दशा आली सांगा।।तु.गा.०५५९.००४।।
पुढें तरी चित्ता। काय येईल तें आतां।।तु.गा.०५६०.००१।।
मज सांगोनियां धाडी। वाट पहातों बराडी।।तु.गा.०५६०.००२।।
कंठीं धरिला प्राण। पायांपाशीं आलें मन।।तु.गा.०५६०.००३।।
तुका म्हणे चिंता। बहु वाटतसे आतां।।तु.गा.०५६०.००४।।
धरितों वासना परि नये फळ। प्राप्तीचा तों काळ नाहीं आला।।तु.गा.०५६१.००१।।
तळमळी चित्त घातलें खापरीं। फुटतसे परी लाहीचिया।।तु.गा.०५६१.००२।।
प्रकार ते कांहीं नावडती जिवा। नाहीं पुढें ठावा काळ हातीं।।तु.गा.०५६१.००३।।
जातों तळा येतों मागुता लवकरी। वोळशाचे फेरी सांपडलों।।तु.गा.०५६१.००४।।
तुका म्हणे बहु करितों विचार। उतरें डोंगर एक चढें।।तु.गा.०५६१.००५।।
कां माझे पंढरी न देखती डोळे। काय हें न कळे पाप यांचें।।तु.गा.०५६२.००१।।
पाय पंथ कां हे न चलती वाट। कोण हें अदृष्ट कर्म बळी।।तु.गा.०५६२.००२।।
कां हें पायांवरी न पडे मस्तक। क्षेम कां हस्तक न पवती।।तु.गा.०५६२.००३।।
कां या इंद्रियांची न पुरे वासना। पवित्र होईना जिव्हां कीर्ति।।तु.गा.०५६२.००४।।
तुका म्हणे कईं जाऊनि मोटळें। पडेन हा लोळे महाद्वारीं।।तु.गा.०५६२.००५।।

सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं। रिद्धि सिद्धि ठायीं मुक्ति चारी ।।तु.गा.०५६८.००३ ।।
इंद्रासी दुर्लभ पाविजें तें पद। गीतीं गातां छंद वाहतां टाळी ।।तु.गा.०५६८.००४ ।।
तुका म्हणे जड जीव शक्तिहीन। त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ।।तु.गा.०५६८.००५ ।।
काय झालें नेणों माझिया कपाळा। न देखिजे डोळां मूळ येतां ।।तु.गा.०५६९.००१ ।।
बहु दिस पाहें वचनाची वास। धरिलें उदास पांडुरंगा ।।तु.गा.०५६९.००२ ।।
नाहीं निरोपाचें पावलें उत्तर। ऐसें तों निष्ठुर न पाहिजे ।।तु.गा.०५६९.००३ ।।
पडिला विसर किंवा कांहीं धंदा। याहूनि गोविंदा जरूरसा ।।तु.गा.०५६९.००४ ।।
तुका म्हणे आलें वेचाचें सांकडें। देणें घेणें पुढें तोही धाक ।।तु.गा.०५६९.००५ ।।
कांहीं चिंतेविण। नाहीं उपजत सीण ।।तु.गा.०५७०.००१ ।।
तरी हा पडिला विसर। माझा तुम्हां झाला भार ।।तु.गा.०५७०.००२ ।।
आली कांहीं तुटी। गेली सुटोनियां गांठी ।।तु.गा.०५७०.००३ ।।
तुका म्हणे घरीं। बहु बैसले रिणकरी ।।तु.गा.०५७०.००४ ।।
एवढा संकोच तरी कां व्यालासी। आम्ही कोणापाशीं तोंड वासूं ।।तु.गा.०५७१.००१ ।।
कोण मज पुसे सिणलें भागलें। जरी मोकलिलें तुम्ही देवा ।।तु.गा.०५७१.००२ ।।
कवणाची वास पाहों कोणीकडे। कोण मज ओढे जीवलग ।।तु.गा.०५७१.००३ ।।
कोण जाणे माझें जीवींचें सांकडें। उगवील कोडें संकटाचें ।।तु.गा.०५७१.००४ ।।
तुका म्हणे तुम्ही देखिली निश्चिंती। काय माझें चित्तीं पांडुरंगा ।।तु.गा.०५७१.००५ ।।
काय पोरें झालीं फार। किंवा न साहे करकर ।।तु.गा.०५७२.००१ ।।
म्हणऊनि केली सांडी। घांस घेऊं न लांहे तोंडीं ।।तु.गा.०५७२.००२ ।।
करूं कलागती। तुज भांडणें भोंवतीं ।।तु.गा.०५७२.००३ ।।
तुका म्हणे टांचें। घरीं झालेंसे वरोचें ।।तु.गा.०५७२.००४ ।।
जोडी कोणासाठीं। एवढी करितोसी आटी ।।तु.गा.०५७३.००१ ।।
जरी हें आम्हां नाहीं सुख। रडों पोरें पोटीं भूक ।।तु.गा.०५७३.००२ ।।

करूनि जतन । कोणा देसील हें धन ।।तु.गा.०५७३.००३ ।।
आमचें तळमळें । तुझें होईल वाटोळें ।।तु.गा.०५७३.००४ ।।
घेसील हा शाप । माझे होऊनियां बाप ।।तु.गा.०५७३.००५ ।।
तुका म्हणे उरी । आतां न ठेवी यावरी ।।तु.गा.०५७३.००६ ।।
समर्थाचे पोटीं । आम्ही जन्मलों करंटीं ।।तु.गा.०५७४.००१ ।।
ऐसी झाली जगीं कीर्ति । तुझ्या नामाची फजिती ।।तु.गा.०५७४.००२ ।।
येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ।।तु.गा.०५७४.००३ ।।
तुका म्हणे जिणें । आतां खोटें जीवपणें ।।तु.गा.०५७४.००४ ।।
देईं डोळे भेटी न धरीं संकोच । न घलीं कांहीं वेच तुजवरी ।।तु.गा.०५७५.००१ ।।
तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ।।तु.गा.०५७५.००२ ।।
फार थोडें कांहीं करूनि पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ।।तु.गा.०५७५.००३ ।।
आहे माझी तेंचि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ।।तु.गा.०५७५.००४ ।।
तुका म्हणे आम्हां लेंकराची जाती । भेटावया खंती वाटतसे ।।तु.गा.०५७५.००५ ।।
करील आबाळी । माझ्या दांताची कसाळी ।।तु.गा.०५७६.००१ ।।
जासी एखादा मरोन । पाठी लागेल हें जन ।।तु.गा.०५७६.००२ ।।
घरीं लागे कळ । नाहीं जात तो शीतळ ।।तु.गा.०५७६.००३ ।।
तुका म्हणे पोरवडे । मज येतील रोकडे ।।तु.गा.०५७६.००४ ।।
जोडीच्या हव्यासें । लागे धनाचेंचि पिसें ।।तु.गा.०५७७.००१ ।।
मग आणीक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ।।तु.गा.०५७७.००२ ।।
पाहे रूक्याकडे । मग अवघें ओस पडे ।।तु.गा.०५७७.००३ ।।
तुका म्हणे देवा । तुला बहुताचा हेवा ।।तु.गा.०५७७.००४ ।।
शीण भाग हरे तेथींच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ।।तु.गा.०५७८.००१ ।।
इंद्रियांची धांव होईल कुंठित । पावेल हें चित्त समाधान ।।तु.गा.०५७८.००२ ।।

माहेर आहेसें लौकिकीं कळावें। निढळ बरवें शोभा नेदी ।।तु.गा.०५७८.००३ ।।
आस नाहीं परि उरी बरी वाटे। आपलें तें भेटे आपणासी ।।तु.गा.०५७८.००४ ।।
तुका म्हणे माझी अवीट आवडी। खंडणा तांतडी होऊं नेदी ।।तु.गा.०५७८.००५ ।।
ऐकोनियां कीर्ति। ऐसी वाटती विश्रांति ।।तु.गा.०५७९.००१ ।।
मा तें सुख डोळां पडे। तेथें कोण लाभ जोडे ।।तु.गा.०५७९.००२ ।।
बोलतां ये वाचें। वीट नये जिव्हा नाचे ।।तु.गा.०५७९.००३ ।।
तुका म्हणे धांवे। वासना ते रस घ्यावें।।तु.गा.०५७९.००४ ।।
न बैससी खालीं । सम उभाच पाऊलीं ।।तु.गा.०५८०.००१ ।।
ऐसे झाले बहुत दिस। झालीं युगें अठ्ठावीस ।।तु.गा.०५८०.००२ ।।
नाहीं भाग सीण। अराणूक एक क्षण ।।तु.गा.०५८०.००३ ।।
तुका म्हणे किती। मापें केलीं देती घेती ।।तु.गा.०५८०.००४ ।।
मविलें माविती। नेणों रासी पडिल्या किती ।।तु.गा.०५८१.००१ ।।
परि तूं धालाचि न धासी। आलें उभाउभीं घेसी ।।तु.गा.०५८१.००२ ।।
अवघ्या अवघा काळ। वाटा वाहाती सकळ ।।तु.गा.०५८१.००३ ।।
तुका म्हणे नाहीं। अराणूक तुज कांहीं ।।तु.गा.०५८१.००४ ।।
करूनि चाहाडी। अवघी बुडवीन जोडी ।।तु.गा.०५८२.००१ ।।
जरी तूं होऊनि उदास। माझी बुडविसी आस ।।तु.गा.०५८२.००२ ।।
येथें न करीं काम। मुखें ने घे तुझें नाम ।।तु.गा.०५८२.००३ ।।
तुका म्हणे कुळ। तुझें बुडवीन समूळ ।।तु.गा.०५८२.००४ ।।
निरोपासी वेंचे। काय बोलतां फुकाचें ।।तु.गा.०५८३.००१ ।।
परि हें न घेवेचि यश। भिऊं नको सुखी आस ।।तु.गा.०५८३.००२ ।।
सुख समाधानें। कोण पाहे देणें घेणें ।।तु.गा.०५८३.००३ ।।
न लगे निरोपासी मोल। तुका म्हणे वेचे बोल ।।तु.गा.०५८३.००४ ।।

नव्हे धीर कांहीं पाठवूं निरोप। आला तरी कोप येऊं सुखें।।तु.गा.०५८४.००१ ।।
कोपोनियां तरी देईल उत्तर। जैसें तैसें पर फिरावूनि।।तु.गा.०५८४.००२ ।।
नाहीं तया तरी काय एक पोर। मज तों माहेर आणीक नाहीं।।तु.गा.०५८४.००३ ।।
तुका म्हणे असे तयामध्यें हित। आपण निवांत असों नये।।तु.गा.०५८४.००४ ।।
आतां आशीर्वाद। माझा असों सुखें नांद।।तु.गा.०५८५.००१ ।।
म्हणसी कोणे तरी काळें। आहेतसीं माझीं बाळें।।तु.गा.०५८५.००२ ।।
दुरी दूरांतर। तरी घेसी समाचार।।तु.गा.०५८५.००३ ।।
नेसी कधीं तरी। तुका म्हणे लाजे हरी।।तु.गा.०५८५.००४ ।।
आतां हे शेवटीं। माझी आईकावी गोष्टी।।तु.गा.०५८६.००१ ।।
आतां द्यावा वचनाचा। जाब कळे तैसा याचा।।तु.गा.०५८६.००२ ।।
आतां करकर। पुढें न करीं उत्तर।।तु.गा.०५८६.००३ ।।
तुका म्हणे ठसा। तुझा आहे राखें तैसा।।तु.गा.०५८६.००४ ।।
बोलिलों तें आतां। कांहीं जाणतां नेणतां।।तु.गा.०५८७.००१ ।।
क्षमा करावे अन्याय। पांडुरंगे माझे माय।।तु.गा.०५८७.००२ ।।
स्तुति निंदा केली। लागे पाहिजे साहिली।।तु.गा.०५८७.००३ ।।
तुका म्हणे लाड। दिला तैसें पुरवा कोड।।तु.गा.०५८७.००४ ।।
माहेरींचा काय येईल निरोप। म्हणऊनि झोंप नाहीं डोळां।।तु.गा.०५८८.००१ ।।
वाट पाहें आस धरूनियां जीवीं। निढळा हे ठेवीं वरी बाहे।।तु.गा.०५८८.००२ ।।
बोटावरी माप लेखितों दिवस। होतों कासावीस धीर नाहीं।।तु.गा.०५८८.००३ ।।
काय नेणों संतां पडिला विसर। कीं नव्हे सादर मायबाप।।तु.गा.०५८८.००४ ।।
तुका म्हणे तेथें होईल दाटणी। कोण माझें आणी मना तेथें।।तु.गा.०५८८.००५ ।।
परि तो आहे कृपेचा सागर। तोंवरी अंतर पडों नेदी।।तु.गा.०५८९.००१ ।।
बहु कान दृष्टी आइके देखणा। पुरोनियां जना उरलासे।।तु.गा.०५८९.००२ ।।

सांगितल्याविणें जाणें अंतरींचें। पुरवावें ज्याचें तैसें कोड।।तु.गा.०५८९.००३।।
बहुमुखें कीर्ति आइकिली कानीं। विश्वासही मनीं आहे माझ्या।।तु.गा.०५८९.००४।।
तुका म्हणे नाहीं जात वायांविण । पाळितों वचन बोलिलों तें।।तु.गा.०५८९.००५।।
यावरी न कळे संचित आपुलें। कैसें वोढवलें होईल पुढें।।तु.गा.०५९०.००१।।
करील विक्षेप धाडितां मुळासी। किंवा धाडा ऐसी तांतडी हे।।तु.गा.०५९०.००२।।
जोंवरी हे डोळा देखें वारकरी। तों हें भरोवरी करी चित्त।।तु.गा.०५९०.००३।।
आस वाढविते बुद्धीचे तरंग। चित्ताचे ते वेग वावडती।।तु.गा.०५९०.००४।।
तुका म्हणे तेव्हां होतील निश्चळ। इंद्रियें सकळ निरोपानें।।तु.गा.०५९०.००५।।
होईल निरोप घेतला यावरी। राऊळाभीतरी जाऊनियां।।तु.गा.०५९१.००१।।
करूनियां दधिमंगळभोजन। प्रयाण शकुनसुमुहूर्तें।।तु.गा.०५९१.००२।।
होतील दाटले सद्‌गदीत कंठीं। भरतें त्या पोटीं वियोगाचें।।तु.गा.०५९१.००३।।
येरयेरां भेटी क्षेम आलिंगनें। केलीं समाधानें होतीं संतीं।।तु.गा.०५९१.००४।।
तुका म्हणे चाली न साहे मनास। पाहाती ते कळस परतोनी।।तु.गा.०५९१.००५।।
ऐसी ते सांडिली होईल पंढरी। येत वारकरी होते वाटे।।तु.गा.०५९२.००१।।
देखिले सोहळे होती आठवत। चालती ते मात करूनियां।।तु.गा.०५९२.००२।।
केली आइकिली होईल जे कथा। राहिलें तें चित्ता होईल प्रेम।।तु.गा.०५९२.००३।।
गरुडटके टाळ मृदंग पताका। सांगताती एकांएक सुख।।तु.गा.०५९२.००४।।
तुका म्हणे आतां येती लवलाहीं। आलिंगुनि बाहीं देईन क्षेम।।तु.गा.०५९२.००५।।
क्षेम मायबाप पुसेन हें आधीं। न घलीं हें मधीं सुख दुःख।।तु.गा.०५९३.००१।।
न करीं तांतडी आपणापासूनि। आइकेन कानीं सांगती ते।।तु.गा.०५९३.००२।।
अंतरींचें संत जाणतील गुज। निरोप तो मज सांगतील।।तु.गा.०५९३.००३।।
पायांवरी डोई ठेवीन आदरें। प्रीतिपडिभरें आलिंगून।।तु.गा.०५९३.००४।।
तुका म्हणे काया करीन कुरवंडी। ओवाळून सांडीं त्यांवरून।।तु.गा.०५९३.००५।।

होईल माझी संतीं भाकिली करुणा। ते त्या नारायणा मनीं बैसे ।।तु.गा.०५९४.००१ ।।
शृंगारूनि माझीं बोबडीं उत्तरें। होतील विस्तारें सांगितली।।तु.गा.०५९४.००२ ।।
क्षेम आहे ऐसें होईल सांगितलें। पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ।।तु.गा.०५९४.००३ ।।
अवस्था जे माझी ठावी आहे संतां। होईल कृपावंता निरोपिली ।।तु.गा.०५९४.००४ ।।
तुका म्हणे सवें येईल मुऱ्हाळी। किंवा कांहीं उरी राखतील ।।तु.गा.०५९४.००५ ।।
दोहींमध्यें एक घडेल विश्वासें। भातुकें सरिसें मूळ तरी ।।तु.गा.०५९५.००१ ।।
करिती निरास निःशेष न घडे। कांहीं तरी ओढे चित्त माये ।।तु.गा.०५९५.००२ ।।
लौकिकाची तरी धरितील लाज। काय माझ्या काज आचरणें ।।तु.गा.०५९५.००३ ।।
अथवा कोणाचें घेणें लागे रीण। नाहीं तरी हीन कर्मी कांहीं ।।तु.गा.०५९५.००४ ।।
व्यालीचिये अंगीं असती वेदना। तुका म्हणे मना मन साक्ष ।।तु.गा.०५९५.००५ ।।
बैसतां कोणापें नाहीं समाधान। विवरे हें मन तेचि सोई ।।तु.गा.०५९६.००१ ।।
घडीघडी मज आठवे माहेर। न पडे विसर क्षणभरी ।।तु.गा.०५९६.००२ ।।
न बोलावें ऐसा करितों विचार। पडितो विसर प्रसंगीं तो ।।तु.गा.०५९६.००३ ।।
इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली। होती विसांवली येचि ठायीं ।।तु.गा.०५९६.००४ ।।
एकसरें सोस माहेरासी जावें। तुका म्हणे जीवें घेतलासे ।।तु.गा.०५९६.००५ ।।
नाहीं हानि परि न राहावें निसुर। न पडे विसर काय करूं ।।तु.गा.०५९७.००१ ।।
पुसाविसी वाटे मात कापडियां। पाठविती न्याया मूळ मज ।।तु.गा.०५९७.००२ ।।
आणीक या मना नावडे सोहळा। करिते टकळा माहेरींचा ।।तु.गा.०५९७.००३ ।।
बहु कामें केलें बहु कासावीस। बहु झालें दिस भेटी नाहीं ।।तु.गा.०५९७.००४ ।।
तुका म्हणे त्याचें न कळे अंतर। अवस्था ते फार होते मज ।।तु.गा.०५९७.००५ ।।
तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें। जों नाहीं बरवें कळों आलें ।।तु.गा.०५९८.००१ ।।
कोणाचिया मुखें तंट नाहीं मागें। वचन वाउगें बोलों नये ।।तु.गा.०५९८.००२ ।।
दिसे हानि परी निरास न घडे। हे तंव रोकडे अनुभव ।।तु.गा.०५९८.००३ ।।

आपुलिया भोगें होईल उशीर। तोंवरी कां धीर केला नाहीं।।तु.गा.०५९८.००४।।
तुका म्हणे गोड करील शेवट। पाहिली ते वाट ठावी आहे।।तु.गा.०५९८.००५।।
माहेरींचें आलें तें मज माहेर। सुखाचें उत्तर करीन त्यासी।।तु.गा.०५९९.००१।।
पायांवरी माथा आळिंगीन बाहीं। घेईन लवलाहीं पायवणी।।तु.गा.०५९९.००२।।
सुख समाचार पुसेन सकळ। कैसा पर्वकाळ आहे त्यास।।तु.गा.०५९९.००३।।
आपुले जीवींचें सुखदु:ख भावें । सांगेन आघवे आहे तैसें।।तु.गा.०५९९.००४।।
तुका म्हणे वीट नेघें आवडीचा। बोलिलीच वाचा बोलवीन।।तु.गा.०५९९.००५।।
वियोग न घडे सन्निध वसलें। अखंड राहिलें होय चित्तीं।।तु.गा.०६००.००१।।
विसर न पडे विकल्प न घडे। आलें तें आवडे तया पंथें।।तु.गा.०६००.००२।।
कामाचा विसर नाठवे शरीर। रसना मधुर नेणे फिकें ।।तु.गा.०६००.००३।।
निरोपासी काज असो अनामिक । निवडितां एक नये मज।।तु.गा.०६००.००४।।
तुका म्हणे हित चित्तें ओढियेलें। जेथें तें उगलें जावें येणें।।तु.गा.०६००.००५।।
आतां माझे सखे येती वारकरी। जीवा आस थोरी लागलीसे।।तु.गा.०६०१.००१।।
सांगतील माझ्या निरोपाची मात। सकळ वृत्तांत माहेरींचा।।तु.गा.०६०१.००२।।
काय लाभ झाला काय होतें केणें। काय काय कोणें सांठविलें।।तु.गा.०६०१.००३।।
मागणें तें काय धाडिलें भातुकें। पुसेन तें सुखें आहेतसीं।।तु.गा.०६०१.००४।।
तुका म्हणे काय सांगती ते कानीं। ऐकोनियां मनीं धरुनि राहें।।तु.गा.०६०१.००५।।
काय करावें म्यां केले ते विचार। घडेल साचार काय पाहों।।तु.गा.०६०२.००१।।
काय मन नाहीं धरीत आवडी। प्रारब्धें जोडी तेचि खरी।।तु.गा.०६०२.००२।।
काय म्यां तेथींचें रांधिलें चाखोनि। तें हें करी मनीं विवंचना।।तु.गा.०६०२.००३।।
आणीकही त्यासी बहुत कारणें। बहु असे जिणें ओढीचेंही।।तु.गा.०६०२.००४।।
तुका म्हणे आम्हां बोळविल्यावरी। परती माघारी केली नाहीं।।तु.गा.०६०२.००५।।
आम्हां अराणूक संवसारा हातीं। पडिली नव्हती आजीवरी।।तु.गा.०६०३.००१।।

पुत्रदाराधन होता मनीं धंदा। गोवियेलों सदा होतों कामें ।।तु.गा.०६०३.००२।।
वोढवलें ऐसें दिसतें कपाळ। राहिलें सकळ आवरोनि ।।तु.गा.०६०३.००३।।
मागें पुढें कांहीं न दिसे पाहातां। येथूनियां चिंता उपजली ।।तु.गा.०६०३.००४।।
तुका म्हणे वाट पाह्याचें कारण। येथींचिया हीन झालें भाग्य ।।तु.गा.०६०३.००५।।
बहु दिस नाहीं माहेरींची भेटी। झाली होती तुटी व्यवसायें ।।तु.गा.०६०४.००१।।
आपुलाल्या होतों गुंतलों व्यासंगें। नाहीं त्या प्रसंगें आठवलें ।।तु.गा.०६०४.००२।।
तोडिलें तुटतें जडीतें जडलें। आहे तें आपुलें आपणापें ।।तु.गा.०६०४.००३।।
बहु निरोपाचें पावलें उत्तर। जवळीच फार एक तेंही ।।तु.गा.०६०४.००४।।
काय जाणों मोह होईल सांडिला। बहु दिस तुटला तुका म्हणे ।।तु.गा.०६०४.००५।।
होतीं नेणों झालीं कठिणें कठीण। जवळीच मनें मन ग्वाही ।।तु.गा.०६०५.००१।।
आम्ही होतों सोई सांडिला मारग। घडलें तें मग तिकूनही ।।तु.गा.०६०५.००२।।
निश्चिंतीनें होते पुढिलांची सांडी। न चले ते कोंडी मायबापा ।।तु.गा.०६०५.००३।।
आम्हां नाहीं त्याचा घडला आठव। त्याचा बहु जीव विखुरला ।।तु.गा.०६०५.००४।।
तुका म्हणे झालें धर्माचें माहेर। पडिलें अंतर आम्हांकूनि ।।तु.गा.०६०५.००५।।
आतां करावा कां सोस वायांविण। लटिकाचि सीण मनासी हा ।।तु.गा.०६०६.००१।।
असेल तें कळों येईल लवकरी। आतां वारकरी आल्यापाठीं ।।तु.गा.०६०६.००२।।
बहु विलंबाचें सन्निध पातलें। धीराचें राहिलें फळ पोटीं ।।तु.गा.०६०६.००३।।
चालिलें तें ठाव पावेल सेवटीं। पुरलिया तुटी पाऊलांची ।।तु.गा.०६०६.००४।।
तुका म्हणे आसे लागलासे जीव। म्हणऊनि कींव भाकीतसें ।।तु.गा.०६०६.००५।।
भागलेती देवा। माझा नमस्कार घ्यावा ।।तु.गा.०६०७.००१।।
तुम्ही क्षेम कीं सकळ। बाळ अवघे गोपाळ ।।तु.गा.०६०७.००२।।
मारगीं चालतां। श्रमलेती येतां जातां ।।तु.गा.०६०७.००३।।
तुका म्हणे कांहीं। कृपा आहे माझ्या ठायीं ।।तु.गा.०६०७.००४।।

घालूनियां ज्योती। वाट पाहें दिवसराती ।।तु.गा.०६०८.००१ ।।
बहु उताविळ मन। तुमचें व्हावें दरुषण ।।तु.गा.०६०८.००२ ।।
आलों बोळवीत। तैसे याचि पंथें चित्त ।।तु.गा.०६०८.००३ ।।
तुका म्हणे पेणी। येतां जातां दिवस गणीं ।।तु.गा.०६०८.००४ ।।
आजी दिवस धन्य। तुमचें झालें दर्शन ।।तु.गा.०६०९.००१ ।।
सांगा माहेरींची मात। अवघा विस्तारें वृत्तांत ।।तु.गा.०६०९.००२ ।।
आइकतों मनें। करूनि सादर श्रवण ।।तु.गा.०६०९.००३ ।।
तुका म्हणे नाम। माझा सकळ संभ्रम ।।तु.गा.०६०९.००४ ।।
बोलिलेती काय। माझा बाप आणि माय ।।तु.गा.०६१०.००१ ।।
ऐसें सांगा जी झडकरी। तुम्ही सखे वारकरी ।।तु.गा.०६१०.००२ ।।
पत्राचें वचन। काय दिलें फिरावून ।।तु.गा.०६१०.००३ ।।
तुका म्हणे कांहीं। मना आणिलें कीं नाहीं ।।तु.गा.०६१०.००४ ।।
काय पाठविलें। सांगा भातुकें विठ्ठलें ।।तु.गा.०६११.००१ ।।
आसे लागलासे जीव। काय केली माझी कींव ।।तु.गा.०६११.००२ ।।
फेडिलें मुडतर। किंवा कांहीं जरजर ।।तु.गा.०६११.००३ ।।
तुका म्हणे सांगा। कैसें आर्त पांडुरंगा ।।तु.गा.०६११.००४ ।।
आजींचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें। सुखी झालें मन कल्पवेना ।।तु.गा.०६१२.००१ ।।
आर्तभूत माझा जीव जयांसाठीं। त्यांच्या झाल्या भेटी पायांसवें ।।तु.गा.०६१२.००२ ।।
वाटुली पाहतां सिणले नयन। बहु होतें मन आर्तभूत ।।तु.गा.०६१२.००३ ।।
माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर। होईल समाचार सांगती तो ।।तु.गा.०६१२.००४ ।।
तुका म्हणे भेटी निवारला ताप। फळले संकल्प संत आले ।।तु.गा.०६१२.००५ ।।
आजी बरवें झालें। माझें माहेर भेटलें ।।तु.गा.०६१३.००१ ।।
डोळां देखिले सज्जन। निवारला भाग सीण ।।तु.गा.०६१३.००२ ।।

धन्य झालों आतां। क्षेम देऊनियां संतां।।तु.गा.०६१३.००३ ।।
इच्छेचें पावलों। तुका म्हणे धन्य झालों।।तु.गा.०६१३.००४।।
वोरसोनि येती। वत्स धेनुवेचे चित्तीं।।तु.गा.०६१४.००१ ।।
माझा करावा सांभाळ। वोरसोनियां कृपाळ।।तु.गा.०६१४.००२।।
स्नेह भूक ताहान। विसरती झाले सीण।।तु.गा.०६१४.००३।।
तुका म्हणे कवतुकें। दिलें प्रेमाचें भातुकें ।।तु.गा.०६१४.००४।।
आलें तें आधीं खाईन भातुकें। मग कवतुकें गाईन ओंव्या।।तु.गा.०६१५.००१ ।।
सांगितला आधीं आइकों निरोप। होईल माझा बाप पुसे तो तें।।तु.गा.०६१५.००२।।
तुका म्हणे माझे सखे वारकरी। आलें हे माहेरींहून आजि।।तु.गा.०६१५.००३।।
अमूप जोडल्या सुखाचिया रासी। पार त्या भाग्यासी नाहीं आतां।।तु.गा.०६१६.००१ ।।
काय सांगों सुख झाले आलिंगनें। निवाली दर्शनें कांति माझी।।तु.गा.०६१६.००२।।
तुका म्हणे यांच्या उपकारासाठीं। नाहीं माझें गांठी कांहीं एक ।।तु.गा.०६१६.००३।।
पवित्र व्हावया घालीन लोळणी। ठेवीन चरणीं मस्तक हें।।तु.गा.०६१७.००१ ।।
जोडोनि हस्तक करीन विनवणी। घेईन पायवणी धोवोनियां।।तु.गा.०६१७.००२।।
तुका म्हणे माझें भांडवल सुचें। संतां हें ठायींचें ठावें आहे।।तु.गा.०६१७.००३।।
चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्र ही न खाती सर्प तया।।तु.गा.०६१८.००१ ।।
विष तें अमृत आघात तें हित। अकर्तव्य नीत होय त्यासी।।तु.गा.०६१८.००२।।
दुःख तें देईल सर्व सुख फळ। होतील शीतळ अग्निज्वाळा।।तु.गा.०६१८.००३।।
आवडेल जीवां जीवाचिये परी। सकळां अंतरीं एक भाव।।तु.गा.०६१८.००४।।
तुका म्हणे कृपा केली नारायणें। जाणिजे तें येणें अनुभवें।।तु.गा.०६१८.००५।।
नाहीं घाटावें लागत। एका सितें कळे भात।।तु.गा.०६१९.००१ ।।
क्षीर निवडितें पाणी। चोंची हंसाचिये आणी।।तु.गा.०६१९.००२ ।।
आंगडें फाडुनि घोंगडें करी। अवकळा तयापरी।।तु.गा.०६१९.००३।।

तुका म्हणे कण। भुसीं निवडे कैंचा सीण।।तु.गा.०६१९.००४।।

सालोमालो हरिचे दास। म्हणऊन केला अवघा नास।।तु.गा.०६२०.००१।।

अवघें बचमंगळ केलें। म्हणती एकाचें आपुलें।।तु.गा.०६२०.००२।।

मोडूनि संतांचीं वचनें। करिती आपणां भूषणें।।तु.गा.०६२०.००३।।

तुका म्हणे कवी। जगामधीं रूढी दावी।।तु.गा.०६२०.००४।।

कालवूनी विष। केला अमृताचा नास।।तु.गा.०६२१.००१।।

ऐशी अभाग्याची बुद्धि। सत्य लोपी नाहीं शुद्धि।।तु.गा.०६२१.००२।।

नाक कापूनि लावी सोनें। कोण अळंकार लेणें।।तु.गा.०६२१.००३।।

तुका म्हणे बावी। मोडूनि मदार बांधावी।।तु.गा.०६२१.००४।।

कण भुसाच्या आधारें। परि तें निवडितां बरें।।तु.गा.०६२२.००१।।

काय घोंगाणी पाधाणी। ताकामध्यें घाटी लोणी।।तु.गा.०६२२.००२।।

सुइणीपुढें चेटा। काय लपविली चाटा।।तु.गा.०६२२.००३।।

तुका म्हणे ज्ञान। दिमाखाची भणभण।।तु.गा.०६२२.००४।।

जायाचे अळंकार। बुडवूनि होती चोर।।तु.गा.०६२३.००१।।

त्यांसी ताडणाची पूजा। योग घडे बऱ्या वोजा।।तु.गा.०६२३.००२।।

अभिळासाच्या सुखें। अंतीं होती काळीं मुखें।।तु.गा.०६२३.००३।।

तुका म्हणे चोरा। होय भूषण मातेरा।।तु.गा.०६२३.००४।।

विकेल तेथें विका। माती नांव ठेवूनि बुका।।तु.गा.०६२४.००१।।

हा तो निवाड्याचा ठाव। खरा खोटा निवडे भाव।।तु.गा.०६२४.००२।।

गऱ्हवारे हा विधि। पोट वाढविलें चिंधीं।।तु.गा.०६२४.००३।।

लावूं जाणे विल्हे। तुका साच आणि कल्हे।।तु.गा.०६२४.००४।।

विषयीं अद्वये। त्यासी आम्हां सिवों नये।।तु.गा.०६२५.००१।।

देव तेथूनि निराळा। असे निष्काम वेगळा।।तु.गा.०६२५.००२।।

वासनेची बुंथी । तेथें कैंची ब्रह्मस्थिती ।।तु.गा.०६२५.००३ ।।
तुका म्हणे असतां देहीं । तेथें नाहीं जमती ।।तु.गा.०६२५.००४ ।।
नमितों या देवा । माझी एके ठायीं सेवा ।।तु.गा.०६२६.००१ ।।
गुण अवगुण निवाडा । म्हैस म्हैस रेडा रेडा ।।तु.गा.०६२६.००२ ।।
जनीं जनार्दन । साक्ष त्यासी लोटांगण ।।तु.गा.०६२६.००३ ।।
तुका म्हणे खडे । निवडूं दळणीं घडघडे ।।तु.गा.०६२६.००४ ।।
चिंतामणिदेवा गणपतीसी आणा । करवावें भोजना दुजें पात्रीं ।।तु.गा.०६२७.००१ ।।
देव म्हणती तुकया एवढी कैंची थोरी । अभिमानाभीतरी नागवलों ।।तु.गा.०६२७.००२ ।।
वाड वेळ जाला सिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ।।तु.गा.०६२७.००३ ।।
तुका म्हणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ।।तु.गा.०६२७.००४ ।।
वांझा गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याती ।।तु.गा.०६२८.००१ ।।
ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ।।तु.गा.०६२८.००२ ।।
चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारू।।तु.गा.०६२८.००३ ।।
पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ।।तु.गा.०६२८.००४ ।।
तुका म्हणे देवा । कां गा खोंचलासी जीवा ।।तु.गा.०६२८.००५ ।।
भोक्ता नारायण लक्ष्मीचा पति । म्हणोनि प्राणाहुति घेतलिया ।।तु.गा.०६२९.००१ ।।
भर्ता आणि भोक्ता कर्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ।।तु.गा.०६२९.००२ ।।
विश्वंभर कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ।।तु.गा.०६२९.००३ ।।
कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका म्हणे ।।तु.गा.०६२९.००४ ।।
माझा स्वामी तुझी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ।।तु.गा.०६३०.००१ ।।
तीर्थें तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ।।तु.गा.०६३०.००२ ।।
तुका म्हणे तुम्ही देवा द्विज वंद्य । मी तों काय निंद्य हीन याती ।।तु.गा.०६३०.००३ ।।
परतें मी आहें सहजचि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा ।।तु.गा.०६३१.००१ ।।

नलगे रुसावें धरावा संकोच। सहज तें नीच आले भागा।।तु.गा.०६३१.००२।।
पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें। आर्त तेंचि देवें केले ऐसें।।तु.गा.०६३१.००३।।
तुका म्हणे तुम्ही आम्हां जी वेगळे। केले ते निराळे द्विज देवा।।तु.गा.०६३१.००४।।
कोण येतें घरा आमुच्या काशाला। काय ज्याचा त्याला नाहीं धंदा।।तु.गा.०६३२.००१।।
देवासाठीं जालें ब्रह्मांड सोइरें। कोवळ्या उत्तरें काय वेंचे।।तु.गा.०६३२.००२।।
मानें पाचारितां नव्हे अराणूक। ऐसे येती लोक प्रीतीसाठीं।।तु.गा.०६३२.००३।।
तुका म्हणे रांडे नावडे भूषण। कातेलें तें श्वान लागे पाठीं।।तु.गा.०६३२.००४।।
देव पहावया करीं वो सायास। न धरीं हे आस नाशिवंत।।तु.गा.०६३३.००१।।
दिन शुद्ध सोम सकाळीं पातला। द्वादशी घडला पर्वकाळ।।तु.गा.०६३३.००२।।
द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन। देईं वो हें दान यथाविध।।तु.गा.०६३३.००३।।
नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची। माउली आमुची पांडुरंग।।तु.गा.०६३३.००४।।
तुका म्हणे दुरी सांगतों पाल्हाळीं। परी तो जवळी आहे आम्हां।।तु.गा.०६३३.००५।।
सुख हें नावडे आम्हां कोण्या बळें। नेणसी अंधळे झालीशी तूं।।तु.गा.०६३४.००१।।
भूक ताहान कैसी राहिली निश्चळ। खुंटलें चपळ मन ठायीं।।तु.गा.०६३४.००२।।
द्रव्य जीवाहूनि आवडे या जना। आम्हांसी पाषाणाहूनि हीन।।तु.गा.०६३४.००३।।
सोइरे सज्जन जन आणि वन। अवघें समान काय गुणें।।तु.गा.०६३४.००४।।
तुका म्हणे आम्हां जवळीच आहे। सुख दुःख साहे पांडुरंग।।तु.गा.०६३४.००५।।
गुरुकृपें मज बोलविलें देवें। होईल हें घ्यावें हित कांहीं।।तु.गा.०६३५.००१।।
सत्य देवें माझा केला अंगीकार। आणिक विचार नाहीं दुजा।।तु.गा.०६३५.००२।।
होईं बळकट घालूनियां कास। हाचि उपदेश तुज आतां।।तु.गा.०६३५.००३।।
सडा संमार्जन तुळसी वृंदावन। अतीतपूजन ब्राह्मणांचें।।तु.गा.०६३५.००४।।
वैष्णवांची दासी होईं सर्वभावें। मुखीं नाम घ्यावें विठोबाचें।।तु.गा.०६३५.००५।।
पूर्णबोध स्त्रीभ्रतारसंवाद। धन्य जिहीं वाद आइकिला।।तु.गा.०६३५.००६।।

तुका म्हणे आहे पांडुरंगकथा। तरेल जो चित्ता धरील कोणी ।।तु.गा.०६३५.००७ ।।
दिवट्या छत्री घोडे। हें तों बऱ्यांत न पडे ।।तु.गा.०६३६.००१ ।।
आतां येथें पंढरिराया। मज गोविसी कासया ।।तु.गा.०६३६.००२ ।।
मान दंभ चेष्टा। हे तों शूकराची विष्ठा ।।तु.गा.०६३६.००३ ।।
तुका म्हणे देवा। माझे सोडवणें धांवा ।।तु.गा.०६३६.००४ ।।
नावडे जें चित्ता। तेंचि होसी पुरविता ।।तु.गा.०६३७.००१ ।।
कां रे पुरविली पाठी। माझी केली जीवें साठीं ।।तु.गा.०६३७.००२ ।।
न करावा संग। वाटे दुरवावें जग ।।तु.गा.०६३७.००३ ।।
सेवावा एकांत। वाटे न बोलावी मात ।।तु.गा.०६३७.००४ ।।
जन तन धन। वाटे लेखावें वमन ।।तु.गा.०६३७.००५ ।।
तुका म्हणे सत्ता। हातीं तुझ्या पंढरीनाथा ।।तु.गा.०६३७.००६ ।।
काय दिला ठेवा। आम्हां विठ्ठलचि व्हावा ।।तु.गा.०६३८.००१ ।।
तुम्ही कळलेती उदार। साटीं परिसाची गार ।।तु.गा.०६३८.००२ ।।
जीव देतां तरी। वचना नये येका सरी ।।तु.गा.०६३८.००३ ।।
गोमांसासमान। तुका म्हणे आम्हां धन ।।तु.गा.०६३८.००४ ।।
मुंगी आणि राव। आम्हां सारखाची जीव ।।तु.गा.०६३९.००१ ।।
गेला मोह आणि आशा। कळिकाळाचा हा फांसा ।।तु.गा.०६३९.००२ ।।
सोनें आणि माती। आम्हां समान हें चित्तीं ।।तु.गा.०६३९.००३ ।।
तुका म्हणे आलें। घरा वैकुंठ सांवळें ।।तु.गा.०६३९.००४ ।।
जाणोनि अंतर। टाळिसील करकर ।।तु.गा.०६४०.००१ ।।
तुज लागली हे खोडी। पांडुरंगा बहु कुडी ।।तु.गा.०६४०.००२ ।।
उठविसी दारीं। धरणें एखादिये परी ।।तु.गा.०६४०.००३ ।।
तुका म्हणे पाय। कैसे सोडीन तें पाहें ।।तु.गा.०६४०.००४ ।।

नाहीं विचारीत। मेघ हगणदारी सेत ।।तु.गा.०६४१.००१ ।।
नये पाहों त्याचा अंत। ठेवी कारणापें चित्त ।।तु.गा.०६४१.००२ ।।
वर्जित गंगा। नाहीं उत्तम अधम जगा ।।तु.गा.०६४१.००३ ।।
तुका म्हणे मळ। नाहीं अग्नीसी विटाळ ।।तु.गा.०६४१.००४ ।।
सोन्याचे पर्वत करवती पाषाण। अवघे रानोरान कल्पतरू।।तु.गा.०६४२.००१ ।।
परि या दुर्लभ विठोबाचे पाय। तेथें हे उपाय न सरती ।।तु.गा.०६४२.००२ ।।
अमृतें सागर भरवती गंगा। म्हणवेल उगा राहे काळा ।।तु.गा.०६४२.००३ ।।
भूतभविष्य कळों येईल वर्तमान। करवती प्रसन्न ऋद्धिसिद्धि ।।तु.गा.०६४२.००४ ।।
ठानमान कळों येती योग मुद्रा। नेववेल वारा ब्रह्मांडासी ।।तु.गा.०६४२.००५ ।।
तुका म्हणे मोक्ष राहे ऐलीकडे। येर तें बापुडें काय तेथें ।।तु.गा.०६४२.००६ ।।
तिहीं त्रिभुवनीं। आम्ही वैभवाचे धनी ।।तु.गा.०६४३.००१ ।।
हातां आला घाव डाव। आमुचा मायबाप देव ।।तु.गा.०६४३.००२ ।।
काय त्रिभुवनीं बळ। अंगीं आमुच्या सकळ ।।तु.गा.०६४३.००३ ।।
तुका म्हणे सत्ता। अवघी आमुचीच आतां ।।तु.गा.०६४३.००४ ।।
आम्ही तेणें सुखी। म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ।।तु.गा.०६४४.००१ ।।
तुमचें येर वित्त धन। तें मज मृत्तिकेसमान ।।तु.गा.०६४४.००२ ।।
कंठीं मिरवा तुळसी। व्रत करा एकादशी ।।तु.गा.०६४४.००३ ।।
म्हणवा हरिचे दास। तुका म्हणे मज हे आस ।।तु.गा.०६४४.००४ ।।
न देखवे डोळां ऐसा हा आकांत। परपीडें चित्त दुःखी होतें ।।तु.गा.०६४५.००१ ।।
काय तुम्ही येथें नसालसें जालें। आम्हीं न देखिलें पाहिजे हें ।।तु.गा.०६४५.००२ ।।
परचक्र कोठें हरिदासांच्या वासे। न देखिजे तद्देशें राहातिया ।।तु.गा.०६४५.००३ ।।
तुका म्हणे माझी लाजविली सेवा। हीनपणें देवा जिणें जालें ।।तु.गा.०६४५.००४ ।।
काय म्यां मानावें हरिकथेचें फळ। तरिजे सकळ जनी ऐसें ।।तु.गा.०६४६.००१ ।।

उच्छेद तो असे हा गे आरंभला। रोकडें विठ्ठुला परचक्र ।।तु.गा.०६४६.००२।।
पापाविण नाहीं पाप येत पुढें। साक्षीसी रोकडें साक्ष आलें।।तु.गा.०६४६.००३।।
तुका म्हणे जेथें वसतील दास। तेथें तुझा वास कैसा आतां।।तु.गा.०६४६.००४।।
भीत नाहीं आतां आपुल्या मरणा। दुःख होतें जनां न देखवे।।तु.गा.०६४७.००१।।
आमची तो जाती ऐसी परंपरा। कां तुम्ही दातारा नेणां ऐसी।।तु.गा.०६४७.००२।।
भजनीं विक्षेप तेंची पैं मरण। न वजावा तो क्षण एक वायां।।तु.गा.०६४७.००३।।
तुका म्हणे नाहीं आघाताचा वारा। ते स्थळीं दातारा ठाव मागें।।तु.गा.०६४७.००४।।
अशक्य तें तुम्हां नाहीं नारायणा। निर्जीवा चेतना आणावया।।तु.गा.०६४८.००१।।
मागें काय जाणों स्वामीचे पवाडे। आतां कां रोकडें दावूं नये।।तु.गा.०६४८.००२।।
थोर भाग्य आम्ही समर्थाचे कांसे। म्हणवितों दास काय थोडे।।तु.गा.०६४८.००३।।
तुका म्हणे माझे निववावे डोळे। दावूनि सोहळे समर्थाचे।।तु.गा.०६४८.००४।।
जळे माझी काया लागला वोणवा। धांव रे केशवा मायबापा।।तु.गा.०६४९.००१।।
पेटली सकळ कांति रोमावळी। नावरे हे होळी दहन जालें ।।तु.गा.०६४९.००२।।
फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे। पाहातोसी काय हृदय माझें।।तु.गा.०६४९.००३।।
घेऊनि जीवन धांवें लवलाहीं। कवणाचें कांहीं न चले येथें।।तु.गा.०६४९.००४।।
तुका म्हणे माझी तूं होसी जननी। आणीक निर्वाणीं कोण राखे।।तु.गा.०६४९.००५।।
पराविया नारी रखुमाईसमान। हें गेलें नेमून ठायींचेंचि।।तु.गा.०६५०.००१।।
जाईं वो तूं माते न करीं सायास। आम्ही विष्णुदास तैसे नव्हों।।तु.गा.०६५०.००२।।
न साहावे मज तुझें हें पतन। नको हें वचन दुष्ट वदों।।तु.गा.०६५०.००३।।
तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार। तरी काय नर थोडे जाले।।तु.गा.०६५०.००४।।
स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्ठा या पाषाणामृत्तिकेच्या।।तु.गा.०६५१.००१।।
नाठवे हा देव न घडे भजन। लांचावलें मन आवरेना।।तु.गा.०६५१.००२।।
दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें। लावण्य तें खरें दुःखमूळ।।तु.गा.०६५१.००३।।

तुका म्हणे जरी अग्नि जाला साधु। तरी पडे बाधूं संघष्टणे ।।तु.गा.०६५१.००४ ।।
याती शूद्र वैश्य केला वेवसाव। आधीं तो हा देव कुळपूज्य ।।तु.गा.०६५२.००१ ।।
नये बोलों परि पाळिलें वचन। केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ।।तु.गा.०६५२.००२ ।।
संवसारें जालों अतिदु:खें दु:खी। मायबापें सेखीं क्रमिलीया ।।तु.गा.०६५२.००३ ।।
दुष्काळें आटिलें द्रव्य नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ।।तु.गा.०६५२.००४ ।।
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दु:खें। वेवसाय देखें तुटी येतां ।।तु.गा.०६५२.००५ ।।
देवाचे देऊळ होते जे भंगले। चित्तासी ते आले करावेसे ।।तु.गा.०६५२.००६ ।।
आरंभीं कीर्तन करी एकादशीं। नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ।।तु.गा.०६५२.००७ ।।
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें। विश्वास आदरें करोनियां ।।तु.गा.०६५२.००८ ।।
गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद। भावें चित्त शुद्ध करोनियां ।।तु.गा.०६५२.००९ ।।
संतांचें सेविलें तीर्थ पायवणी। लाज नाहीं मनीं येऊं दिली ।।तु.गा.०६५२.०१० ।।
ठाकला तो कांहीं केला परउपकार। केलें हें शरीर कष्टवूनि ।।तु.गा.०६५२.०११ ।।
वचनें मानिलीं नाहीं सुहृदांचीं। समूळ प्रपंचीं वीट आला ।।तु.गा.०६५२.०१२ ।।
सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही। मानियेलें नाहीं बहुमतां ।।तु.गा.०६५२.०१३ ।।
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश। धरिला विश्वास दृढ नामीं ।।तु.गा.०६५२.०१४ ।।
यावरी या जाली कवित्वाची स्फूर्ति। पाय धरिले चित्तीं विठोबाचे ।।तु.गा.०६५२.०१५ ।।
निषेधाचा कांहीं पडिला आघात। तेणें मध्यें चित्त दुखवलें ।।तु.गा.०६५२.०१६ ।।
बुडविल्या वह्या बैसलों धरणें। केलें नारायणें समाधान ।।तु.गा.०६५२.०१७ ।।
विस्तारी सांगतां बहुत प्रकार। होईल उशीर आतां पुरे ।।तु.गा.०६५२.०१८ ।।
आतां आहे तैसा दिसतो विचार। पुढील प्रकार देव जाणे ।।तु.गा.०६५२.०१९ ।।
भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा। कृपावंत ऐसा कळों आले ।।तु.गा.०६५२.०२० ।।
तुका म्हणे माझे सर्व भांडवल। बोलविले बोल पांडुरंगें ।।तु.गा.०६५२.०२१ ।।
ऐका वचन हें संत। मी तो आगळा पतित। काय काजें प्रीत। करीतसां आदरें ।।तु.गा.०६५३.००१ ।।

माझें चित्त मज ग्वाही। सत्य तरलों मी नाहीं। एकाचिये वाहीं। एक देखीं मानिती।।तु.गा.०६५३.००२।।
बहु पीडिलों संसारें। मोडी पिसें पिटीं ढोरें। न पडतां पुरें। या विचारें राहिलों।।तु.गा.०६५३.००३।।
सहज सरलें होतें कांहीं। द्रव्य थोडें बहु तेंही। त्याग केला नाहीं। दिलें द्विजां याचकां।।तु.गा.०६५३.००४।।
प्रियापुत्रबंधु। यांचा तोडिला संबंधु। सहज जालों मंदु। भाग्यहीन करंटा।।तु.गा.०६५३.००५।।
तोंड न दाखवावें जना। शिरें सांदी भरें राना। एकांत तो जाणा। तयासाठीं लागला।।तु.गा.०६५३.००६।।
पोटें पिटिलें काहारें। दया नाहीं या विचारें। बोलावितां बरें। सहज म्हणे यासाठीं।।तु.गा.०६५३.००७।।
सहज वडिलां होती सेवा। म्हणोनि पूजितों या देवा। तुका म्हणे भावा–। साठीं झणी घ्या कोणी।।तु.गा.०६५३.००८।।
बरें जालें देवा निघालें दिवाळें। बरी या दुष्काळें पीडा केली।।तु.गा.०६५४.००१।।
अनुतापें तुझें राहिलें चिंतन। जाला हा वमन संवसार।।तु.गा.०६५४.००२।।
बरें जालें देवा बाईल कर्कशा। बरी हे दुर्दशा जनामध्यें।।तु.गा.०६५४.००३।।
बरें जालें जगीं पावलों अपमान। बरें गेलें धन ढोरें गुरें।।तु.गा.०६५४.००४।।
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज। बरा आलों तुज शरण देवा।।तु.गा.०६५४.००५।।
बरें जालें तुझें केलें देवाईल। लेंकरे बाईल उपेक्षिलीं।।तु.गा.०६५४.००६।।
तुका म्हणे बरें व्रत एकादशी। केलें उपवासीं जागरण।।तु.गा.०६५४.००७।।
अवघीं भूतें साम्या आलीं। देखिलीं म्यां कैं होतीं।।तु.गा.०६५५.००१।।
विश्वास तो खरा मग। पांडुरंग कृपेचा।।तु.गा.०६५५.००२।।
माझी कोणी न धरू शंका। ऐसें हो कां निर्द्वंद्व।।तु.गा.०६५५.००३।।
तुका म्हणे जें जें भेटे। तें तें वाटे मी ऐसें।।तु.गा.०६५५.००४।।
काखे कडासन आड पडे। खडबड खडबड हुसकलें।।तु.गा.०६५६.००१।।
दाद करा दाद करा। फजितखोरा लाज नाहीं।।तु.गा.०६५६.००२।।
अवघा झाला राम राम। कोणी कर्म आचरेना।।तु.गा.०६५६.००३।।
हरिदासांच्या पडती पायां। म्हणती तया नागवावें।।तु.गा.०६५६.००४।।
दोहीं ठायीं फजित झाले। पारणें केलें अवकळा।।तु.गा.०६५६.००५।।

तुका म्हणे नाश केला। विटंबिला वेश जेणें ।।तु.गा.०६५६.००६ ।।
कुटुंबाचा केला त्याग। नाहीं राग जंव गेला ।।तु.गा.०६५७.००१ ।।
भजन तें वोंगळवाणें। नरका जाणें चुकेना ।।तु.गा.०६५७.००२ ।।
अक्षराची केली आटी। जरी पोटीं संतनिंदा ।।तु.गा.०६५७.००३ ।।
तुका म्हणे मागें पाय। तया जाय स्थळासी ।।तु.गा.०६५७.००४ ।।
तारतिम वरि तोंडाच पुरतें। अंतरा हें येतें अंतरींचें ।।तु.गा.०६५८.००१ ।।
ऐसी काय बरी दिसे ठकाठकी। दिसतें लौकिकीं सत्य ऐसें ।।तु.गा.०६५८.००२ ।।
भोजनांत द्यावें विष कालवूनि। मोह चाळवणीं मारावया ।।तु.गा.०६५८.००३ ।।
तुका म्हणे मैंद देखों नेदी कुडें। आदराचें पुढें सोंग दावी ।।तु.गा.०६५८.००४ ।।
ब्रह्मनिष्ठ काडी। जरी जीवां नांवें मोडी ।।तु.गा.०६५९.००१ ।।
तया घडली गुरुहत्या। गेला उपदेश तो मिथ्या ।।तु.गा.०६५९.००२ ।।
सांगितलें कानीं। रूप आपुलें वाखाणी ।।तु.गा.०६५९.००३ ।।
भूतांच्या मत्सरें। ब्रह्मज्ञान नेलें चोरें ।।तु.गा.०६५९.००४ ।।
शिकल्या सांगे गोष्टी। भेद क्रोध वाहे पोटीं ।।तु.गा.०६५९.००५ ।।
निंदास्तुति स्तवनीं। तुका म्हणे वेंची वाणी ।।तु.गा.०६५९.००६ ।।
न सोडीं न सोडीं। विठोबा चरण न सोडीं ।।तु.गा.०६६०.००१ ।।
भलतें जड पडो भारी। जीवावरी आगोज ।।तु.गा.०६६०.००२ ।।
शतखंड देह शस्त्रधारी। करितां परी न भीयें ।।तु.गा.०६६०.००३ ।।
तुका म्हणे केली आधीं। दृढ बुद्धि सावध ।।तु.गा.०६६०.००४ ।।
बरवें बरवें। केलें विठोबा बरवें ।।तु.गा.०६६१.००१ ।।
पाहोनि बा अंत क्षमा। अंगीं कांटीवरी मारविलें।।तु.गा.०६६१.००२ ।।
शिव्या गाळी नीत नाहीं। बहु फार विटंबिलें।।तु.गा.०६६१.००३ ।।
तुका म्हणे क्रोधा हातीं। सोंडवूनि घेतलें रे ।।तु.गा.०६६१.००४ ।।

पावलों पावलों। देवा पावलों रे।।तु.गा.०६६२.००१ ।।
बरवे संचित होतें तैसें झालें रे। आतां काय बोलों रे।।तु.गा.०६६२.००२।।
सोज्वळ कंटकवाटा भावें करूं गेलों रे। तुका म्हणे करूनी वेगळा केलों रे।।तु.गा.०६६२.००३।।
कां होती कां होती। देवा एवढी फजीती।।तु.गा.०६६३.००१ ।।
मुळीं वर्म नसतों चुकलों। तो मी ऐसें चित्तीं।।तु.गा.०६६३.००२।।
होणार तें होऊनि गेलें। मिथ्या आतां खंती रे।।तु.गा.०६६३.००३।।
तुका म्हणे पुरे आतां। दुर्जनाची संगती रे।।तु.गा.०६६३.००४।।
सोडवा सोडवा सोडवा अनंता। तुजविण ऐसा कोण दुजा प्राणदाता।।तु.गा.०६६४.००१ ।।
कोणा लाज नेणां ऐसें। आणिका शरण आम्ही जातां।।तु.गा.०६६४.००२।।
तुका म्हणे सखया। माझ्या रखुमाईच्या कांता।।तु.गा.०६६४.००३।।
पुत्राची वार्ता। शुभ ऐके जेवीं माता।।तु.गा.०६६५.००१ ।।
तैसें राहो माझें मन। गातां ऐकतां हरिगुण।।तु.गा.०६६५.००२।।
नादें लुब्ध झाला मृग। देह विसरला अंग।।तु.गा.०६६५.००३।।
तुका म्हणे पाहे। कासवीचें पिलें माय।।तु.गा.०६६५.००४।।
शोधितांचि नये। म्हणोनि वोळगतों पाय।।तु.गा.०६६६.००१ ।।
आतां दिसों नये जना। ऐसें करा नारायणा।।तु.गा.०६६६.००२।।
परतोनि मन। गेलें ठायींचि मुरोन।।तु.गा.०६६६.००३।।
विसरला तुका। बोलों चालों झाला मुका।।तु.गा.०६६६.००४।।
रज्जुसर्पाकार। भासयलें जगडंबर।।तु.गा.०६६७.००१ ।।
म्हणोनि आवडती पाय। घेतों आलाय बलाय।।तु.गा.०६६७.००२।।
दृश्य द्रुमाकार लाणी। केलों सर्वस्वासी धनी।।तु.गा.०६६७.००३।।
तुकीं तुकला तुका। विश्वीं भरोनि उरला लोकां।।तु.गा.०६६७.००४।।
म्हणवितों दास। परि मी असें उदास।।तु.गा.०६६८.००१ ।।

हाचि निश्चय माझा। परि मी निश्चयाहूनि दुजा।।तु.गा.०६६८.००२।।
सरतें कर्तृत्व माझ्यानें। परि मी त्याहून असें भिन्न।।तु.गा.०६६८.००३।।
तुका तुकासी तुकला। तुका तुकाहूनि निराळा।।तु.गा.०६६८.००४।।
घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं। मुक्तां आत्मस्थिती सांडवीन।।तु.गा.०६६९.००१।।
ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं। भाग्य तरी ऋणी देव ऐसा।।तु.गा.०६६९.००२।।
तीर्थभ्रामकासी आणीन आळस। कडू स्वर्गवास करिन भोग।।तु.गा.०६६९.००३।।
सांडवीन तपोनिधा अभिमान। यज्ञ आणि दान लाजवीन।।तु.गा.०६६९.००४।।
भक्तिभाग्यसीमा साधीन पुरुषार्थ। ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा।।तु.गा.०६६९.००५।।
धन्य म्हणवीन येह लोकीं लोकां। भाग्य आम्हीं तुका देखियेला।।तु.गा.०६६९.००६।।
संसाराचे अंगीं अवघीच व्यसनें। आम्ही या कीर्तनें शुद्ध झालों।।तु.गा.०६७०.००१।।
आतां हें सोवळें झालें त्रिभुवन। विषम धोऊन सांडियेलें।।तु.गा.०६७०.००२।।
ब्रह्मपुरीं वास करणें अखंड। न देखिजे तोंड विटाळाचें।।तु.गा.०६७०.००३।।
तुका म्हणे आम्हां एकांताचा वास। ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा।।तु.गा.०६७०.००४।।
गरुडाचे पायीं। ठेवीं वेळोवेळां डोई।।तु.गा.०६७१.००१।।
वेगीं आणावा तो हरी। मज दीनातें उद्धरीं।।तु.गा.०६७१.००२।।
पाय लक्ष्मीच्या हातीं। म्हणोन येतों काकुलती।।तु.गा.०६७१.००३।।
तुका म्हणे शेषा। जागें करा हृषीकेशा।।तु.गा.०६७१.००४।।
तुम्ही सनकादिक संत। म्हणवितां कृपावंत।।तु.गा.०६७२.००१।।
एवढा करा उपकार। देवा सांगा नमस्कार।।तु.गा.०६७२.००२।।
भाकावी करुणा। विनवा वैकुंठींचा राणा।।तु.गा.०६७२.००३।।
तुका म्हणे मज आठवा। मूळ लौकरी पाठवा।।तु.गा.०६७२.००४।।
आपुल्या माहेरा जाईन मी आतां। निरोप या संतां हातीं आला।।तु.गा.०६७३.००१।।
सुख दुःख माझें आइकिलें कानीं। कळवळा मनीं करुणेचा।।तु.गा.०६७३.००२।।

करुनि सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसे एकें न्यावयासी ॥तु.गा.०६७३.००३॥
त्याचि पंथें माझें लागलेंसें चित्त। वाट पाहे नित्य माहेराची ॥तु.गा.०६७३.००४॥
तुका म्हणे आतां येतील न्यावया। अंगें आपुलिया मायबाप ॥तु.गा.०६७३.००५॥
चिन्हें उमटती अंगीं। शकुनाजोगीं उत्तम ॥तु.गा.०६७४.००१॥
आठवला बापमाय। येईल काय मूळ नेणों ॥तु.गा.०६७४.००२॥
उत्कंठित झालें मन। हीच खूण तेथींचि ॥तु.गा.०६७४.००३॥
तुका म्हणे कामा वारीं। आळस घरीं करमेना ॥तु.गा.०६७४.००४॥
आरोनियां पाहें वाट। कटकट सोसेना ॥तु.गा.०६७५.००१॥
आलियांस पुसें मात। तेथें चित्त लागलें ॥तु.गा.०६७५.००२॥
दळीं कांडीं लोकां ऐसें। परि मी नसे ते ठायीं ॥तु.गा.०६७५.००३॥
तुका म्हणे येथें पिसे। तेथें तैसें असेल ॥तु.गा.०६७५.००४॥
येथीलिया अनुभवें। कळों जीवें येतसे ॥तु.गा.०६७६.००१॥
दोहीं ठायीं एक जीव। माझी कींव त्या अंगीं ॥तु.गा.०६७६.००२॥
भुकें भूकची खाऊनि धाय। नाहीं हाय अन्नाची ॥तु.गा.०६७६.००३॥
तुका म्हणे सुख झालें। अंतर धालें त्यागुणें ॥तु.गा.०६७६.००४॥
पैल आले हरि। शंख चक्र शोभे करीं ॥तु.गा.०६७७.००१॥
गरुड येतो फडत्कारें। ना भी ना भी म्हणे त्वरें ॥तु.गा.०६७७.००२॥
मुगुटकुंडलांच्या दीप्ति। तेजें लोपला गभस्ति ॥तु.गा.०६७७.००३॥
मेघश्यामवर्ण हरि। मूर्ति डोळस साजिरी ॥तु.गा.०६७७.००४॥
चतुर्भुज वैजयंती। गळां माळ हे रुळती ॥तु.गा.०६७७.००५॥
पीतांबर झळके कैसा। उजळल्या दाही दिशा ॥तु.गा.०६७७.००६॥
तुका झालासे संतुष्ट। घरा आलें वैकुंठपीठ ॥तु.गा.०६७७.००७॥
शंखचक्रगदापद्म। पैल आला पुरुषोत्तम ॥तु.गा.०६७८.००१॥

ना भी ना भी भक्तराया। वेगीं पावलों सखया।।तु.गा.०६७८.००२।।
दुरुनि येतां दिसे दृष्टी। धाकें दोष पळती सृष्टी।।तु.गा.०६७८.००३।।
तुका देखोनि एकला। वैकुंठींहुनि हरि आला।।तु.गा.०६७८.००४।।
पैल दिसतील भार। दिंड्या पताका अपार।।तु.गा.०६७९.००१।।
आला पंढरीचा राणा। दिसतील त्याच्या खुणा। सुख वाटे मना। डोळे बाह्या स्फुरती।।तु.गा.०६७९.००२।।
उठिले गजर नामाचे। दळभार वैष्णवांचे।।तु.गा.०६७९.००३।।
तुका करी रिता ठाव। त्यासी बैसावया वाव।।तु.गा.०६७९.००४।।
चला जाऊं रे सामोरे। पुढें भेटों विठ्ठल धुरे।।तु.गा.०६८०.००१।।
तुका आनंदला मनीं। कैसा जातो लोटांगणीं। फेडावया धणी। प्रेमसुखाची आजी।।तु.गा.०६८०.००२।।
पुढें आले कृपावंत। मायबाप साधुसंत।।तु.गा.०६८०.००३।।
तुका आळंगिला बाहीं। ठेविला विठोबाचे पायीं।।तु.गा.०६८०.००४।।
पाहुणे घरासी। आजी आले हृषीकेशी।।तु.गा.०६८१.००१।।
काय करूं उपचार। कोंप मोडकी जर्जर।।तु.गा.०६८१.००२।।
दरदरीत पाण्या–। माजीं रांधियेल्या कण्या।।तु.गा.०६८१.००३।।
घरीं मोडकीया बाजा। वरी वाकळांच्या शेजा।।तु.गा.०६८१.००४।।
मुखशुद्धि तुळसीदळ। तुका म्हणे मी दुर्बळ।।तु.गा.०६८१.००५।।
संतीं केला अंगीकार। त्यासी अभिमान थोर।।तु.गा.०६८२.००१।।
कांहीं ठेविलें चरणीं। घेती तेंचि पुरवूनि। तुका पायवणी। घेऊनियां निराळा।।तु.गा.०६८२.००२।।
नसतां कांहीं संचित। भेटी झाली अवचित।।तु.गा.०६८२.००३।।
देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ।।तु.गा.०६८२.००४।।
अवघियांच्या आलों मूळ। एक वेळ न्यावया।।तु.गा.०६८३.००१।।
सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें। आधीं ठावें करितों।।तु.गा.०६८३.००२।।
जोंवरी ते घटिका दुरी। आहे उरी तो काळ।।तु.गा.०६८३.००३।।

मंगळाचे वेळे उभे। असा शोभे सावध ।।तु.गा.०६८३.००४ ।।
अवघियांचा योग घडे। तरी जोडे श्लाघ्यता ।।तु.गा.०६८३.००५ ।।
तुका म्हणे पाहें वाट। बहु आट करूनि ।।तु.गा.०६८३.००६ ।।
सकळही माझी बोळवण करा। परतोनि घरा जावें तुम्हीं ।।तु.गा.०६८४.००१ ।।
कर्मधर्मे तुम्हां असावें कल्याण। घ्या माझें वचन आशीर्वाद ।।तु.गा.०६८४.००२ ।।
वाढवूनि दिलें एकाचिये हातीं। सकळ निश्चिंती झाली तेथें ।।तु.गा.०६८४.००३ ।।
आतां मज जाणें प्राणेश्वरासवें। मी माझिया भावें अनुसरलों ।।तु.गा.०६८४.००४ ।।
वाढवितां लोभ होईल उशीर। अवघींच स्थिर करा ठायीं ।।तु.गा.०६८४.००५ ।।
धर्म अर्थ काम झाला एके ठायीं। मेळविला जिहीं हाताहात ।।तु.गा.०६८४.००६ ।।
तुका म्हणे तुम्हां आम्हां हेची भेटी। उरल्या त्या गोष्टी बोलावया ।।तु.गा.०६८४.००७ ।।
बोलिलों तें आतां पाळावें वचन। ऐसें पुण्य कोण माझे गांठीं ।।तु.गा.०६८५.००१ ।।
जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी। काळक्षेप आम्ही करूं कोठें ।।तु.गा.०६८५.००२ ।।
न घडे यावरी न धरवे धीर। पीडतां हे राष्ट्र देखोनि जग ।।तु.गा.०६८५.००३ ।।
हातीं धरोनियां देवें नेला तुका। जेथें नाहीं लोकां पराश्रम ।।तु.गा.०६८५.००४ ।।
करावें तें काम। उगाच वाढवावा श्रम ।।तु.गा.०६८६.००१ ।।
अवघें एकमय। राज्य बोलों चालों नये ।।तु.गा.०६८६.००२ ।।
दुजीयाची सत्ता। नचलेसी झाली आतां ।।तु.गा.०६८६.००३ ।।
आतां नाहीं तुका। पुन्हा हारपला या लोकां ।।तु.गा.०६८६.००४ ।।
आम्ही जातों तुम्ही कृपा असों द्यावी। सकळां सांगावी विनंती माझी ।।तु.गा.०६८७.००१ ।।
वाड वेळ झाला उभा पांडुरंग। वैकुंठा श्रीरंग बोलावितो ।।तु.गा.०६८७.००२ ।।
अंतकाळीं विठो आम्हांसी पावला। कुडीसहित झाला गुप्त तुका ।।तु.गा.०६८७.००३ ।।
न देखिजे ऐसें केलें। या विठ्ठलें दुःखासी ।।तु.गा.०६८८.००१ ।।
कृपेचिये सिंहासनीं। अधिष्ठानीं बैसविलें ।।तु.गा.०६८८.००२ ।।

वाजता तो नलगे वारा। क्षीरसागरा शयनीं।।तु.गा.०६८८.००३।।
तुका म्हणे अवघे ठायीं। मज पायीं राखिलें।।तु.गा.०६८८.००४।।
विठ्ठल आमचें जीवन। आगम निगमाचें स्थान। विठ्ठल सिद्धीचें साधन। विठ्ठल ध्यानविसावा।।तु.गा.०६८९.००१।।
विठ्ठल कुळींचें दैवत। विठ्ठल वित्त गोत चित्त। विठ्ठल पुण्य पुरुषार्थ। आवडे मात विठ्ठलाची।।तु.गा.०६८९.००२।।
विठ्ठल विस्तारला जनीं। सप्तही पाताळें भरुनि। विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं। विठ्ठल मुनि मानसीं।।तु.गा.०६८९.००३।।
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा। विठ्ठल कृपेचा कोंवळा। विठ्ठल प्रेमाचा पुतळा। लावियला चाळा विश्व विठ्ठलें।।तु.गा.०६८९.००४।।
विठ्ठल बाप माय चुलता। विठ्ठल भगिनी आणि भ्राता। विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता। तुका म्हणे आतां नाहीं दुसरें।।तु.गा.०६८९.००५।।
बरवा झाला वेवसाव। पावलों चिंतिलाचि ठाव। दृढ पायीं राहिला भाव। पावला जीव विश्रांती।।तु.गा.०६९०.००१।।
बरवा फळला शकुन। अवघा निवारिला सीण। तुमचें झालिया दरुषण। जन्ममरण नाहीं आतां।।तु.गा.०६९०.००२।।
बरवे झालें आलों या ठाया। होतें संचित ठायींचें पाया। देहभाव पालटली काया। पडली छाया ब्रह्मींची।।तु.गा.०६९०.००३।।
जोडिलें हें न सरे धन। अविनाश आनंदघन। अमूर्तमूर्ति मधुसूदन। समचरणीं देखियला।।तु.गा.०६९०.००४।।
जुनाट जुगादिचें नाणें। बहुता काळाचें ठेवणें। लोपलें होतें पारिखेपणें। ठाव चळणें चुकविला।।तु.गा.०६९०.००५।।
आतां या जीवाचियासाठीं । न सोडीं पडलिया मिठी। तुका म्हणे सीणलों जगजेठी। न लवीं दिठी दुसऱ्याची।।तु.गा.०६९०.००६।।
मी तंव अनाथ अपराधी। कर्महीन मतिमंदबुद्धि। तुज म्यां आठविले नाहीं कधीं। वाचे कृपानिधि मायबापा।।तु.गा.०६९१.००१।।
नाहीं ऐकिलें गाइलें गीत। धरिली लाज सांडिलें हित। नावडे पुराण बैसले संत। केली बहुत परनिंदा।।तु.गा.०६९१.००२।।
नाहीं केला करविला परोपकार। नाहीं दया आली पीडितां पर। करूं नये तो केला व्यापार। वाहिला भार कुटुंबाचा।।तु.गा.०६९१.००३।।
नाहीं केलें तीर्थांचें भ्रमण। पाळिला पिंड कर चरण। नाहीं संतसेवा घडलें दान। पूजावलोकन मूर्तीचें।।तु.गा.०६९१.००४।।
असंगसंग घडले अन्याय। बहुत अधर्म उपाय। न कळे हित करावें तें काय। नये बोलूं आठवूं तें।।तु.गा.०६९१.००५।।
आप आपण्या घातकर। शत्रु झालों मी दावेदार। तूं तंव कृपेचा सागर। उतरीं पार तुका म्हणे।।तु.गा.०६९१.००६।।
आतां पावेन सकळ सुखें। खादलें कदा तें न देखें। अवघें सरलें पारिखें। सकळ देखें माहियेर।।तु.गा.०६९२.००१।।
जवळी विठ्ठल रखुमाई। बहिण बंधु बाप आई। सकळ गोताचीच साई। पारिखें काई ऐसें नेणिजे।।तु.गा.०६९२.००२।।
जगदाकारीं झाली सत्ता। वारोनि गेली पराधीनता। अवघें आपुलेंचि आतां। लाज आणि चिंता दुरावली।।तु.गा.०६९२.००३।।
वावरे इच्छा वसे घरीं। आपुलें सत्तेचे माहेरीं। करवी तैसें आपण करीं। भीड न धरीं चुकल्याची।।तु.गा.०६९२.००४।।

सोसिला होता सासुरवास। बहुतांचा बहुत दिवस। बहु कामें पुरविला सोस। आतां उदास आपुल्यातें ।।तु.गा.०६९२.००५ ।।
करिती कवतुक लाडें। मज बोलविती कोडें। मायबाप उत्तरें गोडें। बोले बोबडें पुढें तुका ।।तु.गा.०६९२.००६ ।।
सर्व सुखाचिया आशा जन्म गेला। क्षण एक मुक्ती यत्न नाहीं केला। हिंडतां दिशा सीण पावला। माया वेष्टिला जीव माझा ।।तु.गा.०६९३.००१ ।।
माझें स्वहित नेणती कोणी। कांहींच न करिती मजवांचूनि। सज्जन तंव सुखाची मांडणी। नेणती कोणी आदि अंत ।।तु.गा.०६९३.००२ ।।
काय सांगों गर्भीची यातना। मज भोगितां नारायणा। मांस मळ मूत्र जाणा। तुज क्षणक्षणा ध्यात असें ।।तु.गा.०६९३.००३ ।।
मज चालतां प्रयाणकाळीं। असतां न दिसती जवळी। मृत्तिकें मृत्तिका कवळी। एकले मेळीं संचिताचे ।।तु.गा.०६९३.००४ ।।
आतां मज ऐसें करी गा देवा। कांहीं घडे तुझी चरणसेवा। तुका विनवीतसे केशवा। चालवीं दावा संसारें ।।तु.गा.०६९३.००५ ।।
अगा ए सांवळ्या सगुणा। गुणनिधिनाम नारायणा। आमची परिसावी विज्ञापना। सांभाळीं दीना आपुलिया ।।तु.गा.०६९४.००१ ।।
बहु या उदराचे कष्ट। आम्हांसी केले कर्मभ्रष्ट। तुमची चुकविली वाट। करीं वटवट या निमित्यें ।।तु.गा.०६९४.००२ ।।
झालों पांगिला जनासी। संसाराची आंदणी दासी। न कळे कधीं सोडविसी। दृढपाशीं बहु बांधलों ।।तु.गा.०६९४.००३ ।।
येथें तों नये आठव कांहीं। विसावा तो क्षण एक नाहीं। पडिलों आणिके प्रवाहीं। हित तों कांहीं दिसेची ना ।।तु.गा.०६९४.००४ ।।
जीवित्व वेचिलें वियोगें। हिंडतां प्रवास वाउगे। कांहीं व्याधि पीडा रोगें। केलिया भोगें तडातोडी ।।तु.गा.०६९४.००५ ।।
माझा मीच झालों शत्रु। कैंचें पुत्र दारा कैंचा मित्रु। कासया घातला पसरु। अहो जगद्गुरु तुका म्हणे ।।तु.गा.०६९४.००६ ।।
आतां मज धरवावी शुद्धि। येथूनि परतवावी बुद्धि। घ्यावें सोडवूनि कृपानिधि। सांपडलों संधी काळचक्रीं ।।तु.गा.०६९५.००१ ।।
करिसील तरी नव्हे काई। राईचा डोंगर पर्वत राई। आपुले करुणेची साई। करीं वो आई मजवरी ।।तु.गा.०६९५.००२ ।।
मागील काळ अज्ञानपणें। सरला स्वभावें त्या गुणें। नेणें आयुष्य होतें उणें। पुढील पेणें अंतरलों ।।तु.गा.०६९५.००३ ।।
आतां मज वाटतसे भय। दिवसेंदिवस चालत जाय। येथें म्यां येऊनि केलें काय। नाहीं तुझे पाय आठविले ।।तु.गा.०६९५.००४ ।।
करूनि अपराध क्षमा। होतील केले पुरुषोत्तमा। आपुले नामीं द्यावा प्रेमा। सोडवीं भ्रमापासूनियां ।।तु.गा.०६९५.००५ ।।
हृदय वसो तुमच्या गुणीं। ठाव हा पायांपे चरणीं। करूं हा रस सेवन वाणी। फिटे तों धणी तुका म्हणे ।।तु.गा.०६९५.००६ ।।
जेणें हा जीव दिला दान। तयाचें करीन चिंतन। जगज्जीवन नारायण। गाईन गुण तयाचे ।।तु.गा.०६९६.००१ ।।
जो या भीवरेच्या तिरीं। कट धरूनियां करीं। पाउलें समचि साजिरीं। अंतरीं धरोनि राहेन ।।तु.गा.०६९६.००२ ।।
जो या असुरांचा काळ। भक्तजनप्रतिपाळ। खेळे हा लाघवें सकळ। तयाच्या भाळ पायांवरी ।।तु.गा.०६९६.००३ ।।
जो या गोपाळांच्या मेळीं। खेळु खेळे वनमाळी। रसातळा नेला बळी। राहे पाताळीं स्वामी माझा ।।तु.गा.०६९६.००४ ।।

जो हा लावण्यपुतळा। जयाचे अंगीं सकळ कळा। जयाचें गळां वैजयंती माळा। तया वेळोवेळां दंडवत।।तु.गा.०६९६.००५।।
जयाचें नाम पाप नासी। लक्ष्मी ऐसी जयाची दासी। जो हा तेज:पुंज रासी। सर्वभावें त्यासी तुका शरण।।तु.गा.०६९६.००६।।
काय मी उद्धार पावेन। काय कृपा करील नारायण। ऐसें तुम्ही सांगा संतजन। करा समाधान चित्त माझें।।तु.गा.०६९७.००१।।
काय हें खंडईल कर्म। पारुषतील धर्माधर्म। कासयानें तें कळेल वर्म। म्हणऊनि श्रम वाटतसे।।तु.गा.०६९७.००२।।
काय हे स्थिर राहेल बुद्धि। कांहीं अरिष्ट न येल कीं मधीं। धरिलें जाईल तें सिद्धि। शेवट तो कधीं मज न कळे।।तु.गा.०६९७.००३।।
काय ऐसें पुण्य होईल गांठीं। घालीन पायीं देवाचे मिठी। मज तो कुरवाळील जगजेठी। दाटईन कंठीं सद्‌गदित।।तु.गा.०६९७.००४।।
काय हे निवतील डोळे। सुख तें देखोनि सोहळे। संचित कैसें तें न कळे। होतील डोहाळे वासनेसीं।।तु.गा.०६९७.००५।।
ऐसी चिंता करी सदा सर्वकाळ। रात्रंदिवस हेचि तळमळ। तुका म्हणे नाहीं आपुलें बळ। जेणें फळ पावेन निश्चयेंसी।।तु.गा.०६९७.००६।।
तूंचि अनाथाचा दाता। दु:ख मोह नासावया चिंता। शरण आलों तुज आतां। तारीं कृपावंता मायबापा।।तु.गा.०६९८.००१।।
संतसंगति देईं चरणसेवा। जेणें हा तुझा विसर न पडावा। हाचि भाव माझिया जीवा। पुरवीं देवा मनोरथ।।तु.गा.०६९८.००२।।
मज भाव प्रेम देईं प्रीति। गुण नाम वर्णावया स्तुति। विघ्ना सोडवूनि हातीं। विनंती माझी परिसावी हे।।तु.गा.०६९८.००३।।
आणिक कांहीं नाहीं मागणें। सुखसंपत्ति राज्य चाड धनें। सांकडें न पडे तुज जेणें। दुजें भक्तीविण मायबापा।।तु.गा.०६९८.००४।।
जोडोनि कर पायीं ठेवितों माथा। तुका विनवी पंढरीनाथा। रंगीं वोढवावी रंगकथा। पुरवीं मनोरथा मायबापा।।तु.गा.०६९८.००५।।
सेंदरींहेंदरीं दैवतें। कोण तीं पूजी भूतेंखेतें। आपुल्या पोटा जीं रडतें। मागती शितें अवदान।।तु.गा.०६९९.००१।।
आपुले इच्छे आणिकां पीडी। काय तें देईल बराडी। कळों ही आली तयाची जोडी। अल्प रोकडी बुद्धि अधिरा।।तु.गा.०६९९.००२।।
दासीचा पाहुणेर उखीतें। धणी देईल आपुल्या हातें। करुणाभाषण उचितें। हें तों रितें सतत शक्तिहीन।।तु.गा.०६९९.००३।।
काय तें थिल्लरीचें पाणी। ओठ न भिजे न फिटे धणी। सीण तरी आदीं अवसानीं। क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ।।तु.गा.०६९९.००४।।
विलेपनें बुजविती तोंड। भार खोळ वाहाती उदंड। करविती आपआपणया दंड। ऐसियास भांड म्हणे देव तो।।तु.गा.०६९९.००५।।
तैसा नव्हे नारायण। जगव्यापक जनार्दन। तुका म्हणे त्याचें करा चिंतन। वंदूं चरण येती सकळ।।तु.गा.०६९९.००६।।
विषयओढीं भुलले जीव। आतां यांची कोण करील कींव। नुपजे नारायणीं भाव। पावोनि ठाव नरदेह।।तु.गा.०७००.००१।।
कोण सुख धरिलें संसारीं। पडोनि काळाचे आहारीं। माप या लागलें शरीरीं। झालियावरी सळे ओढती।।तु.गा.०७००.००२।।
बापुडीं होतील शेवटीं। आयुष्यासवें झालिया तुटी। भोगिलें मागें पुढें ही कोटी। होईल भेटी जन्मासी।।तु.गा.०७००.००३।।
जुंतिलें घाणां बांधोनि डोळे। मागें जोडी आर तेणेंही पोळे। चालिलों किती तें न कळे। दु:खें आरंबळे भूक तहान।।तु.गा.०७००.००४।।

एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित ।  तें हें देह मानूनि अनित्य । न करिती कां नित्य नामस्मरण ।।तु.गा.०७००.००५ ।।
तुका म्हणे न वेंचतां मोल । तो हा यासी महाग विठ्ठल ।  वेंचितां फुकाचे बोल । केवढे खोल अभागियां ।।तु.गा.०७००.००६ ।।
आले हो संसारा तुम्ही एक करा । मुक्तिमारग हळूचि धरा ।  काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा दचकसी ना ।।तु.गा.०७०१.००१ ।।
नाहीं त्या यमासी करुणा । बाहेर काढितां कुडी प्राणा ।  ओढाळ सांपडे जैसे धान्या । चोर यातना धरिजेतो ।।तु.गा.०७०१.००२ ।।
नाहीं दिलें पावईल कैसा । चालतां पंथें तेणें वळसा ।  नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती बंद जैसा धरोनियां ।।तु.गा.०७०१.००३ ।।
क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं ।  ओढिती कांटवणा सोई । अग्निस्तंभ बाहीं कवटाळविती ।।तु.गा.०७०१.००४ ।।
देखोनि अंगें कांपती । तये नदीमाजी चालविती ।  लागे ठाव ना न चलवे बुडविती । वरी मारिती यमदंड ।।तु.गा.०७०१.००५ ।।
तहानभूक न साहावे वेळ । तो राखिती किती एक काळ ।  पिंड पाळूनि कैसा सीतळ । तो तप्तभूमीं ज्वाळ लोळविती ।।तु.गा.०७०१.००६ ।।
म्हणऊनि करा कांहीं सायास । व्हावेल तरी व्हा रे उदास ।  करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका म्हणे ।।तु.गा.०७०१.००७ ।।
न बोलसी तेंही कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा ।  तुज मी घालीत नाहीं गोवा । भीड केशवा कासयाची ।।तु.गा.०७०२.००१ ।।
उतरीं आपुला हा भार । मजशीं बोलोनी उत्तर ।  माझा तुज नव्हे अंगीकार । मग विचार करीन मी ।।तु.गा.०७०२.००२ ।।
दात्या आणि मागत्यासी । धर्मनीति तरी बोलिली ऐसी ।  यथानुशक्ति ठाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ।।तु.गा.०७०२.००३ ।।
म्हणोनि करितों मी आस । तुझिया वचनाची वास ।  धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ।।तु.गा.०७०२.००४ ।।
तुझें म्यां घेतल्यावांचून । येथूनि न वजें वचन ।  हाचि माझा नेम सत्य जाण । आहे नाहीं म्हण तुका म्हणे ।।तु.गा.०७०२.००५ ।।
आतां मी न पडें सायासीं । संसारदु:खाचिये पाशीं ।  शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ।।तु.गा.०७०३.००१ ।।
न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधती पाय ।  आतां मज न विसंबें वो माय । मोकलूनि धाय विनवीतसें ।।तु.गा.०७०३.००२ ।।
बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें ।  त्रिगुण येताती लहरें । तेणें दु:खें थोर आक्रंदलों ।।तु.गा.०७०३.००३ ।।
आणिक दु:खें सांगों मी किती । सकळ संसाराची स्थिती ।  न साहे पाषाण फुटती । भय कांप चित्तीं भरलासे ।।तु.गा.०७०३.००४ ।।
आतां मज न साहावे सर्वथा । संसारगंधीची हे वार्ता ।  झालों वेडा असोनि जाणता । पावे अनंता तुका म्हणे ।।तु.गा.०७०३.००५ ।।
आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरी तारीं मारी ।  जवळी अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ।।तु.गा.०७०४.००१ ।।
शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणें ।  मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहूनि ।।तु.गा.०७०४.००२ ।।
मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरती ।  सकळ खुंटलिया युक्ति ।  शांति निवृत्ति जवळी नाहीं ।।तु.गा.०७०४.००३ ।।
सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव ।  आतां करीं कळे तो उपाव । तूंचि सर्व ठाव माझा देवा ।।तु.गा.०७०४.००४ ।।

राहिलों धरूनि विश्वास। आधार नेटीं तुझी कास। आणिक नेणें मी सायास। तुका म्हणे यास तुझें उचित।।तु.गा.०७०४.००५।।
देवा तूं कृपाकरुणासिंधु। होसी मायबाप आमचा बंधु। जीवनसिद्धि साधनसिंधु। तोडिसी भवबंधु काळपाश।।तु.गा.०७०५.००१।।
शरणागता वज्रपंजर। अभयदाना तूं उदार। सकळां देवा तूं अगोचर। होसी अविकार अविनाश।।तु.गा.०७०५.००२।।
भागलीं स्तुति करितां फार। तेथें मी काय तें गव्हार। जाणावया तुझा विचार। नको अंतर देऊं आतां।।तु.गा.०७०५.००३।।
नेणें भाव परि म्हणवितों तुझा। नेणें भक्ति परि करितों पूजा। आपुल्या नामाचिया काजा। तुज केशीराजा लागे धांवणें।।तु.गा.०७०५.००४।।
तुझियां बळें पंढरीनाथा। झालों निर्भर तुटली व्यथा। घातला भार तुझिया माथां। न भीं सर्वथा तुका म्हणे।।तु.गा.०७०५.००५।।
कोण सुख धरोनि संसारीं। राहों सांग मज बा हरी। अवघ्या नाशिवंता परी। थिता दुरी तूंही अंतरसी।।तु.गा.०७०६.००१।।
प्रथम केला गर्भीं वास। काय तें सांगावे सायास। दुःख भोगिलें नवही मास। आलों जन्मास येथवरी।।तु.गा.०७०६.००२।।
बाळपण गेलें नेणतां। तारुण्यदशें विषयव्यथा। वृद्धपणीं प्रवर्तली चिंता। मरें मागुता जन्म धरीं।।तु.गा.०७०६.००३।।
क्षण एक तोही नाहीं विसावा। लक्ष चौऱ्यांशीं घेतल्या धांवा। भोवंडिती पाठीं लागल्या हांवा। लागो आगी नांवा माझ्या मी पणा।।तु.गा.०७०६.००४।।
आतां पुरे ऐसी भरोवरी। रंक होऊनि राहेन द्वारीं। तुझा दास मी दीन कामारी। तुका म्हणे करीं कृपा आतां।।तु.गा.०७०६.००५।।
सुख या संतसमागमें। नित्य दुणावे तुझिया नामें। दहन होती सकळ कर्में। सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों।।तु.गा.०७०७.००१।।
म्हणोनि नाहीं कांहीं चिंता। तूंचि आमुचा मातापिता। बहिणी बंधू आणि चुलता। आणिकां गोतां सर्वांठायीं।।तु.गा.०७०७.००२।।
ऐसा हा कळला निर्धार। माझा तुज न पडे विसर। असमी देउनियां धीर। बाह्य अभ्यंतर मजजवळी।।तु.गा.०७०७.००३।।
दुःख तें कैसे नये स्वप्नासी। भुक्तिमुक्ति झाल्या कामारी दासी। त्यांचें वर्म तूं आम्हांपाशीं। सुखें राहिलासी प्रेमाचिया।।तु.गा.०७०७.००४।।
जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष। जळती पापें पळती दोष। काय तें उणें आम्हां आनंदास। सेवूं ब्रह्मरस तुका म्हणे।।तु.गा.०७०७.००५।।
न पवे सन्निध वाटते चिंता। वरि या बहुतांची सत्ता। नुगवे पडत जातो गुंता। कर्मा बळिवंता सांपडलों।।तु.गा.०७०८.००१।।
बहु भार पडियेला शिरीं। मी हें माझें मजवरी। उघड्या नागविलों चोरीं। घरिंच्याघरीं जाणतजाणतां।।तु.गा.०७०८.००२।।
तुज मागणें इतुलें आतां। मज या निरवावें संतां। झाला कंठस्फोट आळवितां। उदास आतां न करावें।।तु.गा.०७०८.००३।।
अति हा निकट समय। मग म्यां करावें तें काय। दिवस गेलिया ठाकईल छाय। उरईल हाय रातिकाळीं।।तु.गा.०७०८.००४।।
होईल संचिताची सत्ता। अंगा येईल पराधीनता। ठाव तो न दिसे लपतां। बहु चिंता प्रवर्तली।।तु.गा.०७०८.००५।।
ऐसी या संकटाचे संधी। धांव घालावी कृपानिधी। तुका म्हणे माझी बळबुद्धी। सकळ सिद्धी पाय तुझे।।तु.गा.०७०८.००६।।
देवा तूं आमचा कृपाळ। भक्तप्रतिपाळ दीनवत्सल। माय तूं माउली स्नेहाळ। भार सकळ चालविसी।।तु.गा.०७०९.००१।।

तुज लागली सकळ चिंता। राखणें लागे वांकडें जातां। पुढती निरविसी संतां। नव्हे विसंबतां धीर तुज।।तु.गा.०७०९.००२।।
आम्हां भय चिंता नाहीं धाक। जन्ममरण कांहीं एक। झाला इहलोकीं परलोक। आलें सकळिक वैकुंठ।।तु.गा.०७०९.००३।।
न कळे दिवस कीं राती। अखंड लागलीसे ज्योती। आनंदलहरीची गती। वर्णूं मी किती तया सुखा।।तु.गा.०७०९.००४।।
तुझिया नामाचीं भूषणें। तियें मज लेवविलीं लेणें। तुका म्हणे तुझियां गुणें। काय तें उणें एक आम्हां।।तु.गा.०७०९.००५।।
आतां धर्माधर्मीं कांहीं उचित। माझें विचारावें हित। तुज मी ठाउका पतित। शरणागत परि झालों।।तु.गा.०७१०.००१।।
येथें राया रंका एकी सरी। नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं। पावलों पाय भलत्या परी। मग बाहेरी न घालावें।।तु.गा.०७१०.००२।।
ऐसें हें चालत आलें मागें। नाहीं मी बोलत वाउगें। आपुलिया पडिल्या प्रसंगें। कीर्ति हें जगें वाखाणिजेती।।तु.गा.०७१०.००३।।
घालोनियां माथां बैसलों भार। सांडिला लौकिक वेव्हार। आधीं हें विचारिली थार। अविनाशपर पद ऐसें।।तु.गा.०७१०.००४।।
येथें एक वर्म पाहिजे धीर। परि म्यां लेखिलें असार। देह हा नाशिवंत जाणार। धरिलें सार नाम तुझें।।तु.गा.०७१०.००५।।
केली आराणूक सकळां हातीं। धरावें ते धरिलें चित्तीं। तुका म्हणे सांगितलें संतीं। देई अंतीं ठाव मज देवा।।तु.गा.०७१०.००६।।
बरवें झालें आलों या जन्मासी। जोड जोडिली मनुष्यदेहाऐसी। महालाभाची उत्तम रासी। जेणें सर्व सुखासी पात्र होईजे।।तु.गा.०७११.००१।।
दिलें इंद्रियें हात पाय कान। डोळे मुख बोलावया वचन। जेणें तूं जोडसी नारायण। नासे जीवपण भवरोग।।तु.गा.०७११.००२।।
तिळेंतिळें पुण्य सांचा पडे। तरि हें बहुतां जन्मीं जोडे। नाम तुझें वाचेसी आतुडे। समागम घडे संतांचा।।तु.गा.०७११.००३।।
ऐसिये पावविलों ठायीं। आतां मी काय होऊं उतराई। येवढा जीव ठेवीन पायीं। तूं वो माझे आई पांडुरंगे।।तु.गा.०७११.००४।।
फेडिला डोळियांचा कवळ। धुतला गुणदोषांचा मळ। लावूनि स्तनीं केलों सीतळ। निजविलों बाळ निजस्थानीं।।तु.गा.०७११.००५।।
नाहीं या आनंदासी जोडा। सांगतां गोष्टी लागती गोडा। आलासी आकारा आमुच्या चाडा। तुका म्हणे भिडा भक्तिचिया।।तु.गा.०७११.००६।।
अल्प भाव अल्प मती। अल्प आयुष्य नाहीं हातीं। अपराधाची वोळिलों मूर्ती। अहो वेदमूर्ति परियेसा।।तु.गा.०७१२.००१।।
किती दोषा देऊं परिहार। गुणदोषें मळिलें अंतर। आदि वर्तमान भविष्याकार। लागे अंतपार ऐसें नाहीं।।तु.गा.०७१२.००२।।
विविध कर्म चौऱ्याशीं फेरा। त्रिविध भोग या शरीरा। कर्मकोठार पांजरा। जन्म जरा मरण सांठवण।।तु.गा.०७१२.००३।।
जीवा नाहीं कुडीचें लाहातें। ये भिन्न भिन्न पंचभूतें। रचतें खचतें संचितें। असार रिते फलकट।।तु.गा.०७१२.००४।।
पुत्र पत्नी सहोदर। मायबाप गोताचा पसर। मिळती काष्ठें लोटतां पूर। आदळे दूर होती खल्लाळीं।।तु.गा.०७१२.००५।।
म्हणोनि नासावें अज्ञान। इतुकें करीं कृपादान। कृपाळू तूं जनार्दन। धरूनि चरण तुका विनवी।।तु.गा.०७१२.००६।।
ऐसी हे गर्जवूं वैखरी। केशवा मुकुंदा मुरारी। राम कृष्ण नामें बरीं। हरी हरी दोष सकळ।।तु.गा.०७१३.००१।।

जनार्दना जगजीवना। विराटस्वरूपा वामना। महदादि मधुसूदना। भवबंधना तोडितिया।।तु.गा.०७१३.००२ ।।
चक्रपाणी गदाधरा। असुरमर्दना वीर्यवीरा। सकळमुगुटमणि शूरा। अहो दातारा जगदानिया।।तु.गा.०७१३.००३ ।।
मदनमूर्ति मनमोहना। गोपाळगोपिकारमणा। नटनाट्यकौशल्य कान्हा। अहो संपन्ना सर्वगुणें।।तु.गा.०७१३.००४ ।।
गुणवंता आणि निर्गुणा। सर्वसाक्षी सर्वजाणा। करोनि अकर्ता आपणा। नेदी अभिमाना आतळो।।तु.गा.०७१३.००५ ।।
कासयानें घडे याची सेवा। काय एक समर्पावें या देवा। वश्य तो नव्हे वांचूनि भावा। पाया वेगळे जीवा न करी तुका।।तु.गा.०७१३.००६ ।।
होतों तें चिंतित मानसीं। नवस फळलें नवसीं। जोडी ते नारायणा ऐसी। अविट ज्यासी नाश नाहीं।।तु.गा.०७१४.००१ ।।
धरिलें जीवें न सोडी पाय। आलें या जीवित्वाचें काय। कैं हे पाविजेती ठाय। लाविली सोय संचितानें।।तु.गा.०७१४.००२ ।।
मज तों पडिली होती भुली। चित्ताची अपसव्य चाली। होती मृगजळें गोवी केली। दृष्टी उघडली बरवें झालें।।तु.गा.०७१४.००३ ।।
आतां हा सिद्धि पावो भाव। मध्यें चांचल्य न व्हावा जीव। ऐसी तुम्हां भाकीतसे कींव। कृपाळुवा जगदानिया।।तु.गा.०७१४.००४ ।।
कळों येतें आपुले बुद्धी। ऐसें तों न घडे कधीं। येवढे आघात ते मधीं। लज्जा रिद्धी उभी आड ठाके ।।तु.गा.०७१४.००५ ।।
कृपा या केली संतजनीं। माझी अळंकारिली वाणी। प्रीति हे लाविली कीर्तनीं। तुका चरणीं लोळतसे।।तु.गा.०७१४.००६ ।।
मज ते हांसतील संत। जिहीं देखिलेती मूर्तिमंत। म्हणोनि उद्वेगलें चित्त। आहाच भक्त ऐसा दिसें।।तु.गा.०७१५.००१ ।।
ध्यानीं म्यां वर्णावेती कैसें। पुढें एकीं स्तुति केली असे। येथूनि जीव निघत नसे। ऐसिये आसे लागलोंसें।।तु.गा.०७१५.००२ ।।
कासया पडिला जी धडा। उगाचि वेडा आणि वांकडा। आम्हां लेंकरांसी पीडा। एका मागें जोडा दुसऱ्याचा।।तु.गा.०७१५.००३ ।।
सांगा कोणाचा अन्याय। ऐसें मी धरितों पाय। तूं तंव समचि सकळां माय। काय अन्याय एक माझा।।तु.गा.०७१५.००४ ।।
नये हा जरी कारणा। तरी कां व्यालेती नारायणा। वचन द्यावें जी वचना। मज अज्ञाना समजावी।।तु.गा.०७१५.००५ ।।
बहुत दिवस केला बोभाट। पाहातां श्रमलों वाट। तुका म्हणे विस्तारलें ताट। काय वीट आला नेणों स्वामीया।।तु.गा.०७१५.००६ ।।
बरवें झालें आजीवरी। नाहीं पडिलों मृत्यूचे आहारीं। वांचोन आलों एथवरी। उरलें तें हरि तुम्हां समर्पण।।तु.गा.०७१६.००१ ।।
दिला या काळें अवकाश। नाहीं पावलें आयुष्या नाश। कार्या कारण उरलें शेष। गेलें तें भूस जावो परतें।।तु.गा.०७१६.००२ ।।
बुडणें खोटें पावतां थडी। स्वप्नीं झाली ओढाओढी। नासली जागृती घडी। साच जोडी शेवटीं गोड घास।।तु.गा.०७१६.००३ ।।
तुम्हां पावविली हाक । तेणें निरसला धाक । तुमचें भातें हें कवतुक । जे शरणागत लोक रक्षावे।।तु.गा.०७१६.००४ ।।
रवीच्या नांवें निशीचा नाश। उदय होतांचि प्रकाश। आतां कैंचा आम्हां दोष। तूं जगदीश कैवारी।।तु.गा.०७१६.००५ ।।
आतां जळो देह सुख दंभ मान। न करी तयाचें साधन। तूं जगदीश नारायण। आलों शरण तुका म्हणे।।तु.गा.०७१६.००६ ।।

आतां माझा नेणों परतों भाव। विसावोनि ठायीं ठेविला जीव। सकळ लाभांचा हा ठाव। ऐसा वाव झाला चित्ताठायीं।।तु.गा.०७१७.००१।।

भांडवल गांठीं तरि विश्वास। झालों तें झालों निश्चयें दास। न पाहें मागील ते वास। पुढती सोस सेवेचाचि।।तु.गा.०७१७.००२।।

आहे तें निवेदिलें सर्व। माझा मोडियेला गर्व। अकाळीं काळ आघवें पर्व। झाला भरंवसा कृपें लाभाचा।।तु.गा.०७१७.००३।।

वेव्हारीं वेव्हारा अनंत। नाहीं यावांचूनि जाणत। तरी हें समाधान चित्त। लाभहानी नाहीं येत अंतरा।।तु.गा.०७१७.००४।।

करूनि नातळों संसारा। अंग भिन्न राखिला पसारा। कळवळा तो जीवनीं खरा। बीजाचा थारा दुरी आघात।।तु.गा.०७१७.००५।।

बहु मतांपासूनि निराळा। होऊनि राहिलों सोंवळा। बैसला रूपाचा कळवळा। तुका म्हणे डोळां लेइलों तें।।तु.गा.०७१७.००६।।

बरवें झालें लागलों कारणीं। तुमचे राहिलों चरणीं। फेडीन संतसंगती धणी। गर्जईल गुणीं वैखरी।।तु.गा.०७१८.००१।।

न वंचे शरीर सेवेसी। काय वाचा आणि मनेसीं। झालों संतांची आंदणी दासी। केला येविशीं निर्धार।।तु.गा.०७१८.००२।।

जीवनीं राखिला जिव्हाळा । झालों मी मजसीं निराळा। पंचभूतांचा पुतळा। सहज लीळा वर्ततसे।।तु.गा.०७१८.००३।।

जयाचें जया होईल ठावें । लाहो या साधियेला भावें । ऐसें होतें राखियलें जीवें । येथूनि देवें भोवंडूनि ।।तु.गा.०७१८.००४।।

आस निरसली ये खेपे। अवघे पंथ झाले सोपें। तुमचे दीनबंधु कृपें। दुसरें कांपे सत्ताधाकें ।।तु.गा.०७१८.००५।।

अंकिलेपणें आनंदरूप। आतळों नये पुण्यपाप। सारूनि ठेविले संकल्प। तुका म्हणे आपेंआप एकाएकीं।।तु.गा.०७१८.००६।।

अवघ्या दशा येणेंचि साधती। मुख्य उपासना सगुणभक्ति । प्रगटे हृदयींची मूर्ति। भावशुद्धि जाणोनियां।।तु.गा.०७१९.००१।।

बीज आणि फळ हरीचें नाम। सकळ पुण्य सकळ धर्म। सकळां कळांचे हें वर्म। निवारी श्रम सकळही।।तु.गा.०७१९.००२।।

जेथें कीर्तन हें नामघोष। करिती निर्लज्ज हरीचे दास। सकळ वोथंबले रस। तुटती पाश भवबंधाचे।।तु.गा.०७१९.००३।।

येती अंगा वसती लक्षणें। अंतरीं देवें धरिलें ठाणें। आपणचि येती तयाचे गुणें। जाणें येणें खुंटे ये वस्तीचें।।तु.गा.०७१९.००४।।

न लगे सांडावा आश्रम। उपजले कुळींचे धर्म। आणिक न करावे श्रम। एक पुरे नाम विठोबाचें।।तु.गा.०७१९.००५।।

वेदपुरुष नारायण। योगियांचें ब्रह्म शून्य। मुक्त आत्मा परिपूर्ण। तुका म्हणे सगुण भोळ्या आम्हां।।तु.गा.०७१९.००६।।

श्रीअनंता मधुसूदना। पद्मनाभा नारायणा। जगव्यापका जनार्दना। आनंदघना अविनाशा।।तु.गा.०७२०.००१।।

सकळदेवाधिदेवा। कृपाळुवा जी केशवा। महानंदा महानुभवा। सदाशिवा सहजरूपा।।तु.गा.०७२०.००२।।

चक्रधरा विश्वंभरा। गरुडध्वजा करुणाकरा। सहस्त्रपादा सहस्त्रकरा। क्षीरसागरा शेषशयना।।तु.गा.०७२०.००३।।

कमलनयना कमलापति। कामिनीमोहना मदनमूर्ति। भवतारका धरित्या क्षिती। वामनमूर्ती त्रिविक्रमा।।तु.गा.०७२०.००४।।

अगा ये सगुणा निर्गुणा। जगज्जनित्या जगज्जीवना। वसुदेवदेवकीनंदना। बाळरांगणा बाळकृष्णा।।तु.गा.०७२०.००५।।

तुका आला लोटांगणीं। मज ठाव द्यावा जी चरणीं। हेचि करीतसे विनवणी। भवबंधनीं सोडवावें ।।तु.गा.०७२०.००६ ।।
माझा तंव खुंटला उपाव। जेणें तुझें आतुडती पाव। करूं भक्ति तरि नाहीं भाव। नाहीं हातीं जीव कवणेविशीं ।।तु.गा.०७२१.००१ ।।
धर्म करूं तरि नाहीं चित्त। दान देऊं तरि नाहीं वित्त। नेणें पुजों ब्राह्मण अतीत। नाहीं भूतदया पोटा हातीं ।।तु.गा.०७२१.००२ ।।
नेणें गुरुदास्य संतसेवन। जप तप अनुष्ठान। नव्हे वैराग्य वनसेवन। नव्हे दमन इंद्रियांसी ।।तु.गा.०७२१.००३ ।।
तीर्थ करूं तरि मन नये सवें। व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें। देव जवळी आहे म्हणों मजसवें। तरि आपपरावे न वचे ।।तु.गा.०७२१.००४ ।।
म्हणोनि झालों शरणागत। तुझा दास मी अंकित। यास न लगे संचित। झालों निश्चिंत तुका म्हणे ।।तु.गा.०७२१.००५ ।।
तरी म्यां आळवावें कोणा। कोण हे पुरवील वासना। तुजवांचून नारायणा। लावीं स्तना कृपावंतें ।।तु.गा.०७२२.००१ ।।
आपुला न विचारी सीण। न धरी अंगसंगें भिन्न। अंगीकारिलें राखें दीन। देईं जीवन आवडीचें ।।तु.गा.०७२२.००२ ।।
माझिया मानसीं हे आस। नित्य सेवावा ब्रह्मरस। अखंड चरणींचा वास। पुरवी आस याचकाची ।।तु.गा.०७२२.००३ ।।
माझिया संचिताचा ठेवा। तेणें हे वाट दाविली देवा। एवढ्या आदराचा हेवा। मागें सेवादान आवडीचें ।।तु.गा.०७२२.००४ ।।
आळवीन करुणावचनीं। आणिक गोड नलगे मनीं। निद्रा जागृती आणि स्वप्नीं। धरिलें ध्यानीं मनीं रूप ।।तु.गा.०७२२.००५ ।।
आतां भेट न भेटतां आहे। किंवा नाहीं ऐसें विचारूनि पाहें। लागला झरा अखंड आहे। तुका म्हणे साहे केलें अंतरीं ।।तु.गा.०७२२.००६ ।।
हेंचि भवरोगाचें औषध। जन्म जरा तुटे व्याध। आणिक कांहीं नव्हे बाध। करील वध षड्वर्गा ।।तु.गा.०७२३.००१ ।।
सांवळें रूप ल्यावें डोळां। सहा चौ अठरांचा मेळा। पदर लागो नेदी खळा। नाममंत्रमाळा विष्णुसहस्त्र ।।तु.गा.०७२३.००२ ।।
भोजना न द्यावें आन। जेणें चुके अनुपान। तरीच घेतल्याचा गुण। होईल जाण सत्य भाव ।।तु.गा.०७२३.००३ ।।
नये निघों आपुलिया घरा। बाहेर लागों नये वारा। बहु बोलणें तें सारा। संग दुसरा वर्जावा ।।तु.गा.०७२३.००४ ।।
पासी तें एक द्यावें वरी। नवनीताची होईल परी। होईल घुसळिलें तें निवारी। सार भीतरीं नाहीं तया ।।तु.गा.०७२३.००५ ।।
न्हायें अनुतापीं पांघरें दिशा। स्वेद निघों दे अवघी आशा। होसील आधीं होतासी तैसा। तुका म्हणे दशा भोगीं वैराग्य ।।तु.गा.०७२३.००६ ।।
मागुता हाचि जन्म पावसी। भोगिलें सुखदु:ख जाणसी। हें तों न घडे रे सायासीं। कां रे अंध होसी जाणोनियां ।।तु.गा.०७२४.००१ ।।
लक्ष चौऱ्यांशी न चुके फेरा। गर्भवासीं यातना थोरा। येऊनि पडसी संदेहपुरा। वोळसा थोर मायाजाळीं ।।तु.गा.०७२४.००२ ।।
पशु काय पाप पुण्य जाणती। उत्तम मध्यम भोग भोगिती। काय एक उपजतां मरती। बहिरीं अंध होती पांगुळ मुकीं ।।तु.गा.०७२४.००३ ।।
नरदेह निधान लागले हातीं। उत्तम सार उत्तम गती। देवचि होईन म्हणती ते होती। तरि कां चित्तीं न धरावें ।।तु.गा.०७२४.००४ ।।
क्षण एक मन स्थिर करूनि। सावध होई डोळे उघडोनि। पाहें वेद बोलिले पुराणीं। तुका विनवणी करीतसे ।।तु.गा.०७२४.००५ ।।

दास्य करी दासाचें। उणें न साहे तयाचें। वाढिलें ठायीचें। भाणें टाकोनियां धांवे ।।तु.गा.०७२५.००१ ।।
ऐसा कृपेचा सागर। विटे उभा कटीं कर। सर्वस्वें उदार। भक्तांलागीं प्रगटे ।।तु.गा.०७२५.००२ ।।
हृदयीं श्रीवत्सलांछन। मिरवी भक्तांचें भूषण। नाहीं तयाचा सीण। सुख धरिलें लातेचें ।।तु.गा.०७२५.००३ ।।
सत्यभामा दान करी। उजुर नाहीं अंगीकारी। सेवकाच्या शिरीं। धरूनि चाले पादुका ।।तु.गा.०७२५.००४ ।।
राखे दारवंटा बळीचा। सारथी झाला अर्जुनाचा। दास सेवकांचा। होय साचा अंकित ।।तु.गा.०७२५.००५ ।।
भिडा न बोले पुंडलीकाशीं। उभा मर्यादा पाठीशीं। तुका म्हणे ऐसी। कां रे न भजा माउली ।।तु.गा.०७२५.००६ ।।
हरि तैसे हरीचे दास। नाहीं तयां भय मोह चिंता आस। होऊनि राहाती उदास। बळकट कांस भक्तीची ।।तु.गा.०७२६.००१ ।।
धरूनि पाय त्यजिलें जन। न लगे मान मृत्तिका धन। कंठीं नामामृत पान। न लगे आन ऐसें झालें ।।तु.गा.०७२६.००२ ।।
वाव तरी उदंडचि पोटीं। धीर सिंधु ऐसे जगजेठी। कामक्रोधा न सुटे मिठी। गिऱ्हे तरी वेठी राबविती ।।तु.गा.०७२६.००३ ।।
बळ तरी नागवती काळा। लीन तरी सकळांच्या तळा। उदार तरी देहासी सकळां। जाणोनि कळा सर्व नेणते ।।तु.गा.०७२६.००४ ।।
संसार तो तयांचा दास। मोक्ष तो पाहातसे वास। रिद्धिसिद्धि देशवटा त्रास। न शिवती यास वैष्णवजन ।।तु.गा.०७२६.००५ ।।
जन्ममृत्युस्वप्नांसारिखें। आप त्यां न दिसे पारखें। तुका म्हणे अखंडित सुखें। वाणी वदे मुखें प्रेमामृताची ।।तु.गा.०७२६.००६ ।।
बहुत जाचलों संसारीं। वसें गर्भीं मातेच्या उदरीं। लक्ष चौऱ्यांशीं योनिद्वारीं। झालों भिकारी याचक ।।तु.गा.०७२७.००१ ।।
जिणें पराधीन आणिकां हातीं। दृढ पाशीं बहु बांधलों संचितीं। प्रारब्ध क्रियमाण सांगाती। भोवंडिती सत्ता आपुलिया ।।तु.गा.०७२७.००२ ।।
न भरे पोट नाहीं विसांवा। नाहीं नेम एक ठाव गांवा। नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा। लाही जीवा खापरीं तडफडी ।।तु.गा.०७२७.००३ ।।
काळ बहुत गेले ऐसिया रीती। आणीक पुढेंही नेणों किती। खंडणा नाहीं पुनरावृत्ति। मज कल्पांतीं तरी वेगळें ।।तु.गा.०७२७.००४ ।।
ऐसें दुःख कोण हरील माझें। कोणा भार घालूं आपुलें ओझें। भवसिंधुतारक नाम तुझें। धांवसी काजें आडलिया ।।तु.गा.०७२७.००५ ।।
आतां धांव घालीं नारायणा। मजकारणें रंका दीना। गुण न विचारीं अवगुणा। तुका करुणा भाकीतसे ।।तु.गा.०७२७.००६ ।।
जंव हें सकळ सिद्ध आहे। हात चालावया पाय। तंव तूं आपुलें स्वहित पाहें। तीर्थयात्रें जाय चुकों नको ।।तु.गा.०७२८.००१ ।।
जंव काळ असे दुरी ठेला। तंव तूं हरिगुण गाय आइक वहिला। मनीं भाव धरूनि भला। न वंचें त्याला चुकों नको ।।तु.गा.०७२८.००२ ।।
जोडोनि धन न घालीं माती। ब्रह्मवृंदें पूजन यती। सत्य आचरण दया भूतीं। करीं सांगाती चुकों नको ।।तु.गा.०७२८.००३ ।।
दशा यौवन बाणली अंगीं। पांगिला नव्हें विषयसंगीं। काम क्रोध लोभ मोह त्यागीं। राहें संतसंगीं चुकों नको ।।तु.गा.०७२८.००४ ।।
मग तेथें न चले कांहीं। सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं। पुढें संचित जाईल ग्वाही। तुका म्हणे तईं यमआज्ञा ।।तु.गा.०७२८.००५ ।।

चांगलें नाम गोमटें रूप। निवती डोळे हरती ताप। विठ्ठल विठ्ठल हा जप। प्रगट स्वल्प अति सार।।तु.गा.०७२९.००१।।
शस्त्र हें निर्वाणींचा बाण। निकट समयो अवसान। कोठें योजेल दश दान। खंडी नारायण दुःख चिंतनें।।तु.गा.०७२९.००२।।
सकळ श्रेष्ठांचें हे मत। पावे सिद्धि पाववी अनंत। म्हणोनि व्हावें शरणागत। आहे उचित एवढेंचि।।तु.गा.०७२९.००३।।
म्हणोनि रुसलों संसारा। सर्प हा विखार पांढरा। तुजशीं अंतर रे दातारा। याचि दावेदारानिमित्त।।तु.गा.०७२९.००४।।
येणें मज भोगविल्या खाणी। नसता छंद लाविला मनीं। माजलों मी माझे भ्रमणीं। झाली बोडणी विटंबना।।तु.गा.०७२९.००५।।
पावलों केलियाचा दंड। खाणी भोगिल्या याती उदंड। आतां केला पाहिजे खंड। तुका दंडवत घाली देवा।।तु.गा.०७२९.००६।।
तुझिया पार नाहीं गुणां। माझी अल्प मति नारायणा। भवतारका जी सुजाणा। एक विज्ञापना पायांपाशीं।।तु.गा.०७३०.००१।।
काय जाणावें म्यां दीनें। तुझिये भक्तिचीं लक्षणें। धड तें तोंड धुऊं नेणें। परि चिंतनें काळ सारीं।।तु.गा.०७३०.००२।।
न लवीं आणिक कांहीं पिसें। माझिया मना वायां जाय ऐसें। चालवीं आपुल्या प्रकाशें। हातीं सरिसें धरोनियां।।तु.गा.०७३०.००३।।
तुज हे समर्पिली काया। जीवेंभावें पंढरीराया। सांभाळी समविषम डाया। करीं छाया कृपेची।।तु.गा.०७३०.००४।।
चतुर तरी चतुरां राव। जाणता तरी जीवांचा जीव। न्यून तो कोण एक ठाव। आरुष भाव परि माझा।।तु.गा.०७३०.००५।।
होतें तें माझें भांडवल। पायांपें निवेदिले बोल। आदरा ऐसें पाविजे मोल। तुका म्हणे साच फोल तूं जाणसी।।तु.गा.०७३०.००६।।
कां हो माझा मानियेला भार। ऐसा तंव दिसतसे फार। अनंत पावविलीं उद्धार। नव्हेचि थार मज शेवटीं।।तु.गा.०७३१.००१।।
पाप बळिवंत गाढें। तुजही राहों सकतें पुढें। मागील कांहीं राहिलें ओढें। नवल कोडें देखियेलें।।तु.गा.०७३१.००२।।
काय मानिती संतजन। तुमचें हीनत्व वचन। कीं वृद्ध झाला नारायण। न चले पण आधील तो।।तु.गा.०७३१.००३।।
आतां न करावी चोरी। बहुत न धरावें दुरी। पडदा काय घरच्या घरीं। धरिलें दुरी तेव्हां धरिलें।।तु.गा.०७३१.००४।।
नको चाळवूं अनंता। कासया होतोसी नेणता। काय तूं नाहीं धरीत सत्ता। तुका म्हणे आतां होई प्रगट।।तु.गा.०७३१.००५।।
तुळसी माळा घालूनि कंठीं। उभा विटेवरी जगजेठी। अवलोकोनि पुंडलिका दृष्टी। असे भीमातटीं पंढरीये।।तु.गा.०७३२.००१।।
भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी। रिद्धिसिद्धि वोळगती द्वारीं। सुदर्शन घरटी करी। काळ कांपे दुरी धाकें तया।।तु.गा.०७३२.००२।।
जगज्जननी असें वाम भागीं। भीमकी शोभली अर्धांगीं। जैसी विद्युल्लता झळके मेघीं। दर्शनें भंगी महा दोष।।तु.गा.०७३२.००३।।
सुखसागर परमानंदु। गोपी गोपाळां गोधना छंदु। पक्षिश्वापदां जयाचा वेधु। वाहे गोविंदु पावा छंदें।।तु.गा.०७३२.००४।।
मुखमंडित चतुर्भुजा। मनमोहना गरुडध्वजा। तुका म्हणे स्वामी माझा। पावे भक्तकाजा लवलाहीं।।तु.गा.०७३२.००५।।
हातींचें न संडावें देवें। शरण आलों जीवें भावें। आपलें ऐसें म्हणावें। करितों जीवें निंबलोण।।तु.गा.०७३३.००१।।

बैसतां संतांचे संगती। कळों आलें कमळापती। आपुली कोणीच नव्हती। निश्चय चित्तीं दृढ झाला ।।तु.गा.०७३३.००२ ।।
येती तुझिया भजना आड। दाविती प्रपंचाचें कोड। कनिष्ठीं रुचि ठेवूनि गोड। देखत नाड कळतसे ।।तु.गा.०७३३.००३ ।।
मरती मेलीं नेणों किती। हाचि लाभ तयाचे संगती। म्हणोनि येतों काकुलती। धीर तो चित्तीं दृढ द्यावा ।।तु.गा.०७३३.००४ ।।
सुखें निंदोत हे जन। न करीं तयांशीं वचन। आदिपिता तूं नारायण। जोडी चरण तुमचे ते ।।तु.गा.०७३३.००५ ।।
आपलें आपण न करूं हित। करूं हें प्रमाण संचित। तरी मी नष्टचि पतित। तुका म्हणे मज संत हांसती ।।तु.गा.०७३३.००६ ।।
आतां येणें बळें पंढरिनाथ। जवळी राहिला तिष्ठत। पाहतां न कळे जयाचा अंत। तोचि हृदयांत घालूं आतां ।।तु.गा.०७३४.००१ ।।
विसरोनि आपला देहपणभाव। नामेचि भुलविला पंढरीराव। न विचारी याती कुळ ठाव। लागावया पाव संतांचे ।।तु.गा.०७३४.००२ ।।
बरें वर्म आलें आमुचिया हातां। हिंडावें धुंडावें न लगतां। होय अविनाश साहाकारी दाता। चतुर्भुज सत्ता परि धाके ।।तु.गा.०७३४.००३ ।।
होय आवडी साना थोर। रूप सुंदर मनोहर। भक्तिप्रिय लोभापर। करी आदर याचकपणें ।।तु.गा.०७३४.००४ ।।
तें वर्म आले आमुच्या हाता। म्हणोनि शरण रिघालों संतां। तुका म्हणे पंढरिनाथा। न सोडीं आतां जीवें भावें ।।तु.गा.०७३४.००५ ।।
आइक पांडुरंग एक मात। कांहीं बोलणें आहे एकांत। आम्हां जरी तारील संचित। तरी उचित काय तुझें ।।तु.गा.०७३५.००१ ।।
उसणें फेडितां धर्म तो कोण। काय तया मानवेल जन। काय गा मिरवूनि भूषण। वायां थोरपण जनामध्यें ।।तु.गा.०७३५.००२ ।।
अन्न जरी न मिळे तयासी देणें। अगांतुक पात्र उचित दान। उपकार तरी धन्वंतरीपणें। जरी देणें घेणें नाहीं आशा ।।तु.गा.०७३५.००३ ।।
शूर तो तयासी बोलिजे जाणा। पाठीसी घालूनि राखे दीना। पार पुण्या नाहीं त्या भूषणा। ऐक नारायणा वचन हें ।।तु.गा.०७३५.००४ ।।
आतां पुढें बोलणें तें कांहीं। मज तारिसील तरीच सहि। वचन आपुलें सिद्धि नेईं। तुका म्हणे तईं मज कळसी ।।तु.गा.०७३५.००५ ।।
चांगला तरी पूर्ण काम। गोड तरी याचेचि नाम। दयाळू तरी अवघा धर्म। भला तरी दासां श्रम होऊं नेदी ।।तु.गा.०७३६.००१ ।।
उदार तरी लक्ष्मीयेसी। जुंजार तरी कळिकाळासी। चतुर तरी गुणांचीच रासी। जाणता तयासी तोचि एक ।।तु.गा.०७३६.००२ ।।
जुनाट तरी बहुकाळा। न कळे जयाची लीळा। नेणता गोवळीं गोवळा। लाघवी अबळा भुलवणा ।।तु.गा.०७३६.००३ ।।
गांढ्या तरी भावाचा अंकित। बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत। ओंगळ तरी कुब्जेशीं रत। भ्याड अनंत बहु पापा ।।तु.गा.०७३६.००४ ।।
खेळ तो येणेंचि खेळावा। नट तो येणेंचि आवगावा। लपोनि जीवीं न कळे जीवा। धरितां देवा नातुडसी ।।तु.गा.०७३६.००५ ।।
उंच तरी बहुतचि उंच। नीच तरी बहुतचि नीच। तुका म्हणे बोलिलों साच। नाहीं आहाच पूजा केली ।।तु.गा.०७३६.००६ ।।
काय आम्ही भक्ति करणें कैसी। काय एक वाहावें तुम्हांसी। अवघा भरोनि उरलासी। वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ।।तु.गा.०७३७.००१ ।।
कैसें करूं इंद्रियां बंधन। पुण्यपापाचें खंडण। काय व्रत करूं आचरण। काय तुजविण उरलें तें ।।तु.गा.०७३७.००२ ।।

काय डोळे झांकुनियां पाहों। मंत्र जप काय ध्यावो। कवणें ठायीं धरूनि भाव। काय तें वाव तुजविण।।तु.गा.०७३७.००३।।

काय हिंडों कवण दिशा। कवणें ठायीं पाय ठेवूं कैसा। काय तूं नव्हेसी नकळे ऐसा। काय मी कैसा पाहों आतां।।तु.गा.०७३७.००४।।

तुझिया नामाची सकळ। पूजा अर्चन मंत्र माळ। धूप दीप नैवेद्य फळ तांबूल। वाहूं पुष्पांजुळ तुका म्हणे।।तु.गा.०७३७.००५।।

शरीर दु:खाचें कोठार। शरीर रोगाचें भांडार। शरीर दुर्गंधीची थार। नाहीं अपवित्र शरीरा ऐसें।।तु.गा.०७३८.००१।।

शरीर उत्तम चांगलें। शरीर सुखाचें घोसुलें। शरीरें साध्य होय केलें। शरीरें साधलें परब्रह्म।।तु.गा.०७३८.००२।।

शरीर विटाळाचें आळें। मायामोहपाश जाळें। पतन शरीराच्या मुळें। शरीर काळें व्यापिले।।तु.गा.०७३८.००३।।

शरीर सकळही शुद्ध। शरीर निधींचाही निध। शरीरें तुटे भवबंध। वसे मध्यभागीं देव शरीरा।।तु.गा.०७३८.००४।।

शरीर अविद्येचा बांधा। शरीर अवगुणांचा रांधा। शरीरीं वसे बहुत बाधा। नाहीं गुण सुधा एक शरीरीं।।तु.गा.०७३८.००५।।

शरीरा दु:ख नेदावा भोग। न द्यावें सुख न करीं त्याग। शरीर वोखटें ना चांग। तुका म्हणे वेग करीं हरिभजनी।।तु.गा.०७३८.००६।।

इतुलें करी भलत्या परी। परद्रव्य परनारी। सांडूनि अभिलाष अंतरीं। वर्ते वेव्हारीं सुखरूप।।तु.गा.०७३९.००१।।

न करीं दंभाचा सायास। शांती राहे बहुवस। जिव्हे सेवीं सुगंधरस। न करीं आळस रामनामीं।।तु.गा.०७३९.००२।।

जनमित्र होईं सकळांचा। अशुभ न बोलावी वाचा। संग न धरावा दुर्जनाचा। करीं संतांचा सायास।।तु.गा.०७३९.००३।।

करिसी देवाविण आस। अवघी होईल निरास। तृष्णा वाढविसी बहुवस। कधीं सुखास न पवसी।।तु.गा.०७३९.००४।।

धरूनि विश्वास करीं धीर। करितां देव हाचि निर्धार। तयाचा वाहे योगक्षेमभार। नाहीं अंतर तुका म्हणे।।तु.गा.०७३९.००५।।

संसारसिंधु हा दुस्तर। नुल्लंघवे उल्लंघितां पार। बहुत वाहाविलें दूर। न लगेचि तीर पैल थडी।।तु.गा.०७४०.००१।।

किती जन्म झाला फेरा। गणित नाहीं जी दातारा। पडिलों आवर्तीं भोंवरा। बहु योग वोळसिया।।तु.गा.०७४०.००२।।

वाढलों परि नेणती बुद्धि। नाहीं परतली धरिली शुद्धि। मग म्यां विचारावें कधीं। ऐसी संधि सांडूनियां।।तु.गा.०७४०.००३।।

अनेक खाणी आहार निद्रा। भयमैथुनाचाचि थारा। बालत्व तारुण्य जरा। प्रधान पुरा भोग तेथें।।तु.गा.०७४०.००४।।

ऐसीं उल्लंघूनि आलों स्थळें। बहु या भोवंडिलों काळें। आतां हें उगवावें जाळें। उजेडावें बळें दिवसाच्या।।तु.गा.०७४०.००५।।

सांडो या संसाराची वाट। बहु येणें भोगविले कष्ट। दावी सत्या ऐसें नष्ट। तुका म्हणे भ्रष्ट झालों देवद्रोही।।तु.गा.०७४०.००६।।

विठ्ठल भीमातीरवासी। विठ्ठल पंढरीनिवासी। विठ्ठल पुंडलिकापासीं। कृपादानासीं उदार।।तु.गा.०७४१.००१।।

विठ्ठल स्मरणा कोंवळा। विठ्ठल गौरवी आगळा। आधार ब्रह्मांडा सकळा। विठ्ठल लीळाविग्रही।।तु.गा.०७४१.००२।।

उभाचि परि न मनी सीण। नाहीं उद्धरितां भिन्न। समर्थांचे घरीं एकचि अन्न। आर्तभूता क्षणोक्षणा सांभाळी।।तु.गा.०७४१.००३।।

रुचीचे प्रकार। आणिताती आदरें। कोठेंही न पडे अंतर। थोरासी थोर धाकुट्या धाकुटा।।तु.गा.०७४१.००४।।
करितां बळ धरितां नये। झोंबतां डोळा मनच होय। आपुल्या उद्देशाची सोय। जाणे हृदयनिवासी।।तु.गा.०७४१.००५।।
पान्हा तरी आल्या अंतर तेथें। तों नाहीं भरिलें रितें। करितों सेवन आइतें। तुका म्हणे चित्तें चित्त मेळवूनि ।।तु.गा.०७४१.००६।।
ताप हें हरण श्रीमुख। हरी भवरोगाऐसें दु:ख। अवलोकितां उपजे सुख। उभें सन्मुख दृष्टीपुढें।।तु.गा.०७४२.००१।।
न पुरे डोळियांची धणी। सखोल कृपेचीच खाणी। स्तवितां न पुरे वेदवाणी। तो हा समचरणी कृपानिधी।।तु.गा.०७४२.००२।।
रामकृष्ण ध्यान वामननरसिंहीं। उग्र आणि सौम्य कांहींच नाहीं। सांपडे भरलीये वाहीं। भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ।।तु.गा.०७४२.००३।।
गुणगंभीर चतुर सुजाण। शूर धीर उदार नारायण। व्यापक तरी त्रिभुवन। मनमोहन लावण्य हें।।तु.गा.०७४२.००४।।
ठाण हें साजिरें सुंदर। अविनाश अविकार। अनंत आणि अपरंपार। तो हा कटीं कर धरिताहे।।तु.गा.०७४२.००५।।
जयाची वाणी सुमनमाळा। परमामृतजिव्हाळा। अनंता अंगीं अनंत कळा। तुका जवळा चरणसेवक ।।तु.गा.०७४२.००६।।
भाग्य ऐसी जाली जोडी। आतां घडी न विसंबे।।तु.गा.०७४३.००१।।
विटेवरी समचरण। संतीं खूण सांगितली।।तु.गा.०७४३.००२।।
अवघे आतां काम सारूं । हाचि करूं कैवाड।।तु.गा.०७४३.००३।।
तुका म्हणे खंडूं खेपा। पुढें पापापुण्याच्या।।तु.गा.०७४३.००४।।
आमुच्या हें आलें भागा। जिव्हार या जगाचें।।तु.गा.०७४४.००१।।
धरूनियां ठेलों जिवें। बळकट भावें एकविध।।तु.गा.०७४४.००२।।
आणूनियां केला रूपा। उभा सोपा जवळी।।तु.गा.०७४४.००३।।
तुका म्हणे अंकित केला। खालीं आला वचनें।।तु.गा.०७४४.००४।।
येथें आड कांहीं न साहे आणिक । प्रमाण तें एक हेंचि झालें।।तु.गा.०७४५.००१।।
गाऊं नाचूं टाळी वाहूं गीत छंदें। डोलवूं विनोदें अंग तेणें।।तु.गा.०७४५.००२।।
मथुनियां सार काढिलें बाहेरी। उपाधि त्या येरी निवडिल्या।।तु.गा.०७४५.००३।।
तुका म्हणे जना लाविली शिराणी। सेवितां हे धणी होत नाहीं।।तु.गा.०७४५.००४।।
जैसा तैसा आतां। मज प्रमाण अनंता।।तु.गा.०७४६.००१।।
पायां पडणें न सोडीं। पोटीं तेंच वर तोंडीं।।तु.गा.०७४६.००२।।

एका भावें चाड। आदि तेंचि अंतीं गोड।।तु.गा.०७४६.००३।।
तुका म्हणे आम्हां। टळणेंचि नाहीं नेमा।।तु.गा.०७४६.००४।।
आम्ही पहा कैसीं एकतत्त्वीं झालों। राखणे लागलों वासनेसी।।तु.गा.०७४७.००१।।
तुम्हांविण कांहीं नावडे या जीवा। केला तोचि देवा दृढ पण।।तु.गा.०७४७.००२।।
वर्म नेणों परि वृत्ति भंगो नेदूं। वंदिलेचि वंदूं आवडीनें।।तु.गा.०७४७.००३।।
तुका म्हणे केलें नामाचें जीवन। वारताही भिन्न नेणों आतां।।तु.गा.०७४७.००४।।
गोपीचंदन मुद्रा धरणें। आम्हां लेणें वैष्णवा।।तु.गा.०७४८.००१।।
मिरवूं अळंकार लेणें। हीं भूषणें स्वामीची।।तु.गा.०७४८.००२।।
विकलो ते सेवा जीवें। एक्या भावें एकविध।।तु.गा.०७४८.००३।।
तुका म्हणे शूर झालों। बाहेर आलों संसारा।।तु.गा.०७४८.००४।।
माझी भक्ती भोळी। एकविध भावबळी।।तु.गा.०७४९.००१।।
मी कां पडेन निराळा। ऐसा सांडूनि सोहळा।।तु.गा.०७४९.००२।।
आतां अनारिसा। येथें न व्हावें सहसा।।तु.गा.०७४९.००३।।
तुका म्हणे जोडुनि पाय। पुढें उगा उभा आहे।।तु.गा.०७४९.००४।।
आम्हां भाविकांची जाती। एकविध जी श्रीपती। अळंकारयुक्ति। सरों शकेचि ना।।तु.गा.०७५०.००१।।
जाणे माउली त्या खुणा। क्षोभ उपजो नेदी मना। शांतवूनि स्तना। लावीं अहो कृपाळें।।तु.गा.०७५०.००२।।
तुज अवघे होऊं येतें। परि मज बाटों नये चित्तें। उपासने परतें। नये कांहीं आवडों।।तु.गा.०७५०.००३।।
करूं रूपाची कल्पना। मुखीं नाम नारायणा। तुका म्हणे जना। जळस्थळ देखतां।।तु.गा.०७५०.००४।।
आम्हां एकविधां पुण्य सर्वकाळ। चरणकमळ स्वामींचे तें।।तु.गा.०७५१.००१।।
चित्ताचे संकल्प राहिलें चळण। आज्ञा ते प्रमाण करूनि असों।।तु.गा.०७५१.००२।।
दुजिया पासाव परतलें मन। केलें घ्यावें दान होईल तें।।तु.गा.०७५१.००३।।
तुका म्हणे आतां पुरला नवस। एकाविण ओस सकळही।।तु.गा.०७५१.००४।।
एकविध आम्ही न धरूं पालट। न संडूं हे वाट सांपडली।।तु.गा.०७५२.००१।।

म्हणवूनि केला पाहिजे सांभाळ। माझें बुद्धीबळ पाय तुझें ।।तु.गा.०७५२.००२ ।।
बहुत न कळे बोलतां प्रकार। अंतरा अंतर साक्ष असे ।।तु.गा.०७५२.००३ ।।
तुका म्हणे अगा जीवींच्या जीवना। तूंचि नारायणा साक्षी माझा ।।तु.गा.०७५२.००४ ।।
नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें। स्वामिसेवा काजें निर्धारू हा ।।तु.गा.०७५३.००१ ।।
आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार। येणें फिटे भार निश्चयेंसी ।।तु.गा.०७५३.००२ ।।
आळीकर आम्हीं एकविध चित्तें। तैसें होऊं येतें मायबापें ।।तु.गा.०७५३.००३ ।।
तुका म्हणे माझी ये जातीची सेवा। घातलासे देवावरी भार ।।तु.गा.०७५३.००४ ।।
परपीडक तो आम्हां दावेदार। विश्वीं विश्वंभर म्हणऊनि ।।तु.गा.०७५४.००१ ।।
दंडू त्यागूं बळें नावलोकूं डोळा। राखूं तो चांडाळा ऐसा दूरी ।।तु.गा.०७५४.००२ ।।
अनाचार कांहीं न साहे अवगुण। बहु होय मन कासावीस ।।तु.गा.०७५४.००३ ।।
तुका म्हणे माझी एकविध सेवा। विमुख ते देवा वाळीं चित्तें ।।तु.गा.०७५४.००४ ।।
लौकिकापुरती नव्हे माझी सेवा। अनन्य केशवा दास तुझा ।।तु.गा.०७५५.००१ ।।
म्हणऊनि करीं पायांसवें आळी। आणीक वेगळी नेणें परी ।।तु.गा.०७५५.००२ ।।
एकविध आम्ही स्वामिसेवेसाठीं। वरी तोचि पोटीं एक भाव ।।तु.गा.०७५५.००३ ।।
तुका म्हणे करीं सांगितलें काम। तुम्हां धर्माधर्म ठावे देवा ।।तु.गा.०७५५.००४ ।।
धीर तो कारण एकविध भाव। पतिव्रते नाहो सर्वभावें ।।तु.गा.०७५६.००१ ।।
चातक हे जळ न पाहती दृष्टी। वाट पाहे कंठीं प्राण मेघा ।।तु.गा.०७५६.००२ ।।
सूर्यविकासिनी नेघे चंद्रामृत। वाट पाहे अस्त उदयाची ।।तु.गा.०७५६.००३ ।।
धेनु येऊं नेदी जवळी आणिकां। आपुल्या बाळकाविण वत्सा ।।तु.गा.०७५६.००४ ।।
तुका म्हणे नेम प्राणासंवसाटीं। तरीच या गोष्टी विठोबाची ।।तु.गा.०७५६.००५ ।।
पतिव्रता नेणें आणिकांची स्तुति। सर्वभावें पति ध्यानीं मनीं ।।तु.गा.०७५७.००१ ।।
तैसें माझें मन एकविध जालें। नावडे विठ्ठलेंविण दुजें ।।तु.गा.०७५७.००२ ।।
सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा। गाय ते कोकिळा वसंतेसी ।।तु.गा.०७५७.००३ ।।

तुका म्हणे बाळ मातेपुढें नाचे। बोल आणिकाचे नावडती।।तु.गा.०७५७.००४।।
आणिकाची स्तुति आम्हां ब्रह्महत्या। एकावांचुनि त्या पांडुरंगा।।तु.गा.०७५८.००१।।
आम्हां विष्णुदासां एकविध भाव। न म्हणों या देव आणिकासी।।तु.गा.०७५८.००२।।
शतखंड माझी होईल रसना। जरी या वचना पालटेन।।तु.गा.०७५८.००३।।
तुका म्हणे मज आणिका संकल्पें। अवघींच पापें घडतील।।तु.गा.०७५८.००४।।
पतिव्रतें जैसा भ्रतार प्रमाण। आम्हां नारायण तैशापरी।।तु.गा.०७५९.००१।।
सर्वभावें लोभ्या आवडे हें धन। आम्हां नारायण तैशापरी।।तु.गा.०७५९.००२।।
तुका म्हणे एकविध जालें मन। विठ्ठलावांचून नेणें दुजें।।तु.गा.०७५९.००३।।
काय करूं आन दैवतें। एकाविण पंढरीनाथें।।तु.गा.०७६०.००१।।
सरिता मिळाली सागरीं। आणिकां नांवा कैची उरी।।तु.गा.०७६०.००२।।
अनेक दीपिका प्रकाश। सूर्य उगवतां नाश।।तु.गा.०७६०.००३।।
तुका म्हणे नेणें दुजें। एकाविण पंढरीराजे।।तु.गा.०७६०.००४।।
माझी आतां सत्ता आहे। तुम्हां पायां हे वरती।।तु.गा.०७६१.००१।।
एकाविण नेणें दुजा। पंढरीराजा सर्वांगें।।तु.गा.०७६१.००२।।
पुरवावी केली आळी। जे जे काळीं मागेन तें।।तु.गा.०७६१.००३।।
तुका म्हणे सुटसी कैसा। धरूनि दिशा राहिलों।।तु.गा.०७६१.००४।।
आणिक दुसरें मज नाहीं आतां। नेमिलें या चित्तापासुनियां।।तु.गा.०७६२.००१।।
पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं। जागृतीं स्वप्नीं पांडुरंग।।तु.गा.०७६२.००२।।
पडिलें वळण इंद्रियां सकळां। भाव तो निराळा नाहीं दुजा।।तु.गा.०७६२.००३।।
तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण। तटस्थ हें ध्यान विटेवरी।।तु.गा.०७६२.००४।।
न पूजीं आणिकां देवां न करी त्यांची सेवा। न मनीं या केशवाविण दुजें।।तु.गा.०७६३.००१।।
काय उणें जालें मज तया पायीं। तें मी मागों काई कवणासी।।तु.गा.०७६३.००२।।
आणिकांची कीर्ति नाइकें न बोलें। चाड या विठ्ठलेंविण नाहीं।।तु.गा.०७६३.००३।।

न पाहें लोचनीं श्रीमुखावांचूनि । पंढरी सांडूनि नवजें कोठें ।।तु.गा.०७६३.००४ ।।
न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास । न भें संसारास येतां जातां ।।तु.गा.०७६३.००५ ।।
तुका म्हणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजें ।।तु.गा.०७६३.००६ ।।
कोणाचिया न पडों छंदा । गोविंदासी आळवूं ।।तु.गा.०७६४.००१ ।।
बहुतांचीं बहु मतें । अवघे रिते पोकळ ।।तु.गा.०७६४.००२ ।।
घटापटा डहुळी मन । होय सीण न करूं तें ।।तु.गा.०७६४.००३ ।।
तुका म्हणे पांडुरंग । भरूं भाग आला तो ।।तु.गा.०७६४.००४ ।।
न करीं पठन घोष अक्षरांचा । बीजमंत्र आमुचा पांडुरंग ।।तु.गा.०७६५.००१ ।।
सर्वकाळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासीं समाधि हे ।।तु.गा.०७६५.००२ ।।
न करीं भ्रमण न रिघें कपाटीं । जाईन तेथें दाटी वैष्णवांची ।।तु.गा.०७६५.००३ ।।
आन नेणें कांहीं नवजें तपासी । नाचे दींडीपाशीं जागरणीं ।।तु.गा.०७६५.००४ ।।
उपवास व्रत न करीं पारणें । रामकृष्ण म्हणें नारायण ।।तु.गा.०७६५.००५ ।।
आणिकांची स्तुती सेवा नेणें वाणूं । तुका म्हणे आनु दुजें कांहीं ।।तु.गा.०७६५.००६ ।।
आणोनियां मना । अवघ्या धांडोळिल्या खुणा । देखिला तो राणा । पंढरपूरनिवासी ।।तु.गा.०७६६.००१ ।।
यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वायां जाय । देखिले ते पाय । सम जीवीं राहती ।।तु.गा.०७६६.००२ ।।
तो देखावा हा विध । चिंतनेंचि कार्य सिद्ध । आणिकां संबंध । नाहीं पर्वकाळासी ।।तु.गा.०७६६.००३ ।।
तुका म्हणे खळ । होती क्षणेंचि निर्मळ । जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ।।तु.गा.०७६६.००४ ।।
तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत । तूंचि माझे हित करितां देवा ।।तु.गा.०७६७.००१ ।।
तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंगा ।।तु.गा.०७६७.००२ ।।
तूं माझा आचार तूं माझा विचार । तूंचि सर्व भार चालविसी ।।तु.गा.०७६७.००३ ।।
सर्वभावें मज तूं होसी प्रमाण । ऐसी तुझी आण वाहतसें ।।तु.गा.०७६७.००४ ।।
तुका म्हणे तुज विकला जीवभाव । कळेल तो उपाव करीं आतां ।।तु.गा.०७६७.००५ ।।
तूं आम्हां सोयरा सज्जन सांगाती । तुज मज प्रीति चालों सदा ।।तु.गा.०७६८.००१ ।।

तूं माझा जिव्हाळा जीवाचा जीवलग। होसी अंतरंग अंतरींचा ॥तु.गा.०७६८.००२॥
गण गोत मित्र तूं माझें जीवन। अनन्य शरण तुझ्या पायीं ॥तु.गा.०७६८.००३॥
तुका म्हणे सर्वगुणें तुझा दास। आवडे अभ्यास सदा तुझा ॥तु.गा.०७६८.००४॥
असोत हे बोल। अवघें तूंचि भांडवल ॥तु.गा.०७६९.००१॥
माझा मायबाप देवा। सज्जन सोयरा केशवा ॥तु.गा.०७६९.००२॥
गाळियेला भेद। सारियेले वादावाद ॥तु.गा.०७६९.००३॥
तुका म्हणे मधीं। आतां न पडे उपाधि ॥तु.गा.०७६९.००४॥
आमुची विश्रांति। तुमचे चरण कमळापती ॥तु.गा.०७७०.००१॥
हेंचि एक जाणें। कायावाचा आणि मनें ॥तु.गा.०७७०.००२॥
पुढती पुढती नमन। घालूनियां लोटांगण ॥तु.गा.०७७०.००३॥
नीच जनालोकां। तळिल पायरीस तुका ॥तु.गा.०७७०.००४॥
विश्वासिया नाहीं लागत सायास। अनायासे रंग अंगा येतो ॥तु.गा.०७७१.००१॥
लेंकराच्या हातें घांस मागे माता। वोरसोनि चित्ता सुख पावे ॥तु.गा.०७७१.००२॥
गौरव तो मानी आरुषा वचनीं। भूषण ते वाणी मिरवावी ॥तु.गा.०७७१.००३॥
तुका म्हणे आहे सकळही साक्षी। माझा तो कइपक्षी पांडुरंग ॥तु.गा.०७७१.००४॥
बहुत असती मार्गे सुखी केलीं। अनाथा माउली जिवांची तूं ॥तु.गा.०७७२.००१॥
माझिया संकटा न धरीं आळस। लावूनियां कासे पार पावीं ॥तु.गा.०७७२.००२॥
कृपावंता करा ज्याचा अंगीकार। तया संवसार नाहीं पुन्हा ॥तु.गा.०७७२.००३॥
विचारितां नाहीं दुजा बळिवंत। ऐसा सर्वगत व्यापी कोणी ॥तु.गा.०७७२.००४॥
म्हणऊनि दिला मुळीं जीवभाव। देह केला वाव समाधिस्थ ॥तु.गा.०७७२.००५॥
तुका म्हणे नाहीं जाणत आणीक। तुजविण एक पांडुरंगा ॥तु.गा.०७७२.००६॥
रवीचा प्रकाश। तोचि निशीं घडे नाश। जाल्या बहुवस। तरि त्या काय दीपिका ॥तु.गा.०७७३.००१॥
आतां हाचि वसों जीवीं। माझे अंतरीं गोसावी। होऊं येतीं ठायीं। काय वर्मे त्याच्यानें ॥तु.गा.०७७३.००२॥

सवें असतां धनी। आड येऊं न सके कोणी। नलगे विनवणी। पृथकाची करावी।।तु.गा.०७७३.००३ ।।
जन्माचिया गति। येणें अवघ्या खुंटती। कारण ते प्रीती। तुका म्हणे जवळी।।तु.गा.०७७३.००४।।
न कळे जी भक्ती काय करूं सेवा। संकोचोनि देवा राहिलोसें।।तु.गा.०७७४.००१ ।।
जोडोनियां कर राहिलों निवांत। पायांपाशीं चित्त ठेवूनियां।।तु.गा.०७७४.००२ ।।
दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षिणा। भ्रमें नारायणा कष्टविलें।।तु.गा.०७७४.००३ ।।
तुका म्हणे झालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला।।तु.गा.०७७४.००४।।
मी दास तयाचा जया चाड नाहीं। सुख दुःख दोहीं विरहित जो।।तु.गा.०७७५.००१ ।।
राहिलासे उभा भींवरेचे तीरीं। कट दोहीं करी धरोनियां।।तु.गा.०७७५.००२ ।।
नवल काय तरी पाचारितां पावे। न संवरित धांवे भक्तिकाजें।।तु.गा.०७७५.००३ ।।
सर्व भार माझा त्यासी आहे चिंता। तोचि माझा दाता स्वहिताचा।।तु.गा.०७७५.००४ ।।
तुका म्हणे त्यास गाईन मी गीतीं। आणीक तें चित्तीं न धरीं कांहीं।।तु.गा.०७७५.००५ ।।
खरें भांडवल सांपडलें गांठी। जेणें नये तुटी उदिमासी।।तु.गा.०७७६.००१ ।।
सवंगाचें केणें सांपडलें घरीं। भरूनि वैखरी सांठविलें।।तु.गा.०७७६.००२ ।।
घेतां देतां लाभ होतसे सकळां। सदैवां दुर्बळा भाव तैसा।।तु.गा.०७७६.००३ ।।
फडा आलिया तो न वजे निरास। जरि कांहीं त्यास न कळतां।।तु.गा.०७७६.००४।।
तुका म्हणे आतां जालीसे निश्चिंती। आणीक तें चित्तीं न धरूं दुजें।।तु.गा.०७७६.००५ ।।
ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम। आन न करी काम जिव्हामुखें।।तु.गा.०७७७.००१ ।।
पाहिन तुझे पाय ठेवीन मी डोई। पृथक तें कांहीं न करी आन।।तु.गा.०७७७.००२ ।।
तुझेचि गुणवाद आइकेन कानीं। आणिकांची वाणी पुरे आतां।।तु.गा.०७७७.००३ ।।
करिन सेवा करें चालेन मी पायीं। आणीक न वजे ठायीं तुजविण।।तु.गा.०७७७.००४ ।।
तुका म्हणे जीव ठेवीन मी पायीं। आणीक ते कांहीं देऊं कवणा।।तु.गा.०७७७.००५ ।।
तुझा शरणागत। जन्मोजन्मींचा अंकित।।तु.गा.०७७८.००१ ।।
आणीक नेणे कांहीं हेवा। तुजवांचूनि केशवा।।तु.गा.०७७८.००२ ।।

हेंचि माझें गाणें। तुझें नामसंकीर्तन।।तु.गा.०७७८.००३।।
तुझ्या नामाचीं भूषणें। तुका म्हणे ल्यालों लेणें।।तु.गा.०७७८.००४।।
तुझ्या नामाची आवडी। आम्ही विठो तुझीं वेडीं।।तु.गा.०७७९.००१।।
आतां न वजो आणिकां ठाया। गाऊं गीत लागों पायां।।तु.गा.०७७९.००२।।
काय वैकुंठ बापुडें। तुझ्या प्रेमसुखापुढें।।तु.गा.०७७९.००३।।
संतसमागममेळें। प्रेमसुखाचा सुकाळ।।तु.गा.०७७९.००४।।
तुका म्हणे तुझ्या पायीं। जन्ममरणा ठाव नाहीं।।तु.गा.०७७९.००५।।
काय ते विरक्ती न कळेचि आम्हां। जाणो एका नामा विठोबाच्या।।तु.गा.०७८०.००१।।
नाचेन मी सुखें वैष्णवांचे मेळीं। दिंडी टाळघोळीं आनंदें या।।तु.गा.०७८०.००२।।
शांति क्षमा दया ते मी काय जाणे। विठ्ठलकीर्तनें वाचूनियां।।तु.गा.०७८०.००३।।
कासया एकांत सेवूं तया वना । आनंदें या जनामाजी असो ।।तु.गा.०७८०.००४।।
कासया उदास होऊं देहावरी। अमृतसागरी बुडोनियां।।तु.गा.०७८०.००५।।
तुका म्हणे मज असे हा भरवसा। विठ्ठल सरसा चालतसे।।तु.गा.०७८०.००६।।
मायेविण बाळ क्षणभरी न राहे। न देखतां होय कासावीस।।तु.गा.०७८१.००१।।
आणिक उदंड बुजाविती तरी। छंद त्या अंतरीं माउलीचा।।तु.गा.०७८१.००२।।
नावडती तया बोल आणिकांचे। देखोनियां नाचे माय दृष्टी।।तु.गा.०७८१.००३।।
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली। आणिकांचे बोली चाड नाहीं।।तु.गा.०७८१.००४।।
पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं। नाहीं ऐशी मति अर्थ कळे।।तु.गा.०७८२.००१।।
होईल तें हो या विठोबाच्या नांवें। अर्जिलें तें भावें जीवीं धरूं ।।तु.गा.०७८२.००२।।
एखादा अंगाशी येईल प्रकार। विचारितां फार युक्ति वाढे।।तु.गा.०७८२.००३।।
तुका म्हणे आळी करितां गोमटी। मायबापा पोटीं येते दया।।तु.गा.०७८२.००४।।
सिद्धिचा दास नव्हे श्रुतीचा अंकिला। होईन विठ्ठला दास तुझा।।तु.गा.०७८३.००१।।
सर्व सुख असे माझिये मानसीं। राहिलें तयासी नाश नाहीं।।तु.गा.०७८३.००२।।

तेणें पुण्य पाप न देखें लोचनीं। आणिकां वांचूनि पांडुरंगा।।तु.गा.०७८३.००३।।
न करीं मी आस साधनीं सायास। भक्तिप्रेमरस वांचूनियां।।तु.गा.०७८३.००४।।
गर्भवासीं दुःख नाहीं येतां जातां। हृदयीं असतां नाम तुझें।।तु.गा.०७८३.००५।।
तुका म्हणे तुझा होईन अंकिला। न भें मी विठ्ठला कळिकाळासी।।तु.गा.०७८३.००६।।
म्हणे विठ्ठल ब्रह्म नव्हे। त्याचे बोल नाइकावे।।तु.गा.०७८४.००१।।
मग तो हो का कोणी एक। आदि करोनि ब्रह्मादिक ।।तु.गा.०७८४.००२।।
नाहीं विठ्ठल जया ठावा। तोही डोळां न पहावा।।तु.गा.०७८४.००३।।
तुका म्हणे नाहीं। त्याची भीड मज कांहीं।।तु.गा.०७८४.००४।।
जयाचिये वाचे नये हा विठ्ठल। त्याचे मज बोल नावडती।।तु.गा.०७८५.००१।।
शत्रु तो म्यां केला न म्हणे आपुला। जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें।।तु.गा.०७८५.००२।।
जयासी नावडे विठोबाचें नाम। तो जाणा अधम तुका म्हणे।।तु.गा.०७८५.००३।।
विठ्ठलावांचूनि ब्रह्म जें बोलती । वचन तें संतीं मानूं नये ।।तु.गा.०७८६.००१।।
विठ्ठलावांचूनि ज्या ज्या उपासना । अवघाचि जाणा श्रमचि तो ।।तु.गा.०७८६.००२।।
विठ्ठलावांचूनि सांगतील गोष्टी । वायां तें हिंपुटी होती जाणा ।।तु.गा.०७८६.००३।।
विठ्ठलावांचूनि जें कांहीं जाणती । तितुल्या वित्पति वाउगीं या।।तु.गा.०७८६.००४।।
तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाचि ।।तु.गा.०७८६.००५।।
येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरि जाय ।।तु.गा.०७८७.००१।।
मज न साहे वांकडें । ये विठ्ठलकथेपुढें ।।तु.गा.०७८७.००२।।
ऐकोनि मरसी वृथा । जंव आहेसी तूं जीता ।।तु.गा.०७८७.००३।।
हुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड ।।तु.गा.०७८७.००४।।
पुसेल कोणी त्यास । जा रे करीं उपदेश ।।तु.गा.०७८७.००५।।
आम्ही विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर ।।तु.गा.०७८७.००६।।
घेऊं पुढती जन्म । वाणूं कीर्ति मुखें नाम ।।तु.गा.०७८७.००७।।

तुका म्हणे मुक्ती। नाहीं आसचि ये चित्तीं ।।तु.गा.०७८७.००८।।
हेंचि सर्वसुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वायां ।।तु.गा.०७८८.००१।।
हेंचि एक सर्व साधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणे पंथें।।तु.गा.०७८८.००२।।
न लगती कांहीं तपाचिया राशी । करणें वाराणशी नाना तीर्थे ।।तु.गा.०७८८.००३।।
कल्पना हे तिळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्याच्या ।।तु.गा.०७८८.००४।।
तुका म्हणे देव नामीं नेदी भेटी । म्हणे त्याचे होंटीं कुष्ट होय ।।तु.गा.०७८८.००५।।
आणिक कोणाचा न करीं मी संग । जेणे होय भंग माझ्या चित्ता ।।तु.गा.०७८९.००१।।
विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी । नाइकें मी कानीं आपुलिया ।।तु.गा.०७८९.००२।।
समाधानासाठीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ।।तु.गा.०७८९.००३।।
जिवाहूनि मज तेचि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ।।तु.गा.०७८९.००४।।
तुका म्हणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं बोला ।।तु.गा.०७८९.००५।।
नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ।।तु.गा.०७९०.००१।।
बळिया माझा पंढरीराव । जो ह्या देवांचाही देव ।।तु.गा.०७९०.००२।।
रंडी चंडी शक्ती । मद्यमांस भक्षिती ।।तु.गा.०७९०.००३।।
बहिरव खंडेराव । रोटी सुटीसाठीं देव ।।तु.गा.०७९०.००४।।
गणोबा विक्राळ । लाडुमोदकांचा काळ ।।तु.गा.०७९०.००५।।
मुंजा म्हैसासुरें । हे तों कोण लेखी पोरें ।।तु.गा.०७९०.००६।।
वेताळें फेताळें । जळो त्यांचें तोंड काळे ।।तु.गा.०७९०.००७।।
तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती ।।तु.गा.०७९०.००८।।
माझे अंतरींचें तोचि जाणे एक । वैकुंठनायक पांडुरंग ।।तु.गा.०७९१.००१।।
जीव भाव त्याचे ठेवियेला पायीं । मज चिंता नाहीं कवणेविशीं ।।तु.गा.०७९१.००२।।
सुखसमारंभें संतसमागम । गाऊं वाचे नाम विठोबाचें।।तु.गा.०७९१.००३।।
गातां पुण्य होय आइकतां लाभ । संवसारबंद तुटतील ।।तु.गा.०७९१.००४।।

तुका म्हणे जीव तयासी विकिला । आणीक विठ्ठलाविण नेणें ।।तु.गा.०७९१.००५।।
आणीक मज कांहीं नावडती मात । एका पंढरीनाथावांचूनियां ।।तु.गा.०७९२.००१।।
त्याचीच कथा आवडे कीर्तन । तें मज श्रवण गोड लागे ।।तु.गा.०७९२.००२।।
तुका म्हणे संत म्हणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनीं कांहीं ।।तु.गा.०७९२.००३।।
कोण वेचीं वाणी । आतां क्षुल्लका कारणीं ।।तु.गा.०७९३.००१।।
आतां हेंचि माप करूं । विठ्ठल हृदयांत धरूं ।।तु.गा.०७९३.००२।।
नेदाविया वृत्ति । आतां उठोंचि बहुती ।।तु.गा.०७९३.००३।।
उपदेश लोकां । करूनी वेडा होतो तुका ।।तु.गा.०७९३.००४।।
विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मुळ ।।तु.गा.०७९४.००१।।
भाग्यवंता छंद मनीं । कोड कानीं ऐकती ।।तु.गा.०७९४.००२।।
विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ।।तु.गा.०७९४.००३।।
तुका म्हणे भलते याती । विठ्ठल चित्तीं तो धन्य ।।तु.गा.०७९४.००४।।
विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ।।तु.गा.०७९५.००१।।
विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ।।तु.गा.०७९५.००२।।
विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ।।तु.गा.०७९५.००३।।
विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ।।तु.गा.०७९५.००४।।
विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ।।तु.गा.०७९६.००१।।
आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपुळिया धन ।।तु.गा.०७९६.००२।।
विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत हे संजीवनी ।।तु.गा.०७९६.००३।।
रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ।।तु.गा.०७९६.००४।।
विठ्ठल आमुचा निजाचा । सज्जन सोयरा जीवांचा ।।तु.गा.०७९७.००१।।
माय बाप चुलता बंधु । अवघा तुजशीं संबंधु ।।तु.गा.०७९७.००२।।
उभय कुळीं साक्ष । तूंचि माझा मातुळपक्ष ।।तु.गा.०७९७.००३।।

समर्पिली काया । तुका म्हणे पंढरीराया ।।तु.गा.०७९७.००४।।
विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल या चित्तीं बैसलासे ।।तु.गा.०७९८.००१।।
विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे छाया माझी मज ।।तु.गा.०७९८.००२।।
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ।।तु.गा.०७९८.००३।।
सकळां इंद्रियां मन हें प्रधान । तें ही करी ध्यान विठोबाचें ।।तु.गा.०७९८.००४।।
तुका म्हणे या हो विठ्ठलासी आतां । नयें विसंबतां माझें मज ।।तु.गा.०७९८.००५।।
विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पहावा विटेवरी ।।तु.गा.०७९९.००१।।
अनाथांचा बंधु विठ्ठल कृपासिंधु । तोडी भवबंधु यमपाश ।।तु.गा.०७९९.००२।।
तोचि शरणागतां विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या संतांसमागमें ।।तु.गा.०७९९.००३।।
विठ्ठल गुणनिधि विठ्ठल सर्व सिद्धि । लागली समाधि विठ्ठल नामें ।।तु.गा.०७९९.००४।।
विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख । गोडावलें मुख तुका म्हणे ।।तु.गा.०७९९.००५।।
विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ।।तु.गा.०८००.००१।।
विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं।।तु.गा.०८००.००२।।
विठ्ठल जागृति स्वप्नसुषुप्ती । आन दुजें नेणती विठ्ठलाविण ।।तु.गा.०८००.००३।।
भूषण अळंकार सुखाचे प्रकार । विठ्ठल निर्धार जयां नरां ।।तु.गा.०८००.००४।।
तुका म्हणे तेहीं विठ्ठलचि जाले । संकल्प मुराले दुजपणें ।।तु.गा.०८००.००५।।
जिवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळां ।।तु.गा.०८०१.००१।।
आम्हां विठ्ठल एक देव । येर अवघेचि वाव ।।तु.गा.०८०१.००२।।
पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटीं ।।तु.गा.०८०१.००३।।
तुका म्हणे चित्तीं । वाहूं रखमाईचा पती ।।तु.गा.०८०१.००४।।
एक धरिला चित्तीं । आम्हीं रखुमाईचा पती ।।तु.गा.०८०२.००१।।
तेणें जालें अवघें काम । निवारला भवभ्रम ।।तु.गा.०८०२.००२।।
परद्रव्य परनारी । जाली विषाचिये परि ।।तु.गा.०८०२.००३।।

तुका म्हणे फार । नाहीं लागत व्यवहार ।।तु.गा.०८०२.००४।।
आम्हां अवघें भांडवल । येक विठ्ठल एकला ।।तु.गा.०८०३.००१।।
कायावाचामनोभावें । येथें जीवें वेंचलों ।।तु.गा.०८०३.००२।।
परतें कांहीं नेणें दुजें । तत्त्वबीज पाऊलें ।।तु.गा.०८०३.००३।।
तुका म्हणे संतसंगें । रंगें येणें रंगलों ।।तु.गा.०८०३.००४।।
आम्हां हेंचि भांडवल । म्हणों विठ्ठल विठ्ठल ।।तु.गा.०८०४.००१।।
सुखें तरों भवनदी । संगें वैष्णवांची मांदी ।।तु.गा.०८०४.००२।।
बाखराचें बाण । सांडुं हें जेवूं जेवण ।।तु.गा.०८०४.००३।।
नलगे वारंवार । तुका म्हणे वेरझार ।।तु.गा.०८०४.००४।।
आणीक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ।।तु.गा.०८०५.००१।।
मुखा तेंचि गोडी श्रवणीं आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ।।तु.गा.०८०५.००२।।
जये पदीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ।।तु.गा.०८०५.००३।।
आणिकाचें मज म्हणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें ।।तु.गा.०८०५.००४।।
तुका म्हणे मज तूंचि आवडसी । सर्वभावेविसीं पांडुरंगा ।।तु.गा.०८०५.००५।।
आम्ही नामाचें धारक । नेणों प्रकार आणीक । सर्व भावें एक । विठ्ठलचि प्रमाण ।।तु.गा.०८०६.००१।।
न लगे जाणावें नेणावें । गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचें संगती ।।तु.गा.०८०६.००२।।
भावबळें घालूं कास । लज्जा चिंता दवडूं आस । पायीं निजध्यास । म्हणवूं दास विष्णूचे ।।तु.गा.०८०६.००३।।
भय नाहीं जन्म घेतां । मोक्षसुखा हाणों लाता । तुका म्हणे सत्ता । करूं निकट सेवेची ।।तु.गा.०८०६.००४।।
एक गावें आम्ही विठोबाचें नाम । आणिकांपें काम नाहीं आतां ।।तु.गा.०८०७.००१।।
मोडूनियां वाटा सुक्ष्म दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा ।।तु.गा.०८०७.००२।।
लावूनि मृदंग श्रुतिटाळघोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ।।तु.गा.०८०७.००३।।
तुका म्हणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रें ।।तु.गा.०८०७.००४।।
आम्हांसी तों नाहीं आणीक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ।।तु.गा.०८०८.००१।।

घालूनियां कास करितो कैवाड । वागों नेदीं आड कळिकाळासी ।।तु.गा.०८०८.००२।।
अबद्ध वाकुडें जैशातैशापरी । वाचे हरि हरि उच्चारावें ।।तु.गा.०८०८.००३।।
तुका म्हणे आम्हां सांपडलें निज । सकळ हें बीज पुराणाचें ।।तु.गा.०८०८.००४।।
माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायाशीं न विसंबें ।।तु.गा.०८०९.००१।।
विसरेना रूप क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ति सांवळी तें ।।तु.गा.०८०९.००२।।
विसरतां हरी क्षणएक घडी । अंतरेल जोडी लक्षलाभ ।।तु.गा.०८०९.००३।।
तुका म्हणे माझ्या विठोबाचे पाय । संजीवनी आहे हृदयामाजीं ।।तु.गा.०८०९.००४।।
जतन करीन जीवें । शुद्ध भावें करूनी ।।तु.गा.०८१०.००१।।
विठ्ठल विठ्ठल हें धन । जीवन अंतकाळींचें ।।तु.गा.०८१०.००२।।
वर्दळ हें संचित सारूं । बरवा करूं उदिम हा ।।तु.गा.०८१०.००३।।
तुका म्हणे हृदय पेटीं । ये संपुटीं सांठवूं ।।तु.गा.०८१०.००४।।
यथाविधि पुजा करी । सामोग्री तोवरी हे नाहीं ।।तु.गा.०८११.००१।।
आतां माझा सर्वभार । तूं दातार चालविता ।।तु.गा.०८११.००२।।
मंगळ तें तुम्हीं जाणा । नारायणा काय तें ।।तु.गा.०८११.००३।।
तुका म्हणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ।।तु.गा.०८११.००४।।
सुखाची वस्ती जाली माझे जीवीं । तुमच्या गोसावी कृपादानें ।।तु.गा.०८१२.००१।।
रूप वेळोवेळां आठवीं अंतरीं । बैसोनि जिव्हारीं राहिलें तें ।।तु.गा.०८१२.००२।।
विसावलें मन विटलें प्रपंचा । गोडावली वाचा येणें रसें ।।तु.गा.०८१२.००३।।
तुका म्हणे कांहीं नाठवेसें झालें । दुसरें विठ्ठलें मज आतां ।।तु.गा.०८१२.००४।।
काम क्रोध आम्हीं वाहिलें विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ।।तु.गा.०८१३.००१।।
आतां कोण पाहे मागें परतोनि । गेले हारपोनि देहभाव ।।तु.गा.०८१३.००२।।
रिद्धिसिद्धी सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ।।तु.गा.०८१३.००३।।
तुका म्हणे आम्ही विठोबाचे दास । करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ।।तु.गा.०८१३.००४।।

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ।।तु.गा.०८१४.००१।।
पढियें देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ।।तु.गा.०८१४.००२।।
मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ।।तु.गा.०८१४.००३।।
योगक्षेम त्याचें जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ।।तु.गा.०८१४.००४।।
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनी ।।तु.गा.०८१४.००५।।
काय उणें आम्हां विठोबाचें पायीं । नाहीं ऐसें काई येथें एक ।।तु.गा.०८१५.००१।।
तें हें भोंवताले ठायीं वांटूं मन । बराडी करून दारोदारीं ।।तु.गा.०८१५.००२।।
कोण बळी माझ्या विठोबावेगळा । आणीक आगळा दुजा सांगा ।।तु.गा.०८१५.००३।।
तुका म्हणे मोक्ष विठोबाचें गांवीं । फुकाचीं लुटावीं भांडारें तीं ।।तु.गा.०८१५.००४।।
पाहोनि अधिकार । तैसें बोलावें उत्तर ।।तु.गा.०८१६.००१।।
काय वाउगी घसघस । आम्ही विठोबाचें दास ।।तु.गा.०८१६.००२।।
आम्ही जाणों एका देवा । जैसी तैसी करूं सेवा ।।तु.गा.०८१६.००३।।
तुका म्हणे भावें । माझें पुढें पडेल ठावें ।।तु.गा.०८१६.००४।।
आम्हां विष्णुदासां हेंचि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ।।तु.गा.०८१७.००१।।
वाणी नाहीं घ्यावें आपुलिया हातें । करोनियां चित्तें समाधान ।।तु.गा.०८१७.००२।।
तुका म्हणे द्रव्य मेळविलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ।।तु.गा.०८१७.००३।।
आम्ही विठ्ठलाचें दास झालों आतां । न चलेचि सत्ता आणिकांची ।।तु.गा.०८१८.००१।।
नावरे तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ।।तु.गा.०८१८.००२।।
कोठें तुज ठाव घ्यावयासी धांवा । मना तूं विसावा घेईं आतां ।।तु.गा.०८१८.००३।।
इंद्रियांची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार चाली तुज ।।तु.गा.०८१८.००४।।
तुका म्हणे आम्ही जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ।।तु.गा.०८१८.००५।।
सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणीक तें वर्म नेणें कांहीं ।।तु.गा.०८१९.००१।।
काय जाणों संतां निरविलें देवें । करिती या भावें कृपा मज ।।तु.गा.०८१९.००२।।

तुका म्हणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळों यावा ।।तु.गा.०८१९.००३ ।।
माझें आराधन । पंढरपुरींचें निधान ।।तु.गा.०८२०.००१ ।।
तया एकाविण दुजें । कांहीं नेणें पंढरीराजें ।।तु.गा.०८२०.००२ ।।
दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ।।तु.गा.०८२०.००३ ।।
तुका म्हणे आतां । नव्हे पालट सर्वथा ।।तु.गा.०८२०.००४ ।।
माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हाइली ।।तु.गा.०८२१.००१ ।।
कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ।।तु.गा.०८२१.००२ ।।
केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ।।तु.गा.०८२१.००३ ।।
तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ।।तु.गा.०८२१.००४ ।।
सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ।।तु.गा.०८२२.००१ ।।
गायें नाचें एवढें जाणें । विठ्ठल म्हणे निर्लज्ज ।।तु.गा.०८२२.००२ ।।
अवघें माझें एवढें धन । साधनही सकळ ।।तु.गा.०८२२.००३ ।।
तुका म्हणे पायां पडे । तुमच्या कोडें संतांच्या ।।तु.गा.०८२२.००४ ।।
येउनि संसारीं । मी तों एक जाणें हरी ।।तु.गा.०८२३.००१ ।।
नेणें आणिक कांहीं धंदा । नित्य ध्यातसें गोविंदा ।।तु.गा.०८२३.००२ ।।
कामक्रोधलोभ स्वार्थ । अवघा माझा पंढरिनाथ ।।तु.गा.०८२३.००३ ।।
तुका म्हणे एक । धणी विठ्ठल मी सेवक ।।तु.गा.०८२३.००४ ।।
रुची रुची घेऊं गोडी । प्रेम सुख जाली जोडी ।।तु.गा.०८२४.००१ ।।
काळ जाऊं नेदूं वांयां । चिंतूं विठोबाच्या पायां ।।तु.गा.०८२४.००२ ।।
करूं भजन भोजन । धणी घेऊं नारायण ।।तु.गा.०८२४.००३ ।।
तुका म्हणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ।।तु.गा.०८२४.००४ ।।
आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां निजध्येय योगियांचें ।।तु.गा.०८२५.००१ ।।
ते हे समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ।।तु.गा.०८२५.००२ ।।

पुराणासी वाड श्रुति नेणती पार । तें झालें साकार पुंडलिका ।।तु.गा.०८२५.००३।।
तुका म्हणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग ।।तु.गा.०८२५.००४।।
वाट पाहे बाहे निढळीं ठेवूनियां हात । पंढरीचें वाटे दृष्टि लागलेंसें चित्त ।।तु.गा.०८२६.००१।।
कईं येतां देखेन माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरूनियां माप ।।तु.गा.०८२६.००२।।
डावा डोळा लवे उजवी स्फुरतसे बाहे । मन उताविळ भाव सांडूनियां देहे ।।तु.गा.०८२६.००३।।
सुखसेज गोड चित्तीं न लगे आणीक । नाठवे घरदार तहान पळाली भूक ।।तु.गा.०८२६.००४।।
तुका म्हणे धन्य ऐसा दिवस तो कोण । पंढरीचें वाटे येतां मूळ देखेन ।।तु.गा.०८२६.००५।।
कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावीं हरी ।।तु.गा.०८२७.००१।।
ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावीं डोळां ।।तु.गा.०८२७.००२।।
कटीं पितांबर कास मिरवली । दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ।।तु.गा.०८२७.००३।।
गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ।।तु.गा.०८२७.००४।।
झुरोनि पांझरा होऊं पाहें आतां । येईं पंढरिनाथा भेटावया ।।तु.गा.०८२७.००५।।
तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनंति उदास करूं नये ।।तु.गा.०८२७.००६।।
वाटुली पाहतां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं वो डोळा ।।तु.गा.०८२८.००१।।
तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ।।तु.गा.०८२८.००२।।
कां बा मोकलिलें कोणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें ।।तु.गा.०८२८.००३।।
तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ।।तु.गा.०८२८.००४।।
भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे होसी माये ।।तु.गा.०८२९.००१।।
पडिला विसर माझा काय गुणें । कपाळ हें उणें काय करूं ।।तु.गा.०८२९.००२।।
तुका म्हणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देईं ।।तु.गा.०८२९.००३।।
तुजविण मज कोण वो सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगा ।।तु.गा.०८३०.००१।।
लागलीसे आस पहातुसें वास । रात्रीं वो दिवस लेखीं बोटीं ।।तु.गा.०८३०.००२।।
काम गोड मज नलगे हा धंदा । तुका म्हणे सदा हेंचि ध्यान ।।तु.गा.०८३०.००३।।

न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ।।तु.गा.०८३१.००१।।
लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या ।।तु.गा.०८३१.००२।।
जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझें नाहीं मनीं मानसीं हें ।।तु.गा.०८३१.००३।।
तुका म्हणे नको रागेजूं विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ।।तु.गा.०८३१.००४।।
धांव घालीं आई । आतां पाहातीस काई ।।तु.गा.०८३२.००१।।
धीर नाहीं माझें पोटी । जालों वियोगें हिंपुटीं ।।तु.गा.०८३२.००२।।
करावें सीतळ । बहु जाली हळहळ ।।तु.गा.०८३२.००३।।
तुका म्हणे डोई । कईं ठेवीन हे पायीं ।।तु.गा.०८३२.००४।।
दर्शनाची आस । आतां न साहे उदास ।।तु.गा.०८३३.००१।।
जीव आला पायांपाशीं । येथें असें कलिवरेसीं ।।तु.गा.०८३३.००२।।
कांहींच नाठवे । ठायीं बैसलें नुठवे ।।तु.गा.०८३३.००३।।
जीव असतां पायीं । तुका ठकावला ठायीं ।।तु.गा.०८३३.००४।।
कान्हया रे जगजेठी । देईं भेटी एक वेळे ।।तु.गा.०८३४.००१।।
काय मोकलिलें वनीं । सावजांनीं वेढिलें ।।तु.गा.०८३४.००२।।
येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ।।तु.गा.०८३४.००३।।
तुका म्हणे पाहिलें मागें । एवढ्या वेगें अंतरला ।।तु.गा.०८३४.००४।।
जये ठायीं आवडी ठेली । मज ते बोली न संडे ।।तु.गा.०८३५.००१।।
पुरवावें जीवींचें कोड । भेटी गोड तुज मज ।।तु.गा.०८३५.००२।।
आणियलें येथ वरी । रूप दुरी न करावें ।।तु.गा.०८३५.००३।।
तुका म्हणे नारायणा । सेवाहीना धिग् वृत्ति ।।तु.गा.०८३५.००४।।
आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांची ।।तु.गा.०८३६.००१।।
यासी तुम्ही कृपावंता । माझी चिंता असों द्या ।।तु.गा.०८३६.००२।।
तळमळ करी चित्त । अखंडित वियोगें ।।तु.गा.०८३६.००३।।

तुका म्हणे पंढरीनाथा । जाणे व्यथा अंतरिंची ।।तु.गा.०८३६.००४।।
भेटीची आवडी उताविळ मन । लागलेंसें ध्यान जीवीं जीवा ।।तु.गा.०८३७.००१।।
आतां आवडीचा पुरवा सोहळा । येऊनि गोपाळा क्षेम देईं ।।तु.गा.०८३७.००२।।
नेत्र उन्मळित राहिले ताटस्थी । गंगा अश्रुपाती वहावली ।।तु.गा.०८३७.००३।।
तुका म्हणे तुम्ही करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ।।तु.गा.०८३७.००४।।
मी तंव बैसलों धरूनियां आस । न करीं उदास पांडुरंगा ।।तु.गा.०८३८.००१।।
नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी झालों दास ।।तु.गा.०८३८.००२।।
भुकेलों कृपेच्या वचनाकारणें । आशा नारायणें पुरवावी ।।तु.गा.०८३८.००३।।
तुका म्हणे येऊनियां देईं भेटी । कुरवाळुनि पोटीं धरीं मज ।।तु.गा.०८३८.००४।।
धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोसी ।।तु.गा.०८३९.००१।।
संकल्प तो नाहीं दुजा । महाराजाविण तो ।।तु.गा.०८३९.००२।।
पायांवरी ठेविन भाळ । येणें सकळ पावलों ।।तु.गा.०८३९.००३।।
तुका म्हणे डोळेभरी । पाहीन हरी श्रीमुख ।।तु.गा.०८३९.००४।।
भेटीलागीं पंढरीनाथा । जीवा लागली तळमळ व्यथा ।।तु.गा.०८४०.००१।।
कधीं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ।।तु.गा.०८४०.००२।।
सीणलें माझें मन । वाट पाहातां लोचन ।।तु.गा.०८४०.००३।।
तुका म्हणे भूक । तुझें पहावया मुख ।।तु.गा.०८४०.००४।।
भेटीवांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुलती याजसाठीं ।।तु.गा.०८४१.००१।।
भेटोनियां बोलें आवडीचें गुज । आनंदाच्या भोजें जेवूं संगें ।।तु.गा.०८४१.००२।।
मायलेंकरासी नाहीं दुजी परि । जेवूं बरोबरी बैसोनियां ।।तु.गा.०८४१.००३।।
तुका म्हणे ऐसें अंतरींचें आर्त । यावें जी त्वरित नारायणा ।।तु.गा.०८४१.००४।।
कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनि पाहे ।।तु.गा.०८४२.००१।।
तैसें जालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ।।तु.गा.०८४२.००२।।

चुकलिया माय । बाळा हुरुहुरु पाहे ।।तु.गा.०८४२.००३।।
जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ।।तु.गा.०८४२.००४।।
कीर्तन ऐकावया भुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ।।तु.गा.०८४३.००१।।
उदित हें भाग्य होईल कोणे काळीं । चित्त तळमळी म्हणऊनि ।।तु.गा.०८४३.००२।।
उताविळ बाह्या भेटिलागीं दंड । लोटांगणीं धड जावयासी ।।तु.गा.०८४३.००३।।
तुका म्हणे माथा ठेवीन चरणीं । होतील पारणीं इंद्रियांचीं ।।तु.गा.०८४३.००४।।
कां हो एथें काळ आला आम्हां आड । तुम्हांपाशीं नाड करावया ।।तु.गा.०८४४.००१।।
कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ।।तु.गा.०८४४.००२।।
कां हो उपजेना द्यावी ऐसी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ।।तु.गा.०८४४.००३।।
पाप फार किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ।।तु.गा.०८४४.००४।।
काय जालें देणें निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं ।।तु.गा.०८४४.००५।।
तुका म्हणे कां रे ऐसी केली गोंवी । तुझी माझी ठेवी निवडुनी ।।तु.गा.०८४४.००६।।
पंढरीची वाट पाहें निरंतर । निढळावरी कर ठेवूनियां ।।तु.गा.०८४५.००१।।
जातियां निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ।।तु.गा.०८४५.००२।।
पैल कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिकें चतुर्भुज ।।तु.गा.०८४५.००३।।
तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ।।तु.गा.०८४५.००४।।
काय तुझें वेचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ।।तु.गा.०८४६.००१।।
काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोंनि राहिलासी ।।तु.गा.०८४६.००२।।
काय तुझें आम्हां करावें वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ।।तु.गा.०८४६.००३।।
तुका म्हणे तुझी न लगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ।।तु.गा.०८४६.००४।।
वाट पाहे हरि कां न ये अझुनि । निष्ठुर का मनीं धरियेलें ।।तु.गा.०८४७.००१।।
काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ।।तु.गा.०८४७.००२।।
नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ।।तु.गा.०८४७.००३।।

नाहीं कळों आलें अंतरा अंतर । कृपावंता फार ऐकतों ।।तु.गा.०८४७.००४।।
बहुतां दिसांचें राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवाळिलें ।।तु.गा.०८४७.००५।।
तुका म्हणे देईं एक वेळां भेटी । शीतळ हें पोटीं होईल मग ।।तु.गा.०८४७.००६।।
नाहीं बळ योगअभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ।।तु.गा.०८४८.००१।।
तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगीं । नाहीं बळ अंगीं भजनाचें ।।तु.गा.०८४८.००२।।
काय पांडुरंगा करूं बा विचार । झुरतें अंतर भेटावया ।।तु.गा.०८४८.००३।।
तुका म्हणे सांगा वडिलपणें बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणा ।।तु.गा.०८४८.००४।।
न लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनियां ।।तु.गा.०८४९.००१।।
म्हणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणिकांचें ।।तु.गा.०८४९.००२।।
काय तीं महत्त्वें करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ।।तु.गा.०८४९.००३।।
तुका म्हणे तुज भेटल्यावांचून । न राहें त्याहून होईन वेडा ।।तु.गा.०८४९.००४।।
हाचि माझा नेम धरिला हा धंदा । यावरी गोविंदा भेटी द्यावी ।।तु.गा.०८५०.००१।।
हाचि माझा ध्यास सदा सर्व काळ । न्यावयासी मूळ येसी कधीं ।।तु.गा.०८५०.००२।।
डोळियांची भूक पाहतां श्रीमुख । आलिंगनें सुख निवती भुजा ।।तु.गा.०८५०.००३।।
बहु चित्त ओढे तयाचिये सोई । पुरेल हा कईं नवस नेणों ।।तु.गा.०८५०.००४।।
बहु बहु काळ झालों कासावीस । वाहिलें बहुवस कलेवर ।।तु.गा.०८५०.००५।।
तुका म्हणे आतां पडावें हें ओझें । पांडुरंगा माझे इयावरी ।।तु.गा.०८५०.००६।।
स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ।।तु.गा.०८५१.००१।।
दुखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुजपासीं ।।तु.गा.०८५१.००२।।
रिद्धी सिद्धी मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस यांची जीवें ।।तु.गा.०८५१.००३।।
तुका म्हणे एक वेळ देईं भेटी । वोरसोनि पोटीं आळिंगावें ।।तु.गा.०८५१.००४।।
नेणपणें केला नाहीं हा बोभाट । आतां आली वाट कळों खरी ।।तु.गा.०८५२.००१।।
आतां बहु शीघ्र यावें लवकरी । वाट पाहें हरी भेटी देईं ।।तु.गा.०८५२.००२।।

समर्थाच्या बाळा करुणेचें भाषण । तरी त्याची कोण नांदणूक ।।तु.गा.०८५२.००३।।
तुका म्हणे बहु बोलिले बडिवार । पडिलें अंतर लौकिकीं तें ।।तु.गा.०८५२.००४।।
भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ।।तु.गा.०८५३.००१।।
पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ।।तु.गा.०८५३.००२।।
दिवाळीच्या मुळा लेकी आसावली । पाहातसे वाटुली पंढरीची ।।तु.गा.०८५३.००३।।
भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परि माउलीची ।।तु.गा.०८५३.००४।।
तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावीं देवा ।।तु.गा.०८५३.००५।।
आमुची जिवलगें सज्जन सोयरीं । नांदतील तीरीं भिंवरेच्या ।।तु.गा.०८५४.००१।।
तींच माझ्या चित्तीं वसती दिवसराती । भेटावया खंती वाटतसे ।।तु.गा.०८५४.००२।।
संपदा सोहळे सर्व सुख वसे । वैकुंठीं जें नसे सुरवरासी ।।तु.गा.०८५४.००३।।
ज्याच्या नामें पाप दुःख नासे भय । विठ्ठल बाप माय रखुमाई ।।तु.गा.०८५४.००४।।
माझा जीव जीतो अमृत ते कळा । कंठीं वेळोवेळा ध्यात असे ।।तु.गा.०८५४.००५।।
तुका म्हणे वाट पाहातां शिणले । त्या पंथें डोळुले पंढरीच्या ।।तु.गा.०८५४.००६।।
लोकमान देहसुख । संपत्ति उपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिया भेटीवांचूनि ।।तु.गा.०८५५.००१।।
तरि मज ये भेट । काय ठाकलासी नीट । थोर पुण्यें वीट । तुज दैवेंचि लाधली ।।तु.गा.०८५५.००२।।
काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मायेचें मापाडें । भेटीविण कुडें । तुझिया अवघें मज वाटे ।।तु.गा.०८५५.००३।।
आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार । न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ।।तु.गा.०८५५.००४।।
रिद्धिसिद्धी काय करूं । अथवा आगमविचारू । भेटीविण भारू । तुझिया वाटे मज यांचा ।।तु.गा.०८५५.००५।।
तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीवें । तुका म्हणे द्यावें । दरुषण पायांचें ।।तु.गा.०८५५.००६।।
मातेविण बाळा । आणीक न माने सोहळा ।।तु.गा.०८५६.००१।।
तैसें जालें माझ्या चित्ता । तुजविण पंढरीनाथा ।।तु.गा.०८५६.००२।।
वाट पाहे मेघा बिंदू । नेघे चातक सरिता सिंधू ।।तु.गा.०८५६.००३।।
सारसाशीं निशीं । ध्यान रवीच्या प्रकाशीं ।।तु.गा.०८५६.००४।।

जीवनावीण मत्स्य । जैसें धेनुलागीं वत्स ।।तु.गा.०८५६.००५।।
पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्तमानें ।।तु.गा.०८५६.००६।।
कृपणाचें धन । लोभ्यालागीं जैसें मन ।।तु.गा.०८५६.००७।।
तुका म्हणे काय । तुजविण प्राण राहे ।।तु.गा.०८५६.००८।।
सर्वभावें आलों तुजचि शरण । कायावाचामनसहित देवा ।।तु.गा.०८५७.००१।।
आणीक दुसरें नये माझ्या मना । राहिली वासना तुझ्या पायीं ।।तु.गा.०८५७.००२।।
माझिये जीवींचें कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण दुजें ।।तु.गा.०८५७.००३।।
तुझें आम्ही दास आमुचा तूं ऋणी । चालत दुरुनी आलें मागें ।।तु.गा.०८५७.००४।।
तुका म्हणे आतां घेतलें धरणें । हिशेबाकारणें भेटी देई ।।तु.गा.०८५७.००५।।
दंभें कीर्ती पोट भरे मानी जन । स्वहितकारण नव्हे कांहीं ।।तु.गा.०८५८.००१।।
अंतरतीं तुझें पाय मज दुरी । धरितां हे थोरी जाणिवेची ।।तु.गा.०८५८.००२।।
पिंडाच्या पाळणें धांवती विकार । आहे दावेदार मजमाजीं ।।तु.गा.०८५८.००३।।
कैसा करूं घात आपुला आपण । धरूनि गुमान लोकलाज ।।तु.गा.०८५८.००४।।
तुका म्हणे मज दावीं तो सोहळा । देखें पाय डोळां तुझें देवा ।।तु.गा.०८५८.००५।।
डोळियां पाझर कंठ माझा दाटी । येईं वो देईं भेटी पांडुरंगे ।।तु.गा.०८५९.००१।।
बहु दिस टाकिलें निरास कां केलें । कोठें वो गुंतलें चित्त तुझें ।।तु.गा.०८५९.००२।।
बहु धंदा तुज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ।।तु.गा.०८५९.००३।।
पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं धाडी ।।तु.गा.०८५९.००४।।
तुजविण कोण सांवाधांवा करी । येईं वो झडकरी पांडुरंगे ।।तु.गा.०८५९.००५।।
काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळुवा परी विसरलासी ।।तु.गा.०८५९.००६।।
एक वेळे माझा धरूनि आठव । तुका म्हणे येवो न्यावयासी ।।तु.गा.०८५९.००७।।
कोण्या काळें येईल मना । नारायणा तुमचिया ।।तु.गा.०८६०.००१।।
माझा करणें अंगीकार । सर्व भार फेडूनी ।।तु.गा.०८६०.००२।।

लागली ये तळमळ चित्ता । तरी दुश्चिता संसारीं ।।तु.गा.०८६०.००३।।
मुखाचिच पाहे वास । मागें दास सांभाळी ।।तु.गा.०८६०.००४।।
इच्छा पूर्ण जाल्याविण । कैसा सीण वारेल ।।तु.गा.०८६०.००५।।
लाहो काया मनें वाचा । दिवसाच्या भेटीचा ।।तु.गा.०८६०.००६।।
कांटाळा तो न धरावा । तुम्ही देवा दासाचा ।।तु.गा.०८६०.००७।।
तुका म्हणे माझे वेळे । न कळे कां हे उफराटें ।।तु.गा.०८६०.००८।।
बेगडाचा रंग राहे कोण काळ । अंग हें पितळ न देखतां ।।तु.गा.०८६१.००१।।
माझें चित्त मज जवळीच ग्वाही । तुज मज नाहीं भेटी ऐसें ।।तु.गा.०८६१.००२।।
दासीसुता नाहीं पितियाचा ठाव । अवघेंचि वाव सोंग त्याचें ।।तु.गा.०८६१.००३।।
तुका म्हणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येईल कळों ।।तु.गा.०८६१.००४।।
तुमची तों भेटी नव्हे ऐसी जाली । कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ।।तु.गा.०८६२.००१।।
आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणासवें ।।तु.गा.०८६२.००२।।
तुम्हां निमित्यासी सांपडलें अंग । नेदावा हा संग विचारिलें ।।तु.गा.०८६२.००३।।
तुका म्हणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाचीच होती ।।तु.गा.०८६२.००४।।
तुझा म्हणवून तुज नेणें । ऐसें काय माझें जिणें ।।तु.गा.०८६३.००१।।
तरि मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ।।तु.गा.०८६३.००२।।
काय शब्दचि ऐकिला । भेटी नव्हतां गा विठ्ठला ।।तु.गा.०८६३.००३।।
तुका म्हणे आतां । अभय देईं पंढरिनाथा ।।तु.गा.०८६३.००४।।
उद्धवअक्रूरासी । आणीक व्यासअंबऋषी । रुक्मांगदा प्रल्हादासी । दाविलें तें दाखवी।।तु.गा.०८६४.००१।।
तरि मी पाहेन पाहेन । तुझें श्रीमुखचरण । उताविळ मन । तयाकारणें तेथें ।।तु.गा.०८६४.००२।।
जनका श्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी । विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ।।तु.गा.०८६४.००३।।
पांडवां आकांतीं । तेथें पावसी स्मरती । घातलें द्रौपदी । लागीं बिरडें चोळीचें ।।तु.गा.०८६४.००४।।
करी गोपींचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख । दावीं तेंचि मुख । दृष्टी माझ्या आपुलें ।।तु.गा.०८६४.००५।।

तरि तूं अनाथांचा दाता । मागतियां शरणागतां । तुका म्हणे आतां । कोड पुरवी हें माझें ।।तु.गा.०८६४.००६।।

मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ।।तु.गा.०८६५.००१।।

मज भक्तिची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ।।तु.गा.०८६५.००२।।

आपल्या प्रकारा । करा जतन दातारा ।।तु.गा.०८६५.००३।।

तुका म्हणे भेटी । पुरे एकचि शेवटीं ।।तु.गा.०८६५.००४।।

नमो विश्वरूपा विष्णु मायबापा । अपारा अमुपा पांडुरंगा ।।तु.गा.०८६६.००१।।

विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ।।तु.गा.०८६६.००२।।

तुझी स्तुति वेद करितां भागला । निवांतचि ठेला नेति नेति ।।तु.गा.०८६६.००३।।

ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां तुझें गुण न सरती ।।तु.गा.०८६६.००४।।

तुका म्हणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ति देवा ।।तु.गा.०८६६.००५।।

तुज ऐसा कोणी न देखे उदार । अभयदानशूर पांडुरंगा ।।तु.गा.०८६७.००१।।

शरण येती त्यांचे न विचारिसी दोष । न मागतां त्यांस अढळ देसी ।।तु.गा.०८६७.००२।।

धांवसी आडणी ऐकोनियां धांवा । कइवारें देवा भक्तांचिया ।।तु.गा.०८६७.००३।।

दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी । नामासाठीं हरि आपुलिया ।।तु.गा.०८६७.००४।।

तुका म्हणे तुज वाणूं कैशा परी । एक मुख हरी आयुष्य थोडें ।।तु.गा.०८६७.००५।।

उदार कृपाळ अनाथांचा नाथ । ऐकसी मात शरणागतां ।।तु.गा.०८६८.००१।।

सर्व भार माथां चालविसी त्यांचा । अनुसरले वाचा काया मनें ।।तु.गा.०८६८.००२।।

पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ।।तु.गा.०८६८.००३।।

चालतांही पंथ सांभाळीसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ।।तु.गा.०८६८.००४।।

तुका म्हणे चिंता नाहीं तुझ्या दासां । तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ।।तु.गा.०८६८.००५।।

यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी ।।तु.गा.०८६९.००१।।

वेदश्रुति तुज नेणती कोणी । चोवीस ठेंगणीं धांडोळिता ।।तु.गा.०८६९.००२।।

आतां मज क्षमा करावें तें देवा । सलगी ते केशवा बोलियेलों ।।तु.गा.०८६९.००३।।

सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न कळे हा पार वेदश्रुतीं ।।तु.गा.०८६९.००४।।
तो आम्हीं भावें केलासी लहान । ठेवोनियां नांवें पाचारितों ।।तु.गा.०८६९.००५।।
सहस्रमुखें शेष सीणला स्तवितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला ।।तु.गा.०८६९.००६।।
तेथें माझी देहबुद्धि ते काई । थोर मी अन्यायी तुका म्हणे ।।तु.गा.०८६९.००७।।
अनंताचे मुखीं होसील गाइला । अमुप विठ्ठला दास तुम्हां ।।तु.गा.०८७०.००१।।
माझें कोठें आलें होईल विचारा । तरीच अव्हेरा योग्य झालों ।।तु.गा.०८७०.००२।।
सर्व काळ तुम्ही असा जी संपन्न । चतुरा नारायण शिरोमणि ।।तु.गा.०८७०.००३।।
तुका म्हणे असें कलियुगींचे जीव । तरी नये कींव बहुपापी ।।तु.गा.०८७०.००४।।
उदारा कृपाळा पतितपावना । ब्रिदें नारायणा साच तुझीं ।।तु.गा.०८७१.००१।।
वर्णिलासी जैसा जाणतां नेणतां । तैसा तूं अनंता साच होसी ।।तु.गा.०८७१.००२।।
दैत्यां काळ भक्ता मेघश्याममूर्ति । चतुर्भुज हातीं शंख चक्र ।।तु.गा.०८७१.००३।।
काम इच्छा तया तैसा होसी रानीं । यशोदेच्या स्तनीं पान करी ।।तु.गा.०८७१.००४।।
होऊनि सकळ कांहींच न होसी । तुका म्हणे यासी वेद ग्वाही ।।तु.गा.०८७१.००५।।
जन हें सुखाचे दिल्या घेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी ।।तु.गा.०८७२.००१।।
जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनियां पळती रांडापोरें ।।तु.गा.०८७२.००२।।
बाइल म्हणे खर मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ।।तु.गा.०८७२.००३।।
तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ।।तु.गा.०८७२.००४।।
मी तों बहु सुखी आनंदभरित । आहें साधुसंतां मेळींकारी ।।तु.गा.०८७३.००१।।
कांहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा । आणीक केशवा तुजविण ।।तु.गा.०८७३.००२।।
नलगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसे ।।तु.गा.०८७३.००३।।
मृत्युलोकीं कोण धरील वासना । पावावया जनासवें दुःख ।।तु.गा.०८७३.००४।।
तुका म्हणे तुझा दास ऐसें लोका । कांहीं सकळिका कळों यावें ।।तु.गा.०८७३.००५।।
आपुले गांवींचें न देखेसें जालें । परदेसी एकलें किती कंठूं ।।तु.गा.०८७४.००१।।

म्हणऊनि पाहें मूळ येतां वाटे । जीवलग भेटे कोणी तरी ।।तु.गा.०८७४.००२।।
पाहतां अवघ्या दिसतील दिशा । सकळही वोसा दृष्टीपुढें ।।तु.गा.०८७४.००३।।
तुका म्हणे कोणी न सांगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ।।तु.गा.०८७४.००४।।
आवडी धरूनि करूं गेलों लाड । भक्ति प्रेमकोड न पुरेचि ।।तु.गा.०८७५.००१।।
म्हणऊनि जीव ठेला आसावोनि । खेद होतो मनी बहुसाल ।।तु.गा.०८७५.००२।।
वेठीऐसें वाटे निर्फळ कारण । शीतळ होऊन खोडावलों ।।तु.गा.०८७५.००३।।
तुका म्हणे सरतें नव्हेंचि पायांपें । बळ केलें पापें नव्हे भेटी ।।तु.गा.०८७५.००४।।
लागों नेदी बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आन ।।तु.गा.०८७६.००१।।
परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानीं ।।तु.गा.०८७६.००२।।
तुका म्हणे याची लाज असे कोणा । साहाकारी दीना ज्याची तया ।।तु.गा.०८७६.००३।।
पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कांहीं देहाकडें नावलोकी ।।तु.गा.०८७७.००१।।
म्हणऊनि मागें कंठीचा सौरस । पावतील नाश विघ्नें पुढें ।।तु.गा.०८७७.००२।।
कृपेच्या कटाक्षें न भें कळिकाळा । येतां येत बळा शक्ती पुढें ।।तु.गा.०८७७.००३।।
तुका म्हणे गुढी आणीन पायापें । होइल तें सोपें नाम तुझें ।।तु.गा.०८७७.००४।।
बोलिलेंचि बोलें पडपडताळूनि । उपजत मनीं नाहीं शंका ।।तु.गा.०८७८.००१।।
बहुतांची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझाविसी ।।तु.गा.०८७८.००२।।
बहुतांच्या भावें वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ।।तु.गा.०८७८.००३।।
तुका म्हणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तो श्रम न वजें वायां ।।तु.गा.०८७८.००४।।
मज त्याची भीड नुल्लंघवे देवा । जो म्हणे केशवा दास तुझा ।।तु.गा.०८७९.००१।।
मज आवडती बहु तैसें जन । करिती कीर्तन कथा तुझी ।।तु.गा.०८७९.००२।।
सांडूनिया लाज नाचेन त्यापुढें । आइकती कोडें नाम तुझें ।।तु.गा.०८७९.००३।।
नलगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ।।तु.गा.०८७९.००४।।
तुका म्हणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित तेंचि करूं ।।तु.गा.०८७९.००५।।

तरी भलें वायां गेलों । जन्मा आलों मागुता ।।तु.गा.०८८०.००१।।
म्हणऊनि ठेलों दास । सावकास निर्भय ।।तु.गा.०८८०.००२।।
उणें पुरें काय माझें । त्याचें ओझें तुम्हासी ।।तु.गा.०८८०.००३।।
सांभाळावें तें म्यां काई । अवो आई विठ्ठले ।।तु.गा.०८८०.००४।।
भोग जया जाइन स्थळा । तुज गोपाळा विसरेना ।।तु.गा.०८८०.००५।।
आपलें म्यां एकसरें । करुनि बरें घेतलें ।।तु.गा.०८८०.००६।।
तुका म्हणे नारायणा । आतां जाणा आपुलें ।।तु.गा.०८८०.००७।।
आहे तें सकळ प्रारब्धाचें हातीं । यावें काकुलती यासी आतां ।।तु.गा.०८८१.००१।।
ऐसा माझ्या मनें सांगितला भाव । तोंवरीच देव दुजा नाहीं ।।तु.गा.०८८१.००२।।
अवघियांची जेव्हां सारावी करकर । भावबळें थार धरूं येसी ।।तु.गा.०८८१.००३।।
तुका म्हणे तुज ठेवावें पूजून । आणीक तो गुण नाहीं येथें ।।तु.गा.०८८१.००४।।
आडलिया जना होसी साहाकारी । अंधळिया करीं काठी तूंचि ।।तु.गा.०८८२.००१।।
आडले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायणा ।।तु.गा.०८८२.००२।।
प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुम्ही आपंगिला नानापरी ।।तु.गा.०८८२.००३।।
आपुलेंचि अंग तुम्ही वोडविलें । त्याचें निवारलें महादुःख ।।तु.गा.०८८२.००४।।
तुका म्हणे तुझें कृपें पार नाहीं । माझें विठाबाई जननीये ।।तु.गा.०८८२.००५।।
कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ।।तु.गा.०८८३.००१।।
कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ।।तु.गा.०८८३.००२।।
कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ।।तु.गा.०८८३.००३।।
कवण ते रूपता कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ।।तु.गा.०८८३.००४।।
सर्वां ठायीं तूंचि सर्वही जालासी । तुका म्हणे यासी दुजें नाहीं ।।तु.गा.०८८३.००५।।
जन मानवलें वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ।।तु.गा.०८८४.००१।।
म्हणऊनि पंढरिनाथा वाटतसें चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ।।तु.गा.०८८४.००२।।

संतां ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ।।तु.गा.०८८४.००३।।
तुका म्हणे मी तों आपणासी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ।।तु.गा.०८८४.००४।।
चोरटें सुनें मारिलें टाळें । केऊं करी परि न संडी चाळे ।।तु.गा.०८८५.००१।।
ऐसे एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ।।तु.गा.०८८५.००२।।
नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ।।तु.गा.०८८५.००३।।
तुका म्हणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तया पुढें मागें सरो ।।तु.गा.०८८५.००४।।
आम्हांसी आपुलें नावडे संचित । चरफडे चित्त कळवळ्यानें ।।तु.गा.०८८६.००१।।
न कळतां जाला खोळंबा मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ।।तु.गा.०८८६.००२।।
कळों आलें बरे उघडले डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ।।तु.गा.०८८६.००३।।
तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ।।तु.गा.०८८६.००४।।
म्हणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोट भरीं ।।तु.गा.०८८७.००१।।
खोटें कोठें सरे तुझें पायांपाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ।।तु.गा.०८८७.००२।।
आचरण खोटें आपणांसी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ।।तु.गा.०८८७.००३।।
तुका म्हणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधी तुम्हां ठावा ।।तु.गा.०८८७.००४।।
जेथें पाहें तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ।।तु.गा.०८८८.००१।।
काय सांगूं देवा भुलले जीव । बहु यांची येतसे कींव ।।तु.गा.०८८८.००२।।
वैकुंठीचें मोटळें लटिकेंची फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे ।।तु.गा.०८८८.००३।।
तुका म्हणे कां उगेचि खोल । जवळी दाखवी आपणा वोल ।।तु.गा.०८८८.००४।।
जन तरी देखें गुंतले प्रपंचें । स्मरण तें त्यांचें त्यांसी नाहीं ।।तु.गा.०८८९.००१।।
म्हणऊनि  मागें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ।।तु.गा.०८८९.००२।।
इंद्रियांचा गाजे गोंधळे ये ठायीं । फोडीतसे डोई अहंकार ।।तु.गा.०८८९.००३।।
तुका म्हणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ।।तु.गा.०८८९.००४।।
काय तुझें उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजी आतां ।।तु.गा.०८९०.००१।।

जतन हें माझें करूनि संचित । दिलें अवचित आणूनियां ।।तु.गा.०८९०.००२।।
घडल्या दोषांचें न घलींच भरी । आली यास थोरी कृपा देवा ।।तु.गा.०८९०.००३।।
नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं । न मागतां पाहीं दान दिलें ।।तु.गा.०८९०.००४।।
तुका म्हणे याच्या उपकारासाठीं । नाहीं माझें गांठी कांहीं एक ।।तु.गा.०८९०.००५।।
पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ।।तु.गा.०८९१.००१।।
कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपण भिकारी अर्थ नेणे ।।तु.गा.०८९१.००२।।
न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ।।तु.गा.०८९१.००३।।
तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वांठायीं एक मज ।।तु.गा.०८९१.००४।।
तुका म्हणे खीळ पडो त्याच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकांसी ।।तु.गा.०८९१.००५।।
कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देइल धीर माझ्या जीवा ।।तु.गा.०८९२.००१।।
शास्त्रज्ञ पंडित नव्हे मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ।।तु.गा.०८९२.००२।।
कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ।।तु.गा.०८९२.००३।।
मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ।।तु.गा.०८९२.००४।।
तुका म्हणे आतां दुरावितां जन । किंवा हें मरण भलें दोन्ही।।तु.गा.०८९२.००५।।
तुजविण वाणीं आणिकाची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ।।तु.गा.०८९३.००१।।
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ।।तु.गा.०८९३.००२।।
नेत्रीं आणिकासी पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ।।तु.गा.०८९३.००३।।
कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ।।तु.गा.०८९३.००४।।
तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ।।तु.गा.०८९३.००५।।
द्रव्य घेऊनियां कथा जरी करी । तरी भंगो हरी देह माझा ।।तु.गा.०८९४.००१।।
माझी कथा करा ऐसें म्हणे कोणा । तरी नारायणा जिव्हा झडो ।।तु.गा.०८९४.००२।।
साह्य तूं झालासी काय उणें तुपें । आणिक भूतांपे काय मागे ।।तु.गा.०८९४.००३।।
तुका म्हणे सर्व सिद्धी तुझे पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ।।तु.गा.०८९४.००४।।

कासयासी व्हावें आम्ही जीवन्मुक्त । सांडुनियां थीत प्रेमसुख ।।तु.गा.०८९५.००१।।
वैष्णवांचा दास झाला नारायण । काय त्या मिळोन असों सुखी ।।तु.गा.०८९५.००२।।
काय त्या गांठींचें पडलें सुटोन । उगेचि बैसोन धीर धरूं ।।तु.गा.०८९५.००३।।
सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण हाणे लाता ।।तु.गा.०८९५.००४।।
तुका म्हणे मज नलगे सायुज्यता । राहेन त्या संतां समागमें ।।तु.गा.०८९५.००५।।
जन्ममरणाची कायसी चिंता । तुझ्या शरणागतां पंढरिराया ।।तु.गा.०८९६.००१।।
वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय काय ।।तु.गा.०८९६.००२।।
हृदयीं तुझे रूप बिंबलें साकार । तेथें कोण पार संसाराचा ।।तु.गा.०८९६.००३।।
तुका म्हणे तुझ्या नामाची पाखर । असतां कळिकाळ पायांतळीं ।।तु.गा.०८९६.००४।।
आमुचें उचित हेचि उपकार । आपुलाचि भार घालूं तुज ।।तु.गा.०८९७.००१।।
भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरण काळीं शीताचिये ।।तु.गा.०८९७.००२।।
जेणें काळीं उठी मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडे तें ।।तु.गा.०८९७.००३।।
दु:ख येवो नेदी आमुचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ।।तु.गा.०८९७.००४।।
तुका म्हणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेंचि आम्हा गोड जन्म घेंता ।।तु.गा.०८९७.००५।।
दिली हाक मनें नव्हतें जतन । वेगळाले गुण धांव घेती ।।तु.गा.०८९८.००१।।
काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा हिंसा फार माया तृष्णा ।।तु.गा.०८९८.००२।।
इंद्रियांचे भार फिरतील चोर । खाणें घ्यावया घर फोडूं पाहे ।।तु.गा.०८९८.००३।।
माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ।।तु.गा.०८९८.००४।।
तुका म्हणे आतां करितों उपाय । जेणें तुझें पाय आतुडती ।।तु.गा.०८९८.००५।।
दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ।।तु.गा.०८९९.००१।।
कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ।।तु.गा.०८९९.००२।।
आणिकांची येती अंतरा अंतरें । सुखदु:ख बरेंवाईट तें ।।तु.गा.०८९९.००३।।
तुका म्हणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ।।तु.गा.०८९९.००४।।

खेळतां निजभावें समर्थाचें बाळ । तयाच्या सकळ सत्तेखालीं ।।तु.गा.०९००.००१।।
तरी लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ।।तु.गा.०९००.००२।।
अवघीच दिशा असावी मोकळी । मायबाप बळी म्हणऊनि ।।तु.गा.०९००.००३।।
तुका म्हणे माझें ऐसें आहे देवा । म्हणऊनि सेवा समर्पिली ।।तु.गा.०९००.००४।।
कळों आला भाव माझा मज देवा । वायांविण जीवा आट केली ।।तु.गा.०९०१.००१।।
जोडूनि अक्षरें केली तोंडपिटी । नलगे शेवटीं हातीं कांहीं ।।तु.गा.०९०१.००२।।
देव जोडे म्हणोन सांगतसे लोकां । माझा मीच देखा दुःख पावें ।।तु.गा.०९०१.००३।।
तुका म्हणे माझें गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझें देवा ।।तु.गा.०९०१.००४।।
बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आम्हीं अविश्वासी सर्वभावें ।।तु.गा.०९०२.००१।।
दंभें करूं भक्ति सोंग दावूं जना । अंतरीं भावना वेगळिया ।।तु.गा.०९०२.००२।।
चित्ताचा तूं साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आतां पुढें ।।तु.गा.०९०२.००३।।
तुका म्हणे देवां तूं काय करिसी । कर्मा दुस्तरासी आमुचिया ।।तु.गा.०९०२.००४।।
कासया वांचूनि झालों भूमिभार। तुझ्या पायीं थार नाहीं तरी।।तु.गा.०९०३.००१।।
जातां भलें काय डोळियांचें काम। जंव पुरुषोत्तम न देखती।।तु.गा.०९०३.००२।।
काय मुख पेंव श्वापदांची धांव। नित्य तुझें नांव नुच्चारितां।।तु.गा.०९०३.००३।।
तुका म्हणे आतां पांडुरंगाविण। न वांचतां क्षण जीव भला।।तु.गा.०९०३.००४।।
समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ।।तु.गा.०९०४.००१।।
न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देऊनि साहे दुःख त्याचें ।।तु.गा.०९०४.००२।।
मान भलेपण नाहीं फुकासाठीं । जयावरि गांठी झीज साहे ।।तु.गा.०९०४.००३।।
तुका म्हणे हे तूं सर्वही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ।।तु.गा.०९०४.००४।।
माझा तों स्वभाव मज अनावर । तुजही देतां भार कांहीं नव्हे ।।तु.गा.०९०५.००१।।
ऐसें कळों आलें मज नारायण । जागृती स्वप्ना ताळ नाहीं ।।तु.गा.०९०५.००२।।
संपादितों तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ।।तु.गा.०९०५.००३।।

ऐसीं मागें ठकलीं किती । सांगतां खाती विषगोळा ।।तु.गा.०९१०.००२।।
विचारोनि पाहे त्यास । न वजे जीवा नव्हे नास ।।तु.गा.०९१०.००३।।
तुका म्हणे जो रुसला जीवा । तयासी केशवा काय चाले ।।तु.गा.०९१०.००४।।
मिळे हरिदासांसी दाटी । रीघ न होय शेवटीं ।।तु.गा.०९११.००१।।
तेथें काय म्यां करावें । माझें कोणें आइकावें ।।तु.गा.०९११.००२।।
कैसें तुज लाजवावें । भक्त म्हणोनियां भावें ।।तु.गा.०९११.००३।।
नाचतां नये तालीं । वाजवितां नये टाळी ।।तु.गा.०९११.००४।।
अति मंडित भूषणें । शरीर माझें दैन्यवाणें ।।तु.गा.०९११.००५।।
तुका म्हणे कमळापति । मज न द्यावें त्यांचे हातीं ।।तु.गा.०९११.००६।।
न बोलावें ऐसें जनासी उत्तर । करितों विचार बहु वेळां ।।तु.गा.०९१२.००१।।
कोण पाप आड ठाकतें येऊन । पालटीत गुण अंतरींचा ।।तु.गा.०९१२.००२।।
संसारा हातीं सोडविला गळा । कां हे अवकळा येती पुढें ।।तु.गा.०९१२.००३।।
तुका म्हणे सेवें घडे अंतराय । यासी करूं काय पांडुरंगा ।।तु.गा.०९१२.००४।।
आतां हें उचित माझी जनाहातीं । पाहिजे फजीती केली कांहीं ।।तु.गा.०९१३.००१।।
मग मी तुमचे न सोडीं चरण । त्रासोनियां मन येईल ठाया ।।तु.गा.०९१३.००२।।
वाउगे वाणीचा न धरीं कांटाळा । ऐसी कां चांडाळा बुद्धि मज ।।तु.गा.०९१३.००३।।
तुका म्हणे जरि माथां बैसे घाव । तरि मग वाव नेघे पुढें ।।तु.गा.०९१३.००४।।
त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ।।तु.गा.०९१४.००१।।
ऐसें माझें मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरी मिठी ।।तु.गा.०९१४.००२।।
कईं तें सुंदर देखेन रुपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ।।तु.गा.०९१४.००३।।
नाहीं पूर्वपुण्य मज पामरासी । म्हणोनि पायांसी अंतरलों ।।तु.गा.०९१४.००४।।
अलभ्य लाभ कैंचा संचितावेगळा । विनवी गोपाळा दास तुका ।।तु.गा.०९१४.००५।।
करूनि चिंतन खेळें भोंवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं।।तु.गा.०९१५.००१।।

येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ।।तु.गा.०९१५.००२।।
सुख दुःख तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आम्ही ।।तु.गा.०९१५.००३।।
तुका म्हणे जाला देहाचा विसर । आतां आप–पर नाहीं कोणी ।।तु.गा.०९१५.००४।।
सुराणीचीं झालों लाडिकीं एकलीं । वडील धाकुलीं आम्ही देवा ।।तु.गा.०९१६.००१।।
म्हणऊनि कांहीं न घडे अव्हेर । गोमटें उत्तर भातुकेंही ।।तु.गा.०९१६.००२।।
कांहीं एक नाहीं वंचिलें वेगळें । मुळींचिया मुळें स्थिरावलें ।।तु.गा.०९१६.००३।।
लेवविलीं अंगीं आपुलीं भूषणें । अळंकार लेणें सकळही ।।तु.गा.०९१६.००४।।
सारितां न सरे अमुप भांडार । धना अंतपार नाहीं लेखा।।तु.गा.०९१६.००५।।
तुका म्हणे आम्ही आळवूं आवडी । म्हणऊनि जोडी दाखविली ।।तु.गा.०९१६.००६।।
आलों उल्लंघूनि दुःखाचे पर्वत । पायापाशीं हित तुमच्या तरी ।।तु.गा.०९१७.००१।।
न देखेची लासा दुःखी होतें मन । कठिणें कठिण वाटतसे ।।तु.गा.०९१७.००२।।
नव्हे सांडी परि वाटतें निरास । न ये माझ्या दिस संकल्पाचा ।।तु.गा.०९१७.००३।।
तुका म्हणे तुम्ही सदैव जी देवा । माझ्या हाचि जीवा एक ठाव ।।तु.गा.०९१७.००४।।
नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष । अंगीं कांहीं रस न येचि तो ।।तु.गा.०९१८.००१।।
कैसें समाधान राहे पांडुरंगा । नलगेचि अंगा आणी कांहीं ।।तु.गा.०९१८.००२।।
लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचे ते फिके वेवसाव ।।तु.गा.०९१८.००३।।
तुका म्हणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मा वरी माझ्या ।।तु.गा.०९१८.००४।।
वैराग्याचा अंगीं झालासे संचार । इच्छी वनांतर सेवावया ।।तु.गा.०९१९.००१।।
कां जी माझें करूं नये समाधान । वियोगानें मन सिणतसे ।।तु.गा.०९१९.००२।।
न येचि न्यावया पंढरीचें मूळ । न देवेचि माळ कंठींचीही ।।तु.गा.०९१९.००३।।
तुका म्हणे झालें अप्रीतीचें जिणें । लाजिर हें वाणें सेवा करी ।।तु.गा.०९१९.००४।।
म्हणऊनि काय जीऊं भक्तपणें । जायाचीं भूषणें अळंकार ।।तु.गा.०९२०.००१।।
आपुल्या कष्टाची करोनियां जोडी । मिरवीन उघडीं इच्छावसें ।।तु.गा.०९२०.००२।।

तुके तरी तुके खऱ्याचें उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोठवरी ।।तु.गा.०९२०.००३।।
तुका म्हणे पुढें आणि मागें फांस । पावें ऐसा नास न करी देवा ।।तु.गा.०९२०.००४।।
सोंवळा होऊं तों वोंवळे जडलें । सांडीमांडी बोले तोंडीं बीजी ।।तु.गा.०९२१.००१।।
एकसरीं केली कलेवरीं साटी । आतां नका तुटी पायांसवें ।।तु.गा.०९२१.००२।।
संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मूळ मरणाचें ।।तु.गा.०९२१.००३।।
तुका म्हणे हें तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ।।तु.गा.०९२१.००४।।
कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावे नाहीं पोळी मागें देखी ।।तु.गा.०९२२.००१।।
बुझाविलें हातीं देऊनि खापर । छंद करकर वारियेली ।।तु.गा.०९२२.००२।।
तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ।।तु.गा.०९२२.००३।।
तुका म्हणे मायबापाचें उचित । करावें स्वहित बाळकाचें ।।तु.गा.०९२२.००४।।
निष्ठुर यासाठीं करितों भाषण। आहेसी सर्वज्ञ जाणता तूं।।तु.गा.०९२३.००१।।
ऐसें दुःख कोण आहे निवारितां। तों मी जाऊं आतां शरण त्यासी।।तु.गा.०९२३.००२।।
बैसलासी कोण करुनियां धीर। नाहीं येथ उरी दुसऱ्याची।।तु.गा.०९२३.००३।।
तुका म्हणे आलें अवघेच पायापें। आतां मायबापें नुपेक्षावें।।तु.गा.०९२३.००४।।
न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धांडोळितां ।।तु.गा.०९२४.००१।।
न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा ब्रह्मादिकां ।।तु.गा.०९२४.००२।।
तुका म्हणे तुझा नाहीं अंतपार । म्हणोनि विचार पडिला मज ।।तु.गा.०९२४.००३।।
माउलीसी सांगे कोण । प्रेमें वाढवी तान्हें ।।तु.गा.०९२५.००१।।
अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ।।तु.गा.०९२५.००२।।
मायबापांची उपमा । तुज देऊं पुरुषोत्तमा ।।तु.गा.०९२५.००३।।
तेही साजेना पाहातां । जीवलगा पंढरीनाथा ।।तु.गा.०९२५.००४।।
माय पाळीं संसारीं । परलोकीं राहे दूरी ।।तु.गा.०९२५.००५।।
तैसा नव्हेसी अनंता । काळावरी तुझी सत्ता ।।तु.गा.०९२५.००६।।

तुका म्हणे नारायणा । तुज बहुत करुणा ।।तु.गा.०९२५.००७।।
धर्म रक्षावया अवतार घेसी । आपुल्या पाळिसी भक्तजना ।।तु.गा.०९२६.००१।।
अंबऋषीसाठीं जन्म सोशियेले । दुष्ट निर्दाळिले किती एक ।।तु.गा.०९२६.००२।।
धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तूं बोल साच करी ।।तु.गा.०९२६.००३।।
तुका म्हणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधु ।।तु.गा.०९२६.००४।।
अजामीळ अंत मरणासी आला । तोंवरि स्मरला नाहीं तुज ।।तु.गा.०९२७.००१।।
प्राण जातेवेळे म्हणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें ।।तु.गा.०९२७.००२।।
बहुत कृपाळु होसी जगन्नाथा । त्रैलोक्यसमर्था सोइरिया ।।तु.गा.०९२७.००३।।
तुका म्हणे भक्तकाज तूं कैवारी । तुज साही चारी वर्णिताती ।।तु.गा.०९२७.००४।।
मी त्यांसी अनन्य ती कोणा असती । ऐसें तंव चित्तीं विचारावें ।।तु.गा.०९२८.००१।।
आहे तो विचार आपणयापाशीं । कळा बिंबाऐसी प्रतिबिंबीं ।।तु.गा.०९२८.००२।।
शुभ शकुन तो शुभ लाभें फळे । पुढील तें कळे अनुभवें ।।तु.गा.०९२८.००३।।
तुका म्हणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पायीं ।।तु.गा.०९२८.००४।।
रडे अळंकार दैन्याचिये कांती । उत्तमा विपत्तिसंग घडे ।।तु.गा.०९२९.००१।।
एकाविण एक अशोभ दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ।।तु.गा.०९२९.००२।।
रांधूं नेणों तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वायां जाय ।।तु.गा.०९२९.००३।।
तुका म्हणे चिंतामणि शेळी गळां । पावे अवकळा म्हणऊनि ।।तु.गा.०९२९.००४।।
वदे वाणी परि दुर्लभ अनुभवो । चालीचाची वाहो बहुतेक ।।तु.गा.०९३०.००१।।
आम्ही ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ जिंकितसे ।।तु.गा.०९३०.००२।।
वाढवितां पोट दंभाचे पसारे । येतील माघारें मुदला तोटे ।।तु.गा.०९३०.००३।।
तुका म्हणे बरें जागवितां मना । तुमच्या नारायणा अभय करें ।।तु.गा.०९३०.००४।।
आइकें नारायणा वचन माझें खरें । सांगतों निर्धारें तुजपासीं ।।तु.गा.०९३१.००१।।
नाहीं भाव मज पडिली लोकलाज । राहिलेंसे काज तुझे पायीं ।।तु.गा.०९३१.००२।।

वरदळ भक्ति करितों मी नित्य । परि नाहीं चित्त तुझे पाईं ।।तु.गा.०९३१.००३।।
जरि तुज कांहीं करणें उचित । तारी तूं पतित तुका म्हणे ।।तु.गा.०९३१.००४।।
दु:ख वाटे ऐसी ऐकोनियां गोष्टी । जेणें घडे तुटी तुझ्या पायीं ।।तु.गा.०९३२.००१।।
येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ।।तु.गा.०९३२.००२।।
काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडूनि पुढती वाटे लावूं ।।तु.गा.०९३२.००३।।
तुका म्हणे मज दावूं नको ऐसे । दृष्टीपुढें पिसे पांडुरंगा ।।तु.गा.०९३२.००४।।
तुज ऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि देसी पद दासा ।।तु.गा.०९३३.००१।।
शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ।।तु.गा.०९३३.००२।।
भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्ताच्या परी नावडती ।।तु.गा.०९३३.००३।।
नवजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या ।।तु.गा.०९३३.००४।।
तुका म्हणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ।।तु.गा.०९३३.००५।।
तुम्ही साच नुपेक्षाल हा भरंवसा । मज जाणतसां अधीरसें ।।तु.गा.०९३४.००१।।
कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा कर कर वारूनियां ।।तु.गा.०९३४.००२।।
सुटों नये ऐसें कळलें निरुतें । कां घ्यावें मागुतें आळवूनि ।।तु.गा.०९३४.००३।।
तुका म्हणे तुम्ही सभाग्य जी देवा । माझा तुम्हा केवा काय आला ।।तु.गा.०९३४.००४।।
काय आम्ही आतां पोटचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हूण ।।तु.गा.०९३५.००१।।
ऐसा तरि एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ।।तु.गा.०९३५.००२।।
काय कवित्वाची घालूनियां रुढी । करूं जोडा जोडी अक्षरांची ।।तु.गा.०९३५.००३।।
तुका म्हणे काय गुंफोनि दुकाना । राहो नारायणा करूनी घात ।।तु.गा.०९३५.००४।।
जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आम्हां ।।तु.गा.०९३६.००१।।
जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदु:खें ।।तु.गा.०९३६.००२।।
पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणा कारणें कवणें केलीं ।।तु.गा.०९३६.००३।।
आम्हां मरण नाश तूं तंव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ।।तु.गा.०९३६.००४।।

तुका म्हणे तूंचि निवडी हे गुढार । दाखवी साचार तेचि मज ।।तु.गा.०९३६.००५।।
आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैचें दिलें साचें करोनियां ।।तु.गा.०९३७.००१।।
दुजियासी तंव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें।।तु.गा.०९३७.००२।।
एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतीस्वभावत्व प्रमाणेंचि ।।तु.गा.०९३७.००३।।
तुका म्हणे करूं उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुम्हीं देवा ।।तु.गा.०९३७.००४।।
पापपुण्यसुखदु:खाचीं मंडळें । एक एका बळें धांव घेती ।।तु.गा.०९३८.००१।।
कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवांसी तो ।।तु.गा.०९३८.००२।।
स्वर्गाचिया भोगें सरता नरक । मागें पुढें एक एक दोन्ही ।।तु.गा.०९३८.००३।।
तुका म्हणे भय उपजलें मना । घेईं नारायणा कडिये मज ।।तु.गा.०९३८.००४।।
तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीवें येरयेरें वंचिजे ना ।।तु.गा.०९३९.००१।।
हें तुम्हां सांगणें काय उगवूनि । जावें समजोनि पांडुरंगा ।।तु.गा.०९३९.००२।।
जेवित्याची खुण वाढित्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ।।तु.गा.०९३९.००३।।
तुका म्हणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हार संपादणी ।।तु.गा.०९३९.००४।।
खुंटोनियां दोरी आपणियांपाशीं । वावडी आकाशीं मोकलिली ।।तु.गा.०९४०.००१।।
आपुलिया आहे मालासी जतन । गाहाणाचें तें ऋण बुडों नेणें ।।तु.गा.०९४०.००२।।
बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन तें सार करायाची ।।तु.गा.०९४०.००३।।
तुका म्हणे माझी निश्चिंतीची सेवा । वेगळें नाहीं देवा उरों दिलें ।।तु.गा.०९४०.००४।।
कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्यां तुज बळें कष्टवावें ।।तु.गा.०९४१.००१।।
नाहीं जात जीव होत नाहीं हानी । सहज तें मनीं आठवलें ।।तु.गा.०९४१.००२।।
नाहीं कांहीं चिंता मरत उपवासी । अथवा त्या म्हैसी गाई व्हाव्या ।।तु.गा.०९४१.००३।।
हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लापणीक वरी साचभाव ।।तु.गा.०९४१.००४।।
तुका म्हणे देवा नाशिवंतासाठीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ।।तु.गा.०९४१.००५।।
मनवाचातीत तुझें हें स्वरुप । म्हणोनियां माप भक्ति केलें ।।तु.गा.०९४२.००१।।

भक्तीचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्त्वता न मोजवें ।।तु.गा.०९४२.००२।।
योग याग तपें देहाचियां योगें । ज्ञानाचिया लागें न सांपडसी ।।तु.गा.०९४२.००३।।
तुका म्हणे आम्हीं भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ।।तु.गा.०९४२.००४।।
कायावाचामन ठेविलें गहाण । घेतलें तुझें रिण जोडिलागीं ।।तु.गा.०९४३.००१।।
अवघें आलें आंत पोटी पडिलें थीत । सारुनि निश्चिंत जालों देवा ।।तु.गा.०९४३.००२।।
द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा । आधील मवेशा तुज ठावी ।।तु.गा.०९४३.००३।।
तुझ्या रिणें गेले बहुतें बांधोनि । जाले मजहूनि थोर थोर ।।तु.गा.०९४३.००४।।
तुका म्हणे तुझे खतीं जें गुंतलें । करुनी आपुलें घेईं देवा ।।तु.गा.०९४३.००५।।
न गमेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी न बोलवे ।।तु.गा.०९४४.००१।।
रुचिविण काय शब्द वाऱ्या माप । अनादरें कोप येत असे ।।तु.गा.०९४४.००२।।
आपुलिया रडे आपुलेंचि मन । दाटे समाधान पावतसें ।।तु.गा.०९४४.००३।।
तुका म्हणे तुम्ही असां जी जाणते । काय करुं रिते वादावाद ।।तु.गा.०९४४.००४।।
दुर्बळाचे हातीं सापडलें धन । करितां जतन नये त्यासी ।।तु.गा.०९४५.००१।।
तैसी परि मज झाली नारायणा । योगक्षेम जाणां तुम्ही आतां ।।तु.गा.०९४५.००२।।
खातां लेतां नये मिरवितां वरि । राजा दंड करी जन राग ।।तु.गा.०९४५.००३।।
तुका म्हणे मग तळमळ उरे । देखिलें तें झुरे पाहावया ।।तु.गा.०९४५.००४।।
लोक फार वाखा अमंगळ झाला । त्याचा त्याग केला पांडुरंगा ।।तु.गा.०९४६.००१।।
विषयीं चेवलों मीपणा मुकलों । शरण तुज आलों पांडुरंगा ।।तु.गा.०९४६.००२।।
घर दार अवघीं त्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ।।तु.गा.०९४६.००३।।
तुका म्हणे पडिलों पुंडलिकापाशीं । धांव हृषीकेशी आळिंगीं मज ।।तु.गा.०९४६.००४।।
तुज करितां होय ऐसें काय नाहीं । डोंगराची राई रंक राणा ।।तु.गा.०९४७.००१।।
अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा ।।तु.गा.०९४७.००२।।
सोळा सहस्त्र नारी ब्रह्मचारी कैसा। निराहारी दुर्वासा नवल नव्हे ।।तु.गा.०९४७.००३।।

पंचभ्रतार द्रौपदी ते सती । करितां पितृशांती पुण्य धर्मा ।।तु.गा.०९४७.००४।।
दशरथ पातकी ब्रह्महत्यारासी । नवल त्याचें कुशी जन्म तुझा ।।तु.गा.०९४७.००५।।
मुनेश्वरा नाहीं दोष अणुमात्र । भांडवितां सूत्र वध होती ।।तु.गा.०९४७.००६।।
तुका म्हणे माझे दोष ते कायी । सरतां तुझे पायीं झालों देवा ।।तु.गा.०९४७.००७।।
सत्यत्वेशीं घेणें भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छीतसे ।।तु.गा.०९४८.००१।।
मग तें अवीट न भंगे साचार । पावलें विस्तार फिरों नेणे ।।तु.गा.०९४८.००२।।
वाणी वदे त्याचा कोणासी विश्वास । अभयकरें दास सत्य तईं ।।तु.गा.०९४८.००३।।
तुका म्हणे आधीं न करी तांतडी । पायीं झाली जोडी तेणें शुद्ध ।।तु.गा.०९४८.००४।।
समर्थाचा ठाव संचलाचि असे । दुर्बळाची आस पुढें करी ।।तु.गा.०९४९.००१।।
फावलें घेईन पदरीं हें दान । एकांतीं भोजन करूं जाऊं ।।तु.गा.०९४९.००२।।
नलगें पाहावी उचिताची वेळ । अयाचित काळ साधला तो ।।तु.गा.०९४९.००३।।
तुका म्हणे पोट धालिया उपरीं । गौरवा उत्तरीं पूजूं देवा ।।तु.गा.०९४९.००४।।
घ्यावी तरी घ्यावी उदंडचि सेवा । द्यावें तरी देवा उदंडचि ।।तु.गा.०९५०.००१।।
ऐसीं कैंचीं आम्ही पुरतीं भांडवलें । आल्या करीं बोलें समाधान ।।तु.गा.०९५०.००२।।
व्हावें तरी व्हावें बहुतचि दुरी । आलिया अंतरीं वसवावें ।।तु.गा.०९५०.००३।।
तुका म्हणे तुझें सख्यत्व आपणीं । अससील ऋणी आवडीचा ।।तु.गा.०९५०.००४।।
नाहीं होत भार घातल्या उदास । पुरवावी आस सकळही ।।तु.गा.०९५१.००१।।
ऐसा नाहीं मज एकाचा अनुभव । धरिला तो भाव उद्धरिले ।।तु.गा.०९५१.००२।।
उतावीळ असे शरणागत काजें । धांवा केशीराजे आइकतां ।।तु.गा.०९५१.००३।।
तुका म्हणे हितचिंतनीं भरंवसा । नेदी गर्भवासा येऊं देऊं ।।तु.गा.०९५१.००४।।
उद्वेगासी बहु फांकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ।।तु.गा.०९५२.००१।।
आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ।।तु.गा.०९५२.००२।।
मज तो अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीवित्वाचा ।।तु.गा.०९५२.००३।।

तुका म्हणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ।।तु.गा.०९५२.००४।।
काय मी अन्यायी तें घाला पालवीं । आणीक वाट दावीं चालावया ।।तु.गा.०९५३.००१।।
माग पाहोनियां जातों तेच सोयी । नवजावें कायी कोणी सांगा ।।तु.गा.०९५३.००२।।
धोपट मारग लागलासे गाढा । मज काय पीडा करा तुम्ही ।।तु.गा.०९५३.००३।।
वारितांही भय कोण धरी धाक । परी तुम्हां एक सांगतों मी ।।तु.गा.०९५३.००४।।
तुका म्हणे शूर दोहीं पक्षीं भला । मरतां मुक्त जाला मान पावे ।।तु.गा.०९५३.००५।।
माझी आतां लोक सुखें निंदा करूं । म्हणती विचारू सांडियेला ।।तु.गा.०९५४.००१।।
कारण होय तो करीन विचार । काय भीड भार करूं देवा ।।तु.गा.०९५४.००२।।
तुका म्हणे काय करूं लापणिक । जनाचार सुख नाशिवंत ।।तु.गा.०९५४.००३।।
लाजोनि या काळें राहिलें लिखित । नेदितांही चित्त समाधान ।।तु.गा.०९५५.००१।।
कैसें सुख वाटे वचनांचे तुटी । प्रीतिविण भेटीं रुचि नेदी ।।तु.गा.०९५५.००२।।
एकाचिये भेटी एकाचा कोंपर । मायेचा पदर कळों ये तो ।।तु.गा.०९५५.००३।।
होत्या आपल्या त्या वेचूनियां शक्ती । पुढें झालों युक्तिकळाहीन ।।तु.गा.०९५५.००४।।
तुका म्हणे तुम्ही समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावे ।।तु.गा.०९५५.००५।।
शेवट तो होतो तुझियानें गोड । म्हणऊनि चाड धरीतसों ।।तु.गा.०९५६.००१।।
देऊं भोगा भोग कलिवराचा भार । साहों तुज थार त्याजमधीं ।।तु.गा.०९५६.००२।।
तुझ्या बळें कांहीं खटपट काम । वाढवावा श्रम नलगे तो ।।तु.गा.०९५६.००३।।
तुका म्हणे आम्ही चेंपलों या भारें । तुमचें तें खरें देवपण ।।तु.गा.०९५६.००४।।
आवडी न पुरे मायबापापासीं । घडों का येविसीं सकईल ।।तु.गा.०९५७.००१।।
होईल नेमिलें आपुलिया काळें । आलियाचें बळें आग्रहो उरे ।।तु.गा.०९५७.००२।।
जाणविलें तेथें थोडें एक वेळा । सकळ ही कळा सर्वोत्तमीं ।।तु.गा.०९५७.००३।।
तुका म्हणे निवेदिलें गुह्य गुज । आतां तुझी तुज सर्व चिंता ।।तु.गा.०९५७.००४।।
तुम्हांसी न कळे सांगा काय एक । कासया संकल्प वागवूं मी ।।तु.गा.०९५८.००१।।

आहे तेथें सत्ता ठेविलों स्थापूनि । प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा ।।तु.गा.०९५८.००२।।
कृपा झाली मग नलगे अंगसंग । निजध्यासें रंग चढताहे ।।तु.गा.०९५८.००३।।
तुका म्हणे मागें बोलिलों तें वाव । आतां हाचि भाव दृढ झाला ।।तु.गा.०९५८.००४।।
काय उरली ते करूं विनवणी । वेंचलों वचनीं पांडुरंगा ।।तु.गा.०९५९.००१।।
अव्हेरलों आतां कैचें नामरूप । आदर निरोप तरि तो नाहीं ।।तु.गा.०९५९.००२।।
माझा मायबाप ये गेलों सलगी । तों हे तुम्ही जगीं सोयरिका ।।तु.गा.०९५९.००३।।
तुका म्हणे आतां जोडोनियां हात । करी दंडवत ठायींचा ठायीं ।।तु.गा.०९५९.००४।।
भांडवल माझें लटिक्याचे गांठी । उदीमासी तुटी यावी हेचि ।।तु.गा.०९६०.००१।।
कैसी तुझी वाट पाहों कोण्या तोंडें । भोंवताले भांडे गर्भवास ।।तु.गा.०९६०.००२।।
बहु खाणीचिया रंगलोंसे रंगें । सुष्ट दुष्ट अंगें धरूनियां ।।तु.गा.०९६०.००३।।
बहुतांचे बहु पालटलों साळे । बहु आला काळें रंग अंगा ।।तु.गा.०९६०.००४।।
उकलूनि नये दावितां अंतर । घडिचा पदर सारूनियां ।।तु.गा.०९६०.००५।।
तुका म्हणे आतां करीं गोळ्यासाठी । आपणा पालटी संगें देवा ।।तु.गा.०९६०.००६।।
माझें विषयीं तुज पडतो विसर । नको धरूं दूर पांडुरंगा ।।तु.गा.०९६१.००१।।
तुझा म्हणवितों हेचि लाज तुला । आतां झणीं मला विसरसी ।।तु.गा.०९६१.००२।।
तुका म्हणे तुझी माझी नाहीं उरी । आतां केली खरी देवराया ।।तु.गा.०९६१.००३।।
मज कांहीं सीण न व्हावा यासाठीं । कृपा तुम्हा पोटीं उपजली ।।तु.गा.०९६२.००१।।
होतें तैसें केलें आपलें उचित । शिकविलें हित बहु बरें ।।तु.गा.०९६२.००२।।
आम्हीं न मनावी कोणाची आशंका । तुम्हां भय लोकां आहे मनीं ।।तु.गा.०९६२.००३।।
तुका म्हणे आतां संचिताचा ठेवा । वोढवला घ्यावा जैसा तैसा ।।तु.गा.०९६२.००४।।
लेखिलें कवित्व माझे सहज बोल । न लगेचि ओल जिव्हाळ्याची ।।तु.गा.०९६३.००१।।
नयेचि उत्तर कांहीं परतोनि । झालों नारायणीं न सरतें ।।तु.गा.०९६३.००२।।
लाजिरवाणी कां वदली हे वाचा । नव्हेचि ठायींचा मननशीळ ।।तु.गा.०९६३.००३।।

तुका म्हणे फळ नयेचि सायासा । पंढरीनिवासा काय झालें ।।तु.गा.०९६३.००४।।
आतां सोडवणें न या नारायणा । तरि मी वांचेना काळा हातीं ।।तु.गा.०९६४.००१।।
ऐसें सांगोनियां झालों उतराई । आणिक तें काई माझें हातीं ।।तु.गा.०९६४.००२।।
केलियाचें माप नये शेवटासी । करितील नासि अंतराय ।।तु.गा.०९६४.००३।।
तुका म्हणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ।।तु.गा.०९६४.००४।।
ऐक पांडुरंगा वचन माझें एक । झालों मी सेवक दास तुझा ।।तु.गा.०९६५.००१।।
कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ।।तु.गा.०९६५.००२।।
दंभ मान माझा करूं पाहे घात । झालियाही थीत कारणाचा ।।तु.गा.०९६५.००३।।
हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ।।तु.गा.०९६५.००४।।
तुका म्हणे मज विघडतां क्षण । नलगे जतन करीं देवा ।।तु.गा.०९६५.००५।।
कवतुकवाणी बोलतसें लाडें । आरुष वांकडें करूनि मुख ।।तु.गा.०९६६.००१।।
दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननीबाळकामध्यें भेद ।।तु.गा.०९६६.००२।।
सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ।।तु.गा.०९६६.००३।।
धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ।।तु.गा.०९६६.००४।।
तुका म्हणे तुज आमचीच गोडी । ऐसे हे आवडी कळों आली ।।तु.गा.०९६६.००५।।
बोलिलिया गुणीं नाहीं पाविजेत । देवा नाहीं होत हित तेथें ।।तु.गा.०९६७.००१।।
कवतुक तुझें नकळे यापरी । घेसील तें शिरीं काय नव्हे ।।तु.गा.०९६७.००२।।
नाहीं मिळो येत संतांचिया मता । पुराणीं पाहतां अघटित ।।तु.गा.०९६७.००३।।
तुका म्हणे पायीं निरोपिला भाव । न्याल तैसा जावो सिद्धि देवा ।।तु.गा.०९६७.००४।।
ठेवूनि इमान राहिलों चरणीं । म्हणऊनि धनी कृपा करी ।।तु.गा.०९६८.००१।।
आम्हांसी भांडार करणें जतन । आला गेला कोण उंच नीच ।।तु.गा.०९६८.००२।।
करूनि सांभाळीं राहिलों निराळा । एक एक वेळा आज्ञा केली ।।तु.गा.०९६८.००३।।
तुका म्हणे योग्यायोग्य हे विनित । देवा नाहीं चित्त तेथें देणें ।।तु.गा.०९६८.००४।।

अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचें ।।तु.गा.०९६९.००१।।
त्याचे पाय माझे लागोत कपाळीं । भोगे उष्टावळी धन्यकाळ ।।तु.गा.०९६९.००२।।
षड्ऊर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ।।तु.गा.०९६९.००३।।
तुका म्हणे जाती वोळे लवकरी । ठायींचि अंतरीं शुद्ध होती ।।तु.गा.०९६९.००४।।
वाढवावा पुढें आणीक प्रकार । एकचि तें फार रुचि नेदी ।।तु.गा.०९७०.००१।।
निचे नवें लेणें देह हा पवाडा । पालट रोकडा वरावरी ।।तु.गा.०९७०.००२।।
दिसे शोभिवंत सेवेने सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ती ।।तु.गा.०९७०.००३।।
तुका म्हणे आजी पाववा संतोष । करूनि कीर्तीघोष नाचईन ।।तु.गा.०९७०.००४।।
मागील विसर होईल सकळ । केली तळमळ दु:खाची ते ।।तु.गा.०९७१.००१।।
दोहींचें ऐक्य घालीं गडसंदीं । स्थिरावली बुद्धि पायापाशीं ।।तु.गा.०९७१.००२।।
आहाच या केलों देहपरिचारें । तुमचें तें खरें वाटों नये ।।तु.गा.०९७१.००३।।
तुका म्हणे व्हावें लवकरी उदार । मी आहें सादर प्रतिग्रहा ।।तु.गा.०९७१.००४।।
पाहिजे तें आतां प्रमाण प्रत्यक्ष । आलियानें साक्ष खरे खोटें ।।तु.गा.०९७२.००१।।
काय त्या दिवस उचिताचा आला । मागील जो केला श्रम होता ।।तु.गा.०९७२.००२।।
ठेवियली खूण करोनि संकेत । तयापाशीं चित्त लागलेंसे ।।तु.गा.०९७२.००३।।
जाणसी गे माते लेंकराचा लाड । नये पडो आड निष्ठुरता ।।तु.गा.०९७२.००४।।
तुका म्हणे आम्ही करावें वचन । तुम्हांस जतन करणें तें ।।तु.गा.०९७२.००५।।
पाहा हो देवा कैसें जन । भिन्न भिन्न संचितें ।।तु.गा.०९७३.००१।।
एक नाहीं एकाऐसें । दावी कैसें शुद्ध हीन ।।तु.गा.०९७३.००२।।
पंचभूतें एकी राशी । सूत्रें कैसीं ओळखावीं ।।तु.गा.०९७३.००३।।
तुका म्हणे जो जे जाती । त्याची स्थिती तैशी ते ।।तु.गा.०९७३.००४।।
बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी ।।तु.गा.०९७४.००१।।
जालें आम्हांसी जीवन । धणीवरी हें सेवन ।।तु.गा.०९७४.००२।।

सोपें आणि गोड । किती अमृताही वाढ ।।तु.गा.०९७४.००३।।
तुका म्हणे अच्युता । आमुचा कल्पतरु दाता ।।तु.गा.०९७४.००४।।
आगी लागो तया सुखा । जेणें हरी नये मुखा ।।तु.गा.०९७५.००१।।
मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ।।तु.गा.०९७५.००२।।
जळो तें समूळ । धन संपत्ती उत्तम कुळ ।।तु.गा.०९७५.००३।।
तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ।।तु.गा.०९७५.००४।।
पुरुषाहातीं कंकण चुडा । नवल दोडा वृत्ती या ।।तु.गा.०९७६.००१।।
पाहा कैसी विटंबणा । नारायणा देखिली ।।तु.गा.०९७६.००२।।
जळो ऐसी ब्रीदावळी । भाटवोळीपणाची ।।तु.गा.०९७६.००३।।
तुका म्हणे पाहों डोळां । अवकळा नये हे ।।तु.गा.०९७६.००४।।
काय लवणकणिकेविण । एके क्षीण सागर ।।तु.गा.०९७७.००१।।
मा हे येवढी अडचणी । नारायणीं मजविण ।।तु.गा.०९७७.००२।।
कुबेरा अट्टाहासें जोडी । काय कवडी कारणें ।।तु.गा.०९७७.००३।।
तुका म्हणे काचमणी । कोण गणी भांडारी ।।तु.गा.०९७७.००४।।
चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ।।तु.गा.०९७८.००१।।
अंध पारिखी माणिकें । बोलविशी स्पष्ट मुकें ।।तु.गा.०९७८.००२।।
काय नाहीं सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ।।तु.गा.०९७८.००३।।
तुका म्हणे मूढा । मज चेष्टविलें जडा ।।तु.गा.०९७८.००४।।
पावतों ताडन । जरी हें मोकलितें जन ।।तु.गा.०९७९.००१।।
मग मी आठवितों दु:खें । देवा सावकाश मुखें ।।तु.गा.०९७९.००२।।
होती अप्रतिष्ठा । होतों वरपडा कष्टा ।।तु.गा.०९७९.००३।।
तुका म्हणे मान । होतां उत्तम खंडन ।।तु.गा.०९७९.००४।।
माझें माथां तुझा हात । तुझें पायीं माझें चित्त ।।तु.गा.०९८०.००१।।

ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ।।तु.गा.०९८०.००२।।
येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसी ।।तु.गा.०९८०.००३।।
तुका म्हणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ।।तु.गा.०९८०.००४।।
मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचूं ।।तु.गा.०९८१.००१।।
लटकियाचि न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनि ।।तु.गा.०९८१.००२।।
हिशोबें तें आलें घ्यावें । तें तों ठावें सकळांसी ।।तु.गा.०९८१.००३।।
तुका म्हणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ।।तु.गा.०९८१.००४।।
आम्ही बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ।।तु.गा.०९८२.००१।।
काय परिहाराचें काम । जाणे अंतरींचें राम ।।तु.गा.०९८२.००२।।
कळोनियां काय चाड । माझी लोकांसी बडबड ।।तु.गा.०९८२.००३।।
कारण सवें एका । अवघें आहे म्हणे तुका ।।तु.गा.०९८२.००४।।
कौतुकाची सृष्टी । कौतुकेंचि केलें कष्टी ।।तु.गा.०९८३.००१।।
मोडे तरी भले खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ।।तु.गा.०९८३.००२।।
जाणणियासाठीं । भय सामावलें पोटीं ।।तु.गा.०९८३.००३।।
तुका म्हणे चेता । होणें तें तूंच आयता ।।तु.गा.०९८३.००४।।
मूळ कारण सत्ता । नाहीं मिळत उचिता ।।तु.गा.०९८४.००१।।
घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ।।तु.गा.०९८४.००२।।
सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ।।तु.गा.०९८४.००३।।
तुका म्हणे भावें । शरण म्हणवितां बरवें ।।तु.गा.०९८४.००४।।
मोहरोनी चित्ता । आणूं हळूचि वरि हिता ।।तु.गा.०९८५.००१।।
तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ।।तु.गा.०९८५.००२।।
संसारा भेणें । कांहीं उसंतीतो पेणें ।।तु.गा.०९८५.००३।।
एखादिया भावें । तुका म्हणे जवळी यावें ।।तु.गा.०९८५.००४।।

कोण आमचीं योगतपें । करूं बापें जाणावीं ।।तु.गा.०९८६.००१।।
गीत संतसंगें गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ।।तु.गा.०९८६.००२।।
आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ।।तु.गा.०९८६.००३।।
तुका म्हणे इंद्रियांसी । येचि रसीं रंगवूं ।।तु.गा.०९८६.००४।।
आम्हां हें सकळ । तुझ्या पायांचेंचि बळ ।।तु.गा.०९८७.००१।।
करूं अमृताचें पान । दुजें नेणों कांहीं आन ।।तु.गा.०९८७.००२।।
जयाचा जो भोग । सुख दुःख पीडा रोग ।।तु.गा.०९८७.००३।।
तुका म्हणे देवा । तुझें पायीं माझा हेवा ।।तु.गा.०९८७.००४।।
जाणतों समय । परिमित कामा नये ।।तु.गा.०९८८.००१।।
तुम्हीं सांगावें तें बरें । देवा सकळ विचारें ।।तु.गा.०९८८.००२।।
फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होते ऐसी ।।तु.गा.०९८८.००३।।
तुका म्हणे आहे । धर पाय मज साहे ।।तु.गा.०९८८.००४।।
बैसलों तों कडियेवरी । नव्हें दुरी वेगळा ।।तु.गा.०९८९.००१।।
घडलें हें बहुता दिसां । आतां इच्छा पुरवीन ।।तु.गा.०९८९.००२।।
बहु होता जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ।।तु.गा.०९८९.००३।।
दुःखी केलें मीतूंपणें । जवळी नेणें होतें तें ।।तु.गा.०९८९.००४।।
पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ।।तु.गा.०९८९.००५।।
तुका म्हणे मायबापा । झणी कोपा विठ्ठला ।।तु.गा.०९८९.००६।।
तुज पाहतां सामोरी । दृष्टी न फिरे माघारी ।।तु.गा.०९९०.००१।।
माझ्या चित्ता तुझ्या पायां । मिठी पडली पंढरिराया ।।तु.गा.०९९०.००२।।
नव्हे सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ।।तु.गा.०९९०.००३।।
तुका म्हणे बळी । जीव दिला पायांतळीं ।।तु.गा.०९९०.००४।।
ठाव तुम्हांपाशीं । झाला आतां हृषीकेशी ।।तु.गा.०९९१.००१।।

नलगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ।।तु.गा.०९९१.००२।।
चोरट्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ।।तु.गा.०९९१.००३।।
तुका म्हणे मन । आतां झालें समाधान ।।तु.गा.०९९१.००४।।
बोलविसी तरी । तुझ्या येईन उत्तरीं ।।तु.गा.०९९२.००१।।
कांहीं कोड कवतुकें । हातीं द्यावया भातुकें ।।तु.गा.०९९२.००२।।
बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ।।तु.गा.०९९२.००३।।
तुका म्हणे देवा । माझें चळण तुजसवा ।।तु.गा.०९९२.००४।।
प्रीती करी सत्ता । बाळा भिती माता पिता ।।तु.गा.०९९३.००१।।
काय चाले त्याशीं बळ । आळी करितां कोल्हाळ ।।तु.गा.०९९३.००२।।
पदरीं घाली मिठी । खेदी मागें पुढें लोटी ।।तु.गा.०९९३.००३।।
बोले मना आलें । तुका साहिलें विठ्ठलें ।।तु.गा.०९९३.००४।।
मागें चिंता होती आस । केला नास या काळे ।।तु.गा.०९९४.००१।।
तुम्ही आम्हां उदासीन । भिन्नाभिन्न वारिलें ।।तु.गा.०९९४.००२।।
मोहजाळें दुःख वाढे । ओढे ओढे त्यास तें ।।तु.गा.०९९४.००३।।
तुका म्हणे कोण देवा । आतां हेवा वाढवी ।।तु.गा.०९९४.००४।।
आपणचि व्हाल साहे । कार्य आहे निर्वाणीचें ।।तु.गा.०९९५.००१।।
भाकिली ते उरली कींव । आहे जीव जीवपणे ।।तु.गा.०९९५.००२।।
आहाच कैंचा बीजामोड । प्रीति कोड वांचूनि ।।तु.गा.०९९५.००३।।
तुका म्हणे दंडीन काया । याल तया धांवणिया ।।तु.गा.०९९५.००४।।
राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सांपडे ।।तु.गा.०९९६.००१।।
लव्हाळ्यासी कोठें बळ । करिल जळ आपुलें ।।तु.गा.०९९६.००२।।
कठिणासी बळजोडा । नम्र पीडा देखेना ।।तु.गा.०९९६.००३।।
तुका म्हणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ।।तु.गा.०९९६.००४।।

असाल ते तुम्ही असा । आम्ही सहसा निवडों ना ।।तु.गा.०९९७.००१।।
अनुसरलों एका चित्तें । हातोंहातें गिंवसीत ।।तु.गा.०९९७.००२।।
गुणदोष कशासाटी । तुमचे पोटीं वागवूं ।।तु.गा.०९९७.००३।।
तुका म्हणे दुजें आतां । कोठें चित्ता आतळों ।।तु.गा.०९९७.००४।।
तूं माझा कोंवसा । परी न कळे या धसां ।।तु.गा.०९९८.००१।।
कूट खाती मागें पुढें । जाती निरयगांवा पुढें ।।तु.गा.०९९८.००२।।
मज म्हणताती कवी । निषेधुनि पापी जेवीं ।।तु.गा.०९९८.००३।।
तुका म्हणे पांडुरंगा । आतां कोण लेखी जगा ।।तु.गा.०९९८.००४।।
कोठें देवा बोलो । तुम्हां भीड घालूं गेलों ।।तु.गा.०९९९.००१।।
करावया सत्त्वहाणी । भांडवलाची टांचणी ।।तु.गा.०९९९.००२।।
दुर्बळा मागतां । त्याच्या प्रवर्तला घाता ।।तु.गा.०९९९.००३।।
तुका म्हणे नाहीं । मज कळलें ऐसें कांहीं ।।तु.गा.०९९९.००४।।
वायां जाय ऐसा । आतां उगवावा फांसा ।।तु.गा.१०००.००१।।
माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदु:खांचीं वचनें ।।तु.गा.१०००.००२।।
हाचि आम्हां ठाव । पायीं निरोपाया भाव ।।तु.गा.१०००.००३।।
तुका म्हणे जार । तुझा तुज देवा भार ।।तु.गा.१०००.००४।।
विनवीजे ऐसें कांहीं । उरलें नाहीं यावरि ।।तु.गा.१००१.००१।।
आतां असो पंढरिनाथा । पायीं माथां तुमचिये ।।तु.गा.१००१.००२।।
मागें सारियेली युक्ती । कांहीं होती जवळी ते ।।तु.गा.१००१.००३।।
निराशेची न करी आस । तुका दास माघारी ।।तु.गा.१००१.००४।।
हा तों नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ।।तु.गा.१००२.००१।।
कां जी नेणों राखा हात । कैसें देखावें रडत ।।तु.गा.१००२.००२।।
दावूनियां आस । दूर पळवितां काशास ।।तु.गा.१००२.००३।।

तुका म्हणे धांव । घेतां न पुरेचि हाव ।।तु.गा.१००२.००४।।
तुम्हां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ।।तु.गा.१००३.००१।।
आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ।।तु.गा.१००३.००२।।
बरें न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ।।तु.गा.१००३.००३।।
लावितो आभार । तुका विसरलेती फार ।।तु.गा.१००३.००४।।
हेचि वादकाची कळा । नाहीं येऊं देत बळा ।।तु.गा.१००४.००१।।
धीर करावा करावा । तरी तो आहे आम्हां देवा ।।तु.गा.१००४.००२।।
रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ।।तु.गा.१००४.००३।।
तुका म्हणे वरी । गोडा आणावा उत्तरीं ।।तु.गा.१००४.००४।।
द्याल ऐसें दिसे । तुमचें साचपण इच्छे ।।तु.गा.१००५.००१।।
म्हणऊनि न भंगे निर्धार । केले लोचन सादर ।।तु.गा.१००५.००२।।
मुखाचीच वास । पुरला पाहे अवकाश ।।तु.गा.१००५.००३।।
तुका म्हणे कळे । काय लाभ कोणे वेळे।।तु.गा.१००५.००४।।
लावूनि कोलित । माझा करितील घात ।।तु.गा.१००६.००१।।
ऐसे बहुतांचे संधी । सांपडलों खोळेमधीं ।।तु.गा.१००६.००२।।
पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ।।तु.गा.१००६.००३।।
तुका म्हणे रिघ । पुढें नाहीं झालें धींद ।।तु.गा.१००६.००४।।
आम्हा लडिवाळांचे बोल । करा कवतुकें नवल ।।तु.गा.१००७.००१।।
करूं स्तुती तरि ते निंदा । तुम्ही जाणा हे गोविंदा ।।तु.गा.१००७.००२।।
बोबडया उत्तरीं । तुम्हां रंजवितों हरी ।।तु.गा.१००७.००३।।
मागतों भातुकें । तुका म्हणे कवतुकें ।।तु.गा.१००७.००४।।
हा गे आतां हाचि लाहो । माझा अहो विठ्ठला ।।तु.गा.१००८.००१।।
दंडवत दंडवत । वेगळी मात न बोलें ।।तु.गा.१००८.००२।।

वेगळाल्या कोठें भागें । लाग लागें लावावा ।।तु.गा.१००८.००३।।
तुका म्हणे केल्या जमा । वृत्ति क्षमा भाजूनी ।।तु.गा.१००८.००४।।
तुझें मजपाशीं मन । माझी तेथें भूक तहान ।।तु.गा.१००९.००१।।
जिव्हा रते एके ठायीं । दुजें बोलायाचें काई ।।तु.गा.१००९.००२।।
माझिया कवतुकें । उभा पाहासी भातुकें ।।तु.गा.१००९.००३।।
तुका म्हणे साचें । तेथें मागील कईचें ।।तु.गा.१००९.००४।।
तुम्हां आम्हां सरी । येथें कईच्या या परी ।।तु.गा.१०१०.००१।।
स्वामिसेवा अळंकार । नाहीं आवडिये थार ।।तु.गा.१०१०.००२।।
खुंटिलिया वाचा । मग हा आनंद कइचा ।।तु.गा.१०१०.००३।।
तुका म्हणे कोडें । आम्ही नाचों तुजपुढें ।।तु.गा.१०१०.००४।।
आवडी कां ठेवूं । बैसोनियां संगें जेवूं ।।तु.गा.१०११.००१।।
मागें नको ठेवूं उरी । माझी आण तुजवरी ।।तु.गा.१०११.००२।।
देखिले प्रकार । त्याचे पाहेन साचार ।।तु.गा.१०११.००३।।
तुका म्हणे बाळीं । केली चाहाडी सकळीं ।।तु.गा.१०११.००४।।
देवो कपाट । कोण काळ राखों वाट ।।तु.गा.१०१२.००१।।
काय येईल तें शिरीं । आज्ञा धरोनियां करीं ।।तु.गा.१०१२.००२।।
करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा एकांत ।।तु.गा.१०१२.००३।।
तुका म्हणे जागों । किंवा कोणा नेदूं वागों ।।तु.गा.१०१२.००४।।
वायां ऐसा जन्म गेला । हें विठ्ठला दुःख वाटे ।।तु.गा.१०१३.००१।।
नाहीं सरता झालों पायीं । तुम्ही जईं न पुसा ।।तु.गा.१०१३.००२।।
कां मी जितों संवसारीं । अद्यापवरी भूमिभार ।।तु.गा.१०१३.००३।।
तुका म्हणे पंढरिनाथा । सबळ व्यथा भवरोग ।।तु.गा.१०१३.००४।।
कार्यचि कारण । तृष्णा पावविते शीण ।।तु.गा.१०१४.००१।।

काय करूनि ऐसा संग । सोसें चिंतूं पांडुरंग ।।तु.गा.१०१४.००२।।
रूपीं नाहीं गोडी । हांवे हांवे ऊर फोडी ।।तु.गा.१०१४.००३।।
तुका म्हणे पडे भरी । ऐसा वरदळाचे थोरी ।।तु.गा.१०१४.००४।।
ज्यावें हीनपणें । कासयाच्या प्रयोजनें ।।तु.गा.१०१५.००१।।
प्रारब्धीं संसार । बरी हिमतीची थार ।।तु.गा.१०१५.००२।।
होणार तें कांहीं । येथें अवकळा नाहीं ।।तु.गा.१०१५.००३।।
तुका म्हणे देवें । कृपा केलिया बरवें ।।तु.गा.१०१५.००४।।
पाठी लागे तया दवडी दुरी । घालीं बाहेरी संवसारा ।।तु.गा.१०१६.००१।।
येउनि दडें तुमच्या पायीं । धांवें तईं छो म्हणा ।।तु.गा.१०१६.००२।।
पारखियाचा वास पडे । खडबडे उठी तें ।।तु.गा.१०१६.००३।।
तुका म्हणे लाविला धाक । नेदी ताक खाऊं कोणा ।।तु.गा.१०१६.००४।।
सोळा सहस्त्र होऊं येतें । भरलें रितें आम्हांपें ।।तु.गा.१०१७.००१।।
ऐसे तुम्हां ठायाठाव । देव म्हूण संपादे ।।तु.गा.१०१७.००२।।
कैंचीं चिरामध्यें चिरें । मना बरें आलें तैं ।।तु.गा.१०१७.००३।।
तुका म्हणे पांडुरंगा । अंगसंगा भिन्न करा ।।तु.गा.१०१७.००४।।
लागों दिलें अंगा । ऐसें कां गा सन्निध ।।तु.गा.१०१८.००१।।
कोण्या पापें उदय केला । तो देखिला प्रळय ।।तु.गा.१०१८.००२।।
न देखवे पिडला सर्प । दया दर्प विषाचा ।।तु.गा.१०१८.००३।।
तुका म्हणे भलें । मज तों न वजे साहिलें ।।तु.गा.१०१८.००४।।
नवजावा तो काळ वायां । मुख्य दया हे देवा ।।तु.गा.१०१९.००१।।
म्हणऊनि जैसें तैसें । रहणी असें पायांचे ।।तु.गा.१०१९.००२।।
मोकळें हें मन कष्ट । करीं नष्ट दुर्जन ।।तु.गा.१०१९.००३।।
तुका म्हणे कांहीं नेणे । नवजें येणेंपरी वायां ।।तु.गा.१०१९.००४।।

आइकिली मात । पुरविले मनोरथ ।।तु.गा.१०२०.००१।।
प्रेम वाढविलें देवा । बरवी घेऊनियां सेवा ।।तु.गा.१०२०.००२।।
केली विनवणी । तैसी पुरविली धणी ।।तु.गा.१०२०.००३।।
तुका म्हणे काया । रसा कुरोंडी वरोनियां ।।तु.गा.१०२०.००४।।
निघालें तें आगीहुनी । आतां झणी आतळे ।।तु.गा.१०२१.००१।।
पळवा परपरतें दूरी । आतां हरी येथूनि ।।तु.गा.१०२१.००२।।
धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें आहों प्रपंची ।।तु.गा.१०२१.००३।।
अबोल्यानें ठेला तुका । भेउनि लोकां निराळा।।तु.गा.१०२१.००४।।
भाग सीण गेला । माझा सकळ विठ्ठला ।।तु.गा.१०२२.००१।।
तुझा म्हणवितों दास । केली उच्छिष्टाचि आस ।।तु.गा.१०२२.००२।।
राहिली तळमळ । तईं पासोनि सकळ ।।तु.गा.१०२२.००३।।
तुका म्हणे धालें । पोट ऐसें कळों आले ।।तु.गा.१०२२.००४।।
तुम्ही आम्ही भले आतां । जालों चिंता काशाची ।।तु.गा.१०२३.००१।।
आपुलाले आलों स्थळीं । मौन कळी वाढेना ।।तु.गा.१०२३.००२।।
सहज जें मनी होते । तें उचितें उघडलें ।।तु.गा.१०२३.००३।।
तुका म्हणे नसतें अंगा । येत संगा सारिखे ।।तु.गा.१०२३.००४।।
बहु देवा बरें जालें । नसतें गेलें सोंवळें ।।तु.गा.१०२४.००१।।
धोवटाशीं पडिली गांठीं । जगजेठीप्रसादें ।।तु.गा.१०२४.००२।।
गादल्याचा जाला झाडा । गेली पीडा विकल्प ।।तु.गा.१०२४.००३।।
तुका म्हणे वरावरी । निर्मळ करी निर्मळा ।।तु.गा.१०२४.००४।।
सर्व संगीं विट आला । तूं एकला आवडसी ।।तु.गा.१०२५.००१।।
दिली आतां पायीं मिठी । जगजेठी न सोडीं ।।तु.गा.१०२५.००२।।
बहु जालों खेदक्षीण । येणें शीण तो नासे ।।तु.गा.१०२५.००३।।

तुका म्हणे गंगे वास । बहु त्या आस स्थळाची ।।तु.गा.१०२५.००४।।
फावलें तें तुम्हां मागें । नवतों लागें पावलों ।।तु.गा.१०२६.००१।।
आलों आतां उभा राहें । जवळी पाहें सन्मुख ।।तु.गा.१०२६.००२।।
घरीं होती गोंवी जाली । कामें बोली न घडेचि ।।तु.गा.१०२६.००३।।
तुका म्हणे धडफुडा । जालों झाडा देईं देवा ।।तु.गा.१०२६.००४।।
मी तें मी तूं तें तूं । कुकुड हें लाडसी ।।तु.गा.१०२७.००१।।
वचनासी पडो तुटी । पोटींचें पोटीं राखावें ।।तु.गा.१०२७.००२।।
तेथील तेथें येथील येथें । वेगळ्या कुंथें कोण भारें ।।तु.गा.१०२७.००३।।
याचें यास त्याचें त्यास । तुक्यानें कास घातली ।।तु.गा.१०२७.००४।।
तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा ।।तु.गा.१०२८.००१।।
आपल्यासारिखें करिसी दासां । भिकारिसा जग जाणे ।।तु.गा.१०२८.००२।।
रूपा नाहीं ठाव नांवा । तैसें आमुचें करिसी देवा ।।तु.गा.१०२८.००३।।
तुका म्हणे तोयें आपुलें भेंडोळें । करिसी वाटोळें माझें तैसें ।।तु.गा.१०२८.००४।।
नको दुष्टसंग । पडे भजनामधीं भंग ।।तु.गा.१०२९.००१।।
काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ।।तु.गा.१०२९.००२।।
तुज निषेधितां । मज न साहे सर्वथा ।।तु.गा.१०२९.००३।।
एका माझ्या जीवें । वाद करूं कोणा सवें ।।तु.गा.१०२९.००४।।
तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्टजन ।।तु.गा.१०२९.००५।।
काय करूं एका । मुखें सांग म्हणे तुका ।।तु.गा.१०२९.००६।।
न वजतां घरा । आम्ही कोणाच्या दातारा ।।तु.गा.१०३०.००१।।
कां हे छळूं येती लोक । दाट बळेंचि कंटक ।।तु.गा.१०३०.००२।।
नाहीं आम्ही खात । कांहीं कोणाचें लागत ।।तु.गा.१०३०.००३।।
कळे तैसी सेवा । तुका म्हणे करूं देवा ।।तु.गा.१०३०.००४।।

होउनि कृपाळ । भार घेतला सकळ ।।तु.गा.१०३१.००१।।
तूंचि चालविसी माझें । भार सकळही ओझें ।।तु.गा.१०३१.००२।।
देह तुझ्या पायीं । ठेवुनि झालों उतराई ।।तु.गा.१०३१.००३।।
कायावाचामनें । तुका म्हणे दुजें नेणें ।।तु.गा.१०३१.००४।।
भला म्हणे जन । परि नाहीं समाधान ।।तु.गा.१०३२.००१।।
माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ।।तु.गा.१०३२.००२।।
कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला फार ।।तु.गा.१०३२.००३।।
तुका म्हणे कृपे । अंतराय कोण्या पापें ।।तु.गा.१०३२.००४।।
शिकविलों तें बोल । बोले तैसी नाहीं ओल ।।तु.गा.१०३३.००१।।
आतां देवा संदेह नाहीं । वायां गेलों यासी कांहीं ।।तु.गा.१०३३.००२।।
एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ।।तु.गा.१०३३.००३।।
बुद्धि नाहीं स्थिर । तुका म्हणे शब्दा धीर ।।तु.गा.१०३३.००४।।
काळावरी सत्ता । ऐशा करितो वारता ।।तु.गा.१०३४.००१।।
मी तो हीनाहूनि सांडें । देव दुऱ्हें काळतोंडें ।।तु.गा.१०३४.००२।।
मानूनी भरंवसा । होतों दास म्हणत ऐसा ।।तु.गा.१०३४.००३।।
तुका म्हणे मान । गेलों वाढवूं थोरपण ।।तु.गा.१०३४.००४।।
कळों येतें तरि कां नव्हे । पडती गोवें भ्रमाचे ।।तु.गा.१०३५.००१।।
जाणतांचि होतो घात । परिसा मात देवा हे ।।तु.गा.१०३५.००२।।
आंविसासाठीं फासा मान । पाडी धनइच्छा ते ।।तु.गा.१०३५.००३।।
तुका म्हणे होणार खोटें । कर्म मोठें बळिवंत ।।तु.गा.१०३५.००४।।
विश्वव्यापी माया । तिणें झाकुळिली छाया ।।तु.गा.१०३६.००१।।
सत्य गेलें भोळ्यावारी । अविद्येची चाली थोरी ।।तु.गा.१०३६.००२।।
आपुलेंचि मन । करी आपणा बंधन ।।तु.गा.१०३६.००३।।

तुका म्हणे देवा । तुम्ही कोडीं हीं उगवा ।।तु.गा.१०३६.००४।।
एक नेणतां नाडलीं । एका जाणिवेची भुली ।।तु.गा.१०३७.००१।।
बोलों नेणें मुकें । वेडे वाचाळ काय निकें ।।तु.गा.१०३७.००२।।
दोहींसवा नाड । विहीर एकीकडे आड ।।तु.गा.१०३७.००३।।
तुका म्हणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ।।तु.गा.१०३७.००४।।
आम्ही देव तुम्ही देव । मध्यें भेव अधिक ।।तु.गा.१०३८.००१।।
कैवाडाच्या धांवा लागें । मागें मागें विठ्ठले ।।तु.गा.१०३८.००२।।
भेडसाविलें हाकें नादें । वोळखी भेदें मोडिली ।।तु.गा.१०३८.००३।।
तुका म्हणे उभा राहे । मागें पाहे परतोनि ।।तु.गा.१०३८.००४।।
काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ।।तु.गा.१०३९.००१।।
आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ।।तु.गा.१०३९.००२।।
लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ।।तु.गा.१०३९.००३।।
भावंडाचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ।।तु.गा.१०३९.००४।।
माझें थोडें त्याचे फार । उत्तर हें वाढवी ।।तु.गा.१०३९.००५।।
तुका म्हणे नारायणा । तुम्ही जाणा बुझावूं ।।तु.गा.१०३९.००६।।
आळविती बाळें । माते तें सुख आगळें ।।तु.गा.१०४०.००१।।
द्यावें आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ।।तु.गा.१०४०.००२।।
लेववूनि अळंकार । दृष्टी करावी सादर ।।तु.गा.१०४०.००३।।
आपुलिये पदीं । बैसवूनि कोडें वंदी ।।तु.गा.१०४०.००४।।
नेदी लागों दिठी । उचलोनि लावी कंठीं ।।तु.गा.१०४०.००५।।
तुका म्हणे लाभा । वारी घ्या वो पद्मनाभा ।।तु.गा.१०४०.००६।।
अवघ्या उपचारा । एक मनचि दातारा ।।तु.गा.१०४१.००१।।
घ्यावी घ्यावी माझी सेवा । दीन दुर्बळाची देवा ।।तु.गा.१०४१.००२।।

अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ।।तु.गा.१०४१.००३।।
चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ।।तु.गा.१०४१.००४।।
नीचपण बरें देवा । न चले कोणाचाही दावा ।।तु.गा.१०४२.००१।।
महापुरें झाडें जातीं । तेथें लव्हाळे राहती ।।तु.गा.१०४२.००२।।
येतां सिंधुच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ।।तु.गा.१०४२.००३।।
तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ।।तु.गा.१०४२.००४।।
आहे तरि सत्ता। ऐशा करितों वारता ।।तु.गा.१०४३.००१।।
अंगसंगाचीं उत्तरें । सलगीसेवनें लेंकुरें ।।तु.गा.१०४३.००२।।
तरी निकटवासे । असो आशंकेच्या नासें ।।तु.गा.१०४३.००३।।
तुका म्हणे रुची । येथें भिन्नता कैंची ।।तु.गा.१०४३.००४।।
वर्म तरी आम्हां दावा । काय देवा जाणें मी ।।तु.गा.१०४४.००१।।
बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ।।तु.गा.१०४४.००२।।
द्याल जरि तुम्ही धीर । होईल स्थिर मन ठायीं ।।तु.गा.१०४४.००३।।
तुका म्हणे सत्ताबळें । लडिवाळें राखावी ।।तु.गा.१०४४.००४।।
अनाथाची तुम्हां दया । पंढरीराया येतसे ।।तु.गा.१०४५.००१।।
ऐसी ऐकोनियां कीर्ति । बहु विश्रांति पावलों ।।तु.गा.१०४५.००२।।
अनाथाच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ।।तु.गा.१०४५.००३।।
तुका म्हणे सवघड हित । ठेवूं चित्त पायांपें ।।तु.गा.१०४५.००४।।
लोह चुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ।।तु.गा.१०४६.००१।।
तैसा तूंचि आम्हा ठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ।।तु.गा.१०४६.००२।।
भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि वांचवी मोहरा ।।तु.गा.१०४६.००३।।
तुका म्हणे अधीलपणें । नेली लांकडें चंदनें ।।तु.गा.१०४६.००४।।
नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ।।तु.गा.१०४७.००१।।

देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ।।तु.गा.१०४७.००२।।
भोगी भोगविता । बाळासवें तोचि पिता ।।तु.गा.१०४७.००३।।
कर्म अकर्म जळालें । प्रौढ तुका तें उरलें ।।तु.गा.१०४७.००४।।
जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ।।तु.गा.१०४८.००१।।
आंत तूंचि बाह्यात्कारीं । अवघ्यापरीं जालासी ।।तु.गा.१०४८.००२।।
नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ।।तु.गा.१०४८.००३।।
तुका म्हणे सर्व सांगे । पांडुरंगे दयाळे ।।तु.गा.१०४८.००४।।
न खंडी अवगुण । वर्मे मानीतसे शीण ।।तु.गा.१०४९.००१।।
भोग देतां करिती काई । फुटतां यमदंडें डोई ।।तु.गा.१०४९.००२।।
पापपुण्याझाडा । देतां तेथें मोठी पीडा ।।तु.गा.१०४९.००३।।
तुका म्हणे बोला । माझ्या शिणती विठ्ठला ।।तु.गा.१०४९.००४।।
आम्हां केलें गुणवंत । तें उचित राखावें ।।तु.गा.१०५०.००१।।
तुम्हांसी तों चाड नाहीं । आणिकां कांहीं सुखदुःखा ।।तु.गा.१०५०.००२।।
दासांचें तों देखों नये । उणें काय होईल तें ।।तु.गा.१०५०.००३।।
तुका म्हणे विश्वंभरा । दृष्टि करा सामोरी ।।तु.गा.१०५०.००४।।
माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ।।तु.गा.१०५१.००१।।
हें कां नेणां नारायणा । मज चाळवितां दीना ।।तु.गा.१०५१.००२।।
नागवी धांवणें । तेथें साह्य व्हावें कोणें ।।तु.गा.१०५१.००३।।
राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ।।तु.गा.१०५१.००४।।
तुझ्या केल्याविण । स्थिर वश नव्हे मन ।।तु.गा.१०५१.००५।।
तुका म्हणे हरी । सूत्र तुझ्या हातीं दोरी ।।तु.गा.१०५१.००६।।
भागल्यांचा तूं विसांवा । करीन नांवा निंबलोण ।।तु.गा.१०५२.००१।।
परमानंदा पुरुषोत्तमा । हरी या श्रमापासोनि ।।तु.गा.१०५२.००२।।

अनाथांचा अंगीकार । करितां भार न मानिसी ।।तु.गा.१०५२.००३।।
तुका म्हणे इच्छा पुरे । ऐसी धुरे हे विठ्ठले ।।तु.गा.१०५२.००४।।
म्हणवितों दास । मज एवढीच आस ।।तु.गा.१०५३.००१।।
परी तें अंगीं नाहीं वर्म । करीं आपला तूं धर्म ।।तु.गा.१०५३.००२।।
बडबडितों तोंडें । रितें भावेविण धेंडें ।।तु.गा.१०५३.००३।।
तुका म्हणे बरा । दावूं जाणतों पसारा ।।तु.गा.१०५३.००४।।
उरलें तें भक्तिसुख । डोळां मुख पाहावें ।।तु.गा.१०५४.००१।।
अंतरींचें कां हो नेणां । नारायणा माझिया ।।तु.गा.१०५४.००२।।
पुरवा तैसी केली आळी । बळी जगदानिया ।।तु.गा.१०५४.००३।।
हातीं घेउनि चोरा भातें । दावा रितें बाळका ।।तु.गा.१०५४.००४।।
साजत हें थोरपण । नाहीं दीनवत्सला ।।तु.गा.१०५४.००५।।
शाहणें तरी लाड दावी । बाळ जेवीं मातेसी ।।तु.गा.१०५४.००६।।
तुका म्हणे पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ।।तु.गा.१०५४.००७।।
प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचेचि भाव निष्ठुरता ।।तु.गा.१०५५.००१।।
जीणें तरि एका जीवें उभयतां । पुत्राचिया पिता दुखवे दुःखें ।।तु.गा.१०५५.००२।।
काय जाणे तुटों मायेचें लिगाड । विषम तें आड उरों नेणे ।।तु.गा.१०५५.००३।।
तुका म्हणे मज करुणा उत्तरें । करितां विश्वंभरें दाविजेल ।।तु.गा.१०५५.००४।।
नव्हों सभाधीट । समोर बोलायाचें नीट । एकलीं एकट । दुजें नाहीं देखिलें ।।तु.गा.१०५६.००१।।
आतां अवघें तुम्ही जाणां । तुमचें माझें नारायणा । येईल करुणा । तेचि पहा तुम्हांसी ।।तु.गा.१०५६.००२।।
ताळ नाहीं माझें बुद्धी । धरली न धरवें शुद्धी । आतां बळ कधीं । कोण्या जन्में निवाड ।।तु.गा.१०५६.००३।।
आतां शेवटीचें । उत्तर हेंचि साचें । शरण आलें त्याचें । तुका म्हणे सांभाळा ।।तु.गा.१०५६.००४।।
नमो नमो तुज माझें हें करणें । काय झालें उणें करितां स्नान ।।तु.गा.१०५७.००१।।
संतांचा मारग चालतों झाडूनि । हो कां लाभ हानि कांहीं तरी ।।तु.गा.१०५७.००२।।

न करिसी तरी हेंचि कोडें मज । भक्ति गोड काज आन नाहीं ।।तु.गा.१०५७.००३।।
करीं सेवा कथा नाचेन रंगणीं । प्रेमसुख धणी पुरेल तों ।।तु.गा.१०५७.००४।।
महाद्वारीं सुख वैष्णवांचें मेळीं । वैकुंठ जवळीं वसे तेथें ।।तु.गा.१०५७.००५।।
तुका म्हणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि जन्म गोड घेतां मज ।।तु.गा.१०५७.००६।।
भेद तुटलियावरी । आम्ही तुमचींच हो हरी ।।तु.गा.१०५८.००१।।
आतां पाळावे पाळावे । आम्हां लडिवाळांचे लळे ।।तु.गा.१०५८.००२।।
आणिकांची देवा । नाहीं जाणतचि सेवा ।।तु.गा.१०५८.००३।।
तुका म्हणे हेवा । माझा हेत पायीं देवा ।।तु.गा.१०५८.००४।।
वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ।।तु.गा.१०५९.००१।।
ठायींची ही काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळूनि काय सांडूं ।।तु.गा.१०५९.००२।।
नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ।।तु.गा.१०५९.००३।।
मज माझें कांहीं न दिसे पाहतां। जें तुज अनंता समर्पावें ।।तु.गा.१०५९.००४।।
तुका म्हणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ।।तु.गा.१०५९.००५।।
देवा हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ।।तु.गा.१०६०.००१।।
याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ।।तु.गा.१०६०.००२।।
देऊनियां जीव । वडिलीं साधियेला हा ठाव ।।तु.गा.१०६०.००३।।
तुका म्हणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ।।तु.गा.१०६०.००४।।
दीनानाथा तुझीं ब्रीदें चराचर । घेसील कैवार शरणागता ।।तु.गा.१०६१.००१।।
पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आम्हां रोकडे कळों आले ।।तु.गा.१०६१.००२।।
आपुल्या दासाचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ।।तु.गा.१०६१.००३।।
चक्र गदा हातीं आयुधें अपार । न्यून तेथें पुरें करूं धांवें ।।तु.गा.१०६१.००४।।
तुका म्हणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ।।तु.गा.१०६१.००५।।
तुम्हां ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ।।तु.गा.१०६२.००१।।

होती कशानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ।।तु.गा.१०६२.००२।।
नसतें सांभाळिलें । जरि तुम्हीं आश्वासलें ।।तु.गा.१०६२.००३।।
तुका म्हणे कृपाळुवा । बरवा केला सांवाधांवा ।।तु.गा.१०६२.००४।।
कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रति पावे ।।तु.गा.१०६३.००१।।
आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां ।।तु.गा.१०६३.००२।।
कुशळ चतुर येथें न पवती । करितील रिती तर्क मतें ।।तु.गा.१०६३.००३।।
तुका म्हणे केणें जालें एके घरीं । मज आणि हरी तुम्हां गांठी ।।तु.गा.१०६३.००४।।
करिसी तें देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न म्हणे संत ।।तु.गा.१०६४.००१।।
जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ।।तु.गा.१०६४.००२।।
जग देव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ।।तु.गा.१०६४.००३।।
तुका म्हणे भय न धरी मानसीं । ऐसियाचें विशीं करितां दंड ।।तु.गा.१०६४.००४।।
दीप घेऊनियां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटित ।।तु.गा.१०६५.००१।।
विष्णुदास आम्ही न भिवों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ।।तु.गा.१०६५.००२।।
उधळितां माती रविकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ।।तु.गा.१०६५.००३।।
तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगेंचि ।।तु.गा.१०६५.००४।।
दिनें दिनें शंका वाढे । आयुष्य नेणवतां गाढें ।।तु.गा.१०६६.००१।।
कैसीं भुललीं बापुडीं । दंभविषयाचे सांकडीं ।।तु.गा.१०६६.००२।।
विसरलीं मरण । त्याची नाहीं आठवण ।।तु.गा.१०६६.००३।।
देखत देखत पाहीं । तुका म्हणे आठव नाहीं ।।तु.गा.१०६६.००४।।
आमुचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीन देखोवेखीं ।।तु.गा.१०६७.००१।।
न कळे सतत हिताचा विचार । तेही दारोदार खाती फेरे ।।तु.गा.१०६७.००२।।
वंदिले वंदावे निंदिले निंदावे । एक गेलें जावें त्याचि वाटा ।।तु.गा.१०६७.००३।।
तुका म्हणे कोणी नाइके सांगतां । होती यमदूता वरपडे ।।तु.गा.१०६७.००४।।

अद्वैतीं तों नाहीं माझें समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ।।तु.गा.१०६८.००१।।
करूनी उचित देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ।।तु.गा.१०६८.००२।।
देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवूनि निराळा दावी मज ।।तु.गा.१०६८.००३।।
तुका म्हणे आहे तुझें हें सकळ । कोण्या एका काळें देईं मज ।।तु.गा.१०६८.००४।।
समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ।।तु.गा.१०६९.००१।।
आणिक न लगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ।।तु.गा.१०६९.००२।।
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें चित्त झणीं जडो देसी ।।तु.गा.१०६९.००३।।
तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ।।तु.गा.१०६९.००४।।
सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाइच्या पती सोयरिया ।।तु.गा.१०७०.००१।।
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्वकाळ ।।तु.गा.१०७०.००२।।
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ।।तु.गा.१०७०.००३।।
तुका म्हणे कांहीं न मागे आणिक । तुझें पायीं सुख सर्व आहे ।।तु.गा.१०७०.००४।।
नामपाठ मुक्ताफळांच्या वोवणी । हें सुख सगुणीं अभीनव ।।तु.गा.१०७१.००१।।
तरी आम्ही जालों उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ।।तु.गा.१०७१.००२।।
द्यावें घ्यावें ऐसा येथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनिया ।।तु.गा.१०७१.००३।।
तुका म्हणे आतां अभयदान करा । म्हणा विश्वंभरा दिलें ऐसें ।।तु.गा.१०७१.००४।।
समर्थाचे सेवें कोठें नाहीं घात । पाहों नये अंत पांडुरंगा ।।तु.गा.१०७२.००१।।
आहे तैसी नीत विचारावी बरी । येऊनी भीतरी वास करा ।।तु.गा.१०७२.००२।।
निढळ राखिलें तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ।।तु.गा.१०७२.००३।।
तुका म्हणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभकीर्ति ।।तु.गा.१०७२.००४।।
वारंवार हाचि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ।।तु.गा.१०७३.००१।।
इच्छेचा ये दाता तूं एक समर्था । अगा कृपावंता माय बापा ।।तु.गा.१०७३.००२।।
लाभाचिये वोढी उतावीळ मन । त्यापरि चिंतन चरणाचें ।।तु.गा.१०७३.००३।।

तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ।।तु.गा.१०७३.००४।।
पावलें पावलें तुझें आम्हां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ।।तु.गा.१०७४.००१।।
जेथें तेथें देखें तुझींच पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ।।तु.गा.१०७४.००२।।
भेदाभेदमतें भ्रमाचे संवाद । आम्हां नको वाद त्यांशीं देऊं ।।तु.गा.१०७४.००३।।
तुका म्हणे अणु तुजविण नाहीं । नभाहुनि पाहीं वाढ आहे ।।तु.गा.१०७४.००४।।
वाळूनियां जन सांडी मज दुरी । करिसील हरी ऐसें कधीं ।।तु.गा.१०७५.००१।।
आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ।।तु.गा.१०७५.००२।।
नावडती जीवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ।।तु.गा.१०७५.००३।।
तुका म्हणे ऐसी धरितों वासना । होईं नारायणा साह्य मज ।।तु.गा.१०७५.००४।।
होईल तो भोग भोगीन आपुला । न घालीं विठ्ठला भार तुज ।।तु.गा.१०७६.००१।।
तुम्हांपासाव हें इच्छीतसें दान । अंतरीचें ध्यान मुखीं नाम ।।तु.गा.१०७६.००२।।
नयें काकुलती गर्भवासासाठीं । न धरीं हें पोटीं भय कांहीं ।।तु.गा.१०७६.००३।।
तुका म्हणे मज उदंड एवढें । नाचेन मी पुढें मायबापा ।।तु.गा.१०७६.००४।।
कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका नये ।।तु.गा.१०७७.००१।।
तैसें मज नको करूं कमळापती । देई या संगति सज्जनांची ।।तु.गा.१०७७.००२।।
तिनें पाचारिले इल बा म्हणोन । येरु पळे आण झाली आतां ।।तु.गा.१०७७.००३।।
तुका म्हणे येरा येरा जेंवि छिन्न । तेथें वाढे शीण सुखा पोटी ।।तु.गा.१०७७.००४।।
नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढें पोटीं ऐसें करीं ।।तु.गा.१०७८.००१।।
रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांग ही गात्रीं प्रेम तुझें ।।तु.गा.१०७८.००२।।
सर्वही शरीर वेंचों या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ।।तु.गा.१०७८.००३।।
तुका म्हणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतांपायीं ।।तु.गा.१०७८.००४।।
अनाथ परदेशी हीन दीन भोळें । उगलेंचि लोळे तुझें रंगीं ।।तु.गा.१०७९.००१।।
आपुलें म्हणावें मज नुपेक्षावें । प्रेमसुख द्यावें माय बापा ।।तु.गा.१०७९.००२।।

कासवीचे परी पाहे दृष्टीं मज । विज्ञान उमज दावुनियां ।।तु.गा.१०७९.००३।।
तुका म्हणे तुझा झालों शरणागत । काया वाचा चित्त दुजें नाहीं ।।तु.गा.१०७९.००४।।
मागत्याची कोठें घडते निरास । लेंकरा उदास नाहीं होत ।।तु.गा.१०८०.००१।।
कासया मी होऊं उतावीळ जीवीं । जाणतां गोसावी सर्व आहे ।।तु.गा.१०८०.००२।।
झाला तरी वेळ कवतुकासाठी । निर्दया तों पोटीं उपजेना ।।तु.गा.१०८०.००३।।
तुका म्हणे त्यासी ठाउकें उचित । होईल संकेत नेमियेला ।।तु.गा.१०८०.००४।।
कां जी तुम्ही ऐसे नव्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठायींच्या ठायीं ।।तु.गा.१०८१.००१।।
कांहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ।।तु.गा.१०८१.००२।।
दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्वें दातारें दाखवीं तीं ।।तु.गा.१०८१.००३।।
तुका म्हणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण म्हणऊनि ।।तु.गा.१०८१.००४।।
येतील अंतरीं शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ।।तु.गा.१०८२.००१।।
आतां माझा जीव घेउनियां बळी । बैसवावें ओळी संताचिये ।।तु.गा.१०८२.००२।।
विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वांझे ।।तु.गा.१०८२.००३।।
तुका म्हणे आलों निर्वाणाचे वरी । राहों नेदीं उरी नारायणा ।।तु.गा.१०८२.००४।।
सांवळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदयीं माझें ।।तु.गा.१०८३.००१।।
आणीक कांहीं इच्छा आम्हां नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगा ।।तु.गा.१०८३.००२।।
जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आम्हांसी सहज द्यावें आतां ।।तु.गा.१०८३.००३।।
तुका म्हणे तुज ऐसे जी दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आम्हां ।।तु.गा.१०८३.००४।।
मोक्षाचें आम्हासी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ।।तु.गा.१०८४.००१।।
भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ।।तु.गा.१०८४.००२।।
ज्याचें त्यासीं देणें कोण तें उचित । मानूनियां हित घेतो सुखें ।।तु.गा.१०८४.००३।।
तुका म्हणे सुखें देईं संसार । आवडीसी थार करीं माझे ।।तु.गा.१०८४.००४।।
पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ।।तु.गा.१०८५.००१।।

प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ।।तु.गा.१०८५.००२।।
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ।।तु.गा.१०८५.००३।।
तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दु:खाचे डोंगर झाले तरी ।।तु.गा.१०८५.००४।।
नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असो द्यावी ।।तु.गा.१०८६.००१।।
सरलिया भोग येईन सेवटीं । पायापें या भेटी अनुसंधानें ।।तु.गा.१०८६.००२।।
आतां मजसाठीं याल आकारास । रोकडी हे आस नाहीं देवा ।।तु.गा.१०८६.००३।।
तुका म्हणे मुखीं असो तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ ।।तु.गा.१०८६.००४।।
डगमगी मन निराशेच्या गुणें । हें तों नारायणें शांतवीजे ।।तु.गा.१०८७.००१।।
धीर तूं गंभीर जीवन जगाचें । जळो विभागाचें अहाच ते ।।तु.गा.१०८७.००२।।
भेईल जीव हें देखोनि कठिण । केला जातो शीण तो तो वायां ।।तु.गा.१०८७.००३।।
तुका म्हणे आवश्यक हें वचन । पाळावेंचि दान समयो आहे ।।तु.गा.१०८७.००४।।
इच्छेपाशीं आलों फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीचे ।।तु.गा.१०८८.००१।।
द्यावें लवकरी मागितलें दान । मुळींचें जतन करूनि असें ।।तु.गा.१०८८.००२।।
उपाय हे करी एकाचि वचना । दावूनियां खुणा ठाया येतों ।।तु.गा.१०८८.००३।।
तुका म्हणे गांठीं किती तुजपाशीं । जगाच्या तोडिसी चिंतनानें ।।तु.गा.१०८८.००४।।
काय करूं मज नागवलें आळसें । बहुत या सोसें पीडा केली ।।तु.गा.१०८९.००१।।
हिरोनियां नेला मुखींचा उच्चार । पाडिलें अंतर जवळीच ।।तु.गा.१०८९.००२।।
द्वैताचिया कैसा सांपडलों हातीं । बहूत करती ओढाओढी ।।तु.गा.१०८९.००३।।
तुका म्हणे आतां आपुलिया सवा । न्यावें मज देवा सोडवूनी ।।तु.गा.१०८९.००४।।
लडिवाळ म्हणोनी निष्ठुर न बोला । परी सांभाळिला लागे घात ।।तु.गा.१०९०.००१।।
बहु वागवीत आणिलें दुरूनी । दिसांची पोसणी बहु आहे ।।तु.गा.१०९०.००२।।
नाहीं लागों दिला आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजेना ।।तु.गा.१०९०.००३।।
तुका म्हणे तुम्ही कृपावंत हरि । शांतवा उत्तरीं अमृताच्या ।।तु.गा.१०९०.००४।।

जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देईं प्रेमसुख ।।तु.गा.१०९१.००१।।
देहभाव राखा दीन करूनियां । जनाचारी वायां जाय तैसा ।।तु.गा.१०९१.००२।।
द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ।।तु.गा.१०९१.००३।।
तुझें नाम माझें धरोनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ।।तु.गा.१०९१.००४।।
तुका म्हणे तुझे जडोनियां पायीं । झालों उतराई पांडुरंगा ।।तु.गा.१०९१.००५।।
माझें हातीं आहे करावें चिंतन । तुम्हीं कृपादान प्रेम द्यावें ।।तु.गा.१०९२.००१।।
मागतिया भांडवल आळवण । नामासी जतन दातियासी ।।तु.गा.१०९२.००२।।
बाळक धांवोनी आड रिघे स्तनीं । घालावा जननी प्रेमपान्हा ।।तु.गा.१०९२.००३।।
तुका म्हणे करी कासवीचे परी । आहे सूत्रदोरी तुझें हातीं ।।तु.गा.१०९२.००४।।
समर्थ या नांवें दीनांचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामीअंगीं ।।तु.गा.१०९३.००१।।
मज काय लागे करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ।।तु.गा.१०९३.००२।।
दयासिंधु तुम्हां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपामृतें ।।तु.गा.१०९३.००३।।
तुका म्हणे अहो पंढरीनिवासे । बहुजीव आसे लागतसे ।।तु.गा.१०९३.००४।।
अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीही ।।तु.गा.१०९४.००१।।
ऐसीयांचा संग देईं नारायणा । बोलावा वचना जयाचिया ।।तु.गा.१०९४.००२।।
उत्तम सेवन सीतळ कंठासी । पुष्ट कांती तैसी दिसे वरी ।।तु.गा.१०९४.००३।।
तुका म्हणे तैसे होईजेते संगें । वास लागे अंगें चंदनाच्या ।।तु.गा.१०९४.००४।।
नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करी देवा ।।तु.गा.१०९५.००१।।
नयो कामक्रोध द्वेष निंदा द्वंद्व । अवघा गोविंद निःसंदेह ।।तु.गा.१०९५.००२।।
असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझें पायीं ।।तु.गा.१०९५.००३।।
करोनियां साह्य पुरवी मनोरथ । व्हावें कृपावंत तुका म्हणे ।।तु.गा.१०९५.००४।।
ऐसें सत्य माझें येईल अंतरा । तरीच मज करा कृपा देवा ।।तु.गा.१०९६.००१।।
वचनासारिखें तळमळें चित्त । बाहेरी तो आंत होईल भाव ।।तु.गा.१०९६.००२।।

तरीच मज ठाव द्यावा पायापाशीं । सत्यत्वें जाणसी दास खरा ।।तु.गा.१०९६.००३।।
तुका म्हणे सत्य निकट सेवक । तरिच भातुकें प्रेम द्यावें ।।तु.गा.१०९६.००४।।
ऋणाच्या परिहारा जालों वोळगणा । द्यावी नारायणा वासलाती ।।तु.गा.१०९७.००१।।
जालों उतराई शरीरसंकल्पें । चुकों द्यावी पापें सकळहीं ।।तु.गा.१०९७.००२।।
आजिवरी होतों धरूनि जीवासी । व्याजें कांसाविसी बहु केलें ।।तु.गा.१०९७.००३।।
तुका म्हणे मना आणिला म्यां भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ।।तु.गा.१०९७.००४।।
आवडी न पुरे सेवितां न सरे । पडियेली धुरे सवें गांठीं ।।तु.गा.१०९८.००१।।
न पुरे हा जन्म हें सुख साठितां । पुढतीहीं आतां हेंचि मागों ।।तु.गा.१०९८.००२।।
मारगाची चिंता पालखी बैसतां । नाहीं उसंतितां कोस पेणी ।।तु.गा.१०९८.००३।।
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक ताहान ।।तु.गा.१०९८.००४।।
सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवांचे न्हाणीं होईन किडा ।।तु.गा.१०९९.००१।।
ऐसे जन्म आतां मज देईं देवा । आवडी हें जीवा सर्व काळ ।।तु.गा.१०९९.००२।।
त्यांचें चरणरज येती अंगावरी । वंदिन तें शिरीं जाईन मागें ।।तु.गा.१०९९.००३।।
तुका म्हणे येथें राहिलासे भाव । सकळही वाव जाणोनियां ।।तु.गा.१०९९.००४।।
आतां काढाकाढी करी गा पंढरिराया । नाहीं तरीं वायां गेलों दास ।।तु.गा.११००.००१।।
जाणतां बैसलों दगडाचें नावें । तिचा तो स्वभाव प्राण घ्यावा ।।तु.गा.११००.००२।।
मनाचा स्वभाव इंद्रियाची ओढी । पतनाचे जोडी वरी हांव ।।तु.गा.११००.००३।।
तुका म्हणे जाली आंधळ्याचे परी । आतां मज हरी वाट दावी ।।तु.गा.११००.००४।।
लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ।।तु.गा.११०१.००१।।
चुकलियां कामा मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ।।तु.गा.११०१.००२।।
पाय सांडूनियां फिरतो बासर । स्वामिसेवा चोर हाऊनियां ।।तु.गा.११०१.००३।।
तुका म्हणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजे ।।तु.गा.११०१.००४।।
आम्हां वैष्णवांचा कुलधर्म कुळीचा । विश्वास नामाचा एका भावें ।।तु.गा.११०२.००१।।

तरीच हरिदास म्हणवितां श्लाघीजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ।।तु.गा.११०२.००२।।
गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्तिमुक्ति दोन्ही न मागों तुज ।।तु.गा.११०२.००३।।
सगुण निर्गुण एकचि आवडी । चित्तें दिली बुडी चिदानंदीं ।।तु.गा.११०२.००४।।
वृत्तिसहित मन रिघे प्रेमडोहीं । नाठविती देहीं देहभाव ।।तु.गा.११०२.००५।।
तुका म्हणे देवा ऐसीयांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ।।तु.गा.११०२.००६।।
मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसीं तों सकळ चिंता त्याची ।।तु.गा.११०३.००१।।
ऐसा परस्परें आहे जी विचार । भोपळ्याचा तार दगडासी ।।तु.गा.११०३.००२।।
भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परी संगें नव्हे तैसा ।।तु.गा.११०३.००३।।
तुका म्हणे करा परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ।।तु.गा.११०३.००४।।
किती तुजपाशीं देऊं परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ।।तु.गा.११०४.००१।।
आतां माझे हातीं देईं माझें हित । करीं माझें चित्त समाधान ।।तु.गा.११०४.००२।।
राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ।।तु.गा.११०४.००३।।
तुका म्हणे तैसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ।।तु.गा.११०४.००४।।
पोट धालें मग नलगे पंगती । झालिया निश्चिंती खेंळ गोड ।।तु.गा.११०५.००१।।
आपुलिया हातें देईं वो कवळ । विठ्ठल शीतळ जीवन वरी ।।तु.गा.११०५.००२।।
घराचा विसर होईल आनंदें । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ।।तु.गा.११०५.००३।।
तुका म्हणे तोंचिवरी करकर । मग हें उत्तर खंडईल ।।तु.गा.११०५.००४।।
सारीन तें आतां एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळोंवेळां ।।तु.गा.११०६.००१।।
शेवटींचा घास गोड करी माते । अगे कृपावंते पांडुरंगे ।।तु.गा.११०६.००२।।
वंचूं नये आतां कांहींच प्रकार । धाकल्याचे थोर झाल्यावरी ।।तु.गा.११०६.००३।।
तुका म्हणे पोटीं बहु झाला वाव । कांहीं नेदी ठाव उरों मागें ।।तु.गा.११०६.००४।।
नाहीं तुम्हां कांहीं लाविलें मागणें । कांटाळ्याच्या भेणें त्रासलेती ।।तु.गा.११०७.००१।।
एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ।।तु.गा.११०७.००२।।

पायांच्या वियोगें प्राणासंवसाटीं । नेघेवेसी तुटी झाली आतां ।।तु.गा.११०७.००३।।
तुका म्हणे तुम्हां मागणें तें आतां । हेंचि कृपावंता चरणीं वास ।।तु.गा.११०७.००४।।
नको देऊं देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाठविसी ।।तु.गा.११०८.००१।।
नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्वेग होय जीवा ।।तु.गा.११०८.००२।।
तुका म्हणे करी फकिराचे परी । रात्रंदिवस हरी येईल वाचे ।।तु.गा.११०८.००३।।
हरि तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ।।तु.गा.११०९.००१।।
अंतरीं विश्वास अखंड नामाचा । कायामनेंवाचा हेंचि देई ।।तु.गा.११०९.००२।।
तुका म्हणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ।।तु.गा.११०९.००३।।
आतां तरी मज सांगा साच भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ।।तु.गा.१११०.००१।।
चुकलिया कर्म नोहे तें कारण । केला होय सीण अवघाचि ।।तु.गा.१११०.००२।।
कळे म्हणवुनी करीतसें वाद । दिसें भेदाभेद अंतरींच ।।तु.गा.१११०.००३।।
तुका म्हणे नको पाहूं तूं निर्वाण । देईं कृपादान याचकासी ।।तु.गा.१११०.००४।।
हेंचि सुख पुढती मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ।।तु.गा.११११.००१।।
जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ।।तु.गा.११११.००२।।
दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ।।तु.गा.११११.००३।।
अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ।।तु.गा.११११.००४।।
तुका म्हणे आम्ही जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरविसी ।।तु.गा.११११.००५।।
एकांताचें सुख देईं मज देवा । आघात या जीवा चुकवूनी।।तु.गा.१११२.००१।।
ध्यानीं रूप वाचें नाम निरंतर। आपुला विसर पडों नेदीं।।तु.गा.१११२.००२।।
मायबाळा भेटी सुखाची आवडी। तैसी मज गोडी देईं देवा।।तु.गा.१११२.००३।।
कीर्ती ऐकोनियां जालों शरणागत। दासाचें तूं हित करितोसी।।तु.गा.१११२.००४।।
तुका म्हणे मी तो दीन पापराशी। घालावें पाठीशीं मायबापा।।तु.गा.१११२.००५।।
येणें मुखें तुझें वर्णी गुण नाम । तेंचि मज प्रेम देईं देवा ।।तु.गा.१११३.००१।।

डोळे भरूनियां पाहेन तुझें मुख । तेंचि मज सुख देईं देवा ।।तु.गा.१११३.००२।।
कान भरोनियां ऐकेन तुझी कीर्ती । तें मज विश्रांती देईं देवा ।।तु.गा.१११३.००३।।
वाहे रंगीं टाळी नाचेन उदास । हें देईं हातांस पायां सुख ।।तु.गा.१११३.००४।।
तुका म्हणे माझा सकळ देहभाव । आणीक नको ठाव चिंतूं यासी ।।तु.गा.१११३.००५।।
पांडुरंगा कांहीं आईकावी मात । न करावें मुक्त आतां मज ।।तु.गा.१११४.००१।।
जन्मांतरें मज तैसीं देईं देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ।।तु.गा.१११४.००२।।
वाखाणीन कीर्ती आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ।।तु.गा.१११४.००३।।
करूनि कामारी दास दीनाहुनी । आपुल्या अंगणीं ठाव मज ।।तु.गा.१११४.००४।।
तुका म्हणे आम्ही मृत्यूलोकीं भले । तुझेचि अंकिले पांडुरंगा ।।तु.गा.१११४.००५।।
त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ।।तु.गा.१११५.००१।।
एकचि मागणें देईं तुझी गोडी । नलगे आवडी आणिकांची ।।तु.गा.१११५.००२।।
तुझें गुण नाम वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगीं ।।तु.गा.१११५.००३।।
बाप विठ्ठलराया हेंचि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ।।तु.गा.१११५.००४।।
आवडीसारिखें मागितलें जरी । तुका म्हणे करीं समाधान ।।तु.गा.१११५.००५।।
अभयदान मज देईं वो दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ।।तु.गा.१११६.००१।।
देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं दुजें नेणें ।।तु.गा.१११६.००२।।
सेवाभक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ।।तु.गा.१११६.००३।।
तुका म्हणे तुझे नाम दीनानाथ । तें मज उचित करी आतां ।।तु.गा.१११६.००४।।
काय देह घालूं करवती कर्मरी । टाकूं या भितरीं अग्नीमाजी ।।तु.गा.१११७.००१।।
काय सेवूं वन शीतउष्ण तहान । साहों कीं मोहन धरूनी बैसों ।।तु.गा.१११७.००२।।
काय लावूं अंगीं भस्म उधळण । हिंडूं देश कोण खुंट चारी ।।तु.गा.१११७.००३।।
काय त्यजूं अन्न करूं मी उपवास । काय करूं नास जीवित्वाचा ।।तु.गा.१११७.००४।।
तुका म्हणे काय करावा उपाव । ऐसा देईं भाव पांडुरंगा ।।तु.गा.१११७.००५।।

आमची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ।।तु.गा.१११८.००१।।
प्रेमपान्हा स्तनीं सदासर्वकाळ । दृष्टी हे निर्मळ अमृताची ।।तु.गा.१११८.००२।।
भूक तहान दु:ख वाटों नेदी शीण । अंतरीचा गुण जाणोनियां ।।तु.गा.१११८.००३।।
आशा तृष्णा माया चिंता दवडी दुरी । ठाव आम्हां करी खेळावया ।।तु.गा.१११८.००४।।
तुका म्हणे लावी संतांचा सांगात । तेथें न पवे हात कळिकाळाचा ।।तु.गा.१११८.००५।।
मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हें माझिया जीवा चाड ।।तु.गा.१११९.००१।।
तुझ्या पायांसाठीं केली आराणूक । आतां कांहीं एक नको दुजें ।।तु.गा.१११९.००२।।
करूनियां कृपा करीं अंगीकार । न लावीं उशीर आतां देवा ।।तु.गा.१११९.००३।।
नव्हें साच कांहीं कळों आलें मना । म्हणोनि वासना आवरिली ।।तु.गा.१११९.००४।।
तुका म्हणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ।।तु.गा.१११९.००५।।
तरि कां नेणतें होते मागें ऋषी । तीही या जनासी दुराविले ।।तु.गा.११२०.००१।।
वोळगती जया अष्टमहासिद्धी । ते या जनबुद्धी नातळती ।।तु.गा.११२०.००२।।
कंद मुळें पाला धातूच्या पोषणा । खाती वास रानांतरीं केला ।।तु.गा.११२०.००३।।
लावुनियां नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले मौन्यरुप ।।तु.गा.११२०.००४।।
तुका म्हणे ऐसे करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ।।तु.गा.११२०.००५।।
नलगे देवा तुझें आम्हांसी वैकुंठ । सायुज्यता पट्ट नलगे मज ।।तु.गा.११२१.००१।।
देईं तुझें नाम मज सर्वकाळीं । मागणें वनमाळी हेंचि तुज ।।तु.गा.११२१.००२।।
नारद तुंबर उद्धव प्रह्लाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ।।तु.गा.११२१.००३।।
सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामें ।।तु.गा.११२१.००४।।
तुका म्हणे हरी देईं तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ।।तु.गा.११२१.००५।।
विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठेवूनियां चित्त तुझें पायीं ।।तु.गा.११२२.००१।।
तरावें बुडावें तुझियां वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ।।तु.गा.११२२.००२।।
न कळें हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेईन देवा ।।तु.गा.११२२.००३।।

मागणें तें सरे ऐसें करी देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ।।तु.गा.११२२.००४।।
करावें कांहीं कीं पाहावें उगलें । तुका म्हणे बोले पांडुरंगा ।।तु.गा.११२२.००५।।
कृपाळू म्हणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें याचि मज ।।तु.गा.११२३.००१।।
आणीक उपाय नेणेंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ।।तु.गा.११२३.००२।।
नसे धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्व भावें ।।तु.गा.११२३.००३।।
कृपा करिसी तरी थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ।।तु.गा.११२३.००४।।
तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ।।तु.गा.११२३.००५।।
भावबळें कैसा जालासी लहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ।।तु.गा.११२४.००१।।
तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ।।तु.गा.११२४.००२।।
पाहोनियां डोळा बोलेन मी गोष्टी । आलिंगूनि मिठी देईन पायीं ।।तु.गा.११२४.००३।।
चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ।।तु.गा.११२४.००४।।
तुका म्हणे उत्कंठित हे वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ।।तु.गा.११२४.००५।।
आत्मस्थिति मज नको हा विचार । देईं निरंतर चरणसेवा ।।तु.गा.११२५.००१।।
जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी आम्हां देईं जीवा ।।तु.गा.११२५.००२।।
काय सायुज्यता मुक्तीची हे चाड । देव भक्त कोड तेथें नाहीं ।।तु.गा.११२५.००३।।
काय तें निर्गुण पाहों कैशापरी । वर्णूं तुझी हरी कीर्ती कैसी ।।तु.गा.११२५.००४।।
गोड चरणसेवा देवभक्तपणें । मज देवा झणें दुराविसी ।।तु.गा.११२५.००५।।
जाणिवेपासूनि सोडवीं सत्वर । देईं निरंतर चरणसेवा ।।तु.गा.११२५.००६।।
तुका म्हणे गोडा गोड नलगे प्रीति । सेवेविण चित्तीं सार नाहीं ।।तु.गा.११२५.००७।।
कुळींचें दैवत ज्याचें पंढरिनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ।।तु.गा.११२६.००१।।
शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करी भलतें ठायीं दास तुझा ।।तु.गा.११२६.००२।।
पंढरीस कोणी जाती वारकरी । होईन त्याचे घरीं पशुयाति ।।तु.गा.११२६.००३।।
विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ।।तु.गा.११२६.००४।।

तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचें घरीं ।।तु.गा.११२६.००५।।
तुका म्हणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिका गती चाड मज ।।तु.गा.११२६.००६।।
पढिये तें आम्हीं तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ।।तु.गा.११२७.००१।।
पाळशील लळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जननिये ।।तु.गा.११२७.००२।।
जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूंचि सर्वां ठायीं एक आम्हां ।।तु.गा.११२७.००३।।
दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ।।तु.गा.११२७.००४।।
सर्वसत्ता एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ।।तु.गा.११२७.००५।।
म्हणवूनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां चोळी डोळे तुका ।।तु.गा.११२७.००६।।
अगा करूणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरि ।।तु.गा.११२८.००१।।
ऐकोनियां माझीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ ।।तु.गा.११२८.००२।।
मागें पुढें अवघा दिसें रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ।।तु.गा.११२८.००३।।
उशीर तो आतां न पाहिजे केला । अहो जी विठ्ठला मायबापा ।।तु.गा.११२८.००४।।
उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ।।तु.गा.११२८.००५।।
तुका म्हणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळां ।।तु.गा.११२८.००६।।
मागता भिकारी जालों तुझें द्वारीं । देईं मज हरी कृपादान ।।तु.गा.११२९.००१।।
प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजी ।।तु.गा.११२९.००२।।
सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळू तूं जगामाजी एक ।।तु.गा.११२९.००३।।
तापत्रयें माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ।।तु.गा.११२९.००४।।
संबंधीं जनवाद पीडलों परोपरी । अंतरलों दुरी तुजसी तेणें ।।तु.गा.११२९.००५।।
तुका म्हणे आतां तुझा शरणागत । करावें सनाथ मायबापा।।तु.गा.११२९.००६।।
न म्हणे कोणा सिद्ध साधक गव्हार । अवघा विश्वंभर वांचूनियां ।।तु.गा.११३०.००१।।
ऐसें माझें बुद्धि काया वाचा मन । लावी तुझें ध्यान पांडुरंगा ।।तु.गा.११३०.००२।।
गातां प्रेमगुण शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ।।तु.गा.११३०.००३।।

देईं चरणसेवा भूतांचे भजन । वर्ण अभिमान सांडवूनि ।।तु.गा.११३०.००४।।
आशापाश माझी तोडी माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ।।तु.गा.११३०.००५।।
तुका म्हणे सर्वभाव तुझे पायीं । राहे ऐसें देईं प्रेम देवा ।।तु.गा.११३०.००६।।
आतां केशीराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ।।तु.गा.११३१.००१।।
देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावे ।।तु.गा.११३१.००२।।
काळाचें खंडन घडावें चिंतन । तनमनधन विन्मुखता ।।तु.गा.११३१.००३।।
कफवातपित्त देहअवसानीं । ठेवावी वारुनि दुरितें हीं ।।तु.गा.११३१.००४।।
सावध तों माझीं इंद्रियें सकळ । दिली एक वेळ हाक आधीं ।।तु.गा.११३१.००५।।
तुका म्हणे तूं या सकळांचा जनिता । येथें ऐक्यता सकळांसी ।।तु.गा.११३१.००६।।
देवा आतां ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ।।तु.गा.११३२.००१।।
तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ।।तु.गा.११३२.००२।।
ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ।।तु.गा.११३२.००३।।
आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ।।तु.गा.११३२.००४।।
मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देईं ।।तु.गा.११३२.००५।।
तुका म्हणे नको वरपंग देवा । घेईं माझी सेवा भावशुद्ध ।।तु.गा.११३२.००६।।
आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहों भाव तुझ्या पायीं ।।तु.गा.११३३.००१।।
काय चाले तुम्हीं बांधले दातारा । वाहिलिया भारा उसंतितों ।।तु.गा.११३३.००२।।
शरीर तें करी शरीराचे धर्म । नको देऊं वर्म चुकों मना ।।तु.गा.११३३.००३।।
चळण फिरवी ठाव बहुवस । न घडो आळस चिंतनाचा ।।तु.गा.११३३.००४।।
इंद्रियें करोत आपुले व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ।।तु.गा.११३३.००५।।
तुका म्हणे नको देऊं काळा हातीं । येतों काकुळती म्हणऊनी ।।तु.गा.११३३.००६।।
चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणांवरि माथा ।।तु.गा.११३४.००१।।
वेळोंवेळा देईं क्षेमआलिंगन । करी अवलोकन कृपादृष्टी ।।तु.गा.११३४.००२।।

प्रक्षाळूं दे पाय बैस माजघरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ।।तु.गा.११३४.००३ ।।
आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ।।तु.गा.११३४.००४ ।।
करूणाकरें नाहीं कळों दिलें वर्म । दूरी होतां भ्रम कोण वारी ।।तु.गा.११३४.००५ ।।
तुका म्हणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ।।तु.गा.११३४.००६ ।।
नको मज ताठा नको अभिमान । तुजवीण क्षीण होतो जीव ।।तु.गा.११३५.००१ ।।
दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ।।तु.गा.११३५.००२ ।।
तुका म्हणे तुझें झालिया दरुषण । मग निवारण होईल सर्व ।।तु.गा.११३५.००३ ।।
नरस्तुति आणि कथेचा विकरा । हें नको दातारा घडों देऊं ।।तु.गा.११३६.००१ ।।
ऐसिये कृपेची भाकितों करुणा । आहेसि तूं राणा उदाराचा ।।तु.गा.११३६.००२ ।।
पराविया नारी आणि परधना । नको देऊं मनावरी येऊं ।।तु.गा.११३६.००३ ।।
भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडों देऊं ।।तु.गा.११३६.००४ ।।
देहअभिमान नको देऊं शरीरीं । चढों कांहीं परी एक देऊं ।।तु.गा.११३६.००५ ।।
तुका म्हणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ।।तु.गा.११३६.००६ ।।
तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हां तेचि घडी झडो माझी ।।तु.गा.११३७.००१ ।।
हेंचि मज देईं हेंचि मज देईं । आणिक दुजें कांहीं न मागे तुज ।।तु.गा.११३७.००२ ।।
बहिर कान तुझी कीर्ति नाइकतां । पाय न देखतां जावोत डोळे ।।तु.गा.११३७.००३ ।।
मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ।।तु.गा.११३७.००४ ।।
हातपाय तेणें पंथें न चालतां । जावोत अनंता गळोनियां ।।तु.गा.११३७.००५ ।।
तुजविण जिणे नाहीं मज चाड । तुका म्हणे गोड नाम तुझें ।।तु.गा.११३७.००६ ।।
अखंड जया तुझी प्रीती । मज दे तयाची संगति । मग मी कमळापति । तुज बा नाणीं कांटाळा ।।तु.गा.११३८.००१ ।।
पडोन राहेन तये ठायीं । उगाचि संतांचिये पायीं । न मागे न करीं कांहीं । तुझी आण गा विठोबा ।।तु.गा.११३८.००२ ।।
तुम्ही आम्ही पीडों जेणें । दोन्ही वारती एकानें । बैसलों धरणें । हाका देत दाराशीं ।।तु.गा.११३८.००३ ।।
तुका म्हणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला । न पाहिजे केला । अवघा माझा अव्हेर ।।तु.गा.११३८.००४ ।।

तुझ्या रूपें माझी काया। भरों द्यावी पंढरीराया। दर्पणींची छाया। एका रूपें भिन्नत्वें ॥तु.गा.११३९.००१॥
सुख पडिलें सांठवणें। सत्ता वेचे शनें शनें। अडचणीचे कोन। चारी मार्ग उगवले ॥तु.गा.११३९.००२॥
वसो डोळ्यांची बाहुली। कवळे भिन्न छाया आली। कृष्णांजन चाली। नव्हे परती माघारी ॥तु.गा.११३९.००३॥
जीव ठसावला शिवें। मना आलें तेथें जावें। फांटा पडिला नांवें। तुका म्हणे खंडलें ॥तु.गा.११३९.००४॥
होईन खडे गोटे। चरणरज साने मोठे। पंढरीचे वाटे। संतचरणीं लागेन ॥तु.गा.११४०.००१॥
आणिक दुजें कांहीं। मी मागे न तुजपाशीं। आठवितां सुख। भय नास नाहीं ज्यासी ॥तु.गा.११४०.००२॥
होईन मोचे वाहणा। पायीं सकळां संतजनां। मांजर सुकर सुणा। जवळी शेष घ्यावया ॥तु.गा.११४०.००३॥
सांडोवा पायरी। वोहळ बावी गंगातिरीं। होईन तयावरी। संतसज्जन चालती ॥तु.गा.११४०.००४॥
लागें संतां पायीं। ऐसा ठेवीं भलते ठायीं। तुका म्हणे देईं। धाक नाहीं जन्माचा ॥तु.गा.११४०.००५॥
हेचि माझे चित्तीं। राहो आतां भाव प्रीति। विठ्ठल सुषुप्तीं। जागृतीं स्वप्नासी ॥तु.गा.११४१.००१॥
आणिक नाहीं मागणें। राज्यचाड संपत्ति धनें। जिव्हे सुख तेणें। घेतां देहीं नाम तुझें ॥तु.गा.११४१.००२॥
तुझें रूप सर्वांठायीं। देखें ऐसें प्रेम देईं। ठेवावा हा पायीं। अनुभव चित्ताचा ॥तु.गा.११४१.००३॥
जन्ममरणाचा बाध। समूळूनि तुटो कंद। लागो हाचि छंद। हरि गोविंद वाचेसी ॥तु.गा.११४१.००४॥
काया पालटे दर्शनें। अवघें कोंदाटे चैतन्य। जीवशिवखंडण। होय तरे चिंतितां ॥तु.गा.११४१.००५॥
तुका म्हणे याचि भावें। आम्ही धालों तुझ्या नांवें। सुखें होत जन्में। भलते याती भलतैसीं ॥तु.गा.११४१.००६॥
जळो माझी ऐसी बुद्धी। मज घाली तुजमधीं। आवडी हे विधि। निषेधींच चांगली ॥तु.गा.११४२.००१॥
तूं स्वामी मी सेवक। उंच पद नीच एक। ऐसें करावें कौतुक। नको करूं खंडणा ॥तु.गा.११४२.००२॥
जळ न खाती जळा। वृक्ष आपुलिया फळा। भोक्ता तो निराळा। तेणें गोडी निवडिली ॥तु.गा.११४२.००३॥
हिरा शोभला कोंदणें। अळंकारीं मिरवे सोनें। एक असतां तेणें। काय दुजें जाणावें ॥तु.गा.११४२.००४॥
उष्णें छायें सुख वाटे। बाळें मातें पान्हा फुटे। एका एक भेटे। कोण सुख ते काळीं ॥तु.गा.११४२.००५॥
तुका म्हणे हित। हेंचि मानी माझें चित्त। नव्हे आतां मुक्त। ऐसा जाला भरंवसा ॥तु.गा.११४२.००६॥
माझें मज आतां न देखें निरसतां। म्हणऊन आधार केला। संसाराची आस सांडुनि लौकिक। जीव भाव तुज दिला। नव्हतीं माझीं कोणी मी कवणांचा। आर्त मोहो सांडवला। तारीं मारी करीं भलतें दातारा। होऊन आतां तुझा ठेलों रें ॥तु.गा.११४३.००१॥

असों माझें कोडें तुज हें सांकडें। मी असेन निवाडें सुखरूप। बाळकासी चिंता काय पोटव्यथा। जया शिरीं मायबाप।।तु.गा.११४३.००२।।

पापपुण्य श्रुति आटल्या। शास्त्रांसी न लगेचि ठाव। विधिनिषेधें गोविलीं पुराणें। वेदासी तो अहंभाव। ओंकाराचें मूळ व्यापिलें माया। तेथें न धरीच भाव। म्हणऊन काबाड सांडिलें उपसतां। धरिलें तुझेंचि नांव।।तु.गा.११४३.००३।।

तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों। सर्व आशा तुझें पायीं। तप तीर्थ दान करवूं कवणा हातीं। अधीन तें मज काई। आहिक्य परत्र चाड नाहीं सर्वथा। जन्म सदा मज देईं। मायामोहपाश करीं विष तैसें। तुका म्हणे माझ्याठायीं।।तु.गा.११४३.००४।।

संसारापासूनी कैसें सोडविशी। न कळे हृषीकेशी काय जालों। करितां न सरे कांहीं आधीक वाढ पाहीं। तृष्णा देशधडी केलों। भक्तिभजनभाव यांसी नाहीं ठाव। चरणीं तुझ्या अंतरलों। मागें पुढें रीघ न पुरेचि पाहतां। अवघा अवघीं वेष्टिलों।।तु.गा.११४४.००१।।

आतां माझी लाज राखें नारायणा। हीन दीन लीन याचकाची। करितां न कळे कांहीं असतील गुण दोष। करी होळी संचिताची।।तु.गा.११४४.००२।।

इंद्रियद्वारें मन धांवे सैरें। नागवे करितांचि कांहीं। हात पाय कान मुख लिंगस्थान। नेत्रद्वारें घ्राण पाहीं। जया जैसी सोय तया तैसें होय। क्षण एक स्थिर नाहीं। करिती तडातोडी ऐसी यांची खोडी। न चले माझें यास कांहीं।।तु.गा.११४४.००३।।

शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधु। धन लोभ मायावंतें। जन लोकपाळ मैत्र हे सकळ। सोइरीं सज्जनें बहुतें। नाना कर्म डाय करिती उपाय। बुडावया घातपातें। तुका म्हणे हरी राखे भलत्यापरी। आम्ही तुझीं शरणागतें।।तु.गा.११४४.००४।।

मागेन तें एक तुज। देईं विचारोनि मज।।तु.गा.११४५.००१।।

नको दुर्जनांचा संग। क्षणाक्षणा चित्तभंग।।तु.गा.११४५.००२।।

जन्म घेईन मी नाना। बहु सोसीन यातना।।तु.गा.११४५.००३।।

रंक होईन दीनांचा। घायें देहपात साचा।।तु.गा.११४५.००४।।

तुका म्हणे हेंचि आतां। देईं देईं तूं सर्वथा।।तु.गा.११४५.००५।।

दुडीवरी दुडी। चाले मोकळी गुजरी।।तु.गा.११४६.००१।।

ध्यान लागो ऐसें हरी। तुझे चरणीं तैशापरी।।तु.गा.११४६.००२।।

आवतण्याची आस। जैसी लागे दुर्बळास।।तु.गा.११४६.००३।।

लोभ्या कळांतराची आस। बोटें मोजी दिवस मास।।तु.गा.११४६.००४।।

तुका म्हणे पंढरीनाथा । मजला आणिक नका व्यथा ।।तु.गा.११४६.००५।।

काय बोलों सांगा। याउपरी पांडुरंगा।।तु.गा.११४७.००१।।

हरिजनासी भेटी। नहो अंगसंग तुटी।।तु.गा.११५२.००३।।
तुका म्हणे जिणें । भलें संतसंघष्टणें।।तु.गा.११५२.००४।।
माप म्हणे मी मवितें। भरी धणी ठेवी रितें।।तु.गा.११५३.००१।।
देवा अभिमान नको। माझे ठायीं देऊं सकों।।तु.गा.११५३.००२।।
देशीं चालें सिक्का । रितें कोण लेखी रंका।।तु.गा.११५३.००३।।
हातीं सूत्रदोरी। तुका म्हणे त्याची थोरीं।।तु.गा.११५३.००४।।
माझ्या मना लागो चाळा। पहावया विठ्ठल डोळां।।तु.गा.११५४.००१।।
आणीक नाहीं चाड। नलगे संसार हा गोड।।तु.गा.११५४.००२।।
तरिच फळ जन्मा आलों । सरता पांडुरंगीं जालों।।तु.गा.११५४.००३।।
तुका म्हणे देवा। देईं चरणांची सेवा।।तु.गा.११५४.००४।।
आतां द्यावें अभयदान। जीवन ये कृपेचें।।तु.गा.११५५.००१।।
उभारोनि बाहो देवा। हात ठेवा मस्तकीं।।तु.गा.११५५.००२।।
नाभी नाभी या उत्तरें। करूणाकरें शांतवीजे।।तु.गा.११५५.००३।।
तुका म्हणे केली आस। तो हा दिस फळाचा।।तु.गा.११५५.००४।।
शेवटींची हे विनंति। पाय चित्तीं रहावे।।तु.गा.११५६.००१।।
ऐसे करा कृपादान। तुम्हां मन सन्निध।।तु.गा.११५६.००२।।
भाग्येंवीण कैंची भेटी। नव्हे तुटी चिंतनें।।तु.गा.११५६.००३।।
तुका म्हणे कळसा आलें। हें विठ्ठलें परिसावें।।तु.गा.११५६.००४।।
वोढविलें अंग। आतां करूनि घ्यावें सांग।।तु.गा.११५७.००१।।
काय पूजा तें मी नेणें। जाणावें जी सर्वजाणें।।तु.गा.११५७.००२।।
पोटा आलें बाळ। त्याचें जाणावें सकळ।।तु.गा.११५७.००३।।
तुका म्हणे हरी। वाहावें जी कडियेवरी।।तु.गा.११५७.००४।।
जिकडे पाहे तिकडे देव। ऐसा भाव दे कांहीं।।तु.गा.११५८.००१।।

काय केलों एकदेशी । गुणदोषीं संपन्न ।।तु.गा.११५८.००२ ।।
पडे तेथें तुझ्या पायां । करी वायां न वजेसें ।।तु.गा.११५८.००३ ।।
तुका म्हणे विषमें सारी । ठाणें धरी जिवासी ।।तु.गा.११५८.००४ ।।
जिकडे जाय तिकडे सवें । आतां यावें यावरी ।।तु.गा.११५९.००१ ।।
माझ्या अवघ्या भांडवला । तूं एकला जालासी ।।तु.गा.११५९.००२ ।।
आतां दुजें धरा झणी । पायांहुनि वेगळें ।।तु.गा.११५९.००३ ।।
तुका म्हणे आतां देवा । नका गोवा यावरी ।।तु.गा.११५९.००४ ।।
आतां बरें जालें । माझें मज कळों आलें ।।तु.गा.११६०.००१ ।।
खोटा ऐसा संसार । मज पायीं द्यावी थार ।।तु.गा.११६०.००२ ।।
उघडल्यां डोळें । भोग देताकाळीं कळे ।।तु.गा.११६०.००३ ।।
तुका म्हणे जीवा । होता तडामोडी देवा ।।तु.गा.११६०.००४ ।।
केलियाचें दान । करा आपुलें जतन ।।तु.गा.११६१.००१ ।।
माझी बुद्धी स्थिर देवा । नाहीं विषयाचा हेवा ।।तु.गा.११६१.००२ ।।
भावा अंतराय । अंतीं अंतरती पाय ।।तु.गा.११६१.००३ ।।
तुका म्हणे जोडी । आदि अंतीं राहों गोडी ।।तु.गा.११६१.००४ ।।
पाहे तिकडे दिशा ओस । अवघी आस पायांपें ।।तु.गा.११६२.००१ ।।
मनिंचें साच होइल कईं । प्रेम देईं भेटोनि ।।तु.गा.११६२.००२ ।।
सर्वापरी पांगुळ असे । न कळे कैसें हें तुम्हां ।।तु.गा.११६२.००३ ।।
तुका म्हणे कृपावंत । तूं तों दाता दीनाचा ।।तु.गा.११६२.००४ ।।
जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ।।तु.गा.११६३.००१ ।।
मज नको लावूं तैसे । वायां जाय ऐसें पिसें ।।तु.गा.११६३.००२ ।।
धरितोसी सत्ता । होसी सकळ जाणता ।।तु.गा.११६३.००३ ।।
चतुराच्या राया । अंगीकारावें तुकया ।।तु.गा.११६३.००४ ।।

करूनि विनवणी। माथा ठेवितों चरणीं ।।तु.गा.११६४.००१ ।।
होतें तेंचि असों द्यावें। रूप सौम्यचि बरवें ।।तु.गा.११६४.००२ ।।
भया भेणें तुमचा ठाव। तुमच्या कोपें कोठें जावें ।।तु.गा.११६४.००३ ।।
तुका पायां लागे। दान समुदाय मागे ।।तु.गा.११६४.००४ ।।
वर्ततां बासर। काय करावें शरीर ।।तु.गा.११६५.००१ ।।
ठेवा नेमून नेमून। माझें तुमचे पायीं मन ।।तु.गा.११६५.००२ ।।
नेदाविया वृत्ती। कोठें फांको जी श्रीपती ।।तु.गा.११६५.००३ ।।
तुका म्हणे भले। जन्मा येउनियां ज्याले ।।तु.गा.११६५.००४ ।।
दुर्बुद्धि ते मना। कदा नुपजो नारायणा ।।तु.गा.११६६.००१ ।।
आतां मज ऐसें करीं। तुझे पाय चित्तीं धरीं ।।तु.गा.११६६.००२ ।।
उपजला भावो। तुझें कृपें सिद्धि जावो ।।तु.गा.११६६.००३ ।।
तुका म्हणे आतां। लाभ नाहीं यापरतां ।।तु.गा.११६६.००४ ।।
अहो कृपावंता। होय बुद्धीचा ये दाता ।।तु.गा.११६७.००१ ।।
जेणें पाविजे उद्धार। होय तुझे पायीं थार ।।तु.गा.११६७.००२ ।।
वदवीं हे वाचा। भाव पांडुरंगीं साचा ।।तु.गा.११६७.००३ ।।
तुका म्हणे देवा। माझें अंतर वसवा ।।तु.गा.११६७.००४ ।।
निर्धाराचें अवघें गोड। वाटे कोड कौतुक ।।तु.गा.११६८.००१ ।।
बैसलिया भाव पायीं। बरा तईं नाचेन ।।तु.गा.११६८.००२ ।।
स्वामी कळे सावधान। तरि मन उल्हासे ।।तु.गा.११६८.००३ ।।
तुका म्हणे आश्वासावें। प्रेम द्यावें विठ्ठले ।।तु.गा.११६८.००४ ।।
माझें पाय तुझी डोई। ऐसें करीं गा भाक देईं ।।तु.गा.११६९.००१ ।।
पाहतां दिसे उफराटें। घडे तईं भाग्य मोठें ।।तु.गा.११६९.००२ ।।
बहु साधन मोलाचें। यासी जोडा दुजें कैचें ।।तु.गा.११६९.००३ ।।

नका अनुमानूं विठ्ठला। तुका म्हणे धडा जाला।।तु.गा.११६९.००४।।
तुजवरी ज्याचें मन। दर्शन दे त्याचें।।तु.गा.११७०.००१।।
कैसा जाती शुद्ध भाव। हात पाव ना वृत्ती।।तु.गा.११७०.००२।।
अवघियांचा करूनी मेळा। तुज डोळां रोखिलें।।तु.गा.११७०.००३।।
तुका म्हणे तुज आड। लपोनि कोड दावी देवा।।तु.गा.११७०.००४।।
आतां माझ्या मायबापा। तूं या पापा प्रायश्चित्ता।।तु.गा.११७१.००१।।
फजित हे केले खळ। तो विटाळ निवारी।।तु.गा.११७१.००२।।
प्रेम आतां पाजीं रस। करीं वास अंतरीं।।तु.गा.११७१.००३।।
तुका म्हणे पांडुरंगा। जिवलगा माझिया।।तु.गा.११७१.००४।।
धर्माची तूं मूर्ति। पाप पुण्य तुझें हातीं।।तु.गा.११७२.००१।।
मज सोडवीं दातारा। कर्मापासूनि दुस्तरा।।तु.गा.११७२.००२।।
करिसी अंगीकार। तरी काय माझा भार।।तु.गा.११७२.००३।।
जिवींच्या जीवना। तुका म्हणे नारायणा।।तु.गा.११७२.००४।।
मज दास करीं त्याच्या। संतदासाच्या दासाचा।।तु.गा.११७३.००१।।
मग होत कल्पवरी। सुखें गर्भवास हरी।।तु.गा.११७३.००२।।
नीचवृत्तिकाम। परी मुखीं तुझें नाम ।।तु.गा.११७३.००३।।
तुका म्हणे सेवें। माझें संकल्प वेचावे।।तु.गा.११७३.००४।।
बोलायाचा त्यासीं। नको संबंध मानसीं।।तु.गा.११७४.००१।।
जया घडली संतनिंदा। तुज विसरूनि गोविंदा।।तु.गा.११७४.००२।।
जळों त्याचें तोंड। नको दृष्टीपुढें भांड।।तु.गा.११७४.००३।।
तुका म्हणे देवा। तया दुरी मज ठेवा।।तु.गा.११७४.००४।।
काय दिनकरा। कोंबड्यानें केला खरा।।तु.गा.११७५.००१।।
कां हो ऐसा संत ठेवा। भार माझें माथां देवा।।तु.गा.११७५.००२।।

आडविलें दासी। तरीं कां मरती उपवासी ।।तु.गा.११७५.००३ ।।
तुका म्हणे हातीं। कळा सकळ अनंतीं ।।तु.गा.११७५.००४ ।।
अधमाची यारी। रंग पतंगाचे परी ।।तु.गा.११७६.००१ ।।
विटे न लगतां क्षण। मोल जाय वायांविण ।।तु.गा.११७६.००२ ।।
सर्पाचिया परी। विषें भरला कल्हारीं ।।तु.गा.११७६.००३ ।।
तुका म्हणे देवा। मज झणी ऐसे दावा ।।तु.गा.११७६.००४ ।।
काय कळे बाळा। बाप सदैव दुबळा ।।तु.गा.११७७.००१ ।।
आहे नाहीं हें न कळे। हातीं काय कोण्या वेळे ।।तु.गा.११७७.००२ ।।
देखिलें तें दृष्टी। मागे घालूनियां मिठी ।।तु.गा.११७७.००३ ।।
तुका म्हणे भावें। माझ्या मग समजावें ।।तु.गा.११७७.००४ ।।
नसे तरी मनीं नसो। परी वाचे तरी वसो ।।तु.गा.११७८.००१ ।।
देह पडो या चिंतनीं। विठ्ठलनामसंकीर्तनीं ।।तु.गा.११७८.००२ ।।
दंभस्फीति भलत्या भावें। मज हरिजन म्हणवावें ।।तु.गा.११७८.००३ ।।
तुका म्हणे काळांतरीं। मज सांभाळील हरी ।।तु.गा.११७८.००४ ।।
पुढिलाचें इच्छी फळ। नाहीं बळ तें अंगीं ।।तु.गा.११७९.००१ ।।
संत गेले तया ठाया। देवराया पाववीं ।।तु.गा.११७९.००२ ।।
ज्येष्ठांची कां आम्हां जोडी। परवडी न लभों ।।तु.गा.११७९.००३ ।।
तुका म्हणे करी कोड। पुरवीं लाड आमुचा ।।तु.गा.११७९.००४ ।।
आळी सलगी पायांपाशीं। होईल तैसी करीन ।।तु.गा.११८०.००१ ।।
आणीक आम्हीं कोठें जावें। येथें जीवें वेचलों ।।तु.गा.११८०.००२ ।।
अवघ्या निरोपणा भाव। हाचि ठाव उरलासे ।।तु.गा.११८०.००३ ।।
तुका म्हणे पाळी लळे । कृपाळुवे विठ्ठले ।।तु.गा.११८०.००४ ।।
ठाकलोंसें द्वारीं। उभा याचक भिकारी ।।तु.गा.११८१.००१ ।।

मज भीक कांहीं देवा। प्रेम भातुकें पाठवा।।तु.गा.११८१.००२।।
याचकाचा भार। घेऊं नये येरझार।।तु.गा.११८१.००३।।
तुका म्हणे दान । सेवा घेतल्यावांचून ।।तु.गा.११८१.००४।।
लक्ष्मीवल्लभा । दीनानाथा पद्मनाभा ।।तु.गा.११८२.००१।।
सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं तेचि ठायीं ।।तु.गा.११८२.००२।।
माझी अल्प हे वासना । तूं तों उदारांचा राणा ।।तु.गा.११८२.००३।।
तुका म्हणे भोगें । पीडा केली धांव वेगें ।।तु.गा.११८२.००४।।
तुज मागणें तें देवा। आम्हां तुझी चरणसेवा।।तु.गा.११८३.००१।।
आन नेघों देसी तरी। रिद्धि सिद्धि मुक्ति चारी।।तु.गा.११८३.००२।।
संतसंगति सर्वकाळ। थोर प्रेमाचा सुकाळ।।तु.गा.११८३.००३।।
तुका म्हणे नाम। तेणें पुरे माझें काम।।तु.गा.११८३.००४।।
काय नव्हे करितां तुज। आतां राखे माझी लाज।।तु.गा.११८४.००१।।
मी तो अपराधाची रासी। शिखा अंगुष्ठ तों पाशीं।।तु.गा.११८४.००२।।
त्राहे त्राहे त्राहे। मज कृपादृष्टि पाहे।।तु.गा.११८४.००३।।
तुका म्हणे देवा। सत्य घ्यावी आतां सेवा।।तु.गा.११८४.००४।।
मी तों दीनाहूनि दीन। माझा तुज अभिमान।।तु.गा.११८५.००१।।
मी तों आलों शरणागत। माझें करावें स्वहित।।तु.गा.११८५.००२।।
दीनानाथा कृपाळुवा। सांभाळावें आपुल्या नांवा।।तु.गा.११८५.००३।।
तुका म्हणे आतां। भलें नव्हे मोकलितां।।तु.गा.११८५.००४।।
न बोलेसी करा वाचा। उपाधीचा संबंध।।तु.गा.११८६.००१।।
एका तुमच्या नामाविण। अवघा सीण कळतसे।।तु.गा.११८६.००२।।
संकल्पाचे ओढी मन। पापपुण्य सर्वेंचि।।तु.गा.११८६.००३।।
तुका म्हणे नारायणीं। पावो वाणी विसांवा।।तु.गा.११८६.००४।।

कृपा करूनि देवा। मज साच तें दाखवा।।तु.गा.११८७.००१।।
तुम्ही दयावंत कैसे। कीर्ति जगामाजी वसे।।तु.गा.११८७.००२।।
पाहोनियां डोळां। हातीं ओढवाल काळा।।तु.गा.११८७.००३।।
तुका म्हणे देवा। माझा करावा कुढावा।।तु.गा.११८७.००४।।
तान्हेल्याची धणी। फिटे गंगा नव्हे उणी।।तु.गा.११८८.००१।।
माझे मनोरथ सिद्धी। पाववावे कृपानिधि।।तु.गा.११८८.००२।।
तूं तों उदारांचा राणा। माझी अल्पचि वासना।।तु.गा.११८८.००३।।
कृपादृष्टी पाहें। तुका म्हणे होई साहे।।तु.गा.११८८.००४।।
सद्गदित कंठ दाटो। येणें फुटो हृदय।।तु.गा.११८९.००१।।
चिंतनाचा एक लाहो। तुमच्या अहो विठ्ठला।।तु.गा.११८९.००२।।
नेत्रीं जळ वाहो सदा। आनंदाचे रोमांच।।तु.गा.११८९.००३।।
तुका म्हणे कृपादान। इच्छी मन हे जोडी।।तु.गा.११८९.००४।।
लहानपण दे गा देवा। मुंगी साखरेचा रवा।।तु.गा.११९०.००१।।
ऐरावत रत्न थोर। त्यासी अंकुशाचा मार।।तु.गा.११९०.००२।।
ज्याचे अंगीं मोठेपण। तया यातना कठीण।।तु.गा.११९०.००३।।
तुका म्हणे जाण। व्हावें लहानाहुनि लहान।।तु.गा.११९०.००४।।
पाहातोसी काय। आतां पुढें करीं पाय।।तु.गा.११९१.००१।।
वरि ठेवूं दे मस्तक ।ठेलों जोडोनि हस्तक ।।तु.गा.११९१.००२।।
बरवें करीं सम। नको भंगों देऊं प्रेम।।तु.गा.११९१.००३।।
तुका म्हणे चला। पुढती सामोरे विठ्ठला।।तु.गा.११९१.००४।।
हेंचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।।तु.गा.११९२.००१।।
गुण गाइन आवडी। हेंचि माझी सर्व जोडी।।तु.गा.११९२.००२।।
नलगे मुक्ति आणि संपदा। संतसंग देईं सदा।।तु.गा.११९२.००३।।

तुका म्हणे गर्भवासीं। सुखें घालावें आम्हांसी ।।तु.गा.११९२.००४।।
करूं जातां सन्निधान। क्षण जन पालटे ।।तु.गा.११९३.००१।।
आतां गोमटे ते पाय। तुझे माय विठ्ठले ।।तु.गा.११९३.००२।।
हरिदासांचा समागम। अंगीं प्रेम विसावे ।।तु.गा.११९३.००३।।
तुका म्हणे हेंचि मन। इच्छादान मागतसे ।।तु.गा.११९३.००४।।
आतां मज देवा। इचे हातींचें सोडवा ।।तु.गा.११९४.००१।।
पाठी लागलीसे लांसी। इच्छा जिते जैसी तैसी ।।तु.गा.११९४.००२।।
फेडा आतां पांग। अंगीं लपवुनी अंग ।।तु.गा.११९४.००३।।
दुजें नेणें तुका। कांहीं तुम्हांसी ठाऊका ।।तु.गा.११९४.००४।।
तुझे पोटीं ठाव। व्हावा ऐसा माझा भाव ।।तु.गा.११९५.००१।।
करी वासनेसारिखें। प्राण फुटे येणें दुःखें ।।तु.गा.११९५.००२।।
अहंकार खोटे। वाटे श्वापदांची थाटे ।।तु.गा.११९५.००३।।
तुका म्हणे आई । हातीं धरुन संग देईं ।।तु.गा.११९५.००४।।
करीन कोल्हाळ । आतां हाचि सर्वकाळ ।।तु.गा.११९६.००१।।
आतां ये वो माझे आई । देईं भातुकें विठाई ।।तु.गा.११९६.००२।।
उपायासी नाम । दिले याचि पुढें क्षेम ।।तु.गा.११९६.००३।।
बीज आणि फळ। हेंचि तुका म्हणे मूळ ।।तु.गा.११९६.००४।।
कथेची सामग्री। देह अवसानावरी ।।तु.गा.११९७.००१।।
नको जाऊं देऊं भंगा। गात्रें माझीं पांडुरंगा ।।तु.गा.११९७.००२।।
आयुष्य करीं उणें। परि मज आवडो कीर्तन ।।तु.गा.११९७.००३।।
तुका म्हणे हाणी। या वेगळी मना नाणीं ।।तु.गा.११९७.००४।।
करावा वर्षाव। तृषाक्रांत झाला जीव ।।तु.गा.११९८.००१।।
पाहें आकाशाची वास। जाणता तूं जगदीश ।।तु.गा.११९८.००२।।

संयोगें विस्तार। वाढी लागतो अंकूर।।तु.गा.११९८.००३।।
तुका म्हणे फळ। चरणांबुज तें सकळ।।तु.गा.११९८.००४।।
कंठीं राहो नाम। अंगीं भरोनियां प्रेम ।।तु.गा.११९९.००१।।
ऐसें द्यावें कांहीं दान। आलों पतित शरण।।तु.गा.११९९.००२।।
संताचिये पायीं। वेळोवळां ठेवीं डोई।।तु.गा.११९९.००३।।
तुका म्हणे तरे। भवसिंधु एका सरें।।तु.गा.११९९.००४।।
रणीं निघतां शूर न पाहे माघारें। ऐशा मज धीरें राखें आतां।।तु.गा.१२००.००१।।
संसारा हातीं अंतरलों दुरी। आतां कृपा करीं नारायणा।।तु.गा.१२००.००२।।
वागवितों तुझिया नामाचें हत्यार। हाचि बडिवार मिरवितों।।तु.गा.१२००.००३।।
तुका म्हणे मज फिरतां माघारें। तेथें उणें पुरें तुम्ही जाणा।।तु.गा.१२००.००४।।
नावडावे जन नावडावा मान। करूनि प्रमाण तूंचि होईं।।तु.गा.१२०१.००१।।
सोडवूनि देहसंबंध व्यसनें। ऐसी नारायणें कृपा कीजे।।तु.गा.१२०१.००२।।
नावडावें रूप नावडावा रस। अवघी राहो आस पायांपाशीं।।तु.गा.१२०१.००३।।
तुका म्हणे आतां आपुलिया सत्ता। करूनि अनंता ठेवा ऐसें।।तु.गा.१२०१.००४।।
तुजविण देवा। कोणा म्हणे माझी जिव्हा।।तु.गा.१२०२.००१।।
तरि हो कां शतखंड। पडो झडोनियां रांड।।तु.गा.१२०२.००२।।
कांहीं इच्छेसाठीं। करिल वळवळ करंटी।।तु.गा.१२०२.००३।।
तुका म्हणे कर। कटीं तयाचा विसर।।तु.गा.१२०२.००४।।
हरिदासाचिये घरीं। मज उपजवा जन्मांतरीं।।तु.गा.१२०३.००१।।
म्हणसी कांहीं मागा। हेंचि देगा पांडुरंगा।।तु.गा.१२०३.००२।।
संता लोटांगणीं। जातां लाज नको मनीं।।तु.गा.१२०३.००३।।
तुका म्हणे अंगीं। शक्ति देईं नाचें रंगीं।।तु.गा.१२०३.००४।।
रंगीं रंगें नारायण। उभा करितों कीर्तन।।तु.गा.१२०४.००१।।

हातीं घेऊनियां वीणा। कंठीं राहें नारायण ।।तु.गा.१२०४.००२ ।।
देखिलीसे मूर्ती। माझ्या हृदयाची विश्रांति ।।तु.गा.१२०४.००३ ।।
तुका म्हणे देवा। देईं कीर्तनाचा हेवा ।।तु.गा.१२०४.००४ ।।
हेचि व्हावी माझी आस। जन्मोजन्मीं तुझा दास ।।तु.गा.१२०५.००१ ।।
पंढरीचा वारकरी। वारी चुकों नेदी हरी ।।तु.गा.१२०५.००२ ।।
संतसंग सर्वकाळ। अखंड प्रेमाचा सुकाळ ।।तु.गा.१२०५.००३ ।।
चंद्रभागे स्नान। तुका मागे हेंचि दान ।।तु.गा.१२०५.००४ ।।
सरलियाचा सोस मनीं। लाजोनियां राहिलों ।।तु.गा.१२०६.००१ ।।
आवडीनें बोलावितों। येथें तें तों लपावें ।।तु.गा.१२०६.००२ ।।
माझें तेचि मज द्यावें। होतें भावें जोडिलें ।।तु.गा.१२०६.००३ ।।
तुका म्हणे विश्वंभरा। आळीकरा बुझावा ।।तु.गा.१२०६.००४ ।।
जाणों नेणों काय। चित्तीं धरूं तुझे पाय ।।तु.गा.१२०७.००१ ।।
आतां हेंचि वर्म। गाऊं धरूनियां प्रेम ।।तु.गा.१२०७.००२ ।।
काय सांडूं मांडूं। भावें हृदयींच कोंडूं ।।तु.गा.१२०७.००३ ।।
तुका म्हणे देवा। जन्मोजन्मीं मागें सेवा ।।तु.गा.१२०७.००४ ।।
काय ऐसा सांगा। धर्म मज पांडुरंगा ।।तु.गा.१२०८.००१ ।।
तुझे पायीं पावे ऐसा। जेणें उगवे हा फांसा ।।तु.गा.१२०८.००२ ।।
करीं कृपादान। तैसें बोलवीं वचन ।।तु.गा.१२०८.००३ ।।
तुका म्हणे देवा। माझें हृदय वसवा ।।तु.गा.१२०८.००४ ।।
आतां देवा मोकलिलें। तुम्हीं भलें दिसेना ।।तु.गा.१२०९.००१ ।।
आतां नाहीं जीवभाव। उरला ठाव वेगळा ।।तु.गा.१२०९.००२ ।।
सांभाळून घ्यावें देवा। आपणासवा यावरि ।।तु.गा.१२०९.००३ ।।
तुका म्हणे नग्न भाज। तरि ते लाज स्वामीसी ।।तु.गा.१२०९.००४ ।।

आतां पंढरिराया। माझ्या निरसावें भया।।तु.गा.१२१०.००१।।
मनीं राहिली आशंका। स्वामिभयाची सेवका।।तु.गा.१२१०.००२।।
ठेवा माथां हात। कांहीं बोला अभय मात।।तु.गा.१२१०.००३।।
तुका म्हणे लाडें। खेळें ऐसें करा पुढें।।तु.गा.१२१०.००४।।
आतां माझ्या भावा। अंतराय नको देवा।।तु.गा.१२११.००१।।
आलें भागा तें करितों। तुझें नाम उच्चारितों।।तु.गा.१२११.००२।।
दृढ माझें मन। येथें राखावें बांधोन।।तु.गा.१२११.००३।।
तुका म्हणे वाटे। नको फुटों देऊं फांटे।।तु.गा.१२११.००४।।
कैसें भले देवा अनुभवा कां नये। उशीर तो काय तुम्हांपाशीं।।तु.गा.१२१२.००१।।
आहे तें मागतों दिसतें जवळी। केल्यामध्यें कळि कोण साध्य।।तु.गा.१२१२.००२।।
नाहीं सांडीत मी सेवेची मर्यादा। लाविला तो धंदा नित्य करीं।।तु.गा.१२१२.००३।।
तुका म्हणे हात आवरिला गुंती। माझे तंव चित्तीं नाहीं दुजें।।तु.गा.१२१२.००४।।
हेंचि जतन करा दान। धरूनि चरण राहिलों ते।।तु.गा.१२१३.००१।।
घ्यावी माझ्या हातें सेवा। हेचि देवा विनवणी।।तु.गा.१२१३.००२।।
आणीक कांहीं न घालीं भार। बहुत फार सांकडे।।तु.गा.१२१३.००३।।
तुका तुमचा म्हणवी दास। त्याची आस पुरवावी।।तु.गा.१२१३.००४।।
बरें आम्हां कळों आलें देवपण। आतां गुज कोण राखे तुझें।।तु.गा.१२१४.००१।।
मारिलें कां मज सांग आजिवरी। आतां सरोवरी तुज मज।।तु.गा.१२१४.००२।।
जें आम्ही बोलों तें आहे तुझ्या अंगीं। देईन प्रसंगीं आजि शिव्या।।तु.गा.१२१४.००३।।
निलाजिरा तुज नाहीं याति कुळ। चोरटा शिंदळ ठावा मज।।तु.गा.१२१४.००४।।
खासी धोंडे माती जीव जंतु झाडें। एकलें उघडें परदेसीं।।तु.गा.१२१४.००५।।
गाढव कुतरा ऐसा मज ठावा। बईल तूं देवा भारवाही।।तु.गा.१२१४.००६।।
लटिका तूं मागें बहुतांसी ठावा। आलें अनुभवा माझ्या तेंही।।तु.गा.१२१४.००७।।

तुका म्हणे मज खवळिलें भांडा। आतां धीर तोंडा न धरवे ।।तु.गा.१२१४.००८ ।।
आम्ही पतित म्हणोनि तुज आलों शरण। करितों चिंतन दिवस रात्रीं ।।तु.गा.१२१५.००१ ।।
नाहीं तरी मज काय होती चाड। धरावया भीड तुझी चित्तीं ।।तु.गा.१२१५.००२ ।।
आम्हां न तारावें तुम्ही काय करावें। सांगीजो जी भावें नारायणा ।।तु.गा.१२१५.००३ ।।
अन्याय कोणाचा अंगीकार करणें। तया हातीं देणें लाज तेचि ।।तु.गा.१२१५.००४ ।।
काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें। जनामाजी दावणें बळ रया ।।तु.गा.१२१५.००५ ।।
पोह्या अन्नछत्र घालूनियां घरीं। दंडितो बाहेरी आलियासी ।।तु.गा.१२१५.००६ ।।
नव्हे कीर्ती कांहीं न मानेचि लोकां। काय विटंबना तैसी तैसी ।।तु.गा.१२१५.००७ ।।
प्रत्यक्षासी काय द्यावें गा प्रमाण। पाहातां दर्पण साक्ष काई ।।तु.गा.१२१५.००८ ।।
तुका म्हणे तरी आम्हा कां न कळे। तरलों किंवा आम्ही नाहीं ।।तु.गा.१२१५.००९ ।।
निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग। आहे लागभाग ठायींचाचि ।।तु.गा.१२१६.००१ ।।
तूं माझा जनिता तूं माझा जनिता। रखुमाईच्या कांता पांडुरंगा ।।तु.गा.१२१६.००२ ।।
मुळींच्या ठेवण्या आहे अधिकार। दुरावोनि दूर गेलों होतों ।।तु.गा.१२१६.००३ ।।
पोटींच्या आठवा पडिला विसर। कांहीं आला भार माथां तेणें ।।तु.गा.१२१६.००४ ।।
राखिला हा होता बहु चौघाचार। साक्षीनें वेव्हार निवडिला ।।तु.गा.१२१६.००५ ।।
तुका म्हणे कांहीं बोलणें नलगे। आतां पांडुरंगे तूं मी ऐसें ।।तु.गा.१२१६.००६ ।।
पांडुरंगें पाहा खादलीसे रडी। परि नामसेंडी धरिली आम्हीं ।।तु.गा.१२१७.००१ ।।
आतां संतांनीं करावी पंचाईत। कोण हा फजितखोर येथें ।।तु.गा.१२१७.००२ ।।
कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी। गर्जतसों आम्ही पातकीहीं ।।तु.गा.१२१७.००३ ।।
याचे पावनपण सोडवा जी तुम्ही। पतितपावन आम्ही आहों खरे ।।तु.गा.१२१७.००४ ।।
आम्ही तंव आहों अन्यायी सर्वथा। याची पावनकथा कैसी आहे ।।तु.गा.१२१७.००५ ।।
तुका म्हणे आम्ही मेलों तरी जाणा। परि तुमच्या चरणा न सोडावें ।।तु.गा.१२१७.००६ ।।
आमुचा तूं ऋणी ठायींचाचि देवा। मागावया ठेवा आलों दारा ।।तु.गा.१२१८.००१ ।।

वर्म तुझें आम्हां सांपडलें हातीं। धरियेलें चित्तीं दृढ पाय।।तु.गा.१२१८.००२।।

बैसलों धरणें कोंडोनियां द्वारीं। आंतूनि बाहेरी येवों नेदी।।तु.गा.१२१८.००३।।

तुज मज सरी होईल या विचारें। जळों भांडखोरें निलाजिरीं।।तु.गा.१२१८.००४।।

भांडवल माझें मिरविसी जनीं। सहस्र वोवणी नाममाळा।।तु.गा.१२१८.००५।।

तुका म्हणे आम्हीं केली जिवें साटी। तुम्हां आम्हां तुटी घालूं आतां।।तु.गा.१२१८.००६।।

नहो आतां जीवीं कपटवसती। मग काकुलती कोणा यावें।।तु.गा.१२१९.००१।।

सत्याचिये मापें गांठीं नये नाड। आदि अंतीं गोड नारायण।।तु.गा.१२१९.००२।।

चोखटिया नाहीं विटाळाचा आघात । साच तें साचत सांच पडे ।।तु.गा.१२१९.००३।।

विचारिली वाट उसंती सीतळ। बुद्धीपुढें बळ तृणतुल्य।।तु.गा.१२१९.००४।।

आहाराच्या घासें पचोनियां जिरे। वासनाही उरे उर्वरीत।।तु.गा.१२१९.००५।।

तुका म्हणे ताळा घालावा वचनीं। तूं माझी जननी पांडुरंगे।।तु.गा.१२१९.००६।।

जेणें तुज जालें रूप आणि नांव। पतित हें दैव तुझें आम्ही।।तु.गा.१२२०.००१।।

नाहीं तरी तुज कोण हो पुसतें। निराकारी तेथें एकाएकीं।।तु.गा.१२२०.००२।।

अंधारें ते दीपा आणियेली शोभा। माणिकासीं प्रभा कोंदणाची।।तु.गा.१२२०.००३।।

धन्वंतरी रोगें आणिला उजेडा। सुखी काय चाडा जाणावें त्या।।तु.गा.१२२०.००४।।

अमृतासी मोल विषाचिया गुणें। पितळ तरी सोने उंच नीच।।तु.गा.१२२०.००५।।

तुका म्हणे आम्ही असोनियां जाण। तुज देवपण आणियेलें।।तु.गा.१२२०.००६।।

लागे तुझी सोय करी ऐसें कांहीं। माझे विठाबाई माउलीये।।तु.गा.१२२१.००१।।

पतितपावन म्हणविसी जरी। अव्हेर न करीं तरी माझा।।तु.गा.१२२१.००२।।

नाहीं तरी ब्रीद टाकीं सोडोनियां। न धरिसी माया जरी माझी।।तु.गा.१२२१.००३।।

बोलियला बोल करावा साचार। तरी लोक बरें म्हणतील।।तु.गा.१२२१.००४।।

करावा संसार लोकलाजे भेणें। वचनासी उणें येऊं नेदीं।।तु.गा.१२२१.००५।।

तुम्हां आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका। होशील तूं सखा जीवलग।।तु.गा.१२२१.००६।।

कासया लागला यासी चौघाचार। मुक्तीचा वेव्हार निवडिला।।तु.गा.१२२२.००१।।
ग्वाही भक्तांची घालूनियां वरि। महजर करीं आहे माझ्या।।तु.गा.१२२२.००२।।
तुम्हां वेगळें आपुल्या ठायीं। होतें करूनि तेंही माझें माझें।।तु.गा.१२२२.००३।।
भांडण शेवटीं जालें एकवट। आतां कटकट करूं नये।।तु.गा.१२२२.००४।।
ठेविला ठेवा तो आला माझ्या हाता। आतां नसे सत्ता तुज देवा।।तु.गा.१२२२.००५।।
तुका म्हणे वायांविण खटपटा। राहिलों मी वांटा घेऊनियां।।तु.गा.१२२२.००६।।
धरूनि पालव असुडीन करें। मग काय बरें दिसे लोकीं।।तु.गा.१२२३.००१।।
काय तें विचारा ठायींचें आपणां। जो हा नारायणा अवकाश।।तु.गा.१२२३.००२।।
अंतर पायांसी तोंवरी या गोष्टी। पडिलिया मिठी हालों नेदी।।तु.गा.१२२३.००३।।
रूसलेति तरी होईल बुझावणी। तांतडी करूनि साधावें हें।।तु.गा.१२२३.००४।।
सांपडलिया आधीं कारणासी ठाव। येथें करूं भाव दृढ आतां।।तु.गा.१२२३.००५।।
तुका म्हणे तुझे ठाउके बोभाट। मग खटपट चुकली ते।।तु.गा.१२२३.००६।।
तुझें म्हणवितां काय नास जाला। ऐकें बा विठ्ठला कीर्ती तुझी।।तु.गा.१२२४.००१।।
परी तुज नाहीं आमचे उपकार। नामरूपा थार केलियाचे।।तु.गा.१२२४.००२।।
समूळीं संसार केला देशधडी। सांडिली आवडी ममतेची।।तु.गा.१२२४.००३।।
लोभ दंभ काम क्रोध अहंकार। यांसीं नाहीं थार ऐसे केलें।।तु.गा.१२२४.००४।।
मृत्तिका पाषाण तैसें केलें धन। आपले ते कोण पर नेणों।।तु.गा.१२२४.००५।।
तुका म्हणे जालों देहासी उदार। आणीक विचार काय तेथें।।तु.गा.१२२४.००६।।
कोण पर्वकाळ पहासील तीथ। होतें माझें चित्त कासावीस।।तु.गा.१२२५.००१।।
पाठवीं भातुकें प्रेमें झडकरी। नको राखो उरी पांडुरंगा।।तु.गा.१२२५.००२।।
न धरावा कोप मजवरी कांहीं। अवगुणी अन्यायी म्हणोनियां।।तु.गा.१२२५.००३।।
काय रडवीसी नेणतिया पोरां। जाणतिया थोराचियापरी।।तु.गा.१२२५.००४।।
काय उभी कर ठेवूनियां कटीं। बुझावी धाकुटी लडिवाळें।।तु.गा.१२२५.००५।।

तुका म्हणे आतां पदरासी पिळा। घालोनि निराळा नव्हे मग।।तु.गा.१२२५.००६।।
कैसा कृपाळू हें न कळसी देवा। न बोलसी सेवा घेसी माझी।।तु.गा.१२२६.००१।।
काय ऐसें बळ आहे तुजपाशीं। पाहों हरि घेसी कोणा आड।।तु.गा.१२२६.००२।।
पडियेला ठायीं तुझा थारामारा। अवघा दातारा लपसी तो।।तु.गा.१२२६.००३।।
आतां तुम्हां आम्हां उरी तोंचि बरें। काय हीं उत्तरें वाढवूनि।।तु.गा.१२२६.००४।।
तुका म्हणे मज साह्य जाले संत। म्हणऊनि मात फावली हे।।तु.गा.१२२६.००५।।
आम्हीं नरका जातां काय येईल तुझ्या हातां। ऐसें तूं अनंता विचारीं पां।।तु.गा.१२२७.००१।।
तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ। विचारा दयाळ कृपानिधी।।तु.गा.१२२७.००२।।
तुझे पावनपण न चले आम्हांसी। ऐसें हृषीकेशी कळों आलें।।तु.गा.१२२७.००३।।
आम्ही दु:ख पावों जन्ममरण व्यथा। काय तुझ्या हाता येत असे।।तु.गा.१२२७.००४।।
तुका म्हणे तुम्हीं खादलीं हो रडी। आम्हीं धरली शेंडी नाम तुझें।।तु.गा.१२२७.००५।।
आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं। सखीं सहोदरी मोकलिलों।।तु.गा.१२२८.००१।।
जनाचारामध्यें उडाला पातेरा। झालों निलाजिरा म्हणवूनि।।तु.गा.१२२८.००२।।
कोणाचिया दारा जावेनासें झालें। म्यांच विटंबिलें आपणासी।।तु.गा.१२२८.००३।।
कोण झाला माझे बुद्धीसी संचार। नाहीं कोठें थार ऐसें झालें।।तु.गा.१२२८.००४।।
तुका म्हणे तुज भक्त झाले फार । म्हणोनियां थार नाहीं येथें।।तु.गा.१२२८.००५।।
आतां तुझा भाव कळों आला देवा। ठकूनियां सेवा घेसी माझी।।तु.गा.१२२९.००१।।
टाकूनि सांकडें आपुलिये माथां। घातला या संतांवरी भार।।तु.गा.१२२९.००२।।
स्तुति करूनियां पिटिला डांगोरा। तें कोण दातारा साच करी।।तु.गा.१२२९.००३।।
जातीचें वाणी मी पोटीचें कुडें। नका मजपुढें ठकाठकीं।।तु.गा.१२२९.००४।।
तुका म्हणे नाहीं आलें अनुभवा। आधींच मी देवा कैसा नाचूं।।तु.गा.१२२९.००५।।
आम्हीं पतितांनीं घालावें सांकडें। तुम्हां लागे कोडें उगवणें।।तु.गा.१२३०.००१।।
आचरतां दोष न धरूं सांभाळ। निवाड उकल तुम्हां हातीं।।तु.गा.१२३०.००२।।

न घेतां कवडी करावा कुढावा। पाचारितां देवा नामासाठीं ।।तु.गा.१२३०.००३ ।।
दयासिंधु नाम पतितपावन। हें आम्हां वचन सांपडलें ।।तु.गा.१२३०.००४ ।।
तुका म्हणे करूं अन्यायाच्या कोटी। कृपावंत पोटीं तुम्ही देवा ।।तु.गा.१२३०.००५ ।।
नाहीं जालें मोल कळे देतां काळीं। कोण पाहों बळि दोघांमध्यें ।।तु.गा.१२३१.००१ ।।
आम्ही तरी जालों जीवासी उदार। कैंचा हा धीर तुजपाशीं ।।तु.गा.१२३१.००२ ।।
बहु चाळविलें मागें आजिवरी। आतां पुढें हरी जाऊं नेदीं ।।तु.गा.१२३१.००३ ।।
नव्हती जों भेटी नामाची ओळखी। म्हणऊनि दुःखी बहु जालों ।।तु.गा.१२३१.००४ ।।
तुका म्हणे कांहीं राहों नेदीं बाकी। एक वेळां चुकी जाली आतां ।।तु.गा.१२३१.००५ ।।
जे केली आळी ते अवघी गेली वायां। उरला पंढरीराया श्रम माझा ।।तु.गा.१२३२.००१ ।।
काय समाधान केलें कोणें वेळे। कोणें माझें लळे पाळियेले ।।तु.गा.१२३२.००२ ।।
आभासही नाहीं स्वप्नीं दुश्चिता। प्रत्यक्ष बोलतां काय चिंता ।।तु.गा.१२३२.००३ ।।
आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा। भक्त ऐसें जगामाजी जालें ।।तु.गा.१२३२.००४ ।।
तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा। मोकलीसी ऐसा वाटतोसी ।।तु.गा.१२३२.००५ ।।
काय विनवावे कोण तो निवाड। केलें माझ्या कोड वचनाचें ।।तु.गा.१२३३.००१ ।।
अहो कृपानिधि गुणांच्या निधाना। माझ्या अनुमाना नयेचि हें ।।तु.गा.१२३३.००२ ।।
बहुत करूणा केलेंसे भाषण। एकही वचन नाहीं आलें ।।तु.गा.१२३३.००३ ।।
माझी कांहीं सेवा होईल पावली। निश्चिंती मानिली होती ऐसी ।।तु.गा.१२३३.००४ ।।
तुका म्हणे माझी उरली ते आटी। अभयकर कटीं न देखेंचि ।।तु.गा.१२३३.००५ ।।
तुम्हां आम्हां तुटी होईल यावरी। ऐसें मज हरी दिसतसें ।।तु.गा.१२३४.००१ ।।
वचनाचा कांहीं न देखों आधार। करावा हा धीर कोठवरी ।।तु.गा.१२३४.००२ ।।
सारिलें संचित होतें गांठीं कांहीं। पुढें ऋण तेंही नेदी कोणी ।।तु.गा.१२३४.००३ ।।
जावेंचि नलगे कोणाचिया घरा। उडाला पातेरा तुझ्या संगें ।।तु.गा.१२३४.००४ ।।
तुका म्हणे आम्हां हाचि लाभ जाला। मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ।।तु.गा.१२३४.००५ ।।

विनवितों चतुरा तुज विश्वंभरा। परियेसीं दातारा पांडुरंगा ।।तु.गा.१२३५.००१ ।।
तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें। आतां नव्हे भलें मोकलितां ।।तु.गा.१२३५.००२ ।।
माझे गुणदोष कोण जाणे मात। पावनपतित नाम तुझें ।।तु.गा.१२३५.००३ ।।
लोभ मोह माया आम्हां बाधवितां। तरि हा अनंता बोल कोणा ।।तु.गा.१२३५.००४ ।।
तुका म्हणे मी तों पतितचि खरा। परि आलों दातारा शरण तुज ।।तु.गा.१२३५.००५ ।।
न बोलावें परी पडिला प्रसंग। हाकलितें जग तुझ्या नामें ।।तु.गा.१२३६.००१ ।।
लटिकेंचि सोंग मांडिला पसारा। भिकारी तूं खरा कळों आलें ।।तु.गा.१२३६.००२ ।।
निलाजिरीं आम्ही करोनियां धीर। राहिलों आधार धरूनियां ।।तु.गा.१२३६.००३ ।।
कैसा नेणों आतां करिसी शेवट। केली कटकट त्याची पुढें ।।तु.गा.१२३६.००४ ।।
तुका म्हणे कांहीं न बोलसी देवा। उचित हे सेवा घेसी माझी ।।तु.गा.१२३६.००५ ।।
चुकलिया आम्हां करितसां दंड। हक्कासी कां खंड पांडुरंगा ।।तु.गा.१२३७.००१ ।।
चाळविलीं एके रिद्धिसिद्धिवरी। तैसा मी भिकारी नव्हें देवा ।।तु.गा.१२३७.००२ ।।
कां मी येथें गुंतों मांडूनि पसारा। मागुता दातारा दंभासाठीं ।।तु.गा.१२३७.००३ ।।
केलें म्यां जतन आपुलें वचन। ठायींचें धरून होतो पोटीं ।।तु.गा.१२३७.००४ ।।
तुका म्हणे ताळा घातला आडाखीं। ठावें होतें सेकीं आडविसी ।।तु.गा.१२३७.००५ ।।
तरि कां मागें वायां कीर्ति वाढविली। जनांत आपुली ब्रिदावळी ।।तु.गा.१२३८.००१ ।।
साच करितां आतां फिरसी माघारा। ठायींचें दातारा नेणेवेचि ।।तु.गा.१२३८.००२ ।।
संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी। पुढें मात त्यांसी सांगईन ।।तु.गा.१२३८.००३ ।।
घेईन डांगोरा तुझिया नामाचा। नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ।।तु.गा.१२३८.००४ ।।
तुका म्हणे आम्ही राहिलों मरोनि। तूं कां होसी धनी निमित्याचा ।।तु.गा.१२३८.००५ ।।
सांगावें तें बरें असतें हें पोटी। दुःख देते खोटी बुद्धि मग ।।तु.गा.१२३९.००१ ।।
आपला आपण करावा वेव्हार। जिंकोनि अंतर मन ग्वाही ।।तु.गा.१२३९.००२ ।।
नाहीं मागें येत बोलिलें वचन। पावावा तो सीण बरा मग।।तु.गा.१२३९.००३ ।।

तुका म्हणे बहू भ्यालो खटपटे । आतां देवा खोटे शब्द पुरें ।।तु.गा.१२३९.००४।।
कां हो तुम्ही माझी वदविली वाणी। नेदा हे निवडोनि पांडुरंगा।।तु.गा.१२४०.००१।।
आणीक म्यां कोणा पुसावा विचार। समूळ संसार दुराविला।।तु.गा.१२४०.००२।।
स्वामिसेवा म्हूण घेतली पदरीं। सांगितलें करी कारण तें।।तु.गा.१२४०.००३।।
तुका म्हणे नाहीं शिकविलें जेणें। तो याच्या वचनें उगा राहे।।तु.गा.१२४०.००४।।
माझा तुम्ही देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे ।।तु.गा.१२४१.००१।।
कांहो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारतां देवा आहें तैसा ।।तु.गा.१२४१.००२।।
लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ।।तु.गा.१२४१.००३।।
तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं । तेथे दिसे हरी ठकाठकी ।।तु.गा.१२४१.००४।।
केलें तरी आतां साचचि करावें। विचारिलें द्यावें कृपादान।।तु.गा.१२४२.००१।।
संकल्पासी नाहीं बोलिला विकल्प। तुम्हां पुण्यपाप कळे देवा।।तु.गा.१२४२.००२।।
उदार विख्यात तुम्ही भूमंडळीं। ऐसी ब्रीदावळी गर्जतसें।।तु.गा.१२४२.००३।।
तुका म्हणे अहो रखुमाईच्या वरा। उपरोध कां धरा माझा आतां।।तु.गा.१२४२.००४।।
माझी मज जाती आवरली देवा। नव्हता या गोवा इंद्रियांचा।।तु.गा.१२४३.००१।।
कासया मी तुझा म्हणवितों दास। असतों उदास सर्व भावें ।।तु.गा.१२४३.००२।।
भयाचिये भेणें धरियली कास । न पुरतां आस काय थोरी ।।तु.गा.१२४३.००३।।
तुका म्हणे आपआपली जतन। कैंचें थोरपण मग तुम्हां।।तु.गा.१२४३.००४।।
निर्दयासी तुम्ही करितां दंडण। तुमचें गाऱ्हाणें कोठें द्यावे।।तु.गा.१२४४.००१।।
भाकितों करूणा ऐकती कान। उगलेंचि मौन्य धरिलें ऐसें ।।तु.गा.१२४४.००२।।
दीनपणें पाहें पाय भिडावोनि । मंजुळा वचनीं विनवीतसें ।।तु.गा.१२४४.००३।।
तुका म्हणे गांठी मनाची उकला। काय जी विठ्ठला पाहातसां।।तु.गा.१२४४.००४।।
आमुचे ठाउके तुम्हां गर्भवास। बळिवंत दोष केले भोग।।तु.गा.१२४५.००१।।
काय हा सांगावा नसता नवलाव। मैंदपणें भाव भुलवणेचा।।तु.गा.१२४५.००२।।

एका पळवूनि एका पाठी लावा। कवतुक देवा पहावया ।।तु.गा.१२४५.००३ ।।
तुका म्हणे जेणें असें चेतविलें। त्याच्यानें उगलें कैसें नव्हे ।।तु.गा.१२४५.००४ ।।
द्या जी माझा विचारोनियां विभाग। न खंडे हा लाग आहाचपणें ।।तु.गा.१२४६.००१ ।।
किती नेणों तुम्हां साहाते कटकट। आम्हीच वाईट निवडलों ते ।।तु.गा.१२४६.००२ ।।
करवितां कलह जिवाचियेसाठीं। हे तुम्हा वोखटी ढाळ देवा ।।तु.गा.१२४६.००३ ।।
तुका म्हणे धीर कारणा आपुला। तुम्हीं तों विठ्ठला मायातीत ।।तु.गा.१२४६.००४ ।।
आलिया अतीता म्हणतसां पुढें। आपुलें रोकडें सत्व जाय ।।तु.गा.१२४७.००१ ।।
काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं। हीनकर्मी लोकीं म्हणावया ।।तु.गा.१२४७.००२ ।।
दारीं हाका कैसें करवतें भोजन। रुची तरि अन्न कैसें देतें ।।तु.गा.१२४७.००३ ।।
तुका म्हणे ध्वज उभारिला कर। ते शक्ति उदार काय झाली ।।तु.गा.१२४७.००४ ।।
येणें झाला तुझ्या पोतडिचा झाडा। केलासी उघडा पांडुरंगा ।।तु.गा.१२४८.००१ ।।
भरूनियां घरीं राहिलों वाखती। आपुली निश्चिंती आपुल्यापें ।।तु.गा.१२४८.००२ ।।
आतां काय उरी उरली ते सांगा। आणिलेति जगाचिये साक्षी ।।तु.गा.१२४८.००३ ।।
तुका म्हणे कोठें पाहों जासी आतां। माझी झाली सत्ता तुम्हांवरी ।।तु.गा.१२४८.००४ ।।
नाहीं भ्यालों तरी पावलों या ठाया। तुम्हां आळवाया जवळिकें ।।तु.गा.१२४९.००१ ।।
सत्ताबळें आतां मागेन भोजन। केलें तें चिंतन आजिवरी ।।तु.गा.१२४९.००२ ।।
नवनीतासाठीं खादला हा जीव। थोड्यासाठीं कींव कोण करी ।।तु.गा.१२४९.००३ ।।
तुका म्हणे ताक नलगे हे घाटे। पांडुरंगा खोटें चाळवणें ।।तु.गा.१२४९.००४ ।।
हरि तूं निष्ठुर निर्गुण। नाहीं माया बहु कठिण। नव्हे तें करिसी आन। कवणें नाहीं केलें तें ।।तु.गा.१२५०.००१ ।।
घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव। राज्य घोडे भाग्य सर्व। पुत्र पत्नी जीव। डोंबा घरीं वोपविलीं ।।तु.गा.१२५०.००२ ।।
नळदमयंतीचा वियोग। विघडिला त्यांचा संग। ऐसें जाणे जग। पुराणेंही बोलती ।।तु.गा.१२५०.००३ ।।
राजा शिबी चक्रवर्ती। कृपाळु दयाळु भूतीं। तुळविलें अंतीं। तुळें मांस तयाचें ।।तु.गा.१२५०.००४ ।।
कर्ण भिडता समरंगणीं। बाणीं व्यापियेला रणीं। मागसी पाडोनी। तेथें दांत तयाचे ।।तु.गा.१२५०.००५ ।।

बळी सर्वस्वें उदार। जेणें उभारिला कर। करूनि काहार। तो पाताळीं घातला।।तु.गा.१२५०.००६।।
श्रियाळाच्या घरीं। धरणें मांडिलें मुरारी। मारविलें करीं। त्याचें बाळ त्या हातीं।।तु.गा.१२५०.००७।।
तुज भावें जे भजती। त्यांच्या संसारा हे गति। ठाव नाहीं रे पुढती। तुका म्हणे करिसी तें।।तु.गा.१२५०.००८।।
आम्ही भाव जाणों देवा। न कळती तुझिया मावा। गणिकेचा कुढावा। पतना न्यावा दशरथ।।तु.गा.१२५१.००१।।
तरी म्यां काय गा करावें। कोण्या रीती तुज पावावें। न सांगतां ठावें। तुम्हांविण न पडे।।तु.गा.१२५१.००२।।
दोनी फांकविल्या वाटा। गोवा केला घटापटा। नव्हे धीर फांटा। आडरानें भरती।।तु.गा.१२५१.००३।।
तुका म्हणे माझे डोळे। तुझे देखती हे चाळे। आतां येणें वेळे। चरण जीवें न सोडीं।।तु.गा.१२५१.००४।।
दुर्बळाचें कोण। ऐके घालूनियां मन। राहिलें कारण। तयावांचूनि काय तें।।तु.गा.१२५२.००१।।
कळों आलें अनुभवें। पांडुरंगा माझ्या जीवें। न सांगतां ठावें। पडे चर्या देखोनि।।तु.गा.१२५२.००२।।
काम क्रोध माझ्या देहीं। भेदाभेद गेले नाहीं। होतें तेथे कांहीं। तुज कृपा करितां।।तु.गा.१२५२.००३।।
हें तों नव्हे उचित। नुपेक्षावें शरणागत। तुका म्हणे रीत। तुमची आम्हां न कळे।।तु.गा.१२५२.००४।।
आम्ही शक्तिहीनें। कैसें कराल तें नेणें। लिगाडाच्या गुणें। खोळंबला राहिलों।।तु.गा.१२५३.००१।।
माझें मज देईं देवा। असे ठेविला तो ठेवा। नाहीं करीत हेवा। कांहीं अधीक आगळा।।तु.गा.१२५३.००२।।
नाहीं गळां पडलो झोंड। तुमचें तेंचि माझें तोंड। चौघा चार खंड। लांबणी हे अनुचित।।तु.गा.१२५३.००३।।
नाहीं येत बळा। आतां तुम्हासी गोपाळा। तुका म्हणे गळा। उगवा पायां लागतों।।तु.गा.१२५३.००४।।
कां हो वाढवितां देवा। मज घरींच समजावा। केवढा हो गोवा। फार केलें थोड्याचें।।तु.गा.१२५४.००१।।
ठेवीन पायांवरी डोई। यासी तुमचें वेचे काई। झालों उतराई। जाणा एकएकांचें।।तु.गा.१२५४.००२।।
निवाड आपणियांपाशीं। असोन कां अपेसी। होती गांठी तैसी। सोडूनियां ठेविली।।तु.गा.१२५४.००३।।
तुका म्हणे गोड। होतें झालिया निवाड। दर्शनेंही ही चाड। आवडीच वाढेल।।तु.गा.१२५४.००४।।
जडलों अंगाअंगीं। मग ठेवीं ये प्रसंगीं। कांहीं उरी जगीं। लोकीं आहे पुरती।।तु.गा.१२५५.००१।।
ठेवीं निवारूनि आधीं। अवकाश तोचि बुद्धी। सांपडली संधी। मग बळ कोणासी।।तु.गा.१२५५.००२।।
गळा बांधीन पायीं। हालों नेदीं ठायींचे ठायीं। निवाड तो तईं। अवकळा केलिया।।तु.गा.१२५५.००३।।
तुका म्हणे ठावे। आम्हां असां जी बरवे। बोभाटाची सवें। मुळींहुनी विठोबा।।तु.गा.१२५५.००४।।

वेरझारीं जाला सीण। बहु केलें खेदक्षीण। भांडणासी दिन। आजि येथें फावला ।।तु.गा.१२५६.००१ ।।
आतां काय भीड भार। धरूनियां लोकाचार। बुडवूनि वेव्हार। सरोवरी करावी ।।तु.गा.१२५६.००२ ।।
आले बहुतांच्या मना। कां रे न होसी शाहाणा। मुळींच्या वचना। आम्ही जागों आपुल्या ।।तु.गा.१२५६.००३ ।।
तुका म्हणे चौघांमधीं। तुज नेलें होतें आधीं। आतां नाहीं मधीं। उरी कांहीं राहिली ।।तु.गा.१२५६.००४ ।।
पाहा किती आले। शरण समानचि केले। नाहीं विचारिलें । गुण दोष कोणाचे ।।तु.गा.१२५७.००१ ।।
मज शेवटीचा द्यावा। ठाव तयाचिये देवा। नाहीं करीत हेवा। कांहीं थोरपणाचा ।।तु.गा.१२५७.००२ ।।
नाहीं पाहिला आचार। कुळगोत्राचा विचार। फेडूं आला भार। मग न म्हणे दगड ।।तु.गा.१२५७.००३ ।।
तुका म्हणे सर्व जाणा। तुझ्या आल्यावरि मना। केला तो उगाणा। घडल्या महादोषांचा ।।तु.गा.१२५७.००४ ।।
प्रीतीचा हेकळ। पदरासी घाली पीळ। सरों नेदी बाळ। मागें पुढें पित्यासी ।।तु.गा.१२५८.००१ ।।
काय लागे त्यासी बळ। हेडावितां कोण काळ। गोवितें सबळ। जाळीं स्नेहसूत्राचीं ।।तु.गा.१२५८.००२ ।।
सलगी दिला लाड। केलें तें तें वाटे गोड। करी बुझावोनि कोड। हातीं देऊनि भातुकें ।।तु.गा.१२५८.००३ ।।
तुका म्हणे बोलों कोणा। हें कां नेणां नारायणा। सलगीच्या वचना। कैचें उपजे विषम ।।तु.गा.१२५८.००४ ।।
अनुभव तो नाहीं तुमच्या दर्शनीं। आइकिलें कानीं वदे वाणी ।।तु.गा.१२५९.००१ ।।
जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं। म्हणतां मांडे पुरी काय होतें ।।तु.गा.१२५९.००२ ।।
नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा। कां जी हरिहरा चाळविलें ।।तु.गा.१२५९.००३ ।।
पत्रीं कुशळता भेटी अनादर। काय तें उत्तर येईल मानूं ।।तु.गा.१२५९.००४ ।।
अंतर सबाह्य कां नाहीं सारिखें। करूनि पारखें वर्ततसां ।।तु.गा.१२५९.००५ ।।
आलों आलों ऐसी दाऊनियां आस। बुडों बुडत्यास काय द्यावें ।।तु.गा.१२५९.००६ ।।
तुका म्हणे अहो चतुरा शिरोमणि। किती माझी वाणी तुम्ही कोठें ।।तु.गा.१२५९.००७ ।।
अमर तूं खरा। नव्हे कैसा मी दातारा ।।तु.गा.१२६०.००१ ।।
चाल जाऊं संतांपुढें। वाद सांगेन निवाडें ।।तु.गा.१२६०.००२ ।।
तुज नांव जरी नाहीं। तरी माझें दाव काई ।।तु.गा.१२६०.००३ ।।
तुज रूप जरी नाहीं। तरी माझें दाव काई ।।तु.गा.१२६०.००४ ।।

खेळसी तूं लीळा। तेथें मी काय वेगळा।।तु.गा.१२६०.००५।।
साच तूं लटिका। तैसा मीही म्हणे तुका।।तु.गा.१२६०.००६।।
आतां बरें घरिच्याघरीं। आपली उरी आपणापें।।तु.गा.१२६१.००१।।
वाइट बरें न पडे दृष्टी। मग कष्टी होइजेना।।तु.गा.१२६१.००२।।
बोलों जातां वाढे बोल। वायां फोल खटपट।।तु.गा.१२६१.००३।।
काकुलती यावें देवा। तो तो सेवा इच्छितो।।तु.गा.१२६१.००४।।
हिशोबाचे खटपटे। चढे तुटे घडेना।।तु.गा.१२६१.००५।।
तुका म्हणे कळों आलें। दुसरें भलें तों नव्हे।।तु.गा.१२६१.००६।।
दावूनियां कोणां कांहीं। तेचि वाहीं चाळविलीं।।तु.गा.१२६२.००१।।
तैसें नको करूं देवा। शुद्धभावा माझिया।।तु.गा.१२६२.००२।।
रिद्धिसिद्धि ऐसीं आड। येती नाड नागवूं।।तु.गा.१२६२.००३।।
उदकाऐसी दावुनि ओढी। ऊर फोडी झळई।।तु.गा.१२६२.००४।।
दर्पणींचें दिले धन। दिसे पण चरफडी।।तु.गा.१२६२.००५।।
तुका म्हणे पायांसाटीं। करितों आटी कळों द्या।।तु.गा.१२६२.००६।।
जालों द्वारपाळ। तुझें राखिलें सकळ।।तु.गा.१२६३.००१।।
नाहीं लागों दिलें अंगा। आड ठाकलों मी जगा।।तु.गा.१२६३.००२।।
करूनियां नीती। दिल्याप्रमाणें चालती।।तु.गा.१२६३.००३।।
हातीं दंड काठी। उभा जिवाचिये साटीं।।तु.गा.१२६३.००४।।
बळ बुद्धी युक्ती। तुज दिल्या सर्व शक्ती।।तु.गा.१२६३.००५।।
तुका म्हणे खरा। आतां घेईन मुशारा।।तु.गा.१२६३.००६।।
संदेह निरसे तरि रुचिकर। फिक्यासी आदर चवी नाहीं।।तु.गा.१२६४.००१।।
आतां नको मज खोट्यानें फटवूं। कोठें येऊं जाऊं वेळोवेळां।।तु.गा.१२६४.००२।।
गेला तरि काय जीवाचें सांकडें। वांचउनि पुढें काय काज।।तु.गा.१२६४.००३।।

तुका म्हणे कसीं निवडा जी बरें। केली तैसी पोरें आळी पायीं।।तु.गा.१२६४.००४।।
काय उणें जालें तुज समर्थासी। ऐसा मजपाशीं कोण दोष।।तु.गा.१२६५.००१।।
जो तूं माझा न करिसी अंगीकार। सांगेन वेव्हार संतांमधीं।।तु.गा.१२६५.००२।।
तुजविण रत आणिकाचे ठायीं। ऐसें कोण ग्वाही दावी मज।।तु.गा.१२६५.००३।।
तुका म्हणे काय धरूनी गुमान। सांग उगवून पांडुरंगा।।तु.गा.१२६५.००४।।
प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा। भक्तिरस सांगा कां जी तुम्ही।।तु.गा.१२६६.००१।।
म्हणउनि कांहीं न ठेवींची उरी। आलों वर्मावरी एकाएकीं।।तु.गा.१२६६.००२।।
न देखोंचि कांहीं परती माघारी। उरली ते उरी नाहीं मुळीं।।तु.गा.१२६६.००३।।
तुका म्हणे आला अंतरासी खंड । तरि माझें तोंड खवळिलें ।।तु.गा.१२६६.००४।।
आहे तेंचि आम्ही मागों तुजपाशीं। नव्हों तुज ऐसीं क्रियानष्ट।।तु.गा.१२६७.००१।।
न बोलावें तेंचि वर्म बरें दिसे। प्रकट ते कैसें गुण करूं ।।तु.गा.१२६७.००२।।
एका ऐसा एका द्यावयाचा मोळा। कां तुम्हा गोपाळा नाहीं ऐसा।।तु.गा.१२६७.००३।।
तुका म्हणे लोकां नाहीं कळों आलें। करावें आपुलें जतन तों।।तु.गा.१२६७.००४।।
तुम्हां होइल देवा पडिला विसर। आम्हीं तें उत्तर यत्न केलें।।तु.गा.१२६८.००१।।
पतितपावन ब्रीदें मिरविसी। याचा काय देसी झाडा सांग।।तु.गा.१२६८.००२।।
आहाच मी नव्हें अर्थाचें भुकेलें। भलत्या एका बोलें वारेन तें।।तु.गा.१२६८.००३।।
तुका म्हणे देह देईन सांडणें । सहित अभिमानें ओवाळूनि।।तु.गा.१२६८.००४।।
मज ऐसें कोण उद्धरीलें सांगा। ब्रीदें पांडुरंगा बोलतसां।।तु.गा.१२६९.००१।।
हातींच्या कांकणा कासया आरसा। उरलों मी जैसा तैसा आहें।।तु.गा.१२६९.००२।।
धन्वंतरी हरी रोग्याचिये व्यथें। तें तों कांहीं येथें न देखिजे।।तु.गा.१२६९.००३।।
तुका म्हणे नाहीं अनुभव अंगें। वचन वाउगें कोण मानी।।तु.गा.१२६९.००४।।
कळों नये तोंचि चुकवितां बरें। मग पाठमोरें काय काज।।तु.गा.१२७०.००१।।
धरिलेती आतां द्या जी माझा डाव। सांपडतां भाव ऐसा आहे।।तु.गा.१२७०.००२।।

होतासी अंतरें झांकिलिया डोळीं। तोचि मी न्याहाळीं भरूनि दृष्टी।।तु.गा.१२७०.००३।।
तुका म्हणे तुज रडीचीच खोडी। अहाच बराडी तो मी नव्हें।।तु.गा.१२७०.००४।।
आमुचिया भावें तुज देवपण। तें कां विसरोन राहिलासी।।तु.गा.१२७१.००१।।
समर्थासी नाहीं उपकारस्मरण। दिल्या आठवण वांचोनियां।।तु.गा.१२७१.००२।।
चळण वळण सेवकाच्या बळें। निर्गुणाच्या मुळें सांभाळावें।।तु.गा.१२७१.००३।।
तुका म्हणे आतां आलों खंडावरी। प्रेम देउनि हरी बुझवावें।।तु.गा.१२७१.००४।।
जे दोष घडले न फिटे करितां कांहीं। सरते तुझ्या पायीं जाले तैसे।।तु.गा.१२७२.००१।।
माझा कां हो करूं नये अंगीकार। जालेती निष्ठुर पांडुरंगा।।तु.गा.१२७२.००२।।
यातिहीन नये ऐकों ज्यां वेद। तयां दिलें पद वैकुंठींचें।।तु.गा.१२७२.००३।।
तुका म्हणे कां रे एकाचा आभार। घेसी माथां भार वाहोनियां।।तु.गा.१२७२.००४।।
म्हणउनी दास नव्हे ऐसा जालों। अनुभवें बोलों स्वामीपुढें।।तु.गा.१२७३.००१।।
कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें। मीच माझ्या वेचें अट्टाहासें।।तु.गा.१२७३.००२।।
कासयानें गोडी उपजावा विश्वास। प्रीती कांहीं रस वांचुनियां।।तु.गा.१२७३.००३।।
तुका म्हणे अगा चतुराशिरोमणी। विचारावें मनीं केशीराजा।।तु.गा.१२७३.००४।।
नाहीं उल्लंघिलें कोणाचें वचन। मज कां नारायण दुरी जाला।।तु.गा.१२७४.००१।।
आशंकित मनें करीं आळवण। नाहीं समाधान निश्चिंतीचें।।तु.गा.१२७४.००२।।
दासाचा विसर हें तों अनुचित । असे सर्व नीत पायांपाशीं।।तु.गा.१२७४.००३।।
तुका म्हणे तुम्हां लाज येत नाहीं। आम्हां चिंताडोहीं बुडवितां।।तु.गा.१२७४.००४।।
धिग जिणें ज्याचा स्वामी हीन वर। मरण तें बरें भलें मग।।तु.गा.१२७५.००१।।
आइकाजी देवा ऐसी आहे नीत। काय तें उचित सांभाळावें।।तु.गा.१२७५.००२।।
देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें। तयाचें कुतरें परि भलें।।तु.गा.१२७५.००३।।
तुका म्हणे हें कां सुचलें उत्तर। जाणोनि अंतर ओळखावें।।तु.गा.१२७५.००४।।
उचित तें काय जाणावें दुर्बळें। थोरिवेचें काळें तोंड देवा।।तु.गा.१२७६.००१।।

देतों हाका कोणी नाइकती द्वारीं। ओस कोणी घरीं नाहीं ऐसें।।तु.गा.१२७६.००२।।
आलिया अतीता शब्दें समाधान। करितां वचन काय वेंचे।।तु.गा.१२७६.००३।।
तुका म्हणे तुम्हां साजे हे श्रीहरी। आम्ही निलाजिरीं नाहीं ऐसीं।।तु.गा.१२७६.००४।।
जगीं मान्य केलें हा तुझा देकार। कीं कांहीं विचार आहे पुढें।।तु.गा.१२७७.००१।।
करितो कवित्व तोडितों अक्षरें। येणें काय पुरें जालें माझें।।तु.गा.१२७७.००२।।
तोंवरि हे माझी नसरे करकर। जों नव्हे विचार तुझ्या मुखें।।तु.गा.१२७७.००३।।
तुका म्हणे तुज पुंडलिकाची आण। जरि कांहीं वंचन करिसी मज।।तु.गा.१२७७.००४।।
काय तुमचि यास वेंचते गांठोळी। माझी टाळाटाळी करीतसां।।तु.गा.१२७८.००१।।
चतुरांच्या राया अहो पांडुरंगा। ऐसें तरी सांगा निवडूनि।।तु.गा.१२७८.००२।।
कोण तुम्हां सुख असे या कौतुकें । भोगितां अनेक दुःखें आम्ही।।तु.गा.१२७८.००३।।
तुका म्हणे काय झालासी निर्गुण। आम्हां येथें कोण सोडवील।।तु.गा.१२७८.००४।।
आमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि। धरावी ते शुद्धी योगा नये।।तु.गा.१२७९.००१।।
काय या राहिलें विनोदावांचून। आपुलिया भिन्न केलें आम्हां।।तु.गा.१२७९.००२।।
कोठें मूर्तिमंत दावीं पुण्यपाप। काशासी संकल्प वाहाविसी।।तु.गा.१२७९.००३।।
तुका म्हणे आतां आवरावा चेडा। लटिकी ते पीडा पांडुरंगा।।तु.गा.१२७९.००४।।
बहुता करूनि चाळवाचाळवी। किती तुम्हीं गोवी करीतसां।।तु.गा.१२८०.००१।।
लागटपणें मी आलों येथवरी। चाड ते दुसरी न धरूनि।।तु.गा.१२८०.००२।।
दुजियाचा तंव तुम्हांसी कांटाळा। राहासी निराळा एकाएकीं।।तु.गा.१२८०.००३।।
तुका म्हणे आतां यावरी गोविंदा। मजशीं विनोदा येऊं नये।।तु.गा.१२८०.००४।।
तुम्ही बैसलेती निर्गुणाचे खोळे। आम्हांसी कां डोळे कान दिले।।तु.गा.१२८१.००१।।
नाइकवे तुझी अपकीर्ति देवा। अव्हेरिली सेवा न देखवे।।तु.गा.१२८१.००२।।
आपुले पोटीं तो राखियेला वाव। आम्हांसी कां भाव अल्प दिला।।तु.गा.१२८१.००३।।
तुका म्हणे दुःखी असें हें कळों द्या। आपुलिया धंद्या मन नेघे।।तु.गा.१२८१.००४।।

उचिताचा भाग होतों राखोनियां। दिसती ते वायां गेले कष्ट।।तु.गा.१२८२.००१ ।।
वचनाची कांहीं राहेचि ना रूचि। खळाऐसें वाची कुची झाली।।तु.गा.१२८२.००२ ।।
विश्वासानें माझें बुडविलें घर। करविला धीर येथवरी।।तु.गा.१२८२.००३ ।।
तुका म्हणे शेकीं थार नाहीं बुड। कैसें तुम्हीं कोड पुरविलें।।तु.गा.१२८२.००४ ।।
ताकें कृपण तो जेवूं काय घाली। आहाच ते चालीवरी कळे।।तु.गा.१२८३.००१ ।।
काय तुम्हां वेंच घातलें सांकडे। माझें आलें कोडें आजिवरी।।तु.गा.१२८३.००२ ।।
सेवेविण आम्ही न लिंपों त्या कार्या। झाला देवराया निर्धार हा।।तु.गा.१२८३.००३ ।।
तुका म्हणे तुझीं राखावया ब्रीदें। येणें अनुवादें गर्जतसें।।तु.गा.१२८३.००४ ।।
वृत्तीवरी आम्हां येणें काशासाठीं। एवढी हे आटी सोसावया।।तु.गा.१२८४.००१ ।।
जाणतसां परी नेणते जी देवा। भ्रमचि बरवा राखावा तो।।तु.गा.१२८४.००२ ।।
मोडुनि क्षरलों अभेदाची मूस। तुम्हां कां आळस वोढवला।।तु.गा.१२८४.००३ ।।
तुका म्हणे होईं लवकरि उदार। लांबणीचें फार काम नाहीं।।तु.गा.१२८४.००४ ।।
सुलभ कीर्तन दिलें ठसावूनि। करितां धरणी उरी कोण।।तु.गा.१२८५.००१ ।।
आतां न टळावें केलिया नेमासी। उदाराचा होसी हीन काय।।तु.गा.१२८५.००२ ।।
एका नेमें कोठें दुसरा पालट। पादर तो धीट म्हणती त्यासी।।तु.गा.१२८५.००३ ।।
तुका म्हणे किती बोलसील उणें। एकाच वचनें खंड करीं।।तु.गा.१२८५.००४ ।।
देऊनियां प्रेम मागितलें चित्त। झाली फिटाफिट तुम्हां आम्हां।।तु.गा.१२८६.००१ ।।
काशानें उदार तुम्हांसी म्हणावें। एक नेसी भावें एक देसी।।तु.गा.१२८६.००२ ।।
देऊनियां थोडें नेसील हें फार। कुंठिसी विचार अवघियांचा।।तु.गा.१२८६.००३ ।।
तुका म्हणे आम्हां भांडवल चित्त। नेउनी दुःश्चित पाडियेलें।।तु.गा.१२८६.००४ ।।
तुजचि पासाव जालोंसें निर्माण। असावें तें भिन्न कासयानें।।तु.गा.१२८७.००१ ।।
पाहावा जी ठायीं करूनि विचार। न्यून कोठें फार असेचि ना।।तु.गा.१२८७.००२ ।।
ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण। करूनि जतन राहिलोंसें।।तु.गा.१२८७.००३ ।।

तुका म्हणे आतां बोलतसें स्पष्ट। जालों क्रियानष्ट तुम्हा ऐसा।।तु.गा.१२८७.००४।।
ऐसें कां जालें तें मजही न कळे। कीर्तनाचे रळेपळे जगीं।।तु.गा.१२८८.००१।।
कैसें तुम्हां देवा वाटतसें बरें। संतांचीं उत्तरें लाजविलीं।।तु.गा.१२८८.००२।।
भाविकां कंटक करिताती पीडा। हा तंव रोकडा अनुभव।।तु.गा.१२८८.००३।।
तुका म्हणे नाम निर्वाणीचा बाण। याचा अभिमान नाहीं तुम्हां।।तु.गा.१२८८.००४।।
सेवकें करावें सांगितलें काम। सिक्याचा तो धर्म स्वामी राखे।।तु.गा.१२८९.००१।।
काय देवा नेणों आलें गांढेपण। तुम्ही शक्तिहीन झाले दिसां।।तु.गा.१२८९.००२।।
विष्णुदास आम्ही निर्भर ज्या बळें। तें दिसें या काळें अव्हेरिलें।।तु.गा.१२८९.००३।।
तुका म्हणे मूळ पाठवा लौकरी। किंवा करूं हरी काय सांगा।।तु.गा.१२८९.००४।।
करावा उद्धार हें तुम्हां उचित। आम्हीं केली नीत कळली ते।।तु.गा.१२९०.००१।।
पावविली हांक धांवा म्हणऊन। करावें जतन ज्याचें तेणें।।तु.गा.१२९०.००२।।
दुश्चितासी बोल ठेवायासी ठाव। ऐसा आम्ही भाव जाणतसों।।तु.गा.१२९०.००३।।
तुका म्हणे माझें कायावाचामन। दुसरें तें ध्यान करीत नाहीं।।तु.गा.१२९०.००४।।
आतां नको चुकों आपुल्या उचिता। कृपाळुवा कांता रखुमाईच्या।।तु.गा.१२९१.००१।।
आचरावे दोष हें आम्हां उचित। तारावे पतित तुमचें तें।।तु.गा.१२९१.००२।।
आम्ही तों आपुलें केलेंसें जतन। घडो तुम्हांकून घडेल तें।।तु.गा.१२९१.००३।।
तुका म्हणे विठो चतुराच्या राया। आहे तें कासया मोडों देसी।।तु.गा.१२९१.००४।।
आदि वर्तमान जाणसी भविष्य। मागें पुढें नीस संचिताचा।।तु.गा.१२९२.००१।।
आतां काय देऊं पायांपें परिहार। जाणा तो विचार करा देवा।।तु.गा.१२९२.००२।।
आपुलें तें येथें काय चाले केलें। जोडावे ते भलें हात पुढें।।तु.गा.१२९२.००३।।
तुका म्हणे फिके बोल माझे वारा। कराल दातारा होईल तें।।तु.गा.१२९२.००४।।
स्वप्नींचें हें धन हातीं ना पदरीं। प्रत्यक्ष कां हरि होऊं नये।।तु.गा.१२९३.००१।।
आजुनि कां करा चाळवाचाळवी। सावकाशें द्यावी सत्य भेटी।।तु.गा.१२९३.००२।।

बोलोनियां फेडा जीवींचि काजळी। पाहेन कोवळी चरणांबुजें।।तु.गा.१२९३.००३।।
तुका म्हणे माझ्या जीवींचियां जीवा। सारूनियां ठेवा पडदा आतां।।तु.गा.१२९३.००४।।
आपुल्या आपण उगवा लिगाड। काय माझे जड करून घ्याल।।तु.गा.१२९४.००१।।
उद्धारासी काय उधाराचें काम। वाढवूंचि श्रम नये देवा।।तु.गा.१२९४.००२।।
करा आतां मजसाठीं वाड पोट। ठावें नाहीं तंट जालें लोकीं।।तु.गा.१२९४.००३।।
तुका म्हणे बाकी झडलियावरी। न पडें व्यवहारीं संचिताचे।।तु.गा.१२९४.००४।।
पुढिलांचे सोयी माझ्या मना चाली। मताची आणिली नाहीं बुद्धी।।तु.गा.१२९५.००१।।
केलासी तों उभा आजिवरी संतीं। धरविलें हातीं कट देवा।।तु.गा.१२९५.००२।।
आहे तेंची मागों नाहीं खोटा चाळा। नये येऊं बळा लेंकराशीं।।तु.गा.१२९५.००३।।
तुका म्हणे माझा साक्षीचा व्यवहार। कृपण जी थोर परी तुम्ही।।तु.गा.१२९५.००४।।
काया वाचा मनें श्रीमुखाची वास। आणीक उदास विचारासी।।तु.गा.१२९६.००१।।
काय आतां मोक्ष करावा जी देवा। तुमचिया गोवा दर्शनासी।।तु.गा.१२९६.००२।।
केलिया नेमासी उभें ठाडें व्हावें । नेमलें तें भावें पालटेना ।।तु.गा.१२९६.००३।।
तुका म्हणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ।।तु.गा.१२९६.००४।।
आतां आवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ।।तु.गा.१२९७.००१।।
केलें तरी आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवे संतांमधीं ।।तु.गा.१२९७.००२।।
नाहीं भक्तराजीं ठेविला उधार। नामाचा आकार त्यांचियानें।।तु.गा.१२९७.००३।।
तुका म्हणे माझ्या वडिलांचें ठेवणें। गोप्य नारायणें न करावें।।तु.गा.१२९७.००४।।
समर्थपणे हे करा संपादणी। नसतेंचि मनीं धरिल्याची।।तु.गा.१२९८.००१।।
दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत। तरी मी निवांत पाय पाहें।।तु.गा.१२९८.००२।।
खोटियाचें खरें खरियाचें खोटें। मानलें गोमटें तुम्हांसी ते।।तु.गा.१२९८.००३।।
तुका म्हणे तुम्हांसवें करितां वाद। होईजेतें निंद्य जनीं देवा।।तु.गा.१२९८.००४।।
आइकिली कीर्ति संतांच्या वदनीं। तरि हें ठाकोनि आलों स्थळ।।तु.गा.१२९९.००१।।

मागिला पुढिला करावें सारिखें। पालटों पारिखें नये देवा।।तु.गा.१२९९.००२।।
आम्हांसी विश्वास नामाचा आधार। तुटतां हे थार उरी नाहीं।।तु.गा.१२९९.००३।।
तुका म्हणे येथें नसावेंचि दुजें। विनंती पंढरिराजें परिसावी हे।।तु.गा.१२९९.००४।।
कैंचें भांडवल खरा हातीं भाव । कळवळ्यानें माव दावीतसें ।।तु.गा.१३००.००१।।
आतां माझा अंत नको सर्वजाणा । पाहों नारायणा निवडूनि ।।तु.गा.१३००.००२।।
संतांचे उच्छिष्ट मागिले पंगती । करावें संगती लागे ऐसें ।।तु.गा.१३००.००३।।
तुका म्हणे आलों दावूनि विश्वास । संचित तें नास पावे ऐसें ।।तु.गा.१३००.००४।।
न व्हावा तो बरा मुळींच संबंध। विश्वासिकां वध बोलिलासे।।तु.गा.१३०१.००१।।
आतां माझें हित काय तें विचारा। सत्यत्वें दातारा पांडुरंगा।।तु.गा.१३०१.००२।।
नाहीं भाव परी म्हणवितों दास। नको देऊं यास उणें येऊं ।।तु.गा.१३०१.००३।।
तुका म्हणे कां हे उद्धरितां दीन। मानीतसां सीण मायबापा।।तु.गा.१३०१.००४।।
तुम्हांसाठीं आम्हां आपुला विसर। करिता अव्हेर कैसें दिसे।।तु.गा.१३०२.००१।।
विचारा जी आतां ठायींचें हे देवा। आम्हां नये हेवा वाढवितां।।तु.गा.१३०२.००२।।
आलों ठाकोनियां सुखाची वसती। पुढें माझ्या युक्ति खुंटलिया।।तु.गा.१३०२.००३।।
तुका म्हणे जाला सकळ वृत्तांत । केला प्रणिपात म्हणऊनि।।तु.गा.१३०२.००४।।
जेथें माझी दृष्टी राहिली बैसोन। तेथेंचि हें मन गुंडाळतें।।तु.गा.१३०३.००१।।
टाळावी ते पीडा आपणांपासून। दिठावलें अन्न ओकवितें।।तु.गा.१३०३.००२।।
तुम्हांसी कां कोडें कोणीये विशीचें। नवलाव याचें वाटतसे।।तु.गा.१३०३.००३।।
तुका म्हणे वेगीं उभारा जी कर। कीर्ति मुखें थोर गर्जईन।।तु.गा.१३०३.००४।।
नव्हें मी आहाच आशेचें बांधलें। जें हें टोंकविलें नारायणा।।तु.गा.१३०४.००१।।
अंतर तें तुम्हां बरें कळों येतें। वेव्हार उचितें चाळवीजे।।तु.गा.१३०४.००२।।
मनें कल्पिलें तें आवरितां पाप। संकल्पी विकल्प याचि नांवें।।तु.गा.१३०४.००३।।
तुका म्हणे आम्हां न सोसे जळजळ। सिजल्यावरी जाळ कढ खोटा।।तु.गा.१३०४.००४।।

तुझिया विनोदें आम्हांसी मरण। सोसियेला शीण बहु फेरे।।तु.गा.१३०५.००१ ।।
आतां आपणचि येसी तें करीन। नाम हें धरीन तुझें कंठीं।।तु.गा.१३०५.००२ ।।
वियोगेंचि आलों उसंतीत वनें। संकल्प हे मनें वाहोनियां।।तु.गा.१३०५.००३ ।।
तुका म्हणे वर्म सांपडलें सोपें। गोवियलों पापें पुण्यें होतों।।तु.गा.१३०५.००४।।
धरूनियां मनीं बोलिलों संकल्प। होसी तरि बाप सिद्धी नेई।।तु.गा.१३०६.००१ ।।
उत्कंठा हे आजी झाली माझे पोटीं। मागील या गोठी टाळा टाळी।।तु.गा.१३०६.००२।।
माझा मज असे ठाउका निर्धार। उपाधि उत्तर न साहे पैं ।।तु.गा.१३०६.००३।।
तुका म्हणे तुज दिली आठवण। तरि अभिमान धरीं माझा।।तु.गा.१३०६.००४।।
ऐका जी देवा माझी विनवणी। मस्तक चरणीं ठेवीतसें।।तु.गा.१३०७.००१ ।।
सन्निध पातलों सांडुनियां शंका। सन्मुखचि एकाएकीं पुढें।।तु.गा.१३०७.००२।।
जाणविलें कोठें पावे पायांपाशीं। केली या जिवासी साटी म्हूण ।।तु.गा.१३०७.००३।।
तुका म्हणे माझे हातीं द्या उद्धार। करीं करकर म्हणवूनि।।तु.गा.१३०७.००४।।
आतां गुण दोष काय विचारिसी। मी तों आहें रासी पातकाची।।तु.गा.१३०८.००१ ।।
पतितपावनासवें समागम। आपुलाला धर्म चालवीजे।।तु.गा.१३०८.००२।।
घणघायीं भेटी लोखंड परिसा। तरी अनारिसा न पालटे।।तु.गा.१३०८.००३।।
तुका म्हणे माती कोण पुसे फुका। कस्तुरीच्या तुका समागमें।।तु.गा.१३०८.००४।।
सांडावी हे भीड अधमाचे चाळे। मद्यपी बरळे भलत्या छंदें।।तु.गा.१३०९.००१ ।।
ऐसे तंव तुम्ही नाहीं जी दिसत। कां हें अनुचित वदलेती।।तु.गा.१३०९.००२।।
फांटा आला त्यासी नाहीं वाढा वारा। बेरसाचा खरा हा तो गुण।।तु.गा.१३०९.००३।।
तुका म्हणे नाहीं ज्याच्या बापा ताळा। तो देखे विटाळा संतां अंगीं।।तु.गा.१३०९.००४।।
करावा उद्धार किंवा घ्यावी हारी। एका बोला स्थिरी राहें देवा।।तु.गा.१३१०.००१ ।।
निरासेनें माझा होईल संदेह। अवघेंचि आहे मूळ पायीं।।तु.गा.१३१०.००२।।
राहिलों डिंकोनी कांहींच न कळे। कोणा नेणों काळें उदय भाग्य।।तु.गा.१३१०.००३।।

तुका म्हणे बहु उद्वेगला जीव। भाकीतसे कींव देवराया।।तु.गा.१३१०.००४।।
झड मारोनियां बैसलों पंगती। उठवितां फजिती दातयाची।।तु.गा.१३११.००१ ।।
काय तें उचित तुम्हां कां न कळे। कांहो झांका डोळे पांडुरंगा।।तु.गा.१३११.००२।।
घेईन इच्छेचें मागोनि सकळ। नाहीं नव्हे काळ बोलायाचा।।तु.गा.१३११.००३।।
तुका म्हणे जालों माना अधिकारी। नाहीं लोक परी लाज देवा।।तु.गा.१३११.००४।।
काय तें सामर्थ्य न चले या काळें। काय जालें बळें शक्तिहीन।।तु.गा.१३१२.००१ ।।
माझिया संचितें आणिलासी हारी। जालें तुजवरी वरिष्ठ तें।।तु.गा.१३१२.००२।।
काय गमाविली सुदर्शन गदा। त्या भेणें गोविंदा लाजतसां।।तु.गा.१३१२.००३।।
तुका म्हणे काय ब्रिदाचें ते काम। सांडा परतें नाम दिनानाथ।।तु.गा.१३१२.००४।।
करावा कांटाळा नव्हे हें उचित। आधींच कां प्रीत लावियेली।।तु.गा.१३१३.००१ ।।
जाणतसां तुम्हीं रूपाचें लाघव। आपलालें जीव घेतें ऐसा।।तु.गा.१३१३.००२।।
काय म्हणऊनि आलेति आकारा। आम्हां उजगरा करावया।।तु.गा.१३१३.००३।।
तुका म्हणे भीड होती आजिवरी। आतां देवा उरी कोण ठेवी।।तु.गा.१३१३.००४।।
कळलें माझा तुज नव्हे रे आठव। काय काजें जीव ठेवूं आतां।।तु.गा.१३१४.००१ ।।
तूं काय करिसी माझिया संचिता। धिग् हे अनंता झालें जिणें।।तु.गा.१३१४.००२।।
पतितपावन राहिलों हे आशा। आइकोनि ठसा कीर्ति तुझी।।तु.गा.१३१४.००३।।
आतां कोण करील माझा अंगीकार। कळलें निष्ठुर झालासी तूं।।तु.गा.१३१४.००४।।
तुका म्हणे माझी मांडिली निरास। करितों जीवा नास तुजसाठीं।।तु.गा.१३१४.००५।।
जाय परते काय आणिला कांटाळा। बोला एक वेळा ऐसें तरी।।तु.गा.१३१५.००१ ।।
कां हो केली तुम्ही निष्ठुरता देवा। मानेना हें सेवा करितों ते।।तु.गा.१३१५.००२।।
भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी। तें नाहीं अदृष्टीं आमुचिया।।तु.गा.१३१५.००३।।
तुका म्हणे तुम्हापासूनि अंतर। न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी।।तु.गा.१३१५.००४।।
परिस काय धातु सोनें न करितु। फेडितो निभ्रांतु लोहपांगु।।तु.गा.१३१६.००१ ।।

काय तयाहूनि जालासी बापुडें। फेडितां सांकडें माझें एक ।।तु.गा.१३१६.००२ ।।
कल्पतरू कोड पुरवितो रोकडा। चिंतामणि खडा चिंतिलें तें ।।तु.गा.१३१६.००३ ।।
चंदनाच्या वासें वसतां चंदन। होती काष्ठ आन वृक्षयाती ।।तु.गा.१३१६.००४ ।।
काय त्याचें उणें जालें त्यासी देतां। विचारीं अनंता तुका म्हणे ।।तु.गा.१३१६.००५ ।।
तुझा म्हणऊनि जालों उतराई। त्याचें वर्म काई तें मी नेणें ।।तु.गा.१३१७.००१ ।।
हातीं धरोनियां दांवी मज वाट। पुढें कोण नीट तेंचि देवा ।।तु.गा.१३१७.००२ ।।
देवभक्तपण करावें जतन। दोहीं पक्षीं जाण तूंचि बळी ।।तु.गा.१३१७.००३ ।।
अभिमानें तुज लागली हें लाज। शरणागतां काज करावया ।।तु.गा.१३१७.००४ ।।
तुका म्हणे बहु नेणता मी फार। म्हणऊनि विचार जाणविला ।।तु.गा.१३१७.००५ ।।
निष्ठुर मी जालों अतिवादागुणें। हे कां नारायणें नेणिजेल ।।तु.गा.१३१८.००१ ।।
सांडियेली तुम्ही गोत परिसोय। फोडविली डोय कर्माहातीं ।।तु.गा.१३१८.००२ ।।
सांपडूनि संदी केली जीवेंसाठीं। घ्यावयासी तुटी कारण हें ।।तु.गा.१३१८.००३ ।।
तुका म्हणे तुज काय म्हणू उणें। नाहीं अभिमानें चाड देवा ।।तु.गा.१३१८.००४ ।।
करितां विचार सांपडलें वर्म। समूळ निश्रम परिहाराचें ।।तु.गा.१३१९.००१ ।।
मज घेऊनियां आपणांसीं द्यावें। साटीं जीवें भावें नारायणा ।।तु.गा.१३१९.००२ ।।
उरी नाहीं मग पडदा कां आला। स्वमुखेंचि भला करितां वाद ।।तु.गा.१३१९.००३ ।।
तुका म्हणे माझें खरें देणें घेणें। तुम्हीं साक्षी जाणें अंतरीचें ।।तु.गा.१३१९.००४ ।।
नाहीं तरी आतां कैंचा अनुभव। जालासी तूं देव घरघेणा ।।तु.गा.१३२०.००१ ।।
जेथें देखों तेथें लांचाचे पर्वत। घ्यावें तरि चित्त समाधान ।।तु.गा.१३२०.००२ ।।
आधीं वरी हात या नांवें उदार। उसण्याचे उपकार फिटाफीट ।।तु.गा.१३२०.००३ ।।
तुका म्हणे जैसी तैसी करूं सेवा। सामर्थ्यानें देवा पायांपाशीं ।।तु.गा.१३२०.००४ ।।
आम्ही म्हणों कोणी नाहीं तुज आड। दिसतोसी भ्याड पांडुरंगा ।।तु.गा.१३२१.००१ ।।
हा गे माझ्या भोगें केलासी परता। विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ।।तु.गा.१३२१.००२ ।।

आम्ही तुज असों देऊनि आधार। नाम वारंवार उच्चारितों ।।तु.गा.१३२१.००३ ।।
तुका म्हणे मज धरियेलें काळे। पंचभूतीं खळें करूनियां ।।तु.गा.१३२१.००४ ।।
उपजल्या काळें शुभ कां शकुन। आतां आवरोन राहिलेती ।।तु.गा.१३२२.००१ ।।
नाहीं मागितली वचनाची जोडी। निष्काम रोकडी वरिवरि ।।तु.गा.१३२२.००२ ।।
सत्याविण काय उगीच लांबणी। कारियाची वाणी येर भूस ।।तु.गा.१३२२.००३ ।।
तुका म्हणे ऐसी कोणा चाळवणी। न विचारा मनीं पांडुरंगा ।।तु.गा.१३२२.००४ ।।
तुम्हां आम्हांसवें न पडावी गांठी। आलेति जगजेठी कळों आतां ।।तु.गा.१३२३.००१ ।।
किती म्हणों आतां वाइटा वाइट। शिवों नये वीट आल्यावरी ।।तु.गा.१३२३.००२ ।।
बोलिल्याची आतां हेचि परचित। भीड भार थीत उडविली ।।तु.गा.१३२३.००३ ।।
तुका म्हणे आली रोकडी प्रचिती। झांकणें तें किती कोठें देवा ।।तु.गा.१३२३.००४ ।।
काय तुज मागें नाहीं जाणवलें। माझें नाहीं केलें हित कांहीं।।तु.गा.१३२४.००१ ।।
डोळे झांकुनियां होसी अबोलणा। तेव्हां नारायणा आतां कैसा ।।तु.गा.१३२४.००२ ।।
न कळे उचित न सांगतां स्पष्ट। ऐसा क्रियानष्ट काय जाणे ।।तु.गा.१३२४.००३ ।।
तुका म्हणे माझा घात तुम्हां ठावा। तरि कां आधीं देवा वारूं नये ।।तु.गा.१३२४.००४ ।।
कामक्रोध माझे लावियेले पाठीं। बहूत हिंपुटी झालों देवा ।।तु.गा.१३२५.००१ ।।
आवरितां तुझे तुज नावरती। थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ।।तु.गा.१३२५.००२ ।।
तुझिया विनोदें आम्हां प्राणासाटी। भयाभीत पोटी सदा दुःखी ।।तु.गा.१३२५.००३ ।।
तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण। तुला हांसे कोण समर्थासी ।।तु.गा.१३२५.००४ ।।
उपजों मरों हे तों आमुची मिरासी। हें तूं निवारिसी तरी थोर ।।तु.गा.१३२६.००१ ।।
उभा राहे करीं खराखोटा वाद। आम्हीं जालों निंद्य लंडपणें ।।तु.गा.१३२६.००२ ।।
उभयतां आहे करणें समान। तुम्हां ऐसा म्हणे मीही देवा ।।तु.गा.१३२६.००३ ।।
तुका म्हणे हातीं सांपडलें वर्म। अवघाचि भ्रम फेडिन आतां ।।तु.गा.१३२६.००४ ।।
तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति। आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ।।तु.गा.१३२७.००१ ।।

काय जाणों देवा होसील निजला। नेणों जी विठ्ठला मायबापा।।तु.गा.१३२७.००२।।
भवबंधनाचे तुटतील फांसे। तें कां येथें ऐसे अव्हेरिलें।।तु.गा.१३२७.००३।।
तुका म्हणे माझें दचकलें मन। वाटे वायांविण श्रम केला।।तु.गा.१३२७.००४।।
आम्ही बळकट जालों फिराऊनि। तुमच्या वचनीं तुम्हां गोवूं।।तु.गा.१३२८.००१।।
जालें तेव्हां जालें मागील तें मागें। आतां वर्म लागें ठावें जालें।।तु.गा.१३२८.००२।।
तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध। शुद्ध त्यासी शुद्ध बुद्ध व्हावें।।तु.गा.१३२८.००३।।
तुका म्हणे आम्हां आत्मत्वाची सोय। आपणचि होय तैसाचि तूं।।तु.गा.१३२८.००४।।
क्षर अक्षर हे तुमचे विभाग। कासयानें जग दुरी धरा।।तु.गा.१३२९.००१।।
तैसें आम्ही नेणों पालटोंच कांहीं। त्यागिल्याचि नाहीं मागें चाड।।तु.गा.१३२९.००२।।
प्रतिपादिता तूं समविषमाचा। प्रसाद तो याचा पापपुण्य।।तु.गा.१३२९.००३।।
तुका म्हणे तुम्हां नाना अवगणीं। लागे संपादणी लटिक्याची।।तु.गा.१३२९.००४।।
निर्गुणाचे घ्यावें गुणासी दर्शन। एकाएकीं भिन्न भेद घडे।।तु.गा.१३३०.००१।।
तुम्हां आम्हां आतां न पडे यावरी। आहों तेंचि वरी जेथें तेथें।।तु.गा.१३३०.००२।।
आपणापासुनि नसावें अंतर। वेचिलें उत्तर म्हणउनि।।तु.गा.१३३०.००३।।
तुका म्हणे अंगा आली कठिणता। आमच्या अनंता तुम्हा ऐसी।।तु.गा.१३३०.००४।।
सेवकासी आज्ञा निरोपासी काम। स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे।।तु.गा.१३३१.००१।।
मनाचिये मुळीं रहावें बैसोन। आकर्षावे गुण पायांपाशीं।।तु.गा.१३३१.००२।।
भेटीचे तांतडी करितसें लाहो। ओंवाळावा देहो ऐसें वाटे।।तु.गा.१३३१.००३।।
तुका म्हणे माझें करावे कारण। आपुलें जतन ब्रीद करा।।तु.गा.१३३१.००४।।
आम्ही भाविक हे काय जाणों खोडी। आइकोनि प्रौढी विनविलें।।तु.गा.१३३२.००१।।
नाहीं ऐसें येथें झालेती असतां। वाढविली चिंता अधिक सोसें।।तु.गा.१३३२.००२।।
न कळेचि आधीं करितां विचार। न धरितां धीर आहाचता।।तु.गा.१३३२.००३।।
तुका म्हणे आतां वचनें वचन। वाढले तिक्ष्ण बुद्धि झाली।।तु.गा.१३३२.००४।।

नये ऐसें बोलों कठिण उत्तरें। सलगी लेंकुरें केली पुढें ।।तु.गा.१३३३.००१ ।।
अपराध कीजे घडला तो क्षमा। सिकवा उत्तमा आमुचिया ।।तु.गा.१३३३.००२ ।।
धरूं धावें आगी पोळेल तें नेणें। ओढिलिया हाणे माते बाळ ।।तु.गा.१३३३.००३ ।।
तुका म्हणे भार ज्याचा जार त्यासी। प्रवीण येविशीं असा तुम्ही ।।तु.गा.१३३३.००४ ।।
पापी म्हणो तरि आठवितों पाय। दोष बळी काय तयाहूनि ।।तु.गा.१३३४.००१ ।।
ऐशा विचाराचे घालूनि कोंडणीं। काय चक्रपाणी निजलेती ।।तु.गा.१३३४.००२ ।।
एक वेळ जेणें पुत्राच्या उद्देशें। घेतल्याचे कैसे नेलें दुःख ।।तु.गा.१३३४.००३ ।।
तुका म्हणे अहो वैकुंठनायका। चिंता कां सेवका तुमचिया ।।तु.गा.१३३४.००४ ।।
कवणाशीं भांडो कोण माझे साहे। कोण मज आहे तुजविण ।।तु.गा.१३३५.००१ ।।
धरिले उदास दुरदुरांतरें। सांडीं एकसरें केली माझी ।।तु.गा.१३३५.००२ ।।
आइकोन माझे नाइकसी बोल। देखोनियां खोळबुंथी घेसी ।।तु.गा.१३३५.००३ ।।
तुका म्हणे एके गांवींची वसती। म्हणऊनी खंती वाटे देवा ।।तु.गा.१३३५.००४ ।।
तरले ते मागे आपुलिया सत्ता। कमाई अनंता करूनियां ।।तु.गा.१३३६.००१ ।।
उसणें फेडितां धर्म तेथे कोण। ते तुज अनन्य तुम्ही त्यांसी ।।तु.गा.१३३६.००२ ।।
मज ऐसा कोण सांग वायां गेला। तो तुम्ही तारिला पांडुरंगा ।।तु.गा.१३३६.००३ ।।
तुका म्हणे नामासारखी करणी। न देखें हें मनीं समजावें ।।तु.गा.१३३६.००४ ।।
तुज जाणे तान्हे नाहीं पांडुरंगा। कां जी मज सांगा उपेक्षिलें ।।तु.गा.१३३७.००१ ।।
तुज ठावें होतें पातकी मी खरा। आधीच कां थारा दिला पायीं ।।तु.गा.१३३७.००२ ।।
अंक तो पडिला हरिचा मी दास। भेद पंगतीस करूं नये ।।तु.गा.१३३७.००३ ।।
तुका म्हणे आम्हीं जिंतीले तें खरें। आतां उणें पुरें तुम्हां लागीं ।।तु.गा.१३३७.००४ ।।
विनवितों तरी आणितोसि परी। याचकानें थोरी दातयाची ।।तु.गा.१३३८.००१ ।।
आमुचेही कांहीं असो द्या उपकार। एकल्यानें थोर कैंचे तुम्ही ।।तु.गा.१३३८.००२ ।।
न घ्यावी जी कांहीं बहुसाल सेवा। गौरव तो देवा यत्न कीजे ।।तु.गा.१३३८.००३ ।।

तुका म्हणे नाहीं आमुची मिरासी। असावेंसी ऐसीं दुर्बळेंचि।।तु.गा.१३३८.००४।।
आपण काय सादर। विशीं आम्हां कां निष्ठुर।।तु.गा.१३३९.००१।।
केले भक्त तैसें देईं । तुझें प्रेम माझ्याठायीं।।तु.गा.१३३९.००२।।
काय पंगतीस कोंडा। एकांतासी साकरमांडा।।तु.गा.१३३९.००३।।
काय एकपण। पोतां घालुनि गांठी खूण।।तु.गा.१३३९.००४।।
काय घ्यावें तैसें। तया आपण अनारिसें।।तु.गा.१३३९.००५।।
तुका म्हणे मधीं। आतां तोडूं भेदबुद्धी।।तु.गा.१३३९.००६।।
नाहीं देणें घेणें। गोवी केली अभिमानें।।तु.गा.१३४०.००१।।
आतां कां हो निवडूं नेदां। पांडुरंगा येवढा धंदा।।तु.गा.१३४०.००२।।
पांचांमधीं जावें । थोड्यासाठीं फजित व्हावें।।तु.गा.१३४०.००३।।
तुज ऐसीं नाहीं। पांडुरंगा आम्ही कांहीं।।तु.गा.१३४०.००४।।
टाकूं तो वेव्हार। तुज बहु करकर।।तु.गा.१३४०.००५।।
तुका म्हणे आतां। निवडूं संतां हे देखतां।।तु.गा.१३४०.००६।।
चित्त तुझ्या पायीं। ठेवुनि जालों उतराई।।तु.गा.१३४१.००१।।
परि तूं खोटा केशीराजा। अंतपार न कळे तुझा।।तु.गा.१३४१.००२।।
आम्ही सर्वस्वें उदार। तुज देऊनि वेव्हार।।तु.गा.१३४१.००३।।
इंद्रियांची होळी। संसार दिला बळी।।तु.गा.१३४१.००४।।
न पडे विसर। तुझा आम्हां निरंतर।।तु.गा.१३४१.००५।।
प्रेम एकासाटीं। तुका म्हणे न वेचे गांठी।।तु.गा.१३४१.००६।।
देवा तुज मज पण। पाहों आगळा तों कोण।।तु.गा.१३४२.००१।।
तरी साच मी पतित। तूंच खोटा दिनानाथ।।तु.गा.१३४२.००२।।
ग्वाही साधुसंत जन। करूनि अंगीं लावीन।।तु.गा.१३४२.००३।।
आम्ही धरिले भेदाभेद। तुज नव्हे त्याचा छेद।।तु.गा.१३४२.००४।।

आम्ही बळकाविले दोष। न चले तुझें कांहीं त्यास।।तु.गा.१३४२.००५।।
दिशा भरल्या माझ्या मनें। लपालासी त्याच्या भेणें।।तु.गा.१३४२.००६।।
तुका म्हणे चित्त। करी तुझी माझी नीत।।तु.गा.१३४२.००७।।
बैसलोंसे दारीं। धरणें कोंडोनि भिकारी।।तु.गा.१३४३.००१।।
आतां कोठें हालों नेदी। बरी सांपडली संदी।।तु.गा.१३४३.००२।।
किती वेरझारा। मागें घातलिया घरा।।तु.गा.१३४३.००३।।
माझें मज नारायणा। देतां कां रे नये मना।।तु.गा.१३४३.००४।।
भांडावें तें किती। बहु सोसिली फजिती।।तु.गा.१३४३.००५।।
तुका म्हणे नाहीं। लाज तुझे अंगीं कांहीं।।तु.गा.१३४३.००६।।
संसाराच्या भेणें। पळों न लाहेसें केलें।।तु.गा.१३४४.००१।।
जेथें तेथें आपण आहे। आम्हीं करावें तें काय।।तु.गा.१३४४.००२।।
एकांतासी ठाव। तिहीं लोकीं नाहीं वाव।।तु.गा.१३४४.००३।।
गांवा जातो ऐसें। नलगे म्हणावें तें कैसें।।तु.गा.१३४४.००४।।
स्वप्नाचिये परी। जागा पाहें तंव घरीं।।तु.गा.१३४४.००५।।
तुका म्हणे काय। तुझें घेतलें म्यां आहे।।तु.गा.१३४४.००६।।
तुझा भरवसा आम्हां। फार होता पुरुषोत्तमा।।तु.गा.१३४५.००१।।
भवसागरसंकटीं। तारिशील जगजेठी।।तु.गा.१३४५.००२।।
नाम आदित्याचें झाड। त्याचा न पडे उजेड।।तु.गा.१३४५.००३।।
शिलंगणीचे सोने। त्यासी गहाण ठेवी कोण।।तु.गा.१३४५.००४।।
नामासारखी करणी। कोठें नाहीं त्रिभुवनीं।।तु.गा.१३४५.००५।।
तुका म्हणे देवा। ब्रीद सोडूनियां ठेवा।।तु.गा.१३४५.००६।।
माझीं मेलीं बहुवरि। तूं कां जैसा तैसा हरी।।तु.गा.१३४६.००१।।
विठो कैसा वांचलासी। आतां सांग मजपाशीं।।तु.गा.१३४६.००२।।

तुज देखतांचि माझा। बाप गेला आजा पणजा।।तु.गा.१३४६.००३।।
आम्हां लागलिसे पाठी। बालत्व तारुण्य काठी।।तु.गा.१३४६.००४।।
तुज फावलें तें मागें। कोणी नसतां वादि लागे।।तु.गा.१३४६.००५।।
तुका म्हणे तुझ्या अंगीं। मज देखतां लागलीं अवघीं।।तु.गा.१३४६.००६।।
केला पण सांडी। ऐसीयासी म्हणती लंडी।।तु.गा.१३४७.००१।।
आतां पाहा विचारून। समर्थासी बोले कोण।।तु.गा.१३४७.००२।।
आपला निवाड। आपणचि करितां गोड।।तु.गा.१३४७.००३।।
तुम्हीं आम्हीं देवा। बोलिला बोल सिद्धी न्यावा।।तु.गा.१३४७.००४।।
असे धुरे उणें। मागें सरे तुका म्हणे।।तु.गा.१३४७.००५।।
आम्हां गांजी जन। तरि कां मेला नारायण।।तु.गा.१३४८.००१।।
जालों पोरटीं निढळें। नाहीं ठाव बुड आळें।।तु.गा.१३४८.००२।।
आम्ही जना भ्यावें। तरि कां न लाजिजे देवें।।तु.गा.१३४८.००३।।
तुका म्हणे देश। जाला देवाविण ओस।।तु.गा.१३४८.००४।।
न व्हावें तें जालें। तुम्हां आम्हांसी लागलें।।तु.गा.१३४९.००१।।
आतां हालमाकलमें। भांडोनियां काढूं वर्मे ।।तु.गा.१३४९.००२।।
पाटोळ्यासंवसाटी। दिली रगट्याची गांठी।।तु.गा.१३४९.००३।।
तुका म्हणे हारी। आणूनियां करिन सरी।।तु.गा.१३४९.००४।।
काशासाठीं आम्हीं जाळला संसार। न करा विचार ऐसा देवा।।तु.गा.१३५०.००१।।
कैसें नेणों तुम्हां करवतें उदास। माझा प्रेमरस भंगावया।।तु.गा.१३५०.००२।।
समर्पूनि ठेलों देह हा सकळ। धरितां विटाळ न लज्जा माझा।।तु.गा.१३५०.००३।।
तुका म्हणे अवघी मोकलूनि आस। फिरतो उदास कोणासाठीं।।तु.गा.१३५०.००४।।
आळणी ऐसें कळों आलें। त्यासी भलें मौनचि।।तु.गा.१३५१.००१।।
नये कांहीं वेचूं वाणी। वेडे घाणी सांगातें।।तु.गा.१३५१.००२।।

वेगळें तें देहभावा। भ्रम जीवा माजिरा।।तु.गा.१३५१.००३ ।।
तुका म्हणे कवतुक केलें। किंवा भलें दवडितां।।तु.गा.१३५१.००४।।
लटिका देव म्हणतां ऐसा। संदेहसा वाटतसे।।तु.गा.१३५२.००१ ।।
ऐसें आलें अनुभवा। मजही सेवा करितां।।तु.गा.१३५२.००२।।
शून्याकारी बहुमोळा। भेंडोळा हे पवाडे।।तु.गा.१३५२.००३ ।।
तुका म्हणे ताळी नाहीं। एके ठायीं चपळत्वें।।तु.गा.१३५२.००४।।
जैशासाठीं तैसें व्हावें। हें बरवें कळलेंसें।।तु.गा.१३५३.००१ ।।
उदास तूं नारायणा। मीही म्हणा तुम्हीच।।तु.गा.१३५३.००२।।
ठका महाठका जोडा। हे धडफुडा लागासी।।तु.गा.१३५३.००३ ।।
एकांगीच भांडे तुका। नाहीं धोका जीवित्वें।।तु.गा.१३५३.००४।।
आपुलें मागतां। काय नाहीं आम्हां सत्ता।।तु.गा.१३५४.००१ ।।
परि या लौकिकाकारणें। उरी ठेविलें बोलणें।।तु.गा.१३५४.००२।।
येचि आतां घडी। करूं बैसों तेचि फडी।।तु.गा.१३५४.००३ ।।
तुका म्हणे करितों तुला। ठाव नाहींसा विठ्ठला।।तु.गा.१३५४.००४।।
तुजशीं संबंध खोटा। परता परता रे तूं थोटा।।तु.गा.१३५५.००१ ।।
देवा तुझें काय घ्यावें। आप आपणां ठकावें।।तु.गा.१३५५.००२।।
जेथें मुद्दल न ये हातां। व्याज मरावें लेखितां।।तु.गा.१३५५.००३ ।।
तुका म्हणे ऐसा। त्रिभुवनीं तुझा ठसा।।तु.गा.१३५५.००४।।
मागतां विभाग। कोठें लपाल जी मग।।तु.गा.१३५६.००१ ।।
संत साक्षी या वचना। त्यांसी ठाउकिया खुणा।।तु.गा.१३५६.००२।।
होईन धरणेकरी। मग मी रिघों नेदीं बाहेरी।।तु.गा.१३५६.००३ ।।
तुका म्हणे मी अक्षर। तुज देवपणाचा भार।।तु.गा.१३५६.००४।।
बहु होता भला। परि ये रांडेने नासिला।।तु.गा.१३५७.००१ ।।

बहु शिकला रंग चाळे। खरें खोटें इचे वेळे।।तु.गा.१३५७.००२।।
नव्हतें आळवितें कोणी। इनें केला जग ऋणी।।तु.गा.१३५७.००३।।
ज्याचें त्यासी नेदी देऊं। तुका म्हणे धांवे खाऊं।।तु.गा.१३५७.००४।।
मज संतांचा आधार। तूं एकलें निर्विकार।।तु.गा.१३५८.००१।।
पाहा विचारूनी देवा। नको आम्हांसवें दावा।।तु.गा.१३५८.००२।।
तुज बोल न बोलवे। आम्हां भांडायाची सवे।।तु.गा.१३५८.००३।।
तुका म्हणे तरी। ऐक्यभावें नुरे उरी।।तु.गा.१३५८.००४।।
आम्हीं याची केली सांडी। कोठें तोंडीं लागावें।।तु.गा.१३५९.००१।।
आहे तैसें असो आतां। चिंतें चिंता वाढते।।तु.गा.१३५९.००२।।
बोलिल्याचा मानी सीण। भिन्न भिन्न राहावें।।तु.गा.१३५९.००३।।
तुका म्हणे आम्हापाशीं। धीरा ऐसी जतन।।तु.गा.१३५९.००४।।
धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें। तो तों त्याच्या दुःखें घामेजेना।।तु.गा.१३६०.००१।।
इंगळासी सन्निधान अतित्याई। क्षेम देतां काई सुख वाटे।।तु.गा.१३६०.००२।।
सप्रेमें कुरवाळी महाफणी व्याळ। आपुले तो ढाळ सांडी केवीं।।तु.गा.१३६०.००३।।
तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला। तयाचा अबोला आकाशासीं।।तु.गा.१३६०.००४।।
मजशीं पुरें न पडे वादें। सुख दोहींच्या संवादें।।तु.गा.१३६१.००१।।
तूंचि आगळा काशानें। शिर काय पायांविणें।।तु.गा.१३६१.००२।।
वाहों तुझा भार। दुःख साहोनि अपार।।तु.गा.१३६१.००३।।
तुका म्हणे नाहीं भेद। देवा करूं नये वाद।।तु.गा.१३६१.००४।।
केली सलगी तोंडपिटी। आम्ही लडिवाळें धाकुटीं।।तु.गा.१३६२.००१।।
न बोलावें तेंचि आलें। देवा पाहिजे साहिलें।।तु.गा.१३६२.००२।।
अवघ्यामध्यें एक वेडें। तेंचि खेळविती कोडें।।तु.गा.१३६२.००३।।
तुका म्हणे मायबापा। मजवरी कोपों नका।।तु.गा.१३६२.००४।।

आतां न करीं सोस। सेवीन हा ब्रह्मरस।।तु.गा.१३६३.००१ ।।
सुखें सेवीन अमृत। ब्रह्मपदींचें निश्चित।।तु.गा.१३६३.००२ ।।
तुमचा निज ठेवा। आम्ही पाडियेला ठावा।।तु.गा.१३६३.००३ ।।
तुका म्हणे देवराया। आतां लपालेती वायां।।तु.गा.१३६३.००४ ।।
कां जी वाढविलें। न लगतां हें उगलें।।तु.गा.१३६४.००१ ।।
आतां मानितां कांटाळा। भोंवतीं मिळालिया बाळा।।तु.गा.१३६४.००२ ।।
लावूनियां सवे। पळतां दिसाल बरवे।।तु.गा.१३६४.००३ ।।
तुका म्हणे बापा। येतां न कळाचि रूपा।।तु.गा.१३६४.००४ ।।
मज नाहीं धीर। तुम्ही न करा अंगीकार।।तु.गा.१३६५.००१ ।।
ऐसें पडिलें विषम। बळी देवाहूनि कर्म।।तु.गा.१३६५.००२ ।।
चालों नेणों वाट। केल्या न पवाचि बोभाट।।तु.गा.१३६५.००३ ।।
वेंचों नेणों जीवें। तुका उदास धरिला देवें।।तु.गा.१३६५.००४ ।।
अंतरींचें जाणां। तरि कां येऊं दिलें मना।।तु.गा.१३६६.००१ ।।
तुमची करावी म्यां सेवा। आतां अव्हेरितां देवा।।तु.गा.१३६६.००२ ।।
नव्हती मोडामोडी। केली मागें तेचि घडी।।तु.गा.१३६६.००३ ।।
तुका म्हणे दिला ठाव। पायीं लागो दिला भाव।।तु.गा.१३६६.००४ ।।
रायाचें सेवक । शेवटीचें पीडी रंक ।।तु.गा.१३६७.००१ ।।
हा तों हिनाव कवणा। कां हो नेणां नारायणा।।तु.गा.१३६७.००२ ।।
परिसेंसी भेटी। नव्हे लोहोपणा तुटी।।तु.गा.१३६७.००३ ।।
तुझें नाम कंठीं। तुक्या काळासवें भेटी।।तु.गा.१३६७.००४ ।।
विष्णुदासां भोग । जरी आम्हां पीडी रोग ।।तु.गा.१३६८.००१ ।।
तरि हें दिसे लाजिरवाणें । काय तुम्हांसी सांगणें ।।तु.गा.१३६८.००२ ।।
आम्हां काळें खावें । बोलिलें तें वायां जावें ।।तु.गा.१३६८.००३ ।।

तुका म्हणे दास । आम्ही भोगूं गर्भवास ।।तु.गा.१३६८.००४ ।।
तुम्हां न पडे वेच । माझा सरेल संकोच ।।तु.गा.१३६९.००१ ।।
फुकासाठीं जोडे यश । येथें कां करा आळस ।।तु.गा.१३६९.००२ ।।
कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ।।तु.गा.१३६९.००३ ।।
तुका म्हणे शिकविलें । माझें ऐकावें विठ्ठलें ।।तु.गा.१३६९.००४ ।।
जैसीं तैसीं तरी । शरणागतें तुझीं हरी ।।तु.गा.१३७०.००१ ।।
आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ।।तु.गा.१३७०.००२ ।।
शुद्ध नाहीं चित्त । परी म्हणवितों भक्त ।।तु.गा.१३७०.००३ ।।
मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ।।तु.गा.१३७०.००४ ।।
समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ।।तु.गा.१३७१.००१ ।।
अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ।।तु.गा.१३७१.००२ ।।
तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जालों तुझा ।।तु.गा.१३७१.००३ ।।
आणिलें शेवटा । आतां कामा नये फांटा ।।तु.गा.१३७२.००१ ।।
मज आपुलेंसें म्हणा । उपरि या नारायणा ।।तु.गा.१३७२.००२ ।।
वेचियेली वाणी । युक्ति अवघी चरणीं ।।तु.गा.१३७२.००३ ।।
तुका धरी पाय । क्षमा करवूनि अन्याय ।।तु.गा.१३७२.००४ ।।
सातां पांचा तरी वचना शेवटीं । निरोप कां भेटी एक तरी ।।तु.गा.१३७३.००१ ।।
कां नेणें निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ।।तु.गा.१३७३.००२ ।।
तुका म्हणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ।।तु.गा.१३७३.००३ ।।
नाहीं माथां भार । तुम्ही घेत हा विचार ।।तु.गा.१३७४.००१ ।।
जाणोनियां ऐसें केलें । दुरिल अंगेंसी लाविलें ।।तु.गा.१३७४.००२ ।।
आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडी ।।तु.गा.१३७४.००३ ।।
तुका म्हणे दुरी । देवा खोटी ऐसी उरी ।।तु.गा.१३७४.००४ ।।

नसतों किविलवाणें। कांहीं तुमच्या कृपादानें।।तु.गा.१३७५.००१ ।।
हेचि तयाची ओळखीं। धालें टवटवित मुखीं।।तु.गा.१३७५.००२ ।।
वायां जात नाहीं। वचन प्रीतीचें तें कांहीं।।तु.गा.१३७५.००३ ।।
तुका म्हणे देवा। सत्य येतें अनुभवा।।तु.गा.१३७५.००४ ।।
मुखाकडे वास। पाहे करूनियां आस।।तु.गा.१३७६.००१ ।।
आतां होईल ते शिरीं। मनोगत आज्ञाधारी।।तु.गा.१३७६.००२ ।।
तुम्हीं अंगीकार। केला पाहिजे हे सार।।तु.गा.१३७६.००३ ।।
तुका म्हणे दारीं। उभें याचक मी हरी।।तु.गा.१३७६.००४ ।।
आतां मज तारीं। वचन हें साच करीं।।तु.गा.१३७७.००१ ।।
तुझें नाम दीनानाथ। ब्रिदावळी जगविख्यात।।तु.गा.१३७७.००२ ।।
कोण लेखी माझ्या दोषा। तुझा त्रिभुवनीं ठसा।।तु.गा.१३७७.००३ ।।
वायां जातां मज। तुका म्हणे तुम्हां लाज।।तु.गा.१३७७.००४ ।।
ऐसें कोण पाप बळी। जें जवळी येऊं नेदी।।तु.गा.१३७८.००१ ।।
तुम्हां तंव होईल ठावें। नेदावें कां कळों हें।।तु.गा.१३७८.००२ ।।
कोण झाला अंतराय। कां ते पाय अंतरले।।तु.गा.१३७८.००३ ।।
तुका म्हणे निमित्याचा। आला सुचा अनुभव।।तु.गा.१३७८.००४ ।।
कां जी धरिलें नाम। तुम्ही असोनि निष्काम।।तु.गा.१३७९.००१ ।।
कोणा सांगतसां ज्ञान। ठकाठकीचें लक्षण।।तु.गा.१३७९.००२ ।।
आवडीनें नाचें। आहे तरी पुढें साचें।।तु.गा.१३७९.००३ ।।
तुका म्हणे प्रेम। नाहीं भंगायाचें काम।।तु.गा.१३७९.००४ ।।
कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ।।तु.गा.१३८०.००१ ।।
ऐसें आम्हां मांडियेलें। विठो त्वां कां सांडियेलें।।तु.गा.१३८०.००२ ।।
बैसुनी कल्पद्रुमातळीं। पोटासाठीं तळमळी।।तु.गा.१३८०.००३ ।।

तुका म्हणे नारायणा। भलें लोकीं हें दिसेना।।तु.गा.१३८०.००४।।
आम्ही आर्तभूत जिवीं। तुम्ही गोसावी उदास।।तु.गा.१३८१.००१।।
वादावाद समर्थाशीं। काशानशीं करावा।।तु.गा.१३८१.००२।।
आम्ही मरों वेरझारीं। स्वामी घरीं बैसले।।तु.गा.१३८१.००३।।
तुका म्हणे करितां वाद। कांहीं भेद कळेना।।तु.गा.१३८१.००४।।
लाज ना विचार। बाजारी तूं भांडखोर।।तु.गा.१३८२.००१।।
ऐसें ज्याणें व्हावें। त्याची गांठी तुजसवें।।तु.गा.१३८२.००२।।
फेडिसी लंगोटी। घेसी सकळांसी तुटी।।तु.गा.१३८२.००३।।
तुका म्हणे चोरा। तुला आप ना दुसरा।।तु.गा.१३८२.००४।।
दाखवूनि आस। केला बहुतांचा नाश।।तु.गा.१३८३.००१।।
थोंटा झोंडा शिरोमणी। भेटलासी नागवणी।।तु.गा.१३८३.००२।।
सुखाचें उत्तर। नाहीं मुदलासी थार।।तु.गा.१३८३.००३।।
तुका म्हणे काय। तुझें घ्यावें उरे हाय।।तु.गा.१३८३.००४।।
लटिकाचि केला। सोंग पसारा दाविला।।तु.गा.१३८४.००१।।
अवघा बुडालासी ऋणें। बहुतांचें देणें घेणें।।तु.गा.१३८४.००२।।
लावियेला चाळा। बहु दावूनि पुतळा।।तु.गा.१३८४.००३।।
तुका म्हणे हात। आम्हीं आवरिली मात।।तु.गा.१३८४.००४।।
व्यवहार तो खोटा। आतां नवजों तुझ्या वाटा।।तु.गा.१३८५.००१।।
एका नामा नाहीं ताळा। केली सहस्त्रांची माळा।।तु.गा.१३८५.००२।।
पाहों जातां ठायीं। खेळसील लपंडाई।।तु.गा.१३८५.००३।।
तुका म्हणे चार। बहु करितोसी फार।।तु.गा.१३८५.००४।।
मिटवण्याचे धनी। तुम्ही व्यवसाय जनीं।।तु.गा.१३८६.००१।।
कोण पडे ये लिगाडीं। केलीं तैसीं उगवा कोडीं।।तु.गा.१३८६.००२।।

केलें सांगितलें काम। दिले पाळुनियां धर्म ।।तु.गा.१३८६.००३ ।।
तुका म्हणे आतां। असो तुमचें तुमचें माथां ।।तु.गा.१३८६.००४ ।।
तूं पांढरा स्फटिक मणी। करिसी आणिकां त्यांहुनि ।।तु.गा.१३८७.००१ ।।
म्हणोनि तुझ्या दारा। न येती ठकती दातारा ।।तु.गा.१३८७.००२ ।।
तुझे ठाई नांदणूक । अवघा बुडविला लौकिक ।।तु.गा.१३८७.००३ ।।
तुका म्हणे ज्याचें घेसी। त्यासी हेंचि दाखविसी ।।तु.गा.१३८७.००४ ।।
नवां नवसांचीं। जालों तुम्हासी वाणीचीं ।।तु.गा.१३८८.००१ ।।
कोण तुझें नाम घेतें। देवा पिंडदान देतें ।।तु.गा.१३८८.००२ ।।
कोण होतें मागें पुढें। दुजें बोलाया रोकडें ।।तु.गा.१३८८.००३ ।।
तुका म्हणे पांडुरंगा। कोणा घेतासि वोसंगा ।।तु.गा.१३८८.००४ ।।
नेघें तुझें नाम। न करीं सांगितलें काम ।।तु.गा.१३८९.००१ ।।
वाढें वचनें वचन। दोष उच्चारितां गुण ।।तु.गा.१३८९.००२ ।।
आतां तुझ्या घरा। कोण करी येरझारा ।।तु.गा.१३८९.००३ ।।
तुका म्हणे ठायीं। मजपाशीं काय नाहीं ।।तु.गा.१३८९.००४ ।।
नाहीं खंड झाला। माझा तुमचा विठ्ठला ।।तु.गा.१३९०.००१ ।।
कैसें कैसें हो दुश्चित। आहे चौघांपाशीं नीत ।।तु.गा.१३९०.००२ ।।
मुळीचें लिहिलें। मज आतां सांपडलें ।।तु.गा.१३९०.००३ ।।
तुका म्हणे मज। नलगे बोलणें सहज ।।तु.गा.१३९०.००४ ।।
ठाव नाहीं बुड। घरें वसविसी कुड।।तु.गा.१३९१.००१ ।।
भलतें ठायीं तुझा वास। सदा एरवीं उदास ।।तु.गा.१३९१.००२ ।।
जागा ना निजला। होसी धाला ना भुकेला ।।तु.गा.१३९१.००३ ।।
न पुसतां भलें। तुका म्हणे बुझे बोलें ।।तु.गा.१३९१.००४ ।।
ऐसाचि तो गोवा। न पाहिजे केला देवा ।।तु.गा.१३९२.००१ ।।

बहु आली दूरवरी। ओढत हे भरोवरी।।तु.गा.१३९२.००२।।
आम्हांसी न कळे। तुम्हीं झाकूं नये डोळे।।तु.गा.१३९२.००३।।
तुका म्हणे संगें। असों एक एका अंगें।।तु.गा.१३९२.००४।।
मागतियाचे दोनिच कर। अमित भांडार दातियाचें।।तु.गा.१३९३.००१।।
काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारू पडियेला।।तु.गा.१३९३.००२।।
एक सांठवण प्रेमें वोसंडलीं। जिव्हा हे भागली करितां माप।।तु.गा.१३९३.००३।।
तुका म्हणे आतां आहे तेथें असो। अंकुनियां बसों पायांपाशीं।।तु.गा.१३९३.००४।।
माझें लेखीं देव मेला। असो त्याला असेल।।तु.गा.१३९४.००१।।
गोष्टी न करीं नांव नेघें। गेलों दोघें खंडोनी।।तु.गा.१३९४.००२।।
स्तुतिसमवेत निंदा। केला धंदा उदंड।।तु.गा.१३९४.००३।।
तुका म्हणे निवांत ठेलों। वेंचित आलों जीवित्व।।तु.गा.१३९४.००४।।
दारीं परिवरीं। कुडीं कवाडीं मी घरीं।।तु.गा.१३९५.००१।।
तुमच्या लागलों पोषणा। अवघें ठायीं नारायणा।।तु.गा.१३९५.००२।।
नेदीं खाऊं जेवूं। हातीं तोंडींचेंही घेऊं ।।तु.गा.१३९५.००३।।
तुका म्हणे अंगीं। जडलों ठायींचा सलगी।।तु.गा.१३९५.००४।।
नव्हों आम्ही आजिकाळीचीं। कांची कुची चाळवणी।।तु.गा.१३९६.००१।।
एके ठायीं मूळडाळ। ठावा सकळ आहेसी।।तु.गा.१३९६.००२।।
तुमचें आमचेंसें कांहीं। भिन्न नाहीं वांटलें।।तु.गा.१३९६.००३।।
तुका म्हणे जेथें असें। तेथें दिसें तुमचासा।।तु.गा.१३९६.००४।।
भुकें नाहीं अन्न। मेल्यावरी पिंडदान।।तु.गा.१३९७.००१।।
हे तों चाळवाचाळवी। केलें आपणचि जेवि।।तु.गा.१३९७.००२।।
नैवेद्याचा आळ। वेंचे ठाकणीं सकळ।।तु.गा.१३९७.००३।।
तुका म्हणे जड। मज न राखावें दगड।।तु.गा.१३९७.००४।।

होईल तरि पुसापुसी। उत्तर त्यासी योजावें।।तु.गा.१३९८.००१ ।।
तोंवरि मी पुढें कांहीं। आपुलें नाहीं घालीत।।तु.गा.१३९८.००२ ।।
जाणोनियां अंतर देव। जेव्हां भेव फेडील।।तु.गा.१३९८.००३ ।।
तुका म्हणे धरिल हातीं । करील खंतीवेगळें।।तु.गा.१३९८.००४ ।।
असो आतां किती। तुज यावें काकुलती।।तु.गा.१३९९.००१ ।।
माझें प्रारब्ध हें गाढें। तूं बापुडें तयापुढें।।तु.गा.१३९९.००२ ।।
सोडवीन आतां। ब्रीद तुझें पंढरीनाथा।।तु.गा.१३९९.००३ ।।
तुका म्हणे बळी। तो गांढ्याचे कान पिळी।।तु.गा.१३९९.००४ ।।
आम्ही तुझ्या दासीं। जरि जावें पतनासी।।तु.गा.१४००.००१ ।।
तरि हें दिसे विपरीत। कोठें बोलिली हे नीत।।तु.गा.१४००.००२ ।।
तुझें नाम कंठीं। आम्हां संसार आटी।।तु.गा.१४००.००३ ।।
तुका म्हणे काळ। करिल आम्हांसी विटाळ।।तु.गा.१४००.००४ ।।
लाजती पुराणें। वेदां येऊं पाहे उणें।।तु.गा.१४०१.००१ ।।
आम्ही नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ।।तु.गा.१४०१.००२ ।।
बोलिले ते संतीं। बोल वायांविण जाती।।तु.गा.१४०१.००३ ।।
तुका म्हणे देवा। रोकडी हे मोडे सेवा।।तु.गा.१४०१.००४ ।।
शोकवावा म्यां देहे। ऐसें नेणो पोटीं आहे।।तु.गा.१४०२.००१ ।।
तरीच नेदां जी उत्तर। दुःखी राखिलें अंतर।।तु.गा.१४०२.००२ ।।
जावें वनांतरा। येणें उद्देशें दातारा।।तु.गा.१४०२.००३ ।।
तुका म्हणे गिरी। मज सेववावी दरी।।तु.गा.१४०२.००४ ।।
कां हो आलें नेणों भागा। पांडुरंगा माझिया।।तु.गा.१४०३.००१ ।।
उफराटी तुम्हां चाली। क्रिया गेली सत्याची।।तु.गा.१४०३.००२ ।।
साक्षी हें गे माझें मन। आर्त कोण होतें तें।।तु.गा.१४०३.००३ ।।

तुका म्हणे समर्थपणें । काय नेणें करीतसां ।।तु.गा.१४०३.००४ ।।
तुम्ही कांटाळलां तरी । आम्हां न सोडणें हरी ।।तु.गा.१४०४.००१ ।।
जावें कवणिया ठाया । सांगा विनवितों पाया ।।तु.गा.१४०४.००२ ।।
केली जिवा साठी । आतां सुखें लागों पाठी ।।तु.गा.१४०४.००३ ।।
तुका म्हणे ठाव । न सोडणें हाचि भाव ।।तु.गा.१४०४.००४ ।।
आम्ही पतित तूं पावन । हें तों पूर्वापार जाण ।।तु.गा.१४०५.००१ ।।
नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें त्यानें ।।तु.गा.१४०५.००२ ।।
मिरासीचा ठाव । राखी करोनि उपाव ।।तु.गा.१४०५.००३ ।।
वादें मारी हाका । देवा आइकवितो तुका ।।तु.गा.१४०५.००४ ।।
तुम्हांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ।।तु.गा.१४०६.००१ ।।
कां बा तुम्ही ऐसें नेणें । निष्ठुरपणें टाळितसां ।।तु.गा.१४०६.००२ ।।
आळवितां मायबापा । नये कृपा अझूनि ।।तु.गा.१४०६.००३ ।।
तुका म्हणे जगदीशा । काय असां निजेले ।।तु.गा.१४०६.००४ ।।
आतां चक्रधरा । झणीं आम्हांस अव्हेरा ।।तु.गा.१४०७.००१ ।।
तुमची म्हणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ।।तु.गा.१४०७.००२ ।।
काळ आम्हां खाय । तरी तुझें नांव जाय ।।तु.गा.१४०७.००३ ।।
तुका म्हणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ।।तु.गा.१४०७.००४ ।।
काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ।।तु.गा.१४०८.००१ ।।
होसी नामाची सारिखा । समजाविली नाहीं लेखा ।।तु.गा.१४०८.००२ ।।
नाहीं वेंचावेंच जाला । उरला आहेसी संचला ।।तु.गा.१४०८.००३ ।।
तुका म्हणे माझें । काय होईल तुम्हां ओझें ।।तु.गा.१४०८.००४ ।।
कैवल्याच्या तुम्हां घरीं । रासी हरी उदंडा ।।तु.गा.१४०९.००१ ।।
मजसाठीं कां जी वाणी । नव्हे धणी विभागा ।।तु.गा.१४०९.००२ ।।

सर्वांगुणीं सपुरता। ऐसा पिता असोनि।।तु.गा.१४०९.००३।।
तुका म्हणे पांडुरंगा। जालों सांगा सन्मुख।।तु.गा.१४०९.००४।।
काय करावें तें आतां। जालें नयेसें बोलतां।।तु.गा.१४१०.००१।।
नाहीं दोघांचिये हातीं। गांठी घालावी एकांतीं।।तु.गा.१४१०.००२।।
होय आपुलें काज। तों हे भीड सांडूं लाज।।तु.गा.१४१०.००३।।
तुका म्हणे देवा। आधीं निवडूं हा गोवा।।तु.गा.१४१०.००४।।
कृपेचा ओलावा। दिसे वेगळाचि देवा।।तु.गा.१४११.००१।।
मी हें इच्छितसें साचें। न लगे फुकट साई काचें।।तु.गा.१४११.००२।।
जेणें जाय कळसा। पाया उत्तम तो तैसा।।तु.गा.१४११.००३।।
तुका म्हणे घरीं। तुझ्या अवघिया परी।।तु.गा.१४११.००४।।
करिसी लाघवें। तूं हें खेळसी आघवें।।तु.गा.१४१२.००१।।
केला अहंकार आड। आम्हां जगासी हा नाड।।तु.गा.१४१२.००२।।
इत्थंभूत यावें। दावूं लपोंही जाणावें।।तु.गा.१४१२.००३।।
तुका म्हणे हो श्रीपती। आतां चाळवाल किती।।तु.गा.१४१२.००४।।
नाहीं मागितला। तुम्हां मान म्यां विठ्ठला।।तु.गा.१४१३.००१।।
जे हे करविली फजिती। माझी एवढी जना हातीं।।तु.गा.१४१३.००२।।
नाहीं केला पोट। पुढें घालूनि बोभाट।।तु.गा.१४१३.००३।।
तुका म्हणे धरूनि हात। नाहीं नेलें दिवाणांत।।तु.गा.१४१३.००४।।
झाड कल्पतरू। न करी याचकीं अव्हेरू ।।तु.गा.१४१४.००१।।
तुम्ही सर्वी सर्वोत्तम। ऐसे विसरतां धर्म।।तु.गा.१४१४.००२।।
परिसा तुमचें देणें। तो त्या जागे अभिमानें।।तु.गा.१४१४.००३।।
गाऱ्हाण्यानें तुका। गर्जे मारुनियां हाका।।तु.गा.१४१४.००४।।
घालूनियां कास। बळें आलों मागायास।।तु.गा.१४१५.००१।।

प्रेम देईं पाठवूनि । पांडुरंगा सेवाऋणी ।।तु.गा.१४१५.००२ ।।
होईं रे शाहाणा । कळों नेदावें या जना ।।तु.गा.१४१५.००३ ।।
तुका म्हणे पायीं । जडलों मग उरलें काई ।।तु.गा.१४१५.००४ ।।
केवढा तो अहंकार । माझा तुम्हां नव्हे दूर ।।तु.गा.१४१६.००१ ।।
आतां कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ।।तु.गा.१४१६.००२ ।।
कां जी कृपेनें कृपण । वेंचतसे ऐसें धन ।।तु.गा.१४१६.००३ ।।
तुका म्हणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ।।तु.गा.१४१६.००४ ।।
विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ।।तु.गा.१४१७.००१ ।।
कां रे कृपाळू न होसी । काय जालें मजविशीं ।।तु.गा.१४१७.००२ ।।
जाल्या वेरझारा । जन्मा बहुतांचा फेरा ।।तु.गा.१४१७.००३ ।।
तुका म्हणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ।।तु.गा.१४१७.००४ ।।
आम्हांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों ।।तु.गा.१४१८.००१ ।।
धरूनि ठेलों जीवेंसाठीं । होय भेटी तोंवरी ।।तु.गा.१४१८.००२ ।।
लागलों ते न फिरें पाठीं । पडिल्या गांठी वांचूनि ।।तु.गा.१४१८.००३ ।।
तुका म्हणे अवकाशें । तुमच्या ऐसे व्हावया ।।तु.गा.१४१८.००४ ।।
जीवींचें कां नेणां । परि हे आवडी नारायणा ।।तु.गा.१४१९.००१ ।।
वाढवावें हें उत्तर । कांहीं लाड करकर ।।तु.गा.१४१९.००२ ।।
कोठें वायां गेले । शब्द उत्तम चांगले ।।तु.गा.१४१९.००३ ।।
तुका म्हणे बाळा । असे तात्पर्य या खेळा ।।तु.गा.१४१९.००४ ।।
समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हसती सकळ लोक कोणा ।।तु.गा.१४२०.००१ ।।
समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आलियाची लागे चिंता ।।तु.गा.१४२०.००२ ।।
जरी तुज कांहीं होईल उचित । तरी हा पतित तारीं तुका ।।तु.गा.१४२०.००३ ।।
कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ।।तु.गा.१४२१.००१ ।।

मग तळमळ न करितें मन। झालें तें कारण कळों येते ।।तु.गा.१४२१.००२ ।।
तुका म्हणे केला पाहिजे निवाड। वैद्यासी ते भीड मरण रोग्या ।।तु.गा.१४२१.००३ ।।
आशाबद्ध बहु असें निलाजरें। होय म्हणें धीरें फळ टोंकें ।।तु.गा.१४२२.००१ ।।
कारणापें चित्त न पाहें अपमान। चित्त समाधान लाभासाठीं ।।तु.गा.१४२२.००२ ।।
तुका म्हणे हातें लोटिलें न कळे। झांकितसे डोळे पांडुरंगा ।।तु.गा.१४२२.००३ ।।
नव्हें मी शाहाणा। तरी म्हणा नारायणा ।।तु.गा.१४२३.००१ ।।
तुम्हां बोलावया कांहीं। येच भरलोंसे वाहीं ।।तु.गा.१४२३.००२ ।।
आणावे ते रूपा। कोपलेती तरी कोपा ।।तु.गा.१४२३.००३ ।।
पायांपासीं चित्त। तेणें भेटी अखंडित ।।तु.गा.१४२४.००१ ।।
असे खेळे भलते ठायीं। प्रेमसूत्रदोरी पायीं ।।तु.गा.१४२४.००२ ।।
केलेंसें जतन। मुळीं काय तें वचन ।।तु.गा.१४२४.००३ ।।
तुका म्हणे सर्व जाणा। ठायीं विचारावें मना ।।तु.गा.१४२४.००४ ।।
नव्हे परि म्हणवी दास। कांहीं निमित्तास मूळ केलें ।।तु.गा.१४२५.००१ ।।
तुमचा तो धर्म कोण। हा आपण विचारा ।।तु.गा.१४२५.००२ ।।
नाहीं शुद्ध आचरण। परी चरण चिंतितों ।।तु.गा.१४२५.००३ ।।
तुका म्हणे पांडुरंगा। ऐसें कां गा नेणा हे ।।तु.गा.१४२५.००४ ।।
आम्हीं घ्यावें तुझें नाम। तुम्हीं आम्हां द्यावें प्रेम ।।तु.गा.१४२६.००१ ।।
ऐसें निवडिलें मुळीं। संतीं बैसोनि सकळीं ।।तु.गा.१४२६.००२ ।।
माझी डोई पायांवरी। तुम्हीं न धरावी दुरी ।।तु.गा.१४२६.००३ ।।
तुका म्हणे केला। खंड दोघांचा विठ्ठला ।।तु.गा.१४२६.००४ ।।
असो मागें जालें। पुढें गोड तें चांगलें ।।तु.गा.१४२७.००१ ।।
आतां माझे मनीं। कांहीं अपराध न मानीं ।।तु.गा.१४२७.००२ ।।
नेदी अवसान। करितां नामाचें चिंतन ।।तु.गा.१४२७.००३ ।।

तुका म्हणे बोलें। तुज आधींच गोविलें।।तु.गा.१४२७.००४।।
उचिताचा दाता। कृपावंता तूं अनंता।।तु.गा.१४२८.००१।।
कां रे न घालिसी धांव। तुझें उच्चारितां नांव।।तु.गा.१४२८.००२।।
काय बळयुक्ति ।नाहीं तुझे अंगीं शक्ति ।।तु.गा.१४२८.००३।।
तुका म्हणे तूं विश्वंभर। वोस माझें कां अंतर।।तु.गा.१४२८.००४।।
वेडें वाकडें गाईन। परि तुझाचि म्हणवीन।।तु.गा.१४२९.००१।।
मज तारीं दीनानाथा। ब्रीद साच करीं आतां।।तु.गा.१४२९.००२।।
केल्या अपराधांच्या राशी। म्हणऊनि आलों तुजपाशीं।।तु.गा.१४२९.००३।।
तुका म्हणे मज तारीं। सांडीं ब्रीद नाहीं तरी।।तु.गा.१४२९.००४।।
अंधळ्याची काठी। हिरोनियां कडा लोटी।।तु.गा.१४३०.००१।।
हे कां देखण्या उचित। लाभ किंवा कांहीं हित।।तु.गा.१४३०.००२।।
चाळवूनि हातीं। साकर म्हणोनि द्यावी माती।।तु.गा.१४३०.००३।।
तुका म्हणे वाटे। देवा पसरावे सराटे।।तु.गा.१४३०.००४।।
माझ्या वडिलांची मिरासी गा देवा। तुझी चरणसेवा पांडुरंगा।।तु.गा.१४३१.००१।।
उपवास पारणीं राखिला दारवंटा। केला भोगवटा आम्हांलागीं।।तु.गा.१४३१.००२।।
वंशपरंपरा दास मी अंकिता। तुका मोकलितां लाज कोणा।।तु.गा.१४३१.००३।।
कळों आलें ऐसें आतां। नाहीं सत्ता तुम्हांसी।।तु.गा.१४३२.००१।।
तरी वीर्य नाहीं नामा। जातो प्रेमा खंडत।।तु.गा.१४३२.००२।।
आड ऐसें येतें पाप। वाढे ताप आगळा।।तु.गा.१४३२.००३।।
तुका म्हणे गुण जाला। हा विठ्ठला हीन शक्ति ।।तु.गा.१४३२.००४।।
आम्ही जाणों तुझा भाव। दृढ धरियले पाव।।तु.गा.१४३३.००१।।
फांकूं नेदूं चुकवितां। नेघों थोडे बहु देतां।।तु.गा.१४३३.००२।।
बहुतां दिसांचें लिगाड। आलें होत होत जड।।तु.गा.१४३३.००३।।

तुका म्हणे आतां। नेघों सर्वस्वही देतां।।तु.गा.१४३३.००४।।
ऋण वैर हत्या। हें तो न सुटे नेदितां।।तु.गा.१४३४.००१।।
हें कां नेणां पांडुरंगा। तुम्ही सांगतसां जगा।।तु.गा.१४३४.००२।।
माझा संबंध तो किती। चुकवा लोकाची फजिती।।तु.गा.१४३४.००३।।
तुका म्हणे याचिसाठीं। मज घेतां नये तुटी।।तु.गा.१४३४.००४।।
दोष पळती कीर्तनें। तुझ्या नामसंकीर्तनें।।तु.गा.१४३५.००१।।
हें कां करूं आदरिलें। खोटें वचन आपुलें।।तु.गा.१४३५.००२।।
तुम्ही पापा भीतां। आम्हां उपजावया चिंता।।तु.गा.१४३५.००३।।
तुका म्हणे सेवा। कळिकाळा जिंकी देवा।।तु.गा.१४३५.००४।।
जरी मी पतित नव्हतों देवा। तरी तूं पावन कैंचा तेव्हां।।तु.गा.१४३६.००१।।
म्हणोनि माझें नाम आधीं। मग तूं पावन कृपानिधी।।तु.गा.१४३६.००२।।
लोहो महिमान परिसा। नाहीं तरी दगड जैसा।।तु.गा.१४३६.००३।।
तुका म्हणे याचक भावें। कल्पतरु मान पावे।।तु.गा.१४३६.००४।।
तुमचा तुम्हीं केला गोवा। आतां चुकवितां देवा।।तु.गा.१४३७.००१।।
कैसें सरे चाळवणें। केलें काशाला शाहाणें।।तु.गा.१४३७.००२।।
कासया हो रूपा। नांवा आलेति गा बापा।।तु.गा.१४३७.००३।।
तुका म्हणे आतां। न सरे हवाले घालितां।।तु.गा.१४३७.००४।।
याचि हाका तुझे द्वारीं। सदा देखों ऋणकरी।।तु.गा.१४३८.००१।।
सदा करिती खंड दंड। देवा बहु गा तूं लंड।।तु.गा.१४३८.००२।।
सुखें गोविसी भोजना। लपवूनियां आपणां।।तु.गा.१४३८.००३।।
एकें एक बुझाविसी। तुका म्हणे ठक होसी।।तु.गा.१४३८.००४।।
संसाराची कोण गोडी। दिली जोडी करूनि।।तु.गा.१४३९.००१।।
निष्ठुर तूं बहु देवा। पुरे हेवा न म्हणवी।।तु.गा.१४३९.००२।।

पाहोनियां कर्म डोळां। निराळा तो वर्जीना ।।तु.गा.१४३९.००३ ।।
तुका म्हणे तुज माझें। म्हणतां ओझें फुकट।।तु.गा.१४३९.००४ ।।
नव्हेसी तूं लांसी। माया आणिकां त्या ऐसी ।।तु.गा.१४४०.००१ ।।
जे हे वायां जाती बोल। होसी निर्मळचि फोल ।।तु.गा.१४४०.००२ ।।
नव्हेसी दुबळी। कांहीं नाहीं तें जवळी ।।तु.गा.१४४०.००३ ।।
तुका म्हणे खोटी। कांहीं नव्हेसी करंटी ।।तु.गा.१४४०.००४ ।।
आम्हां बोल लावा। तुम्हां अनुचित हें देवा ।।तु.गा.१४४१.००१ ।।
ऐसें सांगा कां व्यालेती। काय नाहीं तुम्हां हातीं ।।तु.गा.१४४१.००२ ।।
आतां धरा दुरी। वायां दवडाया थोरी ।।तु.गा.१४४१.००३ ।।
तुका म्हणे ठायीं। ऐसें विचारावे पाहीं ।।तु.गा.१४४१.००४ ।।
मरोनियां गेली माया। मग तया कोण पुसे ।।तु.गा.१४४२.००१ ।।
पोरटियांची दाद कोणा। ऐसा जना प्रवाहो ।।तु.गा.१४४२.००२ ।।
निढळासी निढळ जोडा। होय कोडा कवतुक ।।तु.गा.१४४२.००३ ।।
तुका म्हणे देवा ऐसी। आहों सरसीं आपण ।।तु.गा.१४४२.००४ ।।
आतां दोघांमध्यें काय। उरलें होय वाणीजेसें ।।तु.गा.१४४३.००१ ।।
निष्ठुर हें केलें मन। समाधान करूनि ।।तु.गा.१४४३.००२ ।।
झुरावें तें तेथींच्या परी। घरिच्या घरीं अवघिया ।।तु.गा.१४४३.००३ ।।
तुका म्हणे देवपण। गुंडाळून असों दे ।।तु.गा.१४४३.००४ ।।
आतां येथें खरें। नये फिरतां माघारें ।।तु.गा.१४४४.००१ ।।
होय तैसी हो आबाळी। देहनिमित्य या बळी ।।तु.गा.१४४४.००२ ।।
तुम्हांसवें गांठीं। देवा जीवाचिये साटीं ।।तु.गा.१४४४.००३ ।।
तुका म्हणे लंड। करूं चौघांमध्यें खंड ।।तु.गा.१४४४.००४ ।।
ऐसा तंव मोळा। तुमचा नसेल गोपाळा ।।तु.गा.१४४५.००१ ।।

मागत्याची टाळाटाळी। झिंज्या ओढोनि कपाळीं।।तु.गा.१४४५.००२।।
नसेल ना नवें। ऐसें धरियेलें देवें।।तु.गा.१४४५.००३।।
तुका म्हणे झाला। उशीर नाहीं तो विठ्ठला।।तु.गा.१४४५.००४।।
माझ्या कपाळाच्या गुणें। किंवा सरलेंसें नेणें।।तु.गा.१४४६.००१।।
नये वचन बाहेरी। उभें तिष्ठतसें दारीं।।तु.गा.१४४६.००२।।
काय सांगा यास वेचे। रितें आरंभीं ठायींचे।।तु.गा.१४४६.००३।।
तुका म्हणे किती। भीड धरावी पुढती।।तु.गा.१४४६.००४।।
अहो पुरुषोत्तमा। तुम्हां काशाची उपमा।।तु.गा.१४४७.००१।।
सतत तो नाहीं बुद्धी। नाळवितां नाहीं शुद्धि।।तु.गा.१४४७.००२।।
जागविलें तरी। तुम्हां व्यक्ति येणें हरी।।तु.गा.१४४७.००३।।
तुका म्हणे देवा। तुम्हां नित्य दिस नवा।।तु.गा.१४४७.००४।।
बहु धीर केला। जाण न होसी विठ्ठला।।तु.गा.१४४८.००१।।
आतां धरीन पदरीं। तुज मज करीन सरी।।तु.गा.१४४८.००२।।
झालों जीवासी उदार। उभा राहिलों समोर।।तु.गा.१४४८.००३।।
तुका म्हणे संता। ऐसें सांगा पंढरीनाथा।।तु.गा.१४४८.००४।।
झाला जीवासी उदार। त्यासी काय भीडभार।।तु.गा.१४४९.००१।।
करीन आडक्या घोंगडें। उभ्या बाजारीं उघडें।।तु.गा.१४४९.००२।।
जों जों धरिली भीड। तों तों बहु केली चीड।।तु.गा.१४४९.००३।।
तुका म्हणे मूळ। तुझें उच्चारीन कुळ।।तु.गा.१४४९.००४।।
घेतां आणिकांचा जीव। तेव्हां कींव कराना।।तु.गा.१४५०.००१।।
आपलें तें वरदळ नेदा। हे गोविंदा कृपणता।।तु.गा.१४५०.००२।।
सेवा तरी इच्छा सांग। चोरिलें अंग साहेना।।तु.गा.१४५०.००३।।
तुका म्हणे अरे धन्या। निसंतान्या विठोबा।।तु.गा.१४५०.००४।।

सांपडला संदीं। मग बळिया पडे बंदीं।।तु.गा.१४५१.००१ ।।
ऐसी कोणी वाहे वेळ। हातीं काळाच्या सकळ।।तु.गा.१४५१.००२ ।।
दाता मागे दान। जाय याचका शरण।।तु.गा.१४५१.००३ ।।
तुका म्हणे नेणां। काय सांगों नारायणा।।तु.गा.१४५१.००४ ।।
शोधिसील मूळें। त्यांचें करीसी वाटोळें।।तु.गा.१४५२.००१ ।।
ऐसे संतांचें बोभाट। तुझें बहु जाले तंट।।तु.गा.१४५२.००२ ।।
लौकिका बाहेरी । घाली रोखी जया धरी।।तु.गा.१४५२.००३ ।।
तुका म्हणे गुण। तुझा लागलिया शून्य।।तु.गा.१४५२.००४ ।।
मानामान किती। तुझ्या क्षुल्लक संपत्ती।।तु.गा.१४५३.००१ ।।
जा रे चाळवीं बापुडीं। कोण धरितील ती गोडी ।।तु.गा.१४५३.००२ ।।
रिद्धिसिद्धि देसी। आम्ही चुंभळीं नव्हों तैसीं।।तु.गा.१४५३.००३ ।।
तुका म्हणे ठका। ऐसें नागविलें लोकां।।तु.गा.१४५३.००४ ।।
वटवट केली। न विचारितां मना आली।।तु.गा.१४५४.००१ ।।
मज कराल तें क्षमा। कैसें नेणों पुरुषोत्तमा।।तु.गा.१४५४.००२ ।।
उचित न कळे। जिव्हा भलतेंचि बरळे।।तु.गा.१४५४.००३ ।।
तुका म्हणे कांहीं। लौकिकाची चाड नाहीं।।तु.गा.१४५४.००४ ।।
वारिलें लिगाड। बहू दिसांचें हें जाड।।तु.गा.१४५५.००१ ।।
न बोलावे ऐसें केलें। कांहीं वाउगें तितुलें।।तु.गा.१४५५.००२ ।।
जाला चौघाचार। गेला खंडोनि वेव्हार।।तु.गा.१४५५.००३ ।।
तुका म्हणे देवा। करीन ते घ्यावी सेवा।।तु.गा.१४५५.००४ ।।
हें का आम्हां सेवा दान। देखो सीण विषमाचा।।तु.गा.१४५६.००१ ।।
सांभाळा जी ब्रीदावळी। तुम्ही का कलीसारिखें।।तु.गा.१४५६.००२ ।।
शरणांगतें वैऱ्या हातीं। हे निश्चिंती देखिली।।तु.गा.१४५६.००३ ।।

तुका म्हणे इच्छी भेटी। पाय पोटीं उफराटे।।तु.गा.१४५६.००४।।
येईल तुझ्या नामा। लाज म्हणे पुरुषोत्तमा।।तु.गा.१४५७.००१।।
धीर राहिलों धरूनि। त्रास उपजला मनीं।।तु.गा.१४५७.००२।।
जगा कथा नाव। निराशेनें नुपजें भाव।।तु.गा.१४५७.००३।।
तुम्हीं साक्ष कीं गा। तुका म्हणे पांडुरंगा।।तु.गा.१४५७.००४।।
हें तों वाटलें आश्चर्य। तुम्हां धरवला धीर।।तु.गा.१४५८.००१।।
माझा फुटतसे प्राण। धांवा धांवा म्हणऊन।।तु.गा.१४५८.००२।।
काय नेणो दिशा। झाल्या तुम्हांविण वोसा।।तु.गा.१४५८.००३।।
तुका म्हणे कां गा। नाइकिजे पांडुरंगा।।तु.गा.१४५८.००४।।
सरे ऐसें ज्याचें दान। त्याचे कोण उपकार।।तु.गा.१४५९.००१।।
नको वाढूं ऐसें काचें। दे वो साचे विठ्ठलें।।तु.गा.१४५९.००२।।
रडत मागें सांडी पोर। ते काय थोर माउली।।तु.गा.१४५९.००३।।
तुका म्हणे कीर्ति वाढे। धर्म गाढे ते ऐसे।।तु.गा.१४५९.००४।।
वाढविलें कां गा। तुम्ही एवढें पांडुरंगा।।तु.गा.१४६०.००१।।
काय होती मज चाड। एवढी करावया बडबड।।तु.गा.१४६०.००२।।
ब्रह्मसंतर्पण। लोकीं करावें कीर्तन।।तु.गा.१४६०.००३।।
निमित्ताचा धनी। तुका म्हणे नेणे कोणी।।तु.गा.१४६०.००४।।
ठायींची ओळखी। येईल टाकूं टाका सुखी।।तु.गा.१४६१.००१।।
तुमचे जाईल इमान। माझे कपाळीं पतन।।तु.गा.१४६१.००२।।
ठेविला तो ठेवा। अभिलाषें बुडवावा।।तु.गा.१४६१.००३।।
मनीं न विचारा। तुका म्हणे हे दातारा।।तु.गा.१४६१.००४।।
शकुनानें लाभ हानि। येथूनिच कळतसे।।तु.गा.१४६२.००१।।
भयारूढ जालें मन। आतां कोण विश्वास।।तु.गा.१४६२.००२।।

प्रीत कळे आलिंगनीं। संपादणी अत्यंत ।।तु.गा.१४६२.००३ ।।
तुका म्हणे मोकलिलें। कळों आलें बरवें हें ।।तु.गा.१४६२.००४ ।।
बुडता आवरीं। मज भवाचे सागरीं ।।तु.गा.१४६३.००१ ।।
नको मानूं भार। पाहों दोषांचें डोंगर ।।तु.गा.१४६३.००२ ।।
आहे तें सांभाळीं। तुझी कैसी ब्रीदावळी ।।तु.गा.१४६३.००३ ।।
तुका म्हणे दोषी। मी तों पातकांची राशी ।।तु.गा.१४६३.००४ ।।
कां गा धर्म केला। असोन सत्तेचा आपुला ।।तु.गा.१४६४.००१ ।।
उभाउभीं पाय जोडीं। आतां फांकों नेदीं घडी ।।तु.गा.१४६४.००२ ।।
नको सांडूं ठाव। आतां घेऊं नेदीं वाव ।।तु.गा.१४६४.००३ ।।
तुका म्हणे इच्छा। तैसा करीन सारसा ।।तु.गा.१४६४.००४ ।।
नव्हों गांढे आळसी। जो तूं आम्हांपुढें जासी ।।तु.गा.१४६५.००१ ।।
अरे दिलें आम्हां हातीं। वर्म वेवादाचें संतीं ।।तु.गा.१४६५.००२ ।।
धरोनियां वाट। जालों शिरोमणि थोंट ।।तु.गा.१४६५.००३ ।।
तुका म्हणे देवा। वादें करीन खरी सेवा ।।तु.गा.१४६५.००४ ।।
करितां वेरझारा। उभा न राहासी वेव्हारा ।।तु.गा.१४६६.००१ ।।
हें तों झोंडाईचे चाळे। काय पोटीं तें न कळे ।।तु.गा.१४६६.००२ ।।
आरोगुनी मुग। बैसलासी जैसा बग ।।तु.गा.१४६६.००३ ।।
तुका म्हणे किती। बुडविलीं आळवितीं ।।तु.गा.१४६६.००४ ।।
तुझ्या ठायीं ओस। दोन्ही पुण्य आणि दोष ।।तु.गा.१४६७.००१ ।।
झडलें उरलें किती। आम्हीं धरियेलें चित्तीं ।।तु.गा.१४६७.००२ ।।
कळलासी नष्टा । यातिक्रियाकर्मभ्रष्टा ।।तु.गा.१४६७.००३ ।।
तुका म्हणे बोला। नाहीं ताळा गा विठ्ठला ।।तु.गा.१४६७.००४ ।।
आम्ही भांडों तुजसवें। वर्मीं धरूं जालें ठावें ।।तु.गा.१४६८.००१ ।।

होसी सरड बेडुक । वाघ गांढ्यांही पाईक ।।तु.गा.१४६८.००२ ।।
बळ करी तया भ्यावें। पळों लागे तया घ्यावें ।।तु.गा.१४६८.००३ ।।
तुका म्हणे दूर परता। नरनारी ना तूं भूता ।।तु.गा.१४६८.००४ ।।
कां रे ना पवसी धांवण्या। अंगराख्या नारायणा ।।तु.गा.१४६९.००१ ।।
अंगीं असोनियां बळ। होसी खट्याळ नाठ्याळ ।।तु.गा.१४६९.००२ ।।
आम्ही नरका जातां। काय येईल तुझ्या हातां ।।तु.गा.१४६९.००३ ।।
तुका म्हणे कान्हा। क्रियानष्टा नारायणा ।।तु.गा.१४६९.००४ ।।
नव्हे भिडा हें कारण। जाणें करूं ऐसे जन ।।तु.गा.१४७०.००१ ।।
जों जों धरावा लौकिक । रडवितोसि आणीक ।।तु.गा.१४७०.००२ ।।
चला जाऊं संतांपुढें। ते हें निवडती रोकडे ।।तु.गा.१४७०.००३ ।।
तुका म्हणे तूं निर्लज्ज। आम्हां रोकडी गरज ।।तु.गा.१४७०.००४ ।।
आम्ही देतो हाका। कां रें जालासी तूं मुका ।।तु.गा.१४७१.००१ ।।
न बोलसी नारायणा। कळलासी क्रियाहीना ।।तु.गा.१४७१.००२ ।।
आधीं करूं चौघाचार। मग सांडूं भीडभार ।।तु.गा.१४७१.००३ ।।
तुका म्हणे शेवटीं। तुम्हां आम्हां घालूं तुटी ।।तु.गा.१४७१.००४ ।।
काय साहतोसि फुका। माझा बुडविला रुका ।।तु.गा.१४७२.००१ ।।
रीण घराचें पांगिलें। तें न सुटे कांहीं केलें ।।तु.गा.१४७२.००२ ।।
चौघांचिया मतें। आधीं खरें केलें होतें ।।तु.गा.१४७२.००३ ।।
तुका म्हणे यावरी। आतां भीड कोण धरी ।।तु.गा.१४७२.००४ ।।
पतित मिरासी। ते म्यां धरिलें जीवेंसी ।।तु.गा.१४७३.००१ ।।
आतां बळिया सांग कोण। ग्वाही तुझें माझें मन ।।तु.गा.१४७३.००२ ।।
पावनाचा ठसा। दावीं मज तुझा कैसा ।।तु.गा.१४७३.००३ ।।
तुका म्हणे वाव जालें। रोख पाहिजे दाविलें ।।तु.गा.१४७३.००४ ।।

भांडावें तों हित। ठायीं पडतें उचित।।तु.गा.१४७४.००१ ।।
नये खंडूं देऊं वाद। आम्हां भांडवल भेद।।तु.गा.१४७४.००२।।
शब्दासारसें भेटी। नये पडों देऊं तुटी।।तु.गा.१४७४.००३ ।।
तुका म्हणे आळस। तोचि कारणांचा नास।।तु.गा.१४७४.००४।।
कासया वांचूनि झालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी।।तु.गा.१४७५.००१ ।।
जातां भलें काय डोळियांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ।।तु.गा.१४७५.००२।।
काय मुख पेंव श्वापदांची धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ।।तु.गा.१४७५.००३।।
तुका म्हणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ।।तु.गा.१४७५.००४।।
तुज नाहीं शक्ति । काम घेसी आम्हां हातीं।।तु.गा.१४७६.००१ ।।
ऐसें अनुभवें पाहीं। उरलें बोलिजेसें नाहीं।।तु.गा.१४७६.००२।।
लपोनियां आड। आम्हां तुझा कैवाड।।तु.गा.१४७६.००३ ।।
तुका म्हणे तुजसाठीं। आम्हां संवसारेंसी तुटी।।तु.गा.१४७६.००४।।
पावटणी पडणें पायां। उद्धार वायां काशाचा।।तु.गा.१४७७.००१ ।।
घडेल तें भेटीसवें। दिसेल बरवें सकळां हें।।तु.गा.१४७७.००२।।
न घडतां दृष्टादृष्टी। काय गोष्टी कोरड्या।।तु.गा.१४७७.००३।।
अबोल्यानें असे तुका। अंतर एका साक्षी तें।।तु.गा.१४७७.००४।।
आम्ही झालों एकविध। सुध्या सुधें असावें।।तु.गा.१४७८.००१ ।।
यावरी तुमचा मोळा। तो गोपाळा अकळ।।तु.गा.१४७८.००२।।
घेतलें तें उसणें द्यावें। कांहीं भावें विशेषें।।तु.गा.१४७८.००३।।
तुका म्हणे क्रियानष्ट। तरी कष्ट घेतसां।।तु.गा.१४७८.००४।।
पराधीन माझें करूनियां जीणें। सांडी काय गुणें केली देवा।।तु.गा.१४७९.००१ ।।
उदार हे कितीं असे जगामाजी। कां तें ऐसें आजि पालटिलें।।तु.गा.१४७९.००२।।
आळवितों परि न पुरेचि रीघ। उचित तो त्याग नाहीं तुम्हां।।तु.गा.१४७९.००३।।

तुका म्हणे कां बा मुळीच व्यालासीं। ऐसें कां नेणसी पांडुरंगा ।।तु.गा.१४७९.००४ ।।
मजसवें नको चेष्टा। नव्हे साळी कांहीं कोष्टा ।।तु.गा.१४८०.००१ ।।
बैस सांडोनि दिमाख। जाय काळें करीं मुख ।।तु.गा.१४८०.००२ ।।
येथें न सरे चार। हीण आणिक व्यापार ।।तु.गा.१४८०.००३ ।।
तुका विष्णुदास। रस जाणतों नीरस ।।तु.गा.१४८०.००४ ।।
बोलतों निकुरें। नव्हतीं सलगीचीं उत्तरें ।।तु.गा.१४८१.००१ ।।
माझें संतापलें मन। परपीडा ऐकोन ।।तु.गा.१४८१.००२ ।।
अंगावरि आलें। तोंवरि जाईल सोसिलें ।।तु.गा.१४८१.००३ ।।
तुज भक्ताची आण देवा। जरि तुका येथें ठेवा ।।तु.गा.१४८१.००४ ।।
दंड अन्यायाचे माथां। देखोनि करावा सर्वथा ।।तु.गा.१४८२.००१ ।।
नये उगे बहुतां घाटूं। सिसें सोनियांत आटूं ।।तु.गा.१४८२.००२ ।।
पापपुण्यासाठीं। नीत केली आतां खोटी ।।तु.गा.१४८२.००३ ।।
तुका म्हणे देवा। दोष कोणाचा तो दावा ।।तु.गा.१४८२.००४ ।।
जाणसी उचित। पांडुरंगा धर्मनीत ।।तु.गा.१४८३.००१ ।।
तरि म्यां बोलावें तें काई। सरे ऐसें तुझें पायीं ।।तु.गा.१४८३.००२ ।।
पालटती क्षण। संचित प्रारब्ध क्रियमाण ।।तु.गा.१४८३.००३ ।।
तुका म्हणे सत्ता। होसी सकळ करिता ।।तु.गा.१४८३.००४ ।।
भवसिंधूचें हेंचि तारू । मज विचारूं पाहतां ।।तु.गा.१४८४.००१ ।।
चित्तीं तुझें धरीन पाय। सुख काय तें तेथें ।।तु.गा.१४८४.००२ ।।
माझ्या खुणा मनापाशीं। तें या रसीं बुडालें ।।तु.गा.१४८४.००३ ।।
तुका म्हणे वर्म आलें। हातां भलें हें माझ्या ।।तु.गा.१४८४.००४ ।।
आश्चर्य तें एक जालें। मना आले माझिया ।।तु.गा.१४८५.००१ ।।
मढ्यापाशीं करुणा केली। तैसी गेली वृथा हे ।।तु.गा.१४८५.००२ ।।

न यावा तो कैसा राग। खोटें मग देखोनि।।तु.गा.१४८५.००३।।
तुका म्हणे कैंचा बोला। शोध विठ्ठला माझिया।।तु.गा.१४८५.००४।।
येणें मार्गें गेलें। त्याचें निसंतान केलें।।तु.गा.१४८६.००१।।
ऐसी अवघड वाट। कोण सांगावा बोभाट।।तु.गा.१४८६.००२।।
नागविल्या थाटी। उरों नेदीच लंगोटी।।तु.गा.१४८६.००३।।
तुका म्हणे चोर। तो हा उभा कटिकर।।तु.गा.१४८६.००४।।
उगेंचि हें मन राहतें निश्चल। तरि का तळमळ साठ होती।।तु.गा.१४८७.००१।।
काय तुमचीं नेणों कवतुक विंदानें। सर्वोत्तमपणें खेळतसां।।तु.गा.१४८७.००२।।
नानाछंदें आम्हां नाचवावें जीवां। वाढवाव्या हांवा भलत्यापुढें।।तु.गा.१४८७.००३।।
तुका म्हणे तुम्ही आपुली प्रतिष्ठा। वाढावया चेष्टा करितसां।।तु.गा.१४८७.००४।।
कळों आलें तुझें जिणें। देवा तूं माझें पोसणें।।तु.गा.१४८८.००१।।
वाट पाहासी आमुची। सत्ता सतत कईंची।।तु.गा.१४८८.००२।।
बोलवितां यावें रूपा। सदा निर्गुणींच लपा।।तु.गा.१४८८.००३।।
तुका म्हणे तूं परदेशी। येथें आम्हां अंगें जिसी।।तु.गा.१४८८.००४।।
काय करूं आतां धरूनियां भीड। निःशंक हें तोंड वाजविलें।।तु.गा.१४८९.००१।।
नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण। सार्थक लाजोन नव्हे हित।।तु.गा.१४८९.००२।।
आलें तें उत्तर बोलों स्वामीसवें। धीट नीट जीवें होऊनियां।।तु.गा.१४८९.००३।।
तुका म्हणे मना समर्थासी गांठी। घालावी हे मांडी थापटूनी।।तु.गा.१४८९.००४।।
चालें दंडवत घालीं नारायणा। आपुल्या कल्याणा लागूनियां।।तु.गा.१४९०.००१।।
बैसविला पदीं पुत्र राज्य करी। पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची।।तु.गा.१४९०.००२।।
तुका म्हणे आहे ठायींचाचि मान। आतां अनुमान कायसा तो।।तु.गा.१४९०.००३।।
प्राण समर्पिला आम्हीं। आतां उशीर कां स्वामी।।तु.गा.१४९१.००१।।
माझें फेडावें उसणें। भार न मना या ऋणें।।तु.गा.१४९१.००२।।

जाला कंठस्फोट। जवळीं पातलों निकट।।तु.गा.१४९१.००३ ।।

तुका म्हणे सेवा। कैसी बरी वाटे देवा।।तु.गा.१४९१.००४।।

तुज काय करूं मज एक सार। अमृतनागर नाम तुझें।।तु.गा.१४९२.००१ ।।

काय उणें आम्हां तयाचिये पोटीं। गोवितां हे कंठीं कामधेनु।।तु.गा.१४९२.००२।।

नोळखे तानुलें माय ऐसी कोण। वोरसे देखून शोक त्याचा।।तु.गा.१४९२.००३।।

जो नाहीं देखिला याचक नयनीं। तो पावे घेऊनि लज्जा दान।।तु.गा.१४९२.००४।।

नामासाठीं प्राण सांडियेला रणीं। शूर तें भांडणीं न फिरती।।तु.गा.१४९२.००५।।

तुका म्हणे आम्हीं गातां गीतीं भला। भेटूनि विठ्ठला काय चाड।।तु.गा.१४९२.००६ ।।

चित्त घेऊनियां तूं काय देसी। ऐसें मजपाशीं सांग आधीं।।तु.गा.१४९३.००१ ।।

तरीच पंढरिराया करिन साटोवाटी। नेघें जया तुटी येईल तें।।तु.गा.१४९३.००२।।

रिद्धिसिद्धि कांहीं दाविसी अभिळास। नाहीं मज आस मुक्तीचीही।।तु.गा.१४९३.००३।।

तुका म्हणे तुझें माझें घडे तर। भक्तीचा भाव रे देणें घेणें।।तु.गा.१४९३.००४।।

भले लोक नाहीं सांडीत वोळखी। हे तों झाली देखी दुसऱ्याची।।तु.गा.१४९४.००१ ।।

असो आतां यासी काय चाले बळ। आपुलें कपाळ वोढवलें।।तु.गा.१४९४.००२ ।।

समर्थासी काय कोणें हें म्हणावें। आपुलिया जावें भोगावरी।।तु.गा.१४९४.००३।।

तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा। नाहीं केली सेवा मनोभावें।।तु.गा.१४९४.००४।।

आपण चाळक बुद्धीच्या संचारा। आम्हांसी वेव्हारा पात्र केलें।।तु.गा.१४९५.००१ ।।

काय झालें तरी नेघा तुम्ही भार। आणीक कोणा थोर म्हणो सांगा।।तु.गा.१४९५.००२।।

पंचभूतें तंव चर्माचिया मोटा। येथें खरा खोटा कोण भाव।।तु.गा.१४९५.००३।।

तुका म्हणे नाहीं बोलावया जागा। कां देवा वाउगा श्रम करूं ।।तु.गा.१४९५.००४।।

माझें मज द्यावें। नाहीं करवीत नवें।।तु.गा.१४९६.००१ ।।

सहस्त्र नामाचें रूपडें। भक्तकैवारी चोखडें।।तु.गा.१४९६.००२ ।।

साक्षीवीण बोलें। तरि मज पाहिजे दंडिलें।।तु.गा.१४९६.००३ ।।

तुका म्हणे माल। माझा खरा हा विठ्ठल।।तु.गा.१४९६.००४।।
उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा। तुजसवें पण आतां आमुचा दावा।।तु.गा.१४९७.००१।।
कैसा जासी सांग आतां मजपासूनि। केलें वाताहात दिलें संसारा पाणी।।तु.गा.१४९७.००२।।
अवघीं आवरूनी तुझें लाविली पाठीं। आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी।।तु.गा.१४९७.००३।।
तुका म्हणे आतां चरणीं घातली मिठी। पडिली ते पडो तुम्हां आम्हांसी तुटी।।तु.गा.१४९७.००४।।
माझिया संचिता। दृढ देखोनि बळिवंता। पळसी पंढरीनाथा। भेणें आतां तयाच्या।।तु.गा.१४९८.००१।।
तरि मज कळलासी। नव्हतां भेटी जाणीवेसी। एक संपादिसी। मान करिसी येकात।।तु.गा.१४९८.००२।।
तरि हें प्रारब्ध जी गाढें। कांहीं न चले तयापुढें। काय तुज म्यां कोडें। रे सांकडें घालावें।।तु.गा.१४९८.००३।।
भोगाधिपति क्रियमाण। तें तुज नागवें आझून। तरि कां वायांविण। तुज म्यां सीण करावा।।तु.गा.१४९८.००४।।
तुज न होतां माझें कांहीं। परि मी न संडीं भक्तिसोई। हो कां भलत्या ठायीं। कुळीं जन्म भलतैसा।।तु.गा.१४९८.००५।।
तूं भितोसि माझिया दोषा। कांहीं मागणें ते आशा। तुका म्हणे ऐसा। कांहीं न धरी संकोच।।तु.गा.१४९८.००६।।
मी याचक तूं दाता। काय सत्य पाहों आतां।।तु.गा.१४९९.००१।।
म्यां तों पसरिला हात। करीं आपुलें उचित।।तु.गा.१४९९.००२।।
आम्हीं घ्यावें नाम। तुम्हां समाधान काम।।तु.गा.१४९९.००३।।
तुका म्हणे देवराजा। वाद खंडीं तुझा माझा।।तु.गा.१४९९.००४।।
न करीं तुमची सेवा। बापुडें मीपणें देवा। बोलिलों तो पाववा। पण सिद्धी सकळ।।तु.गा.१५००.००१।।
आणीक काय तुम्हां काम। आम्हां नेदा तरी प्रेम। कैसें धर्माधर्म। निश्चयेसीं रहाती।।तु.गा.१५००.००२।।
आम्हीं वेचलों शरीरें। तुम्ही बीज पेरा खरें। संयोगाचें बरें। गोड होतें उभयतां।।तु.गा.१५००.००३।।
एका हातें टाळी। कोठें वाजते निराळी। जाला तरी बळी। स्वामीविण शोभेना।।तु.गा.१५००.००४।।
रूपा यावें जी अनंता। धरीन पुटाची त्या सत्ता। होईन सरता। संतामाजीं पोसणा।।तु.गा.१५००.००५।।
ठेविलें उधारा। वरी काय तो पातेरा। तुका म्हणे बरा। रोकडाचि निवाड।।तु.गा.१५००.००६।।
बहुतां रीती काकुलती। आलों चित्तीं न धराच।।तु.गा.१५०१.००१।।
आतां काशासाठीं देवा। मिथ्या हेवा वाढवूं।।तु.गा.१५०१.००२।।

तुम्हां आम्हां जाली तुटी। आतां भेटी चिंतनें ।।तु.गा.१५०१.००३ ।।

तुका म्हणे लाजिरवाणें। अधीर जिणें इच्छेचें ।।तु.गा.१५०१.००४ ।।

संसाराच्या तापें तापलों मी देवा। करितां या सेवा कुटुंबाची ।।तु.गा.१५०२.००१ ।।

म्हणऊनि तुझे आठविले पाय। ये वो माझे माय पांडुरंगे ।।तु.गा.१५०२.००२ ।।

बहुतां जन्मींचा जालों भारवाही। सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ।।तु.गा.१५०२.००३ ।।

वेढियलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं। कणव न करी कोणी माझी ।।तु.गा.१५०२.००४ ।।

बहु पांगविलों बहु नागविलों। बहु दीस झालों कासाविस ।।तु.गा.१५०२.००५ ।।

तुका म्हणे आतां धांव घाली वेगीं। ब्रीद तुझें जगीं दीनानाथा ।।तु.गा.१५०२.००६ ।।

सर्प भुलोन गुंतला नादा। गारुडियें फांदां घातलासे। हिंडवुनि पोट भरी दारोदारीं। कोंडुनि पेटारी असे रया ।।तु.गा.१५०३.००१ ।।

तैसी परी मज जाली पांडुरंगा। गुंतलो तो मी गा सोडवी आतां। माझें मज कांहीं न चलेसें जालें। कृपा हे तुज न करितां ।।तु.गा.१५०३.००२ ।।

आविसें मीन लावियला गळीं। भक्ष तो गिळी म्हणूनियां। काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे। तेथें बाप माये कवण रया ।।तु.गा.१५०३.००३ ।।

पक्षी पिल्यां पातलें आशा। देखोनियां फांसा गुंते बळें। मरण सायासें नेणे धांवोनि वोरसे। जीवित्वा नास जालीं बाळें ।।तु.गा.१५०३.००४ ।।

गोडपणें मासी लिगाडीं गुंतली। सांपडे फडफडी अधिकाधिक। तुका म्हणे प्राण घेतला आशा। पंढरीनिवासा धांव घाली ।।तु.गा.१५०३.००५ ।।

सुटायाचा कांहीं करितों उपाय। तों हें देखे पाय गोवियेले ।।तु.गा.१५०४.००१ ।।

ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी। हारपली बुद्धि बळ माझें ।।तु.गा.१५०४.००२ ।।

प्रारब्ध क्रियमाण संचिताचे। वोढत ठायींचे आले साचे ।।तु.गा.१५०४.००३ ।।

विधिनिषेधाचे सांपडलों चेपे। एक एका लोपे निवडेना ।।तु.गा.१५०४.००४ ।।

सारावें तें वाढे त्याचियाची अंगें। तृष्णेचिया संगें दुःखी जालों ।।तु.गा.१५०४.००५ ।।

तुका म्हणे आतां करीं सोडवण। सर्वशक्तिहीन जालों देवा ।।तु.गा.१५०४.००६ ।।

भय वाटे पर। न सुटे हा संसार ।।तु.गा.१५०५.००१ ।।

ऐसा पडिलों काचणी। करीं धांवा म्हणउनि ।।तु.गा.१५०५.००२ ।।

विचारितां कांहीं। तों हें मन हातीं नाहीं ।।तु.गा.१५०५.००३ ।।

तुका म्हणे देवा। येथें न पुरे रिघावा ।।तु.गा.१५०५.००४ ।।

अंतरींचा भाव जाणोनियां गुज। तैसें केलें काज पांडुरंगा।।तु.गा.१५०६.००१ ।।
घातलें वचन न पडेचि खालीं। तूं आम्हां माउली अनाथांची।।तु.गा.१५०६.००२।।
मज याचकाची पुरविली आशा। पंढरीनिवासा मायबापा।।तु.गा.१५०६.००३।।
नाशिली आशंका माझिया जीवाची। उरली भेदाची होती कांहीं।।तु.गा.१५०६.००४।।
तुका म्हणे आतां केलों मी निर्भर। गाईन अपार गुण तुझे।।तु.गा.१५०६.००५।।
बोलिविसी तैसें आणी अनुभवा। नाहीं तरी देवा विटंबना।।तु.गा.१५०७.००१ ।।
मिठेंविण काय करावें मिष्टान्न। शव जीवेंविण शृंगारिलें।।तु.गा.१५०७.००२।।
संपादणीविण विटंबिलें सोंग। गुणेंविण चांग रूप हीन।।तु.गा.१५०७.००३।।
कन्यापुत्रेंविण मंगळदायकें। वेचिलें हें फिकें द्रव्य तरी।।तु.गा.१५०७.००४।।
तुका म्हणे तैसी होते मज परी। न देखें अंतरीं प्रेमभाव।।तु.गा.१५०७.००५।।
श्वाना दिली सवे। पायांभोंवतें तें भोवे।।तु.गा.१५०८.००१ ।।
तैसी जाली मज परी। वसें निकट सेजारीं।।तु.गा.१५०८.००२।।
जेवितां जवळी। येऊनियां पुस घोळी।।तु.गा.१५०८.००३।।
कोपेल तो धणी। तुका म्हणे नेणें मनीं।।तु.गा.१५०८.००४।।
मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी। विदित पायांपाशीं सर्व आहे।।तु.गा.१५०९.००१ ।।
आतां हेंचि भलें भाकावी करुणा। विनियोग तो जाणां तुम्ही याचा।।तु.गा.१५०९.००२।।
आपलें तो येथें केलें नव्हे कांहीं। साधनाच्या वाहीं पडों नये।।तु.गा.१५०९.००३।।
तुका म्हणे देह दिला पिंडदान। वेळोवेळां कोण चिंता करी।।तु.गा.१५०९.००४।।
कवतुकवाणें। बोलों बोबड्या वचनें।।तु.गा.१५१०.००१ ।।
हें तों नसावें अंतरीं। आम्हां धरायाचें दुरी।।तु.गा.१५१०.००२।।
स्तुति तैसी निंदा। माना समचि गोविंदा।।तु.गा.१५१०.००३।।
तुका म्हणे बोले। मज तुम्हीं शिकविलें।।तु.गा.१५१०.००४।।
जन पूजी याचा मज कां आभार। हा तुम्ही विचार जाणां देवा।।तु.गा.१५११.००१ ।।

पत्र कोण मानी वंदितील सिक्का। गौरव सेवका त्याचि मुळें।।तु.गा.१५११.००२।।
मी मीपणें होतों जनामधीं आधीं। कोणें दिलें कधीं काय तेव्हां।।तु.गा.१५११.००३।।
आतां तूं भोगितां सर्व नारायणा। नको आम्हां दीना पीडा करूं ।।तु.गा.१५११.००४।।
आपुलिया हातें देसील मुशारा। तुका म्हणे खरा तोचि आम्हां।।तु.गा.१५११.००५।।
पाळिलों पोसिलों जन्मजन्मांतरीं। वागविलों करीं धरोनियां।।तु.गा.१५१२.००१।।
आतां काय माझा घडेल अव्हेर। मागें बहु दूर वागविलें।।तु.गा.१५१२.००२।।
नेदी वारा अंगीं लागों आघाताचा। घेतला ठायींचा भार माथां।।तु.गा.१५१२.००३।।
तुका म्हणे बोल करितों आवडी। अविट तेचि गोडी अंतरींची।।तु.गा.१५१२.००४।।
मजपुढें नाहीं आणीक बोलतां। ऐसे कांहीं चित्ता वाटतसे।।तु.गा.१५१३.००१।।
याचा कांहीं तुम्हीं देखावा परिहार। सर्वज्ञ उदार पांडुरंगा।।तु.गा.१५१३.००२।।
कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन। राहिले वसोन देहामध्यें।।तु.गा.१५१३.००३।।
तुका म्हणे आतां जालों उतराई। कळों यावें पायीं निरोपिलें।।तु.गा.१५१३.००४।।
काळावरी घालूं तरि तो सरिसा। न पुरतां इच्छा दास कैसे।।तु.गा.१५१४.००१।।
आतां नाहीं कांहीं उसिराचें काम। न खंडावें प्रेम नारायणा।।तु.गा.१५१४.००२।।
देणें लागे मग विलंब कां आड। गोड तरि गोड आदि अंत।।तु.गा.१५१४.००३।।
तुका म्हणे होईल दर्शनें निश्चिंती। गाईन तें गीतीं ध्यान मग।।तु.गा.१५१४.००४।।
काय माझा पण होईल लटिका। ब्रिदावळी लोकां दाविली ते।।तु.गा.१५१५.००१।।
खरी करूनियां देईं माझी आळी। येऊनि कुरवाळीं पांडुरंगे।।तु.गा.१५१५.००२।।
आणीक म्यां कोणा म्हणवावें हातीं। नये काकुलती दुजियासी।।तु.गा.१५१५.००३।।
तुका म्हणे मज येथेंचि ओळखी। होईन तो सुखी पायांनींच।।तु.गा.१५१५.००४।।
नको माझे मानूं आहाच ते शब्द। कळवळ्याचा वाद करीतसें।।तु.गा.१५१६.००१।।
कासयानें बळ करूं पायांपासीं। भाकावी ते दासीं करुणा आम्हीं।।तु.गा.१५१६.००२।।
काय मज चाड असे या लौकिकें। परी असे निकें अनुभवाचें।।तु.गा.१५१६.००३।।

लांचावल्यासाठीं वचनाची आळी। टकळ्यानें घोळी जवळी मन।।तु.गा.१५१६.००४।।
वाटतसे आस पुरविसी ऐसें। तरि अंगीं पिसें लावियेलें।।तु.गा.१५१६.००५।।
तुका म्हणे माझी येथेंचि आवडी। श्रीमुखाची जोडी इच्छीतसें।।तु.गा.१५१६.००६।।
तांतडीनें आम्हां धीरचि न कळे। पाळावे हे लळे लवलाहे।।तु.गा.१५१७.००१।।
नका कांहीं पाहों सावकाशीं देवा। करा एक हेवा तुमचा माझा।।तु.गा.१५१७.००२।।
वोरसाचा यावा सांभाळावी प्रीत। नाहीं राहो येत अंगीं धंदा।।तु.गा.१५१७.००३।।
तुका म्हणे मज नका गोवूं खेळा। भोजनाची वेळा राखियेली।।तु.गा.१५१७.००४।।
इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप। आम्हांसी स्वरूप स्थिती चाड।।तु.गा.१५१८.००१।।
आतां नव्हे माझा भाव अनारिसा। पाउलांनीं इच्छा गोवियेली।।तु.गा.१५१८.००२।।
लेंकरासी कोठें जाणत्याची परी। करूं येते दुरी धरावया।।तु.गा.१५१८.००३।।
लागली न सुटे नामाची आवडी। माझी भावजोडी भंगूं नका।।तु.गा.१५१८.००४।।
घेसी आढेवेढे मुक्तीच्या अभिळासें। चाळवीं जा पिसे ब्रह्मज्ञानी।।तु.गा.१५१८.००५।।
तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस। पाडावया ओस चाळविसी।।तु.गा.१५१८.००६।।
झालिया दर्शन करीन मी सेवा। आणिक कांहीं देवा नलगें दुजें।।तु.गा.१५१९.००१।।
प्रारब्धा आधीन अन्न आच्छादन। स्थिर करोनि मन ठेवी पायीं।।तु.गा.१५१९.००२।।
येगा येगा येगा कृपाळुवा हरी। निववीं अभ्यंतरीं देऊनि भेटी।।तु.गा.१५१९.००३।।
आसावलें मन जीवनाचे ओढी। नामीं रूपीं गोडी लावियेली।।तु.गा.१५१९.००४।।
काय तुम्हांपाशीं नाहीं भांडवल। माझे मिथ्या बोल जाती ऐसें।।तु.गा.१५१९.००५।।
काय लोखंडाचे पाहे गुणदोष। शिवोनि परिस सोनें करी।।तु.गा.१५१९.००६।।
तुका म्हणे माझें अवघें असों द्यावे। आपुलें करावें ब्रीद साच।।तु.गा.१५१९.००७।।
तुझा दास मज म्हणती अंकित। अवघे सकळिक लहान थोर।।तु.गा.१५२०.००१।।
हेंचि आतां लागें करावें जतन। तुझें थोरपण तुज देवा।।तु.गा.१५२०.००२।।
होउनी निर्भर राहिलों निश्चिंत। पावनपतित नाम तुझें।।तु.गा.१५२०.००३।।

करितां तुज होय डोंगराची राई। न लगतां कांहीं पात्या पातें ।।तु.गा.१५२०.००४।।
तुका म्हणे तुज काय तें अशक्य। तारितां मशक मज दीना ।।तु.गा.१५२०.००५।।
भलते जन्मीं मज घालिसील तरी। न सोडीं मी हरी नाम तुझें ।।तु.गा.१५२१.००१।।
सुख दुःख तुज देईन भोगितां। मग मज चिंता कासयाची ।।तु.गा.१५२१.००२।।
तुझा दास म्हणवीन मी अंकिला। भोगितां विठ्ठला गर्भवास ।।तु.गा.१५२१.००३।।
कासया मी तुज भाकितों करुणा। तारीं नारायणा म्हणऊनि ।।तु.गा.१५२१.००४।।
तुका म्हणे तुज येऊं पाहे उणें। तारिसील तेणें आम्हां तया ।।तु.गा.१५२१.००५।।
आणीक पाखांडें असती उदंडें। तळमळिती पिंडें आपुलिया ।।तु.गा.१५२२.००१।।
त्याचिया बोलाचा नाहीं हा विश्वास। घातलीसे कास तुझ्या नामीं ।।तु.गा.१५२२.००२।।
दृढ एक चित्तें झालों या जीवासी। लाज सर्वविशीं तुम्हांसी ते ।।तु.गा.१५२२.००३।।
पीडों नेदी पशु आपुले अंकित। आहे जें उचित तैसें करा ।।तु.गा.१५२२.००४।।
तुका म्हणे किती भाकावी करुणा। कोप नारायणा येईल तुम्हां ।।तु.गा.१५२२.००५।।
जेथें जातों तेथें पडतों मतोळा। न देखिजे डोळां लाभ कांहीं ।।तु.गा.१५२३.००१।।
कपाळींची रेखा असती उत्तम। तरि कां हा श्रम पावतों मी ।।तु.गा.१५२३.००२।।
नव्हेचि तुम्हांस माझा अंगीकार। थीता संवसार अंतरला ।।तु.गा.१५२३.००३।।
भोग तंव झाला खरा भोगावा तो। भांडवल नेतो आयुष्य काळ ।।तु.गा.१५२३.००४।।
कोठें तुझी कीर्ति आइकिली देवा। मुकतों कां जीवा तुका म्हणे ।।तु.गा.१५२३.००५।।
न घडे मायबापा बाळकाचा घात। आपणांदेखत होऊं नेदी ।।तु.गा.१५२४.००१।।
कां मी मनीं चिंता वाहूं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ।।तु.गा.१५२४.००२।।
वर्म जाणें त्याच्या हिताचे उपाय। तहान भूक वाहे कडिये खांदीं ।।तु.गा.१५२४.००३।।
तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी। ऐसे मज हरी कळों आलें ।।तु.गा.१५२४.००४।।
नलगे मायेसी बाळ निरवावें। आपल्या स्वभावें ओढे त्यासी ।।तु.गा.१५२५.००१।।
मज कां लागला करणें विचार। ज्याचा जार भार त्याचे माथां ।।तु.गा.१५२५.००२।।

गोड धड त्यासी ठेवी न मागतां। समाधान खातां नेदी मना।।तु.गा.१५२५.००३।।
खेळतां गुंतलें उमगूनी आणी। बैसोनियां स्तनीं लावी बळें ।।तु.गा.१५२५.००४।।
त्याच्या दु:खें पडे आपण खापरीं। लाही तळीं वरी होय जैसी।।तु.गा.१५२५.००५।।
तुका म्हणे देह विसरे आपुला। आघात तो त्याला लागों नेदी।।तु.गा.१५२५.००६।।
आम्हासाठीं अवतार। मत्स्यकूर्मादि सूकर।।तु.गा.१५२६.००१।।
मोहें धांवे घाली पान्हा। नांव घेतां पंढरीराणा।।तु.गा.१५२६.००२।।
कोठें न दिसे पाहतां। उडी घाली अवचिता।।तु.गा.१५२६.००३।।
सुख ठेवी आम्हासाठीं। दु:ख आपणचि घोंटी।।तु.गा.१५२६.००४।।
आम्हां घाली पाठीकडे। आपण कळिकाळाशीं भिडे।।तु.गा.१५२६.००५।।
तुका म्हणे कृपानिधी। आम्हां उतरीं नावेमधीं।।तु.गा.१५२६.००६।।
देह तंव आहे प्रारब्धा अधीन। याचा मी कां सीण वाहूं भार।।तु.गा.१५२७.००१।।
सरो माझा काळ तुझिया चिंतनें। कायावाचामनें इच्छितसें।।तु.गा.१५२७.००२।।
लाभ तो न दिसे याहूनि दुसरा। आणीक दातारा येणें जन्में।।तु.गा.१५२७.००३।।
तुका म्हणे आलों सोसीत संकटें। मी माझें वोखटें आहे देवा।।तु.गा.१५२७.००४।।
तुज दिलें आतां करीं यत्न याचा। जीवभाव वाचाकायामन।।तु.गा.१५२८.००१।।
भागलों दातारा सीण जाला भारी। आतां मज तारीं शरणागता।।तु.गा.१५२८.००२।।
नेणतां सोसिली तयाची आटणी। नव्हतांही कोणी कांहीं माझी।।तु.गा.१५२८.००३।।
वर्म नेणें दिशा हिंडती मोकाट। इंद्रियें सुनाट दाही दिशा।।तु.गा.१५२८.००४।।
येरझारी फेरा सिणलों सायासीं। आतां हृषीकेशी अंगीकारीं।।तु.गा.१५२८.००५।।
तुका म्हणे मन इंद्रियांचे सोई। धांवे यासी काई करूं आतां।।तु.गा.१५२८.००६।।
नेणें गति काय कवण अधोगति। मानिली निश्चिंती तुझ्या पायीं।।तु.गा.१५२९.००१।।
कर्म धर्म कोण नेणें हा उपाव। तुझ्या पायीं भाव ठेवियेला।।तु.गा.१५२९.००२।।
नेणे निरसूं पापपुण्य नेणें काय। म्हणऊनि पाय धरिले तुझे।।तु.गा.१५२९.००३।।

वेडा मी अविचारी न कळे विचार। तुज माझा भार पांडुरंगा ।।तु.गा.१५२९.००४।।
तुका म्हणे तुज करितां नव्हे काय। माझा तो उपाय कवण तेथें ।।तु.गा.१५२९.००५।।
भक्तिसुख आलें नाहीं अनुभवा। तों मी ज्ञान देवा काय करूं ।।तु.गा.१५३०.००१।।
नसावें जी तुम्हीं कांहीं निश्चिंतीनें। माझिया वचनें अभेदाच्या ।।तु.गा.१५३०.००२।।
एकाएकीं मन नेदी समाधान। देखिल्या चरण वांचूनियां ।।तु.गा.१५३०.००३।।
तुका म्हणे वाचा गुणीं लांचावली। न राहे उगली मौन्य मज ।।तु.गा.१५३०.००४।।
न कळे तों काय करावा उपाव। जेणें राहे भाव तुझ्या पायीं ।।तु.गा.१५३१.००१।।
येऊनियां वास करिसी हृदयीं। ऐसें घडे कईं कासयानें ।।तु.गा.१५३१.००२।।
साच भावें तुझें चिंतन मानसीं। राहे हें करिसी कैं गा देवा ।।तु.गा.१५३१.००३।।
लटिकें हें माझें करूनियां दुरी। साच तूं अंतरीं येउनि राहें ।।तु.गा.१५३१.००४।।
तुका म्हणे मज रांखावें पतिता। आपुलिया सत्ता पांडुरंगा ।।तु.गा.१५३१.००५।।
नाहीं जप तप जीवासी आटणी। मनासी दाटणी नाहीं केली ।।तु.गा.१५३२.००१।।
निजलिया ठायीं फोकारिला धांवा। सांकडें तें देवा तुज माझें ।।तु.गा.१५३२.००२।।
नाहीं आणूनियां समर्पिलें जळ। सेवा ते केवळ चिंतनाची ।।तु.गा.१५३२.००३।।
तुका म्हणे आम्हीं वेचिलीं उत्तरें। घेतलीं उदारें मायबापें ।।तु.गा.१५३२.००४।।
पुढिलियां सुखें निंब देता भले। बहुत वारलें होय दुःख ।।तु.गा.१५३३.००१।।
हें तों वर्म असे माउलीच्या हातीं। हाणी मारी प्रीती हितासाठीं ।।तु.गा.१५३३.००२।।
खेळतां विसरे भूक तहान घर। धरूनियां कर आणी बळें ।।तु.गा.१५३३.००३।।
तुका म्हणे पाळी तोंडींचिया घांसें। उदार सर्वस्वें सर्वकाळ ।।तु.गा.१५३३.००४।।
मार्ग चुकले विदेशी एकले। तयावरी झाले दिशाभुली ।।तु.गा.१५३४.००१।।
हातीं धरूनियां पावविले घरा। त्याच्या उपकारा काय द्यावें ।।तु.गा.१५३४.००२।।
तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा। सेवा न घडे लाजा म्हणऊनि ।।तु.गा.१५३४.००३।।
सांडियेला गर्भ उबगोनि माउली। नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ।।तु.गा.१५३४.००४।।

उष्ण तहान भूक एवढे आकांतीं। वोसंगा लाविती काय म्हूण ।।तु.गा.१५३४.००५ ।।
खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे। अन्यायहि मोठे साच केले ।।तु.गा.१५३४.००६ ।।
हातींचा हिरोनि घातला पाठीसी। तुका म्हणे ऐसी परि जाली ।।तु.गा.१५३४.००७ ।।
ऐसें भाग्य कईं लाहता होईन। अवघें देखें जन ब्रह्मरूप ।।तु.गा.१५३५.००१ ।।
मग तया सुखा अंत नाहीं पार। आनंदें सागर हेलावती ।।तु.गा.१५३५.००२ ।।
शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं। परावृत्त संगीं कामादिकां ।।तु.गा.१५३५.००३ ।।
विवेकासहित वैराग्याचें बळ। धगधगित ज्वाळ अग्नि जैसा ।।तु.गा.१५३५.००४ ।।
भक्ति नवविधा भाव शुद्ध वरी। अळंकारावरी मुगुट मणी ।।तु.गा.१५३५.००५ ।।
तुका म्हणे माझी पुरवी वासना। कोण नारायणा तुजविण ।।तु.गा.१५३५.००६ ।।
आळिकरा कोठें साहातें कठीण। आपुला तें प्राण देऊं पाहे ।।तु.गा.१५३६.००१ ।।
सांभाळावें मायबापें कृपादृष्टी। पीडितां तें दृष्टी देखों नये ।।तु.गा.१५३६.००२ ।।
अंतरलों मागें संवसारा हातीं। पायांपें सरती झालों नाहीं ।।तु.गा.१५३६.००३ ।।
तुका म्हणे तुम्हीं विचारा जी देवा। ठेवाल तें ठेवा कोणे परी ।।तु.गा.१५३६.००४ ।।
न पाहें माघारें आतां परतोनि। संसारापासूनि विटला जीव ।।तु.गा.१५३७.००१ ।।
सामोरा येऊनि कवळीं दातारा। काळाचा हाकारा न साहावे ।।तु.गा.१५३७.००२ ।।
सावधान चित्त होईल आधारें। खेळताही बरें वाटईल ।।तु.गा.१५३७.००३ ।।
तुका म्हणे कंठ दाटला या सोसें। न पवेचि कैसें जवळी हे ।।तु.गा.१५३७.००४ ।।
करितां विचार। तो हा दृढ संसार। ब्रह्मादिकां पार। नुल्लंघवे सामर्थ्यें ।।तु.गा.१५३८.००१ ।।
शरण शरण नारायणा। मज अंगीकारा दीना। आले तें वचना–। पाशीं माझ्या सामर्थ्य ।।तु.गा.१५३८.००२ ।।
पाठीवरी मोळी। तोचि कळवा पायीं तळीं। सांपडला जाळीं। मत्स्य जाला तो न्याय ।।तु.गा.१५३८.००३ ।।
आतां करीन तांतडी। लाभाची ते याच जोडी। तुका म्हणे ओढी। पायां सोई मनाची ।।तु.गा.१५३८.००४ ।।
सिणलों दातारा करितां वेरझारा। आतां सोडवी संसारापासोनियां ।।तु.गा.१५३९.००१ ।।
न सुटेचि बाकी नव्हें झाडापाडा। घातलोंसें खोडा हाडांचिया ।।तु.गा.१५३९.००२ ।।

मायबापें माझी जीवांची सांगाती। तीं देतील हातीं काळाचिया ।।तु.गा.१५३९.००३ ।।
पडताळूनि सुरी बैसली सेजारीं। यमफासा करीं घेऊनियां ।।तु.गा.१५३९.००४ ।।
पाठी पोटीं एकें लागलीं सरसीं। नेती नरकापाशीं ओढूनियां ।।तु.गा.१५३९.००५ ।।
जन साह्यभूत असे या सकळा। मी एक निराळा परदेशी ।।तु.गा.१५३९.००६ ।।
कोणा काकुलती नाहीं कोणे परी। तुजविण हरी कृपाळुवा ।।तु.गा.१५३९.००७ ।।
तुका म्हणे मज तुझाची भरंवसा। म्हणऊनि आशा मोकलिली ।।तु.गा.१५३९.००८ ।।
स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर। विषयीं पडिभर अतिशय ।।तु.गा.१५४०.००१ ।।
आतां सोडवणें धांवा नारायणा। मज हे वासना अनावर ।।तु.गा.१५४०.००२ ।।
येउनियां आड ठाके लोकलाज। तो हें दिसे काज अंतरलें ।।तु.गा.१५४०.००३ ।।
तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा। तेथें तुम्हीं देवा सांभाळावें ।।तु.गा.१५४०.००४ ।।
बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी। ठाकोनियां मनीं आला सीण ।।तु.गा.१५४१.००१ ।।
आतां पायांपाशीं लपवावें देवा। नको पाहूं सेवाभक्ती माझी ।।तु.गा.१५४१.००२ ।।
बहु भय वाटे एकाच्या बोभाटें। आलीं घायवटें फिरोनियां ।।तु.गा.१५४१.००३ ।।
तुका म्हणे सिगे भरूं आलें माप। वियोग संताप झाला तुझा ।।तु.गा.१५४१.००४ ।।
आजिवरी होतों संसाराच्या हातीं। आतां ऐसें चित्तीं उपजलें ।।तु.गा.१५४२.००१ ।।
तुम्हां शरणागत व्हावें नारायणा। अंगीकारा दीना आपुलियां ।।तु.गा.१५४२.००२ ।।
विसरलों काम याजसाठीं धंदा। सकळ गोविंदा माझें तुझें ।।तु.गा.१५४२.००३ ।।
तुका म्हणे विज्ञापना परिसावी। आवडी हे जीवीं झाली तैसी ।।तु.गा.१५४२.००४ ।।
कैसा तूं देखिला होसील गोपाळीं। पुण्यवंता डोळीं नारायणा ।।तु.गा.१५४३.००१ ।।
तेणें लोभें जीव जालासे बराडी। आम्ही ऐसी जोडी कईं लाभों ।।तु.गा.१५४३.००२ ।।
असेल तें कैसें दर्शनाचें सुख। अनुभवें श्रीमुख अनुभवितां ।।तु.गा.१५४३.००३ ।।
तुका म्हणे वाटे देसी आलिंगन। अवस्था ते क्षणक्षणा होते ।।तु.गा.१५४३.००४ ।।
आतां मी अनन्य येथें अधिकारी । होइन कोणे परी नेणों देवा।।तु.गा.१५४४.००१ ।।

पुराणींचा अर्थ आणितां मनास। होय कासावीस जीव माझा ।।तु.गा.१५४४.००२ ।।
इंद्रियांचीं आम्ही पांगिलों अंकित। त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसें ।।तु.गा.१५४४.००३ ।।
येकाचेंही मज न घडे दमन। अवघीं नेमून कैसीं राखों ।।तु.गा.१५४४.००४ ।।
तुका म्हणे जरी मोकलिसी आतां। तरी मी अनंता वायां गेलों ।।तु.गा.१५४४.००५ ।।
अवघ्या पातकांची मीचि एक रासी। अवघा तूं होसी सर्वोत्तम ।।तु.गा.१५४५.००१ ।।
जैसा तैसा करणें लागे अंगीकार। माझा सर्व भार चालविणें ।।तु.गा.१५४५.००२ ।।
अवघेंचि मज गिळियेलें काळें। अवघींच बळें तुझें अंगीं ।।तु.गा.१५४५.००३ ।।
तुका म्हणे आतां खुंटला उपाय। अवघेचि पाय तुझे मज ।।तु.गा.१५४५.००४ ।।
ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव। तेथें अहंभाव पाठी लागे ।।तु.गा.१५४६.००१ ।।
म्हणोनि अवघे सांडिले उपाय। धरियेले पाय दृढ तुझे ।।तु.गा.१५४६.००२ ।।
वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकामधीं ।।तु.गा.१५४६.००३ ।।
पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा। तेथें देखें चेष्टा विपरीत ।।तु.गा.१५४६.००४ ।।
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें। योगी करती रागें गुरगुरु ।।तु.गा.१५४६.००५ ।।
तुका म्हणे मज कोणाचा पांगिला। नको बा विठ्ठला करूं आतां ।।तु.गा.१५४६.००६ ।।
मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध। आरालिया बद्ध ठेवा आम्हां ।।तु.गा.१५४७.००१ ।।
वागवीत संदेह राहों कोठवरी। मग काय थोरी सेवकाची ।।तु.गा.१५४७.००२ ।।
गाणें गीत आम्हां नाचणें आनंदें। प्रेम कोठें भेदें अंगा येतें ।।तु.गा.१५४७.००३ ।।
तुका म्हणे किती सांगावे दृष्टांत। नसतां तूं अनंत सानुकूळ ।।तु.गा.१५४७.००४ ।।
साकरेचें नाम घेतां कळे गोडी। तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ।।तु.गा.१५४८.००१ ।।
मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनि। सोस तो भजनीं आवडीचा ।।तु.गा.१५४८.००२ ।।
भोजनाची चिंता माय वाहे बाळा। आम्हां तरी खेळावरि चित्त ।।तु.गा.१५४८.००३ ।।
तुका म्हणे आम्ही देहउपकारें। गाऊं निरंतर नाचों लागों ।।तु.गा.१५४८.००४ ।।
किती विवंचना करीतसें जीवीं। मन धांवडवी दाही दिशा ।।तु.गा.१५४९.००१ ।।

कोणा एका भावें तुम्हीं अंगीकार। करावा विचार याच साठीं ।।तु.गा.१५४९.००२ ।।
इतर ते आतां लाभ तुच्छ जाले। अनुभवा आले गुणागुण ।।तु.गा.१५४९.००३ ।।
तुका म्हणे लागो अखंड समाधि। जावें प्रेमबोधीं बुडोनियां ।।तु.गा.१५४९.००४ ।।
मोलाचें आयुष्य वेंचतसे सेवें। नुगवतां गोवे खेद होतो ।।तु.गा.१५५०.००१ ।।
उगवूं आलेति तुम्ही नारायणा। परिहार या सिणा निमिषांत ।।तु.गा.१५५०.००२ ।।
लिगाडाचे मासी न्यायें जाली परी। उरली ते उरी नाहीं कांहीं ।।तु.गा.१५५०.००३ ।।
तुका म्हणे लाहो साधीं वाचाबळें। ओढियेलों काळें धांव घालीं ।।तु.गा.१५५०.००४ ।।
नव्हे मी स्वतंत्र अंगाचा पाईक । जे हे सकळिक सत्ता वारूं ।।तु.गा.१५५१.००१ ।।
तुम्हां आळवावें पाउलापाउलीं। कृपेची साउली करीं मज ।।तु.गा.१५५१.००२ ।।
शक्तिहीन तरी जालों शरणागत। आपुला वृत्तांत जाणोनियां ।।तु.गा.१५५१.००३ ।।
तुका म्हणे भवाभेणें धरिले पाय। आणीक उपाय नेणें कांहीं ।।तु.गा.१५५१.००४ ।।
ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें। जीवलग नेणें मज कोणी ।।तु.गा.१५५२.००१ ।।
भय वाटे देखें श्वापदांचे भार। नव्हे मज धीर पांडुरंगा ।।तु.गा.१५५२.००२ ।।
अंधकार पुढें न चलवे वाट। लागतील खुंट कांटे अंगा ।।तु.गा.१५५२.००३ ।।
एकला नि:संग फांकती मारग। भितों नव्हे लाग चालावया ।।तु.गा.१५५२.००४ ।।
तुका म्हणे वाट दावूनि सद्गुरु। राहिलासे दुरु पांडुरंग ।।तु.गा.१५५२.००५ ।।
एका एक वर्मे लावूनियां अंगीं । ठेवितों प्रसंगीं सांभाळीत ।।तु.गा.१५५३.००१ ।।
नेघावा जी आम्हीं वाव बहु फार। धरूनि अंतर ठायाठाव ।।तु.गा.१५५३.००२ ।।
वेव्हारें आलें तें समानचि होतें। बळ नाहीं येथें चालों येत ।।तु.गा.१५५३.००३ ।।
तुका म्हणे आतां निवाड्याच साटीं। संसारें तुटी करुनि ठेलों ।।तु.गा.१५५३.००४ ।।
कांहीं एक तरी असावा आधार। कासयानें धीर उपजावा ।।तु.गा.१५५४.००१ ।।
म्हणविल्यासाठीं कैसें पडे रुजू। धणी नाहीं उजू सन्मुख तो ।।तु.गा.१५५४.००२ ।।
वेंचल्या दिसांचा कोणावरी लेखा। घालावा हा सुखासुखें आम्हीं ।।तु.गा.१५५४.००३ ।।

नाहीं मनोगत तोंवरि हे देवा। तुका म्हणे सेवा नेघेजेतो ।।तु.गा.१५५४.००४।।
शिकल्या शब्दांचें उत्पादितों ज्ञान। दर्पणींचें धन उपर वायां ।।तु.गा.१५५५.००१।।
अनुभव कई होईन भोगितां। सांकडें तें आतां हेचि आलें ।।तु.गा.१५५५.००२।।
गायें नाचें करीं शरीराचें धर्म। बीजनाम वर्म तुझें दान ।।तु.गा.१५५५.००३।।
तुका म्हणे केला उशीर न साहे। द्याल तरी आहे सर्व सिद्ध ।।तु.गा.१५५५.००४।।
नाहीं गुणदोष लिंपों देत अंगीं। झाडितां प्रसंगीं वरावरी ।।तु.गा.१५५६.००१।।
निकटवासिया आळवितों धांवा। येथूनियां देवा सोडवूनि ।।तु.गा.१५५६.००२।।
उमटे अंतरीं तें करूं प्रगट। कळोनी बोभाट धांव घाली ।।तु.गा.१५५६.००३।।
तुका म्हणे तरी वांचलों या काळें । समर्थांचें बळें सुखी असों ।।तु.गा.१५५६.००४।।
तुम्ही माझा देवा करा अंगीकार। हा नाहीं विचार मजपाशीं ।।तु.गा.१५५७.००१।।
आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन। देवभक्तपण लाजविलें ।।तु.गा.१५५७.००२।।
एकांतीं एकलें न राहे निश्चळ। न राहेचि पळ मन ठायीं ।।तु.गा.१५५७.००३।।
पायीं महत्त्वाची पडिली श्रृंखळा। बांधविला गळा स्नेहा हातीं ।।तु.गा.१५५७.००४।।
शरीर सोकलें देखिलिया सुखा। कदान्न हें मुखा मान्य नाहीं ।।तु.गा.१५५७.००५।।
तुका म्हणे झाला अवगुणांचा थारा। वाढली हे निद्रा आळस बहू ।।तु.गा.१५५७.००६।।
अवघा वेंचलों इंद्रियांचें ओढी। जालें ते ते घडी निरोपिलें ।।तु.गा.१५५८.००१।।
असावा जी ठावा सेवेसी विचार। आपुला म्यां भार उतरिला ।।तु.गा.१५५८.००२।।
काया वाचा मनें तोचि निजध्यास। येथें जालों ओस भक्तिभावें ।।तु.गा.१५५८.००३।।
तुका म्हणे करूं येईल धांवणें। तरि नारायणें सांभाळावें ।।तु.गा.१५५८.००४।।
काम क्रोध माझे जीताती शरीरीं। कोवळें तें वरी बोलतसें ।।तु.गा.१५५९.००१।।
कैसा मी सरता जालों तुझ्या पायीं। पांडुरंगा कांहीं न कळे हें ।।तु.गा.१५५९.००२।।
पुराणींची ग्वाही वदतील संत। तैसें नाहीं चित्त शुद्ध झालें ।।तु.गा.१५५९.००३।।
तुका म्हणे मज आणुनि अनुभवा। दाखवीं हें देवा साच खरें ।।तु.गा.१५५९.००४।।

मन माझें चपळ न राहे निश्चळ। घडी एकी पळ स्थिर नाहीं।।तु.गा.१५६०.००१ ।।
आतां तूं उदास नव्हें नारायणा। धांवें मज दीना गांजियेलें।।तु.गा.१५६०.००२ ।।
धांव घालीं पुढें इंद्रियांचे ओढी। केलें तडातोडी चित्त माझें।।तु.गा.१५६०.००३ ।।
तुका म्हणे माझा नचले सायास। राहिलों हे आस धरुनी तुझी।।तु.गा.१५६०.००४ ।।
नित्य या मनासी करितों विचार। तों हें अनावर विषयलोभी।।तु.गा.१५६१.००१ ।।
आतां मज राखें आपुलियां बळें। न देखें हें जाळें उगवतां।।तु.गा.१५६१.००२ ।।
सांपडला गळीं नाहीं त्याची सत्ता। उगळी मागुता घेतला तो।।तु.गा.१५६१.००३ ।।
तुका म्हणे मी तों अज्ञानचि आहें। परि तुझी पाहें वास देवा।।तु.गा.१५६१.००४ ।।
तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणी। मस्तक चरणीं ठेवितसे।।तु.गा.१५६२.००१ ।।
भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसीदळ। जोडूनि अंजुळ उभा असे।।तु.गा.१५६२.००२ ।।
कैचें भाग्य ऐसें पाविजे संनिध। नेणें पाळूं विध करुणा भाकीं।।तु.गा.१५६२.००३ ।।
संतांचे शेवटीं उच्छिष्टाची आस। करूनियां वास पाहातसें।।तु.गा.१५६२.००४ ।।
करीं इच्छा मज म्हणोत आपुलें। एखादिया बोलें निमित्याच्या।।तु.गा.१५६२.००५ ।।
तुका म्हणे शरण आलों हें साधन। करितों चिंतन रात्रंदिवस।।तु.गा.१५६२.००६ ।।
वारंवार तुज द्यावया आठव। आइक तो भाव माझा कैसा।।तु.गा.१५६३.००१ ।।
गेला मग नये फिरोन दिवस। पुढिलांची आस गणित नाहीं।।तु.गा.१५६३.००२ ।।
गुणांअवगुणांचे पडती आघात। तेणें होय चित्त कासावीस।।तु.गा.१५६३.००३ ।।
कांहीं एक तुझा न देखों आधार। म्हणऊनि धीर नाहीं जीवा।।तु.गा.१५६३.००४ ।।
तुका म्हणे तूं या ब्रह्मांडाचा जीव। तरि कां आम्ही कींव भाकीतसों।।तु.गा.१५६३.००५ ।।
माझे मज कळों येती अवगुण। काय करूं मन अनावर।।तु.गा.१५६४.००१ ।।
आतां आड उभा राहें नारायणा। दयासिंधुपणा साच करीं।।तु.गा.१५६४.००२ ।।
वाचा वदे परी करणें कठिण। इंद्रियां अधीन जालों देवा।।तु.गा.१५६४.००३ ।।
तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास। न धरीं उदास मायबापा।।तु.गा.१५६४.००४ ।।

काय पुण्य ऐसें आहे मजपाशीं। तांतडी धांवसी पांडुरंगा।।तु.गा.१५६५.००१ ।।
काय ऐसा भक्त वायां गेलों थोर। तूं मज समोर होसी वेगा।।तु.गा.१५६५.००२ ।।
काय कष्ट माझी देखिली चाकरी। तो तूं झडकरी पाचारिसी।।तु.गा.१५६५.००३ ।।
कोण मी नांवाचा थोर गेलों मोठा। अपराधी करंटा नारायणा।।तु.गा.१५६५.००४ ।।
तुका म्हणे नाहीं ठाऊकें संचित। येणें जन्में हित नाहीं केलें।।तु.गा.१५६५.००५ ।।
जन्मांतरीं शुद्ध नाहीं आचरण। यालागीं चरण अंतरले।।तु.गा.१५६६.००१ ।।
वोढवले संचित येणें जन्में पाहतां। आतां पंढरिनाथा कृपा करी।।तु.गा.१५६६.००२ ।।
पतितपावन ब्रीद साच करी देवा। यालागीं कुढावा करी माझा।।तु.गा.१५६६.००३ ।।
अपराधी पातकी दुष्ट दुराचारी। आहाळलों भारी संवसारें।।तु.गा.१५६६.००४ ।।
कामक्रोध आधि कल्पनेच्या त्रासें। तुज न पवे ऐसें झालें देवा।।तु.गा.१५६६.००५ ।।
हा ना तोसा ठाव झाला पांडुरंगा। नयेचि उपेगा काय करूं ।।तु.गा.१५६६.००६ ।।
आपुलिया नांवा धांवणिया धांवे। लवकरी यावें तुका म्हणे।।तु.गा.१५६६.००७ ।।
कनवाळू कृपाळू भक्तालागीं मोही। गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई।।तु.गा.१५६७.००१ ।।
पांडुरंगे ये वो पांडुरंगे। जीवाचे जीवलगे ये वो पांडुरंगे।।तु.गा.१५६७.००२ ।।
भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठलें। आंबऋषीकारणें जन्म दाहा घेतलें।।तु.गा.१५६७.००३ ।।
प्रह्लादाकारणें स्तंभीं अवतार केला। विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला।।तु.गा.१५६७.००४ ।।
उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं। पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं।।तु.गा.१५६७.००५ ।।
कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली। वस्त्रहरणीं वस्त्र कैसी जाली माउली।।तु.गा.१५६७.००६ ।।
दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं। धांवसी लवलाहीं शाखादेठ घेऊनि।।तु.गा.१५६७.००७ ।।
कृपाळू माउली भुक्तिमुक्तिभांडार। करीं माझा अंगीकार तुका म्हणे विठ्ठले।।तु.गा.१५६७.००८ ।।
तुजकरितां होते आनाचें आन। तारिले पाषाण उदकीं देवा।।तु.गा.१५६८.००१ ।।
कां नये कैवार करूं अंगीकार। माझा बहु भार जड जाला।।तु.गा.१५६८.००२ ।।
चुकलासी म्हणों तरी जीवांचाही जीव। रिता नाहीं ठाव उरों दिला।।तु.गा.१५६८.००३ ।।

तुका म्हणे ऐसें काय सत्ताबळ। माझें परी कृपाळ आहां तुम्ही।।तु.गा.१५६८.००४।।
येईं वो येईं वो येईं धांवोनियां। विलंब कां वायां लावियला कृपाळे।।तु.गा.१५६९.००१।।
विठाबाई विश्वंभरे भवच्छेदके । कोठें गुंतलीस माये विश्वव्यापके ।।तु.गा.१५६९.००२।।
न करीं न करीं आतां आळस अव्हेरु। व्हावया प्रगट कैंचें दूरी अंतरु।।तु.गा.१५६९.००३।।
नेघें नेघें नेघें माझी वाचा विसांवा। तुका म्हणे हांवा हांवा हांवा साधावा।।तु.गा.१५६९.००४।।
संताचा उपदेश आमुचे मस्तकीं। नाहीं मृत्युलोकीं राहाणेसा।।तु.गा.१५७०.००१।।
म्हणऊनि बहु तळमळी चित्त। येईं वो धांवत पांडुरंगे।।तु.गा.१५७०.००२।।
उपजली चिंता लागला उशीर। होत नाहीं धीर निढळ वाटे।।तु.गा.१५७०.००३।।
तुका म्हणे पोटीं रिघालेंसे भय। करूं आतां काय ऐसें जालें।।तु.गा.१५७०.००४।।
मायें मोकलिलें कोठें जावें बाळें। आपुलिया बळें न वांचे तें।।तु.गा.१५७१.००१।।
रुसोनियां पळे सांडुनियां ताट। मागें पाहे वाट यावी ऐसी।।तु.गा.१५७१.००२।।
भांडवल आम्हां आळी करावी हे। आपणचि धाये धांवशील।।तु.गा.१५७१.००३।।
तुका म्हणे आळी करूनियां निकी। देसील भातुकीं बुझाऊनि।।तु.गा.१५७१.००४।।
क्षणक्षणां जीवा वाटतसे खंती। आठवती चित्तीं पाय देवा।।तु.गा.१५७२.००१।।
येईं वो येईं वो येईं लवलाही। आलिंगूनि बाहीं क्षेम देईं।।तु.गा.१५७२.००२।।
उताविळ मन पंथ अवलोकी। आठवे ते चुकी काय जाली।।तु.गा.१५७२.००३।।
तुका म्हणे माझ्या जीवींच्या जीवना। घाला नारायणा उडी वेगीं।।तु.गा.१५७२.००४।।
धरुनियां सोई परतलें मन। अनुलक्षीं चरण करूनियां।।तु.गा.१५७३.००१।।
येईं पांडुरंगे नेईं सांभाळूनी। करुणावचनीं आळवितों।।तु.गा.१५७३.००२।।
बुद्धि जाली साह्य परि नाहीं बळ। अवलोकितों जळ वाहे नेत्रीं।।तु.गा.१५७३.००३।।
न चलती पाय गळित जाली काया। म्हणऊनि दया येऊं द्यावी।।तु.गा.१५७३.००४।।
दिशेच्या करितों वारियासीं मात। जोडुनियां हात वाट पाहे।।तु.गा.१५७३.००५।।
तुका म्हणे वेग करावा सत्वर। पावावया तीर भवनदीचें।।तु.गा.१५७३.००६।।

उदार तूं हरी। ऐसी कीर्ति चराचरीं। अनंत हे थोरी। गर्जताती पवाडे।।तु.गा.१५७४.००१।।
तुझे पायीं माझा भाव। पुसी जन्ममरण ठाव। देवाचा तूं देव। स्वामी सकळां ब्रह्मांडा।।तु.गा.१५७४.००२।।
मागणें तें तुज मागों। जीवभाव तुज सांगों। लागों तरी लागों। पाया तुमच्या दातारा।।तु.गा.१५७४.००३।।
दिसों देसी कीविलवाणे। तरी तुजचि हें उणें। तुका म्हणे जिणें। माझें तुज अधीन।।तु.गा.१५७४.००४।।
धांव धांव गरुडध्वजा। आम्हां अनाथांच्या काजा।।तु.गा.१५७५.००१।।
बहु झालों कासावीस। म्हणोनि पाहें तुझी वास।।तु.गा.१५७५.००२।।
पाहें त्या मारगें। कोणी येतें माझ्या लागें।।तु.गा.१५७५.००३।।
असोनियां ऐसा। तुज सारिखा कोंवसा।।तु.गा.१५७५.००४।।
न लवा उशीर। नेणों कां हो केला धीर।।तु.गा.१५७५.००५।।
तुका म्हणे चाली। नको चालूं धांव घालीं।।तु.गा.१५७५.००६।।
स्वामित्वाचीं वर्मे असोनि जवळी। वाहों जावें मोळी गुणांसवें।।तु.गा.१५७६.००१।।
काबाडापासूनि सोडवा दातारा। कांहीं नका भारा पात्र करूं ।।तु.गा.१५७६.००२।।
धनवंत्र्याचिये अंगीं सत्ताबळ। व्याधि ते सकळ तोडावया।।तु.गा.१५७६.००३।।
तुका म्हणे आलें मोड्यासी कोंपट। सांडोव्याची वाट विसरावी।।तु.गा.१५७६.००४।।
सुकलिया कोंभा अत्यंत जळधरें। तेणेंचि प्रकारें न्याय असे।।तु.गा.१५७७.००१।।
न चले पाउलीं सांडीं गरुडासन। मनाचें हो मन त्वरेलागीं।।तु.गा.१५७७.००२।।
तुका म्हणे भूक न साहावे बाळा। जीवनाची कळा ओढलीसे।।तु.गा.१५७७.००३।।
आरुषा वचनीं मातेची आवडी। म्हणऊनि तांतडी घेत नाहीं।।तु.गा.१५७८.००१।।
काय होईल माझें मांडिलें कवतुक। आदराची भूक रडारोवी।।तु.गा.१५७८.००२।।
लपोनियां करी चुकुर माउली। नाहीं होत केली निष्ठा सांडी।।तु.गा.१५७८.००३।।
तुका म्हणे करी पारखीं वचनें। भेवउनि तान्हें आळवावें।।तु.गा.१५७८.००४।।
बाप करी जोडी लेंकराचे ओढी। आपुली करवंडी वाळवूनी।।तु.गा.१५७९.००१।।
एकाएकीं केला मिरासींचा धनी। कडिये वागवूनी भार खांदीं।।तु.गा.१५७९.००२।।

घालूनियां पाहे डोळा अळंकार। ठेवा दावी थोर करूनियां ।।तु.गा.१५७९.००३ ।।
तुका म्हणे नेदी गांजूं आणिकांसी। उदार जीवासी आपुलियां ।।तु.गा.१५७९.००४ ।।
असोनि न कीजे अलिप्त अहंकारें। उगीच या भारें कुंथाकुंथी ।।तु.गा.१५८०.००१ ।।
धांवा सोडवणें वेगीं लवकरी। मी तो जालों हरी शक्तिहीन ।।तु.गा.१५८०.००२ ।।
भ्रमल्यानें दिसें बांधल्याचेपरी। माझें मजवरी वाहोनियां ।।तु.गा.१५८०.००३ ।।
तुका म्हणे धांव घेतलीसे सोई। आतां पुढें येईं लवकरी ।।तु.गा.१५८०.००४ ।।
मायबापापुढें लाडिके लेकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ।।तु.गा.१५८१.००१ ।।
कृपावंता घाली प्रेमपान्हारस। वोळवी वोरस पांडुरंगे ।।तु.गा.१५८१.००२ ।।
नाहीं धीर खुंटीं जवळी हुंबरे। ठायींच पाखरे कवळतें ।।तु.गा.१५८१.००३ ।।
तुका म्हणे मज होऊं नेदी सीण। कळों नेदी भिन्न आहे तैसें ।।तु.गा.१५८१.००४ ।।
कृपावंता दुजें नाहीं तुम्हां पोटीं। लाडें बोलें गोठी सुख मातें ।।तु.गा.१५८२.००१ ।।
घेउनि भातुकें लागसील पाठी। लाविसील ओठीं ब्रह्मरस ।।तु.गा.१५८२.००२ ।।
आपुलिया पांखें घालिसी पाखर। उदार मजवर कृपाळू तूं ।।तु.गा.१५८२.००३ ।।
तुका म्हणे आम्हांकारणें गोविंदा। वागविसी गदा सुदर्शन ।।तु.गा.१५८२.००४ ।।
आतां नये बोलों अव्हेराची मात। बाळावरि चित्त असों द्यावें ।।तु.गा.१५८३.००१ ।।
तुज कां सांगणें लागे हा प्रकार। परि हें उत्तर आवडीचें ।।तु.गा.१५८३.००२ ।।
न वंची वो कांहीं एकही प्रकार। आपणां अंतर नका मज ।।तु.गा.१५८३.००३ ।।
तुका म्हणे मोहो राखावा सतत। नये पाहों अंत पांडुरंगा ।।तु.गा.१५८३.००४ ।।
मायबापापुढें लेंकराची आळी। आणीक हे पाळी कोण लळे ।।तु.गा.१५८४.००१ ।।
सांभाळा जी माझीं विषमें अनंता। जवळी असतां अव्हेरू कां ।।तु.गा.१५८४.००२ ।।
आणिकांची चाले सत्ता आम्हावरी। तुमची ते थोरी काय मग ।।तु.गा.१५८४.००३ ।।
तुका म्हणे आलों दुरोनि जवळी। आतां टाळाटाळी करूं नये ।।तु.गा.१५८४.००४ ।।
तुझा विसर नको माझिया हो जीवा। क्षण एक केशवा मायबापा ।।तु.गा.१५८५.००१ ।।

जावो राहो देह आतां येचि घडी। कायसी आवडी याची मज।।तु.गा.१५८५.००२।।
कुश्चीळ इंद्रियें आपुलिया गुणें। यांचिया पाळणें कोण हित।।तु.गा.१५८५.००३।।
पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं। यांचा कोण धरी संग आतां।।तु.गा.१५८५.००४।।
पिंड हा उसना आणिला पांचाचा। सेखीं लागे ज्याचा त्यासी देणें।।तु.गा.१५८५.००५।।
तुका म्हणे नाहीं आणिक सोइरें। तुजविण दुसरें पांडुरंगा।।तु.गा.१५८५.००६।।
कृपावंता कोप न धरावा चित्तीं। छळूं वक्रोक्ति स्तुती करूं ।।तु.गा.१५८६.००१।।
आम्हीं तुझा पार काय जाणों देवा। नेणों कैसी सेवा करावी ते।।तु.गा.१५८६.००२।।
अनंता अरूपा अलक्षा अच्युता। निर्गुणा सच्चिता सर्वोत्तमा।।तु.गा.१५८६.००३।।
चांगलीं हीं नामें घेतली ठेवून। जालासी लाहान भक्तिकाजा।।तु.गा.१५८६.००४।।
तुका म्हणे तुझ्या पायांवरी सदा। मस्तक गोविंदा असो माझा।।तु.गा.१५८६.००५।।
आम्हीं जाणावें तें काई। तुझें वर्म कोणे ठायीं। अंतपार नाहीं। ऐसें श्रुति बोलती।।तु.गा.१५८७.००१।।
होई मज तैसा मज तैसा। साना सुकुमार हृषीकेशा। पुरवी माझी आशा। भुजा चारी दाखवीं।।तु.गा.१५८७.००२।।
खालता सप्तही पाताळा। वरता स्वर्गाहूनि ढिसाळा। तो मी मशक डोळां। कैसा पाहों आपुल्या।।तु.गा.१५८७.००३।।
मज असें हा भरंवसा। पढीयें होसी तयां तैसा। पंढरीनिवासा। तुका म्हणे गा विठोबा।।तु.गा.१५८७.००४।।
तुम्हां आम्हां जंव जालिया समान। तेथें कोणां कोण सनमानी।।तु.गा.१५८८.००१।।
उरी तों राहिलें गोमटें गौरव। ओढे माझा जीव पायांपाशीं।।तु.गा.१५८८.००२।।
नेणपणें आम्ही आळवूं वोरसें। बोलवितों रसें शब्दरत्नें।।तु.गा.१५८८.००३।।
तुका म्हणे लळे पाळीं वो विठ्ठले। कां हे उरविले भेदाभेद।।तु.गा.१५८८.००४।।
तुज घालोनियां पूजितों संपुटी। परि तुझ्या पोटीं चौदा भुवने।।तु.गा.१५८९.००१।।
तुज नाचूनि दाखवूं कौतुका। परी रूपरेखा नाहीं तुज।।तु.गा.१५८९.००२।।
तुजलागीं आम्हीं गात असों गीत। परी तूं अतीत शब्दाहूनि।।तु.गा.१५८९.००३।।
तुजलागीं आम्हीं घातियेल्या माळा। परि तूं वेगळा कर्तृत्वासी।।तु.गा.१५८९.००४।।
तुका म्हणे आतां होऊनि परमित। माझें कांहीं हित विचारावें।।तु.गा.१५८९.००५।।

कईं ऐसी दशा येईल माझ्या अंगा। चित्त पांडुरंगा झुरतसे ।।तु.गा.१५९०.००१ ।।
नाठवुनि देह पायांचें चिंतन। अवसान तें क्षण नाहीं मधीं ।।तु.गा.१५९०.००२ ।।
कईं ऐसा पात्र होईन लाभासी। नेणों हृषीकेशी तुष्टईल ।।तु.गा.१५९०.००३ ।।
तुका म्हणे धन्य मानीन संचित। घेईन तें नित्य प्रेमसुख ।।तु.गा.१५९०.००४ ।।
कां जी आम्हां होतें दोषाचें दर्शन। तुज समर्पून देहभाव ।।तु.गा.१५९१.००१ ।।
पांडुरंगा कृपाळुवा दयावंता। धरशील सत्ता सकळही ।।तु.गा.१५९१.००२ ।।
कां जी आम्हांवरि आणिकांची सत्ता। तुम्हांसी असतां जवळिकें ।।तु.गा.१५९१.००३ ।।
तुका म्हणे पायीं केलें निवेदन। उचित तें दान करीं सत्ता ।।तु.गा.१५९१.००४ ।।
निश्चिंतीने होतों करूनियां सेवा। कां जी मन देवा उद्वेगिलें ।।तु.गा.१५९२.००१ ।।
अनंत उठती चित्ताचे तरंग। करावा हा त्याग वाटतसे ।।तु.गा.१५९२.००२ ।।
कोण तुम्हांविण मनाचा चाळक । दुजें सांगा एक नारायणा ।।तु.गा.१५९२.००३ ।।
तुका म्हणे माझा मांडिला विनोद। करवूं नेणें छंद कराल काई ।।तु.गा.१५९२.००४ ।।
मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना। उत्तर वचना देईं माझ्या ।।तु.गा.१५९३.००१ ।।
तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य। तूं माझें प्राचीन पांडुरंगा ।।तु.गा.१५९३.००२ ।।
तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म। तूंचि नित्यनेम नारायणा ।।तु.गा.१५९३.००३ ।।
कृपावचनाची वास पाहातसें। करुणा वोरसें बोला कांहीं ।।तु.गा.१५९३.००४ ।।
तुका म्हणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा। बोला सर्वोत्तमा मजसवें ।।तु.गा.१५९३.००५ ।।
पेणावलें ढोर मार खाय पाठी। बैसलें तें नुठी तेथूनियां ।।तु.गा.१५९४.००१ ।।
तैसी माझ्या मना परी झाली देवा। धांवें अहंभावा सांडवलों ।।तु.गा.१५९४.००२ ।।
कडां घालीं उडी मागिलांच्या भेणें। पडणें मरणें न कळेचि ।।तु.गा.१५९४.००३ ।।
तुका म्हणे झालों त्यापरी दु:खित। असें बोलावीत पांडुरंगा ।।तु.गा.१५९४.००४ ।।
कोठें गुंतलासी कोणाच्या धांवया। आली देवराया निद्रा तुज ।।तु.गा.१५९५.००१ ।।
कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें। न सुटती मुखें गोपिकांचीं ।।तु.गा.१५९५.००२ ।।

काय पडिलें तुज कोणाचें संकट। दुरी पंथ वाट न चलवे ।।तु.गा.१५९५.००३ ।।
काय माझें तुज गुणदोष दिसती। म्हणोनि श्रीपती कोपलासी ।।तु.गा.१५९५.००४ ।।
काय जालें सांग माझिया कपाळा। उरला जीव डोळां तुका म्हणे ।।तु.गा.१५९५.००५ ।।
विठ्ठला रे तूं उदारांचा राव। विठ्ठला तूं जीव जगाचा या ।।तु.गा.१५९६.००१ ।।
विठ्ठला रे तूं उदाराचा राशी। विठ्ठला तुजपाशीं सकळ सिद्धी ।।तु.गा.१५९६.००२ ।।
विठ्ठला रे तुझें नाम बहु गोड। विठ्ठला तूं कोड पुरविसी ।।तु.गा.१५९६.००३ ।।
विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें। विठ्ठला लागलें ध्यान मनीं ।।तु.गा.१५९६.००४ ।।
विठ्ठला रे वाचे बोला बहुरस। विठ्ठला रे सोस घेतला जीवें ।।तु.गा.१५९६.००५ ।।
विठ्ठला रे शोक करीतसे तुका। विठ्ठला तूं ये का झडकरी ।।तु.गा.१५९६.००६ ।।
लटिकेचि साच दाविलें अचळ। पीडीतसें काळ किती म्हूण ।।तु.गा.१५९७.००१ ।।
सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला। कां गा हा दाविला जगदाकार ।।तु.गा.१५९७.००२ ।।
सांभाळीं सांभाळीं आपुली हे माया। आम्हांसी कां भयाभीत केलें ।।तु.गा.१५९७.००३ ।।
रूप नाहीं त्यासी ठेवियलें नाम। लटिकाचि भ्रम वाढविला ।।तु.गा.१५९७.००४ ।।
तुका म्हणे कां गा झालासी चतुर। होतासी निसूर निर्विकार ।।तु.गा.१५९७.००५ ।।
पाहें मजकडे भरोनियां दृष्टी। बहुत हिंपुटी जालों माते ।।तु.गा.१५९८.००१ ।।
करावेंसें वाटे जीवा स्तनपान। नव्हे हें वचन शृंगारिक ।।तु.गा.१५९८.००२ ।।
सत्यासाठीं माझी शब्दविवंचना। जोडिल्या वचनाचें तें नव्हे ।।तु.गा.१५९८.००३ ।।
तुका म्हणे माझी कळवळ्याची कींव। भागलासे जीव कर्तव्यानें ।।तु.गा.१५९८.००४ ।।
काय करूं जीव होतो कासावीस। कोंडलिये दिसे गमेचिना ।।तु.गा.१५९९.००१ ।।
पडिलें हें दिसे ब्रह्मांडचि वोस। दाटोनि उच्छ्वास राहातसे ।।तु.गा.१५९९.००२ ।।
तुका म्हणे अगा सर्व जाणतिया। विश्वंभरे काया निववावी ।।तु.गा.१५९९.००३ ।।
जीव जायवरी सांडी करी माता। हें तों आश्चर्यता बाळकाची ।।तु.गा.१६००.००१ ।।
दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं। काय नारायणीं न्यून जालें ।।तु.गा.१६००.००२ ।।

क्षणक्षणा माझा नेघावा सांभाळ। अभाग्याचा काळ ऐसा आला।।तु.गा.१६००.००३।।
तुका म्हणे नाहीं वचनासी रुचि। फलकट वेंचि तें तें होय।।तु.गा.१६००.००४।।
तुज म्हणतील कृपेचा सागर। तरि कां केला धीर पांडुरंगा।।तु.गा.१६०१.००१।।
आझुनि कां नये तुज माझी दया। काय देवराया पाहातोसि।।तु.गा.१६०१.००२।।
आळवितों जैसें पाडस कुरंगिणी। पीडिलिया वनीं तहानभूकें ।।तु.गा.१६०१.००३।।
प्रेमरसपान्हा पाजीं माझें आई। धांवें वो विठाई वोरसोनि।।तु.गा.१६०१.००४।।
तुका म्हणे माझें कोण हरिल दु:ख। तुजविण एक पांडुरंगा।।तु.गा.१६०१.००५।।
पडियेलों वनीं थोर चिंतवनीं। उशीर कां अझूनि लावियेला।।तु.गा.१६०२.००१।।
येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला। प्राण हा फुटला आळवितां।।तु.गा.१६०२.००२।।
काय तुज नाहीं लौकिकाची शंका। आपुल्या बाळका मोकलितां।।तु.गा.१६०२.००३।।
तुका म्हणे बहु खंती वाटे जीवा। धरियेलें देवा दुरी दिसे।।तु.गा.१६०२.००४।।
तरी आम्ही तुझी धरियेली कास। नाहीं कोणी दास वायां गेला।।तु.गा.१६०३.००१।।
अगा पंढरीशा उभा विटेवरी। येईं लवकरी धांव नेटें।।तु.गा.१६०३.००२।।
पालवितों तुज उभारोनि बाहे। कृपावंता पाहें मजकडे।।तु.गा.१६०३.००३।।
तुका म्हणे तुज बहु कान डोळे। कां हें माझें वेळे ऐसी परी।।तु.गा.१६०३.००४।।
मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड। घेतां वाटे गोड नाम तुझें।।तु.गा.१६०४.००१।।
नेणतें लेकरूं आवडीचें तान्हें। बोलतों वचनें आवडीनें।।तु.गा.१६०४.००२।।
भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं। घातला विठाई भार तुज।।तु.गा.१६०४.००३।।
तुका म्हणे नाचें निर्लज्ज होऊनि। नाहीं माझे मनीं दुजा भाव।।तु.गा.१६०४.००४।।
आवडेल तैसें तुज आळवीन। वाटे समाधान जीवा तैसें।।तु.गा.१६०५.००१।।
नाहीं येथें कांहीं लौकिकाची चाड। तुजविण गोड देवराया।।तु.गा.१६०५.००२।।
पुरवीं मनोरथ अंतरींचें आर्त। धाये वरि गीत गाय तुझें।।तु.गा.१६०५.००३।।
तुका म्हणे लेकीं आळवी माहेरा। गाऊं या संसारा तुज तैसें।।तु.गा.१६०५.००४।।

माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ। गोविंद गोपाळ रामकृष्ण ।।तु.गा.१६०६.००१ ।।
अबद्ध चांगलें गाऊं भलतैसें। बाळ वदे जैसें मायबापा ।।तु.गा.१६०६.००२ ।।
तुका म्हणे मज न लावी वांकडें। मी तुझें बोबडें बाळ तान्हें ।।तु.गा.१६०६.००३ ।।
क्षुधार्थी दुष्काळें अन्नें पीडियेलें। मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ।।तु.गा.१६०७.००१ ।।
तैसें तुझें पायीं लांचावलें मन। झुरे माझा प्राण भेटावया ।।तु.गा.१६०७.००२ ।।
मांजरें देखिला लोणियाचा गोळा। लावूनियां डोळा बैसलेसें ।।तु.गा.१६०७.००३ ।।
तुका म्हणे आतां झडी घालूं पाहे। पांडुरंगे माये तुझे पायीं ।।तु.गा.१६०७.००४ ।।
जेणें माझें हित होईल तो उपाव। करिसील भाव जाणोनियां ।।तु.गा.१६०८.००१ ।।
मज नाहीं सुख दु:ख तया खंती। भावना हे चित्तीं नाना छंदें ।।तु.गा.१६०८.००२ ।।
तोडीं हे संबंध तोडीं आशापाश। मज हो सायास न करितां ।।तु.गा.१६०८.००३ ।।
तुका म्हणे मी तों राहिलों निश्चिंत। कवळोनि एकांतसुख तुझें ।।तु.गा.१६०८.००४ ।।
जे जे कांहीं मज होईल वासना। ते ते नारायणा व्हावें तुम्हीं ।।तु.गा.१६०९.००१ ।।
काय भाव एक निवडूं निराळा। जाणसी तूं कळा अंतरींची ।।तु.गा.१६०९.००२ ।।
तुजविण मज कोण आहे सखा। जें सांगों आणिकां जीवभाव ।।तु.गा.१६०९.००३ ।।
अवघें पिशुन झालें असे जन। आपपर कोण नाठवें हें ।।तु.गा.१६०९.००४ ।।
तुका म्हणे तूंचि जीवांचें जीवन। माझें समाधान तुझें हातीं ।।तु.गा.१६०९.००५ ।।
तुझा म्हणवूनि दिसतों गा दीन। हाचि अभिमान सरे तुझा ।।तु.गा.१६१०.००१ ।।
अज्ञान बाळका कोपली जननी। तयासी निर्वाणीं कोण पावे ।।तु.गा.१६१०.००२ ।।
तैसे विठो तुजविण परदेशी। नको या दु:खासी गोवूं मज ।।तु.गा.१६१०.००३ ।।
तुका म्हणे मज सर्व तुझी आशा। अगा जगदीशा पांडुरंगा ।।तु.गा.१६१०.००४ ।।
आतां माझ्या दु:खा कोण हो सांगाती। रखुमाईचा पति पावेचि ना ।।तु.गा.१६११.००१ ।।
काय विधात्यानें घातलीसे रेखा। सुटका या दु:खा न होयचि ।।तु.गा.१६११.००२ ।।
तुका म्हणे माझी विसरूं नको चिंता। अगा पंढरिनाथा पाव वेगीं ।।तु.गा.१६११.००३ ।।

पावलों हा देह कागटाळी न्यायें। न घडे उपायें घडों आलें।।तु.गा.१६१२.००१।।
आतां माझीं खंडीं देह देहांतरें। अभय दातारें देऊनियां।।तु.गा.१६१२.००२।।
अंधळ्याचे पायीं धनाची चरवी। अघटित तेंवी घडों आलें।।तु.गा.१६१२.००३।।
तुका म्हणे योग घडला बरवा। आतां कास देवा न सोडीं मी।।तु.गा.१६१२.००४।।
कां गा कोणी न म्हणे पंढरीची आई। बोलाविते पाहीं चाल नेटें।।तु.गा.१६१३.००१।।
तेव्हां माझ्या मना होय समाधान। जाय सर्व सीण जन्मांतरिंचा।।तु.गा.१६१३.००२।।
तुका म्हणे माझी होईल माउली। वोरसोनि घाली प्रेमपान्हा।।तु.गा.१६१३.००३।।
संतांचा पढियावो कैशापरि लाहो। नामाचा आठवो कैसा राहे।।तु.गा.१६१४.००१।।
हेचि थोर चिंता लागली मानसीं। निजतां निद्रेसी नलगे डोळा।।तु.गा.१६१४.००२।।
जेवितां जेवणीं नलगे गोड धड। वाटतें काबाड विषयसुख।।तु.गा.१६१४.००३।।
ऐसिया संकटीं पावें कृपानिधि। लावीं संतपदीं प्रेमभावें।।तु.गा.१६१४.००४।।
तुका म्हणे आम्ही नेणों कांहीं हित। तुजविण अनाथ पांडुरंगा।।तु.गा.१६१४.००५।।
आतां हे शेवटीं असो पायांवरी। वदती वैखरी वाग्पुष्पें।।तु.गा.१६१५.००१।।
नुपेक्षावें आम्हां दीनां पांडुरंगा। कृपादानी जगामाजी तुम्हीं।।तु.गा.१६१५.००२।।
बोळवूनि देह सांडियेली शुद्ध। तोडियेले भेद जीवशिव।।तु.गा.१६१५.००३।।
तुका म्हणे मन तुमचें चरणीं। एवढी आयणी पुरवावीं।।तु.गा.१६१५.००४।।
स्वमुखेंचि तुम्हीं सांगा मज सेवा। ऐसे माझें देवा मनोरथ।।तु.गा.१६१६.००१।।
नेघों आम्ही कांहीं आपल्या उदारें। चित्तवित्त घरें जीवावरी।।तु.गा.१६१६.००२।।
बोलें परस्पर वाढवावें सुख। पाहावें श्रीमुख डोळेभरी।।तु.गा.१६१६.००३।।
तुका म्हणे सत्य बोलतों वचन। करुनी चरण साक्ष तुझें।।तु.गा.१६१६.००४।।
काय तुज कैसें जाणावेगा देवा। आणावें अनुभवा कैसा परी।।तु.गा.१६१७.००१।।
सगुण निर्गुण स्थूळ कीं लहान। न कळे अनुमान मज तुझें।।तु.गा.१६१७.००२।।
कोण तो निर्धार करूं हा विचार। भवसिंधु पार तरावया।।तु.गा.१६१७.००३।।

तुका म्हणे कैसें पाय आतुडती। न पडे श्रीपती वर्म ठावें।।तु.गा.१६१७.००४।।
माझ्या इंद्रियांसी लागलें भांडण। म्हणतील कान रसना धाली।।तु.गा.१६१८.००१।।
करिती तळमळ हस्त पाद भाळ। नेत्रांसी दुकाळ पडिला थोर।।तु.गा.१६१८.००२।।
गुण गाय मुख आइकती कान। आमचें कारण तैसें नव्हे।।तु.गा.१६१८.००३।।
दरुषणें फिटे नेत्रांचा तो पांग। जेथें ज्याचा भाग घेतील तें।।तु.गा.१६१८.००४।।
तुका म्हणे ऐसें करीं नारायणा। माझी ही वासना ऐसी आहे।।तु.गा.१६१८.००५।।
व्हावया भिकारी हेंचि आम्हां कारण। अंतरोनि जन जावें दुरी।।तु.गा.१६१९.००१।।
संबंध तुटावा शब्दाचाही स्पर्श। म्हणउनि आस मोकलिली।।तु.गा.१६१९.००२।।
तुका म्हणे दुःखें उबगला जीव। म्हणउनी कींव भाकीं देवा।।तु.गा.१६१९.००३।।
थोडे तुम्हीं मागें होते उद्धरिले। मज ऐसे गेले वायां जीव।।तु.गा.१६२०.००१।।
आतां याचा कांहीं न मनावा भार। कृपेचा सागर आहेसी तूं।।तु.गा.१६२०.००२।।
तुज आळवितां पापाची वसति। राहे अंगीं किती बळ त्याचें।।तु.गा.१६२०.००३।।
तुका म्हणे जैसे तारिले दगड। तैसा मीही जड एक देवा।।तु.गा.१६२०.००४।।
कोठें आम्ही आतां वेंचावी हे वाणी। कोण मना आणी जाणोनियां।।तु.गा.१६२१.००१।।
न करावी सांडी आतां टाळाटाळी। दैन हे कळी होईल माझी।।तु.गा.१६२१.००२।।
घरोघरीं झाल्या ज्ञानाचिया गोष्टी। सत्यासवें गांठी न पडावी।।तु.गा.१६२१.००३।।
तुका म्हणे आम्हां भाकितां करुणा। भलताचि शाहाणा शोध काढी।।तु.गा.१६२१.००४।।
अनंता जीवांचीं तोडिलीं बंधनें। मज काळें येणें कृपा कीजे।।तु.गा.१६२२.००१।।
अनंत पवाडे तुझे विश्वंभरा। भक्तकरुणाकरा नारायणा।।तु.गा.१६२२.००२।।
अंतरींचें कळों देईं गुह्य गुज। अंतरींचें बीज राखेन मी।।तु.गा.१६२२.००३।।
समदृष्टी तुझीं पाहीन पाउलें। धरीन संचले हृदयांत।।तु.गा.१६२२.००४।।
तेणें या चित्ताची राहील तळमळ। होतील शीतळ सकळ गात्रें।।तु.गा.१६२२.००५।।
तुका म्हणे शांति करील प्रवेश। मग नव्हे नाश अखंड तो।।तु.गा.१६२२.००६।।

कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें। पायांचिया बळें कंठीतसे।।तु.गा.१६२३.००१।।
पाहातसें वाट येईं गा विठ्ठला। मज कां हा केला परदेश।।तु.गा.१६२३.००२।।
बहुतांचे सत्तें झालों कासावीस। जाय रात्रंदिवस वैरियांचा।।तु.गा.१६२३.००३।।
तुका म्हणे बैसें मनाचिये मुळीं। तरीच हीं जाळीं उगवतीं।।तु.गा.१६२३.००४।।
कईं तो दिवस देखेन मी डोळा। कल्याण मंगळामंगळाचें।।तु.गा.१६२४.००१।।
आयुष्या शेवटीं पायांसवें भेटी। काळवेळ तुटी झाल्या तरें।।तु.गा.१६२४.००२।।
सरो हें संचित पदरींचा गोवा। उताविळ देवा मन झालें।।तु.गा.१६२४.००३।।
पाउलापाउलीं करितां विचार। अनंत विकार चित्ता अंगीं।।तु.गा.१६२४.००४।।
म्हणउनि भयाभीत होतो जीव। भाकितसे कींव अट्टाहासें।।तु.गा.१६२४.००५।।
दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय। पाहणें तो काय अजून अंत।।तु.गा.१६२४.००६।।
तुका म्हणे होईल आइकिलें कानीं। तरि चक्रपाणी धांव घाला।।तु.गा.१६२४.००७।।
आइकावीं माझीं कवतुक उत्तरें। देऊनी सादरें चित्त देवा।।तु.गा.१६२५.००१।।
वोरसें आवडी आलों पायापाशीं। होय तें मनेंसीं सुख कीजे।।तु.गा.१६२५.००२।।
तुमचें न भंगे सर्वोत्तमपण। करितां समाधान लेंकराचे।।तु.गा.१६२५.००३।।
तुका म्हणे जरी बोलतों बोबडें। तरी लाडें कोडें कवतुकें।।तु.गा.१६२५.००४।।
आशाबद्ध आम्ही भाकितसों कींव। तत्पर हा जीव कार्यापाशीं।।तु.गा.१६२६.००१।।
प्रतिउत्तराची पाहातसें वाट। करूनि बोभाट महाद्वारीं।।तु.गा.१६२६.००२।।
आपुल्या उचितें करूनियां ठेवीं। संबंध गोसावी तोडोनियां।।तु.गा.१६२६.००३।।
तुका म्हणे एक झालिया निवाड। कोण बडबड करी मग।।तु.गा.१६२६.००४।।
तुझिया दासांचा हीन झालों दास। न धरीं उदास मायबापा।।तु.गा.१६२७.००१।।
तुजविण प्राण कैसा राहों पाहे। वियोग न साहे क्षणभरी।।तु.गा.१६२७.००२।।
आणिक माझ्या जीवें मोकलिली आस। पाहें तुझी वास पांडुरंगा।।तु.गा.१६२७.००३।।
सर्वभावें तुज आणिला उचित। राहिलों निश्चिंत तुझे पायीं।।तु.गा.१६२७.००४।।

तुका म्हणे तुज असे माझा भार। बोलतों मी फार काय जाणें।।तु.गा.१६२७.००५।।
कां हो पांडुरंगा न करा धांवणें। तरि मज कोणें सोडवावें।।तु.गा.१६२८.००१।।
तुझा म्हणऊनि आणिकापें उभा। राहों हे तों शोभा नेदी आतां।।तु.गा.१६२८.००२।।
काळें पुरविली पाठी दूरवर। पुढें पाय स्थिर राहों नेदी।।तु.गा.१६२८.००३।।
नको आणूं माझें संचित मनासी। पावन आहेसी पतिता तूं।।तु.गा.१६२८.००४।।
तुका म्हणे चाले आणिकांची सत्ता। तुज आळवितां नवल हें।।तु.गा.१६२८.००५।।
आतां पाहाशील काय माझा अंत। आलों शरणागत तुज देवा।।तु.गा.१६२९.००१।।
करीं अंगीकार राखें पायांपाशीं। झणी दिसों देसी कीविलवाणें।।तु.गा.१६२९.००२।।
नाहीं आइकिली मागें ऐसी मात। जें त्वां शरणांगत उपेक्षिले।।तु.गा.१६२९.००३।।
तुका म्हणे आतां धरीं अभिमान। आहेसी तूं दानशूर दाता।।तु.गा.१६२९.००४।।
सकळ तुझे पायीं मानिला विश्वास। न करीं उदास आतां मज।।तु.गा.१६३०.००१।।
वाचे गातां गोड आइकतां कानीं। पाहातां लोचनीं मूर्ती तुझी।।तु.गा.१६३०.००२।।
मन स्थिर माझें झालेंसे निश्चळ। वारिले सकळ आशापाश।।तु.गा.१६३०.००३।।
जन्मजराव्याधि निवारलें दुःख। वोसंडलें सुख प्रेमधारी।।तु.गा.१६३०.००४।।
तुका म्हणे मज झाला हा निर्धार। आतां वायां फार काय बोलों।।तु.गा.१६३०.००५।।
भागलों मी आतां आपुल्या स्वभावें। कृपा करोनि देवें आश्वासीजे।।तु.गा.१६३१.००१।।
देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें। अंगें हीं दातारें निववावीं।।तु.गा.१६३१.००२।।
अमृताची दृष्टी घालूनियां वरी। शीतळ हा करीं जीव माझा।।तु.गा.१६३१.००३।।
घेईं उचलूनि पुसें तहानभूक। पुसीं माझें मुख पीतांबरें।।तु.गा.१६३१.००४।।
बैसोनियां माझी धरीं हनुवटी। ओवाळूनी दिठीं करूनी सांडीं।।तु.गा.१६३१.००५।।
तुका म्हणे बाप्पा अहो विश्वंभरा। आतां कृपा करा ऐसी कांहीं।।तु.गा.१६३१.००६।।
पूर्वीहूनि बहु भक्त सांभाळिले। नाहीं अव्हेरिले दास कोणी।।तु.गा.१६३२.००१।।
जे जे शरण आले ते ते आपंगिले। पवाडे विठ्ठले ऐसें तुझें।।तु.गा.१६३२.००२।।

मिरवे चरणीं ब्रीद ऐसीये गोष्टीचें। भक्त सांभाळाचें प्रेम ऐसें।।तु.गा.१६३२.००३।।
तुका म्हणे आम्हांसाठीं येणें रूपा। माझ्या मायबापा पांडुरंगा।।तु.गा.१६३२.००४।।
येउनी जाउनी पाहें तुजकडे। पडिल्या सांकडे नारायणा।।तु.गा.१६३३.००१।।
आणीक कोणाचा मज नाहीं आधार। तुजवरी भार जीवें भावें।।तु.गा.१६३३.००२।।
निष्ठुर अथवा होईं तूं कृपाळ । तुज सर्वकाळ विसरेना।।तु.गा.१६३३.००३।।
आपुलें वचन राहें सांभाळून। तुम्हां आम्हां जाण पडिपाडु।।तु.गा.१६३३.००४।।
ज्याच्या वचनासी अंतर पडेल। बोल तो येईल तयाकडे।।तु.गा.१६३३.००५।।
तुम्हां आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका। होशील तूं सखा जीवलग।।तु.गा.१६३३.००६।।
तेव्हां धालें पोट बैसलों पंगतीं। आतां आम्हां मुक्तिपांग काई।।तु.गा.१६३४.००१।।
धांवा केला आतां येईल धांवोन। येथें काईं करणें लागे संदेह।।तु.गा.१६३४.००२।।
गायनाचा आतां कोठें उरला काळ। आनंद सकळ भरी आलें।।तु.गा.१६३४.००३।।
देवाच्या सख्यत्वें विषमासी ठाव। मध्यें कोठें वाव राहों शके ।।तु.गा.१६३४.००४।।
तेव्हां जाली अवघी बाधा वाताहात। प्रेम हृदयांत प्रवेशले।।तु.गा.१६३४.००५।।
तुका म्हणे आम्हीं जिंतिलें भरंवसा। देव कोठें दासां मोकलितो।।तु.गा.१६३४.००६।।
शरण आले त्यासी नेदावी जी पाठी। ऐका जगजेठी विज्ञापना।।तु.गा.१६३५.००१।।
आळवी तयासी उत्तर झडकरी। द्यावें परिसा हरी विज्ञापना।।तु.गा.१६३५.००२।।
गांजिलियाचें करावें धांवणें। विनंती नारायणें परिसावी हे।।तु.गा.१६३५.००३।।
भागलियाचा होईं रे विसावा। परिसावी केशवा विज्ञापना।।तु.गा.१६३५.००४।।
अंकिताचा भार वागवावा माथां। परिसावी अनंता विज्ञापना।।तु.गा.१६३५.००५।।
तुका म्हणे आम्हां विसरावें ना देवा। परिसावी केशवा विज्ञापना।।तु.गा.१६३५.००६।।
जीवनावांचूनी तळमळी मासा। प्रकार हा तैसा होतों जीवा।।तु.गा.१६३६.००१।।
न संपडे झालें भूमिगत धन। चरफडी मन तयापरी।।तु.गा.१६३६.००२।।
मातेचा वियोग झालिया हो बाळा। हा तो कळवळा जाणा देवा।।तु.गा.१६३६.००३।।

सांगावे ते किती तुम्हांसी प्रकार। सकळाचें सार पाय दावीं।।तु.गा.१६३६.००४।।
येचि चिंतें माझा करपला भीतर। कां नेणो विसर पडिला माझा।।तु.गा.१६३६.००५।।
तुका म्हणे तूं हें जाणसी सकळ। यावरी कृपाळ होईं देवा।।तु.गा.१६३६.००६।।
बाळ मातेपाशीं सांगे तहानभूक । उपायाचें दु:ख काय जाणे।।तु.गा.१६३७.००१।।
तयापरी करीं पाळण हें माझें। घेऊनियां ओझें सकळ भार।।तु.गा.१६३७.००२।।
कासया गुणदोष आणिसील मना। सर्व नारायणा अपराधी।।तु.गा.१६३७.००३।।
सेवाहीन दीन पातकांची रासी। आतां विचारिसी काय ऐसें।।तु.गा.१६३७.००४।।
जेणें काळें पायीं अनुसरले चित्त। निर्धार हें हित झालें ऐसें।।तु.गा.१६३७.००५।।
तुका म्हणे तुम्हीं तारिलें बहुतां। माझी कांहीं चिंता असो द्यावी।।तु.गा.१६३७.००६।।
मागें शरणागत तारिले बहुत। म्हणती दीनानाथ तुज देवा।।तु.गा.१६३८.००१।।
पाहिलें अपराध नाहीं याती कुळ। तारिला अजामेळ गणिका भिल्ली।।तु.गा.१६३८.००२।।
अढळपदीं बाळ बैसविला धुरु। क्षीराचा सागरु उपमन्या।।तु.गा.१६३८.००३।।
गजेंद्रपशु नाडिला जळचरें। भवसिंधुपार उतरिला।।तु.गा.१६३८.००४।।
प्रह्लाद अग्नींत राखिला जळांत। विषाचें अमृत तुझ्या नामें।।तु.गा.१६३८.००५।।
पांडवा संकट पडतां जडभारी। त्यांचा तूं कैवारी नारायणा।।तु.गा.१६३८.००६।।
तुका म्हणे तूं या अनाथाचा नाथ। ऐकोनियां मात शरण आलों।।तु.गा.१६३८.००७।।
ऐसा माझा कोण आहे भीडभार। नांवाचा मी फार वायां गेलों।।तु.गा.१६३९.००१।।
काय सेवा रुजू आहे सत्ताबळ। ते मज राऊळ कृपा करी।।तु.गा.१६३९.००२।।
काय याती शुद्ध आहे कुळ कर्म। तेणें पडे वर्म तुझे ठायीं।।तु.गा.१६३९.००३।।
कोण तपोनिधी दानधर्मशीळ। अंगीं एक बळ आहे सत्ता।।तु.गा.१६३९.००४।।
तुका म्हणे वायां झालों भूमीभार। होईल विचार काय नेणों।।तु.गा.१६३९.००५।।
साच मज काय कळों नये देवा। काय तुझी सेवा काय नव्हे।।तु.गा.१६४०.००१।।
करावें तें बरें जेणें समाधान। सेवावें हें वन न बोलावें।।तु.गा.१६४०.००२।।

शुद्ध माझा भाव होईल तुझे पायीं। तरीच हें देईं निवडूनी ।।तु.गा.१६४०.००३ ।।
उचित अनुचित कळों आली गोष्टी। तुझें कृपादृष्टी पांडुरंगा ।।तु.गा.१६४०.००४ ।।
तुका म्हणे मज पायांसवें चाड। सांगसी तें गोड आहे मज ।।तु.गा.१६४०.००५ ।।
करिसी कीं न करिसी माझा अंगीकार। हा मज विचार पडिला देवा ।।तु.गा.१६४१.००१ ।।
देसी कीं न देसी पायांचें दर्शन। म्हणऊनी मन स्थिर नाहीं ।।तु.गा.१६४१.००२ ।।
बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा। म्हणोनियां जीवा भय वाटे ।।तु.गा.१६४१.००३ ।।
होईल कीं न होय तुज माझा आठव। पडिला संदेह हाचि मज ।।तु.गा.१६४१.००४ ।।
तुका म्हणे मी तों कमाईचा हीण। म्हणऊनी सीण करीं देवा ।।तु.गा.१६४१.००५ ।।
तुझा शरणागत जालों मी अंकित। करीं माझें हित पांडुरंगा ।।तु.गा.१६४२.००१ ।।
पतितपावन तुझी ब्रीदावळी। ते आतां सांभाळी मायबापां ।।तु.गा.१६४२.००२ ।।
अनाथाचा नाथ बोलतील संत। ऐकोनियां मात विश्वासलों ।।तु.गा.१६४२.००३ ।।
न करावी निरास न धरावें उदास। देईं याचकास कृपादान ।।तु.गा.१६४२.००४ ।।
तुका म्हणे मी तों पातकांची रासी। देईं पायापासीं ठाव देवा ।।तु.गा.१६४२.००५ ।।
नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। मी भक्त तूं देव ऐसें करीं ।।तु.गा.१६४३.००१ ।।
दावी रूप मज गोपिकारमणा। ठेवीन चरणांवरी माथा ।।तु.गा.१६४३.००२ ।।
पाहोनी श्रीमुख देईन आलिंगन। जीवें निंबलोण उतरीन ।।तु.गा.१६४३.००३ ।।
पुसतां सांगेन हितगुज मात। बैसोनी एकांत सुखगोष्टी ।।तु.गा.१६४३.००४ ।।
तुका म्हणे यासी न लावीं उशीर। माझें अभ्यंतर जाणोनियां ।।तु.गा.१६४३.००५ ।।
तुझा दास ऐसें म्हणती लोकपाळ। म्हणऊनी सांभाळ करी माझा ।।तु.गा.१६४४.००१ ।।
अनाथाचा नाथ पतितपावन। हें आतां जतन करी नाम ।।तु.गा.१६४४.००२ ।।
माझें गुणदोष पाहातां न लगे अंत। ऐसें माझें चित्त मज ग्वाही ।।तु.गा.१६४४.००३ ।।
नेणों तुझी कैसी करावी हे सेवा। जाणसी तूं देवा अंतरीचें ।।तु.गा.१६४४.००४ ।।
तुका म्हणे तूं या कृपेचा सिंधु। तोडी भवबंधु माझा देवा ।।तु.गा.१६४४.००५ ।।

इतुलें करीं देवा ऐकें हें वचन। समूळ अभिमान जाळी माझा।।तु.गा.१६४५.००१।।
इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी। सर्व समदृष्टीं तुज देखें।।तु.गा.१६४५.००२।।
इतुलें करीं देवा विनवितों तुज। संतचरणरज वंदीं माथां।।तु.गा.१६४५.००३।।
इतुलें करीं देवा ऐकें हे मात। हृदयीं पंढरीनाथ दिवसरात्रीं।।तु.गा.१६४५.००४।।
भलतिया भावें तारी पंढरीनाथा। तुका म्हणे आतां शरण आलों।।तु.गा.१६४५.००५।।
कोण आम्हां पुसे सिणलें भागलें। तुजविण उगलें पांडुरंगा।।तु.गा.१६४६.००१।।
कोणापाशीं आम्हीं सांगावें सुखदुःख। कोण तहानभूक निवारील।।तु.गा.१६४६.००२।।
कोण या तापाचा करील परिहार। उतरील पार कोण दुजा।।तु.गा.१६४६.००३।।
कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील।।तु.गा.१६४६.००४।।
कोणावरी आम्हीं करावी हे सत्ता। होईल साहाता कोण दुजा।।तु.गा.१६४६.००५।।
तुका म्हणे अगा स्वामी सर्व जाणा। दंडवत चरणां तुमच्या देवा।।तु.गा.१६४६.००६।।
काय कीर्ति करूं लोक दंभ मान। दाखवी चरण तुझे मज।।तु.गा.१६४७.००१।।
मज आतां ऐसें नको करूं देवा। तुझा दास जावा वायांविण।।तु.गा.१६४७.००२।।
होईल थोरपणें जाणीवेचा भार। दुरावेन दूर तुझ्या पायीं।।तु.गा.१६४७.००३।।
अंतरींचा भाव काय कळे लोकां। एक मानी एका देखोवेखीं।।तु.गा.१६४७.००४।।
तुका म्हणे तुझे पाय आतुडती। त्या मज विपत्ति गोड देवा।।तु.गा.१६४७.००५।।
जाळा तुम्ही माझें जाणते मीपण। येणें माझा खून मांडियेला।।तु.गा.१६४८.००१।।
खादलें पचे तरिच तें हित। ओकलिया थीत पिंड पीडी।।तु.गा.१६४८.००२।।
तरि भलें भोगें जोडिलें तें धन। पडिलिया खाण जीवनासी।।तु.गा.१६४८.००३।।
तुका म्हणे मज तारीं गा विठ्ठला। नेणताचि भला दास तुझा।।तु.गा.१६४८.००४।।
वेदपुरुष तरि ''नेती'' कां वचन। निवडूनि भिन्न दाखविलें।।तु.गा.१६४९.००१।।
तुझी वर्मे तूंचि दावूनि अनंता। होतोसी नेणता कोण्या गुणें।।तु.गा.१६४९.००२।।
यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग। उणें पडतां अंग क्षोभ घडे।।तु.गा.१६४९.००३।।

तुका म्हणे बहु पाहिलें या जीवें। वर्म जालें ठावें नाम तुझें ।।तु.गा.१६५३.००६ ।।
आतां होईं माझें बुद्धिचा जनिता। आवरावें चित्ता पांडुरंगा ।।तु.गा.१६५४.००१ ।।
येथूनियां कोठें न वजें बाहेरी। ऐसें मज धरीं सत्ताबळें ।।तु.गा.१६५४.००२ ।।
अनावर गुण बहुतां जातींचे। न बोलावें वाचें ऐसें करीं ।।तु.गा.१६५४.००३ ।।
तुका म्हणे हित कोणिये जातीचें। तुज ठावें साचें मायबापा ।।तु.गा.१६५४.००४ ।।
पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची। आवडी सुखाची कोण तया ।।तु.गा.१६५५.००१ ।।
तैसें मज कां गा केलें पंढरीराया। लौकिक हा वायां वाढविला ।।तु.गा.१६५५.००२ ।।
ज्वरिलियापुढें वाढिली मिष्टान्नें। काय चवी तेणें घ्यावी त्यांची ।।तु.गा.१६५५.००३ ।।
तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी। तेचि जाली परी मज देवा ।।तु.गा.१६५५.००४ ।।
तळमळी चित्त दर्शनाची आशा। बहु जगदीशा करुणा केली ।।तु.गा.१६५६.००१ ।।
वचनींच संत पावले स्वरूप। माझें नेदी पाप योगा येऊं ।।तु.गा.१६५६.००२ ।।
वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव। न पवेचि जीव समाधान ।।तु.गा.१६५६.००३ ।।
तुका म्हणे कईं देसील विसांवा। पांडुरंगीं धांवा घेतें मन ।।तु.गा.१६५६.००४ ।।
दाटे कंठ लागे डोळियां पाझर। गुणाची अपार वृष्टि वरी ।।तु.गा.१६५७.००१ ।।
तेणें सुखें छंदें घेईन सोहळा। होऊनि निराळा पापपुण्यां ।।तु.गा.१६५७.००२ ।।
तुझ्या मोहें पडो मागील विसर। अलाप सुस्वर करिन कंठ ।।तु.गा.१६५७.००३ ।।
तुका म्हणे येथें पाहिजे सौरस। तुम्हांविण रस गोड नव्हे ।।तु.गा.१६५७.००४ ।।
कासया या लोभें केलें आर्तभूत। सांगा माझें चित्त नारायणा ।।तु.गा.१६५८.००१ ।।
चातकाचे परी एकचि निर्धार। लक्षभेदी तीर फिरों नेणे ।।तु.गा.१६५८.००२ ।।
सांवळें रूपडें चतुर्भुज मूर्ति। कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ।।तु.गा.१६५८.००३ ।।
तुका म्हणे करीं आवडीसी ठाव। नको माझा भाव भंगों देऊं ।।तु.गा.१६५८.००४ ।।
शृंगारिक माझीं नव्हतीं उत्तरें। आळवितों खरे अवस्थेच्या ।।तु.गा.१६५९.००१ ।।
न घलावा मधीं कामाचा विलंब। तुम्ही तों स्वयंभ करुणामूर्ति ।।तु.गा.१६५९.००२ ।।

प्राण हा विकळ होय कासावीस। जीवनाविण मत्स्य तयापरी ।।तु.गा.१६६४.००४।।
तुका म्हणे आतां कोणता उपाव। करूं तुझे पाव आतुडे तो ।।तु.गा.१६६४.००५।।
मागें बहुतां जनां राखिलें आडणी। धांवसी निर्वाणीं नाम घेतां ।।तु.गा.१६६५.००१।।
ऐसें ठावें झालें मज बरव्या परी। म्हणऊनि करीं धांवा तुझा ।।तु.गा.१६६५.००२।।
माझेविशीं तुज पडिला विसरू । आतां काय करुं पांडुरंगा ।।तु.गा.१६६५.००३।।
अझुनि कां नये तुम्हांसी करुणा। दुरि नारायणा धरिलें मज ।।तु.गा.१६६५.००४।।
तुका म्हणे जीव जाऊं पाहे माझा। आतां केशीराजा घाली उडी ।।तु.गा.१६६५.००५।।
एक वेळ करीं या दु:खावेगळें। दुरिताचें जाळें उगवूनि ।।तु.गा.१६६६.००१।।
आठवीन पाय हा माझा नवस। रात्रींही दिवस पांडुरंगा ।।तु.गा.१६६६.००२।।
बहु दूरवरी भोगविलें भोगा। आतां पांडुरंगा सोडवावें ।।तु.गा.१६६६.००३।।
तुका म्हणे काया करीन कुरवंडी। ओंवाळूनि सांडी मस्तक हें ।।तु.गा.१६६६.००४।।
आणीक म्यां कोणा यावें काकुलती। कोण कामा येती अंतकाळीं ।।तु.गा.१६६७.००१।।
तूं वो माझी सखी होसी पांडुरंगे। लवकरी ये गे वाट पाहें ।।तु.गा.१६६७.००२।।
काया वाचा मनें हेंचि आस करीं। पाउलें गोजिरीं चिंतीतसें ।।तु.गा.१६६७.००३।।
तुका म्हणे माझी पुरवी हे आस। घालीं ब्रह्मरस भोजन हें ।।तु.गा.१६६७.००४।।
कराल तें काय नव्हे जी विठ्ठला। चित्त द्यावें बोला बोबडिया ।।तु.गा.१६६८.००१।।
सोडवूनि न्यावें काळचक्राहातीं। बहुत विपत्ती भोगविल्या ।।तु.गा.१६६८.००२।।
ज्यालें जीवों नेदी मारिलेंचि मरे। प्रारब्ध तें उरे मागुतालें ।।तु.गा.१६६८.००३।।
तुका म्हणे दुजा खुंटला उपाय। म्हणवूनि पाय आठविले ।।तु.गा.१६६८.००४।।
तुमच्या पाळणा ओढतसे मन। गेलों विसरोन आपणासी ।।तु.गा.१६६९.००१।।
लागेल पालटे फेडावें उसणें। येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ।।तु.गा.१६६९.००२।।
तुमचे आवडी संबंधाचा त्याग। घेतलासे लाग जगनिंदा ।।तु.गा.१६६९.००३।।
तुका म्हणे जैसा माझा जीव ओढे। तैसेंचि तिकडे पाहिजेल ।।तु.गा.१६६९.००४।।

जन्म मृत्यु फार झाले माझ्या जीवा। ऐक माझा धांवा पांडुरंगा।।तु.गा.१६७०.००१।।
सिणलों बहुत करितां येरझारा। रखुमाईच्या वरा पावें वेगीं।।तु.गा.१६७०.००२।।
तुका म्हणे तूं गा पतितपावन। घेईं माझा शीण जन्मांतर।।तु.गा.१६७०.००३।।
प्रीति नाहीं राया वर्जिली ते कांता। परी तिची सत्ता जगावरी।।तु.गा.१६७१.००१।।
तैसे दंभें जालों तरी तुझें भक्त। वास यमदूत न पाहाती।।तु.गा.१६७१.००२।।
राजयाचा पुत्र अपराधी देखा। तो काय आणिकां दंडवेल।।तु.गा.१६७१.००३।।
बाहात्तर खोडी परी देवमण कंठीं। तैसा मी जगजेठी म्हणे तुका।।तु.गा.१६७१.००४।।
जैसी तैसी तरि वाणी। मना आणी माउली।।तु.गा.१६७२.००१।।
लेंकरांच्या स्नेहें गोड। करी कोड त्या गुणें।।तु.गा.१६७२.००२।।
मागें पुढें रिघे पोटीं। साहे खेटी करी तें।।तु.गा.१६७२.००३।।
तुका विनवी पांडुरंगा। ऐसें पैं गा आहे हें।।तु.गा.१६७२.००४।।
म्हणऊनि धरिले पाय। अवो माय विठ्ठले।।तु.गा.१६७३.००१।।
आपुलेंचि करूनि घ्यावें। आश्वासावें ''ना भी'' सें।।तु.गा.१६७३.००२।।
वाढली ते तळमळ चित्ता। शम आतां करावी।।तु.गा.१६७३.००३।।
तुका म्हणे जीवीं वसे। मज नसे वेगळा।।तु.गा.१६७३.००४।।
बाळ माते लातेवरी। मारी तेणें संतोषे।।तु.गा.१६७४.००१।।
सुख वसे चित्ता अंगीं। तें हें रंगीं मिळालें ।।तु.गा.१६७४.००२।।
भक्षी त्याचा जिवमाग। आला भाग तो बरा।।तु.गा.१६७४.००३।।
तुका म्हणे ऋणानुबंधें। सांगें सुधें सकळांसी।।तु.गा.१६७४.००४।।
पांडुरंगे पांडुरंगे। माझें गंगे माउलिये।।तु.गा.१६७५.००१।।
पान्हा घालीं प्रेमधारा। पूर क्षीरा लोटों दे।।तु.गा.१६७५.००२।।
अंगें अंग मेळउनी। करी धणी फेडावया।।तु.गा.१६७५.००३।।
तुका म्हणे घेईन उड्या। सांडिन कुड्या भावना।।तु.गा.१६७५.००४।।

जाणतें लेंकरूं । माता लागे दूर धरूं ।।तु.गा.१६७६.००१ ।।
तैसें न करीं कृपावंते। पांडुरंगे माझें माते।।तु.गा.१६७६.००२ ।।
नाहीं मुक्ताफळा। भेटी मागुती त्या जळा।।तु.गा.१६७६.००३ ।।
तुका म्हणे लोणी। ताक सांडी निवडूनी।।तु.गा.१६७६.००४ ।।
बाळाचें जीवन। माता जाणें भूक ताहान।।तु.गा.१६७७.००१ ।।
काय करूं विनवणी। असो मस्तक चरणीं।।तु.गा.१६७७.००२ ।।
ठेविलिये ठायीं । चित्त ठेवूनि असे पायीं।।तु.गा.१६७७.००३ ।।
करितों हे सेवा। चिंतन सर्वां ठायीं देवा।।तु.गा.१६७७.००४ ।।
न्यून तेंचि पुरें। घ्यावें करोनि दातारें।।तु.गा.१६७७.००५ ।।
तुका म्हणे बुद्धि। अल्प असे अपराधी।।तु.गा.१६७७.००६ ।।
बैसों पाठिमोरी। मना वाटे तैसें करीं।।तु.गा.१६७८.००१ ।।
परि तूं जाणसी आवडी। बाळा बहुतांची परवडी।।तु.गा.१६७८.००२ ।।
आपुलाल्या इच्छा। मागों जया व्हावें तैसा।।तु.गा.१६७८.००३ ।।
तुका म्हणे आई। नव्हसी उदास विठाई।।तु.गा.१६७८.००४ ।।
गंगा गेली सिंधुपाशीं। जरी तो ठाव नेदी तिशी।।तु.गा.१६७९.००१ ।।
तिणें जावें कवण्या ठाया। मज सांगा पंढरिराया।।तु.गा.१६७९.००२ ।।
जळ क्षोभलें जळचरां। माता बाळा नेदी थारा।।तु.गा.१६७९.००३ ।।
तुका म्हणे आलों शरण। देवा त्वां कां धरिलें मौन।।तु.गा.१६७९.००४ ।।
आळस आला अंगा। धांव घाली पांडुरंगा।।तु.गा.१६८०.००१ ।।
सोसूं शरीराचे भाव। पडती अवगुणांचे घाव।।तु.गा.१६८०.००२ ।।
करावीं व्यसनें। दुरी येउनि नारायणें।।तु.गा.१६८०.००३ ।।
जवळील दुरी। झालों देवा धरीं करीं।।तु.गा.१६८०.००४ ।।
म्हणउनि देवा। वेळोवेळां करी धांवा।।तु.गा.१६८०.००५ ।।

तुका म्हणे पांडुरंगा। दुरी धरूं नको अंगा।।तु.गा.१६८०.००६।।
आश्वासावे दास। तरी घडतो विश्वास।।तु.गा.१६८१.००१।।
नाहीं चुकत चाकरी। पुटें लाडेशाची थोरी।।तु.गा.१६८१.००२।।
स्वामीच्या उत्तरें। सुख वाटे अभयकरें।।तु.गा.१६८१.००३।।
न मगें परि भातें। तुका म्हणे निढळ रितें।।तु.गा.१६८१.००४।।
आतां पाविजेल घरा। या दातारा संगती।।तु.गा.१६८२.००१।।
पायावरि ठेवूनि माथा। सर्वथा हा नुपेक्षी।।तु.गा.१६८२.००२।।
येथून तेथवरि आतां। नाहीं सत्ता आणिकांची।।तु.गा.१६८२.००३।।
तुका म्हणे चक्रपाणी। शिरोमणी बळियांचा।।तु.गा.१६८२.००४।।
हेंचि वारंवार। पडताळुनी उत्तर।।तु.गा.१६८३.००१।।
करितों पायांसी विनंती। नुपेक्षावें कमळापती।।तु.गा.१६८३.००२।।
गंगोदक गंगें। अर्घ्य द्यावें पांडुरंगे।।तु.गा.१६८३.००३।।
जोडोनियां हात। तुका करी प्रणिपात।।तु.गा.१६८३.००४।।
आपण तों असा। समर्थ जी हृषीकेशा।।तु.गा.१६८४.००१।।
करा करा बुझावणी। काय विलंब वचनीं।।तु.गा.१६८४.००२।।
हें घे ऐसें म्हणा। उठूनि लागेन चरणा।।तु.गा.१६८४.००३।।
घेउनियां सुखें। नाचे तुका कवतुकें ।।तु.गा.१६८४.००४।।
तुझे दारींचा कुतरा। नको मोकलूं दातारा।।तु.गा.१६८५.००१।।
धरणें घेतलें द्वारांत। नको धरुनी उठवूं हात।।तु.गा.१६८५.००२।।
घातली मुरकुंड। झालों शिरोमणी लंड।।तु.गा.१६८५.००३।।
तुका म्हणे जगजीवना। ब्रीद पाहें नारायणा।।तु.गा.१६८५.००४।।
सांडियेली काया। वरी ओंवाळूनी पायां।।तु.गा.१६८६.००१।।
शरण शरण नारायणा। मज अंगीकारा दीना।।तु.गा.१६८६.००२।।

तुम्हांविण जगदिशा। उदार ठसा त्रिभुवनीं।।तु.गा.१६९२.००२।।
कोण ऐसें वारी पाप। हरी ताप जन्माचा।।तु.गा.१६९२.००३।।
तुका म्हणे धांव घाली। कोण चाली मनाची।।तु.गा.१६९२.००४।।
धांवा शीघ्रवत। किंवा घ्यावें दंडवत।।तु.गा.१६९३.००१।।
तुमचा जातो बडिवार। आम्ही होतों हीनवर।।तु.गा.१६९३.००२।।
न धरावा धीर। धांवा नका चालों स्थिर।।तु.गा.१६९३.००३।।
तुका म्हणे वाणी। माझी लाजली जी गुणीं।।तु.गा.१६९३.००४।।
न करीं उदास। माझी पुरवावी आस।।तु.गा.१६९४.००१।।
ऐका ऐका नारायणा। माझी परिसा विज्ञापना।।तु.गा.१६९४.००२।।
मायबाप बंधुजन। तूंचि सोयरा सज्जन।।तु.गा.१६९४.००३।।
तुका म्हणे तुजविरहित। कोण करिल माझें हित।।तु.गा.१६९४.००४।।
आतां काशासाठीं दुरी। अंतर उरी राखिली।।तु.गा.१६९५.००१।।
करीं लवकरी मूळा। लहान तळा मुळीचिया।।तु.गा.१६९५.००२।।
दोहीं ठायीं उद्वेगवाणें। दरुषणें निश्चिंती।।तु.गा.१६९५.००३।।
तुका म्हणे वेग व्हावा। ऐसी जीवा उत्कंठा।।तु.गा.१६९५.००४।।
उसंतिल्या कर्मवाटा। बहु मोठा आघात।।तु.गा.१६९६.००१।।
शीघ्र यावें शीघ्र यावें। हातीं न्यावें धरूनि।।तु.गा.१६९६.००२।।
भागलों या खटपटें। घटपटें करितां।।तु.गा.१६९६.००३।।
तुका म्हणे कृपावंता। माझी चिंता खंडावी।।तु.गा.१६९६.००४।।
आतां तळमळ। केली पाहिजे शीतळ।।तु.गा.१६९७.००१।।
पहा करील तें देव। पायीं ठेवूनियां भाव।।तु.गा.१६९७.००२।।
तोचि अन्नदाता। नाहीं आणिकांची सत्ता।।तु.गा.१६९७.००३।।
तुका म्हणे दासा। नुपेक्षील हा भरंवसा।।तु.गा.१६९७.००४।।

मज अनाथाकारणें। करीं येणें केशवा ।।तु.गा.१६९८.००१ ।।
जीव झुरे तुजसाठीं। वाट पोटीं पहातुसें ।।तु.गा.१६९८.००२ ।।
चित्त रंगलें चरणीं। तुजवांचूनि न राहे ।।तु.गा.१६९८.००३ ।।
तुका म्हणे कृपावंता। माझी चिंता असावी ।।तु.गा.१६९८.००४ ।।
जोडिलें अंजुळ। असें दाना उताविळ ।।तु.गा.१६९९.००१ ।।
पहा पहा कृपादृष्टी। आणा अनुभवा गोष्टी ।।तु.गा.१६९९.००२ ।।
तूं स्वामी मी सेवक। आइक्य ते एका एक ।।तु.गा.१६९९.००३ ।।
करितों विनंती। तुका सन्मुख पुढती ।।तु.गा.१६९९.००४ ।।
पदोपदीं पायां पडणें। करुणा जाण भाकावी ।।तु.गा.१७००.००१ ।।
ये गा ये गा विसांविया। करुणा दयासागरा ।।तु.गा.१७००.००२ ।।
जोडोनियां करकमळ। नेत्रीं जळ भरोनि ।।तु.गा.१७००.००३ ।।
तुका उभा दानपात्र। पुरवी आर्त विठोबा ।।तु.गा.१७००.००४ ।।
आम्ही उतराई। भाव निरोपोनि पायीं ।।तु.गा.१७०१.००१ ।।
तुम्ही पुरवावी आळी। करावी ते लडिवाळीं ।।तु.गा.१७०१.००२ ।।
आमचा हा नेम। तुम्हां उचित हा धर्म ।।तु.गा.१७०१.००३ ।।
तुका म्हणे देवा। जाणों सांगितली सेवा ।।तु.गा.१७०१.००४ ।।
आतां दुसरें नाहीं मनीं। निरंजनीं पडिलों ।।तु.गा.१७०२.००१ ।।
तुमचीच पाहें वास। अवघी आस निरसली ।।तु.गा.१७०२.००२ ।।
मागिलांचा मोडला माग। घडला त्याग अरुची ।।तु.गा.१७०२.००३ ।।
तुका म्हणे करुणाकरा। तूं सोयरा दीनांचा ।।तु.गा.१७०२.००४ ।।
आतां आहे नाहीं। न कळे आळीकरा कांहीं ।।तु.गा.१७०३.००१ ।।
देसी पुरवुनी इच्छा। आतां पंढरीनिवासा ।।तु.गा.१७०३.००२ ।।
नेणें भाग सीण। दुजें कोणी तुम्हांविण ।।तु.गा.१७०३.००३ ।।

आतां नव्हे दुरी। तुका पायीं मिठी मारी।।तु.गा.१७०३.००४।।
समर्थाची धरिली कास। आतां नाश काशाचा।।तु.गा.१७०४.००१ ।।
धांवें पावें करीन लाहो। तुमचा आहों विठ्ठला।।तु.गा.१७०४.००२ ।।
नलगे मज पाहाणें दिशा। हाकेसरिसा ओढसी।।तु.गा.१७०४.००३ ।।
तुका म्हणे नव्हे धीर। तुम्हां स्थिर दयेनें।।तु.गा.१७०४.००४।।
येणें पांगें पायांपाशीं। निश्चयेसीं राहेन।।तु.गा.१७०५.००१ ।।
सांगितली करीन सेवा। सकळ देवा दास्यत्व।।तु.गा.१७०५.००२।।
बंधनाची तुटली बेडी। हेचि जोडी मग आम्हां।।तु.गा.१७०५.००३ ।।
तुका म्हणे नव्हे क्षण। पायांविण वेगळा।।तु.गा.१७०५.००४।।
माझें जड भारी। आतां अवघें तुम्हांवरी।।तु.गा.१७०६.००१ ।।
जालों अंकित अंकिला। तुमचा मुकलों मागिला।।तु.गा.१७०६.००२।।
करितों जें काम। माझी सेवा तुझें नाम।।तु.गा.१७०६.००३ ।।
तुका पायां लागे। कांहीं नेदी ना न मागें।।तु.गा.१७०६.००४।।
जालों तंव साचें। दास राहवणें काचें।।तु.गा.१७०७.००१ ।।
हें कां मिळतें उचित। तुम्ही नेणां कृपावंत।।तु.गा.१७०७.००२।।
सिंहाचें तें पिलें। जाय घेऊनियां कोल्हें।।तु.गा.१७०७.००३ ।।
तुका म्हणे नास। आम्हां म्हणविल्या दास।।तु.गा.१७०७.००४।।
इंद्रियांचीं दीनें। आम्ही केलों नारायणें।।तु.गा.१७०८.००१ ।।
म्हणऊनि ऐसें सोसी। काय सांगों कोणापाशीं।।तु.गा.१७०८.००२ ।।
नाहीं अंगीं बळ। त्याग करिजेसा सकळ।।तु.गा.१७०८.००३ ।।
तुका म्हणे मोठें। प्रारब्ध हें होतें खोटें ।।तु.गा.१७०८.००४।।
पसरूनि राहिलों बाहो। सोयी अहो तुमचीये।।तु.गा.१७०९.००१ ।।
आतां यावें लागवेगें। पांडुरंगें धांवत।।तु.गा.१७०९.००२।।

बैसायाची इच्छा कडे। चाली खडे रुपताती।।तु.गा.१७०९.००३।।
तुका म्हणे कृपाळुवा। करणें सेवा लागली।।तु.गा.१७०९.००४।।
दर्शनाचें आर्त जीवा। बहु देवा राहिलें।।तु.गा.१७१०.००१।।
आतां जाणसी तें करीं। विश्वंभरीं काय उणें।।तु.गा.१७१०.००२।।
येथें जरी उरे चिंता। कोण दाता याहूनी।।तु.गा.१७१०.००३।।
तुका म्हणे जाणवलें। आम्हां भलें एवढेंचि।।तु.गा.१७१०.००४।।
बुद्धिहीनां जडजीवां। नको देवा उपेक्षूं।।तु.गा.१७११.००१।।
परिसावी हे विज्ञापना। आम्हां दीनां दासांची।।तु.गा.१७११.००२।।
चिंतूनियां आले पाय। त्यांसी काय वंचना।।तु.गा.१७११.००३।।
तुका म्हणे पुरुषोत्तमा। करा क्षमा अपराध।।तु.गा.१७११.००४।।
बहु वाटे भये। माझे उडी घाला दये।।तु.गा.१७१२.००१।।
फांसा गुंतलों लिगाडीं। न चले बळ चरफडी।।तु.गा.१७१२.००२।।
कुंठितचि युक्ति । माझ्या जाल्या सर्व शक्ति ।।तु.गा.१७१२.००३।।
तुका म्हणे देवा। काममोहें केला गोवा।।तु.गा.१७१२.००४।।
आणीक कांहीं नेणें। असें पायांच्या चिंतनें।।तु.गा.१७१३.००१।।
माझा न व्हावा विसर। नाहीं आणीक आधार।।तु.गा.१७१३.००२।।
भांडवल सेवा । हाचि ठेवियला ठेवा।।तु.गा.१७१३.००३।।
करीं मान भावा। तुका विनंती करी देवा।।तु.गा.१७१३.००४।।
काय जाणों वेद। आम्ही आगमाचे भेद।।तु.गा.१७१४.००१।।
एक रूप तुझें मनीं । धरुनि राहिलों चिंतनीं।।तु.गा.१७१४.००२।।
कोठें अधिकार। नाहीं रानट विचार।।तु.गा.१७१४.००३।।
तुका म्हणे दीना। नुपेक्षावें नारायणा।।तु.गा.१७१४.००४।।
जोडोनियां कर। उभा राहिलों समोर।।तु.गा.१७१५.००१।।

हेंचि माझें भांडवल। जाणे कारण विठ्ठल।।तु.गा.१७१५.००२।।
भाकितों करुणा। आतां नुपेक्षावें दीना।।तु.गा.१७१५.००३।।
तुका म्हणे डोई। ठेवीं वेळोवेळां पायीं।।तु.गा.१७१५.००४।।
उमटे तें ठायीं। तुझे निरोपावें पायीं।।तु.गा.१७१६.००१।।
आम्ही करावें चिंतन। तुझें नामसंकीर्तन।।तु.गा.१७१६.००२।।
भोजन भोजनाच्या काळीं। मागों करूनियां आळी।।तु.गा.१७१६.००३।।
तुका म्हणे माथां। भार तुझ्या पंढरिनाथा।।तु.गा.१७१६.००४।।
जेणें वेळ लागे। ऐसें सांडीं पांडुरंगे।।तु.गा.१७१७.००१।।
कंठ कंठा मिळों देईं। माझा वोरस तूं घेईं।।तु.गा.१७१७.००२।।
नको पीतांबर। सांवरूं हे अळंकार।।तु.गा.१७१७.००३।।
टाकीं वो भातुकें । लौकिकाचें कवतुकें ।।तु.गा.१७१७.००४।।
हातां पायां नको। कांहीं वेगळालें राखों।।तु.गा.१७१७.००५।।
तुका म्हणे यावरी। मग सुखें अळंकारीं।।तु.गा.१७१७.००६।।
क्षेम देयाला हो। स्फुरताती दंड बाहो।।तु.गा.१७१८.००१।।
आतां झडझडां चालें। देईं उचलोनी पाउलें।।तु.गा.१७१८.००२।।
सांडी हंसगती। बहु उत्कंठा हे चित्तीं ।।तु.गा.१७१८.००३।।
तुका म्हणे आई। श्रीरंगे विठाबाई।।तु.गा.१७१८.००४।।
मथुरेच्या राया। माझें दंडवत पायां।।तु.गा.१७१९.००१।।
तुमचे कृपेचें पोसणें। माझा समाचार घेणें।।तु.गा.१७१९.००२।।
नाम धरिलें कंठीं। असें आर्तभूत पोटीं।।तु.गा.१७१९.००३।।
जीवींचें ते जाणां। तुका म्हणे नारायणा।।तु.गा.१७१९.००४।।
पतितपावना। दिनानाथा नारायणा।।तु.गा.१७२०.००१।।
तुझें रूप माझे मनीं। राहो नाम जपो वाणी।।तु.गा.१७२०.००२।।

ब्रह्मांडनायका। विश्वजनांच्या पाळका ।।तु.गा.१७२०.००३ ।।
जीवींचिया जीवा। तुका म्हणे देवदेवा ।।तु.गा.१७२०.००४ ।।
धेनु चरे वनांतरीं। चित्त बाळकापें घरीं ।।तु.गा.१७२१.००१ ।।
तैसें करीं वो माझे आई। ठाव देउनि राखें पायीं ।।तु.गा.१७२१.००२ ।।
काढितां तळमळी। जिवनाबाहेरी मासोळी ।।तु.गा.१७२१.००३ ।।
तुका म्हणे कुडी। जीवाप्राणांची आवडी ।।तु.गा.१७२१.००४ ।।
आळवीन स्वरें। कैशा मधुरा उत्तरें ।।तु.गा.१७२२.००१ ।।
ये वो ये वो पांडुरंगे। प्रेमपान्हा मज दे गे ।।तु.गा.१७२२.००२ ।।
पसरूनि चोचीं। वचनें हीं करुणेचीं ।।तु.गा.१७२२.००३ ।।
तुका म्हणे बळी। आम्ही लडिवाळें आळी।।तु.गा.१७२२.००४ ।।
सकळिकांचे समाधान। नव्हे देखिल्यावांचून ।।तु.गा.१७२३.००१ ।।
रूप दाखवीं रे आतां । सहस्त्रभुजांच्या मंडिता ।।तु.गा.१७२३.००२ ।।
शंखचक्रपद्मगदा। गरुडासहित ये गोविंदा ।।तु.गा.१७२३.००३ ।।
तुका म्हणे कान्हा। भूक लागलीं नयनां ।।तु.गा.१७२३.००४ ।।
येगा येगा पांडुरंगा। घेईं उचलुनि वोसंगा ।।तु.गा.१७२४.००१ ।।
ऐसी असोनियां वेसी। दिसतों मी परदेसी ।।तु.गा.१७२४.००२ ।।
उगवूनि गोवा। सोडवूनि न्यावें देवा ।।तु.गा.१७२४.००३ ।।
तुज आड कांहीं । बळ करी ऐसे नाहीं ।।तु.गा.१७२४.००४ ।।
तुका म्हणे हृषीकेशी। काय उशीर लाविलासी ।।तु.गा.१७२४.००५ ।।
अल्प माझी मती। म्हणोनि येतों काकुलती ।।तु.गा.१७२५.००१ ।।
आतां दाखवा दाखवा। तुमचीं पाउलें केशवा ।।तु.गा.१७२५.००२ ।।
धीर माझ्या मना। नाहीं नाहीं नारायणा ।।तु.गा.१७२५.००३ ।।
तुका म्हणे दया। मज करा अभागिया ।।तु.गा.१७२५.००४ ।।

कोणें साक्षीविण। केलें उधारा भजन।।तु.गा.१७२६.००१ ।।
ऐसें सांगा जी दातारा। माझी भक्ति परंपरा।।तु.गा.१७२६.००२।।
कोणें केली नाहीं आळी। ब्रह्मज्ञानाहुनि वेगळी।।तु.गा.१७२६.००३।।
कोणाचें त्वां कोड। नाहीं पुरविला लाड।।तु.गा.१७२६.००४।।
कोणाच्या उद्धारा। केला विलंब माघारा।।तु.गा.१७२६.००५।।
तुका म्हणे भिन्न। कां हे बोला साक्षीविण।।तु.गा.१७२६.००६ ।।
माझें जीवन तुझें पाय। कृपाळू तूं माझी माय।।तु.गा.१७२७.००१ ।।
नेदीं दिसों किविलवाणें। पांडुरंगा तुझें तान्हें।।तु.गा.१७२७.००२।।
जन्ममरण तुजसाठीं। आणीक नेणें दुजी गोठी।।तु.गा.१७२७.००३।।
तुका म्हणे तुजविण। कोण हरिल माझा सीण।।तु.गा.१७२७.००४।।
काय आम्ही केलें ऐसें। नुद्धरीजेसें सांगावें।।तु.गा.१७२८.००१ ।।
हरण कोल्हें वैकुंठवासी। कोण त्यासी अधिकार।।तु.गा.१७२८.००२।।
गजा नाड्या सरोवरीं। नाहीं हरी विचारिलें।।तु.गा.१७२८.००३।।
तुका म्हणे गणिका नष्ट। माझे कष्ट त्याहूनि।।तु.गा.१७२८.००४।।
काय न्यून आहे सांगा। पांडुरंगा तुम्हांपें।।तु.गा.१७२९.००१ ।।
आमुची तों न पुरे इच्छा। पिता ऐसा मस्तकीं।।तु.गा.१७२९.००२।।
कैसी तुम्हां होते सांडी। करुणा तोंडीं उच्चारें।।तु.गा.१७२९.००३।।
आश्चर्यचि करी तुका। हे नायका वैकुंठीच्या।।तु.गा.१७२९.००४।।
न पवीजे तया ठाया। आलों कायाक्लेशेसीं।।तु.गा.१७३०.००१ ।।
आतां माझें आणी मना। नारायणा ओजेचें।।तु.गा.१७३०.००२।।
बहु रिणें पिडिलों फार। परिहार करावा।।तु.गा.१७३०.००३ ।।
तुका म्हणे निर्बळशक्ति । काकुलती म्हूण येतों।।तु.गा.१७३०.००४।।
कळों येतें वर्म। तरी न पवतों श्रम।।तु.गा.१७३१.००१ ।।

तुम्हां शिरीं होता भार। आम्हां कैचा संसार।।तु.गा.१७३१.००२।।
होतें अभयदान। तरी स्थिर होतें मन।।तु.गा.१७३१.००३।।
तुका म्हणे पाहें। ऐसी वाट उभा आहें।।तु.गा.१७३१.००४।।
तुम्ही तों सदैव। अधीरपणें माझी हांव।।तु.गा.१७३२.००१।।
जळो आशेचें तें जिणें। टोंकतसावें दीनपणें।।तु.गा.१७३२.००२।।
येथूनि सोडवा। आतां अनुभवें देवा।।तु.गा.१७३२.००३।।
तुका म्हणे झाले। एक मग हें निमालें।।तु.गा.१७३२.००४।।
धांवा केला धांवा। श्रम होऊं नेदी जीवा।।तु.गा.१७३३.००१।।
वर्षे अमृताच्या धारा। घेईं वोसंगा लेंकुरा।।तु.गा.१७३३.००२।।
उशीर तो आतां। न करावा हेचि चिंता।।तु.गा.१७३३.००३।।
तुका म्हणे त्वरें। वेग करीं विश्वंभरे।।तु.गा.१७३३.००४।।
घालिती पव्हया। वाटे अनाथाच्या दया।।तु.गा.१७३४.००१।।
तैसें कां हो नये करूं ।पांडुरंगा मज तारूं ।।तु.गा.१७३४.००२।।
रोगियासि काढा। देउनि वारिताती पीडा।।तु.गा.१७३४.००३।।
बुडत्यासाठीं उडी। घालिताती काय जोडी।।तु.गा.१७३४.००४।।
झाडिताती कांटे। पुढें मागिलांचे वाटे।।तु.गा.१७३४.००५।।
तुका म्हणे भार। घेती भागल्यांचा फार।।तु.गा.१७३४.००६।।
शिकवूनि हित। सोयी लावावे हे नीत।।तु.गा.१७३५.००१।।
त्याग करूं नये खरें। ऐसें विचारावें बरें।।तु.गा.१७३५.००२।।
तुमचियां तोंडें। धर्मा धर्माचींच खंडें।।तु.गा.१७३५.००३।।
मजसाठीं देवा। कांहो लपविला हेवा।।तु.गा.१७३५.००४।।
जाला सावधान। त्यासी घालावें भोजन।।तु.गा.१७३५.००५।।
तुका म्हणे पिता। वरी बाळाच्या तो हिता।।तु.गा.१७३५.००६।।

कां जी माझे जीवीं। आळस ठेविला गोसावी ।।तु.गा.१७३६.००१ ।।
येवढा घात आणीक काय। चिंतनासी अंतराय ।।तु.गा.१७३६.००२ ।।
देहआत्मवादी। केला घात कुबुद्धी ।।तु.गा.१७३६.००३ ।।
तुका म्हणे मन। कळवळी वाटे सीण ।।तु.गा.१७३६.००४ ।।
आतां घेईं माझें । भार सकळही ओझें ।।तु.गा.१७३७.००१ ।।
काय करिसी होईं वाड। आलों पोटासीं दगड ।।तु.गा.१७३७.००२ ।।
तूंचि डोळे वाती। होईं दीपक सांगाती।।तु.गा.१७३७.००३ ।।
तुका म्हणे कांहीं। विचाराया चाड नाहीं ।।तु.गा.१७३७.००४ ।।
वाहावतों पुरीं। आतां उचित तें करीं ।।तु.गा.१७३८.००१ ।।
माझी शक्ति नारायणा। कींव भाकावी करुणा ।।तु.गा.१७३८.००२ ।।
आम्हां ओढी काळ। तुझें क्षीण झालें बळ ।।तु.गा.१७३८.००३ ।।
तुका म्हणे गोडी। जीवा मातेचिया ओढी ।।तु.गा.१७३८.००४ ।।
तुम्ही तरी हो श्रीपती। माझी बहु हीन याती ।।तु.गा.१७३९.००१ ।।
दोघे असों एके ठायीं। माझा माथा तुझें पायीं ।।तु.गा.१७३९.००२ ।।
माझ्या दीनपणां पार। नाहीं बहु तूं उदार ।।तु.गा.१७३९.००३ ।।
तुका म्हणे पांडुरंगा। मी ओहोळ तूं गंगा ।।तु.गा.१७३९.००४ ।।
नाहीं तुम्हीं केला। अंगीकार तो विठ्ठला ।।तु.गा.१७४०.००१ ।।
सोंगें न पवीजे थडी। माजी फुटकी सांगडी ।।तु.गा.१७४०.००२ ।।
प्रेम नाही अंगीं। भले म्हणविलें जगीं ।।तु.गा.१७४०.००३ ।।
तुका म्हणे देवा। मज वायां कां चाळवा ।।तु.गा.१७४०.००४ ।।
संत मानितील मज। तेणें वाटतसे लाज ।।तु.गा.१७४१.००१ ।।
तुम्ही कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ।।तु.गा.१७४१.००२ ।।
गोविलों थोरिवा। दुःख वाटतसे जीवा ।।तु.गा.१७४१.००३ ।।

तुका म्हणे माया। आवरा हे पंढरिराया।।तु.गा.१७४१.००४।।
संत पंढरीसी जाती। निरोप धाडी तया हातीं।।तु.गा.१७४२.००१।।
माझा न पडावा विसर। तुका विनवितों किंकर।।तु.गा.१७४२.००२।।
केरसुणी महाद्वारीं। ते मी असें निरंतरीं।।तु.गा.१७४२.००३।।
तुमचे पायीं पायतन। मोचे माझे तन मन।।तु.गा.१७४२.००४।।
तांबुलाची पिकधरणी। ते मी असें मुख पसरूनी।।तु.गा.१७४२.००५।।
तुमची विष्ठा पंढरीराया। ते सारसुवी माझी काया।।तु.गा.१७४२.००६।।
लागती पादुका। ते मी तळील मृत्तिका।।तु.गा.१७४२.००७।।
तुका म्हणे पंढरिनाथा। दुजें न धरावें सर्वथा।।तु.गा.१७४२.००८।।
केला तैसा अंगीकार। माझा भार चालवीं।।तु.गा.१७४३.००१।।
होऊं अंतराय बुद्धी। कृपानिधी नेदावी।।तु.गा.१७४३.००२।।
आम्ही तरी जडजीव। कैंचा भाव पुरता।।तु.गा.१७४३.००३।।
अनन्यभावें घ्यावी सेवा। आम्हां देवा घडेसी।।तु.गा.१७४३.००४।।
तुझीं आम्ही शरणागतें। कृपावंतें रक्षीजे।।तु.गा.१७४३.००५।।
तुका म्हणे भाकूं कींव। असों जीव जड आम्ही।।तु.गा.१७४३.००६।।
स्मरणाचे वेळे। व्हावें सावध न कळे।।तु.गा.१७४४.००१।।
पडिलों विषयांचे ओढी। कोणी न दिसेसें काढी।।तु.गा.१७४४.००२।।
भांडवल माझें। वेंच झालें भूमि ओझें।।तु.गा.१७४४.००३।।
तुका म्हणे कळे। तूंचि धांवें ऐसे वेळे।।तु.गा.१७४४.००४।।
नेणें करूं सेवा। पांडुरंगा कृपाळुवा।।तु.गा.१७४५.००१।।
धांवें बुडतों मी काढी । सत्ता आपुलिया ओढी।।तु.गा.१७४५.००२।।
क्रियाकर्महीन। जालों इंद्रियां अधीन।।तु.गा.१७४५.००३।।
तुका विनंती करी। वेळोवेळां पाय धरी।।तु.गा.१७४५.००४।।

पापाची मी राशी। सेवाचोर पायांपाशीं।।तु.गा.१७४६.००१ ।।
करा दंड नारायणा। माझ्या मानाची खंडणा।।तु.गा.१७४६.००२ ।।
जना हातीं सेवा। घेतों लंडपणें देवा।।तु.गा.१७४६.००३ ।।
देव ना संसार। तुका दोहींकडे चोर।।तु.गा.१७४६.००४ ।।
हातीं धरूं जावें । तेणें परतेंचि व्हावें।।तु.गा.१७४७.००१ ।।
ऐसा कां हो आला वांटा। हीन भाग्याचा करंटा।।तु.गा.१७४७.००२ ।।
देव ना संसार। दोहीं ठायीं नाहीं थार।।तु.गा.१७४७.००३ ।।
तुका म्हणे पीक । भूमि नेदी न मिळे भीक ।।तु.गा.१७४७.००४ ।।
जालों आतां दास। माझे तोडोनियां पाश।।तु.गा.१७४८.००१ ।।
ठाव द्यावा पायांपाशीं। मी तो पातकांची राशी।।तु.गा.१७४८.००२ ।।
सकळही गोवा। माझा उगवूनि देवा।।तु.गा.१७४८.००३ ।।
तुका म्हणे भय। करा जवळी तें नये।।तु.गा.१७४८.००४ ।।
विठोबा विसांविया विसांविया। पडों देईं पायां।।तु.गा.१७४९.००१ ।।
बहु खेद क्षीण। आलों सोसुनियां वन।।तु.गा.१७४९.००२ ।।
बहुतां काकुलती। आलों सोसिली फजिती।।तु.गा.१७४९.००३ ।।
केली तुजसाठीं। तुका म्हणे येवढी आटी।।तु.गा.१७४९.००४ ।।
गातों भाव नाहीं अंगीं। भूषण करावया जगीं।।तु.गा.१७५०.००१ ।।
परि तूं पतितपावन। करीं साच हें वचन।।तु.गा.१७५०.००२ ।।
मुखें म्हणवितों दास। चित्तीं माया लोभ आस।।तु.गा.१७५०.००३ ।।
तुका म्हणे दावीं वेष। तैसा अंतरीं नाहीं लेश।।तु.गा.१७५०.००४ ।।
करा नारायणा। माझ्या दुःखाची खंडणा।।तु.गा.१७५१.००१ ।।
वृत्ति राखा पायांपाशीं। वस्ती धरूनि मानसीं।।तु.गा.१७५१.००२ ।।
पाळोनियां लळा। आतां पाववावें फळा।।तु.गा.१७५१.००३ ।।

तुका म्हणे दीन। त्याचा हरतिया सीण ।।तु.गा.१७५१.००४ ।।
क्रियामतिहीन। एक मी गा तुझें दीन ।।तु.गा.१७५२.००१ ।।
देवा करावा सांभाळ। वारीं माझी तळमळ ।।तु.गा.१७५२.००२ ।।
नको माझें ठायीं। गुणदोष घालूं कांहीं ।।तु.गा.१७५२.००३ ।।
अपराधाच्या कोटी। तुका म्हणे घाला पोटीं ।।तु.गा.१७५२.००४ ।।
तुझे थोर थोर। भक्त करिती विचार ।।तु.गा.१७५३.००१ ।।
जपतपादि साधनें। मज चिंतवेना मनें ।।तु.गा.१७५३.००२ ।।
करुणावचनें। म्यां भाकावीं तुम्हां दीनें ।।तु.गा.१७५३.००३ ।।
तुका म्हणे घेईं। माझें थोडें फार ठायीं ।।तु.गा.१७५३.००४ ।।
न संडवे अन्न। मज न सेंववे वन ।।तु.गा.१७५४.००१ ।।
म्हणउनी नारायणा। कींव भाकितों करुणा ।।तु.गा.१७५४.००२ ।।
नाहीं अधिकार। कांहीं घोकाया अक्षर ।।तु.गा.१७५४.००३ ।।
तुका म्हणे थोडें। आयुष्य अवघेचि कोडें ।।तु.गा.१७५४.००४ ।।
आयुष्य गेलें वायांविण। थोर झाली नागवण ।।तु.गा.१७५५.००१ ।।
आतां धांवाधांव करी। काय पाहातोसि हरी ।।तु.गा.१७५५.००२ ।।
माझे तुझे याचि गती। दिवस गेले तोंडीं माती ।।तु.गा.१७५५.००३ ।।
मन वाव घेऊं नेदी। बुडवूं पाहे भवनदी ।।तु.गा.१७५५.००४ ।।
पडिला विषयाचा घाला। तेणें नागविलें मला ।।तु.गा.१७५५.००५ ।।
शरण आलों आतां धावें। तुका म्हणे मज पावें ।।तु.गा.१७५५.००६ ।।
जाली तडातोडी। अवघीं पडिलों उघडीं ।।तु.गा.१७५६.००१ ।।
नव्हों कोणांचीच कांहीं। तुझे भरलिया वाहीं ।।तु.गा.१७५६.००२ ।।
पारुषला संवसार। मोडलीं बैसण्याची थार ।।तु.गा.१७५६.००३ ।।
आतां म्हणे तुका। देवा अंतरें राखों नका ।।तु.गा.१७५६.००४ ।।

सांगों देवा नेणा काय। बोलाची ये आवडी ।।तु.गा.१७५७.००१ ।।
वायां मज चुकुर करा। विश्वंभरा विनोदें ।।तु.गा.१७५७.००२ ।।
आवडीच्या करा ऐसें। अंतर्वासें जाणतसा ।।तु.गा.१७५७.००३ ।।
तुका म्हणे समाधानें। होइन मनें मोकळा।।तु.गा.१७५७.००४ ।।
देह प्रारब्धाचे शिरीं। असोनि करी उद्वेग ।।तु.गा.१७५८.००१ ।।
धांव घालीं नारायणा। माझ्या मना जागवीं ।।तु.गा.१७५८.००२ ।।
ऐसीं चुकोनियां वर्मे। पीडा भ्रमें पावलों ।।तु.गा.१७५८.००३ ।।
तुका म्हणे कैंचा भोग। नव्हे रोग अंगींचा ।।तु.गा.१७५८.००४ ।।
आतां न म्हणें मी माझें। नेघें भार कांहीं ओझें ।।तु.गा.१७५९.००१ ।।
तूंचि तारिता मारिता। कळों आलासी निरुता ।।तु.गा.१७५९.००२ ।।
अवघा तूंचि जनार्दन। संत बोलती वचन ।।तु.गा.१७५९.००३ ।।
तुका म्हणे कांहीं। माझें तिळभरी नाहीं ।।तु.गा.१७५९.००४ ।।
विठ्ठल माझी माय। आम्हां सुखा उणें काय ।।तु.गा.१७६०.००१ ।।
घेतों अमृताची धणी। प्रेम वोसंडलें स्तनीं ।।तु.गा.१७६०.००२ ।।
क्रीडों वैष्णवांच्या मेळीं। करूं आनंदाच्या जळीं ।।तु.गा.१७६०.००३ ।।
तुका म्हणे कृपावंत। ठेवीं आम्हांपाशीं चित्त ।।तु.गा.१७६०.००४ ।।
हेंचि माझे धन। तुमचे वंदावे चरण ।।तु.गा.१७६१.००१ ।।
येणें भाग्यें असो जीत। एवढें समर्पूनी चित्त ।।तु.गा.१७६१.००२ ।।
सांभाळिलें देवा। मज अनाथा जी जीवा ।।तु.गा.१७६१.००३ ।।
जोडुनियां कर। तुका विनवितों किंकर ।।तु.गा.१७६१.००४ ।।
कोड आवडीचें। पुरविना बाळकाचें ।।तु.गा.१७६२.००१ ।।
तेव्हां कैसी ते माउली। जाणा काशासाठीं व्याली ।।तु.गा.१७६२.००२ ।।
वत्साचिये आसे। धेनु धांवेना वोरसें ।।तु.गा.१७६२.००३ ।।

तुका म्हणे घरीं। बाळ टाकिलें वानरी ||तु.गा.१७६२.००४ ||
मायलेंकरांत भिन्न। नाहीं उत्तरांचा सीण ||तु.गा.१७६३.००१ ||
धाडीं धाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ||तु.गा.१७६३.००२ ||
करूनि नवल। याचें बोलिलों ते बोल ||तु.गा.१७६३.००३ ||
तुका म्हणे माते। पांडुरंगे कृपावंते ||तु.गा.१७६३.००४ ||
प्रीतीचा तो कळवळा। जिव्हाळाचि वेगळा ||तु.गा.१७६४.००१ ||
बहु नेदी रडों माता। दुश्चित होतां धीर नव्हे ||तु.गा.१७६४.००२ ||
वरी वरी तोंडापुरतें। मोहोरिते कळतसे ||तु.गा.१७६४.००३ ||
जाणोनियां नेणता तुका । नव्हे लोकांसारिखा ||तु.गा.१७६४.००४ ||
मागितल्यास आस करा। उरी धरा कांहींबाहीं ||तु.गा.१७६५.००१ ||
म्हणऊनि सारिली आस। होती यास मूळ ते ||तु.गा.१७६५.००२ ||
माझ्या मोहें तुज पान्हा। लोटे स्तना वोरसे ||तु.गा.१७६५.००३ ||
तुका म्हणे आळवणें। माझ्या देणें उत्तरा ||तु.गा.१७६५.००४ ||
चाळवणें काय। ऐसें अगे माझे माय ||तु.गा.१७६६.००१ ||
धांव पाव लवलाहें। कंठीं प्राण वाट पाहे ||तु.गा.१७६६.००२ ||
पसरूनि कर। तुज चालिलों समोर ||तु.गा.१७६६.००३ ||
देशील विसांवा। तुका म्हणे ऐशा हांवा ||तु.गा.१७६६.००४ ||
आपुल्या महिमानें। धातु परिसें केलें सोनें ||तु.गा.१७६७.००१ ||
तैसे न मनीं माझें आतां। गुणदोष पंढरिनाथा ||तु.गा.१७६७.००२ ||
गांवामागील वोहोळ। गंगा न मनी अमंगळ ||तु.गा.१७६७.००३ ||
तुका म्हणे माती। केली कस्तुरीनें सरती ||तु.गा.१७६७.००४ ||
उपजलें मनीं। हें तों स्वामीची करणी ||तु.गा.१७६८.००१ ||
होईल प्रसादाचें दान। तरि हें कवतुक पाहेन ||तु.गा.१७६८.००२ ||

येइल अभय जरि। तरि हे आज्ञा वंदिन शिरीं ।।तु.गा.१७६८.००३ ।।

भक्तिप्रयोजना। प्रयोजावें बंदीजना ।।तु.गा.१७६८.००४ ।।

यश स्वामिचिये शिरीं। दास्य करावें किंकरीं ।।तु.गा.१७६८.००५ ।।

तुका म्हणे आळीकरा। त्यासी योजावें उत्तरा ।।तु.गा.१७६८.००६ ।।

गातों नाचतों आनंदें। टाळघागरियाच्या छंदें ।।तु.गा.१७६९.००१ ।।

तुझीं तुजपुढें देवा। नेणों भाव कैसी सेवा ।।तु.गा.१७६९.००२ ।।

नेणों ताल घात मात। भलते सवां पाय हात ।।तु.गा.१७६९.००३ ।।

लाज नाहीं शंका। प्रेमें धालों म्हणे तुका ।।तु.गा.१७६९.००४ ।।

बुद्धिहीना उपदेश। तें तें विष अमृतीं ।।तु.गा.१७७०.००१ ।।

हुंगों नये गोऱ्हवाडी। तेथें जोडी विटाळ ।।तु.गा.१७७०.००२ ।।

अळसियाचें अंतर कुडें। जैसें मढें निष्काम ।।तु.गा.१७७०.००३ ।।

तुका म्हणे ऐशा हातीं। मज श्रीपती वांचवा ।।तु.गा.१७७०.००४ ।।

आपुलें आम्हीं पुसिलें नाहीं। तुज कांहीं कारणें ।।तु.गा.१७७१.००१ ।।

मागें मागें धांवत आलों। कांहीं बोलों यासाठीं ।।तु.गा.१७७१.००२ ।।

बहुत दिस होतें मनीं। घ्यावी धणी एकांतीं ।।तु.गा.१७७१.००३ ।।

तुका म्हणे उभा राहें। कान्हो पाहे मजकडे ।।तु.गा.१७७१.००४ ।।

अवघिया चाडा कुंठित करूनि। लावीं आपुलीच गोडी। आशा मनसा तृष्णा कल्पना। करूनियां देशधडी। मीतूंपणापासाव गुंतलो मिथ्या। संकल्प तो माझा तोडीं। तुझिये चरणीं माझें दोन्ही पक्ष। अवघी करूनि दाखवी पिंडीं रे रे ।।तु.गा.१७७२.००१ ।।

माझें साच काय केलें मृगजळें। वर्ण याती कुळ अभिमान। कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्यांचें साचपण ।।तु.गा.१७७२.००२ ।।

वेगळाल्या भावें चित्ता तडातोडी। केलों देशधडी मायाजाळें। गोत वित्त माय बाप बहिणी सुत। बंधुवर्ग माझीं बाळें। एका एक न धरी संबंध पुरलिया। पातलिया जवळी काळें। जाणोनियां त्याग सर्वस्वें केला। सांभाळीं आपुलें जाळें ।।तु.गा.१७७२.००३ ।।

एका जवळी धरी आणिकां अंतरीं। तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं। एकाचें पाळण एकासी भांडण। चाड कवणिये काजीं। अधिक असे उणें कवण कवण्या गुणें। हे माव न कळेचि तुझी। म्हणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती। तुका म्हणे भाक माझी ।।तु.गा.१७७२.००४ ।।

कांहीं बोलिलों बोबडें। मायबाप तुम्हांपुढें। सलगी लाडें कोडें। मज क्षमा करावी ।।तु.गा.१७७३.००१ ।।
काय जाणावा महिमा। तुमचा म्यां पुरुषोत्तमा। आवडीनें सीमा। सांडविली मज हातीं ।।तु.गा.१७७३.००२ ।।
घडे अवज्ञा सख्यत्वें। बाळें बापासी न भ्यावें। काय म्यां सांगावें। आहे ठावें तुम्हांसी ।।तु.गा.१७७३.००३ ।।
तुका म्हणे देवा। प्रेम लोभ न सांडावा। पाळिला पाळावा। लळा पुढती आगळा ।।तु.गा.१७७३.००४ ।।
म्हणऊनि काकुलती। येतों पुढत पुढती। तुमचिया असे हातीं। कमळापती भांडार ।।तु.गा.१७७४.००१ ।।
फेडूं आलेतीं दरिद्र। तरी नलगेचि उशीर। पुरे अभयकर। ठाया ठाव रंकासी ।।तु.गा.१७७४.००२ ।।
कोठें न घली धांव। याजसाठीं त्यजिली हांव। घेऊं नेदी वाव। मना केला विरोध ।।तु.गा.१७७४.००३ ।।
कारणांच्या गुणें। वेळ काळ तोही नेणें। तुमच्या कीर्तनें। तुका तुम्हां जागवी ।।तु.गा.१७७४.००४ ।।
जों जों घ्यावा सोस। माझें वारीं गर्भवास। लटिक्याचा दोष। अधिक जडे अंगासीं ।।तु.गा.१७७५.००१ ।।
आतां आहे तैसें असो। अनुताप अंगीं वसो। येवढेंचि नसो। माझें आणि परावें ।।तु.गा.१७७५.००२ ।।
जागा झालेपणें। काय असावें स्वप्नें। शब्दाचिया शिणें। कष्ट मिथ्या मानावे ।।तु.गा.१७७५.००३ ।।
छायें माकड विटे। धांवे कूपीं काय भेटे। तुका म्हणे फुटे। डोई गुडघे कोंपर ।।तु.गा.१७७५.००४ ।।
काय करूं आतां या मना। न संडी विषयाची वासना। प्रार्थितांही राहेना। आदरें पतना नेऊं पाहे ।।तु.गा.१७७६.००१ ।।
आतां धांवें धांवें गा श्रीहरी। गेलों वायां नाहीं तरी। न दिसे कोणी आवरी। आणीक दुजा तयासी ।।तु.गा.१७७६.००२ ।।
न राहे एके ठायीं एक घडी। चित्त तडतडा तोडी। भरलें विषयभोवंडीं। घालूं पाहे उडी भवडोहीं ।।तु.गा.१७७६.००३ ।।
आशा तृष्णा कल्पना पापिणी। घात मांडला माझा यांणीं। तुका म्हणे चक्रपाणी। काय अजोनि पाहातोसि ।।तु.गा.१७७६.००४ ।।
येईं गा तूं मायबापा पंढरीच्या राया। तुजविण शीण वाटे क्षीण जाली काया ।।तु.गा.१७७७.००१ ।।
याती हीन मती हीन कर्म हीन माझें। सर्व लज्जा सांडोनियां शरण आलों तुज ।।तु.गा.१७७७.००२ ।।
दिनानाथ दीनबंधु नाम तुज साजे। पतितपावन नाम ऐसी ब्रीदावळी गाजे ।।तु.गा.१७७७.००३ ।।
विटेवरि उभा नीट कटावरी कर। तुका म्हणे हेचि आम्हां ध्यान निरंतर ।।तु.गा.१७७७.००४ ।।
काय करूं या मना आतां। कां विसरतें पंढरिनाथा। करि संसाराची चिंता। वेळोवेळां मागुती ।।तु.गा.१७७८.००१ ।।
अधिक कोंडितां चरफडी। भलतीकडे घाली उडी ।।तु.गा.१७७८.००२ ।।
भजन नावडे श्रवण। धांवे विषय अवलोकून ।।तु.गा.१७७८.००३ ।।

बहुत चंचळ चपळ। जातां येतां नलगे वेळ।।तु.गा.१७७८.००४।।
किती राखों दोनी काळ। निजलिया जागे वेळ।।तु.गा.१७७८.००५।।
मज राखें आतां। तुका म्हणे पंढरिनाथा।।तु.गा.१७७८.००६।।
काय करूं जी दातारा। कांहीं न पुरे संसारा।।तु.गा.१७७९.००१।।
जाली माकडाची परी। जातो तळा येतो वरी।।तु.गा.१७७९.००२।।
घालीं भलते ठायीं हात। होती शिव्या बैसे लात।।तु.गा.१७७९.००३।।
आदि अंतीं तुका। सांगे न कळे झाला चुका।।तु.गा.१७७९.००४।।
प्रपंच वोसरो। चित्त तुझें पायीं मुरो।।तु.गा.१७८०.००१।।
ऐसें करीं गा पांडुरंगा। शुद्ध रंगवावें रंगा।।तु.गा.१७८०.००२।।
पुरे पुरे आतां। नको दुजियाची सत्ता।।तु.गा.१७८०.००३।।
लटिकें तें फेडा। तुका म्हणे जाय पीडा।।तु.गा.१७८०.००४।।
आधार तो व्हावा। ऐसी आस करी देवा।।तु.गा.१७८१.००१।।
तुम्हांपाशीं काय उणें। काय वेंचे समाधानें ।।तु.गा.१७८१.००२।।
सेवेच्या अभिळासें। मन बहु जालें पिसें।।तु.गा.१७८१.००३।।
अरे भक्तपराधीना। तुका म्हणे नारायणा।।तु.गा.१७८१.००४।।
जन्मा आलियाचा लाभ। पद्मनाभ दरुषनें।।तु.गा.१७८२.००१।।
म्हणवुनि लवलाहें। पाय आहें चिंतित।।तु.गा.१७८२.००२।।
पाठीलागा येतो काळ। तूं कृपाळू माउली।।तु.गा.१७८२.००३।।
बहु उसंतीत आलों। तया भ्यालों स्थळासी।।तु.गा.१७८२.००४।।
कोण्या उपायें हें घडे। भव आंगडें सुटकेचें।।तु.गा.१७८२.००५।।
तुका म्हणे तूं जननी। ये निर्वाणीं विठ्ठले।।तु.गा.१७८२.००६।।
पतित पतित। परि मी त्रिवाचा पतित।।तु.गा.१७८३.००१।।
परि तूं आपुलिया सत्ता। मज करावे सरता।।तु.गा.१७८३.००२।।

नाहीं चित्तशुद्धि। स्थिर पायापाशीं बुद्धि।।तु.गा.१७८३.००३।।
अपराधाचा केलों। तुका म्हणे किती बोलों।।तु.गा.१७८३.००४।।
वायां जातों देवा। नेणें भक्ती करूं सेवा।।तु.गा.१७८४.००१।।
आतां जोडोनियां हात। उभा राहिलों निवांत।।तु.गा.१७८४.००२।।
करावें तें काय। न कळे अवलोकितों पाय।।तु.गा.१७८४.००३।।
तुका म्हणे दान। दिलें पदरीं घेईन।।तु.गा.१७८४.००४।।
पुरली धांव कडिये घेईं। पुढें पायीं न चलवीं।।तु.गा.१७८५.००१।।
कृपाळुवे पांडुरंगे। अंगसंगे जिवलगे।।तु.गा.१७८५.००२।।
अवघी निवारावी भूक। अवघ्या दुःख जन्माचें।।तु.गा.१७८५.००३।।
तुका म्हणे बोलवेना। लावीं स्तना ईश्वरे।।तु.गा.१७८५.००४।।
असां जी सोंवळे। अहां तैसेचि निराळे।।तु.गा.१७८६.००१।।
आम्ही नयों तुमच्या वांटा। काय लटिकाची ताठा।।तु.गा.१७८६.००२।।
चिंतनचि पुरे। काय सलगीसवें धुरे।।तु.गा.१७८६.००३।।
तुका म्हणे देवा। नका नावडे ते सेवा।।तु.गा.१७८६.००४।।
अपराधी म्हणोन येतों काकुलती। नाहीं तरी होती काय चाड।।तु.गा.१७८७.००१।।
येईल तारूं तरी तारीजो जी देवा। नाहीं तरी सेवा घ्यावी भार।।तु.गा.१७८७.००२।।
कासया मी आतां वंचूं हें शरीर। आहें बारगीर जायजणें।।तु.गा.१७८७.००३।।
तुका म्हणे मन करूनि मोकळें। आहें साळेंढाळें उदार तें।।तु.गा.१७८७.००४।।
अनुभव ऐसा। मज लागला सरिसा।।तु.गा.१७८८.००१।।
पाठी बैसलीसे जारी। नव्हे शांत कोणे परी।।तु.गा.१७८८.००२।।
कोठें नलगे जावें। कांहीं घालावया ठावें।।तु.गा.१७८८.००३।।
तुका म्हणे कोटि। दुःखाच्याच तये पोटीं।।तु.गा.१७८८.००४।।
अनुभवें कळों येतें पांडुरंगा। रुसावें तें कां गा तुम्हांवरी।।तु.गा.१७८९.००१।।

तुका म्हणे आम्हां जोगें। विठ्ठल घोगें खरें माप ।।तु.गा.१७९४.००४ ।।
आहें ऐसा आतां आहें ठायीं बरा। ठेविलों दातारा उचितें त्या ।।तु.गा.१७९५.००१ ।।
वचनाचा भार पडिलीया शिरीं। झालें मग भारी उतरेना ।।तु.गा.१७९५.००२ ।।
अबोल्याची सवे लावूनियां मना। फांकों नेदी गुणा ऐसें करूं ।।तु.गा.१७९५.००३ ।।
तुका म्हणे आम्हां गोवळ्याचा संग। राखावें तें अंग जाणतसों ।।तु.गा.१७९५.००४ ।।
आळी करावी ते कळतें बाळका। बुझवावें हें कां नेणां तुम्ही ।।तु.गा.१७९६.००१ ।।
निवाड तो येथें असे पायांपाशीं। तुम्हांआम्हांविशीं एकेठायीं ।।तु.गा.१७९६.००२ ।।
आणीक तें आम्हीं न देखोसें जालें। जाणावें तें शिणलें भागलेसें ।।तु.गा.१७९६.००३ ।।
तुका म्हणे तुम्हां लागतें सांगावें। अंतरीचें ठावें काय नाहीं ।।तु.गा.१७९६.००४ ।।
आतां तुझें नाम गात असें गीतीं। म्हणोनि मानिती लोक मज ।।तु.गा.१७९७.००१ ।।
अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची। वारिली देहाची थोर पीडा ।।तु.गा.१७९७.००२ ।।
सज्जन संबंधी तुटली उपाधी। रोकडा या बंदीं सुटलोंसें ।।तु.गा.१७९७.००३ ।।
घ्यावा द्यावा कोणें करावा सायास। गेले आशापाश वारोनियां ।।तु.गा.१७९७.००४ ।।
तुका म्हणे तुज कळेल तें आतां। करा जी अनंता मायबापा ।।तु.गा.१७९७.००५ ।।
आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा। घडलीया सेवा समर्थाची ।।तु.गा.१७९८.००१ ।।
आतां माझ्या मनें धरावा निर्धार। चिंतनीं अंतर न पडावें ।।तु.गा.१७९८.००२ ।।
येथें नाहीं जाली कोणाची निरास। आल्या याचकास कृपेविशीं ।।तु.गा.१७९८.००३ ।।
तुका म्हणे येथें नाहीं  दुजी परी। राया रंका सरी देवा पायीं ।।तु.गा.१७९८.००४ ।।
आतां माझा सर्वभावें हा निर्धार। न करीं विचार आणिकांसी ।।तु.गा.१७९९.००१ ।।
सर्वभावें नाम गाईन आवडी। सर्व माझी जोडी पाय तुझें ।।तु.गा.१७९९.००२ ।।
लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं। पाहेन भरोनि डोळे मुख ।।तु.गा.१७९९.००३ ।।
निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं। येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ।।तु.गा.१७९९.००४ ।।
अंकित अंकिला दास तुझा देवा। संकल्प हा जीवा तुका म्हणे ।।तु.गा.१७९९.००५ ।।

ऋद्धिसिद्धी तुझें मुख्य भांडवल। हें तो आम्हां फोल भक्तीपुढें।।तु.गा.१८०५.००३ ।।
तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत। बैसोनि निवांत सुख भोगूं।।तु.गा.१८०५.००४ ।।
उतरलों पार। सत्य झाला हा निर्धार।।तु.गा.१८०६.००१ ।।
तुझें नाम धरिलें कंठीं। केली संसारासी तुटी।।तु.गा.१८०६.००२ ।।
आतां नव्हे बाधा। कोणाविशीं कांहीं कदा।।तु.गा.१८०६.००३ ।।
तुका म्हणे कांहीं। आतां उरलें ऐसें नाहीं।।तु.गा.१८०६.००४ ।।
आतां गाऊं तुज ओविया मंगळी। करूं गदारोळी हरिकथा।।तु.गा.१८०७.००१ ।।
होसी निवारिता आमुचें सकळ। भय तळमळ पापपुण्य।।तु.गा.१८०७.००२ ।।
भोगिलें ते भोग लावूं तुझें अंगीं। अलिप्त या जगीं होउनि राहों।।तु.गा.१८०७.००३ ।।
तुका म्हणे आम्ही लाडिकीं लेंकरें। न राहों अंतरें पायांविण।।तु.गा.१८०७.००४ ।।
आतां आम्हां हेंचि काम। वाचे गाऊं तुझें नाम। वाहुनियां टाळी प्रेम। सुखें आनंदें नाचावें।।तु.गा.१८०८.००१ ।।
अवघी जाली आराणूक। मागें पुढें सकळिक। त्रिपुटीचें दुःख। प्रारब्ध सारिलें।।तु.गा.१८०८.००२ ।।
गोदातटें निर्मळें। देव देवांची देउळें। संत महंत मेळें। दिवस जाय सुखाचा।।तु.गा.१८०८.००३ ।।
तुका म्हणे पंढरीनाथा। आणिक नाहीं मज चिंता। योगक्षेम माथां। भार तुझ्या घातला।।तु.गा.१८०८.००४ ।।
उपासा सेवटीं अन्नासवें भेटी। तैसी माझी मिठी पडो पायीं।।तु.गा.१८०९.००१ ।।
पुरवीं वासना साच सर्व जाणा। आम्हां नारायणा अंकिताची।।तु.गा.१८०९.००२ ।।
बहु दिसां पुत्रामातेसवें भेटी। तैसा दाटों पोटीं प्रीति उभड।।तु.गा.१८०९.००३ ।।
तुका म्हणे धन कृपणा सोईरें। यापरि दुसरें नहो आतां।।तु.गा.१८०९.००४ ।।
एकी केली हातोफळी। ठाया बळी पावले।।तु.गा.१८१०.००१ ।।
आम्ही देवा शक्तिहीनें। भाकूं तेणें करुणा।।तु.गा.१८१०.००२ ।।
पावटणी केला काळ। जया बळ होतें तें।।तु.गा.१८१०.००३ ।।
तुका म्हणे वीर्यावीर। संतधीर समुद्र।।तु.गा.१८१०.००४ ।।
करीं ऐसें जागें। वेळोवेळां पायां लागें ।।तु.गा.१८११.००१ ।।

प्रेम झोंबे कंठीं। देह धरणिये लोटी।।तु.गा.१८११.००२।।
राहो लोकाचार। पडो अवघा विसर।।तु.गा.१८११.००३।।
तुका म्हणे ध्यावें। तुज व्यभिचारभावें।।तु.गा.१८११.००४।।
कपट कांहीं एक। नेणें भुलवावयाचे लोक।।तु.गा.१८१२.००१।।
तुमचें करितों कीर्तन। गातों उत्तम ते गुण।।तु.गा.१८१२.००२।।
दाऊं नेणें जडीबुटी। चमत्कार उठाउठी।।तु.गा.१८१२.००३।।
नाहीं शिष्यशाखा। सांगों अयाचित लोकां।।तु.गा.१८१२.००४।।
नव्हें मठपति। नाहीं चाहुरांची वृत्ति।।तु.गा.१८१२.००५।।
नाहीं देवार्चन। असे मांडिलें दुकान।।तु.गा.१८१२.००६।।
नाहीं वेताळ प्रसन्न। कांहीं सांगों खाणखूण।।तु.गा.१८१२.००७।।
नव्हे पुराणिक। करणें सांगणें आणीक।।तु.गा.१८१२.००८।।
नाहीं जाळीत भणदीं। उदो म्हणोनि आनंदी।।तु.गा.१८१२.००९।।
नाहीं हालवीत माळ। भोंवतें मेळवूनि गबाळ।।तु.गा.१८१२.०१०।।
आगमीचें नेणें। कुडें स्तंभन मोहन उच्चाटण।।तु.गा.१८१२.०११।।
नोहे यांच्या ऐसा। तुका निरयवासी पिसा।।तु.गा.१८१२.०१२।।
कुमुदिनी काय जाणे तो परिमळ। भ्रमर सकळ भोगीतसे।।तु.गा.१८१३.००१।।
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम। आम्हीच तें प्रेमसुख जाणों।।तु.गा.१८१३.००२।।
माते तृण बाळा दुधाची ते गोडी। ज्याची नये जोडी त्यासी कामा।।तु.गा.१८१३.००३।।
तुका म्हणे मुक्ताफळ शिंपीपोटीं। नाहीं त्याची भेटी भोग तिये।।तु.गा.१८१३.००४।।
कराल तें करा। हातें आपुल्या दातारा।।तु.गा.१८१४.००१।।
बळियाचीं आम्हीं बाळें। असो निर्भर या सळे।।तु.गा.१८१४.००२।।
आतां कोठें काळ। मध्यें रिघेल ओंगळ।।तु.गा.१८१४.००३।।
तुका म्हणे पंढरीराया। थापटितों ठोकबाह्या।।तु.गा.१८१४.००४।।

करीं धंदा परि आवडती पाय। प्रीती सांगों काय नेणां देवा।।तु.गा.१८१५.००१ ।।
रूप डोळां देखें सदा सर्वकाळ। संपादितों आळ प्रपंचाचा।।तु.गा.१८१५.००२ ।।
नेमून ठेविली कारया कारणीं। आमुची ते वाणी गुण वदे।।तु.गा.१८१५.००३ ।।
मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा। नाहीं लोभ जीवा धन धान्य।।तु.गा.१८१५.००४ ।।
उसंतितो पंथ वेठीचिया परी। जीवनसूत्र दोरीपाशीं ओढे।।तु.गा.१८१५.००५ ।।
तुका म्हणे ऐसें करितों निर्वाण। जीव तुम्हां भिन्न नाहीं माझा।।तु.गा.१८१५.००६ ।।
करूनि राहों जरी आत्माचि प्रमाण। निश्चळ नव्हे मन काय करूं।।तु.गा.१८१६.००१ ।।
जेविलिया विण काशाचे ढेंकर। शब्दाचे प्रकार शब्दचि ते।।तु.गा.१८१६.००२ ।।
पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान। आम्हांसी चरण न सोडवे।।तु.गा.१८१६.००३ ।।
विरोधें विरोध वाढे पुढतोपुढती। वासनेचे हातीं गर्भवास।।तु.गा.१८१६.००४ ।।
सांडीमांडी अंगीं वसे पुण्यपाप। बंधन संकल्प याचि नांवें।।तु.गा.१८१६.००५ ।।
तुका म्हणे नाहीं मुक्तता मोकळी। ऐसा कोण बळी निरसी देह।।तु.गा.१८१६.००६ ।।
कळस वाहियेला शिरीं। सहस्त्रनामें पूजा करी।।तु.गा.१८१७.००१ ।।
पीक पिकलें पिकलें। धन दाटोनियां आलें।।तु.गा.१८१७.००२ ।।
शेवटचें दान। भागा आला नारायण।।तु.गा.१८१७.००३ ।।
तुका म्हणे पोट। भरलें वारला बोभाट।।तु.गा.१८१७.००४ ।।
कळेल हें तैसें गाईन मी तुज। जनासवे काज काय माझें।।तु.गा.१८१८.००१ ।।
करीन मी स्तुती आपुले आवडी। जैसी माझ्या गोडी वाटे जीवा।।तु.गा.१८१८.००२ ।।
होउनि निर्भर नाचेन मी छंदें। आपुल्या आनंदें करूनियां।।तु.गा.१८१८.००३ ।।
काय करूं कळा युक्ती या कुसरी। जाणिवेच्या परी सकळिका।।तु.गा.१८१८.००४ ।।
तुका म्हणे माझें जयासवें काज। भोळा तो सहज पांडुरंग।।तु.गा.१८१८.००५ ।।
काय मागावे कवणासी। ज्यासी मागों तो मजपाशीं।।तु.गा.१८१९.००१ ।।
जरी मागों पद इंद्राचें। तरी शाश्वत नाहीं त्याचें।।तु.गा.१८१९.००२ ।।

जरी मागों ध्रुव पद। तरी त्यासी येथील छंद।।तु.गा.१८१९.००३।।
स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें।।तु.गा.१८१९.००४।।
मागों जरी पद वैकुंठ। तें तव येकदेशी करंटें।।तु.गा.१८१९.००५।।
आयुष्य मागों चिरंजीव। जीवा मरण नाहीं स्वभावें।।तु.गा.१८१९.००६।।
तुका म्हणे एक मागें। एकपणा नाहीं भंग।।तु.गा.१८१९.००७।।
काय ऐसी वेळ। वोढवली अमंगळ।।तु.गा.१८२०.००१।।
आजि दुखवलें मन। कथाकाळीं जाला सीण।।तु.गा.१८२०.००२।।
पापाचिया गुणें। त्याचिये वेळे दर्शनें।।तु.गा.१८२०.००३।।
तुका म्हणे कानीं। घालूं आले दुष्ट वाणी।।तु.गा.१८२०.००४।।
काय मज एवढा भार। हे वेव्हार चालवाया।।तु.गा.१८२१.००१।।
उकल तो जाणे धनी। मज भोजनीं कारण।।तु.गा.१८२१.००२।।
चिंता ज्याची तया शिरीं। लेंकरीं तें खेळावें।।तु.गा.१८२१.००३।।
तुका म्हणे शेवट झाला। देव या बोला भोगिता।।तु.गा.१८२१.००४।।
काय सांगों तुझ्या चरणीच्या सुखा। अनुभव ठाउका नाहीं तुज।।तु.गा.१८२२.००१।।
बोलतां हें कैसें वाटे खरेपण। अमृताचे गुण अमृतासी।।तु.गा.१८२२.००२।।
आम्ही एकएका ग्वाही मायपुतें। जाणों तें निरुतें सुख दोघें।।तु.गा.१८२२.००३।।
तुका म्हणे आम्हां मोक्षाचा कांटाळा। कां तुम्ही गोपाळा नेणां ऐसें।।तु.गा.१८२२.००४।।
काय पुण्यराशी। गेल्या भेदूनि आकाशीं।।तु.गा.१८२३.००१।।
तुम्ही जालेति कृपाळ। माझा केला जी सांभाळ।।तु.गा.१८२३.००२।।
काय वोळलें संचित। ऐसें नेणों अगणित।।तु.गा.१८२३.००३।।
तुका म्हणे नेणें। काय केलें नारायणें।।तु.गा.१८२३.००४।।
काय ऐसा जन्म जावा वायांविण। कांहीं तरी ऋण असो माथां।।तु.गा.१८२४.००१।।
कोणे तरी काळें होईल आठव। नाहीं जरी भाव भार खरा।।तु.गा.१८२४.००२।।

शता एका तरी जन्माच्या शेवटीं। कृपाळुवा पोटीं येईल दया।।तु.गा.१८२४.००३।।
तुका म्हणे तरी नाहीं फांकों देत। सर्वांचें उचित सांपडलें।।तु.गा.१८२४.००४।।
काय करूं न करी धंदा। चित्त गोविंदा तुझें पायीं।।तु.गा.१८२५.००१।।
ऐशा संकल्पाचे संधी। माझें बुद्धी धीर द्यावा।।तु.गा.१८२५.००२।।
कुटुंबाचा तुम्हां भार। मज व्यवहार निमित्त।।तु.गा.१८२५.००३।।
तुका म्हणे करितां काम। हृदयीं नाम धरीन।।तु.गा.१८२५.००४।।
कांहीं जडभारी। पडतां ते अवसरीं।।तु.गा.१८२६.००१।।
तुझें आठवावे पाय। आम्ही मोकलूनि धाय।।तु.गा.१८२६.००२।।
तहान पीडी भूक। शीत उष्ण वाटे दु:ख।।तु.गा.१८२६.००३।।
तुका म्हणे देहयोगें। वारंवार पिडितां भोगें।।तु.गा.१८२६.००४।।
कोठें भोग उरला आतां। आठवितां तुज मज।।तु.गा.१८२७.००१।।
आड कांहीं नये दुजें। फळ बीजें आणिलें।।तु.गा.१८२७.००२।।
उद्वेग तो वायांविण। कैंचा सीण चिंतनें।।तु.गा.१८२७.००३।।
तुका म्हणे गेला भ्रम। तुमच्या धर्म पायाचा।।तु.गा.१८२७.००४।।
कोठें देवा आलें अंगा थोरपण। बरें होतें दीन होतों तरी।।तु.गा.१८२८.००१।।
साधन ते सेवा संताची उत्तम। आवडीनें नाम गाईन तें।।तु.गा.१८२८.००२।।
न पुसतें कोणी कोठेंही असतां। समाधान चित्ताचिया सुखें।।तु.गा.१८२८.००३।।
तुका म्हणे जन अव्हेरितें मज। तरी केशीराज सांभाळिता।।तु.गा.१८२८.००४।।
खावें ल्यावें द्यावें। जमाखर्च तुझ्या नांवें।।तु.गा.१८२९.००१।।
आतां चुकली खटपट। झाड्यापाड्याचा बोभाट।।तु.गा.१८२९.००२।।
आहे नाहीं त्याचें। आम्हां काम सांगायाचें।।तु.गा.१८२९.००३।।
तुका म्हणे चिंता। भार वाहे तुझ्या माथां।।तु.गा.१८२९.००४।।
गाऊं नेणों कळा कुसरी। कान धरोनि म्हणे हरी।।तु.गा.१८३०.००१।।

माझ्या बोबडिया बोला। चित्त द्यावें बा विठ्ठला।।तु.गा.१८३०.००२।।
मज हसतील लोक । परि मी गाईन नि:शंक ।।तु.गा.१८३०.००३।।
तुझे नामीं मी निर्लज्ज। काय जनासवें काज।।तु.गा.१८३०.००४।।
तुका म्हणे माझी विनंती। तुम्ही परिसा कमळापती।।तु.गा.१८३०.००५।।
घेईन मी जन्म याजसाठीं देवा। तुझी चरणसेवा साधावया।।तु.गा.१८३१.००१।।
हरिनामकीर्तन संतांचें पूजन। घालूं लोटांगण महाद्वारीं।।तु.गा.१८३१.००२।।
आनंदें निर्भर असों भलते ठायीं। सुखदु:खा नाहीं चाड आम्हां।।तु.गा.१८३१.००३।।
आणीक सायास न करीं न धरीं आस। होईन उदास सर्व भावें।।तु.गा.१८३१.००४।।
मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी। होय सांगों ऐसी तुका म्हणे।।तु.गा.१८३१.००५।।
चंदनाच्या वासें धरितील नाक । नावडे कनक न घडे हें।।तु.गा.१८३२.००१।।
साकरेची गोडी सारिखी सकळां। थोरां मोठ्यां बाळा धाकुटियां।।तु.गा.१८३२.००२।।
तुका म्हणे माझें चित्त शुद्ध होतें। तरि कां निंदिते जन मज।।तु.गा.१८३२.००३।।
चित्तीं तुझे पाय डोळां रुपाचें ध्यान। अखंड मुखीं नाम तुमचे वर्णावे गुण।।तु.गा.१८३३.००१।।
हेचि एक तुम्हां देवा मागणें दातारा। उचित तें करा माझा भाव जाणूनि।।तु.गा.१८३३.००२।।
खुंटलें जाणीव माझें बोलणें आतां। कळों यावी तैसी करा बाळाची चिंता।।तु.गा.१८३३.००३।।
तुका म्हणे आतां नको देऊं अंतर। न कळे पुढें काय बोलूं विचार।।तु.गा.१८३३.००४।।
जाणावें तें काय नेणावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार।।तु.गा.१८३४.००१।।
करावें तें काय न करावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार।।तु.गा.१८३४.००२।।
बोलावें तें काय न बोलावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार।।तु.गा.१८३४.००३।।
जावें तें कोठें नव जावें तें आतां। बरवें आठवितां नाम तुझें।।तु.गा.१८३४.००४।।
तुका म्हणे तूं करिसी तें सोपें। पुण्यें होतीं पापें आमुच्या मतें।।तु.गा.१८३४.००५।।
झाला हा डांगोरा। मुखीं लहानही थोरा।।तु.गा.१८३५.००१।।
नागविलों जनाचारीं। कोणी बैसों नेदी दारीं।।तु.गा.१८३५.००२।।

संचिताचा ठेवा। आतां आला तैसा घ्यावा ।।तु.गा.१८३५.००३ ।।
तुका म्हणे देवें। केलें आतां हें बरवे ।।तु.गा.१८३५.००४ ।।
जालों बळिवंत। होऊनियां शरणागत ।।तु.गा.१८३६.००१ ।।
केला घरांत रिघावा। ठायीं पाडियेला ठेवा ।।तु.गा.१८३६.००२ ।।
हातां चढे धन। ऐसें रचिलें कारण ।।तु.गा.१८३६.००३ ।।
तुका म्हणे मिठी। पायीं देउनि केली सुटी ।।तु.गा.१८३६.००४ ।।
जालों निर्भर मानसीं । म्हणऊनि कळलासी ।।तु.गा.१८३७.००१ ।।
तुझे म्हणविती त्यांस। भय चिंता नाहीं आस। चुकविसी पाश । गर्भवासयातना ।।तु.गा.१८३७.००२ ।।
तुझें जाणोनियां वर्म। कंठीं धरियेलें नाम। तुका म्हणे तेणें सुखें। निरसलीं जन्मदु:खें ।।तु.गा.१८३७.००३ ।।
जीवन उपाय। वैद्यवाणी तुझे पाय ।।तु.गा.१८३८.००१ ।।
ते मी नाठवीं घडिघडी। म्हणोनियां चरफडीं ।।तु.गा.१८३८.००२ ।।
तुटे भवरोग। जेथें सर्व सुख भोग ।।तु.गा.१८३८.००३ ।।
तुका म्हणे विटे। धरियेलें जें गोमटें ।।तु.गा.१८३८.००४ ।।
जेथें देखें तेथें तुझींच पाउलें। विश्व अवघें कोंदाटलें। रूप गुण नाम अवघा मेघश्याम। वेगळें तें काय उरलें। जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी। सकळ देवपाट जालें। सदा सर्वकाळ सुदिन सुवेळ। चित्त प्रेमें असे धालें ।।तु.गा.१८३९.००१ ।।
अवघा आम्हां तूंच जालासी देवा। संसार हेवा काम धंदा। नलगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ।।तु.गा.१८३९.००२ ।।
वाचा बोले ते तुझेचि गुणवाद। मंत्रजप कथा स्तुति। भोजन सारूं ठायीं फल तांबूल कांहीं। पूजा नैवेद्य तुज होती। चालतां प्रदक्षिणा निद्रा लोटांगण। दंडवत तुजप्रति। देखोन दृष्टी परस्परें गोष्टी। अवघ्या तुझ्या मूर्ति ।।तु.गा.१८३९.००३ ।।
जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप। अवघें गंगाजळ जालें। महाल मंदिरें माड्या तनघरें। झोंपड्या अवघीं देव देवाइले। ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी। नाना शब्द होत जाले। तुका म्हणे आम्ही या विठोबाचे दास। सदा प्रेमसुखें धालों रे ।।तु.गा.१८३९.००४ ।।
जो मानी तो देईल काई। न मानी तो नेईल काई ।।तु.गा.१८४०.००१ ।।
आम्हां विठ्ठल सर्वभूतीं। राहो चित्तीं भलतैसा ।।तु.गा.१८४०.००२ ।।
साध्य न तें जना काई। जल्पे वायांविण ठायीं ।।तु.गा.१८४०.००३ ।।

वंदीं निंदीं तुज तों गा। तुका म्हणे पांडुरंगा।।तु.गा.१८४०.००४।।
तरी हांव केली अमुप व्यापारें। व्हावें एक सरें धनवंत।।तु.गा.१८४१.००१।।
जालों हरिदास शूरत्वाच्या नेमें। जालीं ठावीं वर्मे पुढिलांची।।तु.गा.१८४१.००२।।
जना वेगळे हे असे अभिनव। बळी दिला जीव म्हणऊनि।।तु.गा.१८४१.००३।।
तुका म्हणे तरी लागलों विल्हेसी। चालतिया दिवसीं स्वामी ऋणी।।तु.गा.१८४१.००४।।
तुजविण कोणां। शरण जाऊं नारायणा।।तु.गा.१८४२.००१।।
ऐसा न देखें मी कोणी। दुजा तिहीं त्रिभुवनीं।।तु.गा.१८४२.००२।।
पाहिलीं पुराणें। धांडोळिलीं दरुषणें।।तु.गा.१८४२.००३।।
तुका म्हणे ठायीं। जडून ठेलों तुझ्या पायीं।।तु.गा.१८४२.००४।।
तुजविण कांहीं। स्थिर राहे ऐसें नाहीं।।तु.गा.१८४३.००१।।
कळों आलें बहुतां रीती। पांडुरंगा माझ्या चित्तीं।।तु.गा.१८४३.००२।।
मोकलोनि आस। सर्वभावें झालों दास।।तु.गा.१८४३.००३।।
तुका म्हणे तूंचि खरा। येर वाउगा पसारा।।तु.गा.१८४३.००४।।
तुज दिला देह। अजूनि वागवितों भय।।तु.गा.१८४४.००१।।
ऐसा विश्वासघातकी। घडली कळतां हे चुकी।।तु.गा.१८४४.००२।।
बोलतों जें तोंडें। नाहीं अनुभविलें लंडें।।तु.गा.१८४४.००३।।
दंड लाहे केला। तुका म्हणे जी विठ्ठला।।तु.गा.१८४४.००४।।
तुज पाहावें हे धरितों वासना। परि आचरणा ठाव नाहीं।।तु.गा.१८४५.००१।।
करिसी कैवार आपुलिया सत्ता। तरिच देखतां होईन पाय।।तु.गा.१८४५.००२।।
बाहिरल्या वेषें उत्तम दंडिलें। भीतरी मुंडलें नाहीं तैसें।।तु.गा.१८४५.००३।।
तुका म्हणे वायां गेलोंच मी आहें। जरि तुम्ही साह्य न व्हा देवा।।तु.गा.१८४५.००४।।
तुझें वर्म ठावें। माझ्या पाडियेलें भावें।।तु.गा.१८४६.००१।।
रूप कासवीचे परी। धरूनि राहिलों अंतरीं।।तु.गा.१८४६.००२।।

नेदी होऊं तुटी। मेळवीन दृष्टादृष्टी ।।तु.गा.१८४६.००३ ।।
तुका म्हणे देवा। चिंतन हे तुझी सेवा ।।तु.गा.१८४६.००४ ।।
तुझें वर्म हातीं। दिलें सांगोनियां संतीं ।।तु.गा.१८४७.००१ ।।
मुखीं नाम धरीन कंठीं। अवघा सांठवीन पोटीं ।।तु.गा.१८४७.००२ ।।
नवविधा वेढिन आधीं। सांपडलासी भावासंधीं ।।तु.गा.१८४७.००३ ।।
तुका म्हणे बळिये गाढे। कळिकाळ पायां पडे ।।तु.गा.१८४७.००४ ।।
तुझें नाम गाऊं आतां। तुझ्या रंगीं नाचों था था ।।तु.गा.१८४८.००१ ।।
तुझ्या नामाचा विश्वास। आम्हां कैंचा गर्भवास ।।तु.गा.१८४८.००२ ।।
तुझें नामीं विसर पडे। तरी कोटी हत्या घडे ।।तु.गा.१८४८.००३ ।।
नाम घ्या रे कोणी फुका। भावें सांगतसे तुका ।।तु.गा.१८४८.००४ ।।
तूं माझी माउली तूं माझी साउली। पाहातों वाटुली पांडुरंगे ।।तु.गा.१८४९.००१ ।।
तूं मज एकुला वडील धाकुला। तूं मज आपुला सोयरा जीव ।।तु.गा.१८४९.००२ ।।
तुका म्हणे जीव तुजपाशीं असे। तुझियानें ओस सर्व दिशा ।।तु.गा.१८४९.००३ ।।
तैसे नव्हों आम्ही विठ्ठलाचे दास। यावें आणिकांस काकुलती ।।तु.गा.१८५०.००१ ।।
स्वामीचिया सत्ता ठेंगणें सकळ। आला कळिकाळ हाताखालीं ।।तु.गा.१८५०.००२ ।।
अंकिताचा असे अभिमान देवा। समर्पूनि हेवा असों पायीं ।।तु.गा.१८५०.००३ ।।
तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें। कोड नारायणें पुरवावें ।।तु.गा.१८५०.००४ ।।
त्याग तंव मज न वजतां केला। कांहींच विठ्ठला मनांतूनि ।।तु.गा.१८५१.००१ ।।
भागलिया आला उबग सहज। न धरितां काज जालें मनीं ।।तु.गा.१८५१.००२ ।।
देह जड जालें ऋणाच्या आभारें। केलें संवसारें कासावीस ।।तु.गा.१८५१.००३ ।।
तुका म्हणे गेला आळस किळस। अकर्तव्य दोष निवारले ।।तु.गा.१८५१.००४ ।।
त्यागें भोग माझ्या येतील अंतरा। मग मी दातारा काय करूं ।।तु.गा.१८५२.००१ ।।
आतां असो तुझे पायीं हें मोटळें। इंद्रियें सकळ काया मन ।।तु.गा.१८५२.००२ ।।

सांडीमांडी विधिनिषेधाचा ठाव। न कळतां भाव जाईल वायां ।।तु.गा.१८५२.००३ ।।
तुका म्हणे आतां नको उजगरा। लपवीं दातारा अंगीं मज ।।तु.गा.१८५२.००४ ।।
दुष्ट आचरण ग्वाही माझें मन। मज ठावे गुण दोष माझें ।।तु.गा.१८५३.००१ ।।
आतां तुम्ही सर्व जाणा पांडुरंगा। पाहिजे प्रसंगाऐसें केलें ।।तु.गा.१८५३.००२ ।।
व्याह्याजावयांचे पंगती दुर्बळ। वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ।।तु.गा.१८५३.००३ ।।
तुका म्हणे आतां झालों शरणागत। पुढील उचित तुम्हां हातीं ।।तु.गा.१८५३.००४ ।।
दु:खाची संगति। तिच्या ठायीं कोण प्रीति ।।तु.गा.१८५४.००१ ।।
अवघें असों हें निराळें। करूं सोइरें सावळें ।।तु.गा.१८५४.००२ ।।
क्षणभंगुर ते ठाव। करूनि सांडावेचि वाव ।।तु.गा.१८५४.००३ ।।
तुका म्हणे बरा। ठाव पावलों हा थारा ।।तु.गा.१८५४.००४ ।।
देखोनियां तुझा रूपाचा आकार। उभा कटीं कर ठेवूनियां ।।तु.गा.१८५५.००१ ।।
तेणें माझ्या चित्ता जालें समाधान। वाटतें चरण न सोडावें ।।तु.गा.१८५५.००२ ।।
मुखें गातों गीत वाजवितों टाळी। नाचतों राउळीं प्रेमसुखें ।।तु.गा.१८५५.००३ ।।
तुका म्हणे केलें तुझ्या नामापुढें। तुच्छ हें बापुडें सकळही ।।तु.गा.१८५५.००४ ।।
देखिलें तें धरिन मनें। समाधानें राहेन ।।तु.गा.१८५६.००१ ।।
भाव माझी सांठवण। जगजीवन कळावया ।।तु.गा.१८५६.००२ ।।
वोळवीन एकसरें। उत्तरें या करुणेच्या ।।तु.गा.१८५६.००३ ।।
तुका म्हणे न योन रूपा। काय बापा करिसील ।।तु.गा.१८५६.००४ ।।
देह तुझ्या पायीं। ठेवूनि जालों उतराई ।।तु.गा.१८५७.००१ ।।
आतां माझ्या जीवा। करणें तें करीं देवा ।।तु.गा.१८५७.००२ ।।
बहुत अपराधी। मतिमंद हीनबुद्धि ।।तु.गा.१८५७.००३ ।।
तुका म्हणे नेणें। भावभक्तीचीं लक्षणें ।।तु.गा.१८५७.००४ ।।
द्याल माळ तरी पडेन मी पायां। दंडवत वायां कोण वेंची ।।तु.गा.१८५८.००१ ।।

आलें तें हिशोबें अवघिया प्रमाण। द्याल तरी दान मान होतो।।तु.गा.१८५८.००२।।
मोकळिया मनें घ्याल जरी सेवा। प्रसाद पाठवा लवकरी।।तु.गा.१८५८.००३।।
तुका म्हणे तुम्ही झालिया कृपण। नामाचें जतन मग कैंचें।।तु.गा.१८५८.००४।।
धनासींच धन। करी आपणा जतन।।तु.गा.१८५९.००१।।
तुज आळवितां गोडी। पांडुरंगा खरी जोडी।।तु.गा.१८५९.००२।।
जेविल्याचे खरें। वरी उमटे ढेंकरें।।तु.गा.१८५९.००३।।
तुका म्हणे धाय। तेथें कोठें उरे हाय।।तु.गा.१८५९.००४।।
धरूनियां चाली हांवा। येईन गांवा धांवत।।तु.गा.१८६०.००१।।
पाठविसी मूळ तरी। लवकरी विठ्ठले।।तु.गा.१८६०.००२।।
नाचेन त्या प्रेमसुखें। कीर्ति मुखें गाईन।।तु.गा.१८६०.००३।।
तुका म्हणे संतमेळीं। पायधुळी वंदीन।।तु.गा.१८६०.००४।।
न कळे तत्वज्ञान मूढ माझी मति। परि ध्यातों चित्तीं चरणकमळ।।तु.गा.१८६१.००१।।
आगमाचे भेद मी तो काय जाणें। काळ तो चिंतनें सारीतसे।।तु.गा.१८६१.००२।।
कांहीं नेणें परि म्हणवितों दास। होईल त्याचा त्यास अभिमान।।तु.गा.१८६१.००३।।
संसाराची सोय सांडिला मारग। दुराविलें जग एका घायें।।तु.गा.१८६१.००४।।
मागिल लागाचें केलेंसें खंडन। एकाएकीं मन राखियेलें।।तु.गा.१८६१.००५।।
तुका म्हणे अगा रखुमादेवीवरा। भक्तकरुणाकरा सांभाळावें।।तु.गा.१८६१.००६।।
नलगे पाहावे अबद्ध वांकडें। उच्चारावें कोडें नाम तुझें।।तु.गा.१८६२.००१।।
नाहीं वेळ काळ पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ।।तु.गा.१८६२.००२।।
वेदीं जें प्रतिपाद्य न कळे पाहातां। तैशीं या अनंता ठेवूं नामें।।तु.गा.१८६२.००३।।
आपुलियां मना उपजे आनंद। तैसें करूं छंद कथेकाळीं।।तु.गा.१८६२.००४।।
तुका म्हणे आम्ही आनंदेंचि धालों। आनंदचि ल्यालों अळंकार।।तु.गा.१८६२.००५।।
नव्हे कांहीं कवणाचा। भाव जाणवला साचा।।तु.गा.१८६३.००१।।

म्हणोनि तुझ्या पायीं। जीव ठेविला निश्चयीं ।।तु.गा.१८६३.००२ ।।
शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ।।तु.गा.१८६३.००३ ।।
तुका म्हणे वायांविण। देवा कळों आला सीण ।।तु.गा.१८६३.००४ ।।
नव्हतें तें कळों आलें। तरी बोलें अबोला ।।तु.गा.१८६४.००१ ।।
तुज मज घातली तुटी। एका भेटींपासूनि ।।तु.गा.१८६४.००२ ।।
आतां याची न धरीं चाड । कांहीं कोड कवतुकें ।।तु.गा.१८६४.००३ ।।
तुका म्हणे यावें जावे। एका भावें खंडलें ।।तु.गा.१८६४.००४ ।।
न व्हावें तें जालें देखियेलें पाय। आतां फिरूं काय मागें देवा ।।तु.गा.१८६५.००१ ।।
बहुत दिस होतों करीत हे आस। तें आलें सायासें फळ आजि ।।तु.गा.१८६५.००२ ।।
कोठवरी जिणे संसाराची आशा। उगवूं हा फांसा एथूनियां ।।तु.गा.१८६५.००३ ।।
बुडाले तयांचा मूळ ना मारग। लागला तो लाग सांडूनिया ।।तु.गा.१८६५.००४ ।।
पुढें उल्लंघितां दु:खाचे डोंगर। नाहीं अंतपार गर्भवासा ।।तु.गा.१८६५.००५ ।।
तुका म्हणे कास धरीन पीतांबरीं। तूं भवसागरीं तारूं देवा ।।तु.गा.१८६५.००६ ।।
नसताचि दाउनि भेव। केला जीव हिंपुटी ।।तु.गा.१८६६.००१ ।।
जालों तेव्हां कळलें जागा। वाउगा हा आकांत ।।तु.गा.१८६६.००२ ।।
गंवसिलों पुढें मागें। लाग लागें पावला ।।तु.गा.१८६६.००३ ।।
तुका म्हणे केली आयणी। सलगीच्यांनीं सन्मुख ।।तु.गा.१८६६.००४ ।।
न होय निग्रह देहासी दंडण। न वजे भूकतहान सहावली ।।तु.गा.१८६७.००१ ।।
तरि नित्य नित्य करीं आळवण। माझा अभिमान असों द्यावा ।।तु.गा.१८६७.००२ ।।
नाहीं विटाळीलें कायावाचामन। संकल्पानें भिन्न आशेचिया ।।तु.गा.१८६७.००३ ।।
तुका म्हणे भवसागरीं उतार। करावया आधार इच्छितसे ।।तु.गा.१८६७.००४ ।।
नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर। घालूं तुज भार पांडुरंगा ।।तु.गा.१८६८.००१ ।।
नेणें राग वेळ काळ घात मात। तुझें पायीं चित्त ठेवीं देवा ।।तु.गा.१८६८.००२ ।।

तुका म्हणे मज चाड नाहीं जना। तुज नारायणावांचूनियां।।तु.गा.१८६८.००३।।
नाम घेतां मन निवे। जिव्हें अमृतचि स्त्रवे। होताती बरवे। ऐसे शकुन लाभाचे।।तु.गा.१८६९.००१।।
मन रंगलें रंगलें। तुझ्या चरणीं स्थिरावलें। केलिया विठ्ठलें। ऐसी कृपा जाणावी।।तु.गा.१८६९.००२।।
जालें भोजनसें दिसे। चिरा पडोनि ठेला इच्छे। धालियाच्या ऐसे। अंगा येती उद्गार।।तु.गा.१८६९.००३।।
सुख भेटों आलें सुखा। निध सांपडला मुखा। तुका म्हणे लेखा। आतां नाहीं आनंदा।।तु.गा.१८६९.००४।।
निरोधितों परि न मोडे विकार। बहु हीं दुस्तर विषयद्वारें।।तु.गा.१८७०.००१।।
राहातेति तुम्ही भरोनि अंतरीं। होतों तदाकारी निर्विषयची।।तु.गा.१८७०.००२।।
कृपेचिया साक्षी असती जवळी। वचनें मोकळीं सरत नाहीं।।तु.गा.१८७०.००३।।
तुका म्हणे ताळा मेळवणीपाशीं। विनंती पायांशीं हेचि करीं।।तु.गा.१८७०.००४।।
नाहीं कांटाळलों परि वाटे भय। करावें तें काय न कळतां।।तु.गा.१८७१.००१।।
जन वन आम्हां समानचि झालें। कामक्रोध केले पावटणी।।तु.गा.१८७१.००२।।
षडउर्मी शत्रु जिंकिले अनंता। नामाचिया सत्ताबळें तुझ्या।।तु.गा.१८७१.००३।।
मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा। स्वामी करील शिरसा पाळावें तें।।तु.गा.१८७१.००४।।
म्हणऊनि तुका अवलोकूनि पाय। वचनाची पाहे वास एका।।तु.गा.१८७१.००५।।
नेणती वेद श्रुति कोणी। आम्हां भाविकावांचुनी।।तु.गा.१८७२.००१।।
रूप आवडे आम्हांसी। तैसे जोडी हृषीकेशी।।तु.गा.१८७२.००२।।
आम्हीं भावें बळिवंत। तुज घालूं हृदयांत।।तु.गा.१८७२.००३।।
तुका म्हणे तुज धाक। देतां पावसील हाक।।तु.गा.१८७२.००४।।
परि आतां माझी परिसावी विनंती। रखुमाईच्या पती पांडुरंगा।।तु.गा.१८७३.००१।।
चुकलिया बाळा न मारावें जीवें। हित तें करावें मायबापीं।।तु.गा.१८७३.००२।।
तुका म्हणे तुझा म्हणताती मज। आतां आहे लाज हेचि तुम्हां।।तु.गा.१८७३.००३।।
पवित्र होईन चरित्र उच्चारें। रूपाच्या आधारें गोजरिया।।तु.गा.१८७४.००१।।
अपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठीं। पायीं घालीं मिठी पाहे डोळां।।तु.गा.१८७४.००२।।

गाईन ओवीया शिष्टांच्या आधारें। सारिन विचारें आयुष्य या।।तु.गा.१८७४.००३।।
तुका म्हणे तुझें नाम नारायणा। ठेवीन मी मना आपुलिया।।तु.गा.१८७४.००४।।
पाठीलागा काळ येतसे या लागें। मी माझें वाउगे मध्यें असे।।तु.गा.१८७५.००१।।
आतां आगी लागो ऐसिया वेव्हारा। तूं माझा सोइरा पांडुरंगा।।तु.गा.१८७५.००२।।
वागविला माथां नसताचि भार। नव्हतें साचार देखिलें तों।।तु.गा.१८७५.००३।।
तुका म्हणे केलें जवळील दुरी। मृगजळ वरी आड आलें।।तु.गा.१८७५.००४।।
प्रारब्धा हातीं जन। सुख शीण पावतसे।।तु.गा.१८७६.००१।।
करितां घायाळाचा संग। अंगें अंग माखावें।।तु.गा.१८७६.००२।।
आविसा अंगीं पीडा वसे। त्यागें असे बहु सुख।।तु.गा.१८७६.००३।।
तुका म्हणे जीव भ्याला। अवघ्या आला बाहेरी।।तु.गा.१८७६.००४।।
बरवें ऐसें आलें मना। नारायणा या काळें।।तु.गा.१८७७.००१।।
देव आम्हां प्राणसखा। झालें दुःखा खंडण।।तु.गा.१८७७.००२।।
जन्मांतरिंच्या पुण्यरासी। होत्या त्यांसी फळ आलें।।तु.गा.१८७७.००३।।
तुका म्हणे निजठेवा। होईल देवा लाधलों।।तु.गा.१८७७.००४।।
बरें देवा कुणबी केलों। नाहीं तरि दंभें असतों मेलों।।तु.गा.१८७८.००१।।
भलें केलें देवराया। नाचे तुका लागे पायां।।तु.गा.१८७८.००२।।
विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं।।तु.गा.१८७८.००३।।
सेवा चुकतों संतांची। हेचि नागवण फुकाची।।तु.गा.१८७८.००४।।
गर्व होता ताठा। जातों यमपंथें वाटा।।तु.गा.१८७८.००५।।
तुका म्हणे थोरपणें। नरक होती अभिमानें।।तु.गा.१८७८.००६।।
बराडियाची आवडी पुरे। जया झुरे साठीं तें।।तु.गा.१८७९.००१।।
तैसें झालें माझ्या मना। नुठी चरणावरूनि।।तु.गा.१८७९.००२।।
भागलिया पेणें पावे। विसांवे तें टाकणीं।।तु.गा.१८७९.००३।।

तुका म्हणे छाया भेटे। बरें वाटे तापे त्या ।।तु.गा.१८७९.००४ ।।
बहु उतावीळ भक्तीचिया काजा। होसी केशीराजा मायबापा ।।तु.गा.१८८०.००१ ।।
तुझ्या पायीं मज झालासे विश्वास। म्हणोनियां आस मोकलिली ।।तु.गा.१८८०.००२ ।।
ऋषि मुनि सिद्ध साधक अपार। कळला विचार त्यांसी तुझा ।।तु.गा.१८८०.००३ ।।
नाहीं नाश तें सुख दिलें तयांस। झाले जे उदास सर्वभावें ।।तु.गा.१८८०.००४ ।।
तुका म्हणे सुख न माये मानसीं। धरिलें जीवेंसी पाय तुझे ।।तु.गा.१८८०.००५ ।।
बळिवंत कर्म। करी आपुला तो धर्म ।।तु.गा.१८८१.००१ ।।
पुढें घालूनियां सत्ता। न्यावें पतना पतिता ।।तु.गा.१८८१.००२ ।।
आचरणें खोटीं। केलीं सलताती पोटीं ।।तु.गा.१८८१.००३ ।।
तुका म्हणे देवा। नाहीं भजन केली सेवा ।।तु.गा.१८८१.००४ ।।
बहु दूरवरी। वेठी ओझें होतें शिरीं ।।तु.गा.१८८२.००१ ।।
आतां उतरला भार। तुम्हीं केला अंगीकार ।।तु.गा.१८८२.००२ ।।
बहु काकुलती। आलों असें मागें किती ।।तु.गा.१८८२.००३ ।।
तुका म्हणे देवा। आजि सफळ झाली सेवा ।।तु.गा.१८८२.००४ ।।
बहुजन्में सोस केला। त्याचा झाला परिणाम ।।तु.गा.१८८३.००१ ।।
विठ्ठलसें नाम कंठीं। आवडी पोटीं संचितें ।।तु.गा.१८८३.००२ ।।
येथुन तेथवरी आतां। नलगे चिंता करावी ।।तु.गा.१८८३.००३ ।।
तुका म्हणे धालें मन। हेंचि दान शकुनाचें ।।तु.गा.१८८३.००४ ।।
बाळ माते निष्ठुर होय। परि ते स्नेह करीत आहे ।।तु.गा.१८८४.००१ ।।
तैसा तूं गा पुरुषोत्तमा। घडी न विसंबसी आम्हां ।।तु.गा.१८८४.००२ ।।
नेणती भागली। कडे घेतां अंग घाली ।।तु.गा.१८८४.००३ ।।
भूक साहे ताहान। त्याचें राखे समाधान ।।तु.गा.१८८४.००४ ।।
त्याच्या दु:खें धाये। आपुला जीव देऊं पाहे ।।तु.गा.१८८४.००५ ।।

नांवें घाली उडी। तुका म्हणे प्राण काढी।।तु.गा.१८८४.००६।।
बाप मेला न कळतां। नव्हती संसाराची चिंता।।तु.गा.१८८५.००१।।
विठो तुझें माझें राज्य। नाहीं दुसऱ्याचें काज।।तु.गा.१८८५.००२।।
बाइल मेली मुक्त जाली। देवें माया सोडविली।।तु.गा.१८८५.००३।।
पोर मेलें बरें झालें। देवें मायेविरहित केलें।।तु.गा.१८८५.००४।।
माता मेली मज देखतां। तुका म्हणे हरली चिंता।।तु.गा.१८८५.००५।।
बैसूं खेळूं जेवूं। तेथें नाम तुझें गाऊं ।।तु.गा.१८८६.००१।।
रामकृष्णनाममाळा। घालूं ओवुनियां गळा।।तु.गा.१८८६.००२।।
विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ।।तु.गा.१८८६.००३।।
तुका म्हणे आतां। आम्हां जीवन शरणागतां।।तु.गा.१८८६.००४।।
राम कृष्ण ऐसीं उच्चारीन नामें। नाचेन मी प्रेमें संतांपुढें।।तु.गा.१८८७.००१।।
काय घडेल तें घडो या सेवटीं। लाभ आणि तुटी देव जाणे।।तु.गा.१८८७.००२।।
चिंता मोह आशा ठेवीन निराळीं। देईन हा बळी जीव पायीं।।तु.गा.१८८७.००३।।
तुका म्हणे कांहीं उरों नेदी उरी। सांडीन हे थोरी ओवाळोनी।।तु.गा.१८८७.००४।।
रात्री दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन।।तु.गा.१८८८.००१।।
जीवाही आगोज पडती आघात। येऊनियां नित्य नित्य वारूं।।तु.गा.१८८८.००२।।
तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें। अवघियांचें काळें केलें तोंड ।।तु.गा.१८८८.००३।।
राहो येचि ठायीं। माझा भाव तुझे पायीं।।तु.गा.१८८९.००१।।
करीन नामाचें चिंतन। जाऊं नेदी कोठें मन।।तु.गा.१८८९.००२।।
देईन ये रसीं। आतां बुडी सर्वविशीं।।तु.गा.१८८९.००३।।
तुका म्हणे देवा। साटी करोनियां जीवा।।तु.गा.१८८९.००४।।
रोजकीर्दी जमा धरुनी सकळ। खताविला काळ वरावरी।।तु.गा.१८९०.००१।।
नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजराती गोड सेवा रुजू।।तु.गा.१८९०.००२।।

चोरासाठीं रदबदल अट्टाहास्य। जळो जिणें दास्य बहुतांचें ।।तु.गा.१८९०.००३ ।।
सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापाशीं गुंफों नेणे ।।तु.गा.१८९०.००४ ।।
लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ।।तु.गा.१८९१.००१ ।।
मोजुनि झिजलों मापाचियां परी। जाळावी हे थोरी लाभाविण ।।तु.गा.१८९१.००२ ।।
कोमळ कंटक तीक्षण अगरीं। पोचट ते वरी अंगकांति ।।तु.गा.१८९१.००३ ।।
चित्रींचें ते लेप शृंगारिलें निकें । जीवेंविण फिकें रूप त्याचें ।।तु.गा.१८९१.००४ ।।
तुका म्हणे दिसें वायां गेलों देवा। अनुभव ठावा नाहीं तेणें ।।तु.गा.१८९१.००५ ।।
लोक म्हणती मज देव। हा तो अधर्म उपाव ।।तु.गा.१८९२.००१ ।।
आतां कळेल तें करीं। सीस तुझे हातीं सुरी ।।तु.गा.१८९२.००२ ।।
अधिकार नाहीं। पूजा करिती तैसा कांहीं ।।तु.गा.१८९२.००३ ।।
मन जाणे पापा। तुका म्हणे माय बापा ।।तु.गा.१८९२.००४ ।।
वाचा चापल्यें बहु जालों कुशल। नाहीं बीजमूळ हाता आले ।।तु.गा.१८९३.००१ ।।
म्हणोनि पंढरिराया दु:खी होतें मन। अंतरीचें कोण जाणे माझें ।।तु.गा.१८९३.००२ ।।
पूज्य झालों अंगा आला अभिमान। पुढील कारण खोळंबलें ।।तु.गा.१८९३.००३ ।।
तुका म्हणे खूण न कळेचि निरुती। सापडलों हातीं अहंकाराचे ।।तु.गा.१८९३.००४ ।।
वायांविण हा वाढविला लौकिक । आणिला लटिका वाद दोघां ।।तु.गा.१८९४.००१ ।।
नाहीं ऐसा झाला देव माझ्या मतें। भुकेलें जेवितें काय जाणे ।।तु.गा.१८९४.००२ ।।
शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी। साच तें अंतरीं बिंबेची ना ।।तु.गा.१८९४.००३ ।।
झालों परदेशी गेले दोन्ही ठाय। संसार ना पाय तुझे देवा ।।तु.गा.१८९४.००४ ।।
तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें। न घेतों हें पिसें लावूनियां ।।तु.गा.१८९४.००५ ।।
विभ्रंशिली बुद्धि देहांतीं जवळी। काळाची अवकाळीं वायचाळा ।।तु.गा.१८९५.००१ ।।
पालटलें जैसें देंठ सांडी पान। पिकलें आपण तयापरी ।।तु.गा.१८९५.००२ ।।
न मारितां हीन बुद्धि दु:ख पावी। माजल्याची गोवी तयापरी ।।तु.गा.१८९५.००३ ।।

तुका म्हणे गळ लागलिया मत्स्या। तळमळीचा तैसा लवलाहो।।तु.गा.१८९५.००४।।
शिणलेती सेवकां देऊनी इच्छादान। केला अभिमानें अंगीकार।।तु.गा.१८९६.००१।।
अहो दीनानाथ आनंदमूर्ती। तुम्हांसी शोभती ब्रीदें ऐसीं।।तु.गा.१८९६.००२।।
बहुतांनीं विनविलें बहुता प्रकारीं। सकळां ठायीं हरी पुरलेती।।तु.गा.१८९६.००३।।
तुका म्हणे अगा कुटुंबवत्सला। कोण तुझी लीळा जाणे ऐसी।।तु.गा.१८९६.००४।।
शूद्रवंशीं जन्मलों। म्हणोनि दंभें मोकलिलों ।।तु.गा.१८९७.००१।।
अरे तूंच माझा आतां। मायबाप पंढरीनाथा।।तु.गा.१८९७.००२।।
घोकाया अक्षर। मज नाहीं अधिकार।।तु.गा.१८९७.००३।।
सर्वभावें दीन। तुका म्हणे यातिहीन।।तु.गा.१८९७.००४।।
सकळ सत्ताधारी। व्हावें ऐसें काय हरी।।तु.गा.१८९८.००१।।
परी या कृपेच्या वोरसें। कुढावयाचेंचि पिसें।।तु.गा.१८९८.००२।।
अंगें सर्वोत्तम। अवघाचि पूर्णकाम।।तु.गा.१८९८.००३।।
तुका म्हणे दाता। तरि हा जीवदान देता।।तु.गा.१८९८.००४।।
संगतीनें होतो पंगतीचा लाभ। अशोभीं अनुभव असिजेतें।।तु.गा.१८९९.००१।।
जैसीं तैसीं असो पुढिलांचे सोई। धरिती हातीं पायीं आचारिये।।तु.गा.१८९९.००२।।
उपकारी नाहीं देखत आपदा। पुढिलाची सदा दया चित्तीं।।तु.गा.१८९९.००३।।
तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ति। पुरवावी आर्ति निर्बळाची।।तु.गा.१८९९.००४।।
संगें वाढे शीण संगें वाढे भजन। त्रिविध हें जन बहु देवा।।तु.गा.१९००.००१।।
याचिमुळें आला संगाचा कंटाळा। दिसताती डोळां नानाछंद।।तु.गा.१९००.००२।।
एकविध भाव राहावया ठाव। नेदी हा संदेह राहों चित्तीं।।तु.गा.१९००.००३।।
शब्दज्ञानी हित नेणती आपुले। आणीक देखिलें नावडे त्यां।।तु.गा.१९००.००४।।
तुका म्हणे आतां एकलेंचि भलें। बैसोनि उगलें राहावें तें।।तु.गा.१९००.००५।।
सत्ताबळें येतो मागतां विभाग। लावावया लाग निमित्य करूं ।।तु.गा.१९०१.००१।।

तुझें ऐसें मुखें करूं उच्चारण। बोलें नारायण सांपडवूं ।।तु.गा.१९०१.००२ ।।
आसेविण नाहीं उपजत मोहो। तरिच हा गोहो न पडे फंदीं ।।तु.गा.१९०१.००३ ।।
तुका म्हणे आतां व्हावें याजऐसें। सरिसें सरिसें समागमें ।।तु.गा.१९०१.००४ ।।
बोलोनियां काय दावूं। तुम्ही जीऊ जगाचे ।।तु.गा.१९०२.००१ ।।
हेचि आतां माझी सेवा। चिंतन देवा करितों ।।तु.गा.१९०२.००२ ।।
विरक्तासी देह तुच्छ। नाहीं आस देहाची ।।तु.गा.१९०२.००३ ।।
तुका म्हणे पायापाशीं। येईन ऐसी वासना ।।तु.गा.१९०२.००४ ।।
मज कोणी कांहीं करी। उमटे तुमचे अंतरीं ।।तु.गा.१९०३.००१ ।।
व्याला वाढविलें म्हूण। मज सुख तुज सीण ।।तु.गा.१९०३.००२ ।।
माझें पोट धालें। तुझें अंगीं उमटलें ।।तु.गा.१९०३.००३ ।।
तुका म्हणे खेळें। तेथें तुमचिया बळें ।।तु.गा.१९०३.००४ ।।
मज माझा उपदेश। आणिकां नये याची रीस ।।तु.गा.१९०४.००१ ।।
तुम्ही अवघें पांडुरंग। मीच दुष्ट सकळ चांग ।।तु.गा.१९०४.००२ ।।
तुमचा मी शरणागत। कांहीं करा माझें हित ।।तु.गा.१९०४.००३ ।।
तुका पाय धरी। मी हे माझें दूर करीं ।।तु.गा.१९०४.००४ ।।
मतिविण काय वर्णूं तुझें ध्यान। जेथें पडे मौन वेदश्रुती ।।तु.गा.१९०५.००१ ।।
करूनि गोजिरा आपुलिये मती । धरियलें चित्तीं चरणकमळ ।।तु.गा.१९०५.००२ ।।
सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख। तेणें हरे भूक ताहान माझी ।।तु.गा.१९०५.००३ ।।
रसना गोडावली ओव्या गातां गीत। पावलेंसे चित्त समाधान ।।तु.गा.१९०५.००४ ।।
तुका म्हणे माझी दृष्टि चरणांवरी। पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ।।तु.गा.१९०५.००५ ।।
माझिया जीवासी हेचि पैं विश्रांति। तुझे पाय चित्तीं पांडुरंगा ।।तु.गा.१९०६.००१ ।।
भांडवल गांठीं झालेंसें पुरतें। समाधान चित्तें मानियेलें ।।तु.गा.१९०६.००२ ।।
उदंड उच्चारें घातला पसरु। रुपावरी भरु आवडीचा ।।तु.गा.१९०६.००३ ।।

तुका म्हणे मज भक्तीची आवडी। अभेदीं तांतडी नाहीं म्हूण ।।तु.गा.१९०६.००४।।
माझें तों फुकाचे काय वेंचे कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुम्हां ऐसा ।।तु.गा.१९०७.००१।।
कांहींच न वंचीं आजिच्या प्रसंगीं। सकळाही अंगीं करीन पूजा ।।तु.गा.१९०७.००२।।
द्यावें तुम्हीं कांहीं हे तों नाहीं आस। असों या उदास देहभावें ।।तु.गा.१९०७.००३।।
तुका म्हणे माझी मावळली खंती। समाधान चित्तीं सर्वकाळ ।।तु.गा.१९०७.००४।।
माझें मन पाहे कसून। चित्त न ढळे तुजपासून ।।तु.गा.१९०८.००१।।
कापुनी देईन शिर। पहा कृपण कीं उदार ।।तु.गा.१९०८.००२।।
मजवरी घालीं घण। परि मी न सोडी चरण ।।तु.गा.१९०८.००३।।
तुका म्हणे अंतीं। तुजवांचूनि नाहीं गति ।।तु.गा.१९०८.००४।।
दाता लक्ष्मीचा पति। माझें मागणें तें किती ।।तु.गा.१९०९.००१।।
जाणे तान्हेल्याची ताहान। पीतां गंगा नव्हे न्यून ।।तु.गा.१९०९.००२।।
कल्पतरु झाला देता। तेथें पोटाचा मागता ।।तु.गा.१९०९.००३।।
तुका म्हणे संतां ध्यातां। परब्रह्मची आलें हातां ।।तु.गा.१९०९.००४।।
म्हणवितों दास ते नाहीं करणी। आंत वरी दोन्ही भिन्न भाव ।।तु.गा.१९१०.००१।।
गातों नाचतों तें दाखवितों जना। प्रेम नारायणा नाहीं अंगीं ।।तु.गा.१९१०.००२।।
पाविजे तें वर्म न कळेचि कांहीं। बुडालों या डोहीं दंभाचिया ।।तु.गा.१९१०.००३।।
भांडवल काळें हातोहातीं नेलें। माप या लागलें आयुष्यासि ।।तु.गा.१९१०.००४।।
तुका म्हणे वायां गेलों ऐसा दिसें। होईल या हांसें लौकिकाचें ।।तु.गा.१९१०.००५।।
याजसाठीं वनांतरा। जातों सांडुनियां घरा ।।तु.गा.१९११.००१।।
माझें दिठावेल प्रेम। बुद्धि होईल निष्काम ।।तु.गा.१९११.००२।।
अद्वैताची वाणी। नाहीं ऐकत मी कानीं ।।तु.गा.१९११.००३।।
तुका म्हणे अहंब्रह्म। आड येऊं नेदीं भ्रम ।।तु.गा.१९११.००४।।
यातिहीन मज काय तो अभिमान। मानी तुज जन नारायणा ।।तु.गा.१९१२.००१।।

काय सुख मज तयाची हे खंती। आपुलाला घेती गुणभाव।।तु.गा.१९१२.००२।।
द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी। होन जयामधीं होता गांठीं।।तु.गा.१९१२.००३।।
तुका म्हणे जन वंदितो वेगळा। मजसी दुर्बळा काय चाड।।तु.गा.१९१२.००४।।
सत्य तो आवडे। विकल्पानें भाव उडे।।तु.गा.१९१३.००१।।
आम्ही तुमच्या कृपादानें। जाणों शुद्ध मंद सोनें।।तु.गा.१९१३.००२।।
आला भोग अंगा। न लावूं उशीर त्या त्यागा।।तु.गा.१९१३.००३।।
तुका म्हणे देवा। अंजन ते तुझी सेवा।।तु.गा.१९१३.००४।।
सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेतो कोण।।तु.गा.१९१४.००१।।
मनीं भक्तीची आवडी। हेवा व्हावी ऐशी जोडी।।तु.गा.१९१४.००२।।
घेईन जन्मांतरें। हेंचि करावया खरें।।तु.गा.१९१४.००३।।
तुका म्हणे देवा। ऋणी करूनि ठेवूं सेवा।।तु.गा.१९१४.००४।।
सांखळिलों प्रीती गळां। भुंकें वेळा जाणोनियां।।तु.गा.१९१५.००१।।
तुमचें मी केशीराजा। सुनें या काजा पाळिलों।।तु.गा.१९१५.००२।।
आलें गेलें कळे वाटा। कोण निटा वांकुडिया।।तु.गा.१९१५.००३।।
तुका म्हणे आलें वारी। दुरितें दुरी नातळतां।।तु.गा.१९१५.००४।।
सांडोनियां दों अक्षरां। काय करूं हा पसारा। विधिनिषेधाचा भारा। तेणें दातारा नातुडसी।।तु.गा.१९१६.००१।।
म्हणोनि बोबड्या उत्तरीं। वाचें जपें निरंतरीं। नाम तुझें हरी। भवसागरीं तारूं तें।।तु.गा.१९१६.००२।।
सर्वमय ऐसें वेदाचें वचन। श्रुति गर्जती पुराणें। नाहीं आणीक ध्यान। साधनीं मज चाड।।तु.गा.१९१६.००३।।
शेवटीं हे ब्रह्मार्पण। याचि मंत्राचें कारण। काना मात्रा वायांविण। तुका म्हणे बिंदुलीं।।तु.गा.१९१६.००४।।
स्त्रिया पुत्र कलत्र हे तंव मायावंत। शेवटींचा अंत नपवे कोणी।।तु.गा.१९१७.००१।।
यमाचिये हातीं बांधोनियां देती। भूषणेंही घेती काढूनियां।।तु.गा.१९१७.००२।।
ऐसिया चोरांचा कैसा हा विश्वास। धरिली तुझी कास तुका म्हणे।।तु.गा.१९१७.००३।।
सुख सुखा भेटे। मग तोडिल्या न तुटे।।तु.गा.१९१८.००१।।

होईन भिकारी। पंढरीचा वारकरी।।तु.गा.१९२४.००१ ।।
हाचि माझा नेम धर्म। मुखीं विठोबाचें नाम।।तु.गा.१९२४.००२ ।।
हेचि माझी उपासना। लागेन संतांच्या चरणा।।तु.गा.१९२४.००३ ।।
तुका म्हणे देवा। हेचि माझी भोळी सेवा।।तु.गा.१९२४.००४ ।।
आतां मी पतित ऐसा साच भावें। कळों अनुभवें आलें देवा।।तु.गा.१९२५.००१ ।।
काय करावें तें रोकडेंचि करीं। राहिली हे उरी नाहीं दोघां।।तु.गा.१९२५.००२ ।।
येर येरा दृष्टी द्यावया उत्तरा। यासी काय करा ग्वाही आतां।।तु.गा.१९२५.००३ ।।
तुका म्हणे मेलों सांगतसांगतां। तेंचि आलें आतां कळों तुम्हां।।तु.गा.१९२५.००४ ।।
आपुलिये ठाकीं। करीन कांहीं तरी एकी।।तु.गा.१९२६.००१ ।।
करीन पायांशीं वोळखी। करिसी तें करीं सुखी।।तु.गा.१९२६.००२ ।।
कायाक्लेश गंगाजळ। समर्पीन तुळसीदळ।।तु.गा.१९२६.००३ ।।
तुका म्हणे देवा। कर जोडीन ते सेवा।।तु.गा.१९२६.००४ ।।
आम्हां सर्वभावें हेंचि काम। न विसंबावें तुझें नाम।।तु.गा.१९२७.००१ ।।
नलगे करावी हे चिंता। तरणें करणें काय आतां।।तु.गा.१९२७.००२ ।।
आसनीं भोजनीं शयनीं। दुजें नाहीं ध्यानीं मनीं।।तु.गा.१९२७.००३ ।।
तुका म्हणे कृपानिधी। माझी तोडिली उपाधी।।तु.गा.१९२७.००४ ।।
उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ।।तु.गा.१९२८.००१ ।।
तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसारासी तुटी ।।तु.गा.१९२८.००२ ।।
आतां नव्हें बाधा । कोणेविशी कांहीं कदा ।।तु.गा.१९२८.००३ ।।
तुका म्हणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ।।तु.गा.१९२८.००४ ।।
कासया गा मज घातलें संसारीं। चित्त पायांवरी नाहीं तुझ्या।।तु.गा.१९२९.००१ ।।
कासया गा मज घातलें या जन्मा। नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा।।तु.गा.१९२९.००२ ।।
नामाविण माझी वाचा अमंगळ। ऐसा कां चांडाळ निर्मियेलों।।तु.गा.१९२९.००३ ।।

तुका म्हणे माझी जळो जळो काया। विठ्ठल सखया वांचूनियां ।।तु.गा.१९२९.००४ ।।
झालें समाधान। तुमचे देखिले चरण ।।तु.गा.१९३०.००१ ।।
आतां उठावेंसें मना। येत नाहीं नारायणा ।।तु.गा.१९३०.००२ ।।
सुरवाडिकपणें। येथें सांपडलें केणें ।।तु.गा.१९३०.००३ ।।
तुका म्हणे भोग। गेला निवारला लाग ।।तु.गा.१९३०.००४ ।।
तरिच हा जीव संसारीं उदास। धरिला विश्वास तुम्हां सोई ।।तु.गा.१९३१.००१ ।।
एके जातीविण नाहीं कळवळा। ओढिली गोपाळा सूत्रदोरी ।।तु.गा.१९३१.००२ ।।
फुटतसे प्राण क्षणाच्या विसरे। हें तों परस्परें सारिखेंचि ।।तु.गा.१९३१.००३ ।।
तुका म्हणे चित्तीं राखिला अनुभव। तेणें हा संदेह निवारला ।।तु.गा.१९३१.००४ ।।
असे येथेंचि या दीनें। भाग्यहीनें सकळा ।।तु.गा.१९३२.००१ ।।
भांडवल एवढे गांठीं। नाम कंठीं धरियेलें ।।तु.गा.१९३२.००२ ।।
आणिक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ।।तु.गा.१९३२.००३ ।।
तुका म्हणे केला कोणें। एवढा नेणें लौकिक ।।तु.गा.१९३२.००४ ।।
नाहीं सुख मज नलगे हा मान । न राहे हे जन काय करूं ।।तु.गा.१९३३.००१ ।।
देह उपचारें पोळतसे अंग। विषतुल्य चांग मिष्टान्न तें ।।तु.गा.१९३३.००२ ।।
नाइकवे स्तुती वाणीतां थोरीव। होतो माझा जीव कासावीस ।।तु.गा.१९३३.००३ ।।
तुज पावे ऐसी सांग कांहीं कळा। नको मृगजळा गोवूं मज ।।तु.गा.१९३३.००४ ।।
तुका म्हणे आतां करी माझें हित। काढावें जळत आगींतुनीं ।।तु.गा.१९३३.००५ ।।
झाली होती काया। बहु मळीन देवराया ।।तु.गा.१९३४.००१ ।।
तुझ्या उजळली नामें। चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ।।तु.गा.१९३४.००२ ।।
अनुतापें झाला झाडा। प्रारब्धाचा नितोडा ।।तु.गा.१९३४.००३ ।।
तुका म्हणे देह पायीं। ठेवुनि झालों उतराई ।।तु.गा.१९३४.००४ ।।
नोहे आजिकालिचे ऐसे। अनारिसें पालटे ।।तु.गा.१९३५.००१ ।।

आतां लागवेग करा। ज्याचें धरा ठाके ते।।तु.गा.१९३५.००२।।
नका सांगों वाउग्या गोष्टी। चाहुल खोटी ये ठायीं।।तु.गा.१९३५.००३।।
तुका म्हणे मोडा माग। आपुला लाग वरूनी।।तु.गा.१९३५.००४।।
खाणोरियांचीं पुसों घरें। जींहीं बरे पाळती।।तु.गा.१९३६.००१।।
सांगती त्या जावें वाटा। धरोनी पोटामध्यें गोष्टी।।तु.गा.१९३६.००२।।
आली गेली होती ठाया। सत्य छाया कळली।।तु.गा.१९३६.००३।।
तुका म्हणे आपुलें बळ। युक्ति काळ कारण।।तु.गा.१९३६.००४।।
बैसो आतां मनीं। आलें तैसेंचि वदनीं।।तु.गा.१९३७.००१।।
मग अवघेंचि गोड। पुरे सकळही कोड।।तु.गा.१९३७.००२।।
बाहेरील भाव। तैसा अंतरींहि वाव।।तु.गा.१९३७.००३।।
तुका म्हणे मणी। शोभा दाविली कोंदणीं।।तु.गा.१९३७.००४।।
यत्न आतां तुम्ही करा। मज दातारा सत्तेनें।।तु.गा.१९३८.००१।।
विश्वास तो पायांवरी। ठेवूनि हरी राहिलों।।तु.गा.१९३८.००२।।
जाणतचि दुजें नाहीं। आणीक कांहीं प्रकार।।तु.गा.१९३८.००३।।
तुका म्हणे शरण आलों। नेणें बोलों विनवितां।।तु.गा.१९३८.००४।।
बहु फिरलों ठायाठाव। कोठें भाव पुरेचि ना।।तु.गा.१९३९.००१।।
समाधान तों पावलों। उरलों बोलों यावरी।।तु.गा.१९३९.००२।।
घे गा देवा आशीर्वाद। आमुच्या नांद भाग्यानें।।तु.गा.१९३९.००३।।
तुका म्हणे जेवूं आधीं। खवखव मधीं सारावी।।तु.गा.१९३९.००४।।
मज नष्टा माया मोह नाहीं लोभ। अधिक तो क्षोभ आदराचा।।तु.गा.१९४०.००१।।
धिग हें शरीर अनउपकारें। न मनीं आभार उपकाराचा।।तु.गा.१९४०.००२।।
मजहून नष्ट आहे ऐसा कोण। नावडे मिष्टान्न बहुबोल।।तु.गा.१९४०.००३।।
न दिसती मज आपलेसे गुण। संचित तें कोण जाणे मागें।।तु.गा.१९४०.००४।।

तुका म्हणे माझें देखोनियां काई। पांडुरंगें पायीं राखियेलें ।।तु.गा.१९४०.००५ ।।
कैसीं दिसों बरीं । आम्ही आळवितां हरि ।।तु.गा.१९४१.००१ ।।
नाहीं सोंग अळंकार । दास झाला संवसार ।।तु.गा.१९४१.००२ ।।
दुःख आम्हां नाहीं चिंता । हरिचे दास म्हणवितां ।।तु.गा.१९४१.००३ ।।
तुका म्हणे देवा। ऐसीं झालों करितां सेवा ।।तु.गा.१९४१.००४ ।।
तरीच म्यां देवा। साटी करूनियां जीवा ।।तु.गा.१९४२.००१ ।।
येथें बैसलों धरणें। दृढ कायावाचामनें ।।तु.गा.१९४२.००२ ।।
आवरिल्या वृत्ति। मन घेऊनियां हातीं ।।तु.गा.१९४२.००३ ।।
तुका म्हणे जरा। बाहेर येऊं नेदीं घरा ।।तु.गा.१९४२.००४ ।।
कुरुवंडी करीन काया। वरोनि पायां गोजिरियां ।।तु.गा.१९४३.००१ ।।
बैसलें तें रूप डोळां। मन चाळा लागलें ।।तु.गा.१९४३.००२ ।।
परतें न सरवे दुरी। आवडी पुरी बैसली ।।तु.गा.१९४३.००३ ।।
तुका म्हणे विसावलों। येथें धालों धणीवरी ।।तु.गा.१९४३.००४ ।।
केलें शकुनें प्रयाण। आतां मागें फिरे कोण ।।तु.गा.१९४४.००१ ।।
होय तैसें हो आतां। देह बळी काय चिंता ।।तु.गा.१९४४.००२ ।।
पडिलें पालवीं। त्याचा धाक वाहे जीवीं ।।तु.गा.१९४४.००३ ।।
तुका म्हणे जीणें। देवा काय हीनपणें ।।तु.गा.१९४४.००४ ।।
कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे ।।तु.गा.१९४५.००१ ।।
काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ।।तु.गा.१९४५.००२ ।।
नष्टदुष्टपण कवणाचें वाणूं । तयाहून अणु अधिक माझें ।।तु.गा.१९४५.००३ ।।
कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ।।तु.गा.१९४५.००४ ।।
तुका म्हणे मी या भांडवलें पुरता। तुजसी पंढरीनाथा लावियेलें ।।तु.गा.१९४५.००५ ।।
अचळ न चळे ऐसें झालें मन। धरूनि निज खूण राहीलों तें ।।तु.गा.१९४६.००१ ।।

आवडी बैसली गुणांची अंतरीं। करूं धणीवरी सेवन तें॥तु.गा.१९४६.००२॥
एकविध भाव नव्हे अभावना। आणिक या गुणां न मिळवे॥तु.गा.१९४६.००३॥
तुका म्हणे माझे पडिलें आहारीं। ध्यान विटेवरी ठाकलें तें॥तु.गा.१९४६.००४॥
अनुभवाचे रस देऊं आर्तभूतां। सोडूं चोजवितां पुढें पोतीं॥तु.गा.१९४७.००१॥
देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी। शोभतील गुणीं आपुलिया॥तु.गा.१९४७.००२॥
आधीं भाव सार शुद्ध हे भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं॥तु.गा.१९४७.००३॥
तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत। तें नाहीं लागत पसरावें॥तु.गा.१९४७.००४॥
अनुभवा आलें। माझें चित्तींचें क्षरलें॥तु.गा.१९४८.००१॥
असे जवळी अंतरे। फिरे आवडीच्या फेरें ॥तु.गा.१९४८.००२॥
खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटे॥तु.गा.१९४८.००३॥
तुका म्हणे उभें। आम्ही राखियेलें लोभें॥तु.गा.१९४८.००४॥
अभयाचें स्थळ। तें हें एक अचळ॥तु.गा.१९४९.००१॥
तरि धरिला विश्वास। ठेलों होऊनियां दास॥तु.गा.१९४९.००२॥
पुरली आवडी। पायीं लागलीसे गोडी॥तु.गा.१९४९.००३॥
तुका म्हणे कंठीं नाम। अंगीं भरलेंसें प्रेम॥तु.गा.१९४९.००४॥
असो खळ ऐसे फार। आम्हां तयांचें उपकार॥तु.गा.१९५०.००१॥
करिती पातकांची धुणीं। मोल न घेतां साबणीं॥तु.गा.१९५०.००२॥
फुकाचे मजूर । ओझें वागविती भार॥तु.गा.१९५०.००३॥
पार उतरुन म्हणे तुका। आम्हां आपण जाती नरका॥तु.गा.१९५०.००४॥
असोत लोकांचे बोल शिरावरी। माझी मज बरी विठाबाई॥तु.गा.१९५१.००१॥
आपंगिलें मज आहे ते कृपाळू। बहुत कनवाळू अंतरींची॥तु.गा.१९५१.००२॥
वेदशास्त्रें जिसीं वर्णिती पुराणें। तिचें मी पोसणें लडिवाळ॥तु.गा.१९५१.००३॥
जिचे नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेंकरूं तुका म्हणे॥तु.गा.१९५१.००४॥

अवचिताचि हातीं ठेवा। दिला सेवा न करितां।।तु.गा.१९५२.००१ ।।
भाग्य फळलें जाली भेटी। नेघें तुटी यावरी।।तु.गा.१९५२.००२।।
दैन्य गेलें हरली चिंता। सदैव आतां यावरी।।तु.गा.१९५२.००३।।
तुका म्हणे वांटा जाला। बोलों बोला देवासी।।तु.गा.१९५२.००४।।
आपुल्यांचा करीन मोळा। माझ्या कुळाचारांचा।।तु.गा.१९५३.००१ ।।
अवघियांचें वंदिन पाय। ठायाठाय न देखें।।तु.गा.१९५३.००२।।
नेदीं तुटों समाधान। थांबों जन सकळ।।तु.गा.१९५३.००३।।
तुका म्हणे झाडा होय। तों हे सोय न संडीं।।तु.गा.१९५३.००४।।
काय खावें आतां कोणीकडे जावें। गांवांत रहावें कोण्या बळें।।तु.गा.१९५४.००१ ।।
कोपला पाटील गांवींचे हे लोक । आतां घाली भीक कोण मज।।तु.गा.१९५४.००२।।
आतां येणें चवी सांडिली म्हणती। निवाडा करिती दिवाणांत।।तु.गा.१९५४.००३।।
भले लोकीं याची सांगितली मात। केला माझा घात दुर्बळाचा।।तु.गा.१९५४.००४।।
तुका म्हणे याचा संग नव्हे भला। शोधीत विठ्ठला जाऊं आतां।।तु.गा.१९५४.००५।।
आतां कांहीं सोस न करीं आणीक । धरीन तें एक हेंचि दृढ।।तु.गा.१९५५.००१ ।।
जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे हा दुस्तर गर्भवास।।तु.गा.१९५५.००२।।
जोडीन ते आतां देवाचें चरण। अविनाश धन परमार्थ।।तु.गा.१९५५.००३।।
तुका म्हणे बरा जोडला हा देह। मनुष्यपणे इहलोकां आलों।।तु.गा.१९५५.००४।।
आतां चुकलें बंधन। गेलें विसरोनि दान। आपुलें तें वाण। सावकाश विकावे।।तु.गा.१९५६.००१ ।।
लाभ जोडला अनंत । घरीं सापडलें वित्त। हातोंहातीं थीत। उरों तळ नल्हाची।।तु.गा.१९५६.००२।।
होतें गोविलें विसारें। माप जालें एकसरें। होतें होरें वारें। तोंचि लाहो साधिला।।तु.गा.१९५६.००३।।
कराया जतन। तुका म्हणे निजधन। केला नारायण। साह्य नेदी विसंबों।।तु.गा.१९५६.००४।।
आतां देह अवसान। हें जतन तोंवरी।।तु.गा.१९५७.००१ ।।
गाऊं नाचूं गदारोळें। जिंकों बळें संसार।।तु.गा.१९५७.००२।।

तुका म्हणे हें बहु सुकुमार। न साहावे भार वचनाचा।।तु.गा.१९६२.००४।।
आपुला तो देह आम्हां उपेक्षीत। कोठें जाऊं हित सांगों कोणा।।तु.गा.१९६३.००१।।
कोण नाहीं दक्ष करितां संसार। आम्हीं हा विचार वमन केला।।तु.गा.१९६३.००२।।
नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचें।।तु.गा.१९६३.००३।।
तुका म्हणे असों चिंतोनियां देवा। मी माझें हा हेवा सारूनियां।।तु.गा.१९६३.००४।।
आपुलाला लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल।।तु.गा.१९६४.००१।।
भाग्यें पावलों या ठाया। आतां काया कुरवंडी।।तु.गा.१९६४.००२।।
पुढती कोठें घडे ऐसें। बहुतां दिसें फावलें।।तु.गा.१९६४.००३।।
तुका म्हणे जाली जोडी। चरण घडी न विसंबें।।तु.गा.१९६४.००४।।
आजि शिवला मांग। माझें विटाळलें आंग।।तु.गा.१९६५.००१।।
यासी घेऊं प्रायश्चित्त। विठ्ठलविठ्ठल हृदयांत।।तु.गा.१९६५.००२।।
झाली क्रोधासवें भेटी। तोंडावाटे नर्क लोटी।।तु.गा.१९६५.००३।।
अनुतापीं न्हाऊं । तुका म्हणे रवी पाहूं।।तु.गा.१९६५.००४।।
आपुला विचार करीन जीवाशीं। काय या जनाशीं चाड मज।।तु.गा.१९६६.००१।।
आपलें स्वहित जाणती सकळ। निरोधितां बळें दुःख वाटे।।तु.गा.१९६६.००२।।
आइको नाइको कथा कोणी तरी। जाऊनियां घरीं निजो सुखें।।तु.गा.१९६६.००३।।
माझी कोण वोज जाला हा शेवट। देखोनियां वाट आणिकां लागे।।तु.गा.१९६६.००४।।
तुका म्हणे भाकूं आपुली करुणा। जयाची वासना तया फळे।।तु.गा.१९६६.००५।।
आमची जोडी ते देवाचे चरण। करावें चिंतन विठोबाचें।।तु.गा.१९६७.००१।।
लागेल तरी कोणी घ्यावें धणीवरी। अमुपचि परि आवडीच्या।।तु.गा.१९६७.००२।।
उभारिला कर प्रसिद्ध या जगीं । करूं केला त्याग मागें पुढें।।तु.गा.१९६७.००३।।
तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न। ऐसें देऊं दान एक वेळां।।तु.गा.१९६७.००४।।
आवडी भोजन प्रकार परवडी। भिन्नभिन्न गोडी एका रसा।।तु.गा.१९६८.००१।।

भोगित्या पंगती लाधलों प्रसाद। तिहीं नाहीं भेद राखियेला।।तु.गा.१९६८.००२।।
पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग। आवडीचे भाग सिद्ध केले।।तु.गा.१९६८.००३।।
तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद। तेणें हो आनंद माझ्या जीवा।।तु.गा.१९६८.००४।।
आम्हां अळंकार मुद्रांचे शृंगार। तुळसीचे हार वाहों कंठीं।।तु.गा.१९६९.००१।।
लाडिके डिंगर पंढरिरायाचे। निरंतर वाचे नामघोष।।तु.गा.१९६९.००२।।
आम्हां आणिकांची चाड चित्तीं नाहीं। सर्व सुख पायीं विठोबाच्या।।तु.गा.१९६९.००३।।
तुका म्हणे आम्ही नेघोंचि या मुक्ति । एकाविण चित्तीं दुजें नाहीं।।तु.गा.१९६९.००४।।
आम्हां आवडे नाम घेतां। तोही पिता संतोषे।।तु.गा.१९७०.००१।।
उभयतां एकचित्त। तरी प्रीत वाढली।।तु.गा.१९७०.००२।।
आम्ही शोभों निकटवासें। अनारिसें न दिसों ।।तु.गा.१९७०.००३।।
तुका म्हणे पांडुरंगे। अवघीं अंगें निवालीं।।तु.गा.१९७०.००४।।
आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ।।तु.गा.१९७१.००१।।
जैसी तैसी माय बरी। मानिल्या त्या माना येरी।।तु.गा.१९७१.००२।।
व्यालीचा कळवळा। जीव बहुत कोंवळा।।तु.गा.१९७१.००३।।
कवतुकें वावरें। तुका म्हणे त्या आधारें।।तु.गा.१९७१.००४।।
आम्हां भय धाक कोणाचा रे पाहें। काळ मशक काय मानव हे।।तु.गा.१९७२.००१।।
आम्हांसी ते काय चिंता या पोटाची। माउली आमुची पांडुरंग।।तु.गा.१९७२.००२।।
काय करावी हे कोणाची मान्यता। करितां अनंता कोण वारी।।तु.गा.१९७२.००३।।
नाहीं शीण आम्हां झालें कवतुक । पुनीत हे लोक करावया।।तु.गा.१९७२.००४।।
तुका म्हणे खातों आनंदाचे लाडू । नका चरफडूं घ्या रे तुम्ही।।तु.गा.१९७२.००५।।
आम्हां वैष्णवांचा। नेम काया मनें वाचा।।तु.गा.१९७३.००१।।
धीर धरूं जिवासाठीं। येऊं नेदूं लाभा तुटी।।तु.गा.१९७३.००२।।
उचित समय। लाज निवारावें भय।।तु.गा.१९७३.००३।।

तुका म्हणे कळा। जाणों नेम नाहीं बाळा।।तु.गा.१९७३.००४।।
आम्हां हरिच्या दासां कांहीं। भय नाहीं त्रयलोकीं।।तु.गा.१९७४.००१।।
देव उभा मागें पुढें। उगवी कोडें संकट।।तु.गा.१९७४.००२।।
जैसा केला तैसा होय। धांवे सोय धरोनि।।तु.गा.१९७४.००३।।
तुका म्हणे असों सुखें। गाऊं मुखें विठोबा।।तु.गा.१९७४.००४।।
आम्ही आइते जेवणार। नलगे सोसावें डोंगर। सुखाचा वेव्हार। तेणेंचि वाढेल।।तु.गा.१९७५.००१।।
ठेवा जोडला मिरासी। ठाव झाला पायांपासीं। नव्हे आणिकांसी। रीघ तेथें यावया।।तु.गा.१९७५.००२।।
बळी दिला जीवभाव। नेणें आणिकांचें नांव। धरिला एकभाव। तो विश्वास फळला।।तु.गा.१९७५.००३।।
तुका म्हणे झालों बळी। आम्ही निकट जवळी। बोलिलों तें पाळी। वचन स्वामी आमुचें।।तु.गा.१९७५.००४।।
आम्ही वीर झुंझार। करूं जमदाढे मार। थापटिले भार। मोड जाला दोषांचा।।तु.गा.१९७६.००१।।
जाला हाहाकार। आले अंकित जुंझार। शंखचक्रांचे शृंगार। कंठीं हार तुळसीचे।।तु.गा.१९७६.००२।।
रामनामांकित बाण। गोपी लाविला चंदन। झळकती निशाण। गरुडटके पताका।।तु.गा.१९७६.००३।।
तुका म्हणे काळ। जालों जिंकोनि निश्चळ। पावला सकळ। भोग आम्हां आमुचा।।तु.गा.१९७६.००४।।
आम्ही सदैव सुडके । जवळी येतां चोर धाके । जाऊं पुढें भिके । कुतरीं घर राखती।।तु.गा.१९७७.००१।।
नांदणूक ऐसें सांगा। नाहीं तरी वायां भागा। थोरपण अंगा। तरी ऐसें आणावें।।तु.गा.१९७७.००२।।
अक्षई साचार। केलें सायासांनीं घर। एरंडासी हार। दुजा भार न साहती।।तु.गा.१९७७.००३।।
धन कण घरोघरीं। पोट भरे भिकेवरी। जतन तीं करी। कोण गुरें वासरें।।तु.गा.१९७७.००४।।
जाली सकळ निश्चिंती। भांडवल शेण माती। झळझळीत भिंती। वृंदावनें तुळसीचीं।।तु.गा.१९७७.००५।।
तुका म्हणे देवा। अवघा निरविला हेवा। कुटुंबाची सेवा। तोचि करी आमुच्या।।तु.गा.१९७७.००६।।
आम्ही हरिचे सवंगडे। जुने ठायींचे वेडे बागडे। हातीं धरूनि कडे। पाठीसवें वागविलों।।तु.गा.१९७८.००१।।
म्हणोनि भिन्न भेद नाहीं। देवा आम्हां एक देहीं। नाहीं जालों कई। एका एक वेगळे।।तु.गा.१९७८.००२।।
निद्रा करितां होतों पायीं। सवेंचि लंका घेतली तई। वानर गोवळ गाई। सवें चारित फिरतसों।।तु.गा.१९७८.००३।।
आम्हां नामाचें चिंतन। राम कृष्ण नारायण। तुका म्हणे क्षण। खातां जेवितां न विसंबों।।तु.गा.१९७८.००४।।

इहलोकीं आम्हां भूषण अवकळा। भोपळा वाकळा अन्न भिक्षा।।तु.गा.१९७९.००१ ।।
निमोली संपदा भयविरहित। सर्वकाळ चित्त समाधान।।तु.गा.१९७९.००२ ।।
छिद्राचा आश्रम उंदीरकुळवाडी। धन नाम जोडी देवाची ते।।तु.गा.१९७९.००३ ।।
तुका म्हणे एके सेवटीं राहणें। वर्ततां या जनाविरहित।।तु.गा.१९७९.००४ ।।
इहलोकींचा हा देहे। देव इच्छितताती पाहें।।तु.गा.१९८०.००१ ।।
धन्य आम्ही जन्मा आलों। दास विठोबाचे झालों।।तु.गा.१९८०.००२ ।।
आयुष्याच्या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें।।तु.गा.१९८०.००३ ।।
तुका म्हणे पावटणी। करूं स्वर्गाची निशाणी।।तु.गा.१९८०.००४ ।।
उखतें आयुष्य जायाचें कलेवर। अवघें वोडंबर विषयांचें।।तु.गा.१९८१.००१ ।।
कोणासी हा लागे पुसणें विचार। मनचि सादर करूं आतां।।तु.गा.१९८१.००२ ।।
उत्पत्ति प्रळय पडिलें दळण। पाकाचें भोजन बीज वाढे।।तु.गा.१९८१.००३ ।।
तुका म्हणे जाऊं अभयाच्या ठायां। रिघों देवराया शरण वेगीं।।तु.गा.१९८१.००४ ।।
उभे चंद्रभागे तीरीं। कट धरोनियां करीं। पाउलें गोजिरीं। विटेवरी शोभलीं।।तु.गा.१९८२.००१ ।।
त्याचा छंद माझ्या जीवा। काया वाचा मनें हेवा। संचिताचा ठेवा। जोडी हातीं लागली।।तु.गा.१९८२.००२ ।।
रूप डोळियां आवडे। कीर्ति श्रवणीं पवाडे। मस्तका नावडे। उठों पायांवरोनि।।तु.गा.१९८२.००३ ।।
तुका म्हणे नाम। ज्याचें नासी क्रोध काम। हरी भवश्रम। उच्चारितां वाचेसी।।तु.गा.१९८२.००४ ।।
उपजोनि मरें। परि हेंचि वाटे बरें।।तु.गा.१९८३.००१ ।।
नाहीं आवडीसी पार। न म्हणवे झालें फार।।तु.गा.१९८३.००२ ।।
अमृताची खाणी। उघडली नव्हे धणी।।तु.गा.१९८३.००३ ।।
तुका म्हणे पचे। विठ्ठल हें मुखा रुचे।।तु.गा.१९८३.००४ ।।
उल्लंघिली लाज। तेणें साधियेलें काज।।तु.गा.१९८४.००१ ।।
सुखें नाचों पैलतीरीं। गेलों भवाचे सागरीं।।तु.गा.१९८४.००२ ।।
नामाची सांगडी। सुखें बांधली आवडी।।तु.गा.१९८४.००३ ।।

तुका म्हणे लोकां। उरली वाचा मारी हाका।।तु.गा.१९८४.००४।।

एक भाव चित्तीं। तरी न लगे कांहीं युक्ति।।तु.गा.१९८५.००१।।

कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें।।तु.गा.१९८५.००२।।

आठवचि पुरे। सुख अवघें मोहरें।।तु.गा.१९८५.००३।।

तुका म्हणे मन। पूजा इच्छी नारायण।।तु.गा.१९८५.००४।।

एका ऐसें एक होतें कोणा काळें। समर्थाच्या बळें काय नव्हे।।तु.गा.१९८६.००१।।

घालूनि बैसलों मिरासीस पाया। जिंकों देवराया संदेह नाहीं।।तु.गा.१९८६.००२।।

केला तो न संडीं आतां कइवाड। वारीन हे आड कामक्रोध।।तु.गा.१९८६.००३।।

तुका म्हणे जाली आळसाची धाडी। नव्हती आली जोडी कळों साच।।तु.गा.१९८६.००४।।

एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ। लेश तोही मळ नाहीं येथें।।तु.गा.१९८७.००१।।

घ्यावें द्यावें आम्हीं आपुलिया सत्ता। न देखों पुसता दुजा कोणी।।तु.गा.१९८७.००२।।

भांडाराची किल्ली माझे हातीं आहे। पाहिजे तो पाहें वाण येथें।।तु.गा.१९८७.००३।।

तुका म्हणे आम्हां विश्वासाच्या बळें। ठेविलें मोकळें देवें येथें।।तु.गा.१९८७.००४।।

एकविध वृत्ति न राहे अंतरीं। स्मरणींच हरी विस्मृति हे।।तु.गा.१९८८.००१।।

कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें। मज माझ्या जीवें साक्षित्वेंसी।।तु.गा.१९८८.००२।।

न राहे निश्चळ जागवितां मना। किती क्षणक्षणा सावरावें।।तु.गा.१९८८.००३।।

तुका म्हणे बहु केले वेवसाव। तेणें रंगें जीव रंगलासे।।तु.गा.१९८८.००४।।

ऐसा दुस्तर भवसागर। नेणों कैसा उतरूं पार।।तु.गा.१९८९.००१।।

कामक्रोधादि सावजें थोर। दिसताती भयंकर।।तु.गा.१९८९.००२।।

मायाममतेचे भोंवरे। घेती भयानक फेरे।।तु.गा.१९८९.००३।।

वासनेच्या लहरी येती। उद्वेग हेलकावे बैसती।।तु.गा.१९८९.००४।।

तरावया एक युक्ति असे। तुका नामनावेमधें बैसे।।तु.गा.१९८९.००५।।

ऐसीं वर्मे आम्हां असोनियां हातीं। कां होऊं नेणतीं दिशाभुली।।तु.गा.१९९०.००१।।

पोटाळुनी पाय कवळीन उभा। कृपे पद्मनाभा हालों नेदीं।।तु.गा.१९९०.००२।।
आपुले इच्छेचे घालोनी संपुटीं। श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन।।तु.गा.१९९०.००३।।
तुका म्हणे बहु सांडियेलीं मतें। आपुल्या पुरतें धरुनी ठेलों।।तु.गा.१९९०.००४।।
ऐसीं ठावीं वर्में। तरी सांडवलों भ्रमें।।तु.गा.१९९१.००१।।
सुखें नाचतों कीर्तनीं। नाहीं आशंकित मनीं।।तु.गा.१९९१.००२।।
ऐसें आलें हाता। बळ तरी गेली चिंता।।तु.गा.१९९१.००३।।
सुख येथें आलें तरी। नाहीं आणिकांची उरी।।तु.गा.१९९१.००४।।
ऐसें केलें देवें। पुढें कांहींच न व्हावें।।तु.गा.१९९१.००५।।
तुका म्हणे मन। आतां झालें समाधान।।तु.गा.१९९१.००६।।
कईं मात माझे ऐकती कान। बोलतां वचन संतां मुखीं।।तु.गा.१९९२.००१।।
केला पांडुरंगें तुझा अंगीकार। मग होईल धीर माझ्या जीवा।।तु.गा.१९९२.००२।।
म्हणऊनि मुख अवलोकितों पाय। हेचि मज आहे थोरी आशा।।तु.गा.१९९२.००३।।
माझिया मनाचा हाचि पैं विश्वास। न करीं सायास साधनांचे।।तु.गा.१९९२.००४।।
तुका म्हणे मज होईल भरंवसा। तरलों मी ऐसा साच भावें।।तु.गा.१९९२.००५।।
करितों कवित्व म्हणाल हें कोणी। नव्हे माझी वाणी पदरींचि।।तु.गा.१९९३.००१।।
माझीये युक्तीचा नव्हे हा प्रकार। मज विश्वंभर बोलवितो।।तु.गा.१९९३.००२।।
काय मी पामर जाणें अर्थभेद। वदवी गोविंद तेंचि वदे।।तु.गा.१९९३.००३।।
निमित्त मापासी बैसविलों आहें। मी तो कांहीं नव्हे स्वामिसत्ता।।तु.गा.१९९३.००४।।
तुका म्हणे आहें पाईकचि खरा। वागवितों मुद्रा नामाची हे।।तु.गा.१९९३.००५।।
करूं तैसें पाठांतर। करुणापर भाषण।।तु.गा.१९९४.००१।।
जिहीं केला मूर्तिमंत। ऐसा संतप्रसाद।।तु.गा.१९९४.००२।।
सोज्वळ केल्या वाटा। आइत्या नीटा मागीलां।।तु.गा.१९९४.००३।।
तुका म्हणे घेऊं धांवा। करूं हांवा तें जोडी।।तु.गा.१९९४.००४।।

करूं याची कथा नामाचा गजर। आम्हां संवसार काय करी।।तु.गा.१९९५.००१।।
म्हणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें। कांपे तया भेणें कळिकाळ।।तु.गा.१९९५.००२।।
आशा भय लाज आड नये चिंता। ऐसी तया सत्ता समर्थाची।।तु.गा.१९९५.००३।।
तुका म्हणे करूं ऐसियाचा संग। जेणें नव्हे भंग चिंतनाचा।।तु.गा.१९९५.००४।।
कल्याण या आशीर्वादें। जाती द्वंद्वें नासोनि।।तु.गा.१९९६.००१।।
आश्वासिलें नारायणें। प्रेमदानें अंतरिंच्या।।तु.गा.१९९६.००२।।
गेली निवारोनि आतां। सकळ चिंता यावरी।।तु.गा.१९९६.००३।।
तुका म्हणे गातां गीत। आलें हित सामोरें।।तु.गा.१९९६.००४।।
काग बग रिठा मारिले बाळपणीं। अवघी दैत्यखाणी बुडविली।।तु.गा.१९९७.००१।।
तो मज दावा तो मज दावा। नंदनंदन जीवा आवडे तो।।तु.गा.१९९७.००२।।
गोवर्धन गिरी उचलिला करीं। गोकुळ भीतरीं राखियेलें।।तु.गा.१९९७.००३।।
वधुनि भौमासुरा आणिल्या गोपांगना। राज्य उग्रसेना मथुरेचें।।तु.गा.१९९७.००४।।
पांडव जोहरीं राखिले कुसरी। विवराभीतरीं चालविलें।।तु.गा.१९९७.००५।।
तुका म्हणे तो हा भक्तांचा कृपाळ। दुष्ट जना काळ नारायण।।तु.गा.१९९७.००६।।
काय उणें मज पांडुरंगा पायीं। रिद्धिसिद्धि ठायीं वोळंगती।।तु.गा.१९९८.००१।।
कोण पाहे सुखा नाशिवंताकडे। तृष्णेचीं बापुडें नव्हों आम्ही।।तु.गा.१९९८.००२।।
सर्व सुखें आम्हीं केलीं पावटणी। पापपुण्यें दोन्ही उडविलीं।।तु.गा.१९९८.००३।।
तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ। वसविली पेठ वैष्णवांची।।तु.गा.१९९८.००४।।
काय कृपेविण घालावें सांकडें। निश्चिंती निवाडें कोण्या एका।।तु.गा.१९९९.००१।।
आहों तैसीं पुढें असों दीनपणें। वेंचुनि वचनें करुणेची।।तु.गा.१९९९.००२।।
धरूनि भय आतां काय वाहों चिंता। काय करूं आतां आप्तपण।।तु.गा.१९९९.००३।।
तुका म्हणे आम्ही भावहीन जीव। म्हणउनि देव दुरे दूर।।तु.गा.१९९९.००४।।
काय शरीरापें काम। कृपा साधावया प्रेम। उचिताचे धर्म। भागा आले ते करूं ।।तु.गा.२०००.००१।।

देईन हाक नारायणा। ते तों नाकळे बंधना। पंढरीचा राणा। आइकोन धांवेल।।तु.गा.२०००.००२।।
सातांपांचांचें गोठलें। प्रारब्धें आकारलें। आतां हें संचलें। असो भोगा सांभाळीं।।तु.गा.२०००.००३।।
फावली तें बरवी संधि। सावधान करूं बुद्धी। तुका म्हणे मधीं। कोठें नेघें विसांवा।।तु.गा.२०००.००४।।
काळाचेही काळ। आम्ही विठोबाचे लडिवाळ।।तु.गा.२००१.००१।।
करूं सत्ता सर्वांठायीं। वसों निकटवासें पायीं।।तु.गा.२००१.००२।।
ऐसी कोणाची वैखरी। वदे आमुचे सामोरी।।तु.गा.२००१.००३।।
तुका म्हणे बाण। हातीं हरिनाम तीक्ष्ण।।तु.गा.२००१.००४।।
किती वेळां जन्मा यावें। नित्य व्हावें फजीत।।तु.गा.२००२.००१।।
म्हणऊनि जीव भ्याला। शरण गेला विठोसी।।तु.गा.२००२.००२।।
प्रारब्ध हें पाठीं गाढें। न सरे पुढें चालतां।।तु.गा.२००२.००३।।
तुका म्हणे रोकडी हे। होती पाहें फजीती।।तु.गा.२००२.००४।।
कोण सांगायास। गेलें होतें देशोदेश।।तु.गा.२००३.००१।।
जालें वाऱ्या हातीं माप। समर्थ तो माझा बाप।।तु.गा.२००३.००२।।
कोणाची हे सत्ता। जाली वाचा वदविता।।तु.गा.२००३.००३।।
तुका म्हणे या निश्चयें। माझें निरसलें भय।।तु.गा.२००३.००४।।
कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट। कधीं खटपट सरेल हे।।तु.गा.२००४.००१।।
कोणां आराणूक होईल कोणे काळीं। आपुलालीं जाळीं उगवूनि।।तु.गा.२००४.००२।।
माझा येणें दु:खें फुटतसे प्राण। न कळतां जन सुखी असे।।तु.गा.२००४.००३।।
भोगा आधीं मनें मानिलासे त्रास। पाहे लपायास ठाव कोठें।।तु.गा.२००४.००४।।
तुका म्हणे देतों देवाचें गाऱ्हाणें। माझें ऋण येणें सोसियेलें।।तु.गा.२००४.००५।।
कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल। जरी ठावा असेल तुम्हां कोणा।।तु.गा.२००५.००१।।
लागतसें पायां येतों लोटांगणीं। मात तरी कोणी सांगा याची।।तु.गा.२००५.००२।।
गुण रूप याचे वाणितां या संतां। मज क्षेम देतां सुख वाटे।।तु.गा.२००५.००३।।

सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं। पांडुरंग कोणी दावी तया।।तु.गा.२००५.००४।।
तुका म्हणे गाईवत्सा तडातोडी। तैसी जाते घडी एकी मज।।तु.गा.२००५.००५।।
कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता। बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा।।तु.गा.२००६.००१।।
कृष्ण माझा गुरु कृष्ण माझा तारूं । उतरी पैलतीरू भवनदीचा।।तु.गा.२००६.००२।।
कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन। सोईरा सज्जन कृष्ण माझा।।तु.गा.२००६.००३।।
तुका म्हणे माझा श्रीकृष्ण विसांवा। वाटे न करावा परता जीवा।।तु.गा.२००६.००४।।
कृपेचे सागर हेचि साधुजन। तिंहीं कृपादान केले मज।।तु.गा.२००७.००१।।
बोबडे वाणीचा केला अंगीकार। तेणें माझा स्थिर केला जीव।।तु.गा.२००७.००२।।
तेणें सुखें मन स्थिर झालें ठायीं। संतीं दिला पायीं ठाव मज।।तु.गा.२००७.००३।।
नाभी नाभी ऐसें बोलिले वचन। तें माझें कल्याण सर्वस्वही।।तु.गा.२००७.००४।।
तुका म्हणे झालों आनंदें निर्भर। नाम निरंतर घोष करूं ।।तु.गा.२००७.००५।।
खरें नानवट निक्षेपीचें जुनें। काढिलें ठेवणें समर्थांचे।।तु.गा.२००८.००१।।
मजुराच्या हातें मापाचा उकल। मी तों येथें फोल सत्ता त्याची।।तु.गा.२००८.००२।।
कुल्लाळाच्या हातें घटाच्या उत्पत्ति। पाठवी त्या जाती पाकस्थळा।।तु.गा.२००८.००३।।
तुका म्हणे जीवन तें नारायणीं। प्रभा ते किरणीं प्रकाशाची।।तु.गा.२००८.००४।।
खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें। नव्हती हीं छंदें नासिवंतें।।तु.गा.२००९.००१।।
माझा मायबाप उभा विटेवरी। कवतुकें करी कृपादान।।तु.गा.२००९.००२।।
प्रसादाची वाणी वदती उत्तरें। नाहीं मतांतरें जोडियेलीं।।तु.गा.२००९.००३।।
तुका म्हणे रस वाढतियां अंगें। छाया पांडुरंगें केली वरी।।तु.गा.२००९.००४।।
खेळों मनासवें जीवाच्या संवादें। कौतुकें विनोदें निरंजनीं।।तु.गा.२०१०.००१।।
पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां। होतसे डोहळा आवडीसी।।तु.गा.२०१०.००२।।
एकांताचें सुख जडलें जिव्हारीं। वीट परिचारी बरा आला।।तु.गा.२०१०.००३।।
जगा ऐसी बुद्धि नव्हे आतां कदा। लंपट गोविंदा झालों पायीं।।तु.गा.२०१०.००४।।

आणिक ते चिंता नलगे करावी। नित्य नित्य नवी आवडी हे ।।तु.गा.२०१०.००५ ।।
तुका म्हणे धडा राहिला पडोन। पांडुरंगीं मन विसांवलें ।।तु.गा.२०१०.००६ ।।
गाऊं नेणें परी मी कांहीं गाईन। शरण जाईन पांडुरंगा ।।तु.गा.२०११.००१ ।।
ब्रह्मांडनायक मी त्याचा अंकित। काय यमदूत करिती काळ ।।तु.गा.२०११.००२ ।।
वेश्या ज्याच्या नामें तारिली गणिका। अजामेळासारिखा पापरासी ।।तु.गा.२०११.००३ ।।
चरणींच्या रजें अहिल्या तारिली। रूपवंत केली कुब्जा दासी ।।तु.गा.२०११.००४ ।।
पृथिवी तारिली पाताळासी जातां। तुका म्हणे आतां आम्ही किती ।।तु.गा.२०११.००५ ।।
गुणांची आवडी वाचेचा पसरु। पडिला विसरू सर्व रसां ।।तु.गा.२०१२.००१ ।।
आदि मध्य अंतीं नाहीं अवसान। जीवनीं जीवन मिळोनि गेले ।।तु.गा.२०१२.००२ ।।
रामकृष्ण नाममाळा हे साजिरी। ओविली गोजिरी कंठाजोगी ।।तु.गा.२०१२.००३ ।।
तुका म्हणे तनु झालीसे शीतळ। अवघी सकळ ब्रह्मानंदें ।।तु.गा.२०१२.००४ ।।
गाढवाचे घोडें। आम्ही करूं दृष्टीपुढें ।।तु.गा.२०१३.००१ ।।
चघळी वाहाणा। माघारिया बांडासुणा ।।तु.गा.२०१३.००२ ।।
सोंग संपादणी। तरी करूं शुद्ध वाणी ।।तु.गा.२०१३.००३ ।।
तुका म्हणे खळ। करूं समयी निर्मळ ।।तु.गा.२०१३.००४ ।।
घालूनी लोळणी पडलों अंगणीं। सिंचा सिंचवणी तीर्थवरी ।।तु.गा.२०१४.००१ ।।
वोल्हावेल तनु होईल शीतळ। झाली हळहळ बहु तापें ।।तु.गा.२०१४.००२ ।।
पावेन या ठाया कईं झालें होतें। आलों अवचितें उष्ट्यावरि ।।तु.गा.२०१४.००३ ।।
तुका म्हणे कोणी जाणवा राउळीं। येईल जवळीं पांडुरंग ।।तु.गा.२०१४.००४ ।।
चतुर मी जालों आपुल्या भोंवता। भावेंविण रिता स्फुंद अंगीं ।।तु.गा.२०१५.००१ ।।
आतां पुढें वायां जावें हें तें काई। कामक्रोधें ठायीं वास केला ।।तु.गा.२०१५.००२ ।।
गुणदोष आले जगाचे अंतरा। भूतांच्या मत्सरावरी बुद्धि ।।तु.गा.२०१५.००३ ।।
तुका म्हणे करूं उपदेश लोका। नाहीं जालों एका परता दोषा ।।तु.गा.२०१५.००४ ।।

चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार। सकळ बिढार संपत्तीचें।।तु.गा.२०१६.००१ ।।
कंठीं धरीन नाम अमृताची वल्ली। होईल राहिली शीतळ तनु।।तु.गा.२०१६.००२ ।।
पाहेन श्रीमुख साजिरे सुंदर। सकळां आगर लावण्याचें।।तु.गा.२०१६.००३ ।।
करीन अंगसंग बाळकाचे परी। बैसेन तो वरी नुतरें कडिये।।तु.गा.२०१६.००४ ।।
तुका म्हणे हा केला तैसा होय। धरिली मनें सोय विठोबाची।।तु.गा.२०१६.००५ ।।
चवदा भुवनें जयाचिये पोटीं। तोचि आम्हीं कंठीं सांठविला।।तु.गा.२०१७.००१ ।।
काय एक उणें आमुचिये घरीं। वोळंगती द्वारीं रिद्धिसिद्धि।।तु.गा.२०१७.००२ ।।
असुर जयानें घातले तोडरीं। आम्हांसी तो जोडी कर दोन्ही।।तु.गा.२०१७.००३ ।।
रूप रेखा नाहीं जयासी आकार। आम्हीं तो साकार भक्तीं केला।।तु.गा.२०१७.००४ ।।
अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं। समान तो मुंगी आम्हांसाठीं।।तु.गा.२०१७.००५ ।।
तुका म्हणे आम्ही देवाहूनी बळी। जालों हे निराळी ठेवुनि आशा।।तु.गा.२०१७.००६ ।।
जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं।।तु.गा.२०१८.००१ ।।
अंधापुढें जेणें दिधला आधार। त्याचा हा विचार तोचि जाणे।।तु.गा.२०१८.००२ ।।
शरणागता जेणें घातलें पाठीशीं। तो जाणे तेविशीं राखों तया।।तु.गा.२०१८.००३ ।।
कासे लागे तया न लगती सायास। पोहोणार त्यास पार पावी।।तु.गा.२०१८.००४ ।।
तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं। दिला त्याची गती तोचि जाणे।।तु.गा.२०१८.००५ ।।
जरि आड येती लाज। कैसें काज साधतें।।तु.गा.२०१९.००१ ।।
करणें केलें उठाउठी। पायीं मिठी घातली।।तु.गा.२०१९.००२ ।।
समर्पिला जीव भाव। धरिला भाव अखंड।।तु.गा.२०१९.००३ ।।
तुका म्हणे आड कांहीं। काळ नाहीं घातला।।तु.गा.२०१९.००४ ।।
जाऊं देवाचिया गांवां। देव देईल विसांवा।।तु.गा.२०२०.००१ ।।
देवा सांगो सुखदुःख। देव निवारील भूक ।।तु.गा.२०२०.००२ ।।
घालूं देवासीच भार। देव सुखाचा सागर।।तु.गा.२०२०.००३ ।।

जेविले ते संत मागें उष्टावळी। अवघ्या पत्रावळी करूनी झाडा ॥तु.गा.२०२६.००१॥
सोंवळ्या ओंवळ्या राहिलों निराळा। पासूनि सकळां अवघ्या दुरीं ॥तु.गा.२०२६.००२॥
परें परतें मज न लगे सांगावें । हें तों बरें देवें शिकविलें ॥तु.गा.२०२६.००३॥
दुसऱ्यातें आम्ही नाहीं आतळत । जाणोनि संकेत उभा असे ॥तु.गा.२०२६.००४॥
येथें कांहीं कोणी न धरावी शंका। मज चाड एका भोजनाची ॥तु.गा.२०२६.००५॥
लांचावला तुका मारितसे झड। पुरविलें कोड नारायणें ॥तु.गा.२०२६.००६॥
ज्यानें आड यावें कांहीं। त्याचें नाहीं बळ आतां ॥तु.गा.२०२७.००१॥
मन येथें साह्य जालें। हरिच्या धालें गुणवादीं ॥तु.गा.२०२७.००२॥
चुकुर तो गेला काळ। जालें बळ संगाचें ॥तु.गा.२०२७.००३॥
तुका म्हणे धरूं सत्ता। होईल आतां करूं तें ॥तु.गा.२०२७.००४॥
डोळां भरिलें रूप। चित्तीं पायांचा संकल्प ॥तु.गा.२०२८.००१॥
अवघीं घातलीं वांटणी। प्रेम राहिलें कीर्तनीं ॥तु.गा.२०२८.००२॥
जिव्हा केली माप। रासी हरिनाम अमुप ॥तु.गा.२०२८.००३॥
भरूनियां भाग। तुका बैसला पांडुरंग ॥तु.गा.२०२८.००४॥
तपासी तें मन करूं पाहे घात। धरोनि सांगात इंद्रियांचा ॥तु.गा.२०२९.००१॥
म्हणोनि कीर्तन आवडले मज। सांडोनियां लाज हेंचि करी ॥तु.गा.२०२९.००२॥
पहातां आगमनिगमाचे ठाव। तेथें नाहीं भाव एकविध ॥तु.गा.२०२९.००३॥
तुका म्हणे येथें नाहीं वो विकार। नाम एक सार विठोबाचें ॥तु.गा.२०२९.००४॥
तीर्थींची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म। जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥तु.गा.२०३०.००१॥
बहु बरी ऐसी भाविकांची जोडी। काळ नाहीं घडी जात वायां ॥तु.गा.२०३०.००२॥
करूनि चिंतन करवावें आणिकां। तो या झाला लोकां नाव जगीं ॥तु.गा.२०३०.००३॥
तुका म्हणे ऐसे परउपकारी। त्यांच्या पायांवरी डोई माझी ॥तु.गा.२०३०.००४॥
जोंवरि तोंवरि शोभतील गारा। जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥तु.गा.२०३१.००१॥

जोंवरि तोंवरि शोभती दीपिका। नुगवतां एका भास्करासी ।।तु.गा.२०३१.००२ ।।
जोंवरि तोंवरि सांगती संतपणाचिया गोष्टी। जंव नाहीं भेटी तुकयासवे ।।तु.गा.२०३१.००३ ।।
दिनरजनीं हाचि धंदा। गोविंदाचे पवाडे ।।तु.गा.२०३२.००१ ।।
संकल्पिला देह देवा। सकळ हेवा तें ठायीं ।।तु.गा.२०३२.००२ ।।
नाहीं अवसान घडी। सकळ जोडी इंद्रियां।।तु.गा.२०३२.००३ ।।
कीर्ति मुखें गर्जे तुका। करी लोकां सावध ।।तु.गा.२०३२.००४ ।।
देवकीनंदनें। केले आपुल्या चिंतनें ।।तु.गा.२०३३.००१ ।।
मज आपुलिया ऐसें। मना लावूनियां पिसें ।।तु.गा.२०३३.००२ ।।
गोवळे गोपाळां। केलें लावूनियां चाळा ।।तु.गा.२०३३.००३ ।।
तुका म्हणे संग। केला दूरि नव्हे मग ।।तु.गा.२०३३.००४ ।।
देव तिळीं आला। गोडें गोड जीव धाला ।।तु.गा.२०३४.००१ ।।
साधला हा पर्वकाळ। गेला अंतरींचा मळ ।।तु.गा.२०३४.००२ ।।
पापपुण्य गेलें। एका स्नानेंचि खुंटलें ।।तु.गा.२०३४.००३ ।।
तुका म्हणे वाणी। शुद्ध जनार्दन जनीं ।।तु.गा.२०३४.००४ ।।
देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासी होती विकल्प ते ।।तु.गा.२०३५.००१ ।।
वाहिले देह हें देवा एकसरें । होईल तें बरें तेणें द्वारें ।।तु.गा.२०३५.००२ ।।
होता भार त्याची निवारली खंती । येथें आतां रिती साठवण ।।तु.गा.२०३५.००३ ।।
तुका म्हणे इच्छे पावविले कष्ट । म्हणऊनि नष्ट दुरावली ।।तु.गा.२०३५.००४ ।।
देवा वरिल भार । काढूं नये कांहीं पर ।।तु.गा.२०३६.००१ ।।
तहान भुके आठवण । घडे तें बरें चिंतन ।।तु.गा.२०३६.००२ ।।
देखावी निश्चिंती। तेचि अंतर श्रीपती ।।तु.गा.२०३६.००३ ।।
वैभव सकळ। तुका मानितो विटाळ ।।तु.गा.२०३६.००४ ।।
देवें जीव धाला। संसार तो कडू झाला ।।तु.गा.२०३७.००१ ।।

तेचि येताती ढेकर। आनंदाचे हरिहर।।तु.गा.२०३७.००२।।
वेधी आणिकांस। ऐसा जया अंगीं कस।।तु.गा.२०३७.००३।।
तुका म्हणे भूक । येणें न लगे आणीक ।।तु.गा.२०३७.००४।।
देहभाव आम्ही राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ।।तु.गा.२०३८.००१।।
आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ।।तु.गा.२०३८.००२।।
म्हणउनी नाहीं सुख दु:ख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ।।तु.गा.२०३८.००३।।
जालों मी नि:संग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां।।तु.गा.२०३८.००४।।
तुका म्हणे जालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे ।।तु.गा.२०३८.००५।।
दैन्य दु:ख आम्हां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ।।तु.गा.२०३९.००१।।
सर्व सुखें येती मानें लोटांगणी । कोण यांसी आणी दृष्टीपुढें ।।तु.गा.२०३९.००२।।
आमुची आवडी संतसमागम । आणीक त्या नाम विठोबाचें ।।तु.गा.२०३९.००३।।
आमुचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्दैवा कोणा चाड ।।तु.गा.२०३९.००४।।
तुका म्हणे पोटीं सांठविला देव । न्यून तो हा भाव कोण आम्हां ।।तु.गा.२०३९.००५।।
दोहीं बाहीं आम्हां वास । असो कास घालूनि ।।तु.गा.२०४०.००१।।
बोल बोलों उभयतां । स्वामीसत्ता सेवेची ।।तु.गा.२०४०.००२।।
एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीती ।।तु.गा.२०४०.००३।।
तुका म्हणे जोहारितों । आहे होतों ते ठायीं ।।तु.गा.२०४०.००४।।
द्रव्याचा तों आम्ही धरितों विटाळ । तया पाठीं काळ लाग करी ।।तु.गा.२०४१.००१।।
करोनियां हेंचि राहिलों जीवन। एक नारायण नाम ऐसें ।।तु.गा.२०४१.००२।।
तुका म्हणे हेंचि करूनि जतन । आलिया ही दान याचकासी ।।तु.गा.२०४१.००३।।
धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी।।तु.गा.२०४२.००१।।
वाचा बोलों वेदनीति । करूं संतीं केलें तें ।।तु.गा.२०४२.००२।।
न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ।।तु.गा.२०४२.००३।।

तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ।।तु.गा.२०४२.००४।।
धर्माचें पाळण । करणें पाखांड खंडण ।।तु.गा.२०४३.००१।।
हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ।।तु.गा.२०४३.००२।।
तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेउनि बाण फिरे ।।तु.गा.२०४३.००३।।
नाहीं भीड भार। तुका म्हणे साना थोर ।।तु.गा.२०४३.००४।।
धरावें तें भय । जाती अंतरोनि पाय ।।तु.गा.२०४४.००१।।
झाल्या तुटी देवासवें । काय वांचोनि करावें ।।तु.गा.२०४४.००२।।
कोणासी पारिखें । लेखूं आपणासारिखें ।।तु.गा.२०४४.००३।।
तुका म्हणे असो । अथवा हे आतां नसो ।।तु.गा.२०४४.००४।।
धरिलीं जीं होतीं चित्तीं । डोळां तेचि दिसती ।।तु.गा.२०४५.००१।।
आलें आवडीसी फळ । झालें कारण सकळ ।।तु.गा.२०४५.००२।।
घेईन भातुकें । मागोनियां कवतुकें ।।तु.गा.२०४५.००३।।
तुका म्हणे लाड । विठोबा पुरवील कोड ।।तु.गा.२०४५.००४।।
धरोनि दोन्हीं रूपें पाळणें संहार । करी कोप रुद्र दयाळ विष्णु ।।तु.गा.२०४६.००१।।
जटाजूट एका मुगुट माथां शिरीं । कमळापति गौरीहर एक ।।तु.गा.२०४६.००२।।
भस्मउद्धळण लक्ष्मीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ।।तु.गा.२०४६.००३।।
वैजयंती माळ वासुकीचा हार । लेणें अळंकार हरिहरा ।।तु.गा.२०४६.००४।।
कपाळ झोळी एका स्मशानींचा वास । एक जगन्निवास विश्वंभर ।।तु.गा.२०४६.००५।।
तुका म्हणे मज उभयरूपीं एक । सारोनि संकल्प शरण आलों ।।तु.गा.२०४६.००६।।
नका मजपाशीं । वदों प्रपंचाचें विशीं ।।तु.गा.२०४७.००१।।
आतां नाइकवे कानीं । मज देवाविण वाणी ।।तु.गा.२०४७.००२।।
येऊनियां रूपा । कोण पाहे पुण्यपापा ।।तु.गा.२०४७.००३।।
मागें आजिवरी । जालें माप नेलें चोरी ।।तु.गा.२०४७.००४।।

सांडियेलीं पानें । पुढें पिका अवलोकनें ।।तु.गा.२०४७.००५ ।।
पडों नेदी तुका । आड गुंफूं कांहीं चुका ।।तु.गा.२०४७.००६ ।।
नको ऐसें जालें अन्न । भूक ताहान ते गेली ।।तु.गा.२०४८.००१ ।।
गोविंदाची आवडी जीवा । करिन सेवा धणीवरि ।।तु.गा.२०४८.००२ ।।
राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहींचे ।।तु.गा.२०४८.००३ ।।
देह धरिला त्याचें फळ । आणीक काळ धन्य हा ।।तु.गा.२०४८.००४ ।।
जाऊं नेदी करितां सोस । क्षमा दोष करवीन ।।तु.गा.२०४८.००५ ।।
तुका म्हणे याचे पाठी । आतां साटी जीवाची ।।तु.गा.२०४८.००६ ।।
न पडो आतां हाडीं घाव । मध्यें कींव नासक ।।तु.गा.२०४९.००१ ।।
करविली आत्महत्या। जीवा कां त्या द्वंद्वाच्या।।तु.गा.२०४९.००२ ।।
आशापाशीं गुंतला गळा । तेणें कळाहीन झालों ।।तु.गा.२०४९.००३ ।।
तुका म्हणे लावूं मुळीं । जीवकुळीं थारेसी ।।तु.गा.२०४९.००४ ।।
नये पुसों आज्ञा केली एकसरें । आम्हांसी दुसरें नाहीं आतां ।।तु.गा.२०५०.००१ ।।
ज्याचा तो बळिवंत सर्व निवारता । आम्हां काय चिंता करणें लागे ।।तु.गा.२०५०.००२ ।।
बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ।।तु.गा.२०५०.००३ ।।
तुका म्हणे मज होईल वारिता । तरि काय सत्ता नाहीं हातीं ।।तु.गा.२०५०.००४ ।।
नव्हता भेटी तोंचि बरें । होतां चोरें नाडिलें ।।तु.गा.२०५१.००१ ।।
अवघियांचा केला झाडा । रिता वाडा खोंकर ।।तु.गा.२०५१.००२ ।।
चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हरुनि ।।तु.गा.२०५१.००३ ।।
तुका म्हणे मूळा आलें । होतें केलें तैसेंचि ।।तु.गा.२०५१.००४ ।।
नव्हतों सावचित्त । तेणें अंतरलें हित ।।तु.गा.२०५२.००१ ।।
पडिला नामाचा विसर । वाढविला संवसार ।।तु.गा.२०५२.००२ ।।
लटिक्याचे पुरीं । गेलों वाहोनियां दुरीं ।।तु.गा.२०५२.००३ ।।

तुका म्हणे नाव । आम्हां सांपडला भाव ।।तु.गा.२०५२.००४।।
न संडावा ठाव । ऐसा निश्चयाचा भाव ।।तु.गा.२०५३.००१।।
आतां पुरे पुन्हां यात्रा । हेचि सारूनि सर्वत्रा ।।तु.गा.२०५३.००२।।
सन्निधचि सेवा । असों करूनियां देवा ।।तु.गा.२०५३.००३।।
आज्ञेच्या पाळणें । असें तुका संतां म्हणे ।।तु.गा.२०५३.००४।।
नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ।।तु.गा.२०५४.००१।।
चेष्टविलीं माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालतीं ।।तु.गा.२०५४.००२।।
नामरूपें रंगा आलीं । तेचि चाली स्वभावें ।।तु.गा.२०५४.००३।।
तुका म्हणे पांडुरंगे । अंग संगें कवळिलें ।।तु.गा.२०५४.००४।।
नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें ।।तु.गा.२०५५.००१।।
म्हणऊनि आतां वियोग न साहे । लांचावलें देहे संघष्टणें ।।तु.गा.२०५५.००२।।
वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिकचि प्रेम चढे घेतां ।।तु.गा.२०५५.००३।।
तुका म्हणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ।।तु.गा.२०५५.००४।।
नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संतांचिया संगें पोट भरीं ।।तु.गा.२०५६.००१।।
चतुराचे सभें पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ।।तु.गा.२०५६.००२।।
तुका म्हणे नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ।।तु.गा.२०५६.००३।।
नाहीं म्यां वंचिला मंत्र कोणापाशीं । राहिलों जिवासी धरूनि तो ।।तु.गा.२०५७.००१।।
विटेवरी भावें ठेवियलें मन । पाउलें समान चिंतीतसे ।।तु.गा.२०५७.००२।।
पावविलों पार धरिला विश्वास । घालूनियां कास बळकट ।।तु.गा.२०५७.००३।।
तुका म्हणे मागें पावले उद्धार । तिहीं हा आधार ठेविलासे ।।तु.गा.२०५७.००४।।
नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । म्हणऊनि मन स्थिरावलें ।।तु.गा.२०५८.००१।।
धरियेली जीवीं पाउलें कोवळीं । कंठीं एकावळी नाममाळा ।।तु.गा.२०५८.००२।।
शीतळ होऊनी पावलों विश्रांती । न साहे पुढती चाली चित्ता ।।तु.गा.२०५८.००३।।

तुका म्हणे जाले सकळ सोहळे । पुरविलें डोहळे पांडुरंगें ।।तु.गा.२०५८.००४।।
विरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ।।तु.गा.२०५९.००१।।
म्हणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ।।तु.गा.२०५९.००२।।
देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा।।तु.गा.२०५९.००३।।
तुका म्हणे देव अंतरे यामुळें । आशामोहजाळें दुःख वाढे ।।तु.गा.२०५९.००४।।
नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणी ।।तु.गा.२०६०.००१।।
नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापूनियां ।।तु.गा.२०६०.००२।।
मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ।।तु.गा.२०६०.००३।।
राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारी । बोबड्या उत्तरीं हेंचि ध्यान ।।तु.गा.२०६०.००४।।
तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ।।तु.गा.२०६०.००५।।
नेणें जप तप अनुष्ठान याग। काळें तंव लाग घेतलासे ।।तु.गा.२०६१.००१।।
रिघालों या भेणें देवाचे पाठीसी। लागे ज्याचें त्यासी सांभाळणें।।तु.गा.२०६१.००२।।
मापें माप सळे चालिली चढती। जाली मग राती काय चाले।।तु.गा.२०६१.००३।।
तुका म्हणे चोरा हातीं जें वांचले। लाभावरी आलें वारिलेशु।।तु.गा.२०६१.००४।।
न्यावयासी मूळ पाठवील कधीं। मज कृपानिधि पांडुरंग।।तु.गा.२०६२.००१।।
प्राण फुटे माझा त्याचिया वियोगें। घडी जाय युगें येकी येकी।।तु.गा.२०६२.००२।।
त्याचिये गांवींची आवड ती जीवा। जीव हा सांडावा वोवाळूनी।।तु.गा.२०६२.००३।।
दिनो दिन चिंता वाटते बहुत। नावडे संचित करावेंसें।।तु.गा.२०६२.००४।।
तुका म्हणे आतां आहे तेंचि सरो। कोण करी भरोवरी मग।।तु.गा.२०६२.००५।।
पडिलों भोवणीं । होतों बहु चिंतवणी।।तु.गा.२०६३.००१।।
होतों चुकलों मारग। लाहो केला लागवेग।।तु.गा.२०६३.००२।।
इंद्रियांचे संदी। होतों सांपडलों बंदी।।तु.गा.२०६३.००३।।
तुका म्हणे बरें जालें। विठ्ठलसें वाचे आलें।।तु.गा.२०६३.००४।।

पढिये तें मागा पांडुरंगापाशीं। मज दुर्बळासी काय पीडा।।तु.गा.२०६४.००१।।
याचसाठीं दुराविला संवसार। वाढे हे अपार माया तृष्णा।।तु.गा.२०६४.००२।।
कांहीं करितां कोठें नव्हे समाधान। विचारितां पुण्य तेंचि पाप।।तु.गा.२०६४.००३।।
तुका म्हणे आतां निश्चळचि भलें। तुज आठविलें पांडुरंगा।।तु.गा.२०६४.००४।।
पाप पुण्य दोन्ही वाहाती मारग। स्वर्गनर्कभोग यांची पेणीं।।तु.गा.२०६५.००१।।
एका आड एक नलगे पुसावें। जेविल्या देखावें मागें भूक ।।तु.गा.२०६५.००२।।
राहाटीं पडिलीं भरोनियां रितीं। होतील मागुती येतीं जातीं।।तु.गा.२०६५.००३।।
तुका म्हणे आम्ही खेळतों या मधीं। नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों।।तु.गा.२०६५.००४।।
पाववावें ठाया। असे सवें बोलों तया।।तु.गा.२०६६.००१।।
भावा ऐसी क्रिया राखे। खोट्या खोटेपणें वाखे।।तु.गा.२०६६.००२।।
न ठेवूं अंतर। कांहीं भेदाचा पदर।।तु.गा.२०६६.००३।।
तुका म्हणे जीवें भावें। सत्या मानविजे देवें।।तु.गा.२०६६.००४।।
पावलों प्रसाद इच्छा केली तैसी। झालें या चित्तासी समाधान।।तु.गा.२०६७.००१।।
मायबाप माझा उभा कृपादानी। विटे सम जोडूनि पादांबुजें।।तु.गा.२०६७.००२।।
सांभाळासी येऊं नेदीतां उणीव। अधिकारगौरव राखे तैसा।।तु.गा.२०६७.००३।।
तुका म्हणे सर्व अंतर्बाह्य आहे। जया तैसा राहे कवळूनी।।तु.गा.२०६७.००४।।
पाहतां श्रीमुख सुखावलें सुख। डोळियांची भूक न वजे माझ्या।।तु.गा.२०६८.००१।।
जिव्हें गोड तीन अक्षरांचा रस। अमृत जयास फिकें पुढें ।।तु.गा.२०६८.००२।।
श्रवणाची वाट चोखाळली शुद्ध। गेले भेदाभेद निवारोनी।।तु.गा.२०६८.००३।।
महामळें मन होतें जें गादलें। शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें।।तु.गा.२०६८.००४।।
तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन। विठ्ठल निधान सांपडलें।।तु.गा.२०६८.००५।।
पाळियेले लळे। माझे विठ्ठले कृपाळे।।तु.गा.२०६९.००१।।
बहुजन्माचें पोसणें। सरतें पायांपाशीं तेणें।।तु.गा.२०६९.००२।।

सवे दिली लागों। भातें आवडीचें मागों।।तु.गा.२०६९.००३।।
तुका म्हणे भिन्न। नाहीं दिसों दिलें क्षण।।तु.गा.२०६९.००४।।
पाळिला विध तो आजि फळा आला। ऐसा हा कळला साच भाव।।तु.गा.२०७०.००१।।
नामाची आवडी लागलीसे चित्ता। पाय आठवितां सुख वाटे।।तु.गा.२०७०.००२।।
धरिल्या देहाचें साधलें कारण। पुढिल्या खंडण गर्भवासा।।तु.गा.२०७०.००३।।
तुका म्हणे लाभ झाला एकसरें। आणिक दुसरें नाहीं आतां।।तु.गा.२०७०.००४।।
पाळोनियां मोठें केलें। त्यासी बोलें ओळखी।।तु.गा.२०७१.००१।।
जवळोनि नवजे दुरी। लाड करी कौतुकें।।तु.गा.२०७१.००२।।
खूण उभा विटेवर। कटीं कर ठेउनियां।।तु.गा.२०७१.००३।।
तुका म्हणे घातली वरी। झुलीं थोरी मोलाची।।तु.गा.२०७१.००४।।
पुसावेंसें हेंचि वाटे । जें जें भेटे तयासी ।।तु.गा.२०७२.००१।।
देव कृपा करील मज । काय लाज राखील ।।तु.गा.२०७२.००२।।
अवघियांचा विसर जाला । हा राहिला उद्योग ।।तु.गा.२०७२.००३।।
तुका म्हणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसा ।।तु.गा.२०७२.००४।।
पुष्ट कांति निवती डोळे । हे सोहळे श्रीरंगीं ।।तु.गा.२०७३.००१।।
अंतर्बाहीं विलेपन। हें भूषण मिरवूं।।तु.गा.२०७३.००२।।
इच्छेऐसी आवडी पुरे । विश्वंभरे जवळीं ।।तु.गा.२०७३.००३।।
तुका करी नारायण। या सेवन नामाचें।।तु.गा.२०७३.००४।।
पोट धालें आतां जीवनीं आवडी । पुरवावी परवडी बहुतांची।।तु.गा.२०७४.००१।।
काय आंचवणा तांतडीचें काम । मागील ते श्रम न पवाची ।।तु.गा.२०७४.००२।।
वाढितिया पोटीं बहु असे वाव । सांभाळितां ठाव काय वेचे।।तु.गा.२०७४.००३।।
दाविल्यावांचूनि नाहीं कळों येत । तेथेंही दुश्चित एकपण ।।तु.गा.२०७४.००४।।
नावेचा भार तो उदकाचे शिरीं। काय हळू भारी तये ठायीं ।।तु.गा.२०७४.००५।।

तुका म्हणे गीतीं गाऊनि गोविंदु । करूं ब्रह्मानंदू एकसरें ।।तु.गा.२०७४.००६।।
प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी ।।तु.गा.२०७५.००१।।
मनेंसहित वाचा काया । अवघे दिले पंढरीराया ।।तु.गा.२०७५.००२।।
सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुळती ।।तु.गा.२०७५.००३।।
तुका म्हणे ठेवी तैसें । आम्ही राहों त्याचे इच्छे ।।तु.गा.२०७५.००४।।
बरवयांबरवंट । विटे चरण सम नीट ।।तु.गा.२०७६.००१।।
ते म्यां हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ।।तु.गा.२०७६.००२।।
सकळ तीर्थां अधिष्ठान। करी लक्ष्मी संवाहन।।तु.गा.२०७६.००३।।
तुका म्हणे अंतीं । ठाव मागितला संतीं ।।तु.गा.२०७६.००४।।
बरें जालें आलीं ज्याचीं त्याच्या घरा। चुकला पान्हेरा ओढाळांचा।।तु.गा.२०७७.००१।।
बहु केलें दु:खी त्याचिया सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें।।तु.गा.२०७७.००२।।
त्याचिया अन्यायें भोगा माझें अंग। सकळही लाग घ्यावा लागे।।तु.गा.२०७७.००३।।
नाहीं कोठें स्थिर राहों दिले क्षण। आजिवरी सिण पावलों तो।।तु.गा.२०७७.००४।।
वेगळाल्या खोडी केली तडातोडी। सांगावया घडी नाहीं सुख।।तु.गा.२०७७.००५।।
निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार सांडवूनि।।तु.गा.२०७७.००६।।
बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातली या कास कळिकाळासी।।तु.गा.२०७८.००१।।
तेथें माणसाचा कोण आला पाड । उल्लंघोनि जड गेलों आधीं।।तु.गा.२०७८.००२।।
संसाराचे बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षडवर्ग ।।तु.गा.२०७८.००३।।
तुका म्हणे एक उरला धरितां ठाव । येर केले वाव तृणवत ।।तु.गा.२०७८.००४।।
बळियाचे अंकित । आम्ही जालों बळिवंत।।तु.गा.२०७९.००१।।
लाताळिला संसार। केला षडऊर्मीचा मार ।।तु.गा.२०७९.००२।।
जन तन धन। केलें तृणाही समान।।तु.गा.२०७९.००३।।
तुका म्हणे आतां। आम्ही मुक्तीचिया माथां।।तु.गा.२०७९.००४।।

बळें बाह्यात्कारे संपादिलें सोंग। नाहीं जाला त्याग अंतरींचा ।।तु.गा.२०८०.००१ ।।
ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा। मनासी हा ठावा समाचार ।।तु.गा.२०८०.००२ ।।
जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं। जातों विसरूनि सकळ ही ।।तु.गा.२०८०.००३ ।।
प्रपंचाबाहेरी नाहीं आलें चित्त। केले करी नित्य वेवसाव ।।तु.गा.२०८०.००४ ।।
तुका म्हणे मज बहुरुप्याचि परी। जालें सोंग वरी आंत तैसें ।।तु.गा.२०८०.००५ ।।
बहु कृपावंतें माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों ।।तु.गा.२०८१.००१ ।।
संचितानें नाहीं चुकों दिली वाट । लाविलें अदट मजसवें ।।तु.गा.२०८१.००२ ।।
आतां मी रुसतों न कळतां वर्म। परी ठावे धर्म सर्व देवा ।।तु.गा.२०८१.००३ ।।
तुका म्हणे उभा राहिला न बैसे। आमुचिया आसे उद्वेग त्या ।।तु.गा.२०८१.००४ ।।
बहुजन्मीं केला लाग। तो हा भाग लाधलों ।।तु.गा.२०८२.००१ ।।
जीव देईन हा बळी। करीन होळी संसारा ।।तु.गा.२०८२.००२ ।।
गेलें मग नये हातां । पुढती चिंता वाटतसे ।।तु.गा.२०८२.००३ ।।
तुका म्हणे तांतड करूं । पाय धरूं बळकट ।।तु.गा.२०८२.००४ ।।
बहु बरें एकाएकीं । संग चुकी करावा ।।तु.गा.२०८३.००१ ।।
ऐसें बरें जालें ठावें । अनुभवें आपुल्या ।।तु.गा.२०८३.००२ ।।
सांगावें तें काम मना । सलगी जना नेदावी ।।तु.गा.२०८३.००३ ।।
तुका म्हणे निघे आगी। दुजें संगीं आतळतां ।।तु.गा.२०८३.००४ ।।
बाळ काय जाणे जीवनउपाय। वाहे बापमाय सर्व चिंता ।।तु.गा.२०८४.००१ ।।
आइतें भोजन खेळणें अंतरीं। अंकिताच्या शिरीं भार नाहीं ।।तु.गा.२०८४.००२ ।।
आपुलें शरीर रक्षितां न कळे। सांभाळूनि ळळे पाळी माय ।।तु.गा.२०८४.००३ ।।
तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता। आमुची ते सत्ता तयावरी ।।तु.गा.२०८४.००४ ।।
बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति। आठवितां चित्तीं काय नव्हे ।।तु.गा.२०८५.००१ ।।
आणिकां उपाया कोण वांटी मन। सुखाचें निधान पांडुरंग ।।तु.गा.२०८५.००२ ।।

तुका म्हणे तुम्हां होईल ये परी। अनुभवावरीं येईल मग।।तु.गा.२०८९.००४।।
बोलावें म्हूण बोलतों उपाय। प्रवाहें जाय गंगाजळ।।तु.गा.२०९०.००१।।
भाग्ययोगें कोणां घडेल सेवन। कैंचे येथें जन अधिकारी।।तु.गा.२०९०.००२।।
मुखीं देतां घांस पळविती तोंड । अंगींचिया भांड असुखानें ।।तु.गा.२०९०.००३।।
तुका म्हणे पूजा करितों देवाची । आपुलिया रुची मनाचिये।।तु.गा.२०९०.००४।।
बोलावें तें आम्ही आतां अबोलणें । एकाचि वचनें सकळासि।।तु.गा.२०९१.००१।।
मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव। जैसा ज्याचा भाव त्यासी फळें।।तु.गा.२०९१.००२।।
तुका म्हणे नाहीं समाधानें चाड । आपणाही नाड पुढिलासी ।।तु.गा.२०९१.००३।।
बंधनाचा तोडूं फांसा। देऊं आशा टाकोनि।।तु.गा.२०९२.००१।।
नाहीं तेंच घेतां शिरीं। होईल दुरी निजपंथ।।तु.गा.२०९२.००२।।
नाथिलेंचि माझें तुझें। कोण ओझें वागवी।।तु.गा.२०९२.००३।।
तुका म्हणे अंतराय। देवीं काय जिणें तें।।तु.गा.२०९२.००४।।
व्यापक हा विश्वंभर। चराचर ज्याचेनी।।तु.गा.२०९३.००१।।
पंढरिराय विटेवरी। त्याचीं धरीं पाउलें।।तु.गा.२०९३.००२।।
अवघियांचा हाचि ठाव। देवीं देव सकळ।।तु.गा.२०९३.००३।।
तुका म्हणे न करी सोस। भेदें दोष उफराटे।।तु.गा.२०९३.००४।।
साधनाच्या कळा आकार आकृति। कारण नवनीतीं मथनाचे।।तु.गा.२०९४.००१।।
पक्षियासी नाहीं मारगी आडताळा। अंतरिक्षीं फळासीचि पावें।।तु.गा.२०९४.००२।।
भक्तीची जोडी ते उखत्याचि साठी। उणें पुरें तुटी तेथें नाहीं।।तु.गा.२०९४.००३।।
तुका म्हणे आलें सांचत सांचणी। आजी जाली धणी एकसरें।।तु.गा.२०९४.००४।।
येणे बोधें आम्ही असो सर्वकाळ। करूं हे निर्मळ हरिकथा।।तु.गा.२०९५.००१।।
आम्ही भूमीवरी एक पैं दैवाचें। निधान हें वाचें सांपडलें।।तु.गा.२०९५.००२।।
तरतील कुळें दोन्ही उभयतां। गातां आइकतां सुखरूप।।तु.गा.२०९५.००३।।

न चळे हा मंत्र न म्हणें यातीकुळ। नलगे काळ वेळ विचारावी ।।तु.गा.२०९५.००४ ।।
तुका म्हणें माझा विठ्ठल विसांवा। सांठविन हांवा हृदयांत ।।तु.गा.२०९५.००५ ।।
रुसलों या आम्हीं आपुल्या संसारा। तेथे जनाचारा कोण पाड ।।तु.गा.२०९६.००१ ।।
आम्हां इष्ट मित्र सज्जन सोयरे। नाहीं या दुसरें देवाविण ।।तु.गा.२०९६.००२ ।।
दुराविले बंधु सखे सहोदर। आणीक विचार काय तेथें ।।तु.गा.२०९६.००३ ।।
उपाधिवचन नाइकती कान। त्रासलें हें मन बहु माझें ।।तु.गा.२०९६.००४ ।।
तुका म्हणे करा ठाकेल ते दया। सुख दुःख वायां न धरावें ।।तु.गा.२०९६.००५ ।।
सुनियाचा हाचि भाव। आपुला ठाव राखावा ।।तु.गा.२०९७.००१ ।।
दुजियाचा येऊं वारा। नेदूं घरावरी देऊं ।।तु.गा.२०९७.००२ ।।
केली याची फाडाफाडी। तडामोडी क्षेत्राची ।।तु.गा.२०९७.००३ ।।
पातेजत नाहीं लोकां। देव तुका वांचूनीं ।।तु.गा.२०९७.००४ ।।
सुनियांची आवडी देवा। घेत सेवा नाहीं कांहीं ।।तु.गा.२०९८.००१ ।।
शिकविलें जवळी बैसों। जेथें असों तेथेंचि ।।तु.गा.२०९८.००२ ।।
नेदी दुजें बोल करूं। गुरुगुरू न साहे ।।तु.गा.२०९८.००३ ।।
तुका म्हणे कुर्वाळितां। अंग सत्ता संगाची ।।तु.गा.२०९८.००४ ।।
ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणें। बळिये आम्ही भले शरणागत ।।तु.गा.२०९९.००१ ।।
कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ। झाला पद्मनाभ सेवाऋणी ।।तु.गा.२०९९.००२ ।।
कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं। इच्छेचिये वाही वरुषावें ।।तु.गा.२०९९.००३ ।।
बैसलिये ठायीं लागलें भरतें। त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ।।तु.गा.२०९९.००४ ।।
हारि नाहीं आम्हां विष्णुदासां जगीं। नारायण अंगीं विसावला ।।तु.गा.२०९९.००५ ।।
तुका म्हणे बहु लाठे हें भोजन। नाहीं रिता कोण राहात राहों ।।तु.गा.२०९९.००६ ।।
भक्ति आम्हीं केली सांडूनि उद्वेग । पावलों हें संगसुख याचें ।।तु.गा.२१००.००१ ।।
सुख आम्हां झालें धरितां याचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ।।तु.गा.२१००.००२ ।।

तुका म्हणे सुख बहु झालें जीवा । घडली या सेवा विठोबाची ।।तु.गा.२१००.००३।।
भाग्यवंत आम्ही विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ।।तु.गा.२१०१.००१।।
नाहीं तें पुरवीत आणुनि जवळी । गाऊनि माउली गीत सुखें ।।तु.गा.२१०१.००२।।
प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । वोळली सकळ सुखें ठायीं ।।तु.गा.२१०१.००३।।
आपुल्या स्वभावें जैसें जेथें असों । तैसें तेथें दिसों साजिरेचि ।।तु.गा.२१०१.००४।।
वासनेचा कंद उपडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ।।तु.गा.२१०१.००५।।
तुका म्हणे भक्तजनांची माउली । करील साउली विठ्ठल आम्हां ।।तु.गा.२१०१.००६।।
भूतीं देव म्हणोनि भेटतों या जना । नाहीं हे भावना नरनारी ।।तु.गा.२१०२.००१।।
जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ।।तु.गा.२१०२.००२।।
दयेसाठीं केला उपाधिपसारा । जड जीवा तारा नाव कथा ।।तु.गा.२१०२.००३।।
तुका म्हणे नाहीं पडत उपवास । फिरतसें आस धरोनियां ।।तु.गा.२१०२.००४।।
भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें केलें भक्तिभावें ।।तु.गा.२१०३.००१।।
म्हणऊनि चिंता नाहीं आम्हां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ।।तु.गा.२१०३.००२।।
आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ।।तु.गा.२१०३.००३।।
तुका म्हणे आम्हां देवाचा सांगात । नाहीं विसंबत येरयेरां ।।तु.गा.२१०३.००४।।
मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ।।तु.गा.२१०४.००१।।
मेले जित असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ।।तु.गा.२१०४.००२।।
भले तरि देऊं गांडीची लंगोटी । नाठ्याळाचे काठी देऊं माथां ।।तु.गा.२१०४.००३।।
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रुहूनि ।।तु.गा.२१०४.००४।।
अमृत तें काय गोड आम्हांपुढें । विष तें बापुडें कडू किती ।।तु.गा.२१०४.००५।।
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचेपरि ।।तु.गा.२१०४.००६।।
मन झालें भाट । कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । येचि चाली स्वभावें ।।तु.गा.२१०५.००१।।
बोलें देवाचे पवाडे । नित्य नवेचि रोकडें । ज्यापरी आवडे । तैसा तैसा करूनि ।।तु.गा.२१०५.००२।।

रोखीं राहावें समोर । पुढें मागें चाले भार । करावें उत्तर । सेवा रुजू करूनि ।।तु.गा.२१०५.००३।।
पूर वर्षला देकारें । संतोषाच्या अभयकरें । अंगींच्या उतारे । तुकया स्वामी शृंगारी ।।तु.गा.२१०५.००४।।
मागें जैसा होता माझें अंगीं भाव। तैसा एक ठाव नाहीं आतां।।तु.गा.२१०६.००१।।
ऐसें ग्वाही माझें मन मजपाशीं। तुटी मुदलेंसी दिसे पुढें।।तु.गा.२१०६.००२।।
पुढिलांचे मना आणी गुणदोष। पूज्य आपणांस करावया।।तु.गा.२१०६.००३।।
तुका म्हणे जाली कोंबड्याची परी। पुढेंचि उकरी लाभ नेणे।।तु.गा.२१०६.००४।।
मागणें तें मागों देवा। करूं भक्ती त्याची सेवा।।तु.गा.२१०७.००१।।
काय उणें तयापाशीं। रिद्धिसिद्धी ज्याच्या दासी।।तु.गा.२१०७.००२।।
कायावाचामन। करूं देवा हें अर्पण।।तु.गा.२१०७.००३।।
तुका म्हणे विश्वंभर। ज्याच्यानें हें चराचर।।तु.गा.२१०७.००४।।
भूत भविष्य कळों यावें वर्तमान। हें तों भाग्यहीन त्याची जोडी।।तु.गा.२१०८.००१।।
आम्हीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें। होणार तें होतें प्रारब्धेंचि।।तु.गा.२१०८.००२।।
जगरूढीसाठीं घातले दुकान। जातो नारायण अंतरोनि।।तु.गा.२१०८.००३।।
तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा। थोरली ते पीडा रिद्धिसिद्धि।।तु.गा.२१०८.००४।।
मागें बहुतां जन्मीं। हेंचि करित आलों आम्ही। भवतापश्रमीं। दुःखें पीडिले निववूं त्यां।।तु.गा.२१०९.००१।।
गर्जों हरिचे पवाडे। मेळवूं वैष्णव बागडे। पाझर रोकडे। काढूं पाषाणामध्यें।।तु.गा.२१०९.००२।।
भाव शुद्ध नामावळी। हर्षें नाचों पिटूं टाळी। घालूं पायां तळीं। कळिकाळ या बळें।।तु.गा.२१०९.००३।।
कामक्रोध बंदी खाणी। तुका म्हणे दिले दोन्ही। इंद्रियांचे धणी। आम्ही जालों गोसावी।।तु.गा.२१०९.००४।।
माझिये बुद्धीचा खुंटला उपाय। करिसील काय पाहणें तें।।तु.गा.२११०.००१।।
सूत्रधारी तूं हें सकळ चाळिता। कासया अनंता भार वाहो।।तु.गा.२११०.००२।।
वाहिले संकल्प न पवती सिद्धि। येऊं देहबुद्धिवरि नये।।तु.गा.२११०.००३।।
तुका म्हणे दुःखी करिती तरंग। चिंतूं पांडुरंग आवरुनी।।तु.गा.२११०.००४।।
माझ्या मुखावाटा नयों हें वचन। व्हावें हें संतान द्रव्य कोणा।।तु.गा.२१११.००१।।

फुकाचा विभाग पतन दु:खासी। दोहींमुळें त्यासी तेंचि साधे ।।तु.गा.२१११.००२ ।।
नाइकावी निंदा स्तुति माझ्या कानें। सादर या मनें होऊनियां।।तु.गा.२१११.००३ ।।
तुका म्हणे देव असाध्य यामुळें। आशामोहजाळीं गुंतलिया ।।तु.गा.२१११.००४ ।।
मायामोहजाळीं होतों सांपडला। परि या विठ्ठला कृपा आली ।।तु.गा.२११२.००१ ।।
काढूनि बाहेर ठेविलों निराळा। कवतुक डोळां दाखविलें ।।तु.गा.२११२.००२ ।।
नाचे उडे माया करी कवतुक । नाशवंत सुखें साच केलीं ।।तु.गा.२११२.००३ ।।
रडे फुंदे दु:खें कुटितील माथा। एकासी रडतां तेंही मरे ।।तु.गा.२११२.००४ ।।
तुका म्हणे मज वाटते नवल। मी हे माझे बोल ऐकोनियां ।।तु.गा.२११२.००५ ।।
माया साक्षी आम्ही नेणों भीड भार। आप आणि पर नाहीं दोन्ही ।।तु.गा.२११३.००१ ।।
सत्याचियेसाठीं अवघाचि भर। नावडे व्यापार तुटीचा तो ।।तु.गा.२११३.००२ ।।
पोभाळितां चरे अंतरींचें दु:ख। लांसें फांसें मुख उघडावें ।।तु.गा.२११३.००३ ।।
तुका म्हणे नव्हे स्फीतीचा हा ठाव। निवाड्यासी देव साक्षी केला ।।तु.गा.२११३.००४ ।।
मुखीं विठ्ठलाचें नाम। मग कैंचा भवभ्रम ।।तु.गा.२११४.००१ ।।
चालतां बोलतां खातां। जेवितां निद्रा करितां ।।तु.गा.२११४.००२ ।।
सुखें असों संसारीं। मग जवळीच हरि ।।तु.गा.२११४.००३ ।।
मुक्ति वरील भक्ति जाण। अखंड मुखीं नारायण ।।तु.गा.२११४.००४ ।।
मग देवभक्त झाला। तुका तुकीं उतरला ।।तु.गा.२११४.००५ ।।
मुनि मुक्त जाले भेणें गर्भवासा। आम्हां विष्णुदासां सुलभ तो ।।तु.गा.२११५.००१ ।।
अवघाचि संसार केला ब्रह्मरूप। विठ्ठलस्वरूप म्हणोनियां ।।तु.गा.२११५.००२ ।।
पुराणीं उपदेश साधन उद्भट। आम्हां सोपी वाट वैकुंठींची ।।तु.गा.२११५.००३ ।।
तुका म्हणे जनां सकळांसहित। घेऊं अखंडित प्रेमसुख ।।तु.गा.२११५.००४ ।।
मोक्षपद तुच्छ केलें याकारणें। आम्हां जन्म घेणें युगायुगीं ।।तु.गा.२११६.००१ ।।
विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस। पुढतापुढती आस सेवावें हें ।।तु.गा.२११६.००२ ।।

देवा हातीं रूप धरविला आकार। नेदूं निराकार होऊं त्यासी ।।तु.गा.२११६.००३ ।।
तुका म्हणे चित्त निवांत राहिलें। ध्याईं तीं पाउलें विटेवरि ।।तु.गा.२११६.००४ ।।
म्हणउनि खेळ मांडियेला ऐसा। नाहीं कोणी दिशा वर्जियेली ।।तु.गा.२११७.००१ ।।
माझिया गोतें हें वसलें सकळ। न देखिजे मूळ विटाळाचें ।।तु.गा.२११७.००२ ।।
करूनि ओळखी दिली एकसरें। न देखों दुसरें विषमासी ।।तु.गा.२११७.००३ ।।
तुका म्हणे नाहीं काळापाशीं गोवा। स्थिति मति देवा वांचुनियां ।।तु.गा.२११७.००४ ।।
मृत्युलोकीं आम्हां आवडती परी। नाहीं एका हरिनामेविण ।।तु.गा.२११८.००१ ।।
विटलें हें चित्त प्रपंचापासूनि। वमन तें मनीं बैसलेंसें ।।तु.गा.२११८.००२ ।।
सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान। माणिक पाषाण खडे जैसे ।।तु.गा.२११८.००३ ।।
तुका म्हणे तैशा दिसतील नारी। रिसाचियापरि आम्हांपुढें ।।तु.गा.२११८.००४ ।।
याचिया आधारें राहिलों निश्चिंत। ठेवूनियां चित्त पायीं सुखें ।।तु.गा.२११९.००१ ।।
माझें सुख दुःख जाणें हित फार। घातलासे भार पांडुरंगा ।।तु.गा.२११९.००२ ।।
कृपेचीं पोसणीं ठायींचीं अंकिलीं। म्हणऊनि लागली त्यास चिंता ।।तु.गा.२११९.००३ ।।
मन राखे हातीं घेउनियां काठी। इंद्रियें थापटीं फांकों नेदी ।।तु.गा.२११९.००४ ।।
तुका म्हणे यासी अवघड नाहीं। शरणागता कांहीं रक्षावया ।।तु.गा.२११९.००५ ।।
याची सवे लागली जीवा। गोडी हेवा संगाचा ।।तु.गा.२१२०.००१ ।।
परते न सरवे दुरी। क्षण हरीपासूनि ।।तु.गा.२१२०.००२ ।।
जाले तरी काय तंट। आतां चट न सांडे ।।तु.गा.२१२०.००३ ।।
तुका म्हणे चक्रचाळें। वेड बळें लाविलें ।।तु.गा.२१२०.००४ ।।
याती मतिहीन रूपें लीन दीन। आणीक अवगुण जाणोनियां ।।तु.गा.२१२१.००१ ।।
केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार। ऐसा हा विचार जाणोनियां ।।तु.गा.२१२१.००२ ।।
जे कांहीं करतों तें माझें स्वहित। आली हे प्रचित कळों चित्ता ।।तु.गा.२१२१.००३ ।।
जालें सुख जीवा आनंद अपार। परमानंदें भार घेतला माझा ।।तु.गा.२१२१.००४ ।।

तुका म्हणे यासी नामाचा अभिमान। म्हणोनि शरण तारी बळें।।तु.गा.२१२१.००५।।
येणें जाणें तरी। राहे देवकृपा करी।।तु.गा.२१२२.००१।।
ऐसें तंव पुण्य नाहीं। पाहातां माझे गांठीं कांहीं।।तु.गा.२१२२.००२।।
भय निवारिता। कोण वेगळा अनंता।।तु.गा.२१२२.००३।।
तुका म्हणे वारे भोग। वारी तरी पांडुरंग।।तु.गा.२१२२.००४।।
राम राज्य राम प्रजा लोकपाळ। एकचि सकळ दुजें नाहीं।।तु.गा.२१२३.००१।।
मंगळावांचूनि उमटेना वाणी। अखंडचि खाणी एकी रासी।।तु.गा.२१२३.००२।।
मोडलें हें स्वामी ठायाठाव सेवा। वाढवावा हेवा कोणा अंगें।।तु.गा.२१२३.००३।।
तुका म्हणे अवघे दुमदुमिलें देवें। उरलें तें गावें हेंचि आतां।।तु.गा.२१२३.००४।।
रिद्धिसिद्धि दासी कामधेनु घरीं। परि नाहीं भाकरी भक्षावया।।तु.गा.२१२४.००१।।
लोडें बालिस्तें पलंग सुपत्ति । परी नाहीं लंगोटी नेसावया।।तु.गा.२१२४.००२।।
पुसाल तरि आम्हां वैकुंठीचा वास। परि नाहीं राह्यास ठाव कोठें।।तु.गा.२१२४.००३।।
तुका म्हणे आम्ही राजे त्रैलोक्याचे। परि नाहीं कोणाचें उणें पुरें।।तु.गा.२१२४.००४।।
लटिकियाच्या आशा। होतों पडिलों वोळसा। होउनियां दोषां। पात्र मिथ्या अभिमानें।।तु.गा.२१२५.००१।।
बरवी उघडली दृष्टी। नाहीं तरी होतों कष्टी। अक्रंदते सृष्टी। मात्र या चेष्टांनीं।।तु.गा.२१२५.००२।।
मरणाची नाहीं शुद्धी। लोभीं प्रवर्तली बुद्धी। परती तों कधीं। घडेचि ना माघारी।।तु.गा.२१२५.००३।।
सांचवूनि मरे धन। लावी पोरांसी भांडण। नाहीं नारायण। तुका म्हणे स्मरला।।तु.गा.२१२५.००४।।
लावूनि काहाळा। सुखें करितों सोहळा।।तु.गा.२१२६.००१।।
सादावीत गेलों जना। भय नाहीं सत्य जाणा।।तु.गा.२१२६.००२।।
गातां नाचतां विनोदें। टाळघागरियांच्या छंदें।।तु.गा.२१२६.००३।।
तुका म्हणे भेव। नाहीं पुढें येतो देव।।तु.गा.२१२६.००४।।
लेंकरां आइतें पित्याचें जतन। दावी निजधन सर्व जोडी।।तु.गा.२१२७.००१।।
त्यापरि आमुचा जालासे सांभाळ। देखिलाची काळ नाहीं आड।।तु.गा.२१२७.००२।।

भुकेचे सन्निध वसे स्तनपान। उपायाची भिन्न चिंता नाहीं।।तु.गा.२१२७.००३।।
आळवूनि तुका उभा पैलथडी। घातली या उडी पांडुरंगें।।तु.गा.२१२७.००४।।
वचनाचा अनुभव हातीं। बोलविती देव मज।।तु.गा.२१२८.००१।।
परि हें न कळे अभाविकां। जडलोकां जीवासी।।तु.गा.२१२८.००२।।
अनुश्रुत हें प्रासादिक । कृपा भीक स्वामीची।।तु.गा.२१२८.००३।।
तुका म्हणे वरावरी। जातों तरी सांगत।।तु.गा.२१२८.००४।।
वचना फिरती अधम जन। नारायण तो नव्हे।।तु.गा.२१२९.००१।।
केला असतां अंगीकार। न मनीं भार समर्थ।।तु.गा.२१२९.००२।।
संसाराचा नाहीं पांग। देवें सांग सकळ।।तु.गा.२१२९.००३।।
तुका म्हणे कीर्ति वाणूं। मध्यें नाणूं संकल्प।।तु.गा.२१२९.००४।।
वारकरी पायांपाशीं। आले त्यांसी विनविलें।।तु.गा.२१३०.००१।।
काय काय तें आइका। विसरों नका रंकासी।।तु.गा.२१३०.००२।।
चिंतावोनि चिंता केलीं। हे राहिली अवस्था।।तु.गा.२१३०.००३।।
तुका म्हणे संवसारा। रुसलों खरा यासाठीं।।तु.गा.२१३०.००४।।
विठो सांपडावया हातीं। ठावी झाली एक गती। न धरी भय चित्तीं। बळ किती तयाचें।।तु.गा.२१३१.००१।।
लागे आपणचि हातीं। कींव भाकावी काकुलती। करी मग चित्तीं। असेल तें तयाचें।।तु.गा.२१३१.००२।।
एकलिया भावबळें। कैं सांपडे तो काळें। वैष्णवांच्या मेळें। उभा ठाके हांकेसी।।तु.गा.२१३१.००३।।
बांधा माझिया जीवासी। तुका म्हणे प्रेमपाशीं। न सोडी तयासी। सर्वस्वासी उदार।।तु.गा.२१३१.००४।।
विश्वास तो देव। म्हूण धरियेला भाव।।तु.गा.२१३२.००१।।
माझी वदवितो वाणी। जेणें धरिली धरणी।।तु.गा.२१३२.००२।।
जोडिलीं अक्षरें। नव्हती बुद्धीच्या विचारें।।तु.गा.२१३२.००३।।
नाहीं केली आटी। कांहीं मानदंभासाठीं।।तु.गा.२१३२.००४।।
कोणी भाग्यवंत। तया कळे हें उचित।।तु.गा.२१३२.००५।।

तुका म्हणे झरा। आहे मुळींचाचि खरा।।तु.गा.२१३२.००६।।
वेद अनंत बोलिला। अर्थ इतुलाचि शोधिला।।तु.गा.२१३३.००१।।
विठोबासी शरण जावें। निजनिष्ठा नाम गावें।।तु.गा.२१३३.००२।।
सकळशास्त्रांचा विचार। अंतीं इतुलाचि निर्धार।।तु.गा.२१३३.००३।।
अठरापुराणीं सिद्धांत। तुका म्हणे हाचि हेत।।तु.गा.२१३३.००४।।
वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनीं वाहावा भार माथां।।तु.गा.२१३४.००१।।
खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं। भार धन वाही मजुरींचें।।तु.गा.२१३४.००२।।
उत्पत्तिपाळणसंहाराचें निज। जेणें नेलें बीज त्याचें हातीं।।तु.गा.२१३४.००३।।
तुका म्हणे आम्हां सांपडलें मूळ । आपणचि फळ आलें हाता ।।तु.गा.२१३४.००४।।
वोखटा तरी मी विटलों देहासी। पुरे आतां ऐसी जोडी पुन्हां।।तु.गा.२१३५.००१।।
किती मरमर सोसावी पुढती। राहिलों संगती विठोबाचे।।तु.गा.२१३५.००२।।
आतां कोण याचा करील आदर। जावो कलेवर विटंबोनी।।तु.गा.२१३५.००३।।
तुका म्हणे आतां सांडी तेचि सांडीं। कोण फिरे लंडी यासी मागें।।तु.गा.२१३५.००४।।
वृक्षवल्ली आम्हां सोयरे वनचरें। पक्षीही सुस्वरें आळविती।।तु.गा.२१३६.००१।।
येणें सुखें रुचे एकांताचा वास। नाहीं गुण दोष अंगा येत।।तु.गा.२१३६.००२।।
आकाश मंडप पृथिवी आसन। रमे तेथें मन क्रीडा करूं ।।तु.गा.२१३६.००३।।
कथाकमंडलू देह उपचारा। जाणवितो वारा अवसरु।।तु.गा.२१३६.००४।।
हरिकथा भोजन परवडी विस्तार। करोनि प्रकार सेवूं रुची।।तु.गा.२१३६.००५।।
तुका म्हणे होय मनासी संवाद। आपुलाचि वाद आपणांसी।।तु.गा.२१३६.००६।।
शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ती। तो आम्हा सांगाती प्राणसखा।।तु.गा.२१३७.००१।।
म्हणउनि नाहीं आणिकांचा पांग। सर्व झालें सांग नामें एका।।तु.गा.२१३७.००२।।
सगुण निर्गुण जयाचिये अंगें। तोचि आम्हांसंगें क्रीडा करी।।तु.गा.२१३७.००३।।
तुका म्हणे आम्ही विधीचें जनिते। स्वयंभ आइते केले नव्हों।।तु.गा.२१३७.००४।।

शिकवूनि बोल। केलें कवतुक नवल।।तु.गा.२१३८.००१।।
आपणियां रंजविलें। बापें माझिया विठ्ठलें।।तु.गा.२१३८.००२।।
हातीं प्रेमाचें भातुकें। आम्हां देऊनियां निकें।।तु.गा.२१३८.००३।।
तुका करी टाहो। पाहे रखुमाईचा नाहो।।तु.गा.२१३८.००४।।
शीतळ साउली आमुची माउली। विठाई वोळली प्रेमपान्हा।।तु.गा.२१३९.००१।।
जाउनि वोसंगा रिघेन वोरस। लागेल तें इच्छे पीइन वरी।।तु.गा.२१३९.००२।।
कृपा तनु माझी सांभाळी दुभोनि। अमृतसंजीवनी लोटलीसे।।तु.गा.२१३९.००३।।
आनंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं। सागर तो किती उपमेसी।।तु.गा.२१३९.००४।।
सैर जाय पडे तयेसी सांकडें। सांभाळीत पुढें मागें आसे।।तु.गा.२१३९.००५।।
तुका म्हणे चिंता कैसी ते मी नेणें। लडिवाळ तान्हें विठाईचें।।तु.गा.२१३९.००६।।
सर्व काळ डोळां बैसो नारायण। नयो अभिमान आड पुढें।।तु.गा.२१४०.००१।।
धाड पडो माझ्या थोरपणावरि। वाचे हरि हरि उच्चारीन।।तु.गा.२१४०.००२।।
जळो अंतरींचें सर्व जाणपण। विवादवचन अहंतेचें।।तु.गा.२१४०.००३।।
सकळां चरणीं गळित माझा जीव। तुका म्हणे भाव एकविध।।तु.गा.२१४०.००४।।
सर्व काळ माझे चित्तीं। हेचि खंती राहिली।।तु.गा.२१४१.००१।।
बैसलें तें रूप डोळां। वेळोवेळां आठवे।।तु.गा.२१४१.००२।।
वेव्हाराची सरली मात। अखंडित अनुसंधान।।तु.गा.२१४१.००३।।
तुका म्हणे वेध जाला। अंगा आला श्रीरंग।।तु.गा.२१४१.००४।।
सर्वविशीं आम्ही हेचि जोडी केली। स्वामिची साधिली चरणसेवा।।तु.गा.२१४२.००१।।
पाहिलेंचि नाहीं मागें परतोनी। जिंकिला तो क्षणोक्षणीं काळ।।तु.गा.२१४२.००२।।
नाहीं पडों दिला विचाराचा गोवा। नाहीं पोटीं हेवा येऊं दिला।।तु.गा.२१४२.००३।।
केली लागवेगीं अवघी तांतडी। भावना ते कुडी दुराविली।।तु.गा.२१४२.००४।।
कोठें मग ऐसें होतें सावकाश। जळो तया आस वेव्हाराची।।तु.गा.२१४२.००५।।

तुका म्हणे लाभ घेतला पालवीं। आतां नाहीं गोवी कासयाची ।।तु.गा.२१४२.००६ ।।
सत्ता वर्ते मन। पाळी विठ्ठलाची आण ।।तु.गा.२१४३.००१ ।।
आज्ञा वाहोनियां शिरीं। सांगितलें तेंचि करीं ।।तु.गा.२१४३.००२ ।।
सरलीसे धांव। नलगे वाढवावी हांव ।।तु.गा.२१४३.००३ ।।
आहे नाहीं त्याचें। तुका म्हणे कळे साचे ।।तु.गा.२१४३.००४ ।।
संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें। काय म्यां गव्हारें जाणावें हें ।।तु.गा.२१४४.००१ ।।
विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध। तेथें मज बोध काय कळे ।।तु.गा.२१४४.००२ ।।
करितों कवित्व बोबड्या उत्तरीं। झणी मजवरी कोप धरा ।।तु.गा.२१४४.००३ ।।
काय माझी याती नेणा हा विचार। काय मी तें फार बोलों नेणें ।।तु.गा.२१४४.००४ ।।
तुका म्हणे मज बोलवितो देव। अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ।।तु.गा.२१४४.००५ ।।
संसाराच्या नांवें घालूनियां शून्य। वाढता हा पुण्य धर्म केला ।।तु.गा.२१४५.००१ ।।
हरिभजनें हें धवळिलें जग। चुकविला लाग कळिकाळाचा ।।तु.गा.२१४५.००२ ।।
कोणाहि नलगे साधनांचा पांग। करणें केला त्याग देहबुद्धि ।।तु.गा.२१४५.००३ ।।
तुका म्हणे सुख समाधी हरिकथा। नेणें भवव्यथा गाईल तो ।।तु.गा.२१४५.००४ ।।
संसार तो कोण लेखे। आम्हां सखे हरिजन ।।तु.गा.२१४६.००१ ।।
काळ ब्रह्मानंदें सरे। आवडी उरे संचली ।।तु.गा.२१४६.००२ ।।
स्वप्नीं तेही नाहीं चिंता। रात्रीं जातां दिवस ।।तु.गा.२१४६.००३ ।।
तुका म्हणे ब्रह्मरसें। होय सरिसें भोजन ।।तु.गा.२१४६.००४ ।।
साकरेच्या योगें वर्ख। राजा कागदातें देखे ।।तु.गा.२१४७.००१ ।।
तैसें आम्हां माणुसपण। रामनाम केल्यागुणें ।।तु.गा.२१४७.००२ ।।
फिरंगीच्या योगें करीं। राजा काष्ठ हातीं धरी ।।तु.गा.२१४७.००३ ।।
रत्नकनका योगें लाख। कंठीं धरिती श्रीमंत लोक ।।तु.गा.२१४७.००४ ।।
देवा देवपाट। देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ।।तु.गा.२१४७.००५ ।।

ब्रह्मानंदयोगें तुका। पढीयंता जनलोकां।।तु.गा.२१४७.००६।।
सांगों जाणती शकुन। भूत भविष्य वर्तमान।।तु.गा.२१४८.००१।।
त्यांचा आम्हांसी कांटाळा। पाहों नावडती डोळां।।तु.गा.२१४८.००२।।
रिद्धिसिद्धिचें साधक। वाचासिद्ध होती एक ।।तु.गा.२१४८.००३।।
तुका म्हणे जाती। पुण्यक्षयें अधोगती।।तु.गा.२१४८.००४।।
सावध झालों सावध झालों। हरिच्या आलों जागरणा।।तु.गा.२१४९.००१।।
जेथें वैष्णवांचें भार। जयजयकार गर्जतसे।।तु.गा.२१४९.००२।।
पळोनियां गेली झोंप। होतें पाप आड तें।।तु.गा.२१४९.००३।।
तुका म्हणे तया ठाया। बोल छाया कृपेची।।तु.गा.२१४९.००४।।
सोसें सोसें मारूं हाका। होईल चुका म्हणऊनि।।तु.गा.२१५०.००१।।
मागें पुढें क्षणभरी। नव्हे दुरी अंतर।।तु.गा.२१५०.००२।।
नाम मुखीं बैसला चाळा। वेळोंवेळां पडताळीं।।तु.गा.२१५०.००३।।
तुका म्हणे सुखी केलें। या विठ्ठलें बहुतांसी।।तु.गा.२१५०.००४।।
शिकविलें तैसा पढों जाणे पुंसा। कैंची साच दशा तैसी अंगीं।।तु.गा.२१५१.००१।।
स्वप्नींचिया सुखें नाहीं होत राजा। तैसा दिसे माझा अनुभव।।तु.गा.२१५१.००२।।
कासया हा केला जिव्हे अळंकार। पायांसीं अंतर दिसतसे।।तु.गा.२१५१.००३।।
दर्पणीचें धन हातीं ना पदरीं। डोळा दिसे परी सत्याचिये।।तु.गा.२१५१.००४।।
आस केला तरी लाळचि घोंटावी। ठकाठकी तेवीं दिसतसे।।तु.गा.२१५१.००५।।
कवित्व रसाळ वदविली वाणी। साक्षही पुराणीं घडे ऐसी।।तु.गा.२१५१.००६।।
तुका म्हणे गुरें राखोनि गोंवारी। माझी म्हणे परि लाभ नाहीं।।तु.गा.२१५१.००७।।
सुकाळ हा दिवसरजनी। नित्य धणी नवीच।।तु.गा.२१५२.००१।।
करुनि सेवूं नाना परी। राहे उरी गोडीनें।।तु.गा.२१५२.००२।।
सरे ऐसा नाहीं झरा। पंक्तिकरा समवेत।।तु.गा.२१५२.००३।।

तुका म्हणे बरवा पान्हा। कान्हाबाई माउलीचा।।तु.गा.२१५२.००४।।
सुखें होतों कोठें घेतली सुती। बांधविला गळा आपुलें हातीं।।तु.गा.२१५३.००१।।
काय करूं बहू गुंतलों आतां। नयेचि सरतां मागें पुढें।।तु.गा.२१५३.००२।।
होतें गाठीं तें सरलें आतां। आणिक माथां ऋण झालें।।तु.गा.२१५३.००३।।
सोंकरिलियाविण गमाविलीं पिकें । रांडापोरे भिकें लावियेलीं।।तु.गा.२१५३.००४।।
बहुतांचीं बहु घेतलीं घरें। न पडे पुरे कांहीं केल्या।।तु.गा.२१५३.००५।।
तुका म्हणे कांहीं न धरावी आस। जावें हें सर्वस्व टाकोनियां।।तु.गा.२१५३.००६।।
स्मरतां कां घडे नास। विष्णुदास यावरी।।तु.गा.२१५४.००१।।
ऐसी सीमा जाली जगीं। तरी मी वेगीं अनुसरलों।।तु.गा.२१५४.००२।।
धरिलें तें निवडे आतां। न घडे चित्ता वेगळें।।तु.गा.२१५४.००३।।
तुका म्हणे नाश नाहीं। पुराणेंहि गर्जती।।तु.गा.२१५४.००४।।
हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधु पार उतरलों।।तु.गा.२१५५.००१।।
फावलें फावलें आतां। पायीं संता विनटलों।।तु.गा.२१५५.००२।।
हरिनामाचा शस्त्र घोडा। संसार गाढा छेदिला।।तु.गा.२१५५.००३।।
हरिनामाचें धनुष्यकांडे। विन्मुख तोंडें कळिकाळ।।तु.गा.२१५५.००४।।
येणेंचि बळें सरिते आम्ही। हरिचे नामें लोकीं तिहीं।।तु.गा.२१५५.००५।।
तुका म्हणे जालों साचे। श्रीविठ्ठलाचे डिंगर।।तु.गा.२१५५.००६।।
हा गे माझा अनुभव। भक्तिभाव भाग्याचा।।तु.गा.२१५६.००१।।
केला ऋणी नारायण। नव्हे क्षण वेगळा।।तु.गा.२१५६.००२।।
घालोनियां भार माथां। अवघी चिंता वारली।।तु.गा.२१५६.००३।।
तुका म्हणे वचनासाठीं। नाम कंठीं धरियेलें।।तु.गा.२१५६.००४।।
हाचि परमानंद आळंगीन बाहीं। क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे।।तु.गा.२१५७.००१।।
बोलायासि मात मन निवे हर्षें चित्त। दुणी वाढे प्रीत प्रेमसुख।।तु.गा.२१५७.००२।।

जनांत भूषण वैकुंठीं सरतां। फांवलें स्वहिता सर्वभावें।।तु.गा.२१५७.००३।।
तुटला वेव्हार माया लोकाचार। समूळ संसार पारुषला।।तु.गा.२१५७.००४।।
तुका म्हणे तो हा विठ्ठलचि व्हावा। आणिक या जीवा चाड नाहीं।।तु.गा.२१५७.००५।।
हो कां नर अथवा नारी। ज्यांचा आवडता हरि।।तु.गा.२१५८.००१।।
ते मज विठोबासमान। नमूं आवडी ते जन।।तु.गा.२१५८.००२।।
ज्यांचें अंतर निर्मळ। त्यांचे सबाह्य कोमळ।।तु.गा.२१५८.००३।।
त्यांचा संग सर्वकाळ। घडी मज हे मंगळ।।तु.गा.२१५८.००४।।
तुका म्हणे प्राण। काया कुरवंडी करीन।।तु.गा.२१५८.००५।।
होतों सांपडलों वेठी। जातां भेटी संसारा।।तु.गा.२१५९.००१।।
तों या वाटे कृपा केली। भेटी जाली विठोसी।।तु.गा.२१५९.००२।।
होता भार माथां माझे। बहु ओझें अमुप।।तु.गा.२१५९.००३।।
तुका म्हणे केली चिंता। कोण दाता भेटेल।।तु.गा.२१५९.००४।।
रवि रश्मिकळा। नये काढितां निराळा।।तु.गा.२१६०.००१।।
तैसा आम्हां जाला भाव। अंगीं जडोनि ठेला देव।।तु.गा.२१६०.००२।।
गोडी साकरेपासुनि। कैसी निवडिती दोन्हीं।।तु.गा.२१६०.००३।।
तुका म्हणे नाद उठी। विरोनि जाय नभा पोटीं।।तु.गा.२१६०.००४।।
कांहींच मी नव्हें कोणिये गांवींचा। एकटा ठायींचा ठायीं एक ।।तु.गा.२१६१.००१।।
नाहीं जात कोठें येत फिरोनियां। अवघेचि वायांविण बोल।।तु.गा.२१६१.००२।।
नाहीं मज कोणी आपुलें दुसरें। कोणाचा मी खरें कांहीं नव्हे।।तु.गा.२१६१.००३।।
नाहीं आम्हां ज्यावें मरावें लागत। आहों अखंडित जैसे तैसे।।तु.गा.२१६१.००४।।
तुका म्हणे नाम रूप नाहीं आम्हां। वेगळा या कर्मा अकर्मासी।।तु.गा.२१६१.००५।।
ठेविलें जतन। करूनियां निज धन।।तु.गा.२१६२.००१।।
जयापासाव उत्पत्ति। तें हें बीज धरिलें हातीं।।तु.गा.२१६२.००२।।

निवडिलें वरळा भूस। सार आइन जिन्नस।।तु.गा.२१६२.००३।।
तुका म्हणे नारायण। भाग संचिताचा गुण।।तु.गा.२१६२.००४।।
नाहीं येथें वाणी। सकळां वर्णीं घ्यावी धणी।।तु.गा.२१६३.००१।।
जालें दर्पणाचें अंग। ज्याचा त्यासीं दावी रंग।।तु.गा.२१६३.००२।।
एका भावाचा एकांत। पीक पिकला अनंत।।तु.गा.२१६३.००३।।
तुका खळे दाणीं। करी बैसोनि वांटणी।।तु.गा.२१६३.००४।।
मीचि मज व्यालों। पोटा आपुलिया आलों।।तु.गा.२१६४.००१।।
आतां पुरलें नवस। निरसोनि गेली आस।।तु.गा.२१६४.००२।।
जालों बारा बळी। गेलों मरोनि तें काळीं।।तु.गा.२१६४.००३।।
दोहींकडे पाहे। तुका आहे तैसा आहे।।तु.गा.२१६४.००४।।
अद्वयचि द्वय झालेंचि कारण। धरिलें नारायणें भक्तिसुख।।तु.गा.२१६५.००१।।
अपरोक्ष आकार झाला चतुर्भुज। एकतत्त्वीं बीज भिन्न नाहीं।।तु.गा.२१६५.००२।।
शून्य निरसूनि राहिलें निर्मळ। तें दिसे केवळ विटेवरी।।तु.गा.२१६५.००३।।
सुखें घ्यावें नाम वदना ही चाड। सरिता वापी आड एक पाणी।।तु.गा.२१६५.००४।।
तुका म्हणे मीच आहे तेणें सुखें। भेद नाहीं मुखें नाम गातां।।तु.गा.२१६५.००५।।
अनंताच्या ऐकों कीर्ती। ज्याच्या चित्तीं हरिनाम।।तु.गा.२१६६.००१।।
उल्लंघूनि गेले सिंधु। हा भवबंधु तोडोनियां।।तु.गा.२१६६.००२।।
हळुहळू तेचि वाहीं। चालों कांहीं अधिकारें।।तु.गा.२१६६.००३।।
खुंटुनियां गेले नांवा। नाहीं हेवा खोळंबा।।तु.गा.२१६६.००४।।
नलगे मोल द्यावा रुका। भाव एका कारणें।।तु.गा.२१६६.००५।।
भीमातिरीं थडवा केला। उठा चला लवलाहें।।तु.गा.२१६६.००६।।
तुका म्हणे पाहतों वाट। उभा नीट पाउलीं।।तु.गा.२१६६.००७।।
आवडीच्या ऐसें झालें। मुखा आलें हरिनाम।।तु.गा.२१६७.००१।।

आतां घेऊं धणीवरि। मागें उरी नुरे तों।।तु.गा.२१६७.००२।।
सांठवण मना ऐसी। पुढें रासी अमुप।।तु.गा.२१६७.००३।।
तुका म्हणे कारण झालें। विठ्ठल या तीं अक्षरीं।।तु.गा.२१६७.००४।।
काय माझें नेती वाईट म्हणोन। करूं समाधान काशासाठीं।।तु.गा.२१६८.००१।।
काय मज लोक नेतील परलोका। जातां कोणी एक निवारील।।तु.गा.२१६८.००२।।
न म्हणे कोणासी उत्तम वाईट। सुखें माझी कूट खावो मागें।।तु.गा.२१६८.००३।।
सर्व माझा भार असे पांडुरंगा। काय माझें जगासवें काज।।तु.गा.२१६८.००४।।
तुका म्हणे माझें सर्वही साधन। नामसंकीर्तन विठोबाचें।।तु.गा.२१६८.००५।।
तुका वेडा अविचार। करी बडबड फार।।तु.गा.२१६९.००१।।
नित्य वाचे हाचि छंद। राम कृष्ण हरि गोविंद।।तु.गा.२१६९.००२।।
धरी पांडुरंगीं भाव। आणीक नेणें दुजा देव।।तु.गा.२१६९.००३।।
गुरुज्ञान सर्वां ठायीं। दुजें न विचारी कांहीं।।तु.गा.२१६९.००४।।
बोल नाइकें कोणाचे। कथें नागवाचि नाचे।।तु.गा.२१६९.००५।।
संग उपचारें कांटाळे। सुखें भलते ठायीं लोळे।।तु.गा.२१६९.००६।।
कांहीं उपदेशिलें नेणें। वाचें विठ्ठल विठ्ठल म्हणे।।तु.गा.२१६९.००७।।
केला बहुतीं फजित। तरी हेंचि करी नित्य।।तु.गा.२१६९.००८।।
अहो पंडित जन। तुका टाकावा थुंकोन।।तु.गा.२१६९.००९।।
दूध दही ताक पशूंचें पाळण। त्यामध्यें कारण घृत सार।।तु.गा.२१७०.००१।।
हेंचि वर्म आम्हां भाविकांचे हातीं। म्हणऊनि चित्तीं धरिला राम।।तु.गा.२१७०.००२।।
लोह कफ गारा अग्नीचिया काजें। येऱ्हवीं तें ओझें कोण वाहे।।तु.गा.२१७०.००३।।
तुका म्हणे खोरीं पाहारा जतन। जोंवरि हें धन हातीं लागे।।तु.गा.२१७०.००४।।
न मिळो खावया न वाढो संतान। परि हा नारायण कृपा करो।।तु.गा.२१७१.००१।।
ऐसी माझी वाचा मज उपदेशी। आणीक लोकांसी हेंचि सांगे।।तु.गा.२१७१.००२।।

विटंबो शरीर होत कां विपत्ती। परि राहे चित्तीं नारायण ।।तु.गा.२१७१.००३ ।।

तुका म्हणे नाशिवंत हें सकळ। आठव गोपाळ तेंचि हित ।।तु.गा.२१७१.००४ ।।

पुरविली आळी। जे जे केली तें तें काळीं।।तु.गा.२१७२.००१ ।।

माय तरी ऐसी सांगा। कृपाळुवा पांडुरंगा ।।तु.गा.२१७२.००२ ।।

घेतलें नुतरी। उचलोनी कडियेवरी ।।तु.गा.२१७२.००३ ।।

तुका म्हणे घांस। मुखीं घाली ब्रह्मरस ।।तु.गा.२१७२.००४ ।।

विठ्ठल सोयरा सज्जन विसांवा। जाइन त्याच्या गांवा भेटावया ।।तु.गा.२१७३.००१ ।।

सीण भाग त्यासी सांगेन आपुला। तो माझा बापुला सर्व जाणे ।।तु.गा.२१७३.००२ ।।

माय माउलिया बंधुवर्ग जाणा। भाकीन करुणा सकळिकांसी ।।तु.गा.२१७३.००३ ।।

संत महंत सिद्ध महानुभाव मुनि। जीवभाव जाउनि सांगेन त्या ।।तु.गा.२१७३.००४ ।।

माझिये माहेरीं सुखा काय उणें। नलगे येणें जाणें तुका म्हणे ।।तु.गा.२१७३.००५ ।।

सुखाचें ओतलें। दिसे श्रीमुख चांगलें ।।तु.गा.२१७४.००१ ।।

मनें धरिला अभिलाष। मिठी घातली पायांस ।।तु.गा.२१७४.००२ ।।

होतां दृष्टादृष्टीं। ताप गेला उठाउठी ।।तु.गा.२१७४.००३ ।।

तुका म्हणे जाला। लाभें लाभ दुणावला ।।तु.गा.२१७४.००४ ।।

श्रीसंतांचिया माथा चरणांवरी। साष्टांग हें करीं दंडवत ।।तु.गा.२१७५.००१ ।।

विश्रांती पावलों सांभाळा उत्तरीं। वाढलें अंतरीं प्रेमसुख ।।तु.गा.२१७५.००२ ।।

डौरली हे काया कृपेच्या वोरसें। नव्हे अनारिसें उद्धरलों ।।तु.गा.२१७५.००३ ।।

तुका म्हणे मज न घडतां सेवा। पूर्वपुण्यठेवा वोढवला ।।तु.गा.२१७५.००४ ।।

अर्भकाचे साठीं। पंतें हातीं धरिली पाटी ।।तु.गा.२१७६.००१ ।।

तैसे संत जगीं। क्रिया करुनि दाविती अंगीं ।।तु.गा.२१७६.००२ ।।

बाळकाचे चाली। माता जाणुनि पाउल घाली ।।तु.गा.२१७६.००३ ।।

तुका म्हणे नाव। जनासाठीं उदकीं ठाव ।।तु.गा.२१७६.००४ ।।

अवघा तो शकुन। हृदयीं देवाचें चिंतन।।तु.गा.२१७७.००१ ।।
येथें नसतां वियोग। लाभा उणें काय मग।।तु.गा.२१७७.००२ ।।
छंद हरिच्या नामाचा। शुचिर्भूत सदा वाचा।।तु.गा.२१७७.००३ ।।
तुका म्हणे हरिच्या दासां। शुभ काळ अवघ्या दिशा।।तु.गा.२१७७.००४ ।।
आम्हां सोयरे हरिजन। जनीं भाग्य निकिंचन।।तु.गा.२१७८.००१ ।।
ज्यांच्या धैर्या नाहीं भंग। भाव एकविध रंग।।तु.गा.२१७८.००२ ।।
भुकें तहानें चित्तीं। सदा देव आठविती।।तु.गा.२१७८.००३ ।।
तुका म्हणे धन। ज्यांचें निज नारायण।।तु.गा.२१७८.००४ ।।
अंगें अनुभव जाला मज। संतरजचरणांचा।।तु.गा.२१७९.००१ ।।
सुखी जालों या सेवनें। दुःख नेणें यावरी।।तु.गा.२१७९.००२ ।।
निर्माल्याचें तुळसीदळ। विष्णुजळ चरणींचें।।तु.गा.२१७९.००३ ।।
तुका म्हणे भावसार। करुनि फार मिश्रित।।तु.गा.२१७९.००४ ।।
आले संत पाय ठेविती मस्तकीं। इहीं उभयलोकीं सरता केलों।।तु.गा.२१८०.००१ ।।
वंदीन पाउलें लोळेन चरणीं। आजि इच्छाधणीं फिटईल।।तु.गा.२१८०.००२ ।।
अवघीं पूर्व पुण्यें जालीं सानुकूळ। अवघेंचि मंगळ संतभेटी।।तु.गा.२१८०.००३ ।।
तुका म्हणे कृतकृत्य जालों देवा। नेणों परि सेवा डोळां देखें।।तु.गा.२१८०.००४ ।।
आम्हीं नाचों तेणें सुखें। वाऊं टाळी गातों मुखें।।तु.गा.२१८१.००१ ।।
देव कृपेचा कोंवळा। शरणागता पाळी लळा।।तु.गा.२१८१.००२ ।।
आम्हां जाला हा निर्धार। मागे तारिलें अपार।।तु.गा.२१८१.००३ ।।
तुका म्हणे संतीं। वर्म दिलें आम्हां हातीं।।तु.गा.२१८१.००४ ।।
आलिंगन घडे। मोक्ष सायुज्यता जोडे।।तु.गा.२१८२.००१ ।।
ऐसा संतांचा महिमा। जाली बोलायाची सीमा।।तु.गा.२१८२.००२ ।।
तीर्थें पर्वकाळ। अवघी पायांपें सकळ।।तु.गा.२१८२.००३ ।।

तुका म्हणे देवा। त्यांची केली पावे सेवा।।तु.गा.२१८२.००४।।
आजिचें हें मज तुम्हीं कृपादान। दिलें संतजन मायबापीं।।तु.गा.२१८३.००१।।
आलीं मुखावाटे अमृतवचनें। उत्तीर्णता येणें नव्हे जन्में।।तु.गा.२१८३.००२।।
तुका म्हणे तुम्हीं उदार कृपाळ। शृंगारिलें बाळ कवतुकें ।।तु.गा.२१८३.००३।।
आवडीची न पुरे धणी। प्रीत मनीं बैसली।।तु.गा.२१८४.००१।।
नित्य नवा कळवळा। मायबाळामध्यें तो।।तु.गा.२१८४.००२।।
सुख सुखा भेटों आलें। होय वाल्हें पोटींचें।।तु.गा.२१८४.००३।।
तुका म्हणे ब्रह्मानंदें। संतवृंदें चरणापें।।तु.गा.२१८४.००४।।
अग्निमाजी गेलें। अग्नि होऊन तेंच ठेलें।।तु.गा.२१८५.००१।।
काय उरलें तया पण। मागील तें नाम गुण।।तु.गा.२१८५.००२।।
लोह लागे परिसा अंगीं। तोही भूषण जाला जगीं।।तु.गा.२१८५.००३।।
सरिता ओहळा ओघा। गंगें मिळोनि जाल्या गंगा।।तु.गा.२१८५.००४।।
चंदनाच्या वासें। तरु चंदन जाले स्पर्शें।।तु.गा.२१८५.००५।।
तुका जवळा संतां पायीं। दुजेपणा ठाव नाहीं।।तु.गा.२१८५.००६।।
ऐशा भाग्यें ज्यालों। तरी धन्य जन्मा आलों।।तु.गा.२१८६.००१।।
रुळें तळील पायरी। संत पाय देती वरी।।तु.गा.२१८६.००२।।
प्रेमामृतपान। होईल चरणरजें स्नान।।तु.गा.२१८६.००३।।
तुका म्हणे सुखें। तयां हरतील दुःखें।।तु.गा.२१८६.००४।।
एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया। घालिती हुंबरी एक वाहातांती टाळिया।।तु.गा.२१८७.००१।।
मातले वैष्णव नटती नाना छंदें। नाहीं मोक्षपदीं चाड भजनीं आवडी।।तु.गा.२१८७.००२।।
हाका आरोळिया गीत वाद्य सुखसोहळे। जाय ते न कळे केव्हां रजनी दिवस।।तु.गा.२१८७.००३।।
तीर्थीं नाहीं चाड नलगे जावे वनांतरा। तुका म्हणे हरिहरात्मकचि पृथिवी।।तु.गा.२१८७.००४।।
ऐसे ऐसियानें भेटती ते साधु। ज्यांच्या दर्शनें तुटे भवबंधू। जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदु। जे कां मोक्षसिद्धी तीर्थवंद्यु रे।।तु.गा.२१८८.००१।।

भाव सर्व कारण मूळ बंदु। सदा समबुद्धि नास्तिक्य भेदु । भूतकृपा मोडी द्वेषकंदु। शत्रु मित्र पुत्र समकरीं बंधु रे।।तु.गा.२१८८.००२।।
मन बुद्धि काया वाचा शुद्ध करी। रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं। लघुत्व सर्व भावें अंगीकारीं। सांडी मांडी मीतूंपण ऐसी थोरी रे।।तु.गा.२१८८.००३।।
अर्थकामचाड नाहीं चित्ता। मानामान मोह माया मिथ्या। वर्ते समाधानी जाणोनि नेणता। साधु भेट देती तया अवचिता रे।।तु.गा.२१८८.००४।।
मनीं दृढ धरीं विश्वास। नाहीं सांडीमांडीचा सायास। साधुदर्शन नित्यकाळ त्यास। तुका म्हणे जो विटला जाणीवेस रे।।तु.गा.२१८८.००५।।
ऐसा ज्याचा अनुभव। विश्व देव सत्यत्वें।।तु.गा.२१८९.००१।।
देव तयां जवळी असे। पाप नासे दर्शनें।।तु.गा.२१८९.००२।।
कामक्रोधा नाहीं चाली। भूतीं जाली समता।।तु.गा.२१८९.००३।।
तुका म्हणे भेदाभेद। गेला वाद खंडोनि।।तु.गा.२१८९.००४।।
उदकीं कालवी शेण मलमूत्र। तो होय पवित्र कासयानें।।तु.गा.२१९०.००१।।
उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना। विन्मुख चरणा संतांचिया।।तु.गा.२१९०.००२।।
दुखवी तो बुडे सांगडीचा तापा। अतित्याई पापाचीच मूर्ति।।तु.गा.२१९०.००३।।
तुका म्हणे जेव्हां फिरतें कपाळ। तरी अमंगळ योग होतो।।तु.गा.२१९०.००४।।
उजळलें भाग्य आतां। अवघी चिंता वारली।।तु.गा.२१९१.००१।।
संतदर्शनें हा लाभ। पद्मनाभ जोडला।।तु.गा.२१९१.००२।।
संपुष्ट हें हृदयपेटी। करुनि पोटीं सांठवूं।।तु.गा.२१९१.००३।।
तुका म्हणे होता ठेवा। तो या भावा सांपडला।।तु.गा.२१९१.००४।।
करणें तें देवा। हेचि एक पावे सेवा।।तु.गा.२१९२.००१।।
अवघें घडे येणें सांग। भक्त देवाचें तें अंग।।तु.गा.२१९२.००२।।
हेंचि एक वर्म। काय बोलिलों तो धर्म।।तु.गा.२१९२.००३।।
तुका म्हणे खरें। खरें त्रिवाचा उत्तरें।।तु.गा.२१९२.००४।।
करितां या सुखा। अंतपार नाहीं लेखा।।तु.गा.२१९३.००१।।
माथां पडती संतपाय। सुख कैवल्य तें काय।।तु.गा.२१९३.००२।।
ऐसा लाभ नाहीं। दुजा विचारितां कांहीं।।तु.गा.२१९३.००३।।

तुका म्हणे गोड। तेथें पुरे माझें कोड।।तु.गा.२१९३.००४।।
कां नवजावें बैसोनि कथे । ऐसें ऐका हो श्रोते । पांडुरंग तेथें । उभा असे तिष्ठत ।।तु.गा.२१९४.००१।।
म्हणऊनि करी धीर। लक्ष लावूनि सादर। भवसिंधुपार। असेल ज्या तरणें।।तु.गा.२१९४.००२।।
कथें कांहीं अणुमात्र । न बोलावा हा वृत्तांत । देवभक्तां चित्त । समरसीं खंडणा ।।तु.गा.२१९४.००३।।
कां वैष्णव पूजावे । ऐका घेईल जो भावें । चरणरजा शिवें । वोढविला मस्तक ।।तु.गा.२१९४.००४।।
ऐसें जाणा हो निभ्रांत । देव वैष्णवांचा अंकित । अलिप्त अतीत । परमित त्यासाठीं ।।तु.गा.२१९४.००५।।
घालोनि लोळणी । तुका आला लोटांगणीं । वंदी पायवणी । संतचरणींचें माथां ।।तु.गा.२१९४.००६।।
काय माझी संत पाहती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ।।तु.गा.२१९५.००१।।
कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ।।तु.गा.२१९५.००२।।
बोबड्या उत्तरीं म्हणे हरिहरि । आणीक भिकारी नेणें दुजें ।।तु.गा.२१९५.००३।।
तुका म्हणे तुम्हीं विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ।।तु.गा.२१९५.००४।।
काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ।।तु.गा.२१९६.००१।।
थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ।।तु.गा.२१९६.००२।।
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती परउपकारें ।।तु.गा.२१९६.००३।।
भूतांची दया हें भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ।।तु.गा.२१९६.००४।।
तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ।।तु.गा.२१९६.००५।।
काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ।।तु.गा.२१९७.००१।।
काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ।।तु.गा.२१९७.००२।।
सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ।।तु.गा.२१९७.००३।।
तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसें मज येती सांभाळीत।।तु.गा.२१९७.००४।।
कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ।।तु.गा.२१९८.००१।।
बरवें जाले शरण गेलों । उगविलों संकटीं ।।तु.गा.२१९८.००२।।
आणिला ही रूपा बळें । करूनि खळें हरिदासीं ।।तु.गा.२१९८.००३।।

तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ।।तु.गा.२१९८.००४।।
केला कईवाड संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ।।तु.गा.२१९९.००१।।
काय जीवित्वाची धरूनियां आशा। व्हावें गर्भवासा पात्र भेणें ।।तु.गा.२१९९.००२।।
अबाळीनें जावें निश्चिंतीच्या ठायां । रांडा रोटा वायां करूं नये ।।तु.गा.२१९९.००३।।
तुका म्हणे बळी देतां तें निधान । भिकेसाठीं कोण राज्य देतो ।।तु.गा.२१९९.००४।।
कोण त्याचा पार पावला धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ।।तु.गा.२२००.००१।।
अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्याही खुंटलिया ।।तु.गा.२२००.००२।।
फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ।।तु.गा.२२००.००३।।
दाविलें अनंतें अर्जुनासि पोटीं । आणीक त्या सृष्टी कृष्ण लोक ।।तु.गा.२२००.००४।।
तुका म्हणे लागा संतांचिये कासे । ठाव घेतां कैसें वांचा जीवें ।।तु.गा.२२००.००५।।
कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें ।।तु.गा.२२०१.००१।।
ऐसें नेणों नारायणा । संतीं सांभाळिलें दीना ।।तु.गा.२२०१.००२।।
कोण लाभकाळ । दिन आजिचा मंगळ ।।तु.गा.२२०१.००३।।
तुका म्हणे जाला । एवढा लाभ का विठ्ठला ।।तु.गा.२२०१.००४।।
कोण पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिक दुराविलें ।।तु.गा.२२०२.००१।।
ऐसीं वर्मे मज दावीं नारायणा । अंतरींच्या खुणा प्रकटोनि ।।तु.गा.२२०२.००२।।
बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करूणा केली ।।तु.गा.२२०२.००३।।
तुका म्हणें मग नये वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ।।तु.गा.२२०२.००४।।
कृपाळू सज्जन तुम्ही संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ।।तु.गा.२२०३.००१।।
आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ।।तु.गा.२२०३.००२।।
अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायांवेगळा नका करूं ।।तु.गा.२२०३.००३।।
तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी । मग मज हरि उपेक्षीना ।।तु.गा.२२०३.००४।।
खळा सदा क्षुद्र दृष्टी । करी कष्टी सज्जना ।।तु.गा.२२०४.००१।।

करिती आपुलाले परी । धणीवरी व्यापार ।।तु.गा.२२०४.००२।।
दया संतां भांडवल । वेची बोल उपकार ।।तु.गा.२२०४.००३।।
तुका म्हणे आपुलालें । उसंतिलें ज्यांणीं तें ।।तु.गा.२२०४.००४।।
गंगाजळा पाहीं पाठीं पोट नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ।।तु.गा.२२०५.००१।।
रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरा नाश तेणें ।।तु.गा.२२०५.००२।।
कर्पूरकांडणी काय कोंडा कणी । सिंधू मेळवणी काय चाले ।।तु.गा.२२०५.००३।।
परिस चिंतामणि आणिकाचा गुणीं । पालटे लागोनि नव्हे तैसा ।।तु.गा.२२०५.००४।।
तुका म्हणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसे ।।तु.गा.२२०५.००५।।
चिंतनें सरे तो धन्य धन्य काळ । सकळ मंगळ मंगळाचें ।।तु.गा.२२०६.००१।।
संवसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ।।तु.गा.२२०६.००२।।
जनवन ऐसें कृपेच्या सागरें । दाटला आधारें पांडुरंग ।।तु.गा.२२०६.००३।।
तुका म्हणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ।।तु.गा.२२०६.००४।।
चिंता नाहीं गांवीं विष्णुदांसाचिये । घोष जयजयाकार सदा ।।तु.गा.२२०७.००१।।
नारायण घरीं सांठविलें धन । अवघेचि वाण तया पोटीं ।।तु.गा.२२०७.००२।।
सवंग सकळां पुरे धणीवरी । सेवावया नारी नर बाळा ।।तु.गा.२२०७.००३।।
तुका म्हणे येणें आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ।।तु.गा.२२०७.००४।।
जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ।।तु.गा.२२०८.००१।।
तुम्हीं सांभाळीलें संतीं । भय निरसली खंती।।तु.गा.२२०८.००२।।
कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ।।तु.गा.२२०८.००३।।
तुका म्हणे काळ । आतां करूं न शके बळ ।।तु.गा.२२०८.००४।।
जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ।।तु.गा.२२०९.००१।।
ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ।।तु.गा.२२०९.००२।।
सुखाची विश्रांती । उमटे मातेचिये चित्तीं ।।तु.गा.२२०९.००३।।

तुम्ही संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वाणूं ।।तु.गा.२२१५.००१ ।।
अवतार तुम्हां धराया कारण । उद्धरावे जन जड जीव ।।तु.गा.२२१५.००२ ।।
वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ।।तु.गा.२२१५.००३ ।।
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुम्ही जगीं संतजन।।तु.गा.२२१५.००४ ।।
तेंच किती वारंवार । बोलों फार बोलिलें ।।तु.गा.२२१६.००१ ।।
आतां माझे दंडवत । तुमच्या संत चरणांसी ।।तु.गा.२२१६.००२ ।।
आवडी तें नीच नवी । जाली जीवीं वसती।।तु.गा.२२१६.००३ ।।
तुका म्हणे बरवें जालें । घरा आलें बंदरींचें ।।तु.गा.२२१६.००४ ।।
ते माझें सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ।।तु.गा.२२१७.००१ ।।
येरा मान विधिपाळणापुरते । देवाचीं तीं भुतें म्हणोनियां ।।तु.गा.२२१७.००२ ।।
सर्वभावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांची आस उच्छिष्टाची ।।तु.गा.२२१७.००३ ।।
तुका म्हणे जैसे आवडती हरिदास । तैसी नाहीं आस आणिकांची ।।तु.गा.२२१७.००४ ।।
तृषाकाळीं उदक भेटी । पडे मिठी आवडीची ।।तु.गा.२२१८.००१ ।।
ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ।।तु.गा.२२१८.००२ ।।
मिष्टान्नाचा योग भुकें। म्हणतां चुके पुरेसें ।।तु.गा.२२१८.००३ ।।
तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ।।तु.गा.२२१८.००४ ।।
दसरा दिवाळी तोचि माझा सण । सखे हरिजन भेटतील ।।तु.गा.२२१९.००१ ।।
अमुप जोडिल्या पुण्याचिया राशी । पार त्या सुखासी नाहीं लेखा ।।तु.गा.२२१९.००२ ।।
धन्य दिवस आजी झाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ।।तु.गा.२२१९.००३ ।।
तुका म्हणे काय होऊं उतराई । जीव ठेवूं पायीं संतांचिये ।।तु.गा.२२१९.००४ ।।
दास जालों हरिदासांचा । बुद्धि काया मनें वाचा ।।तु.गा.२२२०.००१ ।।
तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळमृदंगकल्लोळ । नासे दुष्टबुद्धि सकळ । समाधि हरिकीर्तनीं ।।तु.गा.२२२०.००२ ।।
ऐकतां हरिकथा । भक्ति लागे त्या अभक्तां ।।तु.गा.२२२०.००३ ।।

देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ।।तु.गा.२२२०.००४।।
हें सुख ब्रह्मादिकां । नाहीं नाहीं म्हणे तुका ।।तु.गा.२२२०.००५।।
दासां सर्वकाळ । तेथें सुखाचा कल्लोळ ।।तु.गा.२२२१.००१।।
जेथें वसती हरिचे दास । पुण्य पिके पापा नास ।।तु.गा.२२२१.००२।।
फिरे सुदर्शन । घेऊंनियां नारायण ।।तु.गा.२२२१.००३।।
तुका म्हणे घरीं होय। म्हणियारा कामारी ।।तु.गा.२२२१.००४।।
देवाचा भक्त तो देवासीच गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची ।।तु.गा.२२२२.००१।।
कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघियां हातीं अंतरला ।।तु.गा.२२२२.००२।।
निष्काम वेडें म्हणती बापुडें । अवघियां साकडें जाला कैसा ।।तु.गा.२२२२.००३।।
माझें ऐसें तया न म्हणती कोणी । असे रानीं वनीं भलतें ठायीं ।।तु.गा.२२२२.००४।।
प्रात:स्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी ।।तु.गा.२२२२.००५।।
कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । म्हणती या चांडाळा काय जालें ।।तु.गा.२२२२.००६।।
गातां शंका नाहीं बैसें भलतें ठायीं । शिव्या देती आईबाप भाऊ ।।तु.गा.२२२२.००७।।
घरीं बाईल म्हणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ मरता तरी ।।तु.गा.२२२२.००८।।
जन्मोनि जाला अवघियां वेगळा। म्हणोनि गोपाळा दुर्लभ तो ।।तु.गा.२२२२.००९।।
तुका म्हणे जो संसारा रुसला । तेणेंचि ठाकिला सिद्धपंथ ।।तु.गा.२२२२.०१०।।
देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ।।तु.गा.२२२३.००१।।
भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ।।तु.गा.२२२३.००२।।
देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ।।तु.गा.२२२३.००३।।
एका अंगीं दोन्ही झालीं हे निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ।।तु.गा.२२२३.००४।।
तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव देव भक्त ।।तु.गा.२२२३.००५।।
धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडली तो ।।तु.गा.२२२४.००१।।
संदेहाची सुटली गाठी । जालों पोटीं शीतळ ।।तु.गा.२२२४.००२।।

भवनदीचा जाला तारा । या उत्तरा प्रसादें ।।तु.गा.२२२४.००३ ।।
तुका म्हणे मंगळ आतां । कोण दाता याहुनि ।।तु.गा.२२२४.००४ ।।
धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ।।तु.गा.२२२५.००१ ।।
येथें उपकारासाठीं । आलें घर ज्यां वैकुंठीं ।।तु.गा.२२२५.००२ ।।
लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ।।तु.गा.२२२५.००३ ।।
मधुरा वाणी होटीं । तुका म्हणे वाव पोटीं ।।तु.गा.२२२५.००४ ।।
धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ।।तु.गा.२२२६.००१ ।।
निजलिया जागविती । निज पुरवूनि देती ।।तु.गा.२२२६.००२ ।।
एक वेवसाव । त्याचा संग त्यांचा जीव ।।तु.गा.२२२६.००३ ।।
हितें कळे हित । ग्वाही एक एकां चित्त ।।तु.गा.२२२६.००४ ।।
विषमाचें कांहीं । आड तया एक नाहीं ।।तु.गा.२२२६.००५ ।।
तुका म्हणे बरीं । घरा येतील त्यापरी ।।तु.गा.२२२६.००६ ।।
न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ।।तु.गा.२२२७.००१ ।।
भारें भवनदी नुतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ।।तु.गा.२२२७.००२ ।।
तुका म्हणे गर्व पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ।।तु.गा.२२२७.००३ ।।
नमावे पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचिया ।।तु.गा.२२२८.००१ ।।
कृपेचा वोरस न समाये पोटीं । म्हणोनि उफराटीं वचनें हीं ।।तु.गा.२२२८.००२ ।।
तुमची उष्टावळीं तें माझें भोजन । झाडावें अंगण केरपुंजे ।।तु.गा.२२२८.००३ ।।
परि ऐसें पुण्य नाहीं माझें गांठीं । जेणें पडे मिठी पायांसवें ।।तु.गा.२२२८.००४ ।।
तुका म्हणे राहे आठवण चित्तीं । ऐसी कृपा संतीं केली तुम्हीं ।।तु.गा.२२२८.००५ ।।
न लगे चंदना पुसावा परिमळ । वनस्पतिमेळ हाकारूनी ।।तु.गा.२२२९.००१ ।।
अंतरींचें धांवें स्वभावें बाहेरी । धरितांही परी आवरेना ।।तु.गा.२२२९.००२ ।।
सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाशकिरणा कर म्हूण ।।तु.गा.२२२९.००३ ।।

तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ।।तु.गा.२२२९.००४।।
नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ।।तु.गा.२२३०.००१।।
माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ।।तु.गा.२२३०.००२।।
न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ।।तु.गा.२२३०.००३।।
तुका म्हणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ।।तु.गा.२२३०.००४।।
नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ।।तु.गा.२२३१.००१।।
नये मोल देतां धनाचियां राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ।।तु.गा.२२३१.००२।।
तुका म्हणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ।।तु.गा.२२३१.००३।।
नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ।।तु.गा.२२३२.००१।।
असें तुमचा रजरेण । संतपायींची वाहाण ।।तु.गा.२२३२.००२।।
नाहीं स्वरुपीं ओळखीं । भक्तिभाव करीं देखीं ।।तु.गा.२२३२.००३।।
नाहीं शून्याकारीं । क्षर ओळखी अक्षरीं ।।तु.गा.२२३२.००४।।
नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें काई ।।तु.गा.२२३२.००५।।
कांहीं नव्हे तुका । पायां पडेन हें ऐका ।।तु.गा.२२३२.००६।।
परमेष्ठिपदा । तुच्छ मानिती सर्वदा ।।तु.गा.२२३३.००१।।
हेंचि ज्यांचें धन । सदा हरीचें चिंतन ।।तु.गा.२२३३.००२।।
इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ।।तु.गा.२२३३.००३।।
सार्वभौमराज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ।।तु.गा.२२३३.००४।।
पाताळींचें आधिपत्य । तें तों मानिती विपत्य ।।तु.गा.२२३३.००५।।
योगसिद्धिसार । त्यांसि वाटे तें असार ।।तु.गा.२२३३.००६।।
मोक्षायेवढें सुख । सुख नव्हे तेंचि दुःख ।।तु.गा.२२३३.००७।।
तुका म्हणे हरीविण । त्यांसि वाटे अवघा शीण ।।तु.गा.२२३३.००८।।
पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ।।तु.गा.२२३४.००१।।

तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ।।तु.गा.२२३४.००२।।
देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ।।तु.गा.२२३४.००३।।
काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ।।तु.गा.२२३४.००४।।
तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ।।तु.गा.२२३४.००५।।
पाप ताप दैन्य जाय उठाउठी । जालिया या भेटी हरिदासांची ।।तु.गा.२२३५.००१।।
ऐसें बळ नाहीं आणिकाचे अंगीं । तप तीर्थ जगीं दान व्रत ।।तु.गा.२२३५.००२।।
चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथीं ।।तु.गा.२२३५.००३।।
भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ।।तु.गा.२२३५.००४।।
तुका म्हणे मना जालें समाधान । देखिल्या चरण वैष्णवांचे ।।तु.गा.२२३५.००५।।
पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । झालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ।।तु.गा.२२३६.००१।।
आजि फिटलें माझें कोडें । भवदु:खाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ।।तु.गा.२२३६.००२।।
आळिंगनें संतांचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तक हें पायां –। वरी त्यांच्या ठेवितां ।।तु.गा.२२३६.००३।।
तुका म्हणे धन्य झालों । सुखें संतांचियां धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ।।तु.गा.२२३६.००४।।
पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ।।तु.गा.२२३७.००१।।
नेघे माझी वाचा तुटी । महालाभ फुकासाठीं ।।तु.गा.२२३७.००२।।
विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचियां भाव ।।तु.गा.२२३७.००३।।
तुका म्हणे पापें । जातीं संतांचिया जपें ।।तु.गा.२२३७.००४।।
पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ।।तु.गा.२२३८.००१।।
कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे। अशुभ त्यांपुढें । शुभ होउनियां ठाके ।।तु.गा.२२३८.००२।।
प्रेमसुखाचिया राशी । पाप नाहीं ओखदासी ।।तु.गा.२२३८.००३।।
तुका म्हणे त्यांनीं । केलीं वैकुंठ मेदिनी ।।तु.गा.२२३८.००४।।
पूजा समाधान । अतिशय वाढे शीण ।।तु.गा.२२३९.००१।।
हें तों जाणां तुम्ही संत । आहे बोलिली ती नीत ।।तु.गा.२२३९.००२।।

पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ।।तु.गा.२२३९.००३।।
तुका म्हणे माथां । पायीं माझा तुम्हां संतां ।।तु.गा.२२३९.००४।।
पूज्या पूज्यमान । कथे उभे हरिजन ।।तु.गा.२२४०.००१।।
ज्याची कीर्ती वाखाणिती । तेथें ओतली ते मूर्ती ।।तु.गा.२२४०.००२।।
देहाचा विसर । केला आनंदें संचार ।।तु.गा.२२४०.००३।।
गेला अभिमान । लाज बोळविला मान ।।तु.गा.२२४०.००४।।
शोक मोह चिंता । यांची नेणती ते वार्ता ।।तु.गा.२२४०.००५।।
तुका म्हणे सखे । विठोबाचि ते सारिखे ।।तु.गा.२२४०.००६।।
प्रमाण त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला ।।तु.गा.२२४१.००१।।
न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ।।तु.गा.२२४१.००२।।
अवघा त्याचा होय । जीव भावासहित ।।तु.गा.२२४१.००३।।
वदे उपचारें वाणीं । कांहीं माग म्हणऊनि ।।तु.गा.२२४१.००४।।
उदासीनाच्या लागें । तुका म्हणे धांवें मागें ।।तु.गा.२२४१.००५।।
प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें । न धरावी मनें । शुद्धी देशकाळाची ।।तु.गा.२२४२.००१।।
मुक्त लज्जाविरहित । भाग्यवंत हरिभक्त । जाले वोसंडत । नामकीर्ति पवाडे ।।तु.गा.२२४२.००२।।
जोडी जाली अविनाश । जन्मोनि जाले हरिचे दास । त्यांस नव्हे गर्भवास । परब्रह्मीं सौरस ।।तु.गा.२२४२.००३।।
हेचि वाहाती संकल्प । पुण्यप्रसंगाचे जप । तुका म्हणे पाप । गांवीं नाहीं हरिजना ।।तु.गा.२२४२.००४।।
बरवें देशाउर जालों । काय बोलें बोलावें ।।तु.गा.२२४३.००१।।
लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें ।।तु.गा.२२४३.००२।।
भाग्यें जाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ।।तु.गा.२२४३.००३।।
तुका म्हणे श्रम केला । अवघा आला फळासी ।।तु.गा.२२४३.००४।।
बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुम्हां ठावें जातिकुळ ।।तु.गा.२२४४.००१।।
करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरी ।।तु.गा.२२४४.००२।।

वाचेचा चाळक जाला दावी वर्म । उचित ते धर्म मजपुढें ।।तु.गा.२२४४.००३।।
तुका म्हणे पुढें अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ।।तु.गा.२२४४.००४।।
ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटीं वेदशास्त्रें ।।तु.गा.२२४५.००१।।
शास्त्रांचें भांडण तप तीर्थाटन । उर्वीचें भ्रमण याजसाठीं ।।तु.गा.२२४५.००२।।
याजसाठीं जप याजसाठीं तप । व्यासेंही अमुप ग्रंथ केले ।।तु.गा.२२४५.००३।।
याजसाठीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका म्हणे ।।तु.गा.२२४५.००४।।
भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेलें आशापाश निवारूनि ।।तु.गा.२२४६.००१।।
विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे जन धन माता पिता ।।तु.गा.२२४६.००२।।
निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ।।तु.गा.२२४६.००३।।
तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भय नर्का जाणें ।।तु.गा.२२४६.००४।।
भक्ताचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ।।तु.गा.२२४७.००१।।
जाणोनि नेणते जाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ।।तु.गा.२२४७.००२।।
अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ।।तु.गा.२२४७.००३।।
टाळघोळ कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ।।तु.गा.२२४७.००४।।
तुका म्हणे हें तों आहे तयांठावें । जिहीं एक्याभावें जाणितला ।।तु.गा.२२४७.००५।।
भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ।।तु.गा.२२४८.००१।।
हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ।।तु.गा.२२४८.००२।।
महादोषां आला त्रास । जन्ममरणां केला नास ।।तु.गा.२२४८.००३।।
सहस्त्रनामांची आरोळी । एक एकाहूनि बळी ।।तु.गा.२२४८.००४।।
नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ।।तु.गा.२२४८.००५।।
तुका म्हणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ।।तु.गा.२२४८.००६।।
भाग्यवंता हेचि जोडी । परवडी संतांची ।।तु.गा.२२४९.००१।।
धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना ।।तु.गा.२२४९.००२।।

जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांठवणें ।।तु.गा.२२४९.००३।।
तुका म्हणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ।।तु.गा.२२४९.००४।।
भार देखोनि वैष्णवांचे । दूत पळाले यमाचे ।।तु.गा.२२५०.००१।।
आले आले वैष्णववीर । काळ कांपती असुर ।।तु.गा.२२५०.००२।।
गरूडटकयांच्या भारें । भूमी गर्जे जयजयकारें ।।तु.गा.२२५०.००३।।
तुका म्हणे काळ । पळे देखोनियां बळ ।।तु.गा.२२५०.००४।।
भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ।।तु.गा.२२५१.००१।।
योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ति चालत ।।तु.गा.२२५१.००२।।
पित्याचें जें काय धन । पुत्रा कोण वंचील ।।तु.गा.२२५१.००३।।
तुका म्हणे कडे बैसों । तेणें असों निर्भर ।।तु.गा.२२५१.००४।।
मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ।।तु.गा.२२५२.००१।।
जातीचें तें झुरे येरयेरासाठीं । वियोगेंही तुटी नेघे कधीं ।।तु.गा.२२५२.००२।।
भेटीची अपेक्षा वारता आदर । पुसे नव्हे धीर मागुतालें ।।तु.गा.२२५२.००३।।
तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन । सोईरे हरिजन प्राणसखे ।।तु.गा.२२५२.००४।।
माउलीची चाली लेंकराचे ओढी । तयालागीं काढी प्राण प्रीती ।।तु.गा.२२५३.००१।।
ऐसी बळिवंत आवडी जी देवा । संतमहानुभावा विनवितों ।।तु.गा.२२५३.००२।।
मोहें मोहियेलें सर्वकाळ चित्त । विसरू तो घेत नाहीं क्षण ।।तु.गा.२२५३.००३।।
तुका म्हणे दिला प्रेमाचा वोरस । सांभाळिले दास आपुले ते ।।तु.गा.२२५३.००४।।
माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ।।तु.गा.२२५४.००१।।
आवडे ज्या हरि अंतरापासूनि । ऐसियांचे मनीं आर्त माझे ।।तु.गा.२२५४.००२।।
तयालागीं जीव होतो कासावीस । पाहातील वास नयन हे ।।तु.गा.२२५४.००३।।
सुफळ हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवांसी ।।तु.गा.२२५४.००४।।
तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ।।तु.गा.२२५४.००५।।

मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ।।तु.गा.२२५५.००१ ।।
देह विसरे आपुला । जवळी घेतां सीण गेला ।।तु.गा.२२५५.००२ ।।
दावी प्रेमभातें । आणि अंगावरी चढतें ।।तु.गा.२२५५.००३ ।।
तुका संतांपुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ।।तु.गा.२२५५.००४ ।।
माझिया मीपणावरी पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें । पापा नाहीं पार दुःखाचे डोंगर । जालों ये भूमीसी ओझें ।।तु.गा.२२५६.००१ ।।
काय विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसें दुःख । नर नारी सकळ उत्तम चांडाळ । न पाहाती डोळां माझें मुख ।।तु.गा.२२५६.००२ ।।
काया वाचा मनें अघटित करणें । चर्म चक्षु हात पाय । निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणीक सांगों किती काय ।।तु.गा.२२५६.००३ ।।
लक्ष्मीमदें मातें घडले महा दोष । पत्नी दोनी भेदाभेद । पितृवचनीं घडली अवज्ञा अविचार । कुटिळ कुचरवादी निंद्य ।।तु.गा.२२५६.००४ ।।
आणीक किती सांगों तें अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन । भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट शब्दहीन ।।तु.गा.२२५६.००५ ।।
संत महानुभाव ऐका हें उत्तर । अवगुण अविचार वृद्धि पापा । तुका म्हणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ।।तु.गा.२२५६.००६ ।।
मायेवरी सत्ता आवडीची बाळा । संकोचोनि लळा प्रतिपाळी ।।तु.गा.२२५७.००१ ।।
अपराध माझे न मनावें मनीं । तुम्ही संतजनीं मायबापीं ।।तु.गा.२२५७.००२ ।।
आरुषावचनीं लेंकुराची आळी । साहोनि कवळी मागुताली ।।तु.गा.२२५७.००३ ।।
तुका म्हणे अंगीं काय नाहीं सत्ता । परि निष्ठुरता उपजेना ।।तु.गा.२२५७.००४ ।।
मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासां । संसार तो कैसा न देखती ।।तु.गा.२२५८.००१ ।।
बैसला गोविंद जडोनियां चित्तीं । आदि तेचि अंतीं अवसानीं ।।तु.गा.२२५८.००२ ।।
भोग नारायणा देऊनि निराळीं । ओंविया मंगळीं तोचि गाती ।।तु.गा.२२५८.००३ ।।
बळ बुद्धि त्याची उपकारासाठीं । अमृत तें पोटीं सांठविलें ।।तु.गा.२२५८.००४ ।।
दयावंत तरी देवाच सारखीं । आपली पारखीं नोळखती ।।तु.गा.२२५८.००५ ।।
तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते ।।तु.गा.२२५८.००६ ।।
मोकळें मन रसाळ वाणी । याचि गुणीं संपन्न ।।तु.गा.२२५९.००१ ।।
लक्ष्मी ते ऐशा नांवें । भाग्यें ज्यावें तरि त्यांनीं ।।तु.गा.२२५९.००२ ।।
नमन ते नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ।।तु.गा.२२५९.००३ ।।

तुका म्हणे त्यांच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ।।तु.गा.२२५९.००४।।
युक्ति तंव जाल्या कुंठित सकळां । उरली हे कळा जीवनाची ।।तु.गा.२२६०.००१।।
संतचरणीं भावें ठेंविलें मस्तक । जोडोनि हस्तक राहिलोंसें ।।तु.गा.२२६०.००२।।
जाणपणें नेणें कांहींच प्रकार । साक्षी तें अंतर अंतरासी ।।तु.गा.२२६०.००३।।
तुका म्हणे तुम्ही केलें कृपादान । तेणें समाधान राहिलोसें ।।तु.गा.२२६०.००४।।
लवविलें तयासवें लवे जाती । अभिमाना हातीं सांपडेना ।।तु.गा.२२६१.००१।।
भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजें हारपती ।।तु.गा.२२६१.००२।।
अर्चन वंदन नवविधा भक्ति । दया क्षमा शांति तये ठायीं ।।तु.गा.२२६१.००३।।
तये गांवीं नाहीं दु:खाची वसति । अवघाचि भूतीं नारायण ।।तु.गा.२२६१.००४।।
अवघेचि जालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचे तोंड न देखती ।।तु.गा.२२६१.००५।।
तुका म्हणे गाजे वैकुंठीं सोहळा । याही भूमंडळामाजी कीर्ति ।।तु.गा.२२६१.००६।।
लेंकरा लेववी माता अळंकार । नाहीं अंतपार आवडीसी ।।तु.गा.२२६२.००१।।
कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ।।तु.गा.२२६२.००२।।
आरुषा उत्तरीं संतोषें माउली । कवळुनि घाली हृदयांत ।।तु.गा.२२६२.००३।।
पोटा आले त्याचे नेणे गुणदोष । कल्याणचि आस असावी हे ।।तु.गा.२२६२.००४।।
मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघ गंगा काई परतों जाणें ।।तु.गा.२२६२.००५।।
तुका म्हणे कोठें उदार मेघां शक्ति । माझी तृषा किती चातकाची ।।तु.गा.२२६२.००६।।
लेंकुराचें हित । वाहे माउलीचें चित्त ।।तु.गा.२२६३.००१।।
ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभाविण प्रीती ।।तु.गा.२२६३.००२।।
पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ।।तु.गा.२२६३.००३।।
तुका म्हणे माझें । तुम्हां संतांवरी ओझें ।।तु.गा.२२६३.००४।।
वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन । श्रोता यति झाला जाण । तरी त्या नाहीं उचित ।।तु.गा.२२६४.००१।।
शीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण । धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ।।तु.गा.२२६४.००२।।

पट्ट पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी । प्रमाण सकळीं । ते मर्यादा करावी ।।तु.गा.२२६४.००३।।
वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य । येर उपकरणें । सोनियाचीं परी नीच ।।तु.गा.२२६४.००४।।
सोनियाचा पैंजण । मुगुटमणि केला हीण । जयाचें कारण । तया ठायीं अळंकार ।।तु.गा.२२६४.००५।।
सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन । तुका म्हणे जाण । तुम्ही संत यदर्थी ।।तु.गा.२२६४.००६।।
वाट वैकुंठीं पाहाती । भक्त कैं पां येथें येती । तयां जन्ममरणखंतीं । नाहीं चित्तीं परलोक ।।तु.गा.२२६५.००१।।
धन्य धन्य हरिचे दास । तयां सुलभ गर्भवास । ब्रह्मादिक करिती आस । तीर्थे वास भेटीची ।।तु.गा.२२६५.००२।।
कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस । पाहे रात्रंदिवस । वाट कर जोडोनि ।।तु.गा.२२६५.००३।।
रिद्धिसिद्धि न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्ता । मोक्षसायुज्यता । वाट पाहे भक्तांची ।।तु.गा.२२६५.००४।।
असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले । आणीकही उद्धरिलें । महादोषी चांडाळ ।।तु.गा.२२६५.००५।।
सकळ करिती त्यांची आस । सर्वभावें ते उदास । धन्य भाग्य त्यांस । तुका म्हणे दर्शनें ।।तु.गा.२२६५.००६।।
वैष्णवांसंगती सुख वाटे जीवा । आणीक मी देवा कांहीं नेणें ।।तु.गा.२२६६.००१।।
गायें नाचें उडें आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ।।तु.गा.२२६६.००२।।
लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ।।तु.गा.२२६६.००३।।
तुका म्हणे आतां आपुल्या सायासें । आम्हां जगदीशें सांभाळावें ।।तु.गा.२२६६.००४।।
वैष्णव तो जया । अवघी देवावरि माया ।।तु.गा.२२६७.००१।।
नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ।।तु.गा.२२६७.००२।।
पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ।।तु.गा.२२६७.००३।।
तुका म्हणे याती । हो कां तयाची भलती ।।तु.गा.२२६७.००४।।
शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ।।तु.गा.२२६८.००१।।
मुखीं अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ।।तु.गा.२२६८.००२।।
सर्वांग निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ।।तु.गा.२२६८.००३।।
तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांति ।।तु.गा.२२६८.००४।।
हींच त्यांचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ।।तु.गा.२२६९.००१।।

कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ।।तु.गा.२२६९.००२।।

हाच काळ वर्तमान । समाधान ही संपत्ती ।।तु.गा.२२६९.००३।।

तुका म्हणे दिवसरातीं । हेंचि खाती अन्न ते ।।तु.गा.२२६९.००४।।

सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार समूळ आशा । निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ।।तु.गा.२२७०.००१।।

मोक्षाचें तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें । तीर्थांसी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें ।।तु.गा.२२७०.००२।।

मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळां भूषणांसी । हरिच्या गुणें गर्जताति सदा । आनंद तया मानसीं ।।तु.गा.२२७०.००३।।

तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची । तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ।।तु.गा.२२७०.००४।।

संसारसोहळे भोगिती सकळ । भक्तां त्याचें बळ विठोबाचें ।।तु.गा.२२७१.००१।।

भय चित्तीं धाक न मानिती मनीं । भक्तां चक्रपाणि सांभाळीत ।।तु.गा.२२७१.००२।।

पाप पुण्य त्यांचें धरुं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्व भावें ।।तु.गा.२२७१.००३।।

नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव त्यांचा भार सर्व वाहे ।।तु.गा.२२७१.००४।।

तुका म्हणे देव भक्तां वेळाईत । भक्त ते निश्चिंत त्याचियानें ।।तु.गा.२२७१.००५।।

संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडीं नाचेन पुढें ।।तु.गा.२२७२.००१।।

भजनविधि नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे ।।तु.गा.२२७२.००२।।

ध्यान गति मति आसन समाधी । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ।।तु.गा.२२७२.००३।।

नेणतां निर्लज्ज नेणें नादभेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ।।तु.गा.२२७२.००४।।

सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका म्हणे संतमहंतपाय ।।तु.गा.२२७२.००५।।

संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोनि जाय ।।तु.गा.२२७३.००१।।

मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडीं वाढों लागे ।।तु.गा.२२७३.००२।।

कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे नामरुप ।।तु.गा.२२७३.००३।।

तुका म्हणे साधन सुलभ गोमटे । परि उपतिष्ठे पूर्व पुण्यें ।।तु.गा.२२७३.००४।।

संतांनीं सरता केलों तैशापरी । चंदनीं ते बोरी व्यापियेली ।।तु.गा.२२७४.००१।।

गुण दोष याती न विचारी कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ।।तु.गा.२२७४.००२।।

तुका म्हणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ।।तु.गा.२२७४.००३।।
संकोचित जीव महत्त्वाच्या भारें । दासत्वचि बरें बहु वाटे ।।तु.गा.२२७५.००१।।
कळावी जी माझी आवडी हे संतां । देणें तरि आतां हेंचि द्यावें ।।तु.गा.२२७५.००२।।
तुमचे चरण पावविलों सेवा । म्हणऊनि हेवा हाचि करीं ।।तु.गा.२२७५.००३।।
विनवुनी तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणींचा ।।तु.गा.२२७५.००४।।
संत पाउलें साजिरीं । गंगा आली आम्हांवरी ।।तु.गा.२२७६.००१।।
जेथें पडे रजधुळी । तेथें करावी आंघोळी ।।तु.गा.२२७६.००२।।
सेतुबंध वाराणसी । अवघी तीर्थे तयापासीं ।।तु.गा.२२७६.००३।।
तुका म्हणे धन्य झालों । संत सागरीं मिळालों ।।तु.गा.२२७६.००४।।
संत आले घरा । तों मी अभागीं दातारा ।।तु.गा.२२७७.००१।।
कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ।।तु.गा.२२७७.००२।।
काया कुरवंडी । करून ओंवाळून सांडी ।।तु.गा.२२७७.००३।।
तुका म्हणे भावें । हात जोडीं असो ठावें ।।तु.गा.२२७७.००४।।
संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ।।तु.गा.२२७८.००१।।
काय करावी साधनें । काय एक नव्हे तेणें ।।तु.गा.२२७८.००२।।
शेष घेईन उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ।।तु.गा.२२७८.००३।।
तुका म्हणे संतांपायीं । जीव ठेविला निश्चयीं ।।तु.गा.२२७८.००४।।
संत गाती हरिकीर्तनीं । त्यांचें घेइन पायवणी ।।तु.गा.२२७९.००१।।
हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ।।तु.गा.२२७९.००२।।
काया कुरवंडी करीन । संत महंत ओंवाळीन ।।तु.गा.२२७९.००३।।
संत महंत माझी पूजा । आन भाव नाहीं दुजा ।।तु.गा.२२७९.००४।।
तुका म्हणे नेणें कांहीं । अवघे आहे संतांपायीं ।।तु.गा.२२७९.००५।।
संतसेवेसी अंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी ।।तु.गा.२२८०.००१।।

ऐसियासी व्याली रांड । जळो जळो तिचें तोंड ।।तु.गा.२२८०.००२।।
संतचरणीं ठेवितां भाव । आपेआप भेटें देव ।।तु.गा.२२८०.००३।।
तुका म्हणे संतसेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा ।।तु.गा.२२८०.००४।।
संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ।।तु.गा.२२८१.००१।।
देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वीही थार नेदी तया ।।तु.गा.२२८१.००२।।
संतांपाशी ज्याचा नुरेचि विश्वास । त्याचें जाले दोष बळिवंत ।।तु.गा.२२८१.००३।।
तुका म्हणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धावें लागें विषमें मारूं ।।तु.गा.२२८१.००४।।
संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत ।।तु.गा.२२८२.००१।।
घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासीच अंतरीं वास दिला ।।तु.गा.२२८२.००२।।
आपुलेसें जिहीं नाहीं उरों दिलें । चोजवितां भले ऐसीं स्थळें ।।तु.गा.२२८२.००३।।
तुका म्हणे नाहीं झाकत परिमळ । चंदनाचे स्थळ चंदनचि ।।तु.गा.२२८२.००४।।
संतांचिया पायीं हा माझा विश्वास । सर्वभावें दास झालों त्यांचा ।।तु.गा.२२८३.००१।।
तेचि माझें हित करीती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ।।तु.गा.२२८३.००२।।
भागलिया मज वाहतील कडे । त्यांचेयानें जोडे सर्व सुख ।।तु.गा.२२८३.००३।।
तुका म्हणे शेष घेईन आवडी । वचन न मोडी बोलिलें तें ।।तु.गा.२२८३.००४।।
संतांचें घरींचा दास मी कामारी । दारीं परिवरीं लोळतसें ।।तु.गा.२२८४.००१।।
चरणींचें रज लागती अंगांस । तेणें बेताळीस उद्धरती ।।तु.गा.२२८४.००२।।
उच्छिष्ट हें जमा करूनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ।।तु.गा.२२८४.००३।।
तुका म्हणे मी आणीक विचार । नेणें हेंचि सार मानीतसें ।।तु.गा.२२८४.००४।।
संतांसीं तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरि तो ।।तु.गा.२२८५.००१।।
म्हणऊनि तया न वजावें ठाया । होतसे घात या दुर्बळाचा ।।तु.गा.२२८५.००२।।
भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ।।तु.गा.२२८५.००३।।
तुका म्हणे जया संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ।।तु.गा.२२८५.००४।।

संतांच्या धिक्कारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परि ।।तु.गा.२२८६.००१ ।।
कुळ आणि रूप वायां संवसार । गेला भरतार मोकलितां ।।तु.गा.२२८६.००२ ।।
मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणे ।।तु.गा.२२८६.००३ ।।
तुका म्हणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तईं अवघें बरें ।।तु.गा.२२८६.००४ ।।
संतां आवडे तो काळाचाही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ ।।तु.गा.२२८७.००१ ।।
परि सत्ता तेथें नाहीं एकेविणे । मोहें न पवे सीण ऐसें राखे ।।तु.गा.२२८७.००२ ।।
केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखें दुसरें नाशा मूळ ।।तु.गा.२२८७.००३ ।।
तुका म्हणे मुख्य कल्पतरूछाया । काय नाहीं दया तये ठायीं ।।तु.गा.२२८७.००४ ।।
संतांचें सुख झालें या देवा । म्हणउनि सेवा करी त्यांची ।।तु.गा.२२८८.००१ ।।
तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ।।तु.गा.२२८८.००२ ।।
निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ।।तु.गा.२२८८.००३ ।।
तीर्थे त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळ आपणांसी ।।तु.गा.२२८८.००४ ।।
अष्ट महासिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ।।तु.गा.२२८८.००५ ।।
तुका म्हणे तें हे बळिया शिरोमणी । राहिले चरणीं निकटवासें ।।तु.गा.२२८८.००६ ।।
संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दु:ख लेश ।।तु.गा.२२८९.००१ ।।
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ।।तु.गा.२२८९.००२ ।।
संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ।।तु.गा.२२८९.००३ ।।
संतांचें भोजन अमृताचे पान । करिती कीर्तन सर्वकाळ ।।तु.गा.२२८९.००४ ।।
संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेम सुख साठीं घेती देती ।।तु.गा.२२८९.००५ ।।
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी झालों त्यांचा ।।तु.गा.२२८९.००६ ।।
संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ।।तु.गा.२२९०.००१ ।।
बहु दुधड जरी जाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ।।तु.गा.२२९०.००२ ।।
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ।।तु.गा.२२९०.००३ ।।

सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडूं एक ।।तु.गा.२२९१.००१।।
संसाराची मज न साहेचि वार्ता । आणीक म्हणतां माझे कोणी ।।तु.गा.२२९१.००२।।
देहसुख कांहीं बोलिले उपचार । विष तें आदर बंध वाटे ।।तु.गा.२२९१.००३।।
उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ।।तु.गा.२२९१.००४।।
तुका म्हणे कांहीं आणीक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ।।तु.गा.२२९१.००५।।
सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ।।तु.गा.२२९२.००१।।
सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ।।तु.गा.२२९२.००२।।
तुका म्हणे वाचा राहिली कुंठित । पुढें जालें चित्त समाधान ।।तु.गा.२२९२.००३।।
सर्व भाग्यहीन । असे सांभाळिलों दीन ।।तु.गा.२२९३.००१।।
पायीं संतांचें मस्तक । असों जोडोनि हस्तक ।।तु.गा.२२९३.००२।।
जाणें तरि सेवा । दीन दुर्बळाची देवा ।।तु.गा.२२९३.००३।।
तुका म्हणे जीव । समर्पून भाकीं कींव ।।तु.गा.२२९३.००४।।
सांगतां हें नये सुख । कीर्ति मुख न पुरे ।।तु.गा.२२९४.००१।।
आवडीनें सेवन करूं । जीवींचें धरूं जीवींच ।।तु.गा.२२९४.००२।।
उपमा या देतां लाभा । काशा शोभा सारिखी ।।तु.गा.२२९४.००३।।
तुका म्हणे नुचलीं डोई । ठेविली पायीं संतांचे ।।तु.गा.२२९४.००४।।
सुख वाटे येचि ठायीं । बहु पायीं संतांचें ।।तु.गा.२२९५.००१।।
म्हणऊनि केला वास । नाहीं नाश ये ठायीं ।।तु.गा.२२९५.००२।।
न करवे हाली चाली । निवारली चिंता हे ।।तु.गा.२२९५.००३।।
तुका म्हणे निवे तनु । रजकणु लागतां ।।तु.गा.२२९५.००४।।
स्तुति करिजेसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ।।तु.गा.२२९६.००१।।
तुमचें मी दास संतांचें दुर्बळ । करूनि सांभाळ राखापायीं ।।तु.गा.२२९६.००२।।
राम कृष्ण हरि मंत्र उच्चारणा । आवडी चरणां विठोबाच्या ।।तु.गा.२२९६.००३।।

तुका म्हणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । क्षमा करा धीट होउनियां ।।तु.गा.२२९६.००४।।
सोलीव जें सुख अतिसुखाहुनी । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या ।।तु.गा.२२९७.००१।।
वृंदावन सडे चौक रंगमाळा । नाचे तो सोहळा देखोनियां ।।तु.गा.२२९७.००२।।
भूषणमंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळशी कंठीं ।।तु.गा.२२९७.००३।।
नामवोघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ।।तु.गा.२२९७.००४।।
तुका म्हणे मोक्ष भक्तांचिया मना । नये हा वासना त्यांची करी ।।तु.गा.२२९७.००५।।
हरिजनां प्राण विकली हे काया । अंकित मी तया घरीं झालों ।।तु.गा.२२९८.००१।।
म्हणियें सत्वर करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ।।तु.गा.२२९८.००२।।
आस करूनियां राहेन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी ।।तु.गा.२२९८.००३।।
चालतां तें मार्गी चरणींचें रज । उडती सहज घेईन आतां ।।तु.गा.२२९८.००४।।
दुरी त्यांपासूनि न वजें दवडितां । तुका म्हणे लाता घेईन अंगें ।।तु.गा.२२९८.००५।।
हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ।।तु.गा.२२९९.००१।।
तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ।।तु.गा.२२९९.००२।।
मोहरा तोचि अंगें । सूत न जळे ज्याचें संगें ।।तु.गा.२२९९.००३।।
तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ।।तु.गा.२२९९.००४।।
हें तों एक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ।।तु.गा.२३००.००१।।
म्हणवितां त्यांचे दास । पुढें आस उरेना ।।तु.गा.२३००.००२।।
कृपादान केलें संतीं । कल्पांतीहीं सरेना ।।तु.गा.२३००.००३।।
तुका म्हणे संतसेवा । हेचि देवा उत्तम ।।तु.गा.२३००.००४।।
शेवटींची विनवणी । संतजनीं परिसावी ।।तु.गा.२३०१.००१।।
विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हांसी ।।तु.गा.२३०१.००२।।
पुढें फार बोलों कायी । अवघे पायीं विदित ।।तु.गा.२३०१.००३।।
तुका म्हणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ।।तु.गा.२३०१.००४।।

नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त नव्हती संत ।।तु.गा.२३०२.००१।।
येथें नाहीं वेश सरते आडनांव । निवडे घावडाव व्हावा अंगीं ।।तु.गा.२३०२.००२।।
नव्हती ते संत धरितां भोपळा । करितां वाकळा प्रावरणासी ।।तु.गा.२३०२.००३।।
नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणें नव्हती संत ।।तु.गा.२३०२.००४।।
नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ।।तु.गा.२३०२.००५।।
नव्हती ते संत करितां तप तीर्थाटन । सेविलिया वन नव्हती संत ।।तु.गा.२३०२.००६।।
नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्म उधळणें नव्हती संत ।।तु.गा.२३०२.००७।।
तुका म्हणे नाहीं निरसला देह । तोंवरी अवघे संसारिक ।।तु.गा.२३०२.००८।।
तरिच शोभे वेडी । नग्न होय धड फाडी ।।तु.गा.२३०३.००१।।
काय बोलाचें गौरव । आंत वरी दोन भाव ।।तु.गा.२३०३.००२।।
मृगजळ न्याहाळितां । ताहान न वजे सेवितां ।।तु.गा.२३०३.००३।।
न पाहे आणिकांची वास । शूर बोलिजे तयास ।।तु.गा.२३०३.००४।।
तुका म्हणे या लक्षणें । संत अळंकार लेणें ।।तु.गा.२३०३.००५।।
वेश वदाया पुरते । कोण ब्राह्मण निरूते ।।तु.गा.२३०४.००१।।
ऐसें सांगा मजपाशीं । संतां निरवितो येविशीं ।।तु.गा.२३०४.००२।।
असां जी प्रवीण । ग्रंथीं कळे शुद्ध हीण ।।तु.गा.२३०४.००३।।
तुका म्हणे लोपें । सत्याचिया घडती पापें ।।तु.गा.२३०४.००४।।
करावा संकोच चित्ताचि भोवता । होय तें बहुतां सुख कीजे ।।तु.गा.२३०५.००१।।
देवाची पूजा हे भूतांचें पाळण । मत्सर तो शीण बहुतांचा ।।तु.गा.२३०५.००२।।
रुसावें फुगावें आपुलिया वरी । उरला तो हरी सकळही ।।तु.गा.२३०५.००३।।
तुका म्हणे संतपण याचि नांव । जरी होय जीव सकळांचा ।।तु.गा.२३०५.००४।।
जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ।।तु.गा.२३०६.००१।।
आणिक नये माझ्या मना । हो कां पंडित शाहाणा ।।तु.गा.२३०६.००२।।

नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ।।तु.गा.२३०६.००३।।
तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ।।तु.गा.२३०६.००४।।
हरिच्या दासां भय । ऐसें बोलों तेंही नये ।।तु.गा.२३०७.००१।।
राहोनियां आड । उभा देव पुरवी कोड ।।तु.गा.२३०७.००२।।
हरिच्या दासां चिंता । अघटित हे वार्ता ।।तु.गा.२३०७.००३।।
खावें ल्यावें द्यावें । तुका म्हणे पुरवावें ।।तु.गा.२३०७.००४।।
वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ।।तु.गा.२३०८.००१।।
करिती घोष जयजयकार । जळती दोषांचे डोंगर ।।तु.गा.२३०८.००२।।
क्षमा दया शांति । बाण अभंग हे हातीं।।तु.गा.२३०८.००३।।
तुका म्हणे बळी । तेचि एक भूमंडळीं ।।तु.गा.२३०८.००४।।
उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ।।तु.गा.२३०९.००१।।
अनुताप अंगीं अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ।।तु.गा.२३०९.००२।।
दोष ऐशा नांवें देहाचा आदर । विटाळालें अंतर अहंभावें ।।तु.गा.२३०९.००३।।
तुका म्हणे जाय नासोनियां खंती । तंवचि हे चित्तीं बद्धता ते ।।तु.गा.२३०९.००४।।
भाग्यवंता हेचि काम । मापी नाम वैखरी ।।तु.गा.२३१०.००१।।
आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ।।तु.गा.२३१०.००२।।
पिकलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ।।तु.गा.२३१०.००३।।
तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां ।।तु.गा.२३१०.००४।।
तरी सदा निर्भर दास । चिंता आस विरहित ।।तु.गा.२३११.००१।।
अवघाच एक ठाव । सर्व भाव विठ्ठलीं ।।तु.गा.२३११.००२।।
निरविलें तेव्हां त्यांस । जाला वास त्यांमाजी ।।तु.गा.२३११.००३।।
तुका म्हणे रुप ध्यावें । नाहीं ठावे गुणदोष ।।तु.गा.२३११.००४।।
उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ।।तु.गा.२३१२.००१।।

नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ।।तु.गा.२३१२.००२।।
उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ।।तु.गा.२३१२.००३।।
भाविक विश्वासी । तुका म्हणे नमन त्यांसी ।।तु.गा.२३१२.००४।।
धन वित्त कुळें । अवघियानें ते आगळें ।।तु.गा.२३१३.००१।।
ज्यांचें नारायण गांठीं । भरला हृदय संपुटीं ।।तु.गा.२३१३.००२।।
अवघेंचि गोड । त्यांचें पुरे सर्व कोड ।।तु.गा.२३१३.००३।।
तुका म्हणे अस्त । उदयो त्यांच्या तेजा नास्त ।।तु.गा.२३१३.००४।।
पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ।।तु.गा.२३१४.००१।।
ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ।।तु.गा.२३१४.००२।।
तींच भाग्यवंतें । सरती पुरतीं धनवित्तें ।।तु.गा.२३१४.००३।।
तुका म्हणे देवा । त्यांचीं केली पावे सेवा ।।तु.गा.२३१४.००४।।
ज्यासी आवडी हरिनामाची । तोचि एक बहु शुचि ।।तु.गा.२३१५.००१।।
जपे हरिनाम बीज । तोचि वर्णामाजि द्विज ।।तु.गा.२३१५.००२।।
तुका म्हणे वर्णधर्म । अवघे आहे सम ब्रह्म ।।तु.गा.२३१५.००३।।
कल्पतरू रूया नव्हती बाभुळा । पुरविती फळा इच्छितिया ।।तु.गा.२३१६.००१।।
उदंड त्या गाई म्हैसी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनु ।।तु.गा.२३१६.००२।।
तुका म्हणे देव दाखविल दृष्टि । तयासवें भेटी थोर पुण्य ।।तु.गा.२३१६.००३।।
कोण पुण्य कोणा गांठीं । ज्यासी ऐसियांची भेटी ।।तु.गा.२३१७.००१।।
जिहीं हरी धरिला मनीं । दिलें संसारासी पाणी ।।तु.गा.२३१७.००२।।
कोण हा भाग्याचा । ऐसियासी बोले वाचा ।।तु.गा.२३१७.००३।।
तुका म्हणे त्याचे भेटी । होय संसाराची तुटी ।।तु.गा.२३१७.००४।।
आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ।।तु.गा.२३१८.००१।।
कुळीं कन्यापुत्र होती जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ।।तु.गा.२३१८.००२।।

गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचें ।।तु.गा.२३१८.००३ ।।
तुका म्हणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ।।तु.गा.२३१८.००४ ।।
त्यांचिया चरणा माझें दंडवत । ज्यांचें धनवित्त पांडुरंग ।।तु.गा.२३१९.००१ ।।
तेथें माझा जीव पावला विसांवा । म्हणऊनि हांवा भरलोंसे ।।तु.गा.२३१९.००२ ।।
चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळासोई जाती ।।तु.गा.२३१९.००३ ।।
आणिक तीं भाग्यें येथें कुरवंडी । करूनियां सांडीं इंद्राऐसी ।।तु.गा.२३१९.००४ ।।
वैष्णवांचे घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सर्वभावें ।।तु.गा.२३१९.००५ ।।
तुका म्हणे सखे हरिचे जे दास । आतां पुढें आस दुजी नाहीं ।।तु.गा.२३१९.००६ ।।
बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपें ।।तु.गा.२३२०.००१ ।।
नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ।।तु.गा.२३२०.००२ ।।
विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ।।तु.गा.२३२०.००३ ।।
तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ।।तु.गा.२३२०.००४ ।।
वैष्णवांची कीर्ति गाइली पुराणीं । साही अठरा जणीं चहूं वेदीं ।।तु.गा.२३२१.००१ ।।
ऐसे कोणी दावा ग्रंथांचे वाचक । कर्मठ धार्मिक पुण्यशील ।।तु.गा.२३२१.००२ ।।
आदिनाथ शंकर नारद मुनीश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ।।तु.गा.२३२१.००३ ।।
तुका म्हणे मुगुटमणी हरिभक्ति । आणीक विश्रांति आरतिया ।।तु.गा.२३२१.००४ ।।
नेणो काय नाड। आला उचित काळ आड ।।तु.गा.२३२२.००१ ।।
नाहीं जाली संतभेटी । येवढी हानी काय मोठी ।।तु.गा.२३२२.००२ ।।
सहज पायांपाशीं । जवळी पावलिया ऐसी ।।तु.गा.२३२२.००३ ।।
चुकी जाली आतां काय । तुका म्हणे उरली हाय ।।तु.गा.२३२२.००४ ।।
बहु भितो जाणपणा । आड न यो नारायण । घेईन प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ।।तु.गा.२३२३.००१ ।।
यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं । काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ।।तु.गा.२३२३.००२ ।।
निमिषार्ध संतसंगती । वास वैकुंठीं कल्पांतीं । मोक्षपदें येती । ते विश्रांती बापुडीं।।तु.गा.२३२३.००३ ।।

तुका म्हणे हेंचि देईं । मीतूंपणा खंड नाहीं । बोलिले त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥तु.गा.२३२३.००४॥
बोलिलों ते धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥तु.गा.२३२४.००१॥
सर्व सिद्धि पायीं वोळगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें कांहीं ॥तु.गा.२३२४.००२॥
संतसमागमें अळंकारूं वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजें॥तु.गा.२३२४.००३॥
तुका म्हणे रामकृष्णनामें गोड । आवडीचें कोड माळ ओऊं ॥तु.गा.२३२४.००४॥
वदवावी वाणी माझी कृपावंता । वाग्पुष्पें संतां समर्पीशी ॥तु.गा.२३२५.००१॥
सर्व संकटांचा तुम्हां परिहार । घालावा म्यां भार पांडुरंगा ॥तु.गा.२३२५.००२॥
एकसरें चित्त ठेवूनियां पायीं । जालों उतराई होतों तेणें ॥तु.गा.२३२५.००३॥
तुका म्हणे येथें जालें अवसान । काया वाचा मन वेचूनियां ॥तु.गा.२३२५.००४॥
रवि दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचिया ॥तु.गा.२३२६.००१॥
त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥तु.गा.२३२६.००२॥
तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥तु.गा.२३२६.००३॥
मायबापें पिंड पाळियेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥तु.गा.२३२६.००४॥
संतांचें वचन वारी जन्मदु:ख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥तु.गा.२३२६.००५॥
तुका म्हणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया॥तु.गा.२३२६.००६॥
पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती ॥तु.गा.२३२७.००१॥
कर्मधर्म त्यांचा झाला नारायण । त्यांचेनि पावन तिन्ही लोक ॥तु.गा.२३२७.००२॥
वर्णअभिमानें कोण झाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं॥तु.गा.२३२७.००३॥
अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयांचीं पुराणें भाट झालीं ॥तु.गा.२३२७.००४॥
वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥तु.गा.२३२७.००५॥
कबीर मोमीन लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥तु.गा.२३२७.००६॥
कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेदु हरिचे पायीं ॥तु.गा.२३२७.००७॥
चोखामेळा बंका जातीचे महार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥तु.गा.२३२७.००८॥

नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ।।तु.गा.२३२७.००९ ।।
मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगो ।।तु.गा.२३२७.०१० ।।
यातायातीधर्म नाहीं विष्णुदासां । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ।।तु.गा.२३२७.०११ ।।
तुका म्हणे तुम्हीं विचारावें ग्रंथ । तारिलें पतित नेणों किती ।।तु.गा.२३२७.०१२ ।।
घातला दुकान । देती आलियासी दान ।।तु.गा.२३२८.००१ ।।
संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ।।तु.गा.२३२८.००२ ।।
मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ।।तु.गा.२३२८.००३ ।।
तुका म्हणे पोतें । देवें भरिले नव्हें रितें ।।तु.गा.२३२८.००४ ।।
हरिचिया भक्ता नाहीं भय चिंता । दु:ख निवारिता नारायण ।।तु.गा.२३२९.००१ ।।
नलगे वाहणें संसार उद्वेग । जडों नेदी पांग देव राव ।।तु.गा.२३२९.००२ ।।
असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ।।तु.गा.२३२९.००३ ।।
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियलें जग तेणें एकें ।।तु.गा.२३२९.००४ ।।
प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ।।तु.गा.२३३०.००१ ।।
अवघा देवचि झाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ।।तु.गा.२३३०.००२ ।।
सत्वरजतम बाधा । नव्हे हरिभक्तांसी कदा ।।तु.गा.२३३०.००३ ।।
देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ।।तु.गा.२३३०.००४ ।।
ध्यानीं योगीराज बैसले कपाटीं । लागे पाटोवाटीं तयांचिया ।।तु.गा.२३३१.००१ ।।
ताहान भूक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभावें ।।तु.गा.२३३१.००२ ।।
कोण सखें तयां आणीक सोयरें । असे त्यां दुसरें हरीविण ।।तु.गा.२३३१.००३ ।।
कोण सुख त्यांच्या जीवासी आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ।।तु.गा.२३३१.००४ ।।
तुका म्हणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ।।तु.गा.२३३१.००५ ।।
जन्मा येऊनि तया लाभ झाला । बिडवई भेटला पांडुरंग ।।तु.गा.२३३२.००१ ।।
संसारदु:खें नासियेलीं तेणें । उत्तम हें केणें नामघोष ।।तु.गा.२३३२.००२ ।।

धन्य तेचि संत सिद्ध महानुभाव । पंढरीचा ठाव ठाकियेला ।।तु.गा.२३३२.००३।।
प्रेमदाते तेच पतितपावन । धन्य दरूषण होय त्याला ।।तु.गा.२३३२.००४।।
पावटणी पंथें झालिया सिद्धि । वोळगे समाधि सायुज्यता ।।तु.गा.२३३२.००५।।
प्रेम अराणूक नाहीं भय धाक । मज तेणें सुख काय चिंता ।।तु.गा.२३३२.००६।।
ते दुर्लभ संसारासी । जडजीवउद्धारलोकांसी ।।तु.गा.२३३२.००७।।
तुका म्हणे त्यासी । धन्य भाग्य दरूषणें ।।तु.गा.२३३२.००८।।
भक्तसमागमें सर्व भावें हरी । सर्व काम करी न सांगतां ।।तु.गा.२३३३.००१।।
सांठवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ।।तु.गा.२३३३.००२।।
मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ।।तु.गा.२३३३.००३।।
तुका म्हणे जीव भाव देवापायी । ठेवूनि ते कांहीं न मागती ।।तु.गा.२३३३.००४।।
जेथें वैष्णवाचा वास । धन्य भूमी पुण्य देश ।।तु.गा.२३३४.००१।।
दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ।।तु.गा.२३३४.००२।।
गरूडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ।।तु.गा.२३३४.००३।।
सहज तया जना छंद । वाचे गोविंद गोविंद ।।तु.गा.२३३४.००४।।
तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठ सोहळा ।।तु.गा.२३३४.००५।।
तुका म्हणे भेणें । काळ नये तेणें रानें ।।तु.गा.२३३४.००६।।
तेथें सुखाची वसति । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । जे गर्जती हरिनामें ।।तु.गा.२३३५.००१।।
दोषा जाली घेघेमारी । पळती भरले दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया ।।तु.गा.२३३५.००२।।
विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें ।।तु.गा.२३३५.००३।।
पोट सेवितां न धाये । भूक भूकेलीच राहे। तुका म्हणे पाहे । कोण वास मुक्तीची ।।तु.गा.२३३५.००४।।
चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ।।तु.गा.२३३६.००१।।
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगीं साकर अवघी गोड ।।तु.गा.२३३६.००२।।
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचि ना ।।तु.गा.२३३६.००३।।

वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाग ।।तु.गा.२३३७.००१।।
संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ।।तु.गा.२३३७.००२।।
तोचि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ।।तु.गा.२३३७.००३।।
तुका प्रेमें नाचे गाय । गाणियांत विरोन जाय ।।तु.गा.२३३७.००४।।
संतसमागम एखादियें परी । व्हावें त्याचें द्वारीं श्वानयाती ।।तु.गा.२३३८.००१।।
तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ।।तु.गा.२३३८.००२।।
कामारी बटीक सेवेचा सेवक । दीनपणें रंक तेथें भले ।।तु.गा.२३३८.००३।।
तुका म्हणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ।।तु.गा.२३३८.००४।।
सदैव हे वारकरी । जे पंढरी देखती ।।तु.गा.२३३९.००१।।
पदोपदीं विठ्ठल वाचा । तया कैंचा संसार ।।तु.गा.२३३९.००२।।
दोष पळाले पळाले । पैल आले हरिदास ।।तु.गा.२३३९.००३।।
प्रेमभातें भरलें अंगीं । निर्लज्ज रंगीं नाचती ।।तु.गा.२३३९.००४।।
गोपीचंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरवती ।।तु.गा.२३३९.००५।।
दुर्बळा या शक्तिहीना । त्याही जना पुरता ।।तु.गा.२३३९.००६।।
तुका म्हणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा ।।तु.गा.२३३९.००७।।
ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ।।तु.गा.२३४०.००१।।
रिघों पाहे माजी बळेंचि त्यांचें घर । दवडिती दूर म्हणोनियां ।।तु.गा.२३४०.००२।।
तुका म्हणे येथें न चाले सायास । पडिलें उदास त्यांच्या गळां ।।तु.गा.२३४०.००३।।
वैष्णव चोरटीं । आली घरासी करंटीं ।।तु.गा.२३४१.००१।।
आजि आपुलें जतन । करा भांडें पांघरूण ।।तु.गा.२३४१.००२।।
ज्याचे घरीं खावें । त्याचें सर्वस्वही न्यावें ।।तु.गा.२३४१.००३।।
तुका म्हणे माग । नाहीं लागों देत लाग ।।तु.गा.२३४१.००४।।
भक्तांहूनि देवा आवडतें काई । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ।।तु.गा.२३४२.००१।।

नावडे वैकुंठ क्षीराचा सागर । धरोनि अंतर राहे दासा ।।तु.गा.२३४२.००२।।
सर्वभावें त्यांचें सर्वस्वही गोड । तुळसीदळ कोड करूनी घ्यावें ।।तु.गा.२३४२.००३।।
सर्वस्वही त्यांचा म्हणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ।।तु.गा.२३४२.००४।।
तुका म्हणे भक्तिसुखाचा बांधला । आणिक विठ्ठला धर्म नाहीं ।।तु.गा.२३४२.००५।।
धन्य दिवस आजी दर्शन संतांचें । नांदें तया घरीं दैवत पंढरीचें ।।तु.गा.२३४३.००१।।
धन्य पुण्यरूप कैसा झाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ।।तु.गा.२३४३.००२।।
धन्य पूर्व पुण्य वोढवलें निरूतें । संतांचें दर्शन झालें भाग्यें बहुतें ।।तु.गा.२३४३.००३।।
तुका म्हणे धन्य आम्हां जोडिली जोडी । संतांचें चरण आतां जीवें न सोडीं ।।तु.गा.२३४३.००४।।
मायवणीं धाल्या धाय । गर्भ आंवतणें न पाहे ।।तु.गा.२३४४.००१।।
तैसे पूजितां वैष्णव । सुखें संतोषतो देव ।।तु.गा.२३४४.००२।।
पुत्राच्या विजयें । पिता सुखावत जाये ।।तु.गा.२३४४.००३।।
तुका म्हणे अमृतसिद्धि । हरे तृषा आणि व्याधि ।।तु.गा.२३४४.००४।।
धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ।।तु.गा.२३४५.००१।।
जाली पापातापा तुटी । दैन्य गेले उठाउठीं ।।तु.गा.२३४५.००२।।
जालें समाधान । पायीं विसावलें मन ।।तु.गा.२३४५.००३।।
तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ।।तु.गा.२३४५.००४।।
शरण शरण वाणी । शरण त्रिवाचा विनवणी ।।तु.गा.२३४६.००१।।
स्तुती न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासांचा ।।तु.गा.२३४६.००२।।
देह न सांभाळून । पायांवरी लोटांगण ।।तु.गा.२३४६.००३।।
विनवी तुका संतां दीन । नोहे गौरवीं उत्तीर्ण ।।तु.गा.२३४६.००४।।
सोनियाचा कळस । माजी भरला सुरारस ।।तु.गा.२३४७.००१।।
काय करावें प्रमाण । तुम्ही सांगा संतजन ।।तु.गा.२३४७.००२।।
मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांठ ।।तु.गा.२३४७.००३।।

तुका म्हणें हित । तें मज सांगावें त्वरित ।।तु.गा.२३४७.००४।।
पाळितों वचन । परि बहू भीतें मन ।।तु.गा.२३४८.००१।।
करितों पायाशीं सलगी । नये बैसों अंगसंगीं ।।तु.गा.२३४८.००२।।
जोडोनियां कर । उभें असावें समोर ।।तु.गा.२३४८.००३।।
तुका म्हणे संत । तुम्ही मी बहु पतित ।।तु.गा.२३४८.००४।।
जडलों तों आतां पायीं । होऊं काई वेगळा ।।तु.गा.२३४९.००१।।
तुम्हीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ।।तु.गा.२३४९.००२।।
सांभाळिलों मायबापा । केलों तापावेगळा ।।तु.गा.२३४९.००३।।
वोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्यचि ।।तु.गा.२३४९.००४।।
मागें पुढें झालों लाठा । अवघा मोठा सरळ ।।तु.गा.२३५०.००१।।
नाहीं कोठें रितें अंग । नित्य रंग नवाचि ।।तु.गा.२३५०.००२।।
पोसिंद्याचे पडिलों हातीं । ओझें माती चुकली ।।तु.गा.२३५०.००३।।
जोगावलों पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ।।तु.गा.२३५०.००४।।
अवघिया मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ।।तु.गा.२३५०.००५।।
संताचिये लोळे द्वारीं । पळती दुरी गोमाशा ।।तु.गा.२३५०.००६।।
पहातो गे महाद्वारीं । वरि झूलां वाकळा ।।तु.गा.२३५०.००७।।
कांहीं न साहेसा झाला । तुका नेला समर्थें ।।तु.गा.२३५०.००८।।
भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ।।तु.गा.२३५१.००१।।
परी आम्ही असों एकाचिये हातीं । नाचविती चित्तीं त्याचें तैसें ।।तु.गा.२३५१.००२।।
वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ।।तु.गा.२३५१.००३।।
तुका म्हणे तुम्ही बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ।।तु.गा.२३५१.००४।।
अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ।।तु.गा.२३५२.००१।।
जीव देऊनियां बळी । अवघीं तारिलीं दुबळीं । केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ।।तु.गा.२३५२.००२।।

कांहीं न मगे याची गती । लुटवितो जगा हातीं ।।तु.गा.२३५२.००३।।

तुका म्हणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ।।तु.गा.२३५२.००४।।

हा गे आलों कोणी म्हणे बुडतियां । तेणें किती तया बळ चढे ।।तु.गा.२३५३.००१।।

तुम्हीं तंव भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ।।तु.गा.२३५३.००२।।

भुकेलियां आस दावितां निर्धार । किती होय धीर समाधान ।।तु.गा.२३५३.००३।।

तुका म्हणे दिली चिंतामणीसाठीं । उचित काचवटी दंडवत ।।तु.गा.२३५३.००४।।

पाठीवरी भार । जातो वाहूनियां खर ।।तु.गा.२३५४.००१।।

संत नेतील त्या ठाया । माझी आधीन त्यां काया ।।तु.गा.२३५४.००२।।

मोठें चौफळ । अंगीं उच्छिष्टाचें बळ ।।तु.गा.२३५४.००३।।

न संडी मारग । येथें न चोरूनि अंग ।।तु.गा.२३५४.००४।।

आपुलिया सत्ता । चालविलें नाहीं चित्ता ।।तु.गा.२३५४.००५।।

कळवळिला तुका । जनाचार येथें नका ।।तु.गा.२३५४.००६।।

त्रिविधकर्माचे वेगळाचे भाव । निवडूनि ठाव दाखविले ।।तु.गा.२३५५.००१।।

आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख तो गौरव संतां अंगीं ।।तु.गा.२३५५.००२।।

हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ।।तु.गा.२३५५.००३।।

तुका म्हणे नाहीं पापपुण्य खंती । झाड्याची हुजुती हातां आली ।।तु.गा.२३५५.००४।।

आज्ञा पाळुनियां असें एकसरें । तुमची उत्तरें संतांचीं हीं ।।तु.गा.२३५६.००१।।

भागवूनि देह ठेवियेला पायीं । चरणावरि डोई येथूनचि ।।तु.गा.२३५६.००२।।

येणें जाणें हें तो उपाधींचे मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ।।तु.गा.२३५६.००३।।

तुका म्हणे असें चरणींचा रज । पदींच सहज जेथें तेथें ।।तु.गा.२३५६.००४।।

तुमचिये दासीचा दास करूनि ठेवा । आशीर्वाद द्यावा हाचि मज ।।तु.गा.२३५७.००१।।

नवविधा काय बोलिली जे भक्ती । द्यावी माझ्या हातीं संतजनीं ।।तु.गा.२३५७.००२।।

तुका म्हणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ।।तु.गा.२३५७.००३।।

आतां तुम्ही कृपावंत । साधुसंत जिवलग ।।तु.गा.२३५८.००१।।
गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हांसी ।।तु.गा.२३५८.००२।।
वंचिलें तें पायापाशीं । नाहीं यासी वेगळें ।।तु.गा.२३५८.००३।।
तुका म्हणे सोडील्या गांठी । दिली मिठी पायांसी ।।तु.गा.२३५८.००४।।
पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं।।तु.गा.२३५९.००१।।
तरि हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ।।तु.गा.२३५९.००२।।
काय उणें तुम्हां संतांचिये घरीं । विदित या परी सकळही।।तु.गा.२३५९.००३।।
तुका म्हणे माझी उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ।।तु.गा.२३५९.००४।।
गंगा आली आम्हांवरी । संतपाउलें साजिरीं ।।तु.गा.२३६०.००१।।
तेथें करीन अंघोळी । उडे चरणरजधुळी । येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ।।तु.गा.२३६०.००२।।
पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ।।तु.गा.२३६०.००३।।
तुका म्हणे धन्य जालों । संतसागरीं न्हालों ।।तु.गा.२३६०.००४।।
भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ।।तु.गा.२३६१.००१।।
येथूनियां नुठवुं माथा । मरणावांचूनि सर्वथा ।।तु.गा.२३६१.००२।।
होईं बळकट । माझ्या मना तूं रे धीट ।।तु.गा.२३६१.००३।।
तुका आला लोटांगणीं । भक्तिभाग्या जाली धणी ।।तु.गा.२३६१.००४।।
जग ऐंसे बहुनांवें । बहुभावें भावना ।।तु.गा.२३६२.००१।।
पाहों बोलों बहु नये । सत्य काय सांभाळा ।।तु.गा.२३६२.००२।।
कारियासीं जें कारण । तें जतन करावें ।।तु.गा.२३६२.००३।।
तुका म्हणे संतजनीं । हेंचि मनीं धरावें ।।तु.गा.२३६२.००४।।
अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ।।तु.गा.२३६३.००१।।
रूपाच्या आठवें दोन्हीही आपण । वियोग तो क्षण होत नाहीं ।।तु.गा.२३६३.००२।।
पूजा तरि चित्तें कल्पावें ब्रह्मांड । अहाच तो खंड एकदेसी ।।तु.गा.२३६३.००३।।

तुका म्हणे माझा अनुभव यापरि । डोई पायांवरि ठेवीतसें ।।तु.गा.२३६३.००४।।
ऐका हें वचन माझें संतजन । विनवितो जोडुन कर तुम्हां ।।तु.गा.२३६४.००१।।
तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारी ।।तु.गा.२३६४.००२।।
आमुच्या जीवींचा तोचि जाणे भाव । रखुमाईचा नाहो पांडुरंग ।।तु.गा.२३६४.००३।।
चित्त माझें त्याचे गुंतलेसें पायीं । म्हणऊनि कांहीं नावडे त्या ।।तु.गा.२३६४.००४।।
तुका म्हणे मज न साहे मीनती । खेद होय चित्तीं भंग मना ।।तु.गा.२३६४.००५।।
नव्हे हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ।।तु.गा.२३६५.००१।।
आरुष हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ।।तु.गा.२३६५.००२।।
देहपिंड दान दिला एकसरें । मुळींचें तें खरें टांकसाळ ।।तु.गा.२३६५.००३।।
तुका म्हणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ।।तु.गा.२३६५.००४।।
न मनावी चिंता तुम्ही संतजनीं । हिरा स्फटिकमणी केंवि होय ।।तु.गा.२३६६.००१।।
पडिला प्रसंग स्थळां त्या सारिखा । देखिला पारिखा भाव कांहीं ।।तु.गा.२३६६.००२।।
बहुतांसी भय एकाचियां दंडें। बहुत या तोंडें वचनासी ।।तु.गा.२३६६.००३।।
तुका म्हणे नाहीं वैखरी बासर । करावया चार वेडे वेडे ।।तु.गा.२३६६.००४।।
ऐका जी संतजन । सादर मन करूनि ।।तु.गा.२३६७.००१।।
सकळांचें सार एक । कंटक ते त्यजावे ।।तु.गा.२३६७.००२।।
विशेषता कांद्याहुनी । सेवित्या घाणी आगळी ।।तु.गा.२३६७.००३।।
तुका म्हणे ज्याची जोडी । ते परवडी बैसीजे ।।तु.गा.२३६७.००४।।
जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ।।तु.गा.२३६८.००१।।
आपुलें आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वाटे ।।तु.गा.२३६८.००२।।
तुका म्हणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणा संत ।।तु.गा.२३६८.००३।।
आरुष माझी वाणी बोबडीं उत्तरें । केली ते लेंकुरें सलगी पायीं ।।तु.गा.२३६९.००१।।
करावें कवतुक संतीं मायबापीं । जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ।।तु.गा.२३६९.००२।।

आधारें वदली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवनीं तुमचिया ।।तु.गा.२३६९.००३ ।।
तुका म्हणे हेचि करितों विनंती । मागेन पुढती सेवादान ।।तु.गा.२३६९.००४ ।।
हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांची ।।तु.गा.२३७०.००१ ।।
अंत:काळीं येती माझ्या सोडवणें । मस्तक बैसणें देईन त्यांसी ।।तु.गा.२३७०.००२ ।।
आणिक सोइरे सज्जन वो कोणी । वैष्णवांवांचोनि नाहीं मज ।।तु.गा.२३७०.००३ ।।
देईन आळिंगन धरीन चरण । संवसारसीण नासे तेणें ।।तु.गा.२३७०.००४ ।।
कंठीं तुळसीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदींचें ।।तु.गा.२३७०.००५ ।।
तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हीं वैकुंठीं नाहीं मज ।।तु.गा.२३७०.००६ ।।
अळसें दंभें भावें हरिचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ।।तु.गा.२३७०.००७ ।।
कायावाचामनें देईन क्षेम त्यासी । चाड जिवित्वासी नाहीं मज ।।तु.गा.२३७०.००८ ।।
हरिचें नाम मज म्हणविती कोणी । तया सुखा धणी धणीवरी ।।तु.गा.२३७०.००९ ।।
तुका म्हणे तया उपकारें बांधलों । म्हणऊनि आलों शरण संतां ।।तु.गा.२३७०.०१० ।।
घेसी तरी घेई संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ।।तु.गा.२३७१.००१ ।।
सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ।।तु.गा.२३७१.००२ ।।
करिसील तो करी संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ।।तु.गा.२३७१.००३ ।।
बैससील तरी बैस संतांमधीं । आणिक ते बुद्धी नको मना ।।तु.गा.२३७१.००४ ।।
जासी तरी जाई संतांचिया गांवा । होईल विसावा तेथें मना ।।तु.गा.२३७१.००५ ।।
तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेई ।।तु.गा.२३७१.००६ ।।
बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य झाली बुद्धि संचितासी ।।तु.गा.२३७२.००१ ।।
येणें पंथें माझी चालिलीं पाउलें । दरुषण झालें संतांपायीं ।।तु.गा.२३७२.००२ ।।
त्रासिलें दरिद्रें दोषा झाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत झाला ।।तु.गा.२३७२.००३ ।।
तुका म्हणे झाला अवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ।।तु.गा.२३७२.००४ ।।
डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ।।तु.गा.२३७३.००१ ।।

संतसंगें सारुं काळ । प्रेमसुखाचा कल्लोळ ।।तु.गा.२३७३.००२।।
ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ।।तु.गा.२३७३.००३।।
नाहीं वैकुंठींचा पांग । धांवें कथे पांडुरंग ।।तु.गा.२३७३.००४।।
मुक्त व्हावें काशासाठीं । कैची येणे रसें तुटी ।।तु.गा.२३७३.००५।।
तुका म्हणे गोड । हेंचि पुरें माझें कोड ।।तु.गा.२३७३.००६।।
गुणांचाचि सांठा । करूं न वजों आणिका वाटा ।।तु.गा.२३७४.००१।।
करिती छंद नानापरी । भरोनि सिणती आडभरी ।।तु.गा.२३७४.००२।।
नेमिली पंगती । आम्हां संतांची संगती ।।तु.गा.२३७४.००३।।
तुका म्हणे लीळा । येर कवतुक पाहों डोळां ।।तु.गा.२३७४.००४।।
काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत तें ।।तु.गा.२३७५.००१।।
काय नाहीं त्याची करीत तें सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ।।तु.गा.२३७५.००२।।
अमंगळपणें कंटाळा न धरी । उचलोनि करीं कंठीं लावी ।।तु.गा.२३७५.००३।।
लेववीं आपुलें अंगें अळंकार । संतोषा ये फार देखोनियां ।।तु.गा.२३७५.००४।।
तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हां लाज थोरी अंकिताची ।।तु.गा.२३७५.००५।।
नव्हती माझे बोल जाणा हा निर्धार । मी आहें मजूर विठोबाचा ।।तु.गा.२३७६.००१।।
निर्धारा वचन सोडविलें माझ्या । कृपाळूवें लज्जा राखियेली ।।तु.गा.२३७६.००२।।
निर्भर मानसीं जालों आनंदाचा । गोडावली वाचा नामघोषें ।।तु.गा.२३७६.००३।।
आतां भय माझें नासलें संसारीं । जालोंसें यावरी गगनाचा ।।तु.गा.२३७६.००४।।
तुका म्हणे हा तो संतांचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ।।तु.गा.२३७६.००५।।
हरिच्या दासां सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ।।तु.गा.२३७७.००१।।
कडिये देव वाहे खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ।।तु.गा.२३७७.००२।।
सरती येणें आटाआटी । नाहीं तुटी लाभाची ।।तु.गा.२३७७.००३।।
तुका म्हणे समाधान । सदा मन आमुचें ।।तु.गा.२३७७.००४।।

जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावेचि ना ।।तु.गा.२३७८.००१।।
तुम्ही संत सारे कृपेचे सागर । निरोप हा फार सांगा देवा ।।तु.गा.२३७८.००२।।
अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायापें विठ्ठला ठेवीं मज ।।तु.गा.२३७८.००३।।
तुका म्हणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करील माझें ।।तु.गा.२३७८.००४।।
येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ।।तु.गा.२३७९.००१।।
वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व सांठा ते ठायीं ।।तु.गा.२३७९.००२।।
येथींचियां नाशिवंतें । काय रितें चाळवूं ।।तु.गा.२३७९.००३।।
तुका म्हणे वैष्णवजन । माझें गण समुदाय ।।तु.गा.२३७९.००४।।
सर्वपक्षीं हरि साहे सखा जाला । ओल्या अंगणीच्या कल्पलता त्याला ।।तु.गा.२३८०.००१।।
सहजचाली चालतां पायवाटे । चिंतामणीसमान होती गोटे ।।तु.गा.२३८०.००२।।
तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदांत वाहे पाणी ।।तु.गा.२३८०.००३।।
पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ।।तु.गा.२३८१.००१।।
मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ।।तु.गा.२३८१.००२।।
नव्हे हा उपदेश । तुमचे बडबडिलों शेष ।।तु.गा.२३८१.००३।।
तुमचे कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ।।तु.गा.२३८१.००४।।
कळेल हे खुण । तरि दावी नारायण ।।तु.गा.२३८२.००१।।
सत्य संतांपाशीं राहे । येरां भय आड आहे ।।तु.गा.२३८२.००२।।
अणुचिया ऐसें । असे भरलें प्रकाशें ।।तु.गा.२३८२.००३।।
इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनि ।।तु.गा.२३८२.००४।।
तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ।।तु.गा.२३८२.००५।।
तुका म्हणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ।।तु.गा.२३८२.००६।।
विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वहावें भार माथां ।।तु.गा.२३८३.००१।।
साधनें संकटें सर्वांलागीं शीण । व्हावा लागे क्षीण अहंभाव ।।तु.गा.२३८३.००२।।

भाव हा कठिण वज्र हे भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ।।तु.गा.२३८३.००३।।
तुका म्हणे वर्म भजनेंचि सांपडे । येरासी तों पडे वोस दिशा ।।तु.गा.२३८३.००४।।
सकळ पूजा स्तुति । करावी ते व्हावी याती ।।तु.गा.२३८४.००१।।
म्हणऊनि वारा जन । संत पुजा नारायण ।।तु.गा.२३८४.००२।।
सेवावें तें बरी । दावी उमटूनि ढेंकरीं ।।तु.गा.२३८४.००३।।
तुका म्हणे सुरा । दुधा म्हणतां केवीं बरा ।।तु.गा.२३८४.००४।।
पडोनियां राहीं । उगाच संतांचिये पायीं ।।तु.गा.२३८५.००१।।
नलगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करीं भावें ।।तु.गा.२३८५.००२।।
सहज ते स्फीती । उपदेश पर युक्ति ।।तु.गा.२३८५.००३।।
तुका म्हणे भाव । जवळी धरूनि आणी देव ।।तु.गा.२३८५.००४।।
जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें संतसंगें ।।तु.गा.२३८६.००१।।
पूर्वपुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ नुपजे तेथें ।।तु.गा.२३८६.००२।।
भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतापायीं ।।तु.गा.२३८६.००३।।
तुका म्हणे हेचि करावी मिरासी । बळी संतापाशीं द्यावा जीव ।।तु.गा.२३८६.००४।।
बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरिचि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं ।।तु.गा.२३८७.००१।।
म्हणवी म्हणियारा तयाचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ।।तु.गा.२३८७.००२।।
असे भूतदया मानसीं । अवघा देखें हृषीकेशी । जीवें न विसंबें त्यासीं । मागें मागें हिंडतसें ।।तु.गा.२३८७.००३।।
तुका म्हणे निर्विकार । शरणागतां वज्र पंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ।।तु.गा.२३८७.००४।।
शुद्धचर्या हें संताचें पुजन । लागतचि धन नाहीं वित्त ।।तु.गा.२३८८.००१।।
सगुणाचे सोई सगुण विश्रांति । आपणचि येती चोजवीत ।।तु.गा.२३८८.००२।।
कीर्तनींच वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास सन्निधता ।।तु.गा.२३८८.००३।।
तुका म्हणे वर्म सांगतों सवेगें । मन लावा लागे स्वहिताच्या ।।तु.गा.२३८८.००४।।
भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ।।तु.गा.२३८९.००१।।

शिकल्या बोलाचा धरिशील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ।।तु.गा.२३८९.००२।।
हिरा परिस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परी जन संतां तैसी ।।तु.गा.२३८९.००३।।
सरिता वोहोळ गंगा सागरा समान । लेखी तयाहून अधम नाहीं ।।तु.गा.२३८९.००४।।
आणीक अमुप होती तारांगणें । रवीसी समान लेखूं नये ।।तु.गा.२३८९.००५।।
तुका म्हणे नाहीं नम्रता अंगीं । नव्हे ते फिरंगी कठिण लोह ।।तु.गा.२३८९.००६।।
हरिजनाची कोणा न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ।।तु.गा.२३९०.००१।।
रूपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयकर खळां कष्ट ।।तु.गा.२३९०.००२।।
दुर्वास हा छळूं आला आंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित फिरे ।।तु.गा.२३९०.००३।।
द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांति । होऊनि श्रीपति साह्य केली ।।तु.गा.२३९०.००४।।
न साहेचि बब्रु पांडवां पारिखा । दुराविला सखा बळिभद्र ।।तु.गा.२३९०.००५।।
तुका म्हणे अंगीं राखिली दुर्गंधि । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ।।तु.गा.२३९०.००६।।
उपकारी असे आरोनी उरला । आपुलें तयाला पर नाहीं ।।तु.गा.२३९१.००१।।
लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ।।तु.गा.२३९१.००२।।
जीवा ऐसें देखें आणिकां जीवांसी । निखळचि रासी गुणांचीच ।।तु.गा.२३९१.००३।।
तुका म्हणे देव तयाचा पांगिला । न भंगें संचला धीर सदा ।।तु.गा.२३९१.००४।।
चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसेसीं खापर काय होय ।।तु.गा.२३९२.००१।।
दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ।।तु.गा.२३९२.००२।।
तुका म्हणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरिच राहे बुद्धि संतसंगीं ।।तु.गा.२३९२.००३।।
संतांचें गुणदोष आणितां या मना । केलिया उगाणा सुकृताचा ।।तु.गा.२३९३.००१।।
पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ । चिरोनि केळी केळ गाढव तो ।।तु.गा.२३९३.००२।।
तुका म्हणे गंगें अग्नीसि विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावें ।।तु.गा.२३९३.००३।।
संतापाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उरफोडी ।।तु.गा.२३९४.००१।।
बासर तो भुंकें गाढवाचें परी । उडे पाठीवरीं यमदंड ।।तु.गा.२३९४.००२।।

समयो नेणें तें वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ।।तु.गा.२३९४.००३।।

तुका म्हणे काय वायां चाळवणी । पिट पिट घाणी हागवणीची ।।तु.गा.२३९४.००४।।

संताचा अतिक्रम । देव पूजा तो अधर्म ।।तु.गा.२३९५.००१।।

येती दगड तैसे वरी । मंत्रपुष्प देवाशिरीं ।।तु.गा.२३९५.००२।।

अतीतासी गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ।।तु.गा.२३९५.००३।।

तुका म्हणे देवा । ताडण भेदकाची सेवा ।।तु.गा.२३९५.००४।।

अवघा भार वाटे देवा । संतसेवा न करितां ।।तु.गा.२३९६.००१।।

कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ।।तु.गा.२३९६.००२।।

चुकलोंसा दिसे पंथ । गेलें संत तो ऐसा ।।तु.गा.२३९६.००३।।

तुका म्हणे सोंग वायां । कारण या अनुभवें ।।तु.गा.२३९६.००४।।

दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ।।तु.गा.२३९७.००१।।

धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकां वारी ।।तु.गा.२३९७.००२।।

मळ खायें संवदणी । करी आणिकांची उजळणी ।।तु.गा.२३९७.००३।।

तुका म्हणे त्याचा । प्रीती आदर करा साचा ।।तु.गा.२३९७.००४।।

झविली महारें । त्याची व्याली असे पोरें ।।तु.गा.२३९८.००१।।

करी संतांचा मत्सर । कोपे उभारोनि कर ।।तु.गा.२३९८.००२।।

बीज तैसें फळ । वरी आलें अमंगळ ।।तु.गा.२३९८.००३।।

तुका म्हणे ठावें । ऐसें झालें अनुभवें ।।तु.गा.२३९८.००४।।

भुंकुनियां सुनें लागे हत्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे ।।तु.गा.२३९९.००१।।

काय त्या मशकें तयासी करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ।।तु.गा.२३९९.००२।।

मातले माकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तेणें ।।तु.गा.२३९९.००३।।

तुका म्हणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ।।तु.गा.२३९९.००४।।

संतांचि स्तुति ते दर्शनाच्या योगें । पडिल्या प्रसंगें ऐसें कीजे ।।तु.गा.२४००.००१।।

संकल्प ते सदा स्वामिचेचि चित्तीं । फांको नये वृत्ती अखंडित ।।तु.गा.२४००.००२।।
दास्यत्व तें असे एकविध नांवें । उरों नये जीवें भिन्नत्वेंसी ।।तु.गा.२४००.००३।।
निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे ते पेरी तये वेळीं ।।तु.गा.२४००.००४।।
कासयासी व्हावें आम्ही जीवन्मुक्त । सांडूनियां थीत प्रेमसुख ।।तु.गा.२४०१.००१।।
वैष्णवांचा दास झाला नारायण । काय त्या मिळोन असों सुखी ।।तु.गा.२४०१.००२।।
काय त्या गांठींचें पडलें सुटोन । उगेचि बैसोन धीर धरुं ।।तु.गा.२४०१.००३।।
सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण हाणे लाता ।।तु.गा.२४०१.००४।।
तुका म्हणे मज नलगे सायुज्यता । राहेन या संतां समागमें ।।तु.गा.२४०१.००५।।
देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ।।तु.गा.२४०२.००१।।
मी तो सांगतसें भावें । असो ठावें सकळां ।।तु.गा.२४०२.००२।।
निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ।।तु.गा.२४०२.००३।।
तुका म्हणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ।।तु.गा.२४०२.००४।।
अमंगळ वाणी । नये आइकों ते कानीं ।।तु.गा.२४०३.००१।।
जो हे दूषी हरिची कथा । त्यासी क्षयरोगव्यथा ।।तु.गा.२४०३.००२।।
याति वर्ण श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ठ ।।तु.गा.२४०३.००३।।
तुका म्हणे पाप । माय न आवडे ज्या बाप ।।तु.गा.२४०३.००४।।
अवीट हे क्षीर हरिकथा माउली । सेवितां सेविली वैष्णवजनीं ।।तु.गा.२४०४.००१।।
अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ।।तु.गा.२४०४.००२।।
पतित पातकी पावनपंगती । चतुर्भुज होती देवा ऐसे ।।तु.गा.२४०४.००३।।
सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ।।तु.गा.२४०४.००४।।
निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत । धरूनियां प्रीत गायनाची ।।तु.गा.२४०४.००५।।
तुका म्हणे केली साधनां गाळणी । सुलभ कीर्तनीं होऊनि ठेला ।।तु.गा.२४०४.००६।।
आणीक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा वरपडी ।।तु.गा.२४०५.००१।।

सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ।।तु.गा.२४०५.००२।।
अनाथांचा नाथ देव । अनुभव सत्य हा ।।तु.गा.२४०५.००३।।
तुका म्हणे बहुतां रीती । धरा चित्तीं सकळ ।।तु.गा.२४०५.००४।।
आनंदें कीर्तन कथा करी घोष । आवडीचा रस प्रेमसुख ।।तु.गा.२४०६.००१।।
मज या आवडे वैष्णवांचा संग । येथें नाहीं लाग कळिकाळाचा ।।तु.गा.२४०६.००२।।
स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका । रामकृष्ण सखा नारायण ।।तु.गा.२४०६.००३।।
उच्चारितां दुजें वाटे मज लाज । उपदेश काज आन नाहीं ।।तु.गा.२४०६.००४।।
तुका म्हणे मन रंगलेसें ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ।।तु.गा.२४०६.००५।।
कथा करोनियां द्रव्य देती घेती । तयां अधोगति नरकवास ।।तु.गा.२४०७.००१।।
रवरव कुंभपाक भोगिती यातना । नये नारायणा करूणा त्यांची ।।तु.गा.२४०७.००२।।
असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ।।तु.गा.२४०७.००३।।
तुका म्हणे तया नरक न चुकती । सांपडलें हातीं यमाचिया ।।तु.गा.२४०७.००४।।
कथा करोनियां मोल ज्यापें घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ।।तु.गा.२४०८.००१।।
ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंड स्मरा रामराम ।।तु.गा.२४०८.००२।।
मधुरवाणीच्या नका पडों भरी । जाल यमपुरी भोगावया ।।तु.गा.२४०८.००३।।
तुका म्हणे करीं ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरीं जिणें धिग त्याचें ।।तु.गा.२४०८.००४।।
कथाकाळींची मर्यादा । सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा । हेंचि एक आवडे ।।तु.गा.२४०९.००१।।
टाळ वाद्य गीत नृत्य । अंत:करण प्रेमभरित । वाणिता तो कीर्त । तद्भावने लेखावा ।।तु.गा.२४०९.००२।।
नये आळसें मोडूं अंग । कथें कानवडे ढुंग । हेळणेचा रंग । दावील तो चांडाळ ।।तु.गा.२४०९.००३।।
तोंडीं विडा माने ताठा । थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा । गोष्टी लावी तो चांडाळ ।।तु.गा.२४०९.००४।।
कथें इच्छी मान । दावूनियां थोरपण । रजा संकोचून । लुगडीं सांवरी तो चांडाळ ।।तु.गा.२४०९.००५।।
आपण बैसे बाजेसरी । सामान्य हरीच्या दासां धरीं । तरि तो सुळावरी । वाहिजेला निश्चयें ।।तु.गा.२४०९.००६।।
येतां न करी नमस्कार । कर जोडोनियां नम्र । न म्हणतां थोर । आणिकां खेटी तो चांडाळ ।।तु.गा.२४०९.००७।।

तुका विनवी जना । कथें नाणावें अवगुणा । करा नारायणा । ऋणी समर्पक भावें ।।तु.गा.२४०९.००८ ।।
कथा देवाचें ध्यान । कथा साधना मंडण । कथेऐसें पुण्य । आणिक नाहीं सर्वथा ।।तु.गा.२४१०.००१ ।।
ऐसा साच खरा भाव । कथेमाजीं उभा देव ।।तु.गा.२४१०.००२ ।।
मंत्र स्वल्प जना । उच्चारितां वाचे मना । म्हणतां नारायणा । क्षणें जळती महादोष ।।तु.गा.२४१०.००३ ।।
भावें करितां कीर्तन । तरे तारी आणिक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं म्हणे तुका ।।तु.गा.२४१०.००४ ।।
कथा सुख करी कथा मुक्त करी । कथा याची बरी विठोबाची ।।तु.गा.२४११.००१ ।।
कथा पाप नासी उद्धरिलें दोषी । समाधि कथेसी मूढजना ।।तु.गा.२४११.००२ ।।
कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हे पान हरिकथा ।।तु.गा.२४११.००३ ।।
कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ।।तु.गा.२४११.००४ ।।
तुका म्हणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लागोन उभा कथें ।।तु.गा.२४११.००५ ।।
कथेचा उल्लंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखा तो ।।तु.गा.२४१२.००१ ।।
कासया जीऊन जाला भूमीभार । अनउपकार माते कुशीं ।।तु.गा.२४१२.००२ ।।
निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचें पोटीं कीट कुपथ्याचें ।।तु.गा.२४१२.००३ ।।
तुका म्हणे दोन्हीं बुडविलीं कुळें । ज्याचें तोंड काळें कथेमाजी ।।तु.गा.२४१२.००४ ।।
कथें बैसोनि सादरे । सुखचर्चा परस्परें । नवल काय तो उद्धरे । आणिक तरे सुगंधें ।।तु.गा.२४१३.००१ ।।
पुण्य घ्यावें रे फुकाचें । पाप दुष्ट वासनेचें । पेरिल्या बीजाचें । फळ घेईं शेवटीं ।।तु.गा.२४१३.००२ ।।
कथा विरस पाडी आळस । छळण करूनि मोडवी रस । बुडवी आपणासरिसें । विटाळसी नावेसी ।।तु.गा.२४१३.००३ ।।
सज्जन चंदनाचिये परी । दुर्जन देशत्यागें दुरी । राहो म्हणे हरी । विनंती करी तुका हे ।।तु.गा.२४१३.००४ ।।
करावें कीर्तन । मुखें गावे हरिचे गुण ।।तु.गा.२४१४.००१ ।।
मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाची क्रोधा ।।तु.गा.२४१४.००२ ।।
शांतिखड्ग हातीं । काळासी ते नागवती ।।तु.गा.२४१४.००३ ।।
तुका म्हणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ।।तु.गा.२४१४.००४ ।।
कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम । तेथींचें उत्तम । चरणरज वंदितां ।।तु.गा.२४१५.००१ ।।

जळती दोषांचें डोंगर । शुद्ध होती नारी नर । गाती ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा ।।तु.गा.२४१५.००२।।
तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया । पर्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ।।तु.गा.२४१५.००३।।
अनुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा । तुका म्हणे ब्रह्मा । नेणें वर्णूं या सुखा ।।तु.गा.२४१५.००४।।
कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहु येणें ।।तु.गा.२४१६.००१।।
नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ।।तु.गा.२४१६.००२।।
देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ।।तु.गा.२४१६.००३।।
त्याची निंदा करी त्याची कुष्ट वाणी । मुख संवदणी रजकाची ।।तु.गा.२४१६.००४।।
तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम घ्यावें ।।तु.गा.२४१६.००५।।
कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ।।तु.गा.२४१७.००१।।
प्रेमें छंदें नाचे डोले । हारपले देहभाव ।।तु.गा.२४१७.००२।।
एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ।।तु.गा.२४१७.००३।।
तुका म्हणे उरला देव । गेला भेव त्या काळें ।।तु.गा.२४१७.००४।।
कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं असे ।।तु.गा.२४१८.००१।।
भक्त जाय सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडतसे ।।तु.गा.२४१८.००२।।
त्रैलोक्यभ्रमण करीत नारद । त्यासवें गोविंद फिरतसे ।।तु.गा.२४१८.००३।।
नारद मंजूळ सुस्वरें गीत गाय । मार्गीं चालताहे संगें हरि ।।तु.गा.२४१८.००४।।
तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसीं ।।तु.गा.२४१८.००५।।
खोंकरीं आधण होय पाकसिद्धि । हें तों घडों कधीं शकेचि ना ।।तु.गा.२४१९.००१।।
खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलिया ।।तु.गा.२४१९.००२।।
पालथें घागरीं रिचवितां जळ । तुका म्हणे खळ तैसे कथे ।।तु.गा.२४१९.००३।।
गायत्री विकोनी पोट जे जाळिती । तयां होय गती यमलोकीं ।।तु.गा.२४२०.००१।।
कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता ।।तु.गा.२४२०.००२।।
नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणों तयां गती कैसी होय ।।तु.गा.२४२०.००३।।

कैसी होय गती तेच हो जाणती । आम्हासी संगति नलगे त्यांची ।।तु.गा.२४२०.००४।।
आमुचा सांगाती आहे तो श्रीहरि । नलगे दुराचारी तुका म्हणे ।।तु.गा.२४२०.००५।।
जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ।।तु.गा.२४२१.००१।।
बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ।।तु.गा.२४२१.००२।।
तट्टावृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ।।तु.गा.२४२१.००३।।
तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ।।तु.गा.२४२१.००४।।
जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ।।तु.गा.२४२२.००१।।
हेंचि बळिवंत गाढें । आनंद करूं दिंडीपुढें ।।तु.गा.२४२२.००२।।
कलि पापाची हे मूर्ति । नामखड्ग घेऊं हातीं ।।तु.गा.२४२२.००३।।
तुका म्हणे जाऊं । बळें दमामेही लावूं ।।तु.गा.२४२२.००४।।
टाळघोळ सुख नामाचा गजर । घोष जयजयकार ब्रह्मानंदु ।।तु.गा.२४२३.००१।।
गरुडटके दिंडीं पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ।।तु.गा.२४२३.००२।।
आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहुनि भद्रजाति ।।तु.गा.२४२३.००३।।
तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर लुब्ध होती ।।तु.गा.२४२३.००४।।
तुका म्हणे सोपें वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हेचि वाट ।।तु.गा.२४२३.००५।।
त्या हरिदासांची भेटी घेतां । नरका उभयतांसी जाणें ।।तु.गा.२४२४.००१।।
माते परीस थोर कथा । भाड घेतां न लाजे ।।तु.गा.२४२४.००२।।
देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ।।तु.गा.२४२४.००३।।
तुका म्हणे नरकगांवा । जाती हांवा धरोनि ।।तु.गा.२४२४.००४।।
दया क्षमा शांती । तेथें देवाची वसति ।।तु.गा.२४२५.००१।।
पावें धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा।।तु.गा.२४२५.००२।।
कीर्तनाचे वाटे। बराडिया ऐसा लोटे।।तु.गा.२४२५.००३।।
तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडें ।।तु.गा.२४२५.००४।।

दीन आणि दुर्बळांसी । सुखरासी हरिकथा ।।तु.गा.२४२६.००१ ।।
तारूं भवसागरींचें । उंचनीच अधिकारी ।।तु.गा.२४२६.००२ ।।
चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ।।तु.गा.२४२६.००३ ।।
तुका म्हणे आवडीं धरीं । कृपा करी म्हणऊनी ।।तु.गा.२४२६.००४ ।।
धीर तो कारण । साह्य होतो नारायण । नेदी होऊं शीण । वाहू चिंता दासांसी ।।तु.गा.२४२७.००१ ।।
सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचें गुण । वारी सुदर्शन । आपणचि कळिकाळा ।।तु.गा.२४२७.००२ ।।
जीव वेची माता । बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता । प्राकृतां यांसारिखा ।।तु.गा.२४२७.००३ ।।
हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें । तुका म्हणे सत्य व्हावें । आहाच नये कारणा ।।तु.गा.२४२७.००४ ।।
न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागर त्रिपुटीं । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनि ।।तु.गा.२४२८.००१ ।।
भाविक गे माये भोळें गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ।।तु.गा.२४२८.००२ ।।
जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । राम कृष्ण गोविंदा ।।तु.गा.२४२८.००३ ।।
चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची ।।तु.गा.२४२८.००४ ।।
जया रूप न आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ।।तु.गा.२४२८.००५ ।।
ऐसा भक्तांचा हा ऋणी । पाहतां आगमीं पुराणीं । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसें ।।तु.गा.२४२८.००६ ।।
न लाहिजे जपें न लाहिजें तपें । आम्हासी हें सोपें गीतीं गातां ।।तु.गा.२४२९.००१ ।।
न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरी ।।तु.गा.२४२९.००२ ।।
जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उभा विटे ।।तु.गा.२४२९.००३ ।।
अनंत ब्रह्मांडें जयाचियां पोटीं । तो आम्हां संपुष्टीं भक्तिभावें ।।तु.गा.२४२९.००४ ।।
तुका म्हणे वर्म जाणती लडिवाळें । जीं होतीं निर्मळ अंतर्बाहीं ।।तु.गा.२४२९.००५ ।।
न वजे वायां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वायां न वजे ।।तु.गा.२४३०.००१ ।।
न वजे वायां कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वायां न वजे ।।तु.गा.२४३०.००२ ।।
न वजे वायां कांहीं केलिया तीर्थ । अथवा कां व्रत वायां न वजे ।।तु.गा.२४३०.००३ ।।
न वजे वायां झालें संतांचे दर्शन । शुद्ध आचरण वायां न वजे ।।तु.गा.२४३०.००४ ।।

तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वायां न वजे ।।तु.गा.२४३०.००५।।
नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ।।तु.गा.२४३१.००१।।
सोडवील माझा स्वामी निश्चयेसीं । प्रतिज्ञा हे दासीं केली आम्हीं ।।तु.गा.२४३१.००२।।
गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश होय ।।तु.गा.२४३१.००३।।
तुका म्हणे कडू वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ।।तु.गा.२४३१.००४।।
पानें जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या ते ।।तु.गा.२४३२.००१।।
तमाखू ओढोनि काढील जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ।।तु.गा.२४३२.००२।।
कीर्तनीं बडबड करील जो कोणी । बेडुक होउनि येईल जन्मा ।।तु.गा.२४३२.००३।।
जयाचिये मनीं कथेचा कांटाळा । होती त्या चांडाळा बहु जाच ।।तु.गा.२४३२.००४।।
जाच होती पाठी उडती यमदंड । त्याचें काळें तोंड तुका म्हणे ।।तु.गा.२४३२.००५।।
बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ।।तु.गा.२४३३.००१।।
अभयाचे जावें ठाया । देवराया प्रतापें ।।तु.गा.२४३३.००२।।
साधनाचा नलगे पांग । अवघें सांग कीर्तनें ।।तु.गा.२४३३.००३।।
तुका म्हणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ।।तु.गा.२४३३.००४।।
बोलाचें गौरव । नव्हे माझा हा अनुभव ।।तु.गा.२४३४.००१।।
माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांसी पांगिली ।।तु.गा.२४३४.००२।।
व्याली वाढविलें । निजपदीं निजविलें ।।तु.गा.२४३४.००३।।
दाटली वोरसें । त्रिभुवन ब्रह्मरसें ।।तु.गा.२४३४.००४।।
विष्णु जोडी कर । माथां रज वंदी हर ।।तु.गा.२४३४.००५।।
तुका म्हणे बळ । तोडरीं हा कळिकाळ ।।तु.गा.२४३४.००६।।
भूमीवरी कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ।।तु.गा.२४३५.००१।।
सुखें नाचा हो कीर्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ।।तु.गा.२४३५.००२।।
काळा सुटे पळ । जाती दुरितें सकळ ।।तु.गा.२४३५.००३।।

तुका म्हणे चित्तीं । साच माना हे निश्चिंती ।।तु.गा.२४३५.००४।।
मुंगिचिया घरा कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ।।तु.गा.२४३६.००१।।
याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ।।तु.गा.२४३६.००२।।
उदक अन्न काय म्हणे मज खावें । भुकेला तो जाय चोजवीत ।।तु.गा.२४३६.००३।।
व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दु:खाच्या परिहारा आपुलिया ।।तु.गा.२४३६.००४।।
तुका म्हणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ।।तु.गा.२४३६.००५।।
यमधर्म सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता । जेथें होय हरिकथा । सदा घोष नामाचा ।।तु.गा.२४३७.००१।।
नका जाऊं तया गांवां । नामधारकांच्या शिवां । सुदर्शन यावा । घरटी फिरे भोंवतीं ।।तु.गा.२४३७.००२।।
चक्र गदा घेउनि हरि । उभा असे त्यांचें द्वारीं । लक्ष्मी कामारी । रिद्धिसिद्धीसहित ।।तु.गा.२४३७.००३।।
ते बळियाशिरोमणी । हरिभक्त ये मेदिनी । तुका म्हणे कानीं । यम सांगे दूतांचे ।।तु.गा.२४३७.००४।।
या रे नाचों अवघे जण । भावें आनंदें करून ।।तु.गा.२४३८.००१।।
गाऊं पंढरीचा राणा । क्षेम देऊं संतजना ।।तु.गा.२४३८.००२।।
सुख फुकासाठीं । साधे हरिनाम बोभाटीं ।।तु.गा.२४३८.००३।।
प्रेम वांटितो उदार । देतां नाहीं सान थोर ।।तु.गा.२४३८.००४।।
पापें पळालीं बापुडीं । काळ झाला देशधडी ।।तु.गा.२४३८.००५।।
तुका म्हणे धन्य काळ । आजि प्रेमाचा सुकाळ ।।तु.गा.२४३८.००६।।
लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ।।तु.गा.२४३९.००१।।
लटिकाचि दंभ घातला दुकान । चाळविलें जन पोटासाठीं ।।तु.गा.२४३९.००२।।
लटिकेंचि केलें वेदपारायण । जरि नाहीं स्फुंदन प्रेम कथे ।।तु.गा.२४३९.००३।।
लटिकें तें तप लटिका तो जप । आळस निद्रा झोप कथाकाळीं ।।तु.गा.२४३९.००४।।
नाम आवडे तो करील बोहरी । नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ।।तु.गा.२४३९.००५।।
तुका म्हणे ऐसीं गर्जती पुराणें । शिष्टांची वचनें मागिलाही ।।तु.गा.२४३९.००६।।
लावूनियां पुष्टी पोरें । आणी करकर कथेमाजी ।।तु.गा.२४४०.००१।।

पडा पायां करा विनंती । दवडा हातीं धरोनियां ।।तु.गा.२४४०.००२।।
कुर्वाळूनि बैसें मोहें । प्रेम कां हें नाशीतसे ।।तु.गा.२४४०.००३।।
तुका म्हणे वाटे चित्त । करा फजित म्हणऊनि ।।तु.गा.२४४०.००४।।
विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलतां ।।तु.गा.२४४१.००१।।
मज न साहावे कानीं । विष उत्तर लागे मनीं ।।तु.गा.२४४१.००२।।
हरिकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तोचि वैरी ।।तु.गा.२४४१.००३।।
सुना काळतोंडा । जो या देवा म्हणे धोंडा ।।तु.गा.२४४१.००४।।
अहं म्हणे ब्रह्म । नेणे भक्तीचें तें वर्म ।।तु.गा.२४४१.००५।।
तुका म्हणे क्षण । नको तयाचें दर्शन ।।तु.गा.२४४१.००६।।
साता दिवसांचा जरी झाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ।।तु.गा.२४४२.००१।।
फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । परी नामाचा गजर सोडूं नये ।।तु.गा.२४४२.००२।।
शरीराचें होत दोनी तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सांडो नये ।।तु.गा.२४४२.००३।।
तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव वसे ।।तु.गा.२४४२.००४।।
कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ।।तु.गा.२४४३.००१।।
कोणी व्हारे अधिकारी । त्यासी हरी देईल ।।तु.गा.२४४३.००२।।
अंगीं वैराग्याचें बळ । साही खळ जिणावे ।।तु.गा.२४४३.००३।।
उरेल ना उरी । तुका करी बोभाट ।।तु.गा.२४४३.००४।।
सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ।।तु.गा.२४४४.००१।।
भजनाचे सोई जगा परिहार । नेणत्या सादर चित्त कथे ।।तु.गा.२४४४.००२।।
नाइकवे कानीं साधन उपाय । ऐके तो गाय हरुषें गीत ।।तु.गा.२४४४.००३।।
नव्हे आराणूक जावयासी वना । वेध कामी मना हरिकथेचा ।।तु.गा.२४४४.००४।।
काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्ट प्रहर ।।तु.गा.२४४४.००५।।
तुका म्हणे आम्ही खेळों भातुकुलें । विभागासी मुलें भोळीं येथें ।।तु.गा.२४४४.००६।।

सांडूनि कीर्तन न करी आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ।।तु.गा.२४४५.००१।।
आवडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां याचि लागीं ।।तु.गा.२४४५.००२।।
टाळी वाहूनियां विठ्ठल म्हणेन । तेणें निवारीन भवश्रम ।।तु.गा.२४४५.००३।।
तुका म्हणे देवा नुपक्षावें आम्हां । न्यावें निजधामा आपुलिया ।।तु.गा.२४४५.००४।।
सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ।।तु.गा.२४४६.००१।।
समाधीचें सुख सांडा ओवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ।।तु.गा.२४४६.००२।।
पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्य बळें निर्भरता ।।तु.गा.२४४६.००३।।
उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ।।तु.गा.२४४६.००४।।
तुका म्हणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ।।तु.गा.२४४६.००५।।
स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा । मृत्यूलोकीं व्हावा जन्म आम्हां ।।तु.गा.२४४७.००१।।
नारायणनामें होऊं जीवन्मुक्त । कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ।।तु.गा.२४४७.००२।।
वैकुंठींचें जन सदा इच्छिताती । कई येथें येती हरिचे दास ।।तु.गा.२४४७.००३।।
यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ।।तु.गा.२४४७.००४।।
तुका म्हणे पावावया पैल पार । नाममंत्र सार भाविकांसी ।।तु.गा.२४४७.००५।।
हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ।।तु.गा.२४४८.००१।।
म्हणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागे घालितसे ।।तु.गा.२४४८.००२।।
निर्लज्ज भोजें नाचे रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ।।तु.गा.२४४८.००३।।
तुका म्हणे विकलें देवें । आपणा भावें संवसाटी ।।तु.गा.२४४८.००४।।
क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नाठवे । पाहावया धांवे कोल्हांटासी ।।तु.गा.२४४९.००१।।
कथेसी साक्षेपें पाचारिलें जरी । म्हणे माझ्या घरीं कोणी नाहीं ।।तु.गा.२४४९.००२।।
बलात्कारें जरी आणिला कथेसी । निद्रा घे लोडासी टेंकूनियां ।।तु.गा.२४४९.००३।।
तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ।।तु.गा.२४४९.००४।।
जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ।।तु.गा.२४५०.००१।।

राहें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ।।तु.गा.२४५०.००२।।
कीर्तनीं समाधि साधन ते मुद्रा । राहतील थारा धरोनियां ।।तु.गा.२४५०.००३।।
तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । ओळगती चारी रिद्धिसिद्धि ।।तु.गा.२४५०.००४।।
नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींचीं ।।तु.गा.२४५१.००१।।
न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ।।तु.गा.२४५१.००२।।
ठायींच बैसुनी करा एकचित्त। आवडी अनंत आळवावा ।।तु.गा.२४५१.००३।।
रामकृष्णहरि विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ।।तु.गा.२४५१.००४।।
याविण आणीक असतां साधन । वाहातसें आण विठोबाची ।।तु.गा.२४५१.००५।।
तुका म्हणे सोपें आहे सर्वाहूनि । शहाणा तो धणी घेतो येथें ।।तु.गा.२४५१.००६।।
नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ।।तु.गा.२४५२.००१।।
ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ।।तु.गा.२४५२.००२।।
ब्रह्मादिकां ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ।।तु.गा.२४५२.००३।।
तुका म्हणे सार घ्यावें । मनें हरिरूप पहावें ।।तु.गा.२४५२.००४।।
नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ।।तु.गा.२४५३.००१।।
ऐसा लाभ बांधा गांठी । विठ्ठलपायीं पडे मिठी ।।तु.गा.२४५३.००२।।
नामापरितें साधन नाहीं । जें तूं करिसी आणिक कांहीं ।।तु.गा.२४५३.००३।।
हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ।।तु.गा.२४५३.००४।।
नाम घेतां नलगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ।।तु.गा.२४५४.००१।।
दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावें राम राम ।।तु.गा.२४५४.००२।।
नाहीं वर्णधर्म याती । नामीं अवघींचि सरती ।।तु.गा.२४५४.००३।।
तुका म्हणे नाम । चैतन्य हें निजधाम ।।तु.गा.२४५४.००४।।
नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ।।तु.गा.२४५५.००१।।
आणिकें दुरावली करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ।।तु.गा.२४५५.००२।।

रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ।।तु.गा.२४५५.००३।।
तुका म्हणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ।।तु.गा.२४५५.००४।।
हरि म्हणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि म्हणतां ।।तु.गा.२४५६.००१।।
हरि म्हणतां भुक्ति हरि म्हणतां मुक्ति । चुके यातायाती हरि म्हणतां ।।तु.गा.२४५६.००२।।
तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि म्हणतां ।।तु.गा.२४५६.००३।।
तुका म्हणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुम्हां ।।तु.गा.२४५६.००४।।
लागोनियां पायां विनवितों तुम्हांला । करें टाळी बोला मुखें नाम ।।तु.गा.२४५७.००१।।
विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ।।तु.गा.२४५७.००२।।
कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठींचा ।।तु.गा.२४५७.००३।।
सकळांसी येथें आहे अधिकार । कलियुगीं उद्धार हरिनामें ।।तु.गा.२४५७.००४।।
तुका म्हणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहुतां ग्रंथीं बोलियेलें ।।तु.गा.२४५७.००५।।
यालागीं आवडी म्हणा रामकृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ।।तु.गा.२४५८.००१।।
सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ।।तु.गा.२४५८.००२।।
न लगती कष्ट नलगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ।।तु.गा.२४५८.००३।।
नलगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरि ।।तु.गा.२४५८.००४।।
तुका म्हणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ।।तु.गा.२४५८.००५।।
नाम घेतां वायां गेला । ऐसा कोणें आईकिला ।।तु.गा.२४५९.००१।।
सांगा विनवितों तुम्हांसी । संत महंत सिद्ध ऋषी ।।तु.गा.२४५९.००२।।
नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ।।तु.गा.२४५९.००३।।
सलगीच्या उत्तरा । तुका म्हणे क्षमा करा ।।तु.गा.२४५९.००४।।
सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचे ।।तु.गा.२४६०.००१।।
तयाच्या चिंतनें निरसेल संकट । तराल दुर्घट भवसिंधु ।।तु.गा.२४६०.००२।।
जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम अहर्निशीं ।।तु.गा.२४६०.००३।।

तुका म्हणे कोटी कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचें ।।तु.गा.२४६०.००४।।
कामामध्यें काम । कांहीं म्हणा रामराम । जाईल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ।।तु.गा.२४६१.००१।।
कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचें वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ।।तु.गा.२४६१.००२।।
जीतां जीसी जैसा तैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवुनि फांसा । काय करणें तें करी ।।तु.गा.२४६१.००३।।
केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । तुका म्हणे वर्मे । जाणोनियां तरती ।।तु.गा.२४६१.००४।।
कळे न कळे ज्या धर्म । ऐका सांगतो रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासे उच्चारा ।।तु.गा.२४६२.००१।।
तो या दाखवील वाटा । जया पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोठा । पाहिजे तो कळवळा ।।तु.गा.२४६२.००२।।
पुसतां चुका होतो वाटा । सवें बोळावा गोमटा । मोडों नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ।।तु.गा.२४६२.००३।।
तुका म्हणे मोल । नलगे द्यावें वेचा बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ।।तु.गा.२४६२.००४।।
विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ।।तु.गा.२४६३.००१।।
वाजे टाळ टाळ्या टाळी । होईल होळी विघ्नाची ।।तु.गा.२४६३.००२।।
विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ।।तु.गा.२४६३.००३।।
तुका म्हणे विठ्ठल वाणीं । वदा कानीं आईका ।।तु.गा.२४६३.००४।।
ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ।।तु.गा.२४६४.००१।।
म्हणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडीं ।।तु.गा.२४६४.००२।।
संचित प्रारब्ध गाढें । धांवें पुढें क्रियमाण ।।तु.गा.२४६४.००३।।
तुका म्हणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें शुकराचें ।।तु.गा.२४६४.००४।।
तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ।।तु.गा.२४६५.००१।।
कांहीं नलगे शिणावें । आणीक वेगळाल्या भावें । वाचें उच्चारावें । रामकृष्णगोविंदा ।।तु.गा.२४६५.००२।।
फळ पावाल अवलिळा । भोग वैकुंठ सोहळा ।।तु.गा.२४६५.००३।।
तुका म्हणे त्याच्या नांवें । तोचि होइजे स्वभावें ।।तु.गा.२४६५.००४।।
पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ।।तु.गा.२४६६.००१।।
मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ।।तु.गा.२४६६.००२।।

नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ।।तु.गा.२४६६.००३।।
तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ।।तु.गा.२४६६.००४।।
जन्मा येऊनि कां रे निदसुरा । जाय भेटी वरा रखुमाईच्या ।।तु.गा.२४६७.००१।।
पाप ताप दैन्य जाईल सकळ । पावसी अढळ उत्तम तें ।।तु.गा.२४६७.००२।।
संतमहंतसिद्ध हरिदासदाटणी । फिटती पारणीं इंद्रियांची ।।तु.गा.२४६७.००३।।
तुका म्हणे तेथें नामाचा गजर । फुकाची अपार लुटी घेईं ।।तु.गा.२४६७.००४।।
उभाउभी फळ । अंगीं मंत्राचिया बळ ।।तु.गा.२४६८.००१।।
म्हणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ।।तु.गा.२४६८.००२।।
कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां सदा ।।तु.गा.२४६८.००३।।
तुका म्हणे रोग । वारे भवाऐसा भोग ।।तु.गा.२४६८.००४।।
ब्रह्मरस घेईं काढा । जेणे पीडा वारेल ।।तु.गा.२४६९.००१।।
पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचे न सेवी ।।तु.गा.२४६९.००२।।
भवरोगा ऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ।।तु.गा.२४६९.००३।।
तुका म्हणे नव्हे बाधा । आणीक कदा भूतांचीं ।।तु.गा.२४६९.००४।।
भक्तिभाव आम्ही बांधिलासे गांठीं । सादावितों हाटीं घ्या रे कोणी ।।तु.गा.२४७०.००१।।
सुखाचिया पेठें घातला दुकान । मांडियेलें वान रामनाम ।।तु.गा.२४७०.००२।।
सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधु ।।तु.गा.२४७०.००३।।
मागें भाग्यवंत झाले थोर थोर । तिहीं केला फार हाचि सांटा ।।तु.गा.२४७०.००४।।
खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका म्हणे चित्त शुद्ध करीं ।।तु.गा.२४७०.००५।।
स्वल्प वाटे चला जाऊं । वाचें गाऊं विठ्ठल ।।तु.गा.२४७१.००१।।
तुम्ही आम्ही खेळीमेळीं । गदारोळीं आनंदें ।।तु.गा.२४७१.००२।।
ध्वजा कुंचे गरूडटके । शृंगार निके करोनि ।।तु.गा.२४७१.००३।।
तुका म्हणे हेचि नीट । जवळी वाट वैकुंठा ।।तु.गा.२४७१.००४।।

संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें जोडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं न लागती सायास । तरी कां आळस करिसी झणी ।।तु.गा.२४७२.००१।।
ऐसें हें सार कां नेघेसी फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ।।तु.गा.२४७२.००२।।
पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलोनी परलोकां ।।तु.गा.२४७२.००३।।
अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । रामराम पद उच्चारिलें । तंव त्या दिनानाथा कृपा आली कैसी । त्यानें तियेसी वैकुंठासी नेलें ।।तु.गा.२४७२.००४।।
अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका म्हणे भावें स्मरतां रामराम । कोण जाणें तये दशे ।।तु.गा.२४७२.००५।।
सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा राम कृष्ण ।।तु.गा.२४७३.००१।।
पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ।।तु.गा.२४७३.००२।।
अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एक ठायीं ।।तु.गा.२४७३.००३।।
शेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती म्हैसी । कामधेनु तैसी नव्हे एक ।।तु.गा.२४७३.००४।।
तुका म्हणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणता सुलभचि ।।तु.गा.२४७३.००५।।
ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुकें फेरा गर्भवास ।।तु.गा.२४७४.००१।।
नाशिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा शीण तेंचि फळ ।।तु.गा.२४७४.००२।।
नाव धड करा सहस्त्र नामांची । जे भवसिंधूची थडी पावे ।।तु.गा.२४७४.००३।।
तुका म्हणे काळा हाणा तोंडावरी । भाता भरा हरिरामबाणीं ।।तु.गा.२४७४.००४।।
सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेद काम निवारूनि ।।तु.गा.२४७५.००१।।
नलगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ।।तु.गा.२४७५.००२।।
देवाचींच नामें देवाचियें शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ।।तु.गा.२४७५.००३।।
तुका म्हणे होय भावेंचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ।।तु.गा.२४७५.००४।।
रामकृष्ण नाम मांडी पां वोळी । तेणें होईल होळी पापा धुनी ।।तु.गा.२४७६.००१।।
ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नाश ब्रह्मरसा ।।तु.गा.२४७६.००२।।
जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस उरे मागुताली ।।तु.गा.२४७६.००३।।
तुका म्हणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ।।तु.गा.२४७६.००४।।

गाय नाचें वाहे टाळी । साधन कळीं उत्तम हें ।।तु.गा.२४७७.००१।।
काय जाणों तरले किती । नाव आइती या बैसा ।।तु.गा.२४७७.००२।।
सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचे ।।तु.गा.२४७७.००३।।
तुका म्हणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ।।तु.गा.२४७७.००४।।
नाशिवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचें नाम ।।तु.गा.२४७८.००१।।
नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी । नामें हें वैकुंठीं बैसविले ।।तु.गा.२४७८.००२।।
नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुम्हीं मनीं आठवाना ।।तु.गा.२४७८.००३।।
तुका म्हणे नाम वेदांसी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाठीं ।।तु.गा.२४७८.००४।।
अग्नि तापलिया कायाचि होमे । तापत्रयें संतप्त होती । संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसार स्थिति । राहाट घटिका जैसी फिरतांचि राहिली । भरली झाली होती एके रितीं । साधीं हा प्रपंच पंचाय अग्न । तेणें पावशी निज शांती रे ।।तु.गा.२४७९.००१।।
नारायण नाम नारायण नाम । नित्य करीं काम जिव्हा मुखें । जन्म जराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळहीं दु:खें रे ।।तु.गा.२४७९.००२।।
शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसन समाधी साधी । तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी । भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । जन्मजरादु:खव्याधि । साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश साधी रे ।।तु.गा.२४७९.००३।।
घोकितां अक्षरें अभिमानविधि । निषेध लागला पाठी । वाद करितां निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भविष्यति । दूषणाचें मूळ भूषण तुका म्हणे । सांडी मिथ्या खंती । रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती रे ।।तु.गा.२४७९.००४।।
जवळी मुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं ।।तु.गा.२४८०.००१।।
भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नाशी काम ।।तु.गा.२४८०.००२।।
सुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ।।तु.गा.२४८०.००३।।
तुका म्हणे ठेवा । कां हा न करीच बरवा ।।तु.गा.२४८०.००४।।
काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ।।तु.गा.२४८१.००१।।
सर्व साधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ।।तु.गा.२४८१.००२।।
योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ।।तु.गा.२४८१.००३।।
तुका म्हणे जपा । मंत्र त्रिअक्षरी सोपा ।।तु.गा.२४८१.००४।।

चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ।।तु.गा.२४८२.००१।।
तुज पापचि नाहीं ऐसे । नाम घेतां जवळी वसे ।।तु.गा.२४८२.००२।।
पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां नलगे घडी ।।तु.गा.२४८२.००३।।
केलीं मागें नको पाहों । तुज जमान आम्ही आहों ।।तु.गा.२४८२.००४।।
करीं तुजसी करवती । आणिक नामें घेऊं किती ।।तु.गा.२४८२.००५।।
तुका म्हणे काळा । रीघ नाहीं निघती ज्वाळा ।।तु.गा.२४८२.००६।।
युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ।।तु.गा.२४८३.००१।।
कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ।।तु.गा.२४८३.००२।।
न लगे लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ।।तु.गा.२४८३.००३।।
तुका म्हणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामेंविण ।।तु.गा.२४८३.००४।।
फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ।।तु.गा.२४८४.००१।।
नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ।।तु.गा.२४८४.००२।।
उदंड भावें उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ।।तु.गा.२४८४.००३।।
तुका म्हणे घरिंच्या घरीं । देशाउरीं न शीणीजे ।।तु.गा.२४८४.००४।।
चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ।।तु.गा.२४८५.००१।।
न करीं आणीक साधन । कष्टसी कां वायांविण ।।तु.गा.२४८५.००२।।
अठरा पुराणांचें पोटीं । नामाविण नाहीं गोठी।।तु.गा.२४८५.००३।।
गीता जेणें उपदेशिलीं । ते ही विटेवरी माउली।।तु.गा.२४८५.००४।।
तुका म्हणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारीं ।।तु.गा.२४८५.००५।।
फलकट तो संसार । येथें सार भगवंत ।।तु.गा.२४८६.००१।।
ऐसे जागवितों मना । सरसें जनासहित ।।तु.गा.२४८६.००२।।
अवघे निरसूनि काम । घ्यावें नाम विठोबाचें ।।तु.गा.२४८६.००३।।
तुका म्हणे देवाविण । केला शीण तो मिथ्या ।।तु.गा.२४८६.००४।।

न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ।।तु.गा.२४८७.००१ ।।
न दिसें तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ।।तु.गा.२४८७.००२ ।।
न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ।।तु.गा.२४८७.००३ ।।
न भेटें तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ।।तु.गा.२४८७.००४ ।।
अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचें ।।तु.गा.२४८७.००५ ।।
तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ।।तु.गा.२४८७.००६ ।।
गर्जत जावी नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ।।तु.गा.२४८८.००१ ।।
येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळ ।।तु.गा.२४८८.००२ ।।
लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ।।तु.गा.२४८८.००३ ।।
तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ।।तु.गा.२४८८.००४ ।।
उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ।।तु.गा.२४८९.००१ ।।
बरें सेवन उपकारा । द्यावें घ्यावें या उत्तरा ।।तु.गा.२४८९.००२ ।।
सरळ आणि मृद । कथा पाववीते ऊर्ध्व ।।तु.गा.२४८९.००३ ।।
गात जात तुका । हाचि उपदेश आइका ।।तु.गा.२४८९.००४ ।।
समुद्रवळयांकित पृथ्वीचे दान । करितां समान नये नामा ।।तु.गा.२४९०.००१ ।।
म्हणऊनि कोणी न करावा आळस । म्हणा रात्रंदिवस रामराम ।।तु.गा.२४९०.००२ ।।
सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी नये गोविंदनामें एकें ।।तु.गा.२४९०.००३ ।।
सकळहीं तीर्थें प्रयागादि काशी । करितां नामाशीं तुळति ना ।।तु.गा.२४९०.००४ ।।
कर्वतीं कर्मरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ।।तु.गा.२४९०.००५ ।।
तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ।।तु.गा.२४९०.००६ ।।
हित तेंचि एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देहीं ।।तु.गा.२४९१.००१ ।।
हाचि एक धर्म निज बीज वर्म । हेंचि जाळी कर्मे केलीं महा ।।तु.गा.२४९१.००२ ।।
चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जिवें कळवळा आवडीचा ।।तु.गा.२४९१.००३ ।।

अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ।।तु.गा.२४९१.००४।।
न पालटे एक । भक्त भोळाचि भाविक ।।तु.गा.२४९२.००१।।
येरां नाश आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ।।तु.गा.२४९२.००२।।
नेणें गर्भवास । एक विष्णूचाचि दास ।।तु.गा.२४९२.००३।।
तुका म्हणे खरें । नाम विठोबाचें बरे ।।तु.गा.२४९२.००४।।
काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ।।तु.गा.२४९३.००१।।
म्हणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ।।तु.गा.२४९३.००२।।
काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ।।तु.गा.२४९३.००३।।
कोण लोकीं सांग घातला बाहेरी । म्हणतां हरि हरि तुका म्हणे ।।तु.गा.२४९३.००४।।
अनेक दोषांचे काट । जे जे गादलें निघोंट । होती हरिनामें चोखट । क्षण एक न लगतां ।।तु.गा.२४९४.००१।।
तुम्ही हरि म्हणा हरि म्हणा । महादोषांचें छेदना ।।तु.गा.२४९४.००२।।
अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळीं रतला । क्षण न लागतां नेला । वैकुंठासी हरि म्हणतां ।।तु.गा.२४९४.००३।।
अमित दोषांचें मूळ । झालें वाल्मीकासी सबळ । झाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा ।।तु.गा.२४९४.००४।।
हरि म्हणतां तरले । महादोषी उद्धरिले । पहा गणिकेसी नेलें । वैकुंठासी हरि म्हणतां ।।तु.गा.२४९४.००५।।
हरिविण जन्म नको वायां । जैसी दर्पणींची छाया । म्हणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ।।तु.गा.२४९४.००६।।
न धरी प्रतिष्ठा कोणाचीही यम । म्हणतां कां रे राम लाजा झणी ।।तु.गा.२४९५.००१।।
सांपडे हातींचें सोडवील काळा । तो कां वेळोंवेळां नये वाचे ।।तु.गा.२४९५.००२।।
कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ।।तु.गा.२४९५.००३।।
तुका म्हणे हित तों हा म्हणा विठ्ठल । न म्हणे तो भोगील कळेल तें ।।तु.गा.२४९५.००४।।
झाडें वोरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ।।तु.गा.२४९६.००१।।
वल्कलें नेसुनि ढुंगा गुंडाळून । सांडी देहभान जवळूनीं ।।तु.गा.२४९६.००२।।
लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ।।तु.गा.२४९६.००३।।
सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावे अरण्य एकांतवास ।।तु.गा.२४९६.००४।।

ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ।।तु.गा.२४९६.००५ ।।
नेत्र झांकोनियां काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं प्रेमभाव ।।तु.गा.२४९७.००१ ।।
उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ।।तु.गा.२४९७.००२ ।।
मंत्रयंत्र कांहीं करिसी बुटबुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ।।तु.गा.२४९७.००३ ।।
सार तुका जपे बीजमंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण ।।तु.गा.२४९७.००४ ।।
काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरिनाथा कष्ट नाहीं ।।तु.गा.२४९८.००१ ।।
सर्वकाळ वाचे उच्चारितां हरि । तया सुखा सरी पार नाहीं ।।तु.गा.२४९८.००२ ।।
रामकृष्णरंगीं रसना रंगली । अमृतउकळी नाम तुझें ।।तु.गा.२४९८.००३ ।।
तुका म्हणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ।।तु.गा.२४९८.००४ ।।
विठोबाचे नाम ज्याचें मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती ।।तु.गा.२४९९.००१ ।।
विठ्ठलविठ्ठल भावें म्हणे वाचे । तरी तो काळाचे दांत ठेंची ।।तु.गा.२४९९.००२ ।।
बहुत तारिले सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ।।तु.गा.२४९९.००३ ।।
तुका म्हणे म्यां ही ऐकोनियां कीर्ति । धरिला एकांतीं हृदयामाजी ।।तु.गा.२४९९.००४ ।।
विचा केला ठोबा । म्हणोनि नांव तो विठोबा ।।तु.गा.२५००.००१ ।।
कां रे नेणां त्याचें नांव । काय वेदासि नाहीं ठावें ।।तु.गा.२५००.००२ ।।
शेष स्तुति प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग झाला ।।तु.गा.२५००.००३ ।।
तुका म्हणे सत्ता । ज्याची काळाचिये माथां ।।तु.गा.२५००.००४ ।।
नाम वाचें श्रवणीं कीर्ति । पाउलें चित्तीं समान ।।तु.गा.२५०१.००१ ।।
काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ।।तु.गा.२५०१.००२ ।।
कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ।।तु.गा.२५०१.००३ ।।
निळा म्हणे स्वरुपसिद्धी । नित्य समाधी हरिनामें ।।तु.गा.२५०१.००४ ।।
तरी कां पवाडे गर्जती पुराणें । असतां नारायण शक्तिहीन ।।तु.गा.२५०२.००१ ।।
कीर्तिविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीतना । तरीच म्हणतों आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखी गुणें ।।तु.गा.२५०२.००२ ।।

तुका म्हणे संत न मनिती त्यास । घेऊं पाहे ग्रास यमदूत ।।तु.गा.२५०६.००५ ।।
म्हणवितां हरी न म्हणे तयाला। दरवडा पडिला देहामाजी ।।तु.गा.२५०७.००१ ।।
आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं । भुलविला निश्चिती कामरंगें ।।तु.गा.२५०७.००२ ।।
नावडे ती कथा देउळासी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ।।तु.गा.२५०७.००३ ।।
कोण नेतो तया घटिका दिवसा एका । कां रे म्हणे तुका नागविसी ।।तु.गा.२५०७.००४ ।।
सांडुनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ।।तु.गा.२५०८.००१ ।।
कां रे न घ्यावें हे जन्म । काय वैकुंठा जाऊन ।।तु.गा.२५०८.००२ ।।
येथें मिळतो दहीं भात । नाहीं वैकुंठीं ते मात ।।तु.गा.२५०८.००३ ।।
तुका म्हणे मुक्ति नलगे । राहेन संतांचिये संगें।।तु.गा.२५०८.००४ ।।
मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ।।तु.गा.२५०९.००१ ।।
अशौच तो बाधी आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ।।तु.गा.२५०९.००२ ।।
रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ।।तु.गा.२५०९.००३ ।।
आणिकां भजना विधि बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ।।तु.गा.२५०९.००४ ।।
तुका म्हणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ।।तु.गा.२५०९.००५ ।।
वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरा ।।तु.गा.२५१०.००१ ।।
विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एकसरें भवसिंधु ।।तु.गा.२५१०.००२ ।।
जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ।।तु.गा.२५१०.००३ ।।
तुका म्हणे विधिनिषेध लोपला । उच्छेद या झाला मारगाचा ।।तु.गा.२५१०.००४ ।।
वाचे विठ्ठल नाहीं । तोचि प्रेतरूप पाहीं ।।तु.गा.२५११.००१ ।।
धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ।।तु.गा.२५११.००२ ।।
न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ।।तु.गा.२५११.००३ ।।
जातां कांटाळें देउळा । तोचि सुना मुखकाळा ।।तु.गा.२५११.००४ ।।
हरिभक्तीविण । जळो त्याचें शहाणपण ।।तु.गा.२५११.००५ ।।

तुका म्हणे तेणें । वंशा आणियलें उणें ।।तु.गा.२५११.००६।।
विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ।।तु.गा.२५१२.००१।।
तयासी बोलतां होईल विटाळ । नवजाय तो जळस्नान करितां ।।तु.गा.२५१२.००२।।
विठ्ठलनामाची नाहीं ज्या आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ।।तु.गा.२५१२.००३।।
तुका म्हणे मज विठोबाची आण । जरी प्रतिवचन करिन त्यासी ।।तु.गा.२५१२.००४।।
नव्हे गुरुदास्य संसारिया । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां । तैसें नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ।।तु.गा.२५१३.००१।।
म्हणोनि गोड सर्वभावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें । आर्तचाड जीवें । नलगे भ्यावें संसारा ।।तु.गा.२५१३.००२।।
कर्म तंव न पुरे संसारिक । धर्म तंव फळदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ।।तु.गा.२५१३.००३।।
न लगे सांडणें मांडणें । आगमनिगमाचें देखणें । अवघें तुका म्हणे । विठ्ठलनामें आटलें ।।तु.गा.२५१३.००४।।
कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ।।तु.गा.२५१४.००१।।
भलत्या काळीं नामावळीं । सुलभ भोळी भाविका ।।तु.गा.२५१४.००२।।
प्रायश्चितें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ।।तु.गा.२५१४.००३।।
तुका म्हणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ।।तु.गा.२५१४.००४।।
अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ।।तु.गा.२५१५.००१।।
सकळां जीवामाजि देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ।।तु.गा.२५१५.००२।।
ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ।।तु.गा.२५१५.००३।।
काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लागतां उन्मनीचा ।।तु.गा.२५१५.००४।।
तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ।।तु.गा.२५१५.००५।।
नाम म्हणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करितील कांहीं । बधिर व्हावें त्याचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ।।तु.गा.२५१६.००१।।
जयांचे राहिलें मानसीं । तेचि पावले तयासी । चाचपडतां मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ।।तु.गा.२५१६.००२।।
नवविधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद । जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ।।तु.गा.२५१६.००३।।
काय सांगों वेळोंवेळां । आठव नाहीं त्या चांडाळा । नामासाठीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ।।तु.गा.२५१६.००४।।
आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं । फोडोनियां पोटीं । वेद चारी काढिले ।।तु.गा.२५१६.००५।।

जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली । आणिकेंही उद्धरिली । पातकी महादोषी ।।तु.गा.२५१६.००६।।

जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखें हातीं विषाचे ।।तु.गा.२५१६.००७।।

काय सांगों ऐशी किर्ति । तुका म्हणे नामख्याती । नरकाप्रती जाती । निषेधिती तीं एकें ।।तु.गा.२५१६.००८।।

हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ।।तु.गा.२५१७.००१।।

ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ।।तु.गा.२५१७.००२।।

करितां आठव । धांवोनियां घाली कव ।।तु.गा.२५१७.००३।।

तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ।।तु.गा.२५१७.००४।।

नाम साराचेंही सार । शरणागत यमकिंकर ।।तु.गा.२५१८.००१।।

उत्तमा उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ।।तु.गा.२५१८.००२।।

नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हाकोळी ।।तु.गा.२५१८.००३।।

तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ।।तु.गा.२५१८.००४।।

नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तनें तोचि ठेला ।।तु.गा.२५१९.००१।।

आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ।।तु.गा.२५१९.००२।।

आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ।।तु.गा.२५१९.००३।।

तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं।।तु.गा.२५१९.००४।।

परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त झाला वाचा उच्चारितां ।।तु.गा.२५१९.००५।।

कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामाआधीं ।।तु.गा.२५१९.००६।।

सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं ।।तु.गा.२५१९.००७।।

पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारक महिमा ।।तु.गा.२५२०.००१।।

मागें जाळीं महा दोष । पुढें नाहीं गर्भवास ।।तु.गा.२५२०.००२।।

जें निंदिलें शास्त्रें । वंद्य झालें नाममात्रें ।।तु.गा.२५२०.००३।।

तुका म्हणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ।।तु.गा.२५२०.००४।।

तारिलीं बहुतें चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ।।तु.गा.२५२१.००१।।

नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाठीं ।।तु.गा.२५२१.००२।।

जन्म नाम धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा याचसाठीं ।।तु.गा.२५२१.००३।।

असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ।।तु.गा.२५२१.००४।।

तुका म्हणे देवभक्तपण सार । कवतुक वेव्हार तयासाठीं ।।तु.गा.२५२१.००५।।

गोड झालें पोट धालें । अवचिता वाचे आलें । म्हणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ।।तु.गा.२५२२.००१।।

सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ।।तु.गा.२५२२.००२।।

चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा । म्हणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ।।तु.गा.२५२२.००३।।

हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका म्हणे दावी । रूप तेंचि अरूप ।।तु.गा.२५२२.००४।।

तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ।।तु.गा.२५२३.००१।।

माझा बळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ।।तु.गा.२५२३.००२।।

शंख वधिला सागरीं । वेद घेउनि आला चारी ।।तु.गा.२५२३.००३।।

कूर्मे दैत्य वधिला जेठी । हात पाय लपवीं पोटीं ।।तु.गा.२५२३.००४।।

वराहरुप धरिलें गाढें। धरा प्रतापें धरिली दाढें।।तु.गा.२५२३.००५।।

हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रह्लाद रक्षिला ।।तु.गा.२५२३.००६।।

वामन झाला दिनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ।।तु.गा.२५२३.००७।।

छेदुनियां सहस्त्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ।।तु.गा.२५२३.००८।।

शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ।।तु.गा.२५२३.००९।।

मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ।।तु.गा.२५२३.०१०।।

पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण झाला हरी ।।तु.गा.२५२३.०११।।

गजेंद्र स्मरे राम राम । त्यासी पाववी वैकुंठधाम ।।तु.गा.२५२३.०१२।।

तुका म्हणे हरिरूप झाले । पुन्हा जन्मा नाहीं आले ।।तु.गा.२५२३.०१३।।

भक्तकरूणा बहुत तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें ।।तु.गा.२५२४.००१।।

पक्षीयासी तुझें नाम जें ठेविलें । तयें उद्धरिलें गणिकेसी ।।तु.गा.२५२४.००२।।

कुंटिणी ते दोष बहु आचरली । नाम घेतां आली करुणा तुज ।।तु.गा.२५२४.००३।।
हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसें बहुतां जना तारियलें ।।तु.गा.२५२४.००४।।
तुका म्हणे सीमा नाहीं तुझें दये । कोमळ हृदय पांडुरंगा ।।तु.गा.२५२४.००५।।
सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ।।तु.गा.२५२५.००१।।
सर्वांगीं तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ।।तु.गा.२५२५.००२।।
ऐशी उभविली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ।।तु.गा.२५२५.००३।।
तुका म्हणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरंवसा ।।तु.गा.२५२५.००४।।
धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी ।।तु.गा.२५२६.००१।।
धन्य झालें मुख निवाली रसना । नाम नारायणा घोष करी ।।तु.गा.२५२६.००२।।
धन्य हे मस्तक सर्वांगा शोभलें । संतांचीं पाउलें लागताती ।।तु.गा.२५२६.००३।।
धन्य आजि पंथें चालती पाउलें । टाळिया शोभले कर दोन्ही ।।तु.गा.२५२६.००४।।
धन्य तुका म्हणे आम्हांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ।।तु.गा.२५२६.००५।।
काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें ।।तु.गा.२५२७.००१।।
तृणीं हुताशन लागतां ते रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें ।।तु.गा.२५२७.००२।।
विष्णुमूर्तिपाद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ।।तु.गा.२५२७.००३।।
तुका म्हणे नाम जाळीं महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ।।तु.गा.२५२७.००४।।
फोडिलीं भांडारें । माप घेऊनियां खरें ।।तु.गा.२५२८.००१।।
केली हरिनामाची वरो । मागील तें आतां सरो ।।तु.गा.२५२८.००२।।
देशात सुकाळ । झाला हारपला काळ ।।तु.गा.२५२८.००३।।
घ्यावें धणीवरी । तुका म्हणे लहान थोरीं ।।तु.गा.२५२८.००४।।
लागलें भरतें । ब्रह्मानंदाही वरतें ।।तु.गा.२५२९.००१।।
झाला हरिनामाचा तारा । शीड लागलें फरारा ।।तु.गा.२५२९.००२।।
बैसोनि सकळ । बाळ चालिले गोपाळ ।।तु.गा.२५२९.००३।।

तुका म्हणे वाट । बरवी सांपडली नीट ।।तु.गा.२५२९.००४।।
सत्य साचें खरें । नाम विठोबाचें बरें ।।तु.गा.२५३०.००१।।
येणें तुटती बंधनें । उभयलोकीं कीर्ति जेणें ।।तु.गा.२५३०.००२।।
भाव ज्याचे गांठीं । त्यासी लाभ उठाउठी ।।तु.गा.२५३०.००३।।
तुका म्हणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ।।तु.गा.२५३०.००४।।
तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ।।तु.गा.२५३१.००१।।
ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ।।तु.गा.२५३१.००२।।
वसों न शके पाप । जाय त्रिविध तो ताप ।।तु.गा.२५३१.००३।।
तुका म्हणे माया । होय दासी लागे पायां ।।तु.गा.२५३१.००४।।
नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळ ही ।।तु.गा.२५३२.००१।।
रसना येरां रसां विटें । घेतां घोटें अधिक हें ।।तु.गा.२५३२.००२।।
आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी संसारें ।।तु.गा.२५३२.००३।।
तुका म्हणे आहार जाला । हा विठ्ठल आम्हासी ।।तु.गा.२५३२.००४।।
निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ।।तु.गा.२५३३.००१।।
उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ।।तु.गा.२५३३.००२।।
मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें।।तु.गा.२५३३.००३।।
तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ।।तु.गा.२५३३.००४।।
करील तें काय नव्हे विश्वंभर । सेवकां दरिद्र लाज नाहीं ।।तु.गा.२५३४.००१।।
मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ।।तु.गा.२५३४.००२।।
नामाच्या चिंतनें नाशी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ।।तु.गा.२५३४.००३।।
तुका म्हणे नेणों किती वायां गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ।।तु.गा.२५३४.००४।।
ज्याचे गर्जता पवाडे। कळिकाळ पायां पडे ।।तु.गा.२५३५.००१।।
तो हा पंढरीचा राणा । पुसा सहा चौं अठरां जणां ।।तु.गा.२५३५.००२।।

चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति कामारी दासी ।।तु.गा.२५३५.००३ ।।
वैकुंठासी जावें । तुका म्हणे ज्याच्या नांवें ।।तु.गा.२५३५.००४ ।।
नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ।।तु.गा.२५३६.००१ ।।
गोड हें गोमटें अमृतासी वाड । केला कईवाड माझ्या चित्तें ।।तु.गा.२५३६.००२ ।।
प्रेमरसें झाली पुष्ट अंगकांति । त्रिविध नासती ताप क्षणें ।।तु.गा.२५३६.००३ ।।
तुका म्हणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ।।तु.गा.२५३६.००४ ।।
मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ।।तु.गा.२५३७.००१ ।।
वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा वस्तूसी ।।तु.गा.२५३७.००२ ।।
भस्म दंड नलगे काठी । तीर्थां आटी भ्रमण ।।तु.गा.२५३७.००३ ।।
तुका म्हणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ।।तु.गा.२५३७.००४ ।।
विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्या साठीं वाचा ।।तु.गा.२५३८.००१ ।।
कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ।।तु.गा.२५३८.००२ ।।
न पाहे शिदोरी । जाती कुळ न विचारी ।।तु.गा.२५३८.००३ ।।
तुका म्हणे भेटी । हाक देतां उठाउठी ।।तु.गा.२५३८.००४ ।।
हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ।।तु.गा.२५३९.००१ ।।
त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ।।तु.गा.२५३९.००२ ।।
नसो भाव चित्तीं । हरिचें गुण गातां गीतीं ।।तु.गा.२५३९.००३ ।।
करी अनाचार । वाचे हरिनामउच्चार ।।तु.गा.२५३९.००४ ।।
हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ।।तु.गा.२५३९.००५ ।।
म्हणवी हरिचा दास । तुका म्हणे धन्य त्यास ।।तु.गा.२५३९.००६ ।।
भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आतां नारायण ।।तु.गा.२५४०.००१ ।।
येणें एक केलें अवघें होय सांग । अच्युताचा योग नाम छंदें ।।तु.गा.२५४०.००२ ।।
भोवरें खळाळ चोर वाटा घेती । पावलें मारिती सिंवेपाशीं ।।तु.गा.२५४०.००३ ।।

तुका म्हणे येथें भावेंविण पार । न पविजें सार हेंचि आहे ।।तु.गा.२५४०.००४।।
जेथें आठवती स्वामीचें ते पाय । उत्तम ते ठाय रम्य स्थळ ।।तु.गा.२५४१.००१।।
रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त ते ते घडी ।।तु.गा.२५४१.००२।।
धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ।।तु.गा.२५४१.००३।।
तुका म्हणे लाभकाळ तेंचि जिणे । भाग्य नारायण उत्तम ते ।।तु.गा.२५४१.००४।।
कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजी असे सार मोल तया ।।तु.गा.२५४२.००१।।
आणिकही तैसी चंदनाचीं झाडें। परिमळें वाढे मोल तयां ।।तु.गा.२५४२.००२।।
काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ।।तु.गा.२५४२.००३।।
फिरंगी आटितां नये बारा रूकें । गुणें मोलें विके सहस्रवरी ।।तु.गा.२५४२.००४।।
तुका म्हणे नाहीं जातीसवें काम । ज्याचें मुखीं नाम तोचि धन्य ।।तु.गा.२५४२.००५।।
कंठीं नामशिक्का । आतां  कळिकाळासी धक्का ।।तु.गा.२५४३.००१।।
रोखा माना कीं शिक्का माना । रोखा शिक्का तत्समाना ।।तु.गा.२५४३.००२।।
रोखा न मना शिक्का न मना । जतन करा नाक काना ।।तु.गा.२५४३.००३।।
शिक्का न मनी रावण  । त्याचें केलें निसंतान  ।।तु.गा.२५४३.००४।।
शिक्का मानी हळाहळ । झालें सर्वांग शीतळ।।तु.गा.२५४३.००५।।
तुका म्हणे नाम शिक्का । पटीं बैसविलों निजसुखा ।।तु.गा.२५४३.००६।।
न करा टांचणी । येथें कांहीं आडचणी ।।तु.गा.२५४४.००१।।
जिव्हा अमुप करी माप । विठ्ठल पिकला माझा बाप ।।तु.गा.२५४४.००२।।
आठही प्रहर । बारा मास निरंतर ।।तु.गा.२५४४.००३।।
तुका म्हणे वाणी । वर्जेना हे घेतां धणी ।।तु.गा.२५४४.००४।।
भोळे भक्त भाव धरिती मानसीं । त्यांसी हृषीकेशी जवळीच ।।तु.गा.२५४५.००१।।
भाव नाहीं मनीं अभाविक सदा । त्याचिया खेदा काय सांगो ।।तु.गा.२५४५.००२।।
गणिकेसारिखीं नामें उद्धरिलीं । सज्ञानें पडिलीं खटाटोपीं ।।तु.गा.२५४५.००३।।

तुका म्हणे काय शुद्ध माझी याती । थोर केली ख्याती हरिनामें ।।तु.गा.२५४५.००४ ।।
आविसाचिये आशा गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावें ।।तु.गा.२५४६.००१ ।।
मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ।।तु.गा.२५४६.००२ ।।
अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका म्हणे सुखा पार नाहीं ।।तु.गा.२५४६.००३ ।।
पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ।।तु.गा.२५४७.००१ ।।
येर वेठ्या पोट भरी । चाम मसकाचे परी ।।तु.गा.२५४७.००२ ।।
जेऊनियां तोचि धाला । हरिचिंतनीं केला काला ।।तु.गा.२५४७.००३ ।।
तुका म्हणे चवी आलें । जें कां मिश्रित विठ्ठलें ।।तु.गा.२५४७.००४ ।।
लय लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ।।तु.गा.२५४८.००१ ।।
हें तों असाध्य जी सर्वत्र या जना । भलें नारायणा आळवितां ।।तु.गा.२५४८.००२ ।।
कामनेचा त्याग वैराग्य या नांव । कुटुंब ते सर्व विषयजात ।।तु.गा.२५४८.००३ ।।
कर्म उसंतावें चालतां पाउलीं । होय जो राहिली देहबुद्धि ।।तु.गा.२५४८.००४ ।।
भक्ती ते नमावें जीवजंतुभूत । शांतवूनि ऊत कामक्रोध ।।तु.गा.२५४८.००५ ।।
तुका म्हणे साध्य साधन अवघड । देतां हें सांकडें देह बळी ।।तु.गा.२५४८.००६ ।।
देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ति । तया इच्छा गति । हेंचि सुख आगळें ।।तु.गा.२५४९.००१ ।।
या या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धि द्वारीं । कर जोडुनि तिष्ठती ।।तु.गा.२५४९.००२ ।।
नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नास । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ।।तु.गा.२५४९.००३ ।।
तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळें मेघश्यामा । तुका म्हणे आम्हां । जन्म गोड यासाठीं ।।तु.गा.२५४९.००४ ।।
पुढें गेले त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आम्ही ।।तु.गा.२५५०.००१ ।।
वंदुं चरणरज सेऊं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करूनियां ।।तु.गा.२५५०.००२ ।।
अमुप हें गांठीं बांधूं भांडवल । अनाथ विठ्ठल आम्हां जोगा ।।तु.गा.२५५०.००३ ।।
अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ।।तु.गा.२५५०.००४ ।।
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ।।तु.गा.२५५०.००५ ।।

तुका म्हणे घालूं जिवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ।।तु.गा.२५५०.००६।।
नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरीं संदेह कांहीं मनीं ।।तु.गा.२५५१.००१।।
ऐसें मी हें नाहीं बोलत नेणता । आणोनि संमता संतांचिया ।।तु.गा.२५५१.००२।।
नाम म्हणे तया आणीक साधन । ऐसें हें वचन बोलों नये ।।तु.गा.२५५१.००३।।
तुका म्हणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दोन्ही मायबापें ।।तु.गा.२५५१.००४।।
आलें फळ तेव्हां राहिलों पिकोन । जरि तें जतन होय देठीं ।।तु.गा.२५५२.००१।।
नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ।।तु.गा.२५५२.००२।।
चालिला पंथ तो पाववील ठाया । जरि आड तया नये कांहीं ।।तु.गा.२५५२.००३।।
तुका म्हणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि लाभ ।।तु.गा.२५५२.००४।।
प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरि ।।तु.गा.२५५३.००१।।
प्रेमें यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ।।तु.गा.२५५३.००२।।
प्रेम पाठी लागें बळें । भक्त देखोनियां भोळे ।।तु.गा.२५५३.००३।।
प्रेम नवजे दवडितां । शिरे बळें जेथें कथा ।।तु.गा.२५५३.००४।।
तुका म्हणे थोर आशा । प्रेमा घरीं विष्णुदासां ।।तु.गा.२५५३.००५।।
अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ।।तु.गा.२५५४.००१।।
आपुलालें तुम्ही करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य राम राम ।।तु.गा.२५५४.००२।।
देखोनि जीवन जरि जाय ताहान । तरि कां सांठवण घरोघरीं ।।तु.गा.२५५४.००३।।
देखोनियां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तयातळीं ।।तु.गा.२५५४.००४।।
हित तरी होय गातां आइकतां । जरि राहे चित्ता दृढभाव ।।तु.गा.२५५४.००५।।
तुका म्हणे होसी भावेंचि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची ।।तु.गा.२५५४.००६।।
हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ।।तु.गा.२५५५.००१।।
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ।।तु.गा.२५५५.००२।।
हेंचि माझें कर्म हाचि माझा धर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ।।तु.गा.२५५५.००३।।

हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि तपध्यान नाम तुझें ।।तु.गा.२५५५.००४।।
हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ।।तु.गा.२५५५.००५।।
हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ।।तु.गा.२५५५.००६।।
तुका म्हणे दुजें सांगायासी नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ।।तु.गा.२५५५.००७।।
विठ्ठल कीर्तनाचे अंतीं । जय जय हरी जे म्हणती ।।तु.गा.२५५६.००१।।
तेंचि सुकृताचें फळ । वाचा रामनामें निखळ ।।तु.गा.२५५६.००२।।
बैसोनि हरिकथेसी । होय सावध चित्तासी ।।तु.गा.२५५६.००३।।
तुका म्हणे त्याचा जन्म । सुफळ झाला भवश्रम ।।तु.गा.२५५६.००४।।
प्राणिया एक बीजमंत्र उच्चारी । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हण कां मुरारी ।।तु.गा.२५५७.००१।।
हेंचि साधन रे तुज सर्व सिद्धिचें । नाम उच्चारी हे गोपाळाचें वाचे ।।तु.गा.२५५७.००२।।
उपास पारणें न लगे वनसेवन । नलगे धुम्रपान पंचाग्नितापणें ।।तु.गा.२५५७.००३।।
सुखाचें फुकाचें कांहीं न वेचें भांडार । कोटियज्ञांपरिस तुका म्हणे हें सार ।।तु.गा.२५५७.००४।।
नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ।।तु.गा.२५५८.००१।।
जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ।।तु.गा.२५५८.००२।।
वचनाचा न करीं गोवा । रिघें देवा शरण ।।तु.गा.२५५८.००३।।
तुका म्हणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ।।तु.गा.२५५८.००४।।
करा करा लागपाठ । धरा पंढरीची वाट । जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ।।तु.गा.२५५९.००१।।
दुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतूनि । करा म्हणऊनि । हा विचार ठायींचा ।।तु.गा.२५५९.००२।।
होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमान काळीं। हातें वाहे टाळी । जंव मोकळीं आहेती ।।तु.गा.२५५९.००३।।
कां रे घेतलासी सोस । तुज वाटताहे कैसें । तुका म्हणे ऐसें । पुढें कैं लाहासी ।।तु.गा.२५५९.००४।।
जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ।।तु.गा.२५६०.००१।।
सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ।।तु.गा.२५६०.००२।।
खांद्या पताकांचें भार । तुळसीमाळा आणि अबीर ।।तु.गा.२५६०.००३।।

साधुसंताच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ।।तु.गा.२५६०.००४।।
जा रे तुम्ही पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ।।तु.गा.२५६१.००१।।
गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखे ।।तु.गा.२५६१.००२।।
उभारोनि उभा कर । भवपार उतराया ।।तु.गा.२५६१.००३।।
तुका म्हणे तांतड मोठी । झाली भेटी उदंड ।।तु.गा.२५६१.००४।।
पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ।।तु.गा.२५६२.००१।।
वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तांतडी उतावीळ ।।तु.गा.२५६२.००२।।
मागील परिहार पुढें नाहीं शीण । झालिया दर्शन एकवेळ ।।तु.गा.२५६२.००३।।
तुका म्हणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ।।तु.गा.२५६२.००४।।
होय होय वारकरी । पाहें पाहें रे पंढरी।।तु.गा.२५६३.००१।।
काय करावीं साधनें । फळ अवघेंचि येणें ।।तु.गा.२५६३.००२।।
अभिमान नुरे । कोड अवघेचि पुरे ।।तु.गा.२५६३.००३।।
तुका म्हणे डोळां। विठो बैसला सांवळा ।।तु.गा.२५६३.००४।।
पुण्य उभें राहों आतां । संतांचें या कारणें ।।तु.गा.२५६४.००१।।
पंढरीचें लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ।।तु.गा.२५६४.००२।।
संकल्प हे यावें फळा । कळवळा बहुतांचा ।।तु.गा.२५६४.००३।।
तुका म्हणे होऊनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ।।तु.गा.२५६४.००४।।
बहुतां जन्मा अंतीं जन्मलासी नरा । देव तो सोइरा करीं आतां ।।तु.गा.२५६५.००१।।
करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं आतां ।।तु.गा.२५६५.००२।।
सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ।।तु.गा.२५६५.००३।।
पंढरीसी जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पहावें विटेवरी ।।तु.गा.२५६५.००४।।
विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका नाचें छंदें नामघोषें ।।तु.गा.२५६५.००५।।
नव्हे आराणूक परि मनीं वाहे । होईल त्या साहे पांडुरंग ।।तु.गा.२५६६.००१।।

पंढरीसि जावें उद्वेग मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ।।तु.गा.२५६६.००२।।
नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाकों नको ।।तु.गा.२५६६.००३।।
तुका म्हणे देह पडो या चिंतनें । पुढें लागें येणें याजसाठीं ।।तु.गा.२५६६.००४।।
जाती पंढरीस । म्हणे जाईन तयांस ।।तु.गा.२५६७.००१।।
तया आहे संवसार । ऐसें बोले तो महार ।।तु.गा.२५६७.००२।।
असो नसो भाव । जो हा देखे पंढरिराव ।।तु.गा.२५६७.००३।।
चंद्रभागे न्हाती । तुका म्हणे भलते याती ।।तु.गा.२५६७.००४।।
चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ।।तु.गा.२५६८.००१।।
डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ।।तु.गा.२५६८.००२।।
संतां महंता होतील भेटीं । आनंदें नाचों वाळवंटी ।।तु.गा.२५६८.००३।।
तें तिर्थांचें माहेर । सर्व सुखाचें भांडार ।।तु.गा.२५६८.००४।।
जन्म नाहीं रे आणीक । तुका म्हणे माझी भाक ।।तु.गा.२५६८.००५।।
आमुची मिरासी पंढरी । आमुचें घर भीमातिरीं ।।तु.गा.२५६९.००१।।
पांडुरंग आमुचा पिता । रखुमाई आमुची माता ।।तु.गा.२५६९.००२।।
भाऊ पुंडलिक मुनि । चंद्रभागा आमुची बहिणी ।।तु.गा.२५६९.००३।।
तुका जुनाट मिराशी । ठाव दिला पायांपाशीं ।।तु.गा.२५६९.००४।।
आतां जावें पंढरींसी । दंडवत विठोबासी ।।तु.गा.२५७०.००१।।
चंद्रभागेचिया तिरीं । आम्ही नाचों पंढरपुरीं ।।तु.गा.२५७०.००२।।
जेथें संतांची दाटणी । त्यांचें घेऊं पायवणी ।।तु.गा.२५७०.००३।।
तुका म्हणे आम्ही बळी । जीव दिला पायां तळीं ।।तु.गा.२५७०.००४।।
पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ।।तु.गा.२५७१.००१।।
व्रत एकादशी करीन उपवाशी । गाईन अहर्निशीं मुखीं नाम ।।तु.गा.२५७१.००२।।
नाम विठोबाचें घेईन मी वाचें । बीज कल्पांतींचें तुका म्हणे ।।तु.गा.२५७१.००३।।

पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दिन सोनियाचा ।।तु.गा.२५७२.००१।।
पावलों पंढरी आनंदगजरें । वाजतील तुरें शंखभेरी ।।तु.गा.२५७२.००२।।
पावलों पंढरी क्षेम आलिंगनीं । संत या सज्जनीं निवविलों ।।तु.गा.२५७२.००३।।
पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ।।तु.गा.२५७२.००४।।
पावलों पंढरी येरझार खुंटली । माउली वोळली प्रेमपान्हा ।।तु.गा.२५७२.००५।।
पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संवसार तुका म्हणे ।।तु.गा.२५७२.००६।।
आम्ही ज्याचे दास । त्याचा पंढरीये वास ।।तु.गा.२५७३.००१।।
तो हा देवाचाही देव । काय कळिकाळाचा भेव ।।तु.गा.२५७३.००२।।
वेद जया गाती । श्रुति म्हणती नेतिनेति ।।तु.गा.२५७३.००३।।
तुका म्हणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ।।तु.गा.२५७३.००४।।
आम्हां सुकाळ सुखाचा । जवळी हाट पंढरीचा । सादाविती वाचा । रामनामें वैष्णव ।।तु.गा.२५७४.००१।।
घ्यारे आपुलाल्या परी । नका ठेऊं कांहीं उरी । ओसरतां भरी । तोंडवरी अंबर ।।तु.गा.२५७४.००२।।
वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उभेचि विकिलें एका । सनकादिकां सांपडलें ।।तु.गा.२५७४.००३।।
धन्य धन्य हे भूमंडळीं । प्रगटली नामावळीं । घेती जीं दुबळीं । तीं आगळीं सदैव ।।तु.गा.२५७४.००४।।
माप आपुलेनि हातें । कोणी नाहीं निवारितें । पैस करूनि चित्तें । घ्यावें हितें आपुलिया ।।तु.गा.२५७४.००५।।
नाहीं वांटितां सरलें । आहें तैसेंचि भरलें । तुका म्हणे गेलें । वायांविण न घेतां ।।तु.गा.२५७४.००६।।
सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । माझ्या पांडुरंगासारिखें तें ।।तु.गा.२५७५.००१।।
नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ।।तु.गा.२५७५.००२।।
चंद्रभागे स्नान विध तो हरिकथा । समाधान चित्ता सर्वकाळ ।।तु.गा.२५७५.००३।।
तुका म्हणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष हा लाभ संतसंगें ।।तु.गा.२५७५.००४।।
पंढरिये माझें माहेर साजणी । ओविया कांडणी गाऊं गीतीं।।तु.गा.२५७६.००१।।
राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता माहियेर ।।तु.गा.२५७६.००२।।
उद्धव अक्रुर व्यास आंबऋषि । भाई नारदासी गौरवीन ।।तु.गा.२५७६.००३।।

गरूड बंधु लडिवाळ पुंडलिक । यांचे कवतुक वाटे मज ।।तु.गा.२५७६.००४।।
मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ।।तु.गा.२५७६.००५।।
निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ।।तु.गा.२५७६.००६।।
नागो जगमित्रा नरहरि सोनारा । रोहिदास कबिरा सोईरिया ।।तु.गा.२५७६.००७।।
परिसा भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळिकांसी ।।तु.गा.२५७६.००८।।
चोखामेळा संत जिवाचे सोईरे । न पडे विसर यांचा घडी ।।तु.गा.२५७६.००९।।
जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाठक हा कान्हा मिराबाई ।।तु.गा.२५७६.०१०।।
आणीकही संत महानुभाव मुनि । सकळा चरणीं जीव माझा ।।तु.गा.२५७६.०११।।
आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ।।तु.गा.२५७६.०१२।।
तुका म्हणे माझा बळिया बापमाय । हर्षे नांदे सये घराचारी ।।तु.गा.२५७६.०१३।।
कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ।।तु.गा.२५७७.००१।।
तांतडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ।।तु.गा.२५७७.००२।।
नांवासाठीं नेघें भार । नलगे फार वित्पत्ति ।।तु.गा.२५७७.००३।।
तुका म्हणे नलगे जावें । कोठें देवें सुचेना ।।तु.गा.२५७७.००४।।
सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ।।तु.गा.२५७८.००१।।
नको पृथकाचे भरी । पडों एक मूळ धरीं ।।तु.गा.२५७८.००२।।
पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटावें तें थोर ।।तु.गा.२५७८.००३।।
वश झाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ।।तु.गा.२५७८.००४।।
एक आतुडें चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ।।तु.गा.२५७८.००५।।
तुका म्हणे धांवा । आहे पंढरी विसावा ।।तु.गा.२५७८.००६।।
सुख पंढरिये आलें । पुंडलिकें सांठविलें ।।तु.गा.२५७९.००१।।
घ्या रे घ्या रे माझे बाप । जिव्हा घेउनि खरें माप । करा एक खेप । मग नलगे हिंडणें ।।तु.गा.२५७९.००२।।
विषय गुंडोनी पसारा । धांव घाला पंढरपुरा ।।तु.गा.२५७९.००३।।

तेंचि घ्यावें तेंचि द्यावें । कैवल्याच्या राशी भावें ।।तु.गा.२५८४.००३।।
कांहीं कोणा नेणे । विठोवांचुनि तुका म्हणे ।।तु.गा.२५८४.००४।।
न सरे लुटितां मागें बहुतां जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ।।तु.गा.२५८५.००१।।
सिद्ध महामुनि साधक संपन्न । तीहीं हें जतन केलें होतें ।।तु.गा.२५८५.००२।।
पायाळाच्या गुणें पडिलें ठाऊकें । जगा पुंडलिकें दाखविलें ।।तु.गा.२५८५.००३।।
तुका म्हणे तेथें होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहु ।।तु.गा.२५८५.००४।।
जया दोषां परिहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपूर देखिलिया ।।तु.गा.२५८६.००१।।
धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मतीर्थी विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनाद ।।तु.गा.२५८६.००२।।
सकळ तीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ।।तु.गा.२५८६.००३।।
नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठायां। धन्य भाग्य जयां । जे पंढरपुर देखती ।।तु.गा.२५८६.००४।।
उपजोनी संसारीं । एक वेळ पाहें पां पंढरी । महादोषां कैंची उरी । देवभक्त देखिलिया ।।तु.गा.२५८६.००५।।
ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी । सुदर्शन घरटी करी । रीघ न पुरे कळिकाळा ।।तु.गा.२५८६.००६।।
तें सुख वर्णावया गति । एवढी कैंची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ।।तु.गा.२५८६.००७।।
तुका म्हणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । तो अधम जन्मांतरिंचा । जया पंढरी नावडे ।।तु.गा.२५८६.००८।।
आवडे पंढरी भीमा पांडुरंग । चंद्रभागा लिंग पुंडलीक ।।तु.गा.२५८७.००१।।
कामधेनु कल्पतरू चिंतामणी । आवडीची धणी पुरविती ।।तु.गा.२५८७.००२।।
तुका म्हणे जीवा थोर झालें सुख । नाठवे हे भूक तहान कांहीं ।।तु.गा.२५८७.००३।।
पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचें।।तु.गा.२५८८.००१।।
पुंडलिका दिला वर । करूणाकरें विठ्ठलें ।।तु.गा.२५८८.००२।।
मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लावूनि ।।तु.गा.२५८८.००३।।
तुका म्हणे खरे जालें । एका बोलें संतांच्या ।।तु.गा.२५८८.००४।।
आलें भरा केणें । येरझार चुके जेणें ।।तु.गा.२५८९.००१।।
उभे केलें विटेवरी । पेठ इनाम पंढरी ।।तु.गा.२५८९.००२।।

वाहाती मारग । अवघें मोहोरलें जग ।।तु.गा.२५८९.००३।।
तुका म्हणे माप । खरें आणा माझे बाप ।।तु.गा.२५८९.००४।।
उठाउठी अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ।।तु.गा.२५९०.००१।।
तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ।।तु.गा.२५९०.००२।।
नेत्रीं अश्रूंचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ।।तु.गा.२५९०.००३।।
तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ।।तु.गा.२५९०.००४।।
अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ।।तु.गा.२५९१.००१।।
गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ।।तु.गा.२५९१.००२।।
अवघी सुखाचीच राशी । पुंडलिकाशी वोळली ।।तु.गा.२५९१.००३।।
तुका म्हणे जवळीं आलें । उभें ठेलें समचरणीं ।।तु.गा.२५९१.००४।।
अवघींच तीर्थें घडलीं एक वेळां । चंद्रभागा डोळां देखिलिया ।।तु.गा.२५९२.००१।।
अवघींच पापें गेलीं दिगंतरीं । वैकुंठ पंढरी देखिलिया ।।तु.गा.२५९२.००२।।
अवघिया संतां एक वेळां भेटी । पुंडलिक दृष्टि देखिलिया ।।तु.गा.२५९२.००३।।
तुका म्हणे जन्मा आल्याचें सार्थक । विठ्ठलचि एक देखिलिया ।।तु.गा.२५९२.००४।।
उदार चक्रवर्ती । वैकुंठीचा भूपति । पुंडलिकाचिया प्रीती । विटे उभा राहिला ।।तु.गा.२५९३.००१।।
सर्वसिद्धींचा दातार । सवें आणिला परिवार । भक्ता अभयकर । घ्या घ्या ऐसें म्हणतसे ।।तु.गा.२५९३.००२।।
जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षी देवां संस्थापिलें । एकवीस स्वर्गांतें धरिलें । सत्तामात्रें आपुलिया।।तु.गा.२५९३.००३।।
तुका म्हणे कृपावंत । इच्छिलें पुरवी मनोरथ । रिद्धिसिद्धि मोक्ष देत । शेखीं संग आपुला ।।तु.गा.२५९३.००४।।
भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां। कोण्या काळें सुखा । ऐशा कोण पावत ।।तु.गा.२५९४.००१।।
नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ।।तु.गा.२५९४.००२।।
अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ।।तु.गा.२५९४.००३।।
तुका म्हणे धन्य झालें । भूमी वैकुंठ आणिलें ।।तु.गा.२५९४.००४।।
धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरिये ।।तु.गा.२५९५.००१।।

न करीं आळस आलिया संसारीं । पाहें पां पंढरी भूवैकुंठ ।।तु.गा.२५९५.००२।।
न पविजे केल्या तपांचिया राशी । तें जनलोकांसी दाखविलें ।।तु.गा.२५९५.००३।।
सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ।।तु.गा.२५९५.००४।।
विष्णुपद गया रामनाम काशी । अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ।।तु.गा.२५९५.००५।।
तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ हा नास अहंकाराचा ।।तु.गा.२५९५.००६।।
कां रे प्रेमें मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ।।तु.गा.२५९६.००१।।
ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ।।तु.गा.२५९६.००२।।
युगें झालीं अठ्ठावीस । अजुनी न म्हणसी बैस ।।तु.गा.२५९६.००३।।
भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ।।तु.गा.२५९६.००४।।
तुका म्हणे पुंडलिका । तूंचि भक्त बळिया निका ।।तु.गा.२५९६.००५।।
पुंडलीक भक्तराज । तेणें साधियलें काज । वैकुंठीचें निज । परब्रह्म आणिलें ।।तु.गा.२५९७.००१।।
पांडुरंग बाळमूर्ति । गाईगोपाळ सांगाती । येऊनियां प्रीति । उभें समचि राहिलें ।।तु.गा.२५९७.००२।।
एका आगळें अक्षरें । भूवैकुंठचि दुसरें । म्हणविती येरें । परी तीं ऐसीं नव्हेती ।।तु.गा.२५९७.००३।।
पाप पंचक्रोशीमधीं । येऊं न शकेचि कधीं । कैंची तेथें विधि –। निषेधाची वसति ।।तु.गा.२५९७.००४।।
पुराणें बोलती ऐसें । चतुर्भुज ती माणसें । सुदर्शनावरी वसे । न बुडे हे कल्पांतीं ।।तु.गा.२५९७.००५।।
अनुपम्य इची थोरी । महाक्षेत्र महीवरी । धन्य धन्य वारकरी । तुका म्हणे येथींचे ।।तु.गा.२५९७.००६।।
वैकुंठा जावया तपाचें सायास । लागे जीवा नाश करणें बहु ।।तु.गा.२५९८.००१।।
तया पुंडलिकें केला उपकार । फेडावया भार पृथ्वीचा ।।तु.गा.२५९८.००२।।
तुका म्हणे केली सोपी पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ।।तु.गा.२५९८.००३।।
वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ।।तु.गा.२५९९.००१।।
धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ।।तु.गा.२५९९.००२।।
पितृसेवापुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ।।तु.गा.२५९९.००३।।
अंगसंगें रंग क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ।।तु.गा.२५९९.००४।।

धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याती । तुका म्हणे मुक्ति पायीं लोळे ।।तु.गा.२५९९.००५।।
पंढरीचें भूत मोठें । आल्या गेल्या झडपी वाटे ।।तु.गा.२६००.००१।।
बहु खेचरीचें रान । जातां वेडें होय मन ।।तु.गा.२६००.००२।।
तेथें जाऊं नका कोणी । गेले नाहीं आले परतोनि ।।तु.गा.२६००.००३।।
तुका पंढरीसी गेला । पुन्हां जन्मा नाहीं आला ।।तु.गा.२६००.००४।।
मैंद आला पंढरीस । हातीं घेऊनि प्रेमपाश ।।तु.गा.२६०१.००१।।
पुढें नाडियलें जग । नेतो लागों नेदीं माग ।।तु.गा.२६०१.००२।।
उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधिताहे ।।तु.गा.२६०१.००३।।
वैकुंठाहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ।।तु.गा.२६०१.००४।।
पुंडलिकें थारा । देउनि आणिलें या चोरा ।।तु.गा.२६०१.००५।।
तुका म्हणे चला । तुम्ही आम्ही धरूं त्याला ।।तु.गा.२६०१.००६।।
पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ।।तु.गा.२६०२.००१।।
ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभीं भेटे ।।तु.गा.२६०२.००२।।
आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ।।तु.गा.२६०२.००३।।
तुका म्हणे पेठ । भूमिवरी हें वैकुंठ ।।तु.गा.२६०२.००४।।
पंढरी पंढरी । म्हणतां पापाची बोहरी ।।तु.गा.२६०३.००१।।
धन्य धन्य जगीं ठाव । होतों नामाचा उत्साव।।तु.गा.२६०३.००२।।
रिद्धिसिद्धि लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ।।तु.गा.२६०३.००३।।
अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ म्हणे तुका ।।तु.गा.२६०३.००४।।
पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ।।तु.गा.२६०४.००१।।
अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ।।तु.गा.२६०४.००२।।
न लगे धन मान । देह भावें उदासीन ।।तु.गा.२६०४.००३।।
तुका म्हणे मळ । नाशी तात्काळ तें स्थळ ।।तु.गा.२६०४.००४।।

पंढरीस दु:ख न मिळे ओखदा । प्रेमसुख सदा सर्वकाळ ।।तु.गा.२६०५.००१।।
पुंडलिकें हाट भरियेली पेठ । अवघें वैकुंठ आणियेलें ।।तु.गा.२६०५.००२।।
उदिमासी तुटी नाहीं कोणा हानी । घेऊनियां धणी लाभ घेती ।।तु.गा.२६०५.००३।।
पुरलें देशासी भरलें शीगेसी । अवघीं पंचक्रोशी दुमदुमीत ।।तु.गा.२६०५.००४।।
तुका म्हणे संतां लागलीसे धणी । बैसले राहोनि पंढरीस ।।तु.गा.२६०५.००५।।
पंढरीचा वास धन्य तेचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देह ।।तु.गा.२६०६.००१।।
मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरी दयारूप ।।तु.गा.२६०६.००२।।
शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ।।तु.गा.२६०६.००३।।
तुका म्हणे नाहीं वर्णअभिमान । अवघेंचि जीवन्मुक्त लोक ।।तु.गा.२६०६.००४।।
धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ।।तु.गा.२६०७.००१।।
धन्य तोही लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ।।तु.गा.२६०७.००२।।
धन्य तेही भूमी धन्य तरुवर । धन्य तें सरोवर तीर्थरूप ।।तु.गा.२६०७.००३।।
धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भुवन गर्जतसे ।।तु.गा.२६०७.००४।।
धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे ।।तु.गा.२६०७.००५।।
तुका म्हणे धन्य संसारा तीं आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ।।तु.गा.२६०७.००६।।
धन्य तोचि ग्राम जेथें हरिचे दास । धन्य तोचि वंश भक्तिभाग्यें ।।तु.गा.२६०८.००१।।
ब्रह्मज्ञान तेथें असे घरोघरीं । धन्य नरनारी चतुर्भुज ।।तु.गा.२६०८.००२।।
नाहीं पापा रिघ काळाचें खंडण । हरिनामकीर्तन घरोघरीं ।।तु.गा.२६०८.००३।।
तुका म्हणे तिहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित पैं ।।तु.गा.२६०८.००४।।
धन्य धन्य ज्यांस पंढरीचा वास । धन्य तें जन्मास प्राणी आले ।।तु.गा.२६०९.००१।।
चहूं खाणींमध्यें होत कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ।।तु.गा.२६०९.००२।।
उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघेचि सकळ चतुर्भुज ।।तु.गा.२६०९.००३।।
अवघा विठ्ठल तेथें दुजें नाहीं । भरला अंतर्बाहीं सदोदीत ।।तु.गा.२६०९.००४।।

तुका म्हणे तेथें होउनि राहेन । सांडोवा पाषाण पंढरीचा ।।तु.गा.२६०९.००५।।
सुरवर येती तीर्थें नित्यकाळ । पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ।।तु.गा.२६१०.००१।।
साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भुत वर्णवेना ।।तु.गा.२६१०.००२।।
पंचक्रोशीमाजी रीघ नाहीं दोषा । जळती आपैसा अघोर ते।।तु.गा.२६१०.००३।।
निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ।।तु.गा.२६१०.००४।।
तुका म्हणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जारे पंढरीस घेईं कोटी ।।तु.गा.२६१०.००५।।
वाराणसी गया पाहिली द्वारका । परि नये तुका पंढरीच्या ।।तु.गा.२६११.००१।।
पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पाया पडे जन एकमेकां ।।तु.गा.२६११.००२।।
तुका म्हणे जाय एक वेळ पंढरी । तयाचियें घरीं यम नये ।।तु.गा.२६११.००३।।
जंववरी नाहीं देखिलीं पंढरी । वर्णिसील थोरी वैकुंठींची ।।तु.गा.२६१२.००१।।
मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनी कामारी दीनरूप ।।तु.गा.२६१२.००२।।
वृंदावन सडे चौक रंगमाळा । अभिनव सोहोळा घरोघरीं ।।तु.गा.२६१२.००३।।
नामघोष कथापुराणकीर्तनीं । ओविया कांडणीं पांडुरंगा ।।तु.गा.२६१२.००४।।
सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ।।तु.गा.२६१२.००५।।
तुका म्हणे जें न साधे सायासें । प्रत्यक्ष तें दिसे विटेवरी ।।तु.गा.२६१२.००६।।
तीर्थें केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पंढरी ।।तु.गा.२६१३.००१।।
जळो त्याचें ज्यालेंपण । न देखेचि समचरण ।।तु.गा.२६१३.००२।।
योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ।।तु.गा.२६१३.००३।।
तुका म्हणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडलीं पाहीं ।।तु.गा.२६१३.००४।।
जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न मनी तो ।।तु.गा.२६१४.००१।।
सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ।।तु.गा.२६१४.००२।।
जन्मांतरिंच्या पुण्यरासी । वारी त्यासी पंढरीची ।।तु.गा.२६१४.००३।।
बाहेर येतां प्राण फुटे । रडें दाटे गहिंवरें ।।तु.गा.२६१४.००४।।

दधिमंगळ भोजन सारा । म्हणती करा मुरडींव ।।तु.गा.२६१४.००५।।
मागुता हा पावो ठाव । पंढरीराव दर्शनें ।।तु.गा.२६१४.००६।।
तुका म्हणे भूवैकुंठ । वाळुवंट भीवरा ।।तु.गा.२६१४.००७।।
आणीक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगासारिखें ।।तु.गा.२६१५.००१।।
दैवत ये भूमंडळीं । उद्धार कलीं पाववितें ।।तु.गा.२६१५.००२।।
कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठायीं स्थळासी ।।तु.गा.२६१५.००३।।
अन्यत्रीचें तीर्थी नासे । तीर्थी वसे वज्रलेप ।।तु.गा.२६१५.००४।।
पांडुरंगींचें पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ।।तु.गा.२६१५.००५।।
ऐसें हरे गिरिजेप्रति । गुह्य स्थिती सांगितली ।।तु.गा.२६१५.००६।।
तुका म्हणे म्हणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ।।तु.गा.२६१५.००७।।
करोत तपादि साधनें । कोणी साधोत गोरांजनें ।।तु.गा.२६१६.००१।।
आम्ही न वजों तया वाटा । नाचूं पंढरीचोहटां।।तु.गा.२६१६.००२।।
पावोत आत्मस्थिति । कोण म्हणोत उत्तम मुक्ति ।।तु.गा.२६१६.००३।।
तुका म्हणे छंद । आम्हा हरिच्या दासां निंद्य ।।तु.गा.२६१६.००४।।
कासया करावे तपाचे डोंगर । आणिक अपार दुःखराशी ।।तु.गा.२६१७.००१।।
कासया फिरावे अनेक ते देश । दावितील आस पुढें लाभ ।।तु.गा.२६१७.००२।।
कासया पुजावीं अनेक दैवतें । पोटभरे तेथें लाभ नाहीं ।।तु.गा.२६१७.००३।।
कासया करावे मुक्तीचे सायास । मिळें पंढरीस फुकासाठीं ।।तु.गा.२६१७.००४।।
तुका म्हणे करीं कीर्तनपसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ।।तु.गा.२६१७.००५।।
मानी भक्तांचें उपकार । ऋणीया म्हणवी निरंतर । केला निर्गुणीं आकार । कीर्ती मुखें वर्णितां ।।तु.गा.२६१८.००१।।
म्हणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा । झाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ।।तु.गा.२६१८.००२।।
अंबऋषीकारणें । जन्म घेतलें नारायणें । एवढें भक्तीचें लाहाणें । दास्य करी दासाचें ।।तु.गा.२६१८.००३।।
म्हणियें करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं । भक्तिचा आभारी । रीघ न पुरे जावया ।।तु.गा.२६१८.००४।।

अर्जुनाचे रथवारु । ते वागवी सर्वेश्वरू । एवढे भक्तीचें उपकारु । मागें मागें हिंडतसे ।।तु.गा.२६१८.००५।।
पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलें विटेवरी । न वजे कट करीं । धरूनि तेथें राहिला ।।तु.गा.२६१८.००६।।
भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ । म्हणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि ।।तु.गा.२६१८.००७।।
पंढरीसी जावें ऐसें माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ।।तु.गा.२६१९.००१।।
नलगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्निचिया ।।तु.गा.२६१९.००२।।
तुका म्हणे त्याचे पाहिलिया पाय । मग दु:ख जाय सर्व माझें ।।तु.गा.२६१९.००३।।
पंढरीस जाते निरोप आईका । वैकुंठनायका क्षेम सांगा ।।तु.गा.२६२०.००१।।
अनाथांचा नाथ हें तुझें वचन । धांवें नको दीन गांजों देऊं ।।तु.गा.२६२०.००२।।
ग्रासिलों भुजंगें सर्पें महाकाळें। न दिसे हें जाळें उगवतां ।।तु.गा.२६२०.००३।।
कामक्रोधसुनीं श्वापदें बहुतीं । वेढलों आवर्तीं मायेचिये ।।तु.गा.२६२०.००४।।
मृगजळनदी बुडवी ना तारी । आणूनियां वरी तळा नेते ।।तु.गा.२६२०.००५।।
तुका म्हणे तुवां धरिलें उदास । तरी पाहों वास कवणाची ।।तु.गा.२६२०.००६।।
संपदा सोहळा नावडे मनाला । करीतें टकळा पंढरीचा ।।तु.गा.२६२१.००१।।
जावें पंढरीसी आवडी मनासी । कधीं एकादशीं आषाढी हे ।।तु.गा.२६२१.००२।।
तुका म्हणे ऐसें आर्त ज्याचें मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ।।तु.गा.२६२१.००३।।
साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचें ।।तु.गा.२६२२.००१।।
शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ।।तु.गा.२६२२.००२।।
वैष्णवांचा संग रामनाम गाणें । मंडित भूषणें अळंकार ।।तु.गा.२६२२.००३।।
भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली जावें पायीं ।।तु.गा.२६२२.००४।।
मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवुनियां कटीं कर उभीं ।।तु.गा.२६२२.००५।।
तुका म्हणे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ।।तु.गा.२६२२.००६।।
सुखें घेऊं जन्मांतरें । एक बरें इहलोकीं ।।तु.गा.२६२३.००१।।
पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडीं हे ।।तु.गा.२६२३.००२।।

हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरूनि ।।तु.गा.२६२३.००३।।

तुका म्हणे केला त्याग । सर्वसंग म्हणऊनि ।।तु.गा.२६२३.००४।।

संतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ।।तु.गा.२६२४.००१।।

तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड। पुरवितो कोड पांडुरंग ।।तु.गा.२६२४.००२।।

सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचे वाहे बरें तेंची मनीं ।।तु.गा.२६२४.००३।।

तुका म्हणे इच्छावशें खेळे खेळ । चिंता ते सकळ कांहीं नेणें ।।तु.गा.२६२४.००४।।

सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ।।तु.गा.२६२५.००१।।

डोळियांची धणी पाहतां न पुरे। तयालागीं झुरे मन माझें ।।तु.गा.२६२५.००२।।

प्राण रिघों पाहे कुडीये सांडुनि । श्रीमुख नयनीं न देखतां ।।तु.गा.२६२५.००३।।

चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका म्हणे येणें गरुडध्वजें ।।तु.गा.२६२५.००४।।

इनामाची भरली पेंठ । वाहाती दाट मारग ।।तु.गा.२६२६.००१।।

अवघेचि येती वाण । अवघे शकुन लाभाचे ।।तु.गा.२६२६.००२।।

अडचणी केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ।।तु.गा.२६२६.००३।।

तुका म्हणे जोडी झाली । ते आपुली आपणा ।।तु.गा.२६२६.००४।।

पृथक मी सांगों किती । धर्मनीती सकळां ।।तु.गा.२६२७.००१।।

अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ।।तु.गा.२६२७.००२।।

क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये।।तु.गा.२६२७.००३।।

तुका म्हणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ।।तु.गा.२६२७.००४।।

द्वारकेचे केणें आलें याचि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ।।तु.गा.२६२८.००१।।

गोविलें विसारें माप केलें खरें। न पाहे माघारें अद्यापवरी ।।तु.गा.२६२८.००२।।

वैष्णव मापारी नाहीं जाली सळे । पुढेंहि न कळे पार त्याचा ।।तु.गा.२६२८.००३।।

लाभ झाला त्यांनीं धरिला तो विचार । आहिक्य परत्र सांठविलें ।।तु.गा.२६२८.००४।।

तुका म्हणे मज मिळाली मजुरी । विश्वास या घरीं संतांचिया ।।तु.गा.२६२८.००५।।

दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कष्टलासी साठीं । भक्तिकाजें विठ्ठला ।।तु.गा.२६२९.००१।।
भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा । आम्हालागीं सोपा । दैत्या काळ कृतांत ।।तु.गा.२६२९.००२।।
होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं । म्हणोनियां घरीं । गौळियाचे अवतार ।।तु.गा.२६२९.००३।।
केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा । तुका म्हणे भावा– । साठीं हातीं सांपडसी ।।तु.गा.२६२९.००४।।
दुःखाचिये साटीं तेथें मिळें सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ।।तु.गा.२६३०.००१।।
उदाराचा राणा पंढरीस आहे। उभारोनि बाहे पालवितो ।।तु.गा.२६३०.००२।।
जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आलिंगी आवडी करूनियां ।।तु.गा.२६३०.००३।।
शीण घेऊनियां प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभ कांहीं ।।तु.गा.२६३०.००४।।
तुका म्हणे असों अनाथ दुबळीं । आम्हांसी तो पाळी पांडुरंग ।।तु.गा.२६३०.००५।।
धरियेली सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ।।तु.गा.२६३१.००१।।
तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागेतिरीं ।।तु.गा.२६३१.००२।।
अंतर्व्यापी बाहीं । धांडोळितां कोठें नाहीं ।।तु.गा.२६३१.००३।।
योगयागतपें । ज्याकारणें दानजपें ।।तु.गा.२६३१.००४।।
दिलें नेदीजती । भोग सकळ ज्या होती ।।तु.गा.२६३१.००५।।
अवघी लीला पाहे । तुका म्हणे दासां साहे ।।तु.गा.२६३१.००६।।
जो भक्तांचा विसांवा । उभा पाचारितो धांवा ।।तु.गा.२६३२.००१।।
हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें । भवसिंधू सुखें । उतरी कासे लावूनि ।।तु.गा.२६३२.००२।।
थोर भक्ताची आस । पाहे भोंवताली वास ।।तु.गा.२६३२.००३।।
तुका म्हणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ।।तु.गा.२६३२.००४।।
तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तया घरीं ।।तु.गा.२६३३.००१।।
पंढरी चोहोटां घातला दुकान । मांडियेलें वाण आवडीचे ।।तु.गा.२६३३.००२।।
आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ।।तु.गा.२६३३.००३।।
मुक्ति तेथें कोणी हातीं नेघें फुका । लुटतील सुखा प्रेमाचिया ।।तु.गा.२६३३.००४।।

तुका म्हणे संतसज्जन भाग्याचे । अनंता जन्मींचे सांटेकरी ॥तु.गा.२६३३.००५॥
तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरीये॥तु.गा.२६३४.००१॥
तें आम्ही देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांची ॥तु.गा.२६३४.००२॥
जीवांचें जीवन सुखाचें शेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥तु.गा.२६३४.००३॥
जगाचा जनिता कृपेचा सागर । दीनां लोभपर दुष्टां काळ ॥तु.गा.२६३४.००४॥
सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तोचि असे ॥तु.गा.२६३४.००५॥
तुका म्हणे नाहीं श्रुती आतुडलें । आम्हां सांपडलें गीतीं गातां ॥तु.गा.२६३४.००६॥
नागर गोडें बाळरूप । तें स्वरूप काळीचें ॥तु.गा.२६३५.००१॥
गाइगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलीका ॥तु.गा.२६३५.००२॥
तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर मिरवती ॥तु.गा.२६३५.००३॥
नेणपणें उगेंचि उभें । भक्तिलोभें राहिलें ॥तु.गा.२६३५.००४॥
नेणें वरदळाचा मान । विटे चरण सम उभें ॥तु.गा.२६३५.००५॥
सहज कटावरी हात । दहीं भात शिदोरी ॥तु.गा.२६३५.००६॥
मोहरी पांवा गांजिवा पाठीं । धरिली काठी ज्याकाळें ॥तु.गा.२६३५.००७॥
रम्य स्थळ चंद्रभागा । पांडुरंगा क्रीडेसी ॥तु.गा.२६३५.००८॥
भीमा दक्षिणमुख वाहे । दृष्टी पाहे समोर ॥तु.गा.२६३५.००९॥
तारावेसे मूढ लोक । दिली भाक पांडुरंगा ॥तु.गा.२६३५.०१०॥
तुका म्हणे वैकुंठवासी । भक्तांपाशीं राहिला ॥तु.गा.२६३५.०११॥
आइत्या भाग्या धणी व्हावें । केणें घ्यावें न सरे तें ॥तु.गा.२६३६.००१॥
केणें आहे पंढरपुरीं । उधारीचें लाभिक॥तु.गा.२६३६.००२॥
बाखराची करूनि रितीं । भरा पोतीं सकळ ॥तु.गा.२६३६.००३॥
तुका म्हणे संतांपाडें । करा पुढें वाखती ॥तु.गा.२६३६.००४॥
आणिकाची सेवा करावी शरीरें । तीं येथें उत्तरें कोरडींच ॥तु.गा.२६३७.००१॥

ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेघें येरझारा याचकाच्या ।।तु.गा.२६३७.००२।।
आणिकांचें देणें काळीं पोट भरे । येथील न सरे कल्पांतींही ।।तु.गा.२६३७.००३।।
आणिकांचें भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचनही ।।तु.गा.२६३७.००४।।
आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें सोस हेवा नाहीं दोन्हीं।।तु.गा.२६३७.००५।।
तुका म्हणे करी आपणासारिखें । उद्धुरी पारिखें उंच नीच ।।तु.गा.२६३७.००६।।
आपुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ।।तु.गा.२६३८.००१।।
नाम धरिलें दिनानाथ । सत्य करावया व्रत ।।तु.गा.२६३८.००२।।
घातआघात निवारी । छाया पीतांबरें करी ।।तु.गा.२६३८.००३।।
उभा कर कटीं। तुका म्हणे याजसाठीं ।।तु.गा.२६३८.००४।।
आम्हीं आळीकरें। प्रेमसुखाचीं लेंकरें ।।तु.गा.२६३९.००१।।
पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ।।तु.गा.२६३९.००२।।
येतां पाहें मुळा । वास पंढरीच्या डोळां ।।तु.गा.२६३९.००३।।
तुका म्हणे स्थळ । मग मी पाहेन सकळ ।।तु.गा.२६३९.००४।।
इंद्रियांचें पुरे कोड। तेंचि गोड पुढतीही ।।तु.गा.२६४०.००१।।
जावें म्हणती पंढरपुरा । हाचि बरा संसार।।तु.गा.२६४०.००२।।
बैसलें तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें।।तु.गा.२६४०.००३।।
तुका म्हणे देती कान । वाणावाण निवडुनी ।।तु.गा.२६४०.००४।।
केली प्रतिज्ञा मनाशीं । तईं मी दान सत्यत्वेशीं । नेईन पायापाशीं । स्वामी मूळ पंढरिये ।।तु.गा.२६४१.००१।।
तोंवरीं हें भरीं पोट । केला तो मिथ्या बोभाट। नाहीं सांपडली वाट । सइराट फिरतसें ।।तु.गा.२६४१.००२।।
ज्यावें आदराचें जिणें । स्वामी कृपा करी तेणें । पाळिल्या वचनें । सख्यत्वाचा अनुभव ।।तु.गा.२६४१.००३।।
घडे तैसें घडो आतां । मायबापाची सत्ता । तुका म्हणे चिंता । काय पाहें मारगा ।।तु.गा.२६४१.००४।।
झाली हरिकथा रंग वोसरला । उचितासी आला पांडुरंग ।।तु.गा.२६४२.००१।।
वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेईं रे तूं आतां धणीवरि ।।तु.गा.२६४२.००२।।

प्रेम देऊनियां अवघीं सुखी केलीं । जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ।।तु.गा.२६४२.००३।।
तुकें हें दुर्बळ देखियलें संतीं । म्हणउनि पुढती आणियेलें ।।तु.गा.२६४२.००४।।
पांडुरंगा सारिखा सांडुनि वेव्हारा । आणिकांची करा आस वायां ।।तु.गा.२६४३.००१।।
बहुतां दिधला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ।।तु.गा.२६४३.००२।।
याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणीक वेव्हार चालतीना ।।तु.गा.२६४३.००३।।
तुका म्हणे माझे हातींचें वजन । यासी बोल कोण ठेवूं शके ।।तु.गा.२६४३.००४।।
पुंडलिकाचे निकटसेवे। कैसा धांवे बराडी ।।तु.गा.२६४४.००१।।
आपुलें तें थोरपण । नारायण विसरला ।।तु.गा.२६४४.००२।।
उभा कटीं ठेवुनि कर । न म्हणे पर बैससें ।।तु.गा.२६४४.००३।।
तुका म्हणे जगदीशा । करणें आशा भक्तांची।।तु.गा.२६४४.००४।।
माझा बाप दिनानाथ । वाट भक्तांची पहात ।।तु.गा.२६४५.००१।।
कर ठेवूनियां कटीं । उभा चंद्रभागेतटीं ।।तु.गा.२६४५.००२।।
गळां वैजयन्तीमाळा । रूप डोळस सांवळा।।तु.गा.२६४५.००३।।
तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ।।तु.गा.२६४५.००४।।
ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं स्मरावा ।।तु.गा.२६४६.००१।।
सम पाय कर कटीं । उभा तटीं भींवरेच्या ।।तु.गा.२६४६.००२।।
पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनि ।।तु.गा.२६४६.००३।।
तुका म्हणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ।।तु.गा.२६४६.००४।।
भक्तवत्सल दिनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ।।तु.गा.२६४७.००१।।
तो हा पुंडलिकासाठीं । आला उभा वाळवंटीं ।।तु.गा.२६४७.००२।।
गर्भवास धरी । अंबऋषीचा कैवारी ।।तु.गा.२६४७.००३।।
सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्रासी कारण ।।तु.गा.२६४७.००४।।
तुका म्हणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी ।।तु.गा.२६४७.००५।।

लाघवी सूत्रधारी । दोरी नाचवी कुसरी । उपजवी पाळूनि संहारी । नानापरीचें लाघव ।।तु.गा.२६४८.००१ ।।
पुरोनि पंढरिये उरलें । भक्तिसुखें लांचावलें । उभें नीटचि राहिलें । कर कटीं न बैसे ।।तु.गा.२६४८.००२ ।।
बहु काळें ना सांवळें। बहु कठिण ना कोंवळें। गुणत्रया वेगळें । बहुबळें आथीलें ।।तु.गा.२६४८.००३ ।।
असोनि नसे सकळामधीं । मना अगोचर बुद्धि । स्वामी माझा कृपानिधि । तुका म्हणे श्रीविठ्ठल ।।तु.गा.२६४८.००४ ।।
लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ।।तु.गा.२६४९.००१ ।।
जाय अवघिया देशा । येथें संचलासी तैसा ।।तु.गा.२६४९.००२ ।।
मग नलगे पारखी । अवघीं सकट सारखीं ।।तु.गा.२६४९.००३ ।।
तुका म्हणे वोळे । रुपें भूलविले डोळे ।।तु.गा.२६४९.००४ ।।
वाचेचिया आळा कवळिलें ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ।।तु.गा.२६५०.००१ ।।
सुलभ तें झालें सुलभ तें झालें । जवळीच आलें पंढरिये ।।तु.गा.२६५०.००२ ।।
नामरूपाचे बांधलें मोटळें । एक एका वेळे सारियेलें ।।तु.गा.२६५०.००३ ।।
तुका म्हणे वाटे चुकली वसती । उधार तो हातीं आणियेला ।।तु.गा.२६५०.००४ ।।
साधावया भक्तिकाज । नाहीं लाज धरीत ।।तु.गा.२६५१.००१ ।।
ऐसियासी शरण जावें । शक्तीजीवें न वंची ।।तु.गा.२६५१.००२ ।।
भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षीलें ।।तु.गा.२६५१.००३ ।।
तुका म्हणे साक्ष हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ।।तु.गा.२६५१.००४ ।।
पंढरीस घडे अतित्यायें मृत्य । तो जाय पतित अध:पाता ।।तु.गा.२६५२.००१ ।।
दुराचाऱ्या मोक्षसुखाची वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ।।तु.गा.२६५२.००२ ।।
कालियापें भेद मानितां निवडे । श्रोत्रियांसी जोडे अंत्यजता ।।तु.गा.२६५२.००३ ।।
माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी । कालिमा काजळी पावविते ।।तु.गा.२६५२.००४ ।।
केला न सहावे तीर्थ उपवास । कथेविण दोषसाधन तें ।।तु.गा.२६५२.००५ ।।
तुका म्हणे तेथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान समपाय ।।तु.गा.२६५२.००६ ।।
कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहुं डोळां । आलें वैकुंठ जवळां । सन्निध पंढरिये ।।तु.गा.२६५३.००१ ।।

पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । अवघीं मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ।।तु.गा.२६५३.००२।।
चालती स्थिर स्थिर । गरुडटकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ।।तु.गा.२६५३.००३।।
मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुल्लती । शूर उठावती । एक एक आगळें।।तु.गा.२६५३.००४।।
नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ।।तु.गा.२६५३.००५।।
आस करिती ब्रह्मादिक। देखोनी वाळवंटीचें सुख । धन्य धन्य मृत्युलोक । म्हणती भाग्याचा कैसा ।।तु.गा.२६५३.००६।।
मरण मुक्ति वाराणसी । पित्रऋण गया नासी । उधार नाहीं पंढरीसी । पायापाशीं विठोबाच्या ।।तु.गा.२६५३.००७।।
तुका म्हणे आतां। काय करणें आम्हां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ।।तु.गा.२६५३.००८।।
उदंड पाहिलें उदंड ऐकिलें । उदंड वर्णिले क्षेत्रमहिमे ।।तु.गा.२६५४.००१।।
ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें।।तु.गा.२६५४.००२।।
ऐसे संतजन ऐसे हरिदास । ऐसा नामघोष सांगा कोठें ।।तु.गा.२६५४.००३।।
तुका म्हणे आम्हां अनाथा कारणें । पंढरी निर्माण केली देवें ।।तु.गा.२६५४.००४।।
जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करी ।।तु.गा.२६५५.००१।।
उत्तमचि गति तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ।।तु.गा.२६५५.००२।।
परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ।।तु.गा.२६५५.००३।।
भूतदया गाई पशूंचें पाळण । तान्हेल्या जीवन वनामाजीं ।।तु.गा.२६५५.००४।।
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचें ।।तु.गा.२६५५.००५।।
तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ।।तु.गा.२६५५.००६।।
पराविया नारी माउली समान । मानिलिया धन काय वेंचे ।।तु.गा.२६५६.००१।।
न करितां परनिंदा परद्रव्य अभिलास । काय तुमचें यास वेंचे सांगा ।।तु.गा.२६५६.००२।।
बैसलिये ठायीं म्हणतां रामराम । काय होय श्रम ऐसें सांगा ।।तु.गा.२६५६.००३।।
संतांचें वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेंचे सांगा ।।तु.गा.२६५६.००४।।
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेंचे यास ऐसें सांगा ।।तु.गा.२६५६.००५।।
तुका म्हणे देव जोडे याचसाठीं । आणीक ते आटी न लगे कांहीं ।।तु.गा.२६५६.००६।।

आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ।।तु.गा.२६५७.००१ ।।
देह हें काळाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ।।तु.गा.२६५७.००२ ।।
देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ।।तु.गा.२६५७.००३ ।।
निमित्याचा धनी केला असे प्राणी । तुका म्हणे म्हणोनि व्यर्थ गेला ।।तु.गा.२६५७.००४ ।।
सांगतों तुम्हांसी भजा रे विठ्ठला । नाहीं तरि गेला जन्म वायां ।।तु.गा.२६५८.००१ ।।
करिता भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरीं वाहावसी ।।तु.गा.२६५८.००२ ।।
कांहीं नलगे एक भावची कारण । तुका म्हणे आण विठ्ठलाची ।।तु.गा.२६५८.००३ ।।
आतां जागा रे भाई जागा रे । चोर निजल्या नाडूनी भागा रे ।।तु.गा.२६५९.००१ ।।
कैसें असोनि ठाऊकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणा ।।तु.गा.२६५९.००२ ।।
आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ।।तु.गा.२६५९.००३ ।।
तुका म्हणे एकाच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भय ।।तु.गा.२६५९.००४ ।।
अरे गिळिले हो संसारें । कांहीं तरि राखा खरें । दिला करूणाकरें । मनुष्यदेह सत्संग ।।तु.गा.२६६०.००१ ।।
येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड । उठाउठीं गोड । बीजें बीज वाढवी ।।तु.गा.२६६०.००२ ।।
केलें तें क्रियमाण । झालें तें संचित म्हण । प्रारब्ध जाण । उर उरित उरलें तें ।।तु.गा.२६६०.००३ ।।
चित्त खोटें चालीवरि । रोग भोगाचे अंतरीं । रसना अनावरी । तुका म्हणे ढुंग वाहे ।।तु.गा.२६६०.००४ ।।
मोलाचें आयुष्य वेचुनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ।।तु.गा.२६६१.००१ ।।
अनंत जन्माचा शेवट पाहतां । नरदेह हातां आला तुझ्या ।।तु.गा.२६६१.००२ ।।
कराल ते जोडी येईल कार्यासी । घ्यावें विठ्ठलासी सुखालागीं ।।तु.गा.२६६१.००३ ।।
सांचलिया धन होईल ठेवणें । तैसी नारायण जोडी करा ।।तु.गा.२६६१.००४ ।।
करा हरिभक्ति परलोकीं ये कामा । सोडविल यमा पासोनियां ।।तु.गा.२६६१.००५ ।।
तुका म्हणे करा आयुष्याचें मोल । नका वेंचूं बोल नामेंविण ।।तु.गा.२६६१.००६ ।।
लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी । उत्तम जोडी जोडिली ।।तु.गा.२६६२.००१ ।।
घेईं हरिनाम सादरें । भरा सुखाची भांडारें । झालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ।।तु.गा.२६६२.००२ ।।

घेउनि माप हातीं । काळ मोवी दिवस राती । चोर लाग घेती । पुढें तैसें पळावें ।।तु.गा.२६६२.००३।।

हित सावकासें । म्हणे करीन तें पिसें । हातीं काय ऐसें । तुका म्हणे नेणसी ।।तु.गा.२६६२.००४।।

बहुत सोसिलें मागें न कळतां । पुढती काय आतां अंध व्हावें ।।तु.गा.२६६३.००१।।

एकाचें अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्नाभिन्न चांचपडों ।।तु.गा.२६६३.००२।।

कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देईल हाके ।।तु.गा.२६६३.००३।।

तुका म्हणे दिली चेतवूनि सुनीं । कौतुकावांचुनि नाहीं छळ ।।तु.गा.२६६३.००४।।

आतां उघडी डोळें । जरी अद्यापि न कळे । तरी मातेचिया खोळे । दगड आला पोटासी ।।तु.गा.२६६४.००१।।

मनुष्यदेह ऐसा निध । साधील ते साधे सिद्ध । करूनि प्रबोध । संत पार उतरले ।।तु.गा.२६६४.००२।।

नांव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलिकाचे द्वारीं । कट धरूनियां करीं । उभाउभीं पालवी ।।तु.गा.२६६४.००३।।

तुका म्हणे फुकासाठीं । पायीं घातलिया मिठी । होतो उठाउठी । लवकरीच उतार ।।तु.गा.२६६४.००४।।

येउनि नरदेहा झांकितील डोळे । बळेंचि अंधळे होती लोक ।।तु.गा.२६६५.००१।।

उजाडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनियां ।।तु.गा.२६६५.००२।।

बहु फेरे आले सोसोनि वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ।।तु.गा.२६६५.००३।।

तुका म्हणे जाऊं सादावीत वाटे । भेटे तरी भेटे कोणी तरी ।।तु.गा.२६६५.००४।।

विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ।।तु.गा.२६६६.००१।।

मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ।।तु.गा.२६६६.००२।।

असिपत्र तरूवर खैराचे इंगळ । निघतील ज्वाळ तैलपाकीं ।।तु.गा.२६६६.००३।।

तप्तभूमीवरी चालविती पायीं । अग्निस्तंभ बाहीं कवटाळविती ।।तु.गा.२६६६.००४।।

म्हणऊनि तुका येतो काकुलती । पुरे यातायाती गर्भवास ।।तु.गा.२६६६.००५।।

देह मृत्याचें भातुकें । कळों आले कवतुकें ।।तु.गा.२६६७.००१।।

काय मानियेलें सार । हेंचि वाटतें आश्चर्य ।।तु.गा.२६६७.००२।।

नानाभोगांचीं संचितें । करूनि ठेविलें आइतें ।।तु.गा.२६६७.००३।।

तुका म्हणे कोडीं । उगवूं न शकती बापुडीं ।।तु.गा.२६६७.००४।।

कां रे तुम्ही निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरुप वैकुंठासी जाना ।।तु.गा.२६६८.००१।।
काय गणिकेचा याती अधिकार मोठा । पापी अजामेळ ऐसा नेला वैकुंठा ।।तु.गा.२६६८.००२।।
ऐसे मागें नेणों किती अनंत अपार । पंचमहादोषी त्यांच्या पातकां नाहीं पार ।।तु.गा.२६६८.००३।।
पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य ।।तु.गा.२६६८.००४।।
कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी । होईल यमपुरीं । यमदंड यातना ।।तु.गा.२६६९.००१।।
कोण झाली लगबग । काय करिसि तेथें मग ।।तु.गा.२६६९.००२।।
कां रे भरला ताठा । करिती वोज नेता वाटा ।।तु.गा.२६६९.००३।।
तोंडा पडली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ।।तु.गा.२६६९.००४।।
कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ।।तु.गा.२६६९.००५।।
लाज धरीं म्हणे तुका । नको वायां जाऊं फुका ।।तु.गा.२६६९.००६।।
कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ।।तु.गा.२६७०.००१।।
बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सवें दोन्हीं ।।तु.गा.२६७०.००२।।
फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ।।तु.गा.२६७०.००३।।
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ।।तु.गा.२६७०.००४।।
तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ।।तु.गा.२६७०.००५।।
देवाचें भजन कां रे न करीसी तैसें । अखंड हव्यासें पीडतोसी ।।तु.गा.२६७१.००१।।
देवासी शरण कां रे नवजासी तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागी ।।तु.गा.२६७१.००२।।
देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ।।तु.गा.२६७१.००३।।
कां रे नाहीं तैसी देवाची ते गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ।।तु.गा.२६७१.००४।।
कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजन ।।तु.गा.२६७१.००५।।
कां रे भय वाहासी लोकांचा तो धाक । विसरूनियां एक नारायण ।।तु.गा.२६७१.००६।।
तुका म्हणे कां रे घातलेंसे वायां । अवघें आयुष्य जाया भक्तिवीण ।।तु.गा.२६७१.००७।।
बहुतां जन्माअंतीं । जोडी लागली हे हातीं ।।तु.गा.२६७२.००१।।

मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरी पांडुरंगीं भाव ।।तु.गा.२६७२.००२।।

बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ।।तु.गा.२६७२.००३।।

तुका म्हणे जाणे । ऐसे दुर्लभ ते शाहाणे ।।तु.गा.२६७२.००४।।

भवसागर तरतां । कां रे करीतसा चिंता । पैल उभा दाता । कटीं कर ठेवूनियां ।।तु.गा.२६७३.००१।।

त्याचें पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी । भावा एकासाठीं । खांदा वाहे आपुल्या ।।तु.गा.२६७३.००२।।

सुखें करावा संसार । न संडावें दोन्ही वार । दया क्षमा घर । चोजवीत येतील ।।तु.गा.२६७३.००३।।

भुक्तिमुक्तीची चिंता । दैन्य नाहीं दरिद्रता । तुका म्हणे दाता । पांडुरंग वोळगिल्या ।।तु.गा.२६७३.००४।।

कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिंती त्वां थोर मानियेली ।।तु.गा.२६७४.००१।।

कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ।।तु.गा.२६७४.००२।।

तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घांसील भूमीसी वदन यम ।।तु.गा.२६७४.००३।।

कां रे नागविसी आयुष्य खातो काळ । दिवसें दिवस बळ क्षीण होतें ।।तु.गा.२६७४.००४।।

तुका म्हणे यासी सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप ।।तु.गा.२६७४.००५।।

हरिच्या जागरणा । जातां कां रे न ये मना ।।तु.गा.२६७५.००१।।

कोठें पाहासील तुटी । आयुष्य वेंचे फुकासाठीं ।।तु.गा.२६७५.००२।।

ज्यांची तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ।।तु.गा.२६७५.००३।।

तुका म्हणे बरा । लाभ काय तो विचारा ।।तु.गा.२६७५.००४।।

दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसीं ।।तु.गा.२६७६.००१।।

कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ।।तु.गा.२६७६.००२।।

भोगें कळों येती मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ।।तु.गा.२६७६.००३।।

तुका म्हणे येथें झांकितील डोळे। भोग देते वेळे येईल कळों ।।तु.गा.२६७६.००४।।

बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता हा नाहीं मनुष्यदेह ।।तु.गा.२६७७.००१।।

आपुल्या हिताचे न होती सायास । गृहदारा आस धनवित्त ।।तु.गा.२६७७.००२।।

अवचित निधान लागलें हें हातीं । भोगावी विपत्ति गर्भवास ।।तु.गा.२६७७.००३।।

यावें जावें पुढें ऐसेंचि कारण । भोगावें पतन नरकवास ।।तु.गा.२६७७.००४।।
तुका म्हणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरि कांहीं बरें नव्हे ।।तु.गा.२६७७.००५।।
म्हणवितां हरिदास कां रे नाहीं लाज । दीनासी महाराज म्हणसी हीना ।।तु.गा.२६७८.००१।।
काय ऐसें पोट न भरेसें जालें । हालविसी कुले सभेमाजी ।।तु.गा.२६७८.००२।।
तुका म्हणे पोटें केली विटंबना । दीन जाला जना कींव भाकी ।।तु.गा.२६७८.००३।।
म्हणसी नाहीं रे संचित । न करीं न करीं ऐसी मात ।।तु.गा.२६७९.००१।।
लाहो घेई हरिनामाचा । जन्म जाऊं नेदी साचा । गळा पडेल यमफासा । मग कैंचा हरि म्हणसी ।।तु.गा.२६७९.००२।।
पुरलासाठीं देहाडा । ऐसें न म्हणें न म्हणें मूढा ।।तु.गा.२६७९.००३।।
नरदेह दुबळा । ऐसें न म्हणे रे चांडाळा ।।तु.गा.२६७९.००४।।
तुका म्हणे सांगों किती । सेखीं तोंडीं पडेल माती ।।तु.गा.२६७९.००५।।
ऐसे सांडुनियां धुरे । केविलवाणी दिसां कां रे। कामें उर भरे । हातीं नुरें मृत्तिका ।।तु.गा.२६८०.००१।।
उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ।।तु.गा.२६८०.००२।।
नलगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं । त्याचा तोचि करी । पारपत्य सकळां ।।तु.गा.२६८०.००३।।
नाहीं आडकाठी । तुका म्हणे जातां भेटी । न बोलतां मिठी । उगीच पायीं घालावी ।।तु.गा.२६८०.००४।।
कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ।।तु.गा.२६८१.००१।।
मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरीं स्वाद नेणें ।।तु.गा.२६८१.००२।।
आणीकही भोग आणिका इंद्रियांचे । नाहीं ऐसें साचे जवळी कांहीं ।।तु.गा.२६८१.००३।।
रूप दृष्टि धाय पाहतां पाहतां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ।।तु.गा.२६८१.००४।।
तुका म्हणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी करितोसी ।।तु.गा.२६८१.००५।।
गेले पळाले दिवस रोज । काय म्हणतोसि माझें माझें ।।तु.गा.२६८२.००१।।
सळे धरोनि बैसला काळ । फांकों नेदी घटका पळ ।।तु.गा.२६८२.००२।।
कां रे अद्यापि न कळे । केश फिरले कान डोळे ।।तु.गा.२६८२.००३।।
हित कळोनि असतां हातीं । तोंडीं पाडोनि घेसी माती ।।तु.गा.२६८२.००४।।

तुज ठाऊकें मी जाणार । पाया शोधोनि बांधिसी घर ।।तु.गा.२६८२.००५।।
तुका म्हणे वेगें । पंढरीराया शरण रिघें ।।तु.गा.२६८२.००६।।
करूनि जतन । कोणा कामा आलें धन ।।तु.गा.२६८३.००१।।
ऐसें जाणत जाणतां । कां रे होतोसी नेणता ।।तु.गा.२६८३.००२।।
प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज याशीं संबंधु ।।तु.गा.२६८३.००३।।
तुका म्हणे एका । हरीविण नाहीं सखा ।।तु.गा.२६८३.००४।।
कां रे माझीं पोरें म्हणसील ढोरें । मायबाप खरें काय एक ।।तु.गा.२६८४.००१।।
कां रे गेलें म्हणोनि करिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ गेलियाचा ।।तु.गा.२६८४.००२।।
कां रे माझें माझें म्हणसील गोत । न सोडविती दूत यमाहातीं ।।तु.गा.२६८४.००३।।
कां रे मी बळिया म्हणविसी ऐसा । सरणापाशीं कैसा उचलविसी ।।तु.गा.२६८४.००४।।
तुका म्हणे न धरीं भरंवसा कांहीं । वेगीं शरण जाईं पांडुरंगा ।।तु.गा.२६८४.००५।।
धन मेळवूनि कोटी । सवें न ये रे लंगोटी ।।तु.गा.२६८५.००१।।
पाने खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंड ।।तु.गा.२६८५.००२।।
पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगाती ।।तु.गा.२६८५.००३।।
तुका म्हणे राम । एक विसरतां श्रम ।।तु.गा.२६८५.००४।।
नित्य उठोनियां खावयाची चिंता । आपुल्या तूं हिता नाठवीसी ।।तु.गा.२६८६.००१।।
जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ।।तु.गा.२६८६.००२।।
चातकांलागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ।।तु.गा.२६८६.००३।।
पक्षी वनचरें आहेत भूमीवरि । तयांलागीं हरि उपेक्षीना ।।तु.गा.२६८६.००४।।
तुका म्हणे भाव धरुन राहे चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ।।तु.गा.२६८६.००५।।
एक शेर अन्ना चाड । येर वाउगी बडबड ।।तु.गा.२६८७.००१।।
कां रे तृष्णा वाढविसी । बांधवोनि मोहपाशीं ।।तु.गा.२६८७.००२।।
औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ।।तु.गा.२६८७.००३।।

मानिसिल झणीं आपलिक कांहीं । येरझार पाहीं न चुके कदा ।।तु.गा.२६९२.००४।।
ऐसे जन्म किती पावलासी देहीं । अझुनि कां नाहीं कळली सोय ।।तु.गा.२६९२.००५।।
सोय धरीं आतां होय पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ।।तु.गा.२६९२.००६।।
सहज कैसें आहे तेथींचें तें गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ।।तु.गा.२६९२.००७।।
तुका म्हणे आतां होईं तूं सावध । तोडीं भवबंध एका जन्में ।।तु.गा.२६९२.००८।।
सोसें बहु गर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाहीं सखीं ऐसीं । येथें कोण भेटलीं ।।तु.गा.२६९३.००१।।
करीं करीं रे स्वहित । देह तंव हे अनित्य । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनि ।।तु.गा.२६९३.००२।।
पाळी तोंडींचिया घांसें । तेचि होय अनारिसे । ज्या नव्हे ऐसें । खेदी परि सोडवीना ।।तु.गा.२६९३.००३।।
तुका म्हणे धनमानें । माझ्या बाटलों मीपणें । नाहीं दिला मनें । देखों लाभें हा लाभ ।।तु.गा.२६९३.००४।।
काळ जवळिच उभा नेणां । घाली झांपडी खुंटी कानां ।।तु.गा.२६९४.००१।।
कैसा हुशार सावध राहीं । आपुला तूं आपुले ठायीं ।।तु.गा.२६९४.००२।।
काळ जवळिच उभा पाहीं । नेदी कोणासी देऊं कांहीं ।।तु.गा.२६९४.००३।।
काळें पुरविली पाठी । वरूषें जालीं तरी साठी ।।तु.गा.२६९४.००४।।
काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ।।तु.गा.२६९४.००५।।
तुका म्हणे काळा । कर्म मिळतें तें जाळा ।।तु.गा.२६९४.००६।।
दिकची या नाहीं संसारसंबंधा । तुटेना या बाधा भवरोगाची ।।तु.गा.२६९५.००१।।
तांतडी ते करी म्हणऊनि तांतडी । साधिली ती घडी सोनियाची ।।तु.गा.२६९५.००२।।
संकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली । प्रारब्ध तें घाली गर्भवासीं ।।तु.गा.२६९५.००३।।
तुका म्हणे बीजें जाळुनी सकळ । करावें गोपाळें आपुले भाट ।।तु.गा.२६९५.००४।।
मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ।।तु.गा.२६९६.००१।।
जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ।।तु.गा.२६९६.००२।।
संचित सांगाती बोळवण सवें । आचरलें द्यावें फळ तेणें ।।तु.गा.२६९६.००३।।
तुका म्हणे शेखीं स्मशान तें वरी । संबंध गोवरी आगीसवें ।।तु.गा.२६९६.००४।।

आठवे देव तो करावा उपाव । येर त्यजीं वाव खटपट ।।तु.गा.२६९७.००१ ।।
होईं बा जागा होईं बा जागा । वाउगा कां गा शिणसील ।।तु.गा.२६९७.००२ ।।
जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडसी तों कईं निघसि ना ।।तु.गा.२६९७.००३ ।।
तुका म्हणे देवा पावसील भावें । जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ।।तु.गा.२६९७.००४ ।।
सदैव तुम्हां अवघें आहे । हातपाय चालाया ।।तु.गा.२६९८.००१ ।।
मुखीं वाणी कानीं कीर्ति । डोळे मूर्ति देखावया ।।तु.गा.२६९८.००२ ।।
अंध बहिर ठकलीं किती । मुकीं होती पांगुळ ।।तु.गा.२६९८.००३ ।।
घरा आगी लावुनि जागा । न पळे तो गा वांचेना ।।तु.गा.२६९८.००४ ।।
तुका म्हणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ।।तु.गा.२६९८.००५ ।।
आपुलिया अंगें तोडी मायाजाळ । ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ।।तु.गा.२६९९.००१ ।।
रांडापोरे त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि मन ।।तु.गा.२६९९.००२ ।।
मुक्त जालों ऐसें बोलों जाय मुखें । तुका म्हणे दुःखें बांधला तो ।।तु.गा.२६९९.००३ ।।
काळोखी खाऊन कैवाड केला धीर । आपुलिया हितें जालें जनामध्यें शूर ।।तु.गा.२७००.००१ ।।
कां रे तुम्ही नेणां कां रे तुम्ही नेणां । अल्पसुखासाठीं पडशी विपत्तीचे घाणां ।।तु.गा.२७००.००२ ।।
नाहीं ऐसी लाज काय तयांपें आगळें । काय नव्हे केलें आपुलिया बळें ।।तु.गा.२७००.००३ ।।
तुका म्हणे तरी सुख अवघेंचि बरें । जतन करूं हीं आपुलालीं ढोरें ।।तु.गा.२७००.००४ ।।
नलगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ।।तु.गा.२७०१.००१ ।।
मरण जो मागें गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ।।तु.गा.२७०१.००२ ।।
तुका म्हणे कांहीं होईल स्वहित । निधान जो थीत टाकूं पाहे ।।तु.गा.२७०१.००३ ।।
वाटां घेईं लवकरि । मागें अंतरसी दूरी । केली भरोवरी । सार नेती आणीक ।।तु.गा.२७०२.००१ ।।
ऐसी भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती । समय नेणती । माथां भार वाहोनी ।।तु.गा.२७०२.००२ ।।
नाहीं सरलें तोंवरी । धांव घेईं वेग करीं । घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें ।।तु.गा.२७०२.००३ ।।
फटलंडी म्हणे तुका । एक न साहावे धक्का । तरिच या सुखा । मग कैसा पावसी ।।तु.गा.२७०२.००४ ।।

देवाचे म्हणोनि देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ।।तु.गा.२७०३.००१।।
आतां येरा जना म्हणावें तें काई । जया भार डोई संसाराचा ।।तु.गा.२७०३.००२।।
त्यजुनी संसार अभिमान सांटा । जुलूम हा मोठा दिसतसे ।।तु.गा.२७०३.००३।।
तुका म्हणे अळस करूनियां साहे । बळें कैसें पाहे वायां जाती ।।तु.गा.२७०३.००४।।
काय एकां जालें तें का नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ।।तु.गा.२७०४.००१।।
देखतील डोळां ऐकतील कानीं । बोलिलें पुराणीं तेंही ठावें ।।तु.गा.२७०४.००२।।
काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ।।तु.गा.२७०४.००३।।
कां हें कळों नये आपुलें आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ।।तु.गा.२७०४.००४।।
कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा आलें ।।तु.गा.२७०४.००५।।
कां हें जन्म वायां घातलें उत्तम । कां हें रामराम न म्हणती ।।तु.गा.२७०४.००६।।
काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ।।तु.गा.२७०४.००७।।
काय करिती हे बांधलिया काळें । तुका म्हणे बळें वज्रपाशीं ।।तु.गा.२७०४.००८।।
वाटे या जनाचें थोर बा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ।।तु.गा.२७०५.००१।।
कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ।।तु.गा.२७०५.००२।।
काय मानुनियां राहिले निश्चिंती । काय जाब देती यमदूतां ।।तु.गा.२७०५.००३।।
कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ।।तु.गा.२७०५.००४।।
काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणों ।।तु.गा.२७०५.००५।।
कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ।।तु.गा.२७०५.००६।।
काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ।।तु.गा.२७०५.००७।।
तुका म्हणे कां हीं भोगीतील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ।।तु.गा.२७०५.००८।।
पडिली हे रूढि जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य म्हूण ।।तु.गा.२७०६.००१।।
मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचें धन लाभ हेवा ।।तु.गा.२७०६.००२।।
देहाचें भय तें काळाचें भातुकें । ग्रासूनि तें एकें ठेविलेंसे ।।तु.गा.२७०६.००३।।

तुका म्हणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ।।तु.गा.२७०६.००४।।
म्हणसी होऊनि निश्चिंता । हरूनियां अवघी चिंता । मग जाऊं एकांता । भजन करूं ।।तु.गा.२७०७.००१।।
संसारसंभ्रमें आशा लागे पाठीं । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ।।तु.गा.२७०७.००२।।
सेकीं नाडसील नाडसील । विषयसंगें तूं अवघा नाडसील । मागुता पडसील भवडोहीं ।।तु.गा.२७०७.००३।।
शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कदा आराणूक। करिती तडातोडी अंतर्बाह्यात्कारीं । ऐसें जाती चारीं दिवस वेगीं ।।तु.गा.२७०७.००४।।
मोलाची घडी जाते वायांविण । न मिळे मोल धन देतां कोडी । जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका म्हणे हाय करिसी मग ।।तु.गा.२७०७.००५।।
इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ।।तु.गा.२७०८.००१।।
याचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ।।तु.गा.२७०८.००२।।
सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरलें जाणतां ।।तु.गा.२७०८.००३।।
पिंड पाळितां ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे।।तु.गा.२७०८.००४।।
करितां उपचार । कोणा नाहीं उपकार ।।तु.गा.२७०८.००५।।
अल्प जीवन करीं । तुका म्हणे साधी हरि ।।तु.गा.२७०८.००६।।
एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा ।।तु.गा.२७०९.००१।।
मारा हाक देवा भय अट्टाहासें । जंव काळा ऐसें जालें नाहीं ।।तु.गा.२७०९.००२।।
मरणाची तंव गांठोडी पदरीं । जिणें तोचिवरी माप भरे ।।तु.गा.२७०९.००३।।
तुका म्हणे धिग वाहती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ।।तु.गा.२७०९.००४।।
हरि हरि तुम्हीं म्हणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ।।तु.गा.२७१०.००१।।
आणिक नका कांहीं गाबाळाचे भरी । पडों येते थोरी नागवण ।।तु.गा.२७१०.००२।।
भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । म्हणावें पतित वेळोवेळां ।।तु.गा.२७१०.००३।।
तुका म्हणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील ।।तु.गा.२७१०.००४।।
कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन ।।तु.गा.२७११.००१।।
जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ।।तु.गा.२७११.००२।।
कैं भोज्य नानापरी । कैं कोरड्या भाकरी ।।तु.गा.२७११.००३।।

कैं बैसावें वाहनी । कैं पायीं अनवाणी।।तु.गा.२७११.००४।।
कैं उत्तम प्रावर्णें । कैं वसनें तीं जीर्णें ।।तु.गा.२७११.००५।।
कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ।।तु.गा.२७११.००६।।
कैं सज्जनाशीं संग । कैं दुर्जनाशीं योग।।तु.गा.२७११.००७।।
तुका म्हणे जाण । सुख दुःख तें समान।।तु.गा.२७११.००८।।
सकळांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ।।तु.गा.२७१२.००१।।
अहो श्रोते वक्ते सकळही जन । बरें पारखून बांधा गांठीं ।।तु.गा.२७१२.००२।।
फोडिलें भांडार धन्याचा हा माल । तेथें मी हमाल भारवाही ।।तु.गा.२७१२.००३।।
तुका म्हणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ।।तु.गा.२७१२.००४।।
अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूतकर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ।।तु.गा.२७१३.००१।।
मग कैंचें हरिचें नाम । निजलीया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ।।तु.गा.२७१३.००२।।
विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट। तया तेचि वाट। अधोगती जावया ।।तु.गा.२७१३.००३।।
आणिक एक कोड । नरका जावयाची चाड। तरी संतनिंदा गोड । करी कवतुकें सदा ।।तु.गा.२७१३.००४।।
तुका म्हणे ऐसें । मना लावी रामपिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठकोनि ।।तु.गा.२७१३.००५।।
नका घालूं दूध जयामध्यें सार । ताकाचें उपकार तरी करा ।।तु.गा.२७१४.००१।।
नेदा तरी हें हो नका देऊं अन्न। फुकाचें जीवन तरी पाजा ।।तु.गा.२७१४.००२।।
तुका म्हणे मज सगुणाची चाड। पुरवा कोणी कोड दुर्बळाचें।।तु.गा.२७१४.००३।।
आतां तरी पुढें हाचि उपदेश। नका करूं नाश आयुष्याचा ।।तु.गा.२७१५.००१।।
सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ।।तु.गा.२७१५.००२।।
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध।।तु.गा.२७१५.००३।।
तुका म्हणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ।।तु.गा.२७१५.००४।।
ऐकें रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा मनामाजीं स्मरावा ।।तु.गा.२७१६.००१।।
मग कैंचें रें बंधन वाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण येचि तीरीं सरेल ।।तु.गा.२७१६.००२।।

दास्य करील कळिकाळ बंध तुटेल मायाजाळ । होतील सकळ रिद्धिसिद्धि म्हणियाऱ्या ।।तु.गा.२७१६.००३।।
सकळशास्त्रांचें सार हें वेदांचें गव्हर । पाहातां विचार हाचि करिती पुराणें ।।तु.गा.२७१६.००४।।
ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र चांडाळांही अधिकार । बाळें नारीनर आदिकरोनि वेश्याही ।।तु.गा.२७१६.००५।।
तुका म्हणे अनुभवें आम्हीं पाडियलें ठावें। आणीकही दैवें सुख घेती भाविकें ।।तु.गा.२७१६.००६।।
न करीं तळमळ राहें रे निश्चळ। आहे हा कृपाळ स्वामी माझा ।।तु.गा.२७१७.००१।।
अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्यांशीच्या ।।तु.गा.२७१७.००२।।
आणिकिया जीवा होईल उद्धार। तेही उपकार घडती कोटि ।।तु.गा.२७१७.००३।।
आहिक्यपरत्रीं होसील सरता। वाचे उच्चारितां रामराम ।।तु.गा.२७१७.००४।।
तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ।।तु.गा.२७१७.००५।।
साधकाची दशा उदास असावी । उपाधी नसावी अंतर्बाही ।।तु.गा.२७१८.००१।।
लोलुप्यता काय निद्रेतें जिणावें । भोजन करावें परिमित ।।तु.गा.२७१८.००२।।
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण बोलों नये ।।तु.गा.२७१८.००३।।
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ।।तु.गा.२७१८.००४।।
निर्वाहापुरतें अन्नआच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ।।तु.गा.२७१९.००१।।
कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ।।तु.गा.२७१९.००२।।
नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियदमीं ।।तु.गा.२७१९.००३।।
तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ।।तु.गा.२७१९.००४।।
सर्वस्वासी मुकावें तेणें हरिसी जिंकावें । अर्थप्राणजीवें देहत्याग ।।तु.गा.२७२०.००१।।
मोह ममता माया चाड चिंता । विषयकंदुवेथा जाळूनियां ।।तु.गा.२७२०.००२।।
लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशधडी ।।तु.गा.२७२०.००३।।
शांति क्षमा दया सखिया विनउनी । मूळ चक्रपाणी धाडी त्यांसी ।।तु.गा.२७२०.००४।।
तुका म्हणे याती अक्षरें अभिमान । सांडोनिया शरण रिघें संतां ।।तु.गा.२७२०.००५।।
आशा हे समूळ खणोनि काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ।।तु.गा.२७२१.००१।।

नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ।।तु.गा.२७२१.००२।।
आशा मारोनियां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ।।तु.गा.२७२१.००३।।
तुका म्हणे जरी योगाची तांतडी । आशेची बीबुडी करीं आधीं ।।तु.गा.२७२१.००४।।
हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे ।।तु.गा.२७२२.००१।।
आवडी विठ्ठल गाइजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ।।तु.गा.२७२२.००२।।
आणिकां अंतरीं न द्यावी वसती । करावी हे शांती वासनेची ।।तु.गा.२७२२.००३।।
तुका म्हणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ।।तु.गा.२७२२.००४।।
करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ।।तु.गा.२७२३.००१।।
तरीच हा तरिजे सिंधु । भवबंधु तोडोनियां ।।तु.गा.२७२३.००२।।
येथें सरे शुद्ध साचें । अंतरीचें बीज तें ।।तु.गा.२७२३.००३।।
तुका म्हणे लवणकळी । पडतां जळीं तें होय ।।तु.गा.२७२३.००४।।
बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ।।तु.गा.२७२४.००१।।
येऊनि अंतरीं राहिल गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ।।तु.गा.२७२४.००२।।
राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ।।तु.गा.२७२४.००३।।
तुका म्हणे ऐसें देइन मी दिव्य । जरी होईल भाव एकविध ।।तु.गा.२७२४.००४।।
नये वांटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ।।तु.गा.२७२५.००१।।
पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावे दिवस राती ।।तु.गा.२७२५.००२।।
नये काकुळती । कोणा यावें हरिभक्ति ।।तु.गा.२७२५.००३।।
तुका म्हणे साई । करील कृपेची विठाई ।।तु.गा.२७२५.००४।।
नलगे देशकाळ । मंत्रविधान सकळ । मनचि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ।।तु.गा.२७२६.००१।।
येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ।।तु.गा.२७२६.००२।।
कल्पनेचा साक्षी । तरि आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ।।तु.गा.२७२६.००३।।
घेणें तरि भाव । लक्षी दासाचा उपाव । तुका म्हणे जीव । जीवीं मेळवील अनंत ।।तु.गा.२७२६.००४।।

सत्य आठवितां देव । जातें भेव पळोनि ।।तु.गा.२७२७.००१।।

नलगे कांहीं करणें चिंता । धरी सत्ता सर्व तो ।।तु.गा.२७२७.००२।।

भावें भाव राहे पायीं । देव तैं संनिध ।।तु.गा.२७२७.००३।।

तुका म्हणे कृष्णनामें । शीतळ प्रेमें सर्वांसी ।।तु.गा.२७२७.००४।।

कायावाचामनें झाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ।।तु.गा.२७२८.००१।।

विश्वासी तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ।।तु.गा.२७२८.००२।।

तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ।।तु.गा.२७२८.००३।।

तेचि करीं मात । जेणें होईल तुझें हित । काय बडबड निमित्य । सुख जिव्हारी शिणविसी ।।तु.गा.२७२९.००१।।

जो मूळव्याधि पीडिला । त्यासी देखोनि हांसे खरजुला ।।तु.गा.२७२९.००२।।

आराध करी सोसी । त्यासी हांसे तो आळसी ।।तु.गा.२७२९.००३।।

क्षयरोगी म्हणे परता । सर रोगिया कुष्ठता ।।तु.गा.२७२९.००४।।

वडस दोहीं डोळां वाढले । आणिकां कानें कोचें बोले ।।तु.गा.२७२९.००५।।

तुका लागे पायां । शुद्ध करा आपणियां ।।तु.गा.२७२९.००६।।

थोडें परि निरें। अविट तें घ्यावें खरें।।तु.गा.२७३०.००१।।

घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढें बिजा पोटीं ।।तु.गा.२७३०.००२।।

चित्त ठेवीं ग्वाही । उपचारें चाड नाहीं ।।तु.गा.२७३०.००३।।

आपुलें तें हित फार । तुका म्हणे खरें सार ।।तु.गा.२७३०.००४।।

नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ।।तु.गा.२७३१.००१।।

हेंचि शूरत्वाचें अंग । हारि आणिला श्रीरंग ।।तु.गा.२७३१.००२।।

अवघा जाला पण । लवण सकळां कारण ।।तु.गा.२७३१.००३।।

तुका म्हणे पाणी । पातळपणें तळा आणी ।।तु.गा.२७३१.००४।।

ऐका गा हे अवघे जन । शुद्ध मन तें हित ।।तु.गा.२७३२.००१।।

अवघा काळ नये जरी । समयावरी जाणावें ।।तु.गा.२७३२.००२।।

नाहीं कोणी सवें येतां । संचिता या वेगळा ।।तु.गा.२७३२.००३ ।।
बरवा अवकाश आहे । करा साहे इंद्रियें ।।तु.गा.२७३२.००४ ।।
कर्मभूमी ऐसा ठाव । वेवसाव जाणावा ।।तु.गा.२७३२.००५ ।।
तुका म्हणे उत्तम जोडी । जाती घडी नरदेह ।।तु.गा.२७३२.००६ ।।
कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरीचें चांग ।।तु.गा.२७३३.००१ ।।
तैसा करी कां विचार । शुद्ध कारण अंतर ।।तु.गा.२७३३.००२ ।।
वरी कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ।।तु.गा.२७३३.००३ ।।
मिठें रुचविलें अन्न । नये सतत कारण ।।तु.गा.२७३३.००४ ।।
ऊंस बाहेरी दिसे काळा । आंत रसाचा आगळा ।।तु.गा.२७३३.००५ ।।
तुका म्हणे मोल गोडी । काय चाड वरिल्या खोडी ।।तु.गा.२७३३.००६ ।।
चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळां ।।तु.गा.२७३४.००१ ।।
तैसें जागें करीं चित्ता । कांहीं आपुलियां हिता ।।तु.गा.२७३४.००२ ।।
निक्षेपिलें धन । तेथें गुंतलेंसें मन ।।तु.गा.२७३४.००३ ।।
नाशिवंतासाठीं । तुका म्हणे करिसी आटी ।।तु.गा.२७३४.००४ ।।
उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्त शुद्ध बुद्धी ठायीं स्थीर ।।तु.गा.२७३५.००१ ।।
न घालावी धांव मनाचिये ओढी । वचनीं आवडी संताचिये ।।तु.गा.२७३५.००२ ।।
अंतरीं या राहे वचनाचा विश्वास । न लगे उपदेश तुका म्हणे ।।तु.गा.२७३५.००३ ।।
संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ।।तु.गा.२७३६.००१ ।।
भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ।।तु.गा.२७३६.००२ ।।
भिक्षा आणि वेवसाव । काला करी तो गाढव ।।तु.गा.२७३६.००३ ।।
करूनि वस्ती बाजारीं । म्हणवी कासया निस्पृही ।।तु.गा.२७३६.००४ ।।
प्रसादा आडुनि कवी । केलें तूप पाणी तेवीं ।।तु.गा.२७३६.००५ ।।
तुका म्हणे होईं शूर । किंवा निसूर मजूर ।।तु.गा.२७३६.००६ ।।

कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ।।तु.गा.२७३७.००१।।
करीं यापरी स्वहित । विचारूनी धर्म नीत ।।तु.गा.२७३७.००२।।
देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ।।तु.गा.२७३७.००३।।
विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ।।तु.गा.२७३७.००४।।
हत्या क्षात्रधर्म । नव्हे निष्काम तें कर्म ।।तु.गा.२७३७.००५।।
तुका म्हणे संतीं । करूनि ठेविली आइती ।।तु.गा.२७३७.००६।।
डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तेंहि न समाये ।।तु.गा.२७३८.००१।।
तैसें शुद्ध करा हित । नका चित्त बाटवूं ।।तु.गा.२७३८.००२।।
आपुल्याचा कळवळा । आणिका बाळावरि न ये ।।तु.गा.२७३८.००३।।
तुका म्हणे बीज मुडा । जैशा चाडा पिकाच्या ।।तु.गा.२७३८.००४।।
करणें तें हेचि करा । नरका घोरा कां जातां ।।तु.गा.२७३९.००१।।
जया मध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ।।तु.गा.२७३९.००२।।
शरणागतां देव राखे । येरा वाखे विघ्नांचे ।।तु.गा.२७३९.००३।।
तुका म्हणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ।।तु.गा.२७३९.००४।।
किती रांडवडे। घालूनि व्हाल रे बापुडे। संसाराचें भिडे । कासावीस झालेती ।।तु.गा.२७४०.००१।।
माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठेवी अंगसंगा । विश्वासिया जवळी ।।तु.गा.२७४०.००२।।
कांहीं न मागतां भले । होईल तेंची काम केलें । नसावें आथिलें । कांहीं एका संकल्पें ।।तु.गा.२७४०.००३।।
तुका म्हणे भाव । पाववील ठायाठाव । एकविध जीव । ठेविलिया सेवेसी ।।तु.गा.२७४०.००४।।
सत्य आम्हां मनीं । नव्हों गाबाळांचें धनी ।।तु.गा.२७४१.००१।।
ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टाका मळ ।।तु.गा.२७४१.००२।।
देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढे व्हावयासी बरें ।।तु.गा.२७४१.००३।।
तुका म्हणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ।।तु.गा.२७४१.००४।।
काय धोविलें बाहेरी । मन मळलें अंतरीं । गादलें जन्मवरी । असत्यकाटें काटलें ।।तु.गा.२७४२.००१।।

सांडी व्यापार दंभाचा । शुद्ध करीं रे मन वाचा । तुझिया चित्ताचा । तूंच ग्वाही आपुला ।।तु.गा.२७४२.००२।।
पापपुण्य विटाळ देहीं । करितां न विचारीसी कांहीं । काय चाचपसी मही । जी अखंड सोंवळी ।।तु.गा.२७४२.००३।।
कामक्रोध वेगळा । ऐसा होईं का रे सोंवळा । तुका म्हणे कळा । गुंडून ठेवीं या कुसरी ।।तु.गा.२७४२.००४।।
निवडावे खडे । तरी दळण वोज घडे ।।तु.गा.२७४३.००१।।
नाहीं तरि नासोनि जाय । कारण आळस उरे होय ।।तु.गा.२७४३.००२।।
निवडावें तन । शेतीं करावें राखण ।।तु.गा.२७४३.००३।।
तुका म्हणे नीत । न विचारतां नव्हे हित ।।तु.गा.२७४३.००४।।
भय नाहीं भेव । अनुतापीं नव्हता जीव ।।तु.गा.२७४४.००१।।
जेथें देवाची तळमळ । तेथें काशाचा विटाळ ।।तु.गा.२७४४.००२।।
उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ।।तु.गा.२७४४.००३।।
तुका म्हणे चित्त । होय आवडी मिश्रित ।।तु.गा.२७४४.००४।।
काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद एका भावें ।।तु.गा.२७४५.००१।।
निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारीं पां हित लवलाहीं ।।तु.गा.२७४५.००२।।
तुका म्हणे भावभक्ति हे कारण । नागवी भूषण दंभ तोचि ।।तु.गा.२७४५.००३।।
जेणें घडें नारायणीं अंतराय । होत बापमाय वर्जावीं तीं ।।तु.गा.२७४६.००१।।
येर प्रियापुत्रधना कोण लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु।।तु.गा.२७४६.००२।।
प्रह्लादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरते केली ।।तु.गा.२७४६.००३।।
तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ।।तु.गा.२७४६.००४।।
न मनावें तैसें गुरुचें वचन । जेणें नारायण अंतरे तें । आड आला म्हणुनी फोडियेला डोळा । बळिने आंधळा शुक्र केला ।।तु.गा.२७४७.००१।।
करी देव तरी काय नव्हे एक । कां तुम्ही पृथक शिणा वायां ।।तु.गा.२७४७.००२।।
उल्लंघुनीयां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या । अवघेंचि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ।।तु.गा.२७४७.००३।।
पितयासी पुत्रें केला वैराकार । प्रह्लादें असुर मारवीला । बहुत विघ्नें केलीं तया आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ।।तु.गा.२७४७.००४।।
गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती । तयां दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाही तोचि जाला ।।तु.गा.२७४७.००५।।

देव जोड तरी करावा अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें । तुका म्हणे हा तो जाणतो कळवळा । म्हणोनी अजामेळा उद्धरिलें ।।तु.गा.२७४७.००६।।
हो का पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु । कळों आलें खट्याळसें । शिवों नयें लिंपों दोषें ।।तु.गा.२७४८.००२।।
फोडावें मडकें । मेलें लेखीं घायें एके ।।तु.गा.२७४८.००३।।
तुका म्हणे त्यागें । विण चुकीजेना भोगें ।।तु.गा.२७४८.००४।।
आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी ।।तु.गा.२७४९.००१।।
अंतरीं पापाच्या कोडी । वरि वरि बोडी डोई दाढी ।।तु.गा.२७४९.००२।।
बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ।।तु.गा.२७४९.००३।।
पाप गेल्याची काय खूण । नाहीं पालटले अवगुण ।।तु.गा.२७४९.००४।।
भक्तिभावेंविण । तुका म्हणे अवघा शीण ।।तु.गा.२७४९.००५।।
निर्वैर होणें साधनाचें मूळ । येर ते विल्हाळ सांडीं मांडी।।तु.गा.२७५०.००१।।
नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ।।तु.गा.२७५०.००२।।
त्याग नांव तरी निर्विषय वासना । कार्याकारणापुरते विधि ।।तु.गा.२७५०.००३।।
तुका म्हणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेंसीं ।।तु.गा.२७५०.००४।।
नव्हे खळवादी मताचि पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ।।तु.गा.२७५१.००१।।
साक्षत्वेंसि मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ।।तु.गा.२७५१.००२।।
नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ।।तु.गा.२७५१.००३।।
तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वायां श्रमों नये ।।तु.गा.२७५१.००४।।
पात्र शुद्ध चित्त ग्वाही । नलगे कांहीं सांगणें ।।तु.गा.२७५२.००१।।
शूर तरी सत्य व्हावें । साटी जीवें करूनि ।।तु.गा.२७५२.००२।।
अमुपचि सुखमान । स्वामी जन मानवे ।।तु.गा.२७५२.००३।।
तुका म्हणे जैसी वाणी । तैसा मनीं परिपाक ।।तु.गा.२७५२.००४।।
साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ।।तु.गा.२७५३.००१।।
व्यभिचारीचा टाकमटिका । उपहास होती लोकां ।।तु.गा.२७५३.००२।।

शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ।।तु.गा.२७५३.००३।।
तुका म्हणे जिणें । शर्तीविण लाजिरवाणें ।।तु.गा.२७५३.००४।।
शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें ।।तु.गा.२७५४.००१।।
त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ।।तु.गा.२७५४.००२।।
त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं ।।तु.गा.२७५४.००३।।
तुका म्हणे सत्य सांगें । येवोत रागें येतील ते ।।तु.गा.२७५४.००४।।
न मनी ते ज्ञानी न मनी ते पंडित । ऐसें परीचे एकएका भावें ।।तु.गा.२७५५.००१।।
धातू पोसोनियां आणिकां उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ।।तु.गा.२७५५.००२।।
न मनी ते योगी न मनी ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परीचीं ।।तु.गा.२७५५.००३।।
तुका म्हणे तया नमन बाह्यात्कारी । आवडती परी चित्तशुद्धी ।।तु.गा.२७५५.००४।।
नाहीं पाक होत उफराटे चाली । बोलिली ते केली व्हावी नीत ।।तु.गा.२७५६.००१।।
नाहीं मानू येत वांजटाचे बोल । कोरडेच फोल चवी नाहीं ।।तु.गा.२७५६.००२।।
तरुवरा आधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ म्हणा त्यासी ।।तु.गा.२७५६.००३।।
तुका म्हणे किती ठकलीं तांतडी । गव्हीं नाहीं गोडी मांडे पुऱ्या ।।तु.गा.२७५६.००४।।
करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ।।तु.गा.२७५७.००१।।
कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण तें साचें साच अंगीं ।।तु.गा.२७५७.००२।।
अतिशयाअंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजाऐसें ।।तु.गा.२७५७.००३।।
तुका म्हणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ।।तु.गा.२७५७.००४।।
मनोमय पूजा । हेचि पढियें केशीराजा ।।तु.गा.२७५८.००१।।
घेतो कल्पनेचे भोग । न मानती बाह्य रंग ।।तु.गा.२७५८.००२।।
अंतरींचें जाणे । आदिवर्तमान खुणें ।।तु.गा.२७५८.००३।।
तुका म्हणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ।।तु.गा.२७५८.००४।।
साहोनि टांकीघाये । पाषाण देवचि जाला पाहें ।।तु.गा.२७५९.००१।।

तया रीती दृढ मन । करीं साधाया कारण ।।तु.गा.२७५९.००२।।
बाण शस्त्र साहोनि गोळी । शूरा ठाव उंच स्थळीं ।।तु.गा.२७५९.००३।।
तुका म्हणे सती । अग्न न देखे ज्या रीती ।।तु.गा.२७५९.००४।।
फळाची तो पोटीं । घडे वियोगेंही भेटी ।।तु.गा.२७६०.००१।।
करावें चिंतन । सार तेंचि आठवण ।।तु.गा.२७६०.००२।।
चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ।।तु.गा.२७६०.००३।।
तुका म्हणे देवा । पावें अंतरींची सेवा ।।तु.गा.२७६०.००४।।
खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरि ।।तु.गा.२७६१.००१।।
ऐसे फुकाचे उपाय । सांडोनियां वायां जाय ।।तु.गा.२७६१.००२।।
परउपकार । एका वचनाचा फार ।।तु.गा.२७६१.००३।।
तुका म्हणे मळ । मनें सांडिता शीतळ ।।तु.गा.२७६१.००४।।
वेदविहित तुम्ही आइका हो कर्में । बोलतों ती वर्में संतांपुढें ।।तु.गा.२७६२.००१।।
चारी वर्ण झाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभागिले ।।तु.गा.२७६२.००२।।
प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ।।तु.गा.२७६२.००३।।
आंबे बोरी वड बाभुळा चंदन । गुणागुणीं भिन्न अग्नि एक ।।तु.गा.२७६२.००४।।
तुका म्हणे मन उन्मन जो होय । तोंवरि हे सोय विधि पाळीं ।।तु.गा.२७६२.००५।।
जुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां देहदु:ख थोर आहे ।।तु.गा.२७६३.००१।।
तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ।।तु.गा.२७६३.००२।।
पिंड पोसिलिया विषयांचा पाइक । वैकुंठनायक कैंचा तेथें ।।तु.गा.२७६३.००३।।
तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रखुमादेवीवर जोडावया ।।तु.गा.२७६३.००४।।
चित्तीं नाहीं तें जवळी असोनि काय । वत्स सांडी माय तेणें न्यायें ।।तु.गा.२७६४.००१।।
प्रीतीचा तो वायु गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनियां ।।तु.गा.२७६४.००२।।
तुका म्हणे अवघें फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ।।तु.गा.२७६४.००३।।

यज्ञनिमित्त शरीरासी बंधन । कां रे तृष्णा वायांविण वाढविली ।।तु.गा.२७६५.००१ ।।
नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयांनीं बंधन केलें तुज ।।तु.गा.२७६५.००२ ।।
आशा धरूनि फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंची ।।तु.गा.२७६५.००३ ।।
तुका म्हणे शिणसी वायां । शरण न वजतां पंढरिराया ।।तु.गा.२७६५.००४ ।।
परद्रव्य परनारीचा अभिळास । तेथोनि हरास सर्वभाग्या ।।तु.गा.२७६६.००१ ।।
घटिका दिवस मास वर्षें लागे तीन । बांधलें पतन गांठोडीस ।।तु.गा.२७६६.००२ ।।
पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसी ।।तु.गा.२७६६.००३ ।।
तुका म्हणे एका थडताथवड । काळ लागे नाड परी खरा ।।तु.गा.२७६६.००४ ।।
आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ।।तु.गा.२७६७.००१ ।।
होणार तें सुखें घडो । लाभ जोडो महाबुद्धि ।।तु.गा.२७६७.००२ ।।
सत्य संकल्पाचे साटीं । उजळा पोटीं रविबिंब ।।तु.गा.२७६७.००३ ।।
तुका म्हणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ।।तु.गा.२७६७.००४ ।।
पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ।।तु.गा.२७६८.००१ ।।
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ।।तु.गा.२७६८.००२ ।।
गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ।।तु.गा.२७६८.००३ ।।
संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळा ।।तु.गा.२७६८.००४ ।।
तुका म्हणे उघडे आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ।।तु.गा.२७६८.००५ ।।
कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निधान हाता चढे ।।तु.गा.२७६९.००१ ।।
कुळधर्म भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्रांती पाववील ।।तु.गा.२७६९.००२ ।।
कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनांचें ।।तु.गा.२७६९.००३ ।।
कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ।।तु.गा.२७६९.००४ ।।
तुका म्हणे कुळधर्म दावी देवी देव । यथाविध भाव जरी होय ।।तु.गा.२७६९.००५ ।।
जेणें वाढे अपकीर्ति। सर्वार्थीं तें वर्जावें ।।तु.गा.२७७०.००१ ।।

सत्य रुचे भलेपण । वचन तें जगासी ।।तु.गा.२७७०.००२।।

होईजेतें शूर त्यागें । वाउगें तें सारावें ।।तु.गा.२७७०.००३।।

तुका म्हणे खोटें वर्म । निंद्यकर्म काळिमा ।।तु.गा.२७७०.००४।।

भाव तैंसे फळ । न चले देवापाशीं बळ ।।तु.गा.२७७१.००१।।

धांवे जातीपाशीं जाती । खुण येरयेरां चित्तीं ।।तु.गा.२७७१.००२।।

हिरा हिरकणी । काढी आतुनि आइरणीं ।।तु.गा.२७७१.००३।।

तुका म्हणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ।।तु.गा.२७७१.००४।।

शाहाणिया पुरे एकचि वचन । विशारती खूण तेचि त्यासी ।।तु.गा.२७७२.००१।।

उपदेश असे बहुतांकारणें । घेतला तो मनें पाहिजे हा ।।तु.गा.२७७२.००२।।

फांसावेना तरि दुःख घेतें वाव । मग होतो जीव कासावीस ।।तु.गा.२७७२.००३।।

तुका म्हणे नको राग धरुं झोंडा । नुघडितां पीडा होईल डोळे ।।तु.गा.२७७२.००४।।

नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ।।तु.गा.२७७३.००१।।

वाऱ्याहातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण ।।तु.गा.२७७३.००२।।

प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तंव जन सकळ साक्षी ।।तु.गा.२७७३.००३।।

तुका म्हणे बरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हां ।।तु.गा.२७७३.००४।।

अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ।।तु.गा.२७७४.००१।।

परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ।।तु.गा.२७७४.००२।।

हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ।।तु.गा.२७७४.००३।।

तुका म्हणे पापा । शिवों नये अनुतापा ।।तु.गा.२७७४.००४।।

ढेकरें जेवण दिसें साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ।।तु.गा.२७७५.००१।।

हेही बोल तेही बोल । कोरडें फोल रुचीविण ।।तु.गा.२७७५.००२।।

गव्हांचिया होती परी । फकेवरी खाऊं नये ।।तु.गा.२७७५.००३।।

तुका म्हणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ।।तु.गा.२७७५.००४।।

केलें नाहीं मनीं तया घडें त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ।।तु.गा.२७७६.००१ ।।
देवचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ।।तु.गा.२७७६.००२ ।।
त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ।।तु.गा.२७७६.००३ ।।
तुका म्हणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुम्हां ।।तु.गा.२७७६.००४ ।।
अन्यायासी राजा न करिता दंड। बहुत ते लंड पीडिती जना ।।तु.गा.२७७७.००१ ।।
न करितां निगा न काढितां तण । कैंचें येती कण हातासी ते ।।तु.गा.२७७७.००२ ।।
तुका म्हणे संतां करूं नये अनृत । पाप नाहीं नीत विचारीतां ।।तु.गा.२७७७.००३ ।।
ऐसी एका अटी । रितीं शिणती करंटीं ।।तु.गा.२७७८.००१ ।।
साच आपुल्या पुरते । करूनि न घेती कांहीं हितें ।।तु.गा.२७७८.००२ ।।
कां हीं वेचितील वाणी । निरर्थकचि कारणीं ।।तु.गा.२७७८.००३ ।।
तुका म्हणे देवा । कांहीं समर्पूनि सेवा ।।तु.गा.२७७८.००४ ।।
जळो तें बाह्य सोंग । पडिलिया अंतर व्यंग ।।तु.गा.२७७९.००१ ।।
कारण तें अंतरलें । म्हणवितां वाइट भलें ।।तु.गा.२७७९.००२ ।।
तांतडीनें नाशीं । तांतडीनेंचि संतोषी ।।तु.गा.२७७९.००३ ।।
तुका म्हणे धीर। नाहीं बुद्धि एकी स्थिर ।।तु.गा.२७७९.००४ ।।
निष्ठुर तो दिसे निराकारपणें। कोंवळा सगुणें प्रतिपाळीं ।।तु.गा.२७८०.००१ ।।
केलाच करावा केला कड्वाड । होईल तें गोड न परते।।तु.गा.२७८०.००२ ।।
मथिलिया लागे नवनीत हातां । नासे वितुळतां आहाच तें।।तु.गा.२७८०.००३ ।।
तुका म्हणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्तें ।।तु.गा.२७८०.००४ ।।
भोजन पां शांतीचें । उंच नीच उसाळी ।।तु.गा.२७८१.००१ ।।
जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिताचा ।।तु.गा.२७८१.००२ ।।
कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ।।तु.गा.२७८१.००३ ।।
तुका म्हणे पावे भूतीं । तें निश्चिती मापली ।।तु.गा.२७८१.००४ ।।

जीवित्व तें किती । हेंचि धरितां बरें चित्तीं ।।तु.गा.२७८२.००१।।
संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें।।तु.गा.२७८२.००२।।
विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ।।तु.गा.२७८२.००३।।
तुका म्हणे जोडी । होय जतन रोकडी ।।तु.गा.२७८२.००४।।
मायबापें जरी सर्पीण कीं बोका । त्यांचें संगें सुखा नपवे बाळ ।।तु.गा.२७८३.००१।।
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ।।तु.गा.२७८३.००२।।
तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञानगर्व ताठा ।।तु.गा.२७८३.००३।।
सत्या माप वाढे । गाबाळाची चाली खोडे ।।तु.गा.२७८४.००१।।
उतरे तें कळे कसीं । विखरोन सर्वदेशीं ।।तु.गा.२७८४.००२।।
घरामध्यें राजा । नोहे व्हावी पट्टपूजा ।।तु.गा.२७८४.००३।।
तुका म्हणे साचें । रूप तें दर्पणींचें ।।तु.गा.२७८४.००४।।
मंगळाचा मंगळ सांठा । विट तोटा नेणें तें ।।तु.गा.२७८५.००१।।
हें भरा सातें आलें । भलें भलें म्हणवावें ।।तु.गा.२७८५.००२।।
जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ।।तु.गा.२७८५.००३।।
तुका म्हणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ।।तु.गा.२७८५.००४।।
वंदिलें वंदावें जीवाचियेसाठीं । किंवा बरी तुटी आरंभीच ।।तु.गा.२७८६.००१।।
स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ।।तु.गा.२७८६.००२।।
शिंपलें तें रोंप वरीवरी बरें । वाळलिया पुरे कोंभ नये ।।तु.गा.२७८६.००३।।
तुका म्हणे टाकीघायें देवपण । फुटलिया जन कुला पुसी ।।तु.गा.२७८६.००४।।
पाठेळ करितां न साहावे वारा । साहेलिया ढोरा गोणी चाले ।।तु.गा.२७८७.००१।।
आपणां आपण हेचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ।।तु.गा.२७८७.००२।।
नवनीत तोंवरी कडकडी लोणी । निश्चय होऊनी राहे मग ।।तु.गा.२७८७.००३।।
तुका म्हणे जरी जगे टाकीघाया । त्याच्या पडे पायां जन मग ।।तु.गा.२७८७.००४।।

एका बोटाची निशाणी । परीपाक नाहीं मनीं ॥तु.गा.२७८८.००१॥
तरि तें संपादिलें सोंग । कारणावांचुनियां व्यंग ॥तु.गा.२७८८.००२॥
वैष्णवांचा धर्म । जग विष्णु नेणें वर्म ॥तु.गा.२७८८.००३॥
अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥तु.गा.२७८८.००४॥
एका बीजा केला नास । मग भोगिलें कणीस ॥तु.गा.२७८९.००१॥
कळे सकळां हा भाव । लहान थोरांवरी जीव ॥तु.गा.२७८९.००२॥
लाभ नाहीं फुकासाठीं । केल्याविण जीवासाटीं ॥तु.गा.२७८९.००३॥
तुका म्हणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥तु.गा.२७८९.००४॥
सकळ देवांचें दैवत । उभें असें या रंगांत ॥तु.गा.२७९०.००१॥
रंग लुटा माझे बाप । शुद्ध भावें खरें माप ॥तु.गा.२७९०.००२॥
रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥तु.गा.२७९०.००३॥
तुका लुटिताहे रंग । साह्य झाला पांडुरंग ॥तु.गा.२७९०.००४॥
सोनें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियांचेसाठीं विकूं पाहे ॥तु.गा.२७९१.००१॥
पारखी तो जाणें तयाचें जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥तु.गा.२७९१.००२॥
क्षीर नीरा कैसें होय एक पण । स्वादी तोचि भिन्न भिन्न काढी ॥तु.गा.२७९१.००३॥
तुका म्हणे थीता आपणचि खोटा । अपमान मोठा पावईल ॥तु.गा.२७९१.००४॥
समर्थासी नाहीं वर्णावर्ण भेद । सामुग्री ते सिद्ध सर्व घरीं ॥तु.गा.२७९२.००१॥
आदराचे ठायीं बहुच आदर । मागीतले फार ते ते वाढी ॥तु.गा.२७९२.००२॥
न म्हणे सुहृद सोयरा आवश्यक । राजा आणि रंक सारिखेची ॥तु.गा.२७९२.००३॥
भाव देखे तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंची ॥तु.गा.२७९२.००४॥
कोणा न विसंबे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥तु.गा.२७९२.००५॥
तुका म्हणे पोट भरुनी उरवी । आलें ऐसें दावी अनुभवा ॥तु.गा.२७९२.००६॥
शंख करिशी ज्याच्या नावें । त्याचें तुज नाहीं ठावें । ऐक सांगतों एका भावें । सांपडे तें घरीं जीवऊनि खावें रे विठ्ठल ॥तु.गा.२७९३.००१॥

टिळे माळा करंडी सोंग । धरूनी चाळविलें जग । पसरी हात नाहीं त्याग । दाविती दगड पुजीती भगल रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००२ ।।

राख लावुनि अंग मळी । वायां टोके मी एक बळी । वासने हातीं बांधवी नळी । त्यासी येऊनी काळ गिळी उगळी रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००३ ।।

कोण तें राहडीचें सुख । वरते पाय आरतें मुख । करवी पीडा भोगवी दु:ख । पडे नरकीं परि न वळेचि मूर्ख रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००४ ।।

शिकला फाग मारी हाका । रांडा पोरें मेळवी लोकां। विटंबी शरीर मागें रुका । केलें तें गेलें अवघें फुका रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००५ ।।

कळावें जनां मी एक बळी । उभा राहोनी मांडी फळी । फोडोनी गुडघें कोंपर चोळी । आपला घात करोनी आपणचि तळमळी रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००६ ।।

फुकट खेळे ठकलीं वायां । धरूनि सोंगें बोडक्या डोया । शिवों नये ती अंतरीं माया । संपादणीविण विटंबिली काया रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००७ ।।

धुळी माती कांहीं खेळोंच नका । जवादी चंदन घ्यावा बुका । आपणा परिमळ आणिकां लोकां । मोलाचा महिमा फजिती ते फुका रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००८ ।।

बहुत दु:खी झालिया खेळें । अंगीं बुद्धि नाहीं बळ । पाठीवरी तोबा तोंड काळें । रसना द्रव्य उपस्थाच्या मुळें रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.००९ ।।

काय सांगतों तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं अवगोंच नका । चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका । धाल्यावरी मग बरा टाकमटिका रे विठ्ठल ।।तु.गा.२७९३.०१० ।।

विषयांचें लोलिंगत । ते फजीत होतील ।।तु.गा.२७९४.००१ ।।

न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळ बीज व्हावें ।।तु.गा.२७९४.००२ ।।

शिखासूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ।।तु.गा.२७९४.००३ ।।

तुका म्हणे अभिमान । नारायणा न सोसे ।।तु.गा.२७९४.००४ ।।

ध्याईं अंतरिंच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ।।तु.गा.२७९५.००१ ।।

विधिनिषेध ऊर फोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ।।तु.गा.२७९५.००२ ।।

वाढे तळमळ उभयतां । नाहीं देखिलें अनुभवितां ।।तु.गा.२७९५.००३ ।।

आपुलाल्या मतें पिसें । परि तें आहे जैसें तैसें ।।तु.गा.२७९५.००४ ।।

साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धि ।।तु.गा.२७९५.००५ ।।

तुका म्हणे वादें । वायां गेलीं ब्रह्मवृंदें ।।तु.गा.२७९५.००६ ।।

संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ।।तु.गा.२७९६.००१ ।।

हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें। काय तेथें गोडें निवडावीं ।।तु.गा.२७९६.००२।।
ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ।।तु.गा.२७९६.००३।।
तुका म्हणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला शेटीं विचार त्या ।।तु.गा.२७९६.००४।।
नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ।।तु.गा.२७९७.००१।।
काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचा ।।तु.गा.२७९७.००२।।
कांपवूनि टिरी शुरत्वाची मात । केलें वाताहात उचित काळें ।।तु.गा.२७९७.००३।।
तुका म्हणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मूळ स्तुति होतां ।।तु.गा.२७९७.००४।।
उदंड शाहाणे होती तर्कवंत । परि नेणवेचि अंत विठोबाचा ।।तु.गा.२७९८.००१।।
उदंडा अक्षरां करोत भरोवरी । परि नेणवेचि थोरी विठोबाची।।तु.गा.२७९८.००२।।
तुका म्हणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते शिण रितें माप ।।तु.गा.२७९८.००३।।
नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति । पाठांतरें होती वाचाळ ते ।।तु.गा.२७९९.००१।।
माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंचि तेथें उरी देहभावा ।।तु.गा.२७९९.००२।।
यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान अलीकडे ।।तु.गा.२७९९.००३।।
तुका म्हणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ।।तु.गा.२७९९.००४।।
नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ।।तु.गा.२८००.००१।।
सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येते ।।तु.गा.२८००.००२।।
काय आगीपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापाशीं ।।तु.गा.२८००.००३।।
तुका म्हणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवूनि ।।तु.गा.२८००.००४।।
येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ।।तु.गा.२८०१.००१।।
विषयांचे झणी व्हाल लोलिंगत । चेवलिया अंत न लगे मग।।तु.गा.२८०१.००२।।
वाहोनियां भार कुंथसील ओझें । नव्हें तेंचि माझें थीता त्याग ।।तु.गा.२८०१.००३।।
तुका म्हणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ।।तु.गा.२८०१.००४।।
लय लक्षूनियां झालों म्हणती देव । तोही नव्हे भाव सत्य जाणा ।।तु.गा.२८०२.००१।।

झालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहूं तेही निश्चिंतीनें ।।तु.गा.२८०२.००२।।
तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ।।तु.गा.२८०२.००३।।
कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ।।तु.गा.२८०२.००४।।
तुका म्हणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळां ।।तु.गा.२८०२.००५।।
घरोघरीं अवघें झालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजीं ।।तु.गा.२८०३.००१।।
निरें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ।।तु.गा.२८०३.००२।।
आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनि दिसतसे ।।तु.गा.२८०३.००३।।
काम क्रोध लोभ शिणवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ।।तु.गा.२८०३.००४।।
निंदा अहंकार द्वेष बहु फार । माजी वरी धूर सारीयला ।।तु.गा.२८०३.००५।।
तुका म्हणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोलें जाय वायांविण ।।तु.गा.२८०३.००६।।
देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासी ।।तु.गा.२८०४.००१।।
इंद्रियांचें गोडी ठकलीं बहुतें । सोडितां मागुतें आवरेना ।।तु.गा.२८०४.००२।।
युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ।।तु.गा.२८०४.००३।।
नाव नावरितां घाला घाली वारा । तैसा तो पसारा अहंतेचा ।।तु.गा.२८०४.००४।।
तुका म्हणे बुद्धी आपुलें आधीन । करी नारायण आतुडे तों ।।तु.गा.२८०४.००५।।
नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हें सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ।।तु.गा.२८०५.००१।।
काय करिसी वायां लटिकाची पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ।।तु.गा.२८०५.००२।।
मीच देव ऐसें सांगसी या लोकां । विषयांच्या सुखा टोकोनियां ।।तु.गा.२८०५.००३।।
अमृताची गोडी पुढिला सांगसी । आपण उपवासी मरोनियां ।।तु.गा.२८०५.००४।।
तुका म्हणे जरी राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ।।तु.गा.२८०५.००५।।
ब्रह्मज्ञान जरी एके दिवशीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ।।तु.गा.२८०६.००१।।
अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासें उफराटी दृष्टी केली ।।तु.गा.२८०६.००२।।
जनक भेटीसी पाठविला तेणें । अभिमाननाणें खोटें केलें ।।तु.गा.२८०६.००३।।

खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ।।तु.गा.२८०६.००४।।
जाऊनियां तेणें साधिली समाधी । तुका म्हणे तधीं होतों आम्ही ।।तु.गा.२८०६.००५।।
त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणाजोगें । एक जातां लागे । एक पाठीं लागतें ।।तु.गा.२८०७.००१।।
मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कृपे खांदा हरि वाहे ।।तु.गा.२८०७.००२।।
पापपुण्यात्म्याच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती । यावें काकुलती । तेथें सत्तानायका ।।तु.गा.२८०७.००३।।
तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकार निवडी । घातल्या सांगडी । ताफे पेटे हाकारी ।।तु.गा.२८०७.००४।।
लापणिकशब्दें  नातुडे हा देव । मनिंचा गुह्य भाव शुद्ध बोला ।।तु.गा.२८०८.००१।।
अंतरींचा भेद जाणे परमानंद । जयासी संवाद करणें लागे ।।तु.गा.२८०८.००२।।
तुका म्हणे जरी आपुलें स्वहित । तरी करीं चित्त शुद्ध भावें ।।तु.गा.२८०८.००३।।
आम्हां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ।।तु.गा.२८०९.००१।।
कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ।।तु.गा.२८०९.००२।।
अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्ण नाम ऐसे बाण ।।तु.गा.२८०९.००३।।
तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ।।तु.गा.२८०९.००४।।
नका धरुं कोणी । राग वचनाचा मनीं ।।तु.गा.२८१०.००१।।
येथें बहुतांचें हित । शुद्ध करोनि राखा चित्त ।।तु.गा.२८१०.००२।।
नाहीं केली निंदा । आम्हीं दूषिलेंसे भेदा ।।तु.गा.२८१०.००३।।
तुका म्हणे मज । येणेंविण काय काज ।।तु.गा.२८१०.००४।।
सेवितों हा रस वांटितों आणिकां । घ्यारे होऊं नका रानभरी ।।तु.गा.२८११.००१।।
विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ।।तु.गा.२८११.००२।।
मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धि याचे पायीं ।।तु.गा.२८११.००३।।
तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरुप ।।तु.गा.२८११.००४।।
कलियुगीं कवित्व करिती पाखांड। कुशळ हे भांड बहु झाले ।।तु.गा.२८१२.००१।।
द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी कोरडेंचि ।।तु.गा.२८१२.००२।।

दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ।।तु.गा.२८१२.००३।।
वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । न होती अलिप्त देहाहुनी ।।तु.गा.२८१२.००४।।
तुका म्हणे दंड साहील यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ।।तु.गा.२८१२.००५।।
साधक झाले कळी । गुरगुडीची लांब नळी ।।तु.गा.२८१३.००१।।
पचीं पडे मद्यपान । भांगभुर्का हें साधन ।।तु.गा.२८१३.००२।।
अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ।।तु.गा.२८१३.००३।।
चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भगपाळ ।।तु.गा.२८१३.००४।।
सेवा मानधन । बरे इच्छेनें संपन्न ।।तु.गा.२८१३.००५।।
सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां सोडी ।।तु.गा.२८१३.००६।।
गाजराची पुंगी । तैसें नवे झाले जोगी ।।तु.गा.२८१४.००१।।
काय करोनि पठन । केली अहंता जतन ।।तु.गा.२८१४.००२।।
अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ।।तु.गा.२८१४.००३।।
तुका म्हणे लंड । त्याचें हाणोनि फोडा तोंड ।।तु.गा.२८१४.००४।।
घालूनियां मध्यवर्ती । दाटुनि उपदेश देती ।।तु.गा.२८१५.००१।।
ऐसे पोटभरे संत । तया कैंचा भगवंत ।।तु.गा.२८१५.००२।।
रांडापोरांते गोविती । वर्षासनें ते लाविती ।।तु.गा.२८१५.००३।।
जैसे बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ।।तु.गा.२८१५.००४।।
तुका म्हणे तयां । तमोगुणियांची क्रिया ।।तु.गा.२८१५.००५।।
परद्रव्य परनारी । अभिळासुनि नाक धरीं ।।तु.गा.२८१६.००१।।
जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ।।तु.गा.२८१६.००२।।
सोंवळ्याची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ।।तु.गा.२८१६.००३।।
तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ।।तु.गा.२८१६.००४।।
भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ।।तु.गा.२८१७.००१।।

मनुष्याचे परी बोल रांवा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ।।तु.गा.२८१७.००२।।
तिमयाचे बैल करी शिकविलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे ।।तु.गा.२८१७.००३।।
तुका म्हणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ।।तु.गा.२८१७.००४।।
पुराणिक म्हणविती । जाणोनि कांदे ते भक्षिती ।।तु.गा.२८१८.००१।।
आगस्तीचें मूत्र मळ । लावुनि म्हणती कृष्णावळ ।।तु.गा.२८१८.००२।।
श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ।।तु.गा.२८१८.००३।।
बदराईच्या पाडी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ।।तु.गा.२८१८.००४।।
डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ।।तु.गा.२८१९.००१।।
तरी ते नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ।।तु.गा.२८१९.००२।।
मेळवूनि नरनारी । शकुन सांगे नानापरी ।।तु.गा.२८१९.००३।।
तुका म्हणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ।।तु.गा.२८१९.००४।।
कथा करोनियां दावी प्रेमकळा । अंतरीं जिव्हाळा कुकर्माचा ।।तु.गा.२८२०.००१।।
तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ।।तु.गा.२८२०.००२।।
टिळे टोपी माळा देवाचें गवाळें। वागवी ओंगळ पोटासाठी ।।तु.गा.२८२०.००३।।
गोसाव्याच्या रूपें हेरी परनारी । तयाचे अंतरीं काम लोभ ।।तु.गा.२८२०.००४।।
कीर्तनाचे वेळीं रडे पडे लोळे । प्रेमेविण डोळे गळताती ।।तु.गा.२८२०.००५।।
तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ।।तु.गा.२८२०.००६।।
होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ।।तु.गा.२८२१.००१।।
निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहाताती मान आदराचा ।।तु.गा.२८२१.००२।।
तुका म्हणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केवीं ।।तु.गा.२८२१.००३।।
लांबवूनि जटा नेसोनि कासोटा । अभिमान मोठा करिताती ।।तु.गा.२८२२.००१।।
सर्वांगा करिती विभूती लेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ।।तु.गा.२८२२.००२।।
तुका म्हणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्या वाद ।।तु.गा.२८२२.००३।।

कान फाडूनियां मुद्रा तें घालिती । नाथ म्हणविती जगामाजी ।।तु.गा.२८२३.००१ ।।
घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परि शंकरासी नोळखती ।।तु.गा.२८२३.००२ ।।
पोट भरावया शिकती उपाय । तुका म्हणे जाय नरकलोका ।।तु.गा.२८२३.००३ ।।
लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडें पोटासाठीं देशोदेशीं ।।तु.गा.२८२४.००१ ।।
नेसोनि कोपीन शुभ्रवस्त्र जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रींचें तें ।।तु.गा.२८२४.००२ ।।
तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ।।तु.गा.२८२४.००३ ।।
होऊनि जंगम विभूती लाविती । शंख वाजविती घरोघरीं ।।तु.गा.२८२५.००१ ।।
शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ।।तु.गा.२८२५.००२ ।।
तुका म्हणे त्यांसी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ।।तु.गा.२८२५.००३ ।।
टिळा टोपी ऊंच दावी । जगीं मी एक गोसावी ।।तु.गा.२८२६.००१ ।।
अवघा वरपंग सारा । पोटीं विषयांचा थारा ।।तु.गा.२८२६.००२ ।।
मुद्रा लाविती कोरोनी । मान व्हावयासी जनीं ।।तु.गा.२८२६.००३ ।।
तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ।।तु.गा.२८२६.००४ ।।
लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले ।।तु.गा.२८२७.००१ ।।
खायाचा वोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापशाला बोध कैंचा ।।तु.गा.२८२७.००२ ।।
सेवी भांग अफू तंबाखू उदंड। परि तो अखंड भ्रांतीमाजी ।।तु.गा.२८२७.००३ ।।
तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ।।तु.गा.२८२७.००४ ।।
संतचिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ।।तु.गा.२८२८.००१ ।।
पडिले दु:खाचे सागरीं । वहावलें भवपुरीं ।।तु.गा.२८२८.००२ ।।
कामक्रोधलोभ चित्तीं । वरि दाविती विरक्ती ।।तु.गा.२८२८.००३ ।।
आशापाशीं बांधोनि चित्त । म्हणती झालों आम्हीं मुक्त ।।तु.गा.२८२८.००४ ।।
त्यांचे लागले संगती । झाली त्यांसी तेचि गति ।।तु.गा.२८२८.००५ ।।
तुका म्हणे शब्दज्ञानें । जग नाडियेलें तेणें ।।तु.गा.२८२८.००६ ।।

ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करोनि म्हणती साधु ।।तु.गा.२८२९.००१।।
अंगा लावूनियां राख । डोळे झांकुनि करिती पाप ।।तु.गा.२८२९.००२।।
दावुनि वैराग्याची कळा। भोगी विषयांचा सोहळा।।तु.गा.२८२९.००३।।
तुका म्हणे सांगों किती । जळो तयांची संगती ।।तु.गा.२८२९.००४।।
कौडीकौडीसाठीं फोंडिताती शिर। काढूनि रुधीर मलंग ते।।तु.गा.२८३०.००१।।
पांघरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ।।तु.गा.२८३०.००२।।
तुका म्हणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळें तें वर्म गोविंदाचें ।।तु.गा.२८३०.००३।।
ऐसे संत झाले कळीं । तोंडीं तंमाखूची नळी ।।तु.गा.२८३१.००१।।
स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोढवली ।।तु.गा.२८३१.००२।।
भांगभुर्का हें साधन । पची पडे मद्यपान।।तु.गा.२८३१.००३।।
तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ।।तु.गा.२८३१.००४।।
ऐसे नाना भेष घेउनी हिंडती । पोटासाठीं घेती प्रतिग्रह ।।तु.गा.२८३२.००१।।
परमार्थासी कोण त्यजी संसार । सांगा पां साचार नांव त्याचें ।।तु.गा.२८३२.००२।।
जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका म्हणे ।।तु.गा.२८३२.००३।।
एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ।।तु.गा.२८३३.००१।।
पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ।।तु.गा.२८३३.००२।।
परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ।।तु.गा.२८३३.००३।।
तुका म्हणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ।।तु.गा.२८३३.००४।।
देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु ।।तु.गा.२८३४.००१।।
वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ।।तु.गा.२८३४.००२।।
शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणा हातीं ।।तु.गा.२८३४.००३।।
तुका म्हणे सार । भक्ति नेणती गव्हार ।।तु.गा.२८३४.००४।।
तक्र शिष्या मान । दुधा म्हणे नारायण ।।तु.गा.२८३५.००१।।

ऐशीं ज्ञानाचीं डोंबडें। आशा विटंबिलीं मूढें ।।तु.गा.२८३५.००२।।

उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ।।तु.गा.२८३५.००३।।

रसनाशिश्नाचे अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत ।।तु.गा.२८३५.००४।।

अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्तां हातीं चोट आहे ।।तु.गा.२८३६.००१।।

देव्हारा बैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिंपती तीं ।।तु.गा.२८३६.००२।।

एकीबेकीन्यायें होतसे प्रचित । तेणें लोक समस्त भुलताती ।।तु.गा.२८३६.००३।।

तयांचे स्वाधीन दैवतें असती । तरी कां मरती त्यांचीं पोरें ।।तु.गा.२८३६.००४।।

तुका म्हणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तोहि नव्हे ।।तु.गा.२८३६.००५।।

जगीं कीर्ति व्हावी । म्हणोनि झालासी गोसावी ।।तु.गा.२८३७.००१।।

बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलें तें दूर ।।तु.गा.२८३७.००२।।

चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ।।तु.गा.२८३७.००३।।

तुका म्हणे शिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ।।तु.गा.२८३७.००४।।

काहे लकडा घांस कटावे । खोद हि जुमीन मठ बनावे ।।तु.गा.२८३८.००१।।

देवलवासी तरुवरछाया । घरघर माई खपरि सबमाया ।।तु.गा.२८३८.००२।।

कां छांडियें भार फेर सीर मागें । मायाको दु:ख मिटलिये अंगें ।।तु.गा.२८३८.००३।।

कहे तुका तुम सुनो हो सिद्धा । रामबिन और झुटा कछु धंदा ।।तु.गा.२८३८.००४।।

न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करितसे ।।तु.गा.२८३९.००१।।

विश्वामित्री पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चांडाळाचें ।।तु.गा.२८३९.००२।।

द्रव्यइच्छेसाठीं करितसे कथा । काय त्या पापिष्टा न मिळे खाया ।।तु.गा.२८३९.००३।।

पोट पोसावया तोंडें बडबडी । नाहीं धडफुडी एक गोष्टी ।।तु.गा.२८३९.००४।।

तुका म्हणे तया काय व्याली रांड । येउनियां भांड जनामध्यें ।।तु.गा.२८३९.००५।।

ब्रह्मज्ञान भरोवरी । सांगे आपण न करी ।।तु.गा.२८४०.००१।।

थू थू त्याच्या तोंडावरी । व्यर्थ शिणविली वैखरी ।।तु.गा.२८४०.००२।।

कथा करी वरी वरी । प्रेम नसेचि अंतरीं ।।तु.गा.२८४०.००३।।
तुका म्हणे कवित्व करी । मान लोभ हे अंतरीं ।।तु.गा.२८४०.००४।।
मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन आणि मान ।।तु.गा.२८४१.००१।।
ऐशियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ।।तु.गा.२८४१.००२।।
पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ।।तु.गा.२८४१.००३।।
विरळा ऐसा कोणी । तुका त्यासी लोटांगणी ।।तु.गा.२८४१.००४।।
माया ब्रह्म ऐसें म्हणती धर्मठक । आपणासरीसे लोक नागविले ।।तु.गा.२८४२.००१।।
विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नांद्या होऊनि फिरें ।।तु.गा.२८४२.००२।।
करूनि खातां पाक जिरे सुरण राई । करितां आतित्याई दुःख पावे ।।तु.गा.२८४२.००३।।
औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ।।तु.गा.२८४२.००४।।
तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्याचीं ।।तु.गा.२८४२.००५।।
तुका म्हणे जयां पिंडाचें पाळण । न घडे नारायण भेटे तयां ।।तु.गा.२८४२.००६।।
अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ।।तु.गा.२८४३.००१।।
नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मती पाषांडिया ।।तु.गा.२८४३.००२।।
जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसि ।।तु.गा.२८४३.००३।।
तुका म्हणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला देव ।।तु.गा.२८४३.००४।।
जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण तेचि मुक्ति पाषांड्याची ।।तु.गा.२८४४.००१।।
पिंडाच्या पोषकें नागविले जन । लटिकें पुराण केले वेद ।।तु.गा.२८४४.००२।।
मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाहीं पुन्हां ।।तु.गा.२८४४.००३।।
तुका म्हणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ।।तु.गा.२८४४.००४।।
शब्दज्ञानी येऊं नेदी दृष्टीपुढें । छळवादी कुडें अभक्त ते ।।तु.गा.२८४५.००१।।
जळो ते जाणीव जळो त्यांचें बंड । जळो तया तोंड दुर्जनाचें ।।तु.गा.२८४५.००२।।
तुका म्हणे येती दाटूनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरुं भीड ।।तु.गा.२८४५.००३।।

अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं बोध कैंचा ।।तु.गा.२८४६.००१।।
अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ।।तु.गा.२८४६.००२।।
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ।।तु.गा.२८४६.००३।।
अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ।।तु.गा.२८४६.००४।।
तुका म्हणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ।।तु.गा.२८४६.००५।।
शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ।।तु.गा.२८४७.००१।।
पंडित हें ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा ।।तु.गा.२८४७.००२।।
तुका म्हणे जैसी लांचासाठीं ग्वाही । देतील हे ठावी नाहीं वस्तु ।।तु.गा.२८४७.००३।।
उचित न कळे इंद्रियांचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ।।तु.गा.२८४८.००१।।
आपण जाऊन न्यावें नरकास । बळें बेताळीस कुळें जग ।।तु.गा.२८४८.००२।।
अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वायां दंभासाठीं ।।तु.गा.२८४८.००३।।
तुका म्हणे आम्ही तेथील पारखी । नाचें देखोवेखीं जाणों खरें ।।तु.गा.२८४८.००४।।
पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टिभेटी न हो त्याची ।।तु.गा.२८४९.००१।।
नाहीं संतचिन्हें उमटलीं अंगीं । उपदेशा लागीं पात्र झाला ।।तु.गा.२८४९.००२।।
पोहों नयें कासे लाविती आणिका । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ।।तु.गा.२८४९.००३।।
शिणलें तें गेलें शिणलियापासीं । झाली त्या दोघांसी एक गति ।।तु.गा.२८४९.००४।।
तुका म्हणे अहो देवा दिनानाथा । दरुषण आतां नको त्याचें ।।तु.गा.२८४९.००५।।
कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ।।तु.गा.२८५०.००१।।
त्यासी आतां रिझे कोण । जवळीं जातां चिळसवाणें ।।तु.गा.२८५०.००२।।
प्रेत देह गौरविलें । तैसें विटंबवाणें झालें ।।तु.गा.२८५०.००३।।
तुका म्हणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धिचेष्टा ।।तु.गा.२८५०.००४।।
घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिलाषी ।।तु.गा.२८५१.००१।।
तो येथें कामा नये । नरका जाय म्हणोनि ।।तु.गा.२८५१.००२।।

विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलांचें ।।तु.गा.२८५१.००३।।
तुका म्हणे दांभिक तो । नरका जातो स्वइच्छा ।।तु.गा.२८५१.००४।।
तांतडीची धांव आंगा आणी भाग । खोळंबा तो मग निश्चिंतीचा ।।तु.गा.२८५२.००१।।
म्हणउनि बरी विचाराची चाली । उरीची ते बोली कामा येते ।।तु.गा.२८५२.००२।।
कोरडें वैराग्य माजिरा बडिवार । उतरे तो शूर अंगींचें तें ।।तु.गा.२८५२.००३।।
तुका म्हणे बरी झऱ्याची ते चाली । सांठवण्या खोली कासयाची ।।तु.गा.२८५२.००४।।
लटिक्याचे आवतणें जेविलीया साचें । काय त्या विश्वास तोचि खरा ।।तु.गा.२८५३.००१।।
कोल्हाटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ।।तु.गा.२८५३.००२।।
जळमंडप्याचे घोडे राउत नाचती । ते काय तगती युद्धालागीं ।।तु.गा.२८५३.००३।।
तुका म्हणे तैसें मतवादीचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांचि ।।तु.गा.२८५३.००४।।
भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ।।तु.गा.२८५४.००१।।
वाढवुनि जटा फिरे दाही दिशा । तरी जंबु वेषा सहज स्थिति ।।तु.गा.२८५४.००२।।
कोरोनियां भूमी करी मध्यें वास । तरी उंदिरास काय वाणी ।।तु.गा.२८५४.००३।।
तुका म्हणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंचि ।।तु.गा.२८५४.००४।।
वाघाचा कलभूत दिसे वाघाऐसा । परी नाहीं दशा साच अंगीं ।।तु.गा.२८५५.००१।।
बाहेरील रंग निवडी कसोटी । संघष्टणें भेटी आपोआप ।।तु.गा.२८५५.००२।।
शिकविलें तैसें नाचावें माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ।।तु.गा.२८५५.००३।।
तुका म्हणे करी लटिक्याचा सांठा । फजित तो खोटा शीघ्र होय ।।तु.गा.२८५५.००४।।
जातीचें तें चढें प्रेम । पक्षी स्मरे रामराम ।।तु.गा.२८५६.००१।।
ते काय गुण लागती येरां । कागा न शोभे पिंजरा ।।तु.गा.२८५६.००२।।
शिकविलें तें सुजात सोसी । मग मोल चढे त्यासी ।।तु.गा.२८५६.००३।।
तुका म्हणे वेषधारी । हिजड्या नव्हती त्या नारी ।।तु.गा.२८५६.००४।।
तांबियाचें नाणे न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं ।।तु.गा.२८५७.००१।।

करणीचें कांहीं न मनें सज्जना । यावें लागें मना वृद्धांचिया ।।तु.गा.२८५७.००२।।
हिरियासारिखा दिसे शिरगोळा । पारखी ते डोळां न पाहाती ।।तु.गा.२८५७.००३।।
देऊनियां भिंग कमाविलें मोतीं । पारखिया हातीं घेतां नये ।।तु.गा.२८५७.००४।।
तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हे चित्त आपणा ग्वाही ।।तु.गा.२८५७.००५।।
दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ।।तु.गा.२८५८.००१।।
तैसें खळामुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ।।तु.गा.२८५८.००२।।
काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वायां गेली ।।तु.गा.२८५८.००३।।
तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैसी संसर्गें ।।तु.गा.२८५८.००४।।
वरी वरी बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं झाली ।।तु.गा.२८५९.००१।।
पराव्याचे भार पाहुनियां दृष्टी । कांपतसें पोटीं थरथरां ।।तु.गा.२८५९.००२।।
मनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारितसे ।।तु.गा.२८५९.००३।।
धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ।।तु.गा.२८५९.००४।।
तुका म्हणे साधु बोले खर्गधार । खोंचतें अंतर दुर्जनाचें ।।तु.गा.२८५९.००५।।
लटिकी ग्वाही सभेआंत । देतां पतित आगळा ।।तु.गा.२८६०.००१।।
कुंभपाकीं वस्ती करूं । होय धुरु कुळेंसी ।।तु.गा.२८६०.००२।।
रजस्वला रुधिर स्त्रवे । तेंचि द्यावें तृषेसी ।।तु.गा.२८६०.००३।।
तुका म्हणे जन्मा आला । काळ झाला कुळासी ।।तु.गा.२८६०.००४।।
चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ।।तु.गा.२८६१.००१।।
शिंदळीच्या मागें वेचितां पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ।।तु.गा.२८६१.००२।।
तुका म्हणे भितो पुढिलिया दत्ता । म्हणऊनि चिंता उपजली ।।तु.गा.२८६१.००३।।
एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलीया साधे काय तेथें ।।तु.गा.२८६२.००१।।
काय हातीं लागे भुसाचें कांडणीं । सत्यासी दाटणीं करूनि काय ।।तु.गा.२८६२.००२।।
कवित्वाचें रूढी पायां पडे जग । सुखावोनि मग नरका जाय ।।तु.गा.२८६२.००३।।

तुका म्हणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ।।तु.गा.२८६२.००४।।
कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणिक नाहीं ।।तु.गा.२८६३.००१।।
पावेल गौरव वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतांचें ।।तु.गा.२८६३.००२।।
शब्दज्ञानी एक आपुलाली मतें । सांगती वेदांत भिन्नभावें ।।तु.गा.२८६३.००३।।
तुका म्हणे एक भाव न धरिती । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ।।तु.गा.२८६३.००४।।
भजन हें नासिलें हेंडी । दंभा लंडी आवडी ।।तु.गा.२८६४.००१।।
जेवीत ना आइता पाक । नासी ताक घुसळूनि ।।तु.गा.२८६४.००२।।
एकाएकीं इच्छी पाट । नेणे चाट काउळें ।।तु.गा.२८६४.००३।।
तुका म्हणे मुलाम्याचें । बंधन साचें शेवटीं ।।तु.गा.२८६४.००४।।
तरी कां वोळगणें । राजद्वारीं होती सुने ।।तु.गा.२८६५.००१।।
अंगीं दावूनि निष्कामता । पोकळ पोकळी ते वृथा ।।तु.गा.२८६५.००२।।
कासया मोकळ । भोंवतें शिष्यांचें गाबाळ ।।तु.गा.२८६५.००३।।
तुका म्हणे ढाळे । बाहेर मुदे तें निराळें ।।तु.गा.२८६५.००४।।
इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम म्हणोनि काई ।।तु.गा.२८६६.००१।।
जेवी मासीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ।।तु.गा.२८६६.००२।।
कीर्तन करावें । तैसें करूनि दावावें ।।तु.गा.२८६६.००३।।
हे तों अंगीं नाहीं चिन्हें । गाईलें वेश्येच्या ढव्यानें ।।तु.गा.२८६६.००४।।
तुका म्हणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ।।तु.गा.२८६६.००५।।
गुळें माखोनियां दगड ठेविला । वरी दिसे भला लोकाचारीं ।।तु.गा.२८६७.००१।।
अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसे । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ।।तु.गा.२८६७.००२।।
ऐसिया दांभिकां कैंचि हरिसेवा । नेणेचि सद्भावा कोणे काळीं ।।तु.गा.२८६७.००३।।
तुका म्हणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ।।तु.गा.२८६७.००४।।
चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गरभार बोभाट जनामध्यें ।।तु.गा.२८६८.००१।।

लटकेची डोहळे दाखवी प्रकार । दूध स्तनीं पोर पोटीं नाहीं ।।तु.गा.२८६८.००२।।
तुका म्हणे अंतीं वांज तेचि खरी । फजिती दुसरी जनामध्यें ।।तु.गा.२८६८.००३।।
वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ।।तु.गा.२८६९.००१।।
तेवीं शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ।।तु.गा.२८६९.००२।।
बोलाचीच कढी बोलाचाची भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ।।तु.गा.२८६९.००३।।
कागदीं लिहितां नामाची साखर । चाटितां मधुर गोडी नेदी ।।तु.गा.२८६९.००४।।
तुका म्हणे जळो जळो हे महंती । नाहीं लाज चित्तीं निसुगाला ।।तु.गा.२८६९.००५।।
व्याल्याविण करी शोभन तांतडी । चार ते गधडी करीतसे ।।तु.गा.२८७०.००१।।
कासया पाल्हाळ आणिकांचे देखी । सांगतां नव्हे सुखी साखरेसी ।।तु.गा.२८७०.००२।।
कुंथाच्या ढेंकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टी मळिण वरी ।।तु.गा.२८७०.००३।।
तुका म्हणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंविण नका वांव घेऊं ।।तु.गा.२८७०.००४।।
तरलों म्हणुनि धरिला ताठा । त्यांसी चळ झाला फांटा ।।तु.गा.२८७१.००१।।
वायांविण तुटें दोड । मान सुख इच्छी भांड ।।तु.गा.२८७१.००२।।
ग्वाहीविण मात । स्थापी आपुली स्वतंत्र।।तु.गा.२८७१.००३।।
तुका म्हणे ऐसीं किती । नरका गेलीं अधोगती ।।तु.गा.२८७१.००४।।
जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ।।तु.गा.२८७२.००१।।
मैथुनाचें सुख सांगितल्या खूण। अनुभवाविण कळों नये ।।तु.गा.२८७२.००२।।
तुका म्हणे जळों शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ।।तु.गा.२८७२.००३।।
जपाचें निमित्त झोपेचा पसर । देहाचा विसर पाडूनियां ।।तु.गा.२८७३.००१।।
ऐसें तें भजन अमंगळवाणी । सोंगसंपादणी बहुरूप्याची ।।तु.गा.२८७३.००२।।
सेवेसी विकीलें देहाचिया आसे । तया कोठें असे उरला देव ।।तु.गा.२८७३.००३।।
तुका म्हणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आम्ही ।।तु.गा.२८७३.००४।।
माझी पाठ करा कवी । उठ लावी दारोदार ।।तु.गा.२८७४.००१।।

तंव तया पारखी सिव । लाजे ठाव सांडितां ।।तु.गा.२८७४.००२।।
उष्टावळी करूनि जमा । कुंथुनि प्रेमा आणितसे ।।तु.गा.२८७४.००३।।
तुका म्हणे बाहेरमुदी । आहाच गोविंदीं न सरती ।।तु.गा.२८७४.००४।।
न मनी नाम नमनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी ।।तु.गा.२८७५.००१।।
भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं।।तु.गा.२८७५.००२।।
नाहीं चाड देवाची कांहीं । छळण टोंकें तस्करघाई ।।तु.गा.२८७५.००३।।
तुका म्हणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग ।।तु.गा.२८७५.००४।।
मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ।।तु.गा.२८७६.००१।।
तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ।।तु.गा.२८७६.००२।।
वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ।।तु.गा.२८७६.००३।।
काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे नलगे वाती ।।तु.गा.२८७६.००४।।
उभ्या बाजारांत कथा । हे तों नावडे पंढरीनाथा।।तु.गा.२८७७.००१।।
अवघें पोटासाठीं सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ।।तु.गा.२८७७.००२।।
लावी अनुसंधान । कांहीं देईल म्हणवून ।।तु.गा.२८७७.००३।।
काय केलें रांडलेंका । तुला राजी नाहीं तुका ।।तु.गा.२८७७.००४।।
वरि वरि बोला रस । कथी ज्ञान माजी फोस ।।तु.गा.२८७८.००१।।
ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना परलोक ।।तु.गा.२८७८.००२।।
परिसे एक सांगे । अंगा धुळीही न लगे ।।तु.गा.२८७८.००३।।
तुका म्हणे हाडें । कुतऱ्या लाविले झगडे ।।तु.गा.२८७८.००४।।
गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ।।तु.गा.२८७९.००१।।
नाठेळाची भक्ति कुचराचें बळ । कोरडें बोंगळ मार खाय ।।तु.गा.२८७९.००२।।
सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा दावी ।।तु.गा.२८७९.००३।।
तुका म्हणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धिंदधिंद शिंदळीचे ।।तु.गा.२८७९.००४।।

मोल देऊनियां सांठवावे दोष । नटाचे ते वेष पाहोनियां ।।तु.गा.२८८०.००१ ।।
हरिदांसा मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यापुण्य विशेषता ।।तु.गा.२८८०.००२ ।।
हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेषें । पाप त्या सरिसें मात्रागमन ।।तु.गा.२८८०.००३ ।।
तुका म्हणे पाहा ऐसे झाले जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ।।तु.गा.२८८०.००४ ।।
उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ।।तु.गा.२८८१.००१ ।।
ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ।।तु.गा.२८८१.००२ ।।
तुका म्हणे एका नारायणा ध्याईं । वरकडा वाही शोक असे ।।तु.गा.२८८१.००३ ।।
पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ।।तु.गा.२८८२.००१ ।।
आत्महत्यारा हा विषयांचा लोभी । म्हणावें तें नाभी करवी दंड ।।तु.गा.२८८२.००२ ।।
नागवला अल्प लोभाचिये साठीं । घेऊनि कांचवटि परिस दिला ।।तु.गा.२८८२.००३ ।।
तुका म्हणे हात झाडिलें परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं ठेवी केली ।।तु.गा.२८८२.००४ ।।
पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं विषयांचे ।।तु.गा.२८८३.००१ ।।
ठेवूनियां लोभीं लोभ । झाला क्षोभ आत्मत्वीं ।।तु.गा.२८८३.००२ ।।
केला आणिकां वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ।।तु.गा.२८८३.००३ ।।
तुका म्हणे मोठा घात । वाताहात हा देह ।।तु.गा.२८८३.००४ ।।
आशाबद्ध वक्ता । भय श्रोतयाच्या चित्ता ।।तु.गा.२८८४.००१ ।।
गातों तेंचि नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं द्यावें ।।तु.गा.२८८४.००२ ।।
झालें लोभाचें मांजर । पोट भरी दारोदार ।।तु.गा.२८८४.००३ ।।
वायां गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ।।तु.गा.२८८४.००४ ।।
बहिरमुख एके ठायीं । तैंसे झालें तया दोहीं ।।तु.गा.२८८४.००५ ।।
माप आणि गोणी। तुका म्हणे रितीं दोन्हीं ।।तु.गा.२८८४.००६ ।।
नाइकावे कानीं तयाचें ते बोल। भक्तीविण फोल ज्ञान सांगे ।।तु.गा.२८८५.००१ ।।
वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दु:ख पावे शीण श्रोता वक्ता ।।तु.गा.२८८५.००२ ।।

अहं ब्रह्म म्हणोनि पाळीतसे पिंडा । न बोलावें भांडा तयासवें ।।तु.गा.२८८५.००३।।
वेदबाह्य लंड बोले जो पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ।।तु.गा.२८८५.००४।।
तुका म्हणे खंडी देवभक्तपण । वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ।।तु.गा.२८८५.००५।।
पंडित म्हणतां थोर सुख । परि तो पाहतां अवघा मूर्ख ।।तु.गा.२८८६.००१।।
काय करावें घोकिलें । वेदपठण वायां गेले ।।तु.गा.२८८६.००२।।
वेदीं सांगितलें न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ।।तु.गा.२८८६.००३।।
हा वेदींचा अनुभव । तुका देखे जीव शिव ।।तु.गा.२८८६.००४।।
जैंसें दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे।।तु.गा.२८८७.००१।।
दुःख पावायाचें मूळ । राहाणी ठाव नाहीं ताळ ।।तु.गा.२८८७.००२।।
माळामुद्रांवरी । कैंचा सोंगें जोडे हरि ।।तु.गा.२८८७.००३।।
तुका म्हणे देखें । ऐसे परीचीं बहुतेकें ।।तु.गा.२८८७.००४।।
वसणें थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ।।तु.गा.२८८८.००१।।
नाहीं देखिला ना ठावा । तोंडपिटीं करी हांवा ।।तु.गा.२८८८.००२।।
फुगतें काउळें । म्हणे मी राजहंसा आगळें ।।तु.गा.२८८८.००३।।
गजाहूनि खर । म्हणे चांगला मी फार ।।तु.गा.२८८८.००४।।
मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ।।तु.गा.२८८८.००५।।
कोरड्या गोष्टी चावट्या बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ।।तु.गा.२८८९.००१।।
कोण याचें मना आणी। ऐकों कानीं नाइकोनि।।तु.गा.२८८९.००२।।
घरोघरीं सांगती ज्ञान । भूस शीण कांडती ।।तु.गा.२८८९.००३।।
तुका म्हणे आपुल्या मति । काय रितीं पोकळ ।।तु.गा.२८८९.००४।।
निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ।।तु.गा.२८९०.००१।।
जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ।।तु.गा.२८९०.००२।।
शृंगारिलें मढें । जीवेंवीण जैसें कुडें ।।तु.गा.२८९०.००३।।

तुका म्हणे रागें । भलतें चावळें वाउगें ।।तु.गा.२८९०.००४।।
भक्त म्हणवूनि वंचावें तें जावें । तेणें शेण खावें कशासाठीं ।।तु.गा.२८९१.००१।।
नासिलें अडबंद कौपिन माळा । अडचण राउळामाजी केली ।।तु.गा.२८९१.००२।।
अंगीकारिले सेवे घडे अंतराय । तया जाला न्याय खापराचा ।।तु.गा.२८९१.००३।।
तुका म्हणे कोठें तगों येती घाणी । आहाच ही मनीं अधीरता ।।तु.गा.२८९१.००४।।
कथें उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ।।तु.गा.२८९२.००१।।
येथें तो पातकी न येताच भला । रणीं कुचराला काय चाले ।।तु.गा.२८९२.००२।।
कथें बैसोनी आणीक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ।।तु.गा.२८९२.००३।।
तुका म्हणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ।।तु.गा.२८९२.००४।।
नावडे ज्यां कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे वोजा ।।तु.गा.२८९३.००१।।
तो असे जवळी गोंचिडाच्यान्यायें । देशत्यागें ठाय तया दुरी ।।तु.गा.२८९३.००२।।
नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ।।तु.गा.२८९३.००३।।
तुका म्हणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ।।तु.गा.२८९३.००४।।
जवळीं नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ।।तु.गा.२८९४.००१।।
कैसा पाहे चंद्रीदृष्टी । दीप स्नेहाच्या शेवटीं ।।तु.गा.२८९४.००२।।
कांतलेंसें श्वान । तैसें दिशा हिंडे मन ।।तु.गा.२८९४.००३।।
त्याचें कानीं हाणे । कोण बोंब तुका म्हणे ।।तु.गा.२८९४.००४।।
काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें ।।तु.गा.२८९५.००१।।
करी अक्षरांची आटी । एके कवडीचेसाठीं ।।तु.गा.२८९५.००२।।
निंदी कोणी स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ।।तु.गा.२८९५.००३।।
तुका म्हणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ।।तु.गा.२८९५.००४।।
ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि। पाहा श्रुतीमधीं विचारूनि ।।तु.गा.२८९६.००१।।
जयासी नावडे हरिनाम कीर्तन । आणीक नर्तन वैष्णवांचें ।।तु.गा.२८९६.००२।।

सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ।।तु.गा.२८९६.००३।।
तुका म्हणे येथें मानी आनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ।।तु.गा.२८९६.००४।।
आमुची गोसावी अयाचित्त वृत्ती । करवी शिष्या हातीं उपदेश ।।तु.गा.२८९७.००१।।
दगडाची नाव आधींच ते जड। ते काय दगड तारूं जाणे ।।तु.गा.२८९७.००२।।
तुका म्हणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंगसंपादणी करिती परी ।।तु.गा.२८९७.००३।।
भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ।।तु.गा.२८९८.००१।।
धिग त्याचें साधुपण । विटाळूनि वर्ते मन ।।तु.गा.२८९८.००२।।
नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवीं आस ।।तु.गा.२८९८.००३।।
हें ना तैसें झालें । तुका म्हणे वायां गेलें ।।तु.गा.२८९८.००४।।
घरोघरीं झाले कवि । नेणे प्रसादाची चवी ।।तु.गा.२८९९.००१।।
लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ।।तु.गा.२८९९.००२।।
काढावें आइतें । तेंचि जोडावें स्वहितें ।।तु.गा.२८९९.००३।।
तुका म्हणे कळे । अहाच झांकतील डोळे ।।तु.गा.२८९९.००४।।
कवीश्वरांचा तो आम्हांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ।।तु.गा.२९००.००१।।
दंभाची आवडी बहिरट अंधळे । शेवटासि काळें होइल तोंड ।।तु.गा.२९००.००२।।
सोन्याशेजारीं तों लाखेची जतन । सतत ते गुण जैसेतैसे ।।तु.गा.२९००.००३।।
सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका म्हणे गोवी पावती हीं ।।तु.गा.२९००.००४।।
जळो तैसा प्रेमरंग । जाय भुलोनि पतंग ।।तु.गा.२९०१.००१।।
सासुसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ।।तु.गा.२९०१.००२।।
मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ।।तु.गा.२९०१.००३।।
जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं नये हातीं ।।तु.गा.२९०१.००४।।
बक ध्यान धरी । दावी सोंग मत्स्य मारी ।।तु.गा.२९०१.००५।।
तुका म्हणे सर्प डुले । तैसा कथेमाजी खुले ।।तु.गा.२९०१.००६।।

संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ।।तु.गा.२९०२.००१।।
किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणें हित जवळी तें ।।तु.गा.२९०२.००२।।
माजल्या न कळे उचित तें काय । न द्यावें तें खाय द्यावें सांडी ।।तु.गा.२९०२.००३।।
तुका म्हणे घेती भिंतीसवें डोकें । वावसी तें एकें अंधारली ।।तु.गा.२९०२.००४।।
अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ।।तु.गा.२९०३.००१।।
काय करावें तें मौन । दाही दिशा हिंडें मन ।।तु.गा.२९०३.००२।।
बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ।।तु.गा.२९०३.००३।।
नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ।।तु.गा.२९०३.००४।।
सारविलें निकें । वरि माजीं अवघें फिकें ।।तु.गा.२९०३.००५।।
तुका म्हणे अंतीं । कांहीं न लगेचि हातीं ।।तु.गा.२९०३.००६।।
काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ।।तु.गा.२९०४.००१।।
अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ।।तु.गा.२९०४.००२।।
काय उंदीर नाहीं धांवीं । राख न लावी गाढव ।।तु.गा.२९०४.००३।।
तुका म्हणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ।।तु.गा.२९०४.००४।।
काय धोविलें कातडें । काळकूट भीतरि कुडें ।।तु.गा.२९०५.००१।।
उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ।।तु.गा.२९०५.००२।।
घेसी बुंथी पानवथां । उगाच हालविसी माथा ।।तु.गा.२९०५.००३।।
लावूनि बैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं।।तु.गा.२९०५.००४।।
हालवीत बैसे माळा । विषय जप वेळोवेळां ।।तु.गा.२९०५.००५।।
तुका म्हणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ।।तु.गा.२९०५.००६।।
काय काशी करिती गंगा । भीतरीं चांगा नाहीं तो ।।तु.गा.२९०६.००१।।
अधणीं कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासी ।।तु.गा.२९०६.००२।।
काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ।।तु.गा.२९०६.००३।।

तुका म्हणे प्रेमेंविण । बोले भुंके अवघा शीण ।।तु.गा.२९०६.००४।।
काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ।।तु.गा.२९०७.००१।।
जया न फळे उपदेश । धस ऐसें त्या नांव ।।तु.गा.२९०७.००२।।
काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ।।तु.गा.२९०७.००३।।
तुका म्हणे कुचर दाणा । तैसा म्हणा डेंग हा ।।तु.गा.२९०७.००४।।
नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ।।तु.गा.२९०८.००१।।
तैसें चित्त शुद्ध नाहीं । तेथें बोध करील काई ।।तु.गा.२९०८.००२।।
वृक्ष न धरी पुष्प फळ । काय करील वसंत काळ ।।तु.गा.२९०८.००३।।
वांझा न होती लेकुरें । काय करावें भ्रतारें ।।तु.गा.२९०८.००४।।
नपुंसका पुरुषासी । काय करील बाईल त्यासी ।।तु.गा.२९०८.००५।।
प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ।।तु.गा.२९०८.००६।।
तुका म्हणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ।।तु.गा.२९०८.००७।।
काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ।।तु.गा.२९०९.००१।।
तरी काय तेथें असतीं थोडीं । काय जोडी तयांसी ।।तु.गा.२९०९.००२।।
रिघतां धांवा पेंवामधीं । जोड सिद्धि ते ठायीं ।।तु.गा.२९०९.००३।।
काय भस्म करील राख । अंतर पाख नाहीं तों ।।तु.गा.२९०९.००४।।
वर्णआश्रमाचे धर्म । जाती श्रम झालिया ।।तु.गा.२९०९.००५।।
तुका म्हणे सोंगपाश । निरसे आस तें हित ।।तु.गा.२९०९.००६।।
भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ।।तु.गा.२९१०.००१।।
टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदी जगीं फासे जैसे ।।तु.गा.२९१०.००२।।
ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ।।तु.गा.२९१०.००३।।
खाटिक हा स्नेहवादें पशू पाळी । कापावया नळी तयासाठीं ।।तु.गा.२९१०.००४।।
तुका म्हणे तैसा भला मी लोकांत । परि तूं कृपावंत पांडुरंगा ।।तु.गा.२९१०.००५।।

मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ।।तु.गा.२९११.००१ ।।
ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ।।तु.गा.२९११.००२ ।।
बोलो जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ।।तु.गा.२९११.००३ ।।
तुका म्हणे बहु तोंडें जे वाचाळ । तें गे तेंचि मूळ लटिक्याचें ।।तु.गा.२९११.००४ ।।
आवडीच्या मतें करिती भोजना । भोग नारायणा म्हणती केला ।।तु.गा.२९१२.००१ ।।
अवघा देव म्हणे वेगळें तें काई । अर्थासाठीं डोई फोडूं पाहे ।।तु.गा.२९१२.००२ ।।
लाजे कमंडलु धरितां भोपळा । आणीक थीगळा प्रावरणासी ।।तु.गा.२९१२.००३ ।।
शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं । नैश्वर्य बोलती अवघें मुखें ।।तु.गा.२९१२.००४ ।।
तुका म्हणे त्यास देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटी जन्म घेतां ।।तु.गा.२९१२.००५ ।।
भिक्षापात्र अवलंबणें । जळों जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षिजे सर्वथा ।।तु.गा.२९१३.००१ ।।
देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं तों हा व्यभिचार ।।तु.गा.२९१३.००२ ।।
जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि अविश्वास ।।तु.गा.२९१३.००३ ।।
काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ।।तु.गा.२९१३.००४ ।।
आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ।।तु.गा.२९१४.००१ ।।
करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ।।तु.गा.२९१४.००२ ।।
भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ।।तु.गा.२९१४.००३ ।।
तुका म्हणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ।।तु.गा.२९१४.००४ ।।
वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चिती देव नाहीं ।।तु.गा.२९१५.००१ ।।
भाडेकरी वाहे पाठीवरी भार। अंतरींचें सार लाभ नाहीं ।।तु.गा.२९१५.००२ ।।
देवपुजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ।।तु.गा.२९१५.००३ ।।
तुका म्हणे फळ चिंतिती आदर । लाघव हे चार शिंदळीचे ।।तु.गा.२९१५.००४ ।।
तीळ जाळिलें तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ।।तु.गा.२९१६.००१ ।।
कां रे शिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ।।तु.गा.२९१६.००२ ।।

मानदंभ पोटासाठीं । केली अक्षरांची आटी ।।तु.गा.२९१६.००३।।
तप करूनि तीर्थाटण । वाढविला अभिमान ।।तु.गा.२९१६.००४।।
वांटिलें तें धन । केली अहंता जतन ।।तु.गा.२९१६.००५।।
तुका म्हणे चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ।।तु.गा.२९१६.००६।।
वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ।।तु.गा.२९१७.००१।।
राग आळवितों नाना । गातों काय तें कळेना ।।तु.गा.२९१७.००२।।
आशा धरोनि मनीं । कांहीं देईल म्हणऊनि ।।तु.गा.२९१७.००३।।
पोटा एका साठीं । तुका म्हणे झाले कष्टी ।।तु.गा.२९१७.००४।।
कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ।।तु.गा.२९१८.००१।।
कैसीं ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ।।तु.गा.२९१८.००२।।
भूस उपणुनि केलें काय । हारपलें दोन्ही ठाय ।।तु.गा.२९१८.००३।।
तुका म्हणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां ।।तु.गा.२९१८.००४।।
काळतोंडा सुना । भलतें चोरुनि करी जना ।।तु.गा.२९१९.००१।।
धिग त्याचें साधुपण । विटाळुनि वर्ते मन ।।तु.गा.२९१९.००२।।
मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ।।तु.गा.२९१९.००३।।
तुका म्हणे थीत । नागवला नव्हे हित ।।तु.गा.२९१९.००४।।
विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड जैसा ।।तु.गा.२९२०.००१।।
वादावाद करणें त्यासी तोंचि वरी । गुखाडीची चाड सरे तोंच बाहेरी ।।तु.गा.२९२०.००२।।
सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठा । चिकरूनि सांडी पायां लागली ते विष्ठा ।।तु.गा.२९२०.००३।।
नाहीं याति कुळ फांसे ओढी तयासी । तुका म्हणे काय मुद्रासोंग जाळिसी ।।तु.गा.२९२०.००४।।
एक म्हणती आम्ही देवची पैं झालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ।।तु.गा.२९२१.००१।।
एक म्हणती आम्ही देवाचीं पैं रूपें । तुमचिया बापें न चुके जन्म ।।तु.गा.२९२१.००२।।
देवें उचलीली स्वमुखें मेदिनी । तुमचेनी गोणी नुचलवे ।।तु.गा.२९२१.००३।।

देवें मारियेलें दैत्य दानव मोठे । तुमचेनी न तुटे तृणमात्र ।।तु.गा.२९२१.००४।।
राया विठोबाचें पद जो अभिळासी । पातकांची राशी तुका म्हणे ।।तु.गा.२९२१.००५।।
गासी तरी एक विठ्ठलची गाईं । नाहीं तरि ठायीं राहें उगा ।।तु.गा.२९२२.००१।।
अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा शीण करिसी वायां ।।तु.गा.२९२२.००२।।
तुका म्हणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ।।तु.गा.२९२२.००३।।
मुकें होतां काय पदरींचें जातें । मूर्ख तें भोगितें मीमीपण ।।तु.गा.२९२३.००१।।
आपुलिये घरीं मैंद होऊनि बैसे । कोणासीही ऐसे बोलों नको ।।तु.गा.२९२३.००२।।
तुका म्हणे तुम्हां सांगतों मी खूण । देवासी तें ध्यान लावुनि बैसा ।।तु.गा.२९२३.००३।।
देव तीर्थ येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ।।तु.गा.२९२४.००१।।
तया बरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ।।तु.गा.२९२४.००२।।
शुद्धाशुद्ध ठाव पापपुण्यबीज । पावतील दुजें फळभोग ।।तु.गा.२९२४.००३।।
तुका म्हणे विश्वंभराऐसें वर्म । चुकलिया धर्म अवघे मिथ्या ।।तु.गा.२९२४.००४।।
जाऊनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ।।तु.गा.२९२५.००१।।
अंतरींचें शुद्ध कासयानें झालें । भूषण तों केलें आपणया ।।तु.गा.२९२५.००२।।
वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचि ना ।।तु.गा.२९२५.००३।।
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया स्फुंदां तुम्ही ।।तु.गा.२९२५.००४।।
आधारावांचुनि । काय सांगशील काहाणी ।।तु.गा.२९२६.००१।।
ठावा नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघेंचि वाव ।।तु.गा.२९२६.००२।।
मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ।।तु.गा.२९२६.००३।।
तुका म्हणे ठेवा । जाणपण एक सवा ।।तु.गा.२९२६.००४।।
काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचतातीं पुढें संसाराच्या ।।तु.गा.२९२७.००१।।
झाडा देते वेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंड वरी ।।तु.गा.२९२७.००२।।
हात दांत कान हलविती मान । दाखविती जन मानावया ।।तु.गा.२९२७.००३।।

तुका म्हणे किती झालीं हीं फजित । मागें नाहीं मित भार वाही ।।तु.गा.२९२७.००४।।
चोरटे काचें निघाले चोरी । आपलें तैसे पारखे घरीं ।।तु.गा.२९२८.००१।।
नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ।।तु.गा.२९२८.००२।।
बुद्धिहीन नये कांहींचि कारणा । तयासवें जाणा तेंचि सुख ।।तु.गा.२९२८.००३।।
तुका म्हणे नाहीं ठाउकें वर्म । तयासी तें कर्म वोढवलें ।।तु.गा.२९२८.००४।।
सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ।।तु.गा.२९२९.००१।।
सारा अवघें गाबाळ । डोळ्याआडील पडळ।।तु.गा.२९२९.००२।।
शुद्ध भावावीण । जो जो केला तो तो शीण ।।तु.गा.२९२९.००३।।
तुका म्हणे कळे । परि होताती अंधळे ।।तु.गा.२९२९.००४।।
असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनासी निष्ठुर अतिवादी ।।तु.गा.२९३०.००१।।
अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखे यापरी आपेंआप ।।तु.गा.२९३०.००२।।
संत ते समय वोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदा ।।तु.गा.२९३०.००३।।
तुका म्हणे हित उचित अनुचित । मज लागे नित्य विचारावें ।।तु.गा.२९३०.००४।।
खोल ओली पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वायां जाय ।।तु.गा.२९३१.००१।।
लटिक्याचें आम्ही नव्हों सांटेकरी । थीतें घाली भरी पदरींचें ।।तु.गा.२९३१.००२।।
कोणा इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ।।तु.गा.२९३१.००३।।
तुका म्हणे कसीं अंगीं जे उतरे । तेंचि येथें सरे जाति शुद्ध ।।तु.गा.२९३१.००४।।
अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हें हें करणें स्वहिताचें ।।तु.गा.२९३२.००१।।
तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । स्वहित तेंचि वेगें करूनि घेई ।।तु.गा.२९३२.००२।।
बहुरूपी रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ।।तु.गा.२९३२.००३।।
कनक झाड म्हूण वंदियेलें माथां । परि तेंहि अर्था न मिळे माजी ।।तु.गा.२९३२.००४।।
पाषाणाचें नांव ठेवियलें देव । आणिका तारी भाव परि तो तैसा ।।तु.गा.२९३२.००५।।
तुका म्हणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावी नास तोचि पावे ।।तु.गा.२९३२.००६।।

नव्हती हे उसणें बोल । आहाच फोल रंजवण ।।तु.गा.२९३३.००१।।
अनुभव तो वरावरी । नाहीं दुरी वेगळा ।।तु.गा.२९३३.००२।।
पाहिजे तें आलें रुची । काचाकुची काशाची ।।तु.गा.२९३३.००३।।
तुका म्हणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ।।तु.गा.२९३३.००४।।
न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ।।तु.गा.२९३४.००१।।
तों हे चावटीचें बोल । जन रंजवणें फोल ।।तु.गा.२९३४.००२।।
न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ।।तु.गा.२९३४.००३।।
तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ।।तु.गा.२९३४.००४।।
आवडे सकळां मिष्टान्न । रोग्या विषा तें समान ।।तु.गा.२९३५.००१।।
काय तया एका साठीं । कामें केलीं अवघीं खोटीं ।।तु.गा.२९३५.००२।।
दर्पण नलगे एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ।।तु.गा.२९३५.००३।।
तुका म्हणे खळा । उपदेशाचा कंटाळा ।।तु.गा.२९३५.००४।।
तोचि लटिक्यामाजी भला । म्हणे देव म्यां देखीला ।।तु.गा.२९३६.००१।।
ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे । बुडवी आपणासरिसे । अभिमानें आणिकांस ।।तु.गा.२९३६.००२।।
आणिक नाहीं जोडा । देव म्हणवि तया मूढा ।।तु.गा.२९३६.००३।।
आणिकांचें न मनीं साचें । तुका म्हणे या श्रेष्ठांचें ।।तु.गा.२९३६.००४।।
कलिधर्म मागें सांगितलें संतीं । आचार सांडिती द्विजलोक ।।तु.गा.२९३७.००१।।
तेंचि कळों आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ।।तु.गा.२९३७.००२।।
तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ।।तु.गा.२९३७.००३।।
देव म्हणऊनि न येती देऊळा । संसार वेगळा तरी कां नव्हे ।।तु.गा.२९३७.००४।।
तुका म्हणे मज धरितां गुमान । ऐसें कोणी जन नरका जाती ।।तु.गा.२९३७.००५।।
मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येंऊ लागलें अनुभवा ।।तु.गा.२९३८.००१।।
आचारभ्रष्ट होती लोक कली । पुण्य क्षीण बळी झालें पाप ।।तु.गा.२९३८.००२।।

वर्णधर्म कोणी न करी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ।।तु.गा.२९३८.००३।।
वेदांचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांडण ।।तु.गा.२९३८.००४।।
तुका म्हणे किती करावे फजित । तेचि छंद नित्य बहु होती ।।तु.गा.२९३८.००५।।
उपदेश तो भलत्या हातीं । झाला चित्तीं धरावा ।।तु.गा.२९३९.००१।।
नये जाऊं पात्रावरीं । कवटी सार नारळी ।।तु.गा.२९३९.००२।।
स्त्री पुत्र बंदीजन । नारायण स्मरविती ।।तु.गा.२९३९.००३।।
तुका म्हणे रत्नसार । परि उपकार चिंधीचे ।।तु.गा.२९३९.००४।।
उपकारासाठीं केले हे उपाय । येणेंविण काय चाड आम्हां ।।तु.गा.२९४०.००१।।
बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणउनि ।।तु.गा.२९४०.००२।।
तुका म्हणे माझे देखतिल डोळे । भोग देते वेळे येईल कळों ।।तु.गा.२९४०.००३।।
बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ।।तु.गा.२९४१.००१।।
वाट दावी तया नलगे रुसावें । अतित्याई जीवें नाश पावे ।।तु.गा.२९४१.००२।।
निंब दिला रोग तुटाया अंतरीं । पोंभाळितां वरी आंत चरे ।।तु.गा.२९४१.००३।।
तुका म्हणे हित देखण्यासी कळे । पडती आंधळें कूपामाजी ।।तु.गा.२९४१.००४।।
आतां माझे नका वाणूं गुणदोष । करितों उपदेश याचा कांहीं ।।तु.गा.२९४२.००१।।
मानदंभासाठीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ।।तु.गा.२९४२.००२।।
तुका म्हणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ।।तु.गा.२९४२.००३।।
जन्मा येऊन उदार झाला । उद्धार केला वंशाचा । मेळवूनि धन मेळवी माती । सदा विपत्ति भोगितसे ।।तु.गा.२९४३.००१।।
नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे निजोनि डोकियासी ।।तु.गा.२९४३.००२।।
घरा व्याही पाहुणा आला । म्हणे त्याला बरें नाहीं । तुमचे गांवीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ।।तु.गा.२९४३.००३।।
उजवूं किती होतील पोरें । मरतां बरें म्हणे यांसी । म्हणऊनि देवा नवस करी । दावी घरींहुनि बोनें ।।तु.गा.२९४३.००४।।
पर्वकाळीं भट घरासी आला । बोंब घाला म्हणे पोरां । तुमचा उणा होईल वांटा । काळ पिठासी पैं आला ।।तु.गा.२९४३.००५।।
दाढी करितां अडकां गेला । घरांत आला बाईलेपें । म्हणे आतां उगवीं मोडी । डोईं बोडीं आपुली ।।तु.गा.२९४३.००६।।

तीर्थ स्वप्नीं नेणें गंगा । पूजन लिंगा गांविंचिया । आडकुनि दार बैसे दारीं । आल्या घर म्हणे ओस ।।तु.गा.२९४३.००७।।

माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती म्हणोनि । तुका म्हणे ऐसे आहेत गा हरि । याही तारीं जीवांसी ।।तु.गा.२९४३.००८।।

सोयरिया करी पाहुणेरु बरा । कांडितो ठोमरा संतांलागीं ।।तु.गा.२९४४.००१।।

गाईसी देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ।।तु.गा.२९४४.००२।।

फुलेंपानें वेश्येसी नेतसे उदंड । देऊं नेदी खांड ब्राह्मणासी ।।तु.गा.२९४४.००३।।

बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितयांसी दवडुनी ।।तु.गा.२९४४.००४।।

तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ।।तु.गा.२९४४.००५।।

साधूच्या दर्शना लाजसी गव्हारा । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ।।तु.गा.२९४५.००१।।

वेश्या दासी मुरळी जगाची वोवळी । ते तुज सोंवळी वाटे कैसी ।।तु.गा.२९४५.००२।।

तुका म्हणे आतां लाज धरीं बुच्या । टांचराच्या कुच्या मारा वेगीं ।।तु.गा.२९४५.००३।।

देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ।।तु.गा.२९४६.००१।।

गाईचे पाळण नयेचि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ।।तु.गा.२९४६.००२।।

लेंकराची गांड स्वयें धांवे क्षाळूं । न म्हणे प्रक्षाळूं द्विजपाय ।।तु.गा.२९४६.००३।।

तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ।।तु.गा.२९४६.००४।।

उरा लावी ऊर आळंगितां कांता । संतांसी भेटतां अंग चोरी ।।तु.गा.२९४७.००१।।

अतीत देखोनि होय पाठिमोरा । व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ।।तु.गा.२९४७.००२।।

द्विजा नमस्कारा मनीं भाव कैंचा । तुर्काचे दासीचा लेंक होय ।।तु.गा.२९४७.००३।।

तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणी ।।तु.गा.२९४७.००४।।

बाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गोवी अनिवार ।।तु.गा.२९४८.००१।।

घडों नेदी तीर्थयात्रा । केला कुतरा हातसोंका ।।तु.गा.२९४८.००२।।

आपुलीच करवी सेवा । पुजवी देवासारिखें ।।तु.गा.२९४८.००३।।

तुका म्हणे गाढव पशु । केला नाशु आयुष्याचा ।।तु.गा.२९४८.००४।।

बाइले आधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या अवलोकनें पडिजे द्वाड ।।तु.गा.२९४९.००१।।

कासया ते जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारोड्यांच्या ।।तु.गा.२९४९.००२।।
बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेचें ।।तु.गा.२९४९.००३।।
तुका म्हणे मेंग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ।।तु.गा.२९४९.००४।।
धिग जिणें तो बाईलेआधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ।।तु.गा.२९५०.००१।।
धिग जिणें ज्याचें लोभावरी मन । अतीतपूजन घडेचिना ।।तु.गा.२९५०.००२।।
धिग जिणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ।।तु.गा.२९५०.००३।।
धिग जिणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं साधुपणां ।।तु.गा.२९५०.००४।।
तुका म्हणे धिग ऐसे झाले लोक । निंदक वादक नरका जाती ।।तु.गा.२९५०.००५।।
सुखें वोळंब दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ।।तु.गा.२९५१.००१।।
आवडीचा मारिला वेडा । होय होय कैसा म्हणे भिडा ।।तु.गा.२९५१.००२।।
अखंड मज पोटाची व्यथा । दुधभात साकर तूप पथ्या ।।तु.गा.२९५१.००३।।
दो प्रहरा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ।।तु.गा.२९५१.००४।।
नीज नये खालीं घाली फुलें । जवळीं न साहती मुलें ।।तु.गा.२९५१.००५।।
अंगीं चंदन लावितें भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ।।तु.गा.२९५१.००६।।
निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ।।तु.गा.२९५१.००७।।
गेलें वारीं तुम्ही आणिली साकर । सात दिवस गेली साडेदहा शेर ।।तु.गा.२९५१.००८।।
हाड गळोनि आलें मांस । माझें दुःख तुम्हां नेणवें कैसें ।।तु.गा.२९५१.००९।।
तुका म्हणे जिता गाढव केला । मेलियावरि नरका नेला ।।तु.गा.२९५१.०१०।।
भ्रतारासी भार्या बोले गुजगोष्टी। मज ऐसी कष्टी नाहीं दुजीं ।।तु.गा.२९५२.००१।।
अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ।।तु.गा.२९५२.००२।।
जोडीतसां तुम्ही खाती येरचोरें । माझीं तंव पोरें हळहळती ।।तु.गा.२९५२.००३।।
तुमची व्याली माझे डोईं हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ।।तु.गा.२९५२.००४।।
दुष्टवृत्ति नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्या सुखें ।।तु.गा.२९५२.००५।।

भावा दीर कांहीं धड हा न बोलें । नांदों कोणा खालें कैसी आतां ।।तु.गा.२९५२.००६।।
माझ्या अंगसंगें तुम्हांसी विश्रांती । मग धड गति नाहीं तुमची ।।तु.गा.२९५२.००७।।
ठाकतें ठुमकतें जीव मुठी धरूनि । परि तुम्ही अजूनि न धरा लाज ।।तु.गा.२९५२.००८।।
वेगळें निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ।।तु.गा.२९५२.००९।।
तुका म्हणे झाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते ।।तु.गा.२९५२.०१०।।
कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित निरंतर।।तु.गा.२९५३.००१।।
माझीं मायबापें बंधु हो बहिणी । तुज करिती शीण त्यागीन मी ।।तु.गा.२९५३.००२।।
त्यांचें जरी तोंड पाहेन मागुता । तरी मज हत्या घडो तुझी ।।तु.गा.२९५३.००३।।
सकाळीं उठोन वेगळा निघेन । वाहातों तुझी आण निश्चयेंसि ।।तु.गा.२९५३.००४।।
वेगळें निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ।।तु.गा.२९५३.००५।।
ताईत सांखळी गळाची दुलडी । बाजुबंदजोडी हातसर ।।तु.गा.२९५३.००६।।
वेणीचे जे नग सर्वही करीन । नको धरूं सीण मनीं कांहीं ।।तु.गा.२९५३.००७।।
नेसावया साडी सेलारी चुनडी । अंगींची कांचोळी जाळिया फुलें ।।तु.गा.२९५३.००८।।
तुका म्हणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ।।तु.गा.२९५३.००९।।
एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ।।तु.गा.२९५४.००१।।
पाप नलगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ।।तु.गा.२९५४.००२।।
कांहीं दुसरा विचार । नलगे करावाची फार ।।तु.गा.२९५४.००३।।
असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ।।तु.गा.२९५४.००४।।
सत्य बोलें मुखें । तेथें उचंबळती सुखें ।।तु.गा.२९५४.००५।।
तुका म्हणे दोन्ही । जवळीच लाभहानी ।।तु.गा.२९५४.००६।।
बाईल सवासीण आई । आपण पितरांचे ठायीं ।।तु.गा.२९५५.००१।।
थोर वेंच झाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ।।तु.गा.२९५५.००२।।
विषयांचे चर्वणीं । केली आयुष्याची गाळणी ।।तु.गा.२९५५.००३।।

तुका म्हणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ।।तु.गा.२९५५.००४।।
दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कद्वारीं ।।तु.गा.२९५६.००१।।
ऐसें सांगों जातां जना । नये कोणाचिया मना ।।तु.गा.२९५६.००२।।
बरें विचारूनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ।।तु.गा.२९५६.००३।।
तुका म्हणे रांडलेंका । अंतीं जासी यमलोकां ।।तु.गा.२९५६.००४।।
परिसें गे सुनेबाई । नको वेंचूं दूध दहीं ।।तु.गा.२९५७.००१।।
आवा चालिली पंढरपुरा । वेशीपासुनि आली घरा ।।तु.गा.२९५७.००२।।
ऐकें गोष्टी सादर बाळे । करीं जतन फुटकें पाळें ।।तु.गा.२९५७.००३।।
माझे हातींचा कलवडू । मजवांचूनि नको फोडूं।।तु.गा.२९५७.००४।।
वळवटक्षिरीचें लिंपन । नको फोडूं मजवांचून ।।तु.गा.२९५७.००५।।
उखळ मुसळ जांतें । माझें मन गुंतलें तेथें ।।तु.गा.२९५७.००६।।
भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ।।तु.गा.२९५७.००७।।
भक्षीं मपित आहारु । नको फारसी वरुं सारूं ।।तु.गा.२९५७.००८।।
सून म्हणे बहुत निकें । तुम्हीं यात्रेसी जावें सुखें ।।तु.गा.२९५७.००९।।
सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ।।तु.गा.२९५७.०१०।।
सूनमुखींचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ।।तु.गा.२९५७.०११।।
सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ।।तु.गा.२९५७.०१२।।
आतां कासया यात्रें जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ।।तु.गा.२९५७.०१३।।
मुलें लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपूर ।।तु.गा.२९५७.०१४।।
तुका म्हणे ऐसें जन । गोवियेलें मायेंकरून ।।तु.गा.२९५७.०१५।।
पतिव्रतेची कीर्ती वाखाणितां । शिंदळीच्या माथां तिडिक उठे ।।तु.गा.२९५८.००१।।
आमुचें तों आहे सहज बोलणें । नाहीं विचारून केलें कोणीं ।।तु.गा.२९५८.००२।।
अंगें उणें बैसे त्याच्या टाळक्यांत । तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ।।तु.गा.२९५८.००३।।

तुका म्हणे आम्हीं काय करणें त्यासी । धका खवंदासी लागतसे ।।तु.गा.२९५८.००४।।
जातीची शिंदळी । तिला कोण कैसा वळी ।।तु.गा.२९५९.००१।।
आपघर ना बापघर । चिंती मनीं व्यभिचार ।।तु.गा.२९५९.००२।।
शेजे असोनिया धणी। परद्वार मना आणी ।।तु.गा.२९५९.००३।।
तुका म्हणे अस्सल जाती । जातीसाठीं खाती माती ।।तु.गा.२९५९.००४।।
पतिव्रता ऐसी जगामध्यें मात । भोगी पांच सात अंधारीं ते ।।तु.गा.२९६०.००१।।
भ्रतारासी लेखी श्वानाचे समान । परपुरुषीं मन संभ्रम तो ।।तु.गा.२९६०.००२।।
तुका म्हणे तिच्या दोषा नाहीं पार । भोगील अघोर कुंभपाक ।।तु.गा.२९६०.००३।।
सिंदळीस नाहीं पोराची पैं आस । राहे बीज त्यास काय करी ।।तु.गा.२९६१.००१।।
अथवा शेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देईल कोण काका त्याचा ।।तु.गा.२९६१.००२।।
तुका म्हणे नाहीं राखायाची चाड। तरि कां लिगाड करूनि घेतो ।।तु.गा.२९६१.००३।।
सिंदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चुरमुरी रात्रंदिवस ।।तु.गा.२९६२.००१।।
ऐसी ते वोंगळी जाय हो नरका । तिच्या दोषें देखा पति जाय ।।तु.गा.२९६२.००२।।
आपण बुडती पति बुडविती । दोन्ही कुळें नेती अध:पाता ।।तु.गा.२९६२.००३।।
तुका म्हणे तिची न करावी संगती । होईल फजिती मागें पुढें ।।तु.गा.२९६२.००४।।
संत मागे पाणी नेदी एक चूळी । दासीस आंघोळी ठेवी पाणी ।।तु.गा.२९६३.००१।।
संतांसी देखोनि होय पाठीमोरा । दासीचिया पोरा चुंबन देतो ।।तु.गा.२९६३.००२।।
संतांसी देखोनि करितो टवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीचिया ।।तु.गा.२९६३.००३।।
तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ।।तु.गा.२९६३.००४।।
दगडाच्या देवा बगाडी नवस । बाईल कथेस जाऊं नेदी ।।तु.गा.२९६४.००१।।
वेंची धनराशी बांधिलें स्मशान । दारीं वृंदावन द्वाड मानी ।।तु.गा.२९६४.००२।।
चोरें नागविला न करी त्याची खंती । परी द्विजा हातीं नेदी रुका ।।तु.गा.२९६४.००३।।
करी पाहुणेर व्याह्याजांवयासी । आल्या अतीतासी पाठीमोरा ।।तु.गा.२९६४.००४।।

तुका म्हणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाही शीण धरातळीं ।।तु.गा.२९६४.००५।।
गोहो यावा गांवा । ऐसे नवस करी आवा ।।तु.गा.२९६५.००१।।
कैंचें पुण्य तिये गांठीं । व्रतें वेची लोभासाठीं ।।तु.गा.२९६५.००२।।
वाढावें संतान । गृहीं व्हावें धनधान्य ।।तु.गा.२९६५.००३।।
मागे गारगोटी । परिसाचीये साटोवाटी ।।तु.गा.२९६५.००४।।
तुका म्हणे मोल । देऊन घेतला सोमल ।।तु.गा.२९६५.००५।।
गर्भाचें धारण । तिने वागविला शीण ।।तु.गा.२९६६.००१।।
व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घालीच तोंडा ।।तु.गा.२९६६.००२।।
उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ।।तु.गा.२९६६.००३।।
तुका म्हणे जाय । नरका अभक्ताची माय ।।तु.गा.२९६६.००४।।
देखोनि हरखली अंड । पुत्र झाला म्हणे रांड । तंव तो झाला भांड । चाहाड चोरटा शिंदळ ।।तु.गा.२९६७.००१।।
जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका । थोर झाला चुका । वर कां नाहीं घातलीं ।।तु.गा.२९६७.००२।।
भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें । बोले निष्ठुर उत्तरें । पापदृष्टी मळिण चित्त ।।तु.गा.२९६७.००३।।
दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ । तुका म्हणे खळ । म्हणोनियां निषिद्ध तो ।।तु.गा.२९६७.००४।।
पुत्र झाला चोर । मायबापां हर्ष थोर ।।तु.गा.२९६८.००१।।
आतां काशासाठीं जोडी । हाट धांटे गुंडगे घडी ।।तु.गा.२९६८.००२।।
आइते अपहार । आणूनियां भरी घर ।।तु.गा.२९६८.००३।।
मानिली निश्चिंती । नरका जावया उभयतीं ।।तु.गा.२९६८.००४।।
झोंडा झोंडगीचे पोटीं । फळें विजाती करंटीं ।।तु.गा.२९६८.००५।।
तुका म्हणे बेट्या । भांडवल नलगे खट्या ।।तु.गा.२९६८.००६।।
ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजां ।।तु.गा.२९६९.००१।।
चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ।।तु.गा.२९६९.००२।।
त्याचियानें दु:खी मही । भार तेही न साहे ।।तु.गा.२९६९.००३।।

तुका म्हणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या ।।तु.गा.२९६९.००४।।
आहाकटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र झाला ।।तु.गा.२९७०.००१।।
गळेचिना गर्भ नव्हेचि कां वांज । माता त्याची लाज लावा पापी ।।तु.गा.२९७०.००२।।
परपीडे परद्वारीं सावधान । सादरचि मन अभाग्याचें ।।तु.गा.२९७०.००३।।
न मिळतां निंदा चाहडी उपवास । संग्रहावे दोष सकळही ।।तु.गा.२९७०.००४।।
परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचें तें किडें दुग्धीं मरे ।।तु.गा.२९७०.००५।।
तुका म्हणे विटाळाचीच तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ।।तु.गा.२९७०.००६।।
जळो तिचें तोंड । ऐसी कां तें व्याली रांड ।।तु.गा.२९७१.००१।।
सदा भोंवयासी गांठी । क्रोध धडधडीत पोटीं ।।तु.गा.२९७१.००२।।
फोडिली गोंवरी । ऐसी दिसे तोंडावरी ।।तु.गा.२९७१.००३।।
तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ।।तु.गा.२९७१.००४।।
देवें दिला देह भजना गोमटा । तो या झाला फांटा बाधिकेचा ।।तु.गा.२९७२.००१।।
ताठोनियां मान राहिली वरती । अहंकारा हातीं लवों नेदी ।।तु.गा.२९७२.००२।।
दास म्हणावया न वळे रसना । सइर वचना वास गळे ।।तु.गा.२९७२.००३।।
तुका म्हणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानेंचि निर्मळ व्हावयासी ।।तु.गा.२९७२.००४।।
मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ।।तु.गा.२९७३.००१।।
नको जाऊं देउळासी । नेतो बागुल लोकांसी ।।तु.गा.२९७३.००२।।
वैष्णवांसंगती । हातीं पडलीं नेणों किती ।।तु.गा.२९७३.००३।।
कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें लावी भीक ।।तु.गा.२९७३.००४।।
आम्हां कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ।।तु.गा.२९७३.००५।।
तुका म्हणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका।।तु.गा.२९७३.००६।।
काय करूं पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ।।तु.गा.२९७४.००१।।
सांगितलें नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ।।तु.गा.२९७४.००२।।

काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ।।तु.गा.२९७४.००३।।
आमचें कुळीं नव्हतें ऐसें । हेंच पिसें निवडलें ।।तु.गा.२९७४.००४।।
लौकिकाची नाहीं लाज । माझे मज पारिखें ।।तु.गा.२९७४.००५।।
तुका म्हणे नरका जाणें । या वचनें दुष्टांचीं ।।तु.गा.२९७४.००६।।
कन्या गौ करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ।।तु.गा.२९७५.००१।।
गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशीं कारण नाहीं देवा ।।तु.गा.२९७५.००२।।
आशाबद्ध नये करूं तें करिती । तुका म्हणे जाती नरकामधीं ।।तु.गा.२९७५.००३।।
साळंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान ।।तु.गा.२९७६.००१।।
परि तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढां ।।तु.गा.२९७६.००२।।
आचरतां कर्म । भरे पोट राहे धर्म ।।तु.गा.२९७६.००३।।
सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहें ।।तु.गा.२९७६.००४।।
अन्न मान धन । हें तों प्रारब्धाआधीन ।।तु.गा.२९७६.००५।।
तुका म्हणे सोसे । सुख आतां पुढें नासें ।।तु.गा.२९७६.००६।।
ब्रह्महत्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केलें ।।तु.गा.२९७७.००१।।
ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुण्याचे ।।तु.गा.२९७७.००२।।
नरमांस खादली भाडी । हांका हाडी म्हणोनी ।।तु.गा.२९७७.००३।।
अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिळासिलें ।।तु.गा.२९७७.००४।।
उच्चारितां मज तें पाप । जिव्हें कांप सुटतसे ।।तु.गा.२९७७.००५।।
तुका म्हणे कोरान्न रांड । बेटा भांड मागेना कां ।।तु.गा.२९७७.००६।।
हातीं होन दाविति बेणा । करिती लेकींची धारणा ।।तु.गा.२९७८.००१।।
ऐसे धर्म झाले कलीं । पुण्य रंक पाप बळी ।।तु.गा.२९७८.००२।।
सांडिले आचार । द्विज चाहाड झाले चोर ।।तु.गा.२९७८.००३।।
टिळे लपविती पातडीं । लेती विजार कातडीं ।।तु.गा.२९७८.००४।।

बैसोनियां तक्तां । अन्यायेविण पिडिती लोका ।।तु.गा.२९७८.००५ ।।
मुदबख लिहिणें । तेल तूप साबण केणें ।।तु.गा.२९७८.००६ ।।
नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ।।तु.गा.२९७८.००७ ।।
राजा प्रजा पिडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ।।तु.गा.२९७८.००८ ।।
वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ।।तु.गा.२९७८.००९ ।।
अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वरी सोंग ।।तु.गा.२९७८.०१० ।।
तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धांवा ।।तु.गा.२९७८.०११ ।।
एक ब्रह्मचारी गाढवा झोंबतां । हाणोनियां लाता पळालें तें ।।तु.गा.२९७९.००१ ।।
गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजी ।।तु.गा.२९७९.००२ ।।
हें ना तैसें झालें हें ना तैसें झालें । तुका म्हणे गेलें वायांचि तें ।।तु.गा.२९७९.००३ ।।
कुंकवाची ठेवाठेवी । बोडक्या देवी काशाला ।।तु.गा.२९८०.००१ ।।
दिवस गमा भरा पोट । कां गे नट नटावा ।।तु.गा.२९८०.००२ ।।
दिमाख हा कोणां दावा । लटिकी जीवा चरफड ।।तु.गा.२९८०.००३ ।।
तुका म्हरे झोंडगीं हो । फुंदा कां हो कोरडी ।।तु.गा.२९८०.००४ ।।
हरिचें नाम कदा काळीं कां रे नये वाचे । म्हणतां राम राम तुझ्या बाचें काय वेंचे ।।तु.गा.२९८१.००१ ।।
पोटासाठीं खटपट करिसी अवघा वीळ । राम राम म्हणतां तुझी बसली दांतखीळ ।।तु.गा.२९८१.००२ ।।
द्रव्याचिया आशा तुजला दाही दिशा न पुरती । कीर्तनासी जातां तुझी जड झाली माती ।।तु.गा.२९८१.००३ ।।
तुका म्हणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न म्हणे त्याचा गाढव मातापिता ।।तु.गा.२९८१.००४ ।।
देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ।।तु.गा.२९८२.००१ ।।
कां रे नुमजसी दगडा । कैंचे हत्ती घोडे वाडा ।।तु.गा.२९८२.००२ ।।
लोडें बालिस्तें सुपती । जरा आलिया फजिती ।।तु.गा.२९८२.००३ ।।
शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडविती शेतातें ।।तु.गा.२९८२.००४ ।।
अझुनि तरी होईं जागा । तुका म्हणे पुढें दगा ।।तु.गा.२९८२.००५ ।।

आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारीं संसाराच्या ।।तु.गा.२९८३.००१।।
नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरिविण ।।तु.गा.२९८३.००२।।
कठिण हें दु:ख यम जाचतील । कोण सोडवील तया ठायीं ।।तु.गा.२९८३.००३।।
राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवी श्रीहरी लवलाहीं ।।तु.गा.२९८३.००४।।
तुका म्हणे किती करिसी लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ।।तु.गा.२९८३.००५।।
जन्मा येऊनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ।।तु.गा.२९८४.००१।।
कां रे न फिरसी माघारा । अझुनि तरी फजितखोरा ।।तु.गा.२९८४.००२।।
केली गाठोळीची नासी । पुढें भीकचि मागसी ।।तु.गा.२९८४.००३।।
तुका म्हणे ठाया । जाई आपुल्या आलिया ।।तु.गा.२९८४.००४।।
रंगीं रंगेरें श्रीरंगें । काय भुललासी पतंगें ।।तु.गा.२९८५.००१।।
शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिळास झणें ।।तु.गा.२९८५.००२।।
नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगुर।।तु.गा.२९८५.००३।।
अंतकाळींचा सोईरा । तुका म्हणे विठो धरा ।।तु.गा.२९८५.००४।।
नको बोलों भांडा । खीळ घालून बैसें तोंडा ।।तु.गा.२९८६.००१।।
ऐकें विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ।।तु.गा.२९८६.००२।।
प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ।।तु.गा.२९८६.००३।।
तुका म्हणे हिता । कां रे नागविसी थीता ।।तु.गा.२९८६.००४।।
पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ।।तु.गा.२९८७.००१।।
काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ।।तु.गा.२९८७.००२।।
स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ।।तु.गा.२९८७.००३।।
थोडे तुज घरीं होती उजगरें । देउळासी कां रे मरसी जातां ।।तु.गा.२९८७.००४।।
तुका म्हणे कां रे सुकुमार झालासी । काय जाब देसी यमदूतां ।।तु.गा.२९८७.००५।।
एकादशी व्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होइल नेणों ।।तु.गा.२९८८.००१।।

काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ।।तु.गा.२९८८.००२।।
हरिहरासी नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ।।तु.गा.२९८८.००३।।
तुका म्हणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होइल नेणों ।।तु.गा.२९८८.००४।।
धर्म तो न कळे । काय झांकियले डोळें ।।तु.गा.२९८९.००१।।
जीव भ्रमलें या कामें । कैसीं कळों येती वर्में ।।तु.गा.२९८९.००२।।
विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ।।तु.गा.२९८९.००३।।
तुका म्हणे लांसी । माया नाचविते कैसी ।।तु.गा.२९८९.००४।।
किती वेळां खादला दगा । अझून कां गा जागसी ना ।।तु.गा.२९९०.००१।।
लाज नाहीं हिंडतां गांवें । दु:ख नवें नित्य नित्य ।।तु.गा.२९९०.००२।।
संवचोरां हातीं फांसें । देखतां कैसे न देखसी ।।तु.गा.२९९०.००३।।
तुका म्हणे सांडिती वाट । तळपट करावया ।।तु.गा.२९९०.००४।।
पैल घरीं झाली चोरी । देहा करी बोंब ।।तु.गा.२९९१.००१।।
हाबा हाबा करिसी काय । फिराऊनि नेट्यां वाय ।।तु.गा.२९९१.००२।।
सांडुनियां शुद्धी । निजलासी गेली बुद्धि ।।तु.गा.२९९१.००३।।
चोरीं तुझा काढिला बुर । वेगळें भावा घातला दूर ।।तु.गा.२९९१.००४।।
भलतियासी देसी वाव । लाहेसि तूं एवढा ठाव ।।तु.गा.२९९१.००५।।
तुका म्हणे अजुनि तरी । उरलें तें जतन करीं ।।तु.गा.२९९१.००६।।
वितीयेवढेंसें पोट । केवढा बोभाट तयाचा ।।तु.गा.२९९२.००१।।
जळो त्याची विटंबना । भूक जना नाचवी।।तु.गा.२९९२.००२।।
अभिमाना शिरीं भार । झाले खर तृष्णेचे ।।तु.गा.२९९२.००३।।
तुका म्हणे नरका जावें । हाचि जीवें व्यापार ।।तु.गा.२९९२.००४।।
शूरां साजती हतियारें । गांढ्यां हांसतील पोरें ।।तु.गा.२९९३.००१।।
काय केली विटंबण । मोतीं नासिकावांचून ।।तु.गा.२९९३.००२।।

पतिव्रतें रूप साजे । शिंदळ काजळ लेतां लाजे ।।तु.गा.२९९३.००३।।
दासी पत्नी सुता । नव्हे सरी एकचि पिता ।।तु.गा.२९९३.००४।।
मान बुद्धिमंतां । थोर न मानिती पिता ।।तु.गा.२९९३.००५।।
तुका म्हणे तरी । आत शुद्ध दंडे वरी ।।तु.गा.२९९३.००६।।
अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धि ।।तु.गा.२९९४.००१।।
काय म्हणावें तयासी । तो केवळ पापरासी ।।तु.गा.२९९४.००२।।
जो स्मरे रामनामा । त्यासी म्हणती रिकामा ।।तु.गा.२९९४.००३।।
तीर्थव्रत करी । त्यासी म्हणताती भिकारी ।।तु.गा.२९९४.००४।।
तुका म्हणे विंचाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ।।तु.गा.२९९४.००५।।
जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीचा ।।तु.गा.२९९५.००१।।
अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ।।तु.गा.२९९५.००२।।
मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं विघडी जीवप्राणा ।।तु.गा.२९९५.००३।।
तुका म्हणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ।।तु.गा.२९९५.००४।।
पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयीं आवडे गाणें त्याला ।।तु.गा.२९९६.००१।।
ब्राह्मण दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटी धन ।।तु.गा.२९९६.००२।।
वीतभरि लंगोटी नेदी अतिताला । भोरप्यासी शाला वांटीतसे ।।तु.गा.२९९६.००३।।
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ।।तु.गा.२९९६.००४।।
कांडिल्या कुटिल्या होतो मांडा । अळसें धोंडा पडतसे ।।तु.गा.२९९७.००१।।
राग नको धरुं मनीं । गांडमणीं सांगतों ।।तु.गा.२९९७.००२।।
तरटापुढें बरें नाचे । सुतें काचें मुसळ ।।तु.गा.२९९७.००३।।
तुका म्हणे काठी सार । करी फार शाहाणें ।।तु.गा.२९९७.००४।।
देवाचें चरित्र नाठवे सर्वथा । विनोदाची कथा गोड वाटे ।।तु.गा.२९९८.००१।।
हातावरि हात हांसोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ।।तु.गा.२९९८.००२।।

तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ।।तु.गा.२९९८.००३।।
भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ।।तु.गा.२९९९.००१।।
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुंस । खापरा परीस काय करी ।।तु.गा.२९९९.००२।।
निंबाचिया झाडा साखरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ।।तु.गा.२९९९.००३।।
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ।।तु.गा.२९९९.००४।।
एवढी अपकीर्ति । ऐकोनियां फजीती ।।तु.गा.३०००.००१।।
जरि दावील वदन । थुंका थुंका तो देखोन ।।तु.गा.३०००.००२।।
काळिमेचें जिणें । जीवोनियां राहे सुनें ।।तु.गा.३०००.००३।।
तुका म्हणे गुण । दरुषणें अपशकून ।।तु.गा.३०००.००४।।
सूकरासी विष्ठा माने सावकाश । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ।।तु.गा.३००१.००१।।
तेवीं अभक्तासी आवडे पाखांड । न लगे त्या गोड परमार्थ ।।तु.गा.३००१.००२।।
श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरी ।।तु.गा.३००१.००३।।
तुका म्हणे सर्पा पाजिलीया क्षीर । वमितां विखार विष जालें ।।तु.गा.३००१.००४।।
आपुलें वेंचूनि खोडा घाली पाव । ऐसी तो हा जीव हीनबुद्धि ।।तु.गा.३००२.००१।।
विषयांच्या संगें आयुष्याचा नाश । पडियलें ओस स्वहिताचें ।।तु.गा.३००२.००२।।
भुलल्याचें अंग आपणा पारिखें । छंदाचें सारिखें वर्ततसे ।।तु.गा.३००२.००३।।
तुका म्हणे दुःख उमटे परिणामीं । लंपटासी कामीं रतलिया ।।तु.गा.३००२.००४।।
आंधळ्यांसि जन अवघेचि आंधळे । आपणासी डोळे दृष्टी नाहीं।।तु.गा.३००३.००१।।
रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ।।तु.गा.३००३.००२।।
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण। तया त्रिभुवन सर्व खोटें ।।तु.गा.३००३.००३।।
शब्दां नाहीं धीर । ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ।।तु.गा.३००४.००१।।
त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगती भोजन ।।तु.गा.३००४.००२।।
संतांसी जो निंदी । अधम लोभासाठीं वंदी ।।तु.गा.३००४.००३।।

तुका म्हणे पोटीं । भाव आणीक जया ओंठीं ।।तु.गा.३००४.००४।।
अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज तो ।।तु.गा.३००५.००१।।
वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मनी जो ।।तु.गा.३००५.००२।।
तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ।।तु.गा.३००५.००३।।
नव्हे आराणूक संसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाचि धंदा ।।तु.गा.३००६.००१।।
देवधर्म सांदीं पडिले सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ।।तु.गा.३००६.००२।।
रात्रंदिवस न पुरे कुटुंबी समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ।।तु.गा.३००६.००३।।
तुका म्हणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ।।तु.गा.३००६.००४।।
किती सांगों तरी नाइकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ।।तु.गा.३००७.००१।।
नका नका करूं रांडेची संगती । नेईल अधोगती घाली यम ।।तु.गा.३००७.००२।।
तुका म्हणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनि थोबाड फोडी काळ ।।तु.गा.३००७.००३।।
उपदेश किती करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ।।तु.गा.३००८.००१।।
शुद्ध कां वासना नव्हे चांडाळाची । होळी संचिताची केली तेणें ।।तु.गा.३००८.००२।।
नाहीं भाव मनीं नाइके वचन । आपल्या आपण नाडियेलें ।।तु.गा.३००८.००३।।
तुका म्हणे त्यासी काय व्याली रांड । करी बडबड रात्रंदिवस ।।तु.गा.३००८.००४।।
गातां आइकतां कंटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ।।तु.गा.३००९.००१।।
रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ।।तु.गा.३००९.००२।।
विषयांच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ।।तु.गा.३००९.००३।।
वेंचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ।।तु.गा.३००९.००४।।
तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्ट लोभें ।।तु.गा.३००९.००५।।
तुका म्हणे मग केला साहे दंड । नाइकती लंड सांगितलें ।।तु.गा.३००९.००६।।
जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ।।तु.गा.३०१०.००१।।
कैसा जालासे बेश्रम । लाज नाहीं न म्हणे राम ।।तु.गा.३०१०.००२।।

पाहे वैरियाकडे । डोळे वासुनियां रडे ।।तु.गा.३०१०.००३।।
बांधुनियां यमा हातीं । दिला नाहीं त्याची खंती ।।तु.गा.३०१०.००४।।
नाहीं यांपें काम । ऐसें जाणे तो अधम ।।तु.गा.३०१०.००५।।
अझुन तरी मुका । कां रे जालासी म्हणे तुका ।।तु.गा.३०१०.००६।।
बुद्धिमंदा शिरीं । भार फजिती पदरीं ।।तु.गा.३०११.००१।।
जाय तेथें अपमान । पावे हानि थुंके जन ।।तु.गा.३०११.००२।।
खरियाचा पाड । मागें लावावें लिगाड ।।तु.गा.३०११.००३।।
तुका म्हणे करी । वर्म नेणें भरोवरी ।।तु.गा.३०११.००४।।
साकरेची गोणी बैलाचिये पाठीं । तयासी शेवटीं करबाडें ।।तु.गा.३०१२.००१।।
मालाचे पैं पेटे वाहाताती उंटें । तयालागीं कांटे भक्षावया ।।तु.गा.३०१२.००२।।
वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमाहातीं ।।तु.गा.३०१२.००३।।
ज्यासी असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं बापुडीं शिणली वायां ।।तु.गा.३०१२.००४।।
तुका म्हणे शहाणा होईं रे गव्हारा । चौऱ्यांशीचा फेरा फिरों नको ।।तु.गा.३०१२.००५।।
जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छीतसे ।।तु.गा.३०१३.००१।।
संचितासी जाय मिळोनियां खोडी। पतनांचे जोडीवरी हांव ।।तु.गा.३०१३.००२।।
बांधलें गांठीं तें लागतें भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ।।तु.गा.३०१३.००३।।
तुका म्हणे जया गांवां जाणें जया । पुसोनियां तया वाट चाले ।।तु.गा.३०१३.००४।।
स्तवूनियां नरा । केला आयुष्याचा मातेरा ।।तु.गा.३०१४.००१।।
नारायणाचिया लोपें । घडलीं अवघींच पापें ।।तु.गा.३०१४.००२।।
जीव ज्याचें दान । त्याचा खंडूनियां मान ।।तु.गा.३०१४.००३।।
तुका म्हणे वाणी । आइके त्या दोष कानीं ।।तु.गा.३०१४.००४।।
ढालतरवारे गुंतले हे कर । म्हणे मी झुंजार कैसा झुंजों ।।तु.गा.३०१५.००१।।
पोटीं पडदाळें सिले टोप ओझें । हें तों झालें दुजें मरणमूळ ।।तु.गा.३०१५.००२।।

बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ।।तु.गा.३०१५.००३।।
असोनि उपाय म्हणे हे अपाय । म्हणे हायहाय काय करूं ।।तु.गा.३०१५.००४।।
तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ।।तु.गा.३०१५.००५।।
जया नाहीं नेम एकादशी व्रत। जाणावें तें प्रेत सर्व लोकीं।।तु.गा.३०१६.००१।।
त्याचें वय नित्य काळ लेखीताहे। रागें दांत खाय करकरा।।तु.गा.३०१६.००२।।
जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन। नाहीं तें स्मशान गृह जाणा।।तु.गा.३०१६.००३।।
जये कुळीं नाहीं एकही वैष्णव। त्याचा बुडे भवनदीताफा।।तु.गा.३०१६.००४।।
विठोबाचें नाम नुच्चारी जें तोंड। प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें।।तु.गा.३०१६.००५।।
तुका म्हणे त्याचे काष्ठ हातपाय। कीर्तना नव जाय हरीचिया।।तु.गा.३०१६.००६।।
किती सोसिती करंटीं। नेणों संसाराची आटी। सर्वकाळ पोटीं। चिंतेची हळहळ।।तु.गा.३०१७.००१।।
रिकामिया तोंडें राम। काय उच्चारितां श्रम। उफराटा भ्रम। गोवी विषय माजिरा।।तु.गा.३०१७.००२।।
कळतां न कळे। उघडे झांकियेले डोळे। भरलें त्याचे चाळे। अंगीं वारें मायेचें।।तु.गा.३०१७.००३।।
तुका म्हणे जन। ऐसें नांवबुद्धिहीन। बहुरंगें भिन्न। एकीं एक न मिळे।।तु.गा.३०१७.००४।।
झालों म्हणती त्याचें मज वाटे आश्चर्य। ऐका नव्हे धीर वचन माझें।।तु.गा.३०१८.००१।।
शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात। जिव्हेंसि चाखतां न कळे कैसें।।तु.गा.३०१८.००२।।
तापलिया तेला बावन चंदन। बुंदे एक क्षण शीतळ करी।।तु.गा.३०१८.००३।।
पारखी तो जाणें अंतरींचा भेद। मूढ जना छंद लावण्याचा।।तु.गा.३०१८.००४।।
तुका म्हणे कसीं निवडे आपण। शुद्ध मंद हीन जैसें तैसें।।तु.गा.३०१८.००५।।
लोभावरी ठेवुनि हेत। करी असत्य न्याय नीत।।तु.गा.३०१९.००१।।
त्याच्या पूर्वजां पतन। नरकीं किडे होती जाण।।तु.गा.३०१९.००२।।
कोटी गोहत्यापातक । त्यासी घडेल निष्टंक ।।तु.गा.३०१९.००३।।
मासा स्त्रवे जे सुंदरा। पाजी विटाळ पितरां।।तु.गा.३०१९.००४।।
तुका म्हणे ऐसियासी। यम गांजिल सायासी।।तु.गा.३०१९.००५।।

राउळासी जातां त्रास मानी मोठा। बैसतो चोहोटां आदरेंशीं ।।तु.गा.३०२०.००१ ।।
न करी स्नान संध्या न म्हणे रामराम। गुरूगुडीचें प्रेम अहर्निशीं ।।तु.गा.३०२०.००२ ।।
देवब्राह्मणांसी जाईना शरण। दासीचे चरण वंदी भावें ।।तु.गा.३०२०.००३ ।।
सुगंध चंदन सांडोनियां माशी। बैसे दुर्गंधीशीं अत्यादरें ।।तु.गा.३०२०.००४ ।।
तुका म्हणे अरे ऐक भाग्यहीना। कां रे रामराणा विसरसी ।।तु.गा.३०२०.००५ ।।
संतांच्या हेळणें बाटलें जें तोंड। प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ।।तु.गा.३०२१.००१ ।।
भेसळीचें वीर्य ऐशा अनुभवें। आपुलें परावें नाहीं खळा ।।तु.गा.३०२१.००२ ।।
संतांचा जो शोध करितो चांडाळ। धरावा विटाळ बहु त्याचा ।।तु.गा.३०२१.००३ ।।
तुका म्हणे केली प्रतिज्ञा याचसाठीं। कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ।।तु.गा.३०२१.००४ ।।
हरिची हरिकथा नावडे जया। अधम म्हणतां तया वेळ लागे। मनुष्यदेहीं तया नाट पैं लागलें। अघोर साधिलें कुंभपाक ।।तु.गा.३०२२.००१ ।।
कासया जन्मा आला तो पाषाण। जंत कां होऊन पडिला नाहीं ।।तु.गा.३०२२.००२ ।।
ऐसियाची माता कासया प्रसवली। वर नाहीं घातली मुखावरी। देवधर्माविण तो हा चांडाळ। न साहे भूमिभार क्षणभरी ।।तु.गा.३०२२.००३ ।।
राम म्हणतां तुझें काय वेचेल। कां हित आपुलें न विचारिसी। जन्मोजन्मींचा होईल नरकीं। तुका म्हणे चुकी जरी यासी ।।तु.गा.३०२२.००४ ।।
कांहीं नित्यनेमाविण। अन्न खाय तो श्वान। वायां मनुष्यपण। भार वाहे तो वृषभ ।।तु.गा.३०२३.००१ ।।
त्याचा होय भूमी भार। नेणे जातीचा आचार। झाला दावेदार। भोगवी अघोर पितरांसी ।।तु.गा.३०२३.००२ ।।
अखंड अशुभ वाणी। खरें न बोले स्वप्नीं। पापी तयाहुनी। नाहीं आणीक दुसरा ।।तु.गा.३०२३.००३ ।।
पोट पोसी एकला। भूतीं दया नाहीं ज्याला। पाठीं लागे आल्या। अतिताचे द्वारेशीं ।।तु.गा.३०२३.००४ ।।
कांहीं संतांचे पूजन। न घडे तीर्थांचें भ्रमण। यमाचा आंदण। शीण थोर पावेल ।।तु.गा.३०२३.००५ ।।
तुका म्हणे त्यांणीं। मनुष्यपणा केली हानी। देवा विसरूनि। गेली म्हणती मी माझें ।।तु.गा.३०२३.००६ ।।
भक्ति ज्याची थोडी। पूर्ण विषयाची गोडी ।।तु.गा.३०२४.००१ ।।
तो नरचि नव्हे पाहीं। खर जाणावा तो देहीं ।।तु.गा.३०२४.००२ ।।
भजन पूजनही नेणे। काय स्वरूपासी जाणे ।।तु.गा.३०२४.००३ ।।
तुका म्हणे त्याला। भोवंडून बाहेर घाला ।।तु.गा.३०२४.००४ ।।

देव अवघें प्रतिपादी। वंदी सकळां एका निंदी।।तु.गा.३०२५.००१।।
तेथें अवघें गेलें वायां। विष घास एके ठायां।।तु.गा.३०२५.००२।।
सर्वांग कुरवाळी। उपटी एक रोमावळी।।तु.गा.३०२५.००३।।
तुका म्हणे चित्त। नाहीं जयाचें अंकित।।तु.गा.३०२५.००४।।
कींविलवाणा झाला आतां। दोष करितां न विचारी।।तु.गा.३०२६.००१।।
अभिलाषी नारी धन। झकवी जन लटिकेंचि।।तु.गा.३०२६.००२।।
विश्वासिया करितां घात। न धरी चित्त कांटाळा।।तु.गा.३०२६.००३।।
तुका म्हणे नाहीं आला। वृथा गेला जन्मासी।।तु.गा.३०२६.००४।।
जेणें मुखें स्तवी। तेंचि निंदेपाठीं लावीं।।तु.गा.३०२७.००१।।
ऐसी अधमाची याती। लोपी सोनें खाय माती।।तु.गा.३०२७.००२।।
गुदद्वारावाटे। मिष्टान्नाचा नरक लोटे।।तु.गा.३०२७.००३।।
विंचु लाभेविण। तुका म्हणे वाहे शीण।।तु.गा.३०२७.००४।।
दुर्बळ हे अवघे जन। नारायणीं विन्मुख।।तु.गा.३०२८.००१।।
झाडोनियां हात जाती। पात्र होती दंडासी।।तु.गा.३०२८.००२।।
शिदोरी तें पाप पुण्य। सवें सिण भिकेचा।।तु.गा.३०२८.००३।।
तुका म्हणे पडिला वाहो। कैसा पाहा हो लटिक्याचा।।तु.गा.३०२८.००४।।
द्रव्य असतां धर्म न करी। नागवला राजद्वारीं।।तु.गा.३०२९.००१।।
माय त्यासि व्याली जेव्हां। रांड सटवी नव्हती तेव्हां।।तु.गा.३०२९.००२।।
कथाकाळीं निद्रा लागे। कामीं श्वानापरी जागे।।तु.गा.३०२९.००३।।
भोग स्त्रियेसि देतां लाजे। वस्त्र दासीचें घेउनि निजे।।तु.गा.३०२९.००४।।
तुका म्हणे जाण। नर गाढवाहुनी हीन।।तु.गा.३०२९.००५।।
सज्जन तो शब्द सत्य जो मानी। छळी दुर्जन आणिकांसी।।तु.गा.३०३०.००१।।
एक गुण तो केलासे दोंठायीं। ज्याचा त्यास पाहीं जैसा तैसा।।तु.गा.३०३०.००२।।

भाविक शब्द बोले वाणीचा। लटिका वाचा वाचाळ तो ।।तु.गा.३०३०.००३ ।।
परउपकार घडे तोचि भला। नाट्याळ तयाला दया नाहीं ।।तु.गा.३०३०.००४ ।।
जातीवंत तो पायरी जाणे। अधम तो नेणे खुंट जैसा ।।तु.गा.३०३०.००५ ।।
हित तें अनहित केलें कैसें। तुका म्हणे पिसें लागलें यासीं ।।तु.गा.३०३०.००६ ।।
आसुरी स्वभाव निर्दय अंतर। मानसीं निष्ठुर अतिवादी ।।तु.गा.३०३१.००१ ।।
याति कुळ येथें असे अप्रमाण। गुणाचें कारण असे अंगीं ।।तु.गा.३०३१.००२ ।।
काळेंकुट पितळ सोनें शुद्ध रंग। अंगाचेंच अंग साक्षी देतें ।।तु.गा.३०३१.००३ ।।
तुका म्हणे बरी जातीसवें भेटी। नवनीत पोटीं सांठविलें ।।तु.गा.३०३१.००४ ।।
तोंडें खाय फार। पादे बोचा करी मार ।।तु.गा.३०३२.००१ ।।
एक ऐसे ते शाहाणे। आपुले अधीन तें नेणे ।।तु.गा.३०३२.००२ ।।
कुले घालूनि उघडे। रागें पाहे लोकांकडे ।।तु.गा.३०३२.००३ ।।
खेळे द्यूतकर्म। मग बोंबली जुलूम ।।तु.गा.३०३२.००४ ।।
निजतां आला मोहो। वीतां म्हणे मेला गोहो ।।तु.गा.३०३२.००५ ।।
तुका म्हणे त्यांनीं। मनुष्यपणा केली हानी ।।तु.गा.३०३२.००६ ।।
गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी। हगवण घाणी पिटपिट ते ।।तु.गा.३०३३.००१ ।।
मस्तक सांडुनि सिसफुल गुडघां। चार तो अवघा बावळ्याचा ।।तु.गा.३०३३.००२ ।।
अंगभूत म्हूण पूजितो वाहाणा। म्हणतां शहाणा येईल कैसा ।।तु.गा.३०३३.००३ ।।
तुका म्हणे वेश्या सांगे सवासिणी। इतर पूजनीं भाव तैसा ।।तु.गा.३०३३.००४ ।।
यमपुरी त्यांनीं वसविली जाणा। उच्छेद भजना विधी केला ।।तु.गा.३०३४.००१ ।।
अवघड कोणी न करी सांगतां। सुलभ बहुतां गोड वाटे ।।तु.गा.३०३४.००२ ।।
काय ते नेणते होते मागें ऋषी। आधार लोकांसी ग्रंथ केले ।।तु.गा.३०३४.००३ ।।
द्रव्य दारा कोणें स्थापियलें धन। पिंडाचें पाळण विषय भोग ।।तु.गा.३०३४.००४ ।।
तुका म्हणे दोहीं ठायीं हा फजित। पावे यमदूत जना हातीं ।।तु.गा.३०३४.००५ ।।

अगत्य ज्या नरका जाणें। वीट मानणें कीर्तनीं।।तु.गा.३०३५.००१ ।।
नावडेसा झाला बाप। आलें पाप वस्तीसी।।तु.गा.३०३५.००२ ।।
नारायण नाहीं वाचे। ते यमाचें अंदणे।।तु.गा.३०३५.००३ ।।
तुका म्हणे अभक्तासी। माता दासी जगझोडी।।तु.गा.३०३५.००४ ।।
नेदावी सलगी न करावा संग। करी चित्ता भंग वेळोवेळां।।तु.गा.३०३६.००१ ।।
सर्प शांतिरूप न म्हणावा भला। झोंबे खवळीला तात्काळ तो ।।तु.गा.३०३६.००२ ।।
तुका म्हणे दुरी राखावा दुर्जन। करावें वचन न घडे तें।।तु.गा.३०३६.००३ ।।
याचा कोणी करी पक्ष। तोही त्याशीं समतुल्य।।तु.गा.३०३७.००१ ।।
फुकासाठीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजाशीं लाग निरयदंडीं।।तु.गा.३०३७.००२ ।।
ऐके राजा न करी दंड। जरि या लंड दुष्टासी।।तु.गा.३०३७.००३ ।।
तुका म्हणे त्याचें अन्न। मद्यपानाचे समान।।तु.गा.३०३७.००४ ।।
दानें कांपे हात। नावडे तेविशीं मात।।तु.गा.३०३८.००१ ।।
कथी चावटीचे बोल। हिंग क्षीरीं मिथ्या फोल।।तु.गा.३०३८.००२ ।।
नव जाती पाय। तीर्था म्हणे वेचूं काय।।तु.गा.३०३८.००३ ।।
तुका म्हणे मनीं नाहीं। न ये आकारातें कांहीं।।तु.गा.३०३८.००४ ।।
चाहाडाची माता। व्यभिचारीण तत्त्वता।।तु.गा.३०३९.००१ ।।
पाहे संतांचें उणें। छिद्र छळावया सुनें।।तु.गा.३०३९.००२ ।।
जाणों त्याच्या बाचें। कांहीं सोडिलें गांठीचें।।तु.गा.३०३९.००३ ।।
तुका म्हणे घात। व्हावा ऐसी जोडी मात।।तु.गा.३०३९.००४ ।।
तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा। संत ते अधमा माणसां ऐसे।।तु.गा.३०४०.००१ ।।
वांझेच्या मैथुनापरी गेलें वायां। बांडेल्याचें जायां जालें पीक।।तु.गा.३०४०.००२ ।।
अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचिना ।।तु.गा.३०४०.००३ ।।
तुका म्हणे वरदळी ज्याची दृष्टि। देहबुद्धि कष्टी सदा दुःखी।।तु.गा.३०४०.००४ ।।

संतनिंदा ज्याचे घरीं। नव्हे घर ते यमपुरी।।तु.गा.३०४१.००१।।
त्याच्या पापा नाहीं जोडा। संगें जना होय पीडा।।तु.गा.३०४१.००२।।
संतनिंदा आवडे ज्यासी। तो जिताची नर्कवासी।।तु.गा.३०४१.००३।।
तुका म्हणे नष्ट। जाणा गाढव तो स्पष्ट।।तु.गा.३०४१.००४।।
संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी। आदरें न्याहाळी परस्त्रीसी।।तु.गा.३०४२.००१।।
वीट ये कर्णासी संतवाक्यामृता। स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण।।तु.गा.३०४२.००२।।
कथेमाजी नीज वाढे नित्यक्षणीं। स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे।।तु.गा.३०४२.००३।।
तुका म्हणे तुम्हीं क्रोधासी न यावें। स्वभावा करावें काय कोणीं।।तु.गा.३०४२.००४।।
विद्या अल्प परी गर्वशिरोमणि। मजहुनी ज्ञानी कोण आहे।।तु.गा.३०४३.००१।।
अंगीं भरला ताठा कोणातें मानीना। साधूची छळणा स्वयें करी।।तु.गा.३०४३.००२।।
साधूचे देहाचा मानी जो विटाळ। त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ।।तु.गा.३०४३.००३।।
संतांची जो निंदा करी मुखें जपे। खतेला सकळ पापें तोचि एक ।।तु.गा.३०४३.००४।।
तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद। त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं।।तु.गा.३०४३.००५।।
आणिकांच्या कापिती माना। निष्ठुरपणा पार नाहीं।।तु.गा.३०४४.००१।।
करिती बेटे उसणवारी। यमपुरीं भोगावया।।तु.गा.३०४४.००२।।
सेंदराचें दैवत केलें। नवस बोले तयासी।।तु.गा.३०४४.००३।।
तुका म्हणे नाचती पोरें। खोडितां येरें अंग दुःखें।।तु.गा.३०४४.००४।।
कावळिया नाहीं दया उपकार। काळिमें अंतर विटाळतें।।तु.गा.३०४५.००१।।
तैसें कुजनाचें जिणें अमंगळ। घाणेरी वोंगळ वदे वाणी।।तु.गा.३०४५.००२।।
कडु भोंपळ्याचा उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी।।तु.गा.३०४५.००३।।
तुका म्हणे विष सांडूं नेणे साप। आदरें तें पाप त्याचे ठायीं।।तु.गा.३०४५.००४।।
माकडें मुठीसी धरिले फुटाणे। गुंतलें ते नेणे हात तेथें।।तु.गा.३०४६.००१।।
काय तो तयाचा लेखावा अन्याय। हित नेणे काय आपुलें तें ।।तु.गा.३०४६.००२।।

शुकें नळिकेशीं गोवियेले पाय। विसरोनि जाय पक्ष दोन्ही ।।तु.गा.३०४६.००३ ।।
तुका म्हणे एक ऐसे पशु जीव। न चले उपाव कांहीं तेथें ।।तु.गा.३०४६.००४ ।।
सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें। भक्षावया दिलें श्वानालागीं ।।तु.गा.३०४७.००१ ।।
मुक्ताफळहार खरासि घातला। कस्तुरी सुकराला चोजविली ।।तु.गा.३०४७.००२ ।।
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान। तयासी ते खूण काय जाणे ।।तु.गा.३०४७.००३ ।।
तुका म्हणे ज्याचे तोचि एक जाणे। भक्तिचें महिमान साधु जाणे ।।तु.गा.३०४७.००४ ।।
शिकवणें नाक झाडी। पुढील जोडी कळेना ।।तु.गा.३०४८.००१ ।।
निरयगांवीं भोग देता। तेथें सत्ता आणिकांची ।।तु.गा.३०४८.००२ ।।
अवगुणांचा सांटा करी। तेचि धरी जीवासी ।।तु.गा.३०४८.००३ ।।
तुका म्हणे जडबुद्धि। कर्म शुद्धि सांडवी ।।तु.गा.३०४८.००४ ।।
विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळासी सखें वोंगळचि ।।तु.गा.३०४९.००१ ।।
नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । झणीं ठाका संत दुर्जनापे ।।तु.गा.३०४९.००२ ।।
भेंसळीच्या बीजा अमंगळ गुण । उपजवी शीण दरुषणें ।।तु.गा.३०४९.००३ ।।
तुका म्हणे छीथू जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ।।तु.गा.३०४९.००४ ।।
दुर्जनाची जाती। त्याचे तोंडीं पडे माती ।।तु.गा.३०५०.००१ ।।
त्याची बुद्धि त्यासी नाडी। वाचे अनुचित बडबडी ।।तु.गा.३०५०.००२ ।।
पाहें संतांकडे। दोषदृष्टी सांडी भिडे ।।तु.गा.३०५०.००३ ।।
उंच नीच नाहीं। तुका म्हणे खळा कांहीं ।।तु.गा.३०५०.००४ ।।
नागलें देखोनि चांगलें बोले। आपुलें वेंचूनि त्यापुढें खुले ।।तु.गा.३०५१.००१ ।।
अधमाचें ओंगळ गुण। उचित नेणें तो धर्म कोण ।।तु.गा.३०५१.००२ ।।
आर्तभूता न घली पाण्याची चुळ। न मगे त्यासी घाली साकरगुळ ।।तु.गा.३०५१.००३ ।।
एकासी धड न बोले वाचा। एकासी म्हणे मी तुझे बांदीचा ।।तु.गा.३०५१.००४ ।।
एका देखोनि लपवी भाकरी। एकासी आड पडोनि होकरी ।।तु.गा.३०५१.००५ ।।

तुका म्हणे ते गाढवपशु । लाभेंविण केला आयुष्याचा नाशु ।।तु.गा.३०५१.००६ ।।
गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ।।तु.गा.३०५२.००१ ।।
त्याचें भुंकणें न राहे । स्वभावासी करील काय ।।तु.गा.३०५२.००२ ।।
श्वान शिबिके बैसविलें । भुंकता न राहे उगलें ।।तु.गा.३०५२.००३ ।।
तुका म्हणे स्वभावकर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ।।तु.गा.३०५२.००४ ।।
सेट्या ना चौधरी । पांडेपण वाहे शिरीं ।।तु.गा.३०५३.००१ ।।
जकातीचा धंदा । तेथें पाप वसे सदा ।।तु.गा.३०५३.००२ ।।
गाई म्हैसी हेड । तूप विकी महाद्वाड ।।तु.गा.३०५३.००३ ।।
तुका म्हणे पाहीं । तेथें पुण्या रिघ नाहीं ।।तु.गा.३०५३.००४ ।।
संता नाहीं मान । देव मानी मुसलमान ।।तु.गा.३०५४.००१ ।।
ऐसे पोटाचे मारिले । देवा आशा विटंबिले ।।तु.गा.३०५४.००२ ।।
घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ।।तु.गा.३०५४.००३ ।।
तुका म्हणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ।।तु.गा.३०५४.००४ ।।
अंगीं ब्रह्मक्रिया ख्रिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळांचे ।।तु.गा.३०५५.००१ ।।
अंत्यजाची खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदान मायबहिणी ।।तु.गा.३०५५.००२ ।।
उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कुळ उभयतां ।।तु.गा.३०५५.००३ ।।
तुका म्हणे ऐसी कलियुगाची चाली । स्वार्थे बुडविली आचरणें ।।तु.गा.३०५५.००४ ।।
ख्रिस्तीचा उदीम उदिमांत हीन । करिती ब्राह्मण कलियुगीं ।।तु.गा.३०५६.००१ ।।
वेवसाव करी पर्वत मांगापासीं । ते पैं विटाळासी न मानिती ।।तु.गा.३०५६.००२ ।।
मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरी थुंका पडतसे ।।तु.गा.३०५६.००३ ।।
आशा माया रांड नांव हें कागदीं । आठवीना कधीं नारायण ।।तु.गा.३०५६.००४ ।।
तुका म्हणे देह झाले पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ।।तु.गा.३०५६.००५ ।।
बीजीं फळाचा भरंवसा । जतन सिंचनासरिसा । चालविलिया आशा । काकुलती ते नाड ।।तु.गा.३०५७.००१ ।।

हा तों गढसंधीचा ठाव। पिके पिकविला भाव। संकोचोनि जीव। दशा केली जतन ।।तु.गा.३०५७.००२।।

माती घाली धनावरी। रांडा रोटा वरीवरी। सुखाचे शेजारीं। दु:ख भ्रमें भोगितसे।।तु.गा.३०५७.००३।।

तुका म्हणे दिशाभुली। झाल्या उफराटी चाली। निवाड्याची बोली। अनुभवें साक्षीसी।।तु.गा.३०५७.००४।।

कथा पुराण ऐकतां। झोपें नाथिलें तत्त्वता। खाटेवरि पडतां। व्यापी चिंता तळमळ।।तु.गा.३०५८.००१।।

ऐसी गहन कर्मगति। काय तयासी रडती। झाले जाणते जे चित्तीं। कांहीं नेघे आपुल्या।।तु.गा.३०५८.००२।।

उदक लावितां न धरे। चिंता करी केव्हां सरे। जाऊं नका धीरें। म्हणे करितां ढवाळ्या।।तु.गा.३०५८.००३।।

जवळी गोंचिड क्षीरा। जैसी कमळणी दर्दुरा। तुका म्हणे दुरा। देशत्यागें तयासी।।तु.गा.३०५८.००४।।

कंठीं कृष्णमणी। नाहीं अशुभ ते वाणी।।तु.गा.३०५९.००१।।

हो कां नर अथवा नारी। रांड तयें नांवें खरीं।।तु.गा.३०५९.००२।।

नाहीं हातीं दान। शूरपणाचें कांकण।।तु.गा.३०५९.००३।।

वाळियेलीं संतीं। केली बोडोनी फजिती।।तु.गा.३०५९.००४।।

तुका म्हणे ताळा। नाहीं त्याची अवकळा।।तु.गा.३०५९.००५।।

बीजापोटीं पाहे फळ। विध न करितां सकळ।।तु.गा.३०६०.००१।।

तया मूर्ख म्हणावें वेडे। कैसें तुटेल सांकडें।।तु.गा.३०६०.००२।।

दावितिया वाट। वेठी धरूं पाहे चाट।।तु.गा.३०६०.००३।।

पुढिल्या उपाया। तुका म्हणे राखे काया।।तु.गा.३०६०.००४।।

खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग। साक्षी तंव जग उभयतां।।तु.गा.३०६१.००१।।

आपल्या आपण नाहीं शोभों येत। चार करी स्फीत दाखवूनि।।तु.गा.३०६१.००२।।

खाणार ताकाचें असे तें मांजर। आपणचि अधीर कळों येतें।।तु.गा.३०६१.००३।।

तुका म्हणे जळो मैंदाची मवाळी। दावूनियां नळी कापी सुखें।।तु.गा.३०६१.००४।।

अभक्ताचे गांवीं साधु म्हणजे काय। व्याघ्रवाडां गाय सांपडली।।तु.गा.३०६२.००१।।

कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण। बस्वण्णाची आण तया काई।।तु.गा.३०६२.००२।।

मोतीयाची गोणी माळेवोळी नेली। पुसती केवढ्या केली पासरी हे।।तु.गा.३०६२.००३।।

केळी आणि बोरी वसती शेजारीं। संवाद कोणे परी घडे येथें।।तु.गा.३०६२.००४।।
तुका म्हणे खीर केली काऱ्हेळ्याची। शुद्ध गोडी कैंची वसे तेथें।।तु.गा.३०६२.००५।।
नाहीं देवाचा विश्वास। करी संतांचा उपहास।।तु.गा.३०६३.००१।।
त्याचे तोंडीं पडे माती। हीन शूकराची जाती।।तु.गा.३०६३.००२।।
घोकुनी अक्षरें। वाद छळणा करीत फिरे।।तु.गा.३०६३.००३।।
म्हणे देवासी पाषाण। तुका म्हणे भावहीन।।तु.गा.३०६३.००४।।
जाणिवेच्या भारें चेंपला उर। सदा बुरबुर सरेचि ना।।तु.गा.३०६४.००१।।
किती याचे बोल ऐकों कानीं। मारिलें घाणी नाळेकरी।।तु.गा.३०६४.००२।।
मिठेंविण काय आळणी हे बोल। कोरडीच फोल घसघस।।तु.गा.३०६४.००३।।
तुका म्हणे डेंगा न कळे हित। किती फजित करूं तरी।।तु.गा.३०६४.००४।।
माकडा दिसती कंवटी नारळे । भोक्ता तो निराळे वरील सारी।।तु.गा.३०६५.००१।।
एका रस एका तोंडीं पडे माती। आपुलालें नेती विभाग ते ।।तु.गा.३०६५.००२।।
सुनियासी क्षीर चारिल्या ओकवी। भोक्ता तो सेवी धणीवरी।।तु.गा.३०६५.००३।।
तुका म्हणे मूर्ख वागविती भार। नेतील तें सार परीक्षक ।।तु.गा.३०६५.००४।।
मांस खातां हाऊस करी। जोडोनि वैरी ठेवियेला।।तु.गा.३०६६.००१।।
कोण त्याची करील कींव। जीवें जीव नेणती।।तु.गा.३०६६.००२।।
पुढिलांसाठीं पाजवी सुरी। आपुली चोरी अंगुळी।।तु.गा.३०६६.००३।।
तुका म्हणे कुटिती हाडें। आपुल्या नाडें रडतील।।तु.गा.३०६६.००४।।
सिंदळीचे सोइरे चोराचिया दया। तेही जाणा तया संवसर्गी।।तु.गा.३०६७.००१।।
फुकासाठीं भोगे दुःखाचा तो वांटा। उभारोनि कांटा वाटेवरी।।तु.गा.३०६७.००२।।
सर्प पोसूनियां दुधाचाही नाश। केलें थीता विष अमृताचें।।तु.गा.३०६७.००३।।
तुका म्हणे त्यासी न करितां दंडन। पुढिल्या खंडन नव्हे दोषा।।तु.गा.३०६७.००४।।
काय वृंदावन माखियेलें गुळें। काय जिरें काळें उपचारिलें।।तु.गा.३०६८.००१।।

तैसी अधमाची जातीच अधम। उपदेश श्रम करावा तो।।तु.गा.३०६८.००२।।
न कळे विंचासी कुरवाळिलें अंग। आपले ते रंग दावीतसे।।तु.गा.३०६८.००३।।
तुका म्हणे नये पाकासी दगड। शूकरासी गोड जैसी विष्ठा।।तु.गा.३०६८.००४।।
सुगरणीबाई थिता नास केला। गूळ तो घातला भाजीमध्यें।।तु.गा.३०६९.००१।।
क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ। थितेंचि वोंगळ नाश केला।।तु.गा.३०६९.००२।।
हिरयाचे पेटे आणियेल्या गारा। खांदीं शिरीं भारा व्यर्थ वाहे।।तु.गा.३०६९.००३।।
दळण दळोनि भरीयेली पाळी। भरडोनि वोंगळी नास केला।।तु.गा.३०६९.००४।।
कापुराचे सांतें आणिला लसण। वागवितां शीण दुःख होय।।तु.गा.३०६९.००५।।
रत्नाचा जोहरी रत्नचि पारखी। येर देखोवेखीं हातीं घेती।।तु.गा.३०६९.००६।।
तुका म्हणे जरी योग घडे निका। न घडतां थुंका तोंडावरी।।तु.गा.३०६९.००७।।
कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा। तरी काय त्याला भूषण शोभें।।तु.गा.३०७०.००१।।
गजालागीं केला कस्तुरीचा लेप। तिचें तो स्वरूप काय जाणे।।तु.गा.३०७०.००२।।
बकापुढें सांगे भावार्थ वचन। वाउगाची शीण होय त्यासी।।तु.गा.३०७०.००३।।
तुका म्हणे तैसे अभाविक जन। त्यांसी वायां शीण करूं नये।।तु.गा.३०७०.००४।।
कोणा चिंता आड। कोणा लोकलाज नाड।।तु.गा.३०७१.००१।।
कैंचा राम अभागिया। करी वटवट वायां।।तु.गा.३०७१.००२।।
स्मरणाचा राग। क्रोधे विटाळलें अंग।।तु.गा.३०७१.००३।।
तुका म्हणे जडा। काय चाले या दगडा।।तु.गा.३०७१.००४।।
लटिक्याची वाणी चवी ना संवाद। नाहीं कोणां वाद रुचों येत।।तु.गा.३०७२.००१।।
अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा। मायबापीं वेळां न साधिली।।तु.गा.३०७२.००२।।
अनावर अंगीं प्रबळ अवगुण। तांतडीनें मन लाहो साधी।।तु.गा.३०७२.००३।।
तुका म्हणे दोष आणि अवकळा। न पडतां ताळा घडतसे।।तु.गा.३०७२.००४।।
दर्पणासी नकटें लाजे। शुद्ध खिजे देखोनि।।तु.गा.३०७३.००१।।

ऐंसें अवगुणांचें बाधें। दिसे सुधे विपरीत ।।तु.गा.३०७३.००२ ।।
अंधळ्यासी काय हिरा। गाराचि तो सारिखा ।।तु.गा.३०७३.००३ ।।
तुका म्हणे भुंके सुणें। ठाया नेणे ठाव तो ।।तु.गा.३०७३.००४ ।।
संसाराचे धांवें वेठी। आवडी पोटीं केवढी ।।तु.गा.३०७४.००१ ।।
हागों जातां दगड सांची। अंतरीं हे संकल्प ।।तु.गा.३०७४.००२ ।।
लाज तेवढी नारायणीं। वांकडी वाणी पोरांपें ।।तु.गा.३०७४.००३ ।।
तुका म्हणे बेशरमा। वरी श्रमा पडिभरू ।।तु.गा.३०७४.००४ ।।
कैसा सिंदळीचा। नव्हे ऐसी ज्याची वाचा ।।तु.गा.३०७५.००१ ।।
वाचे नुच्चारी गोविंदा। सदा करी परनिंदा ।।तु.गा.३०७५.००२ ।।
कैसा निरयगांवां। जाऊन पवे विसांवा ।।तु.गा.३०७५.००३ ।।
तुका म्हणे दंड। कैसा न पवे तो लंड ।।तु.गा.३०७५.००४ ।।
जन्मांतरिचा परिट न्हावी। जात ठावी त्यानें ते ।।तु.गा.३०७६.००१ ।।
वाखर जैसा चरचरी। तोंड करी संवदणी ।।तु.गा.३०७६.००२ ।।
पूर्व जन्मीं शिखासूत्र। मळ मूत्र अंतरीं ।।तु.गा.३०७६.००३ ।।
तुका म्हणे करिती निंदा। धुवटधंदा पुढिलांचा ।।तु.गा.३०७६.००४ ।।
माहार मातेचे पणी भरे। न कळे खरें पुढील ।।तु.गा.३०७७.००१ ।।
वोंगळ अधमाचे गुण। जातां घडी नलगेचि ।।तु.गा.३०७७.००२ ।।
श्वान झोळी स्वामिसत्ता। कोप येतां उतरे ।।तु.गा.३०७७.००३ ।।
तुका म्हणे गुमान कां। सांगों लोकां अधमासी ।।तु.गा.३०७७.००४ ।।
ऐसें ठावें नाहीं मूढा। सोस काकुलती पुढां ।।तु.गा.३०७८.००१ ।।
माझी नका जाळूं भांडीं। पोटीं भय सोस तोंडीं ।।तु.गा.३०७८.००२ ।।
पातलिया काळ। तेव्हां काय चाले बळ ।।तु.गा.३०७८.००३ ।।
संचित तें करी। नरका जाया मेल्यावरी ।।तु.गा.३०७८.००४ ।।

परउपकार। न घडावा हा विचार।।तु.गा.३०७८.००५।।
तुका म्हणे लांसी। आतां भेटों नये ऐसी।।तु.गा.३०७८.००६।।
कुतऱ्याऐसें ज्याचें जिणें। संग कोणें न करिजे।।तु.गा.३०७९.००१।।
जाय तिकडे हाडहाडी। गोऱ्हवाडीच सोयरीं।।तु.गा.३०७९.००२।।
अवगुणांचा त्याग नाहीं। खवळें पाहीं उपदेशें।।तु.गा.३०७९.००३।।
तुका म्हणे कैंचि लवी । ठेंग्या केवीं अंकुर।।तु.गा.३०७९.००४।।
वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण। तयाचें वदन नावलोका।।तु.गा.३०८०.००१।।
तार्किकाचें अंग आपणा पारिखें। माजिऱ्यासारिखे वाईचाळे।।तु.गा.३०८०.००२।।
माता निंदी तया कोण तो आधार। भंगलें खापर याच नांवें।।तु.गा.३०८०.००३।।
तुका म्हणे आडरानें ज्याची जाली। तयाची ते बोली मिठेंविण।।तु.गा.३०८०.००४।।
दुर्जनाची जोडी। सज्जनाचे खेंटर तोडी।।तु.गा.३०८१.००१।।
पाहे निमित्य तें उणें। धांवे छळावया सुनें।।तु.गा.३०८१.००२।।
न म्हणे रामराम। मनें वाचें हेंचि काम।।तु.गा.३०८१.००३।।
तुका म्हणे भागा। आली निंदा करी मागा।।तु.गा.३०८१.००४।।
दुर्जनासी करी साहे। तोही लाहे दंड हे।।तु.गा.३०८२.००१।।
शिंदळीच्या कुंटणी वाटा। संग खोटा खोट्याचा।।तु.गा.३०८२.००२।।
येर येरा कांचणी भेटे। आगी उठे तेथूनी।।तु.गा.३०८२.००३।।
तुका म्हणे कापूं नाकें । पुढें आणिकें शिकविती।।तु.गा.३०८२.००४।।
दुर्जनाचें अंग अवघेंचि सरळ। नर्काचा कोथळ सांठवला।।तु.गा.३०८३.००१।।
खाय अमंगळ बोले अमंगळ। उठवी कपाळ संघष्टणें।।तु.गा.३०८३.००२।।
सर्पा मंत्र चाले धरावया हातीं। खळाची ते जाती निखळची।।तु.गा.३०८३.००३।।
तुका म्हणे कांहीं न साहे उपमा। आणीक अधमा वोखट्यासी।।तु.गा.३०८३.००४।।
दुर्जनाचा मान। सुखें करावा खंडण।।तु.गा.३०८४.००१।।

लाता हाणोनियां वारी। गुंडा वाट शुद्ध करी।।तु.गा.३०८४.००२।।
बहुतां पीडी खळ। त्याचा धरावा विटाळ।।तु.गा.३०८४.००३।।
तुका म्हणे नखें। काढुनि टाकिजेती सुखें।।तु.गा.३०८४.००४।।
सापें ज्यासी खावें। तेणें प्राणासी मुकावें।।तु.गा.३०८५.००१।।
काय लाधला दुर्जन। तोंडावरी थुंके जन।।तु.गा.३०८५.००२।।
विंचु हाणी नांगी। अग्न लावी आणिकां अंगीं।।तु.गा.३०८५.००३।।
तुका म्हणे जाती। नरका पाउलीं चालती।।तु.गा.३०८५.००४।।
काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न। खरासी लेपन चंदनाचें।।तु.गा.३०८६.००१।।
नको नको देवा खळाची संगति। रस ज्या पंगती नाहीं कथे।।तु.गा.३०८६.००२।।
काय सेज बाज माकडा विलास। अळंकारा नास करूनि टाकी।।तु.गा.३०८६.००३।।
तुका म्हणे काय पाजूनि नवनीत। सर्पा विष थीत अमृताचें।।तु.गा.३०८६.००४।।
दुष्टाचें चिंतन भिन्न अंतरीं। जरी जन्मवरी उपदेशिला। पालथें घागरीं घातलें जीवन। न धरीच जाण तेंही त्याला।।तु.गा.३०८७.००१।।
जन्मा येउनि तेणें पतनचि साधिलें। तमोगुणें व्यापिलें जया नरा। जळो जळो हें त्याचें ज्यालेंपण। कासया हें आलें संवसारा।।तु.गा.३०८७.००२।।
पाषाण जीवनीं असतां कल्पवरी। पाहातां अंतरीं कोरडा तो। कुचर मुग नयेचि पाका। पाहातां सारिखा होता तैसा।।तु.गा.३०८७.००३।।
तुका म्हणे असे उपाय सकळां। न चले या खळा प्रयत्न कांहीं। म्हणऊनि संग न करितां भला। धरितां अबोला सर्व हित।।तु.गा.३०८७.००४।।
दिवट्या वाद्य लावूनि खाणें। करूनि मंडण दिली हातीं।।तु.गा.३०८८.००१।।
नवरा नेईल नोवरी घरा। पूजन वरा पाद्याचें।।तु.गा.३०८८.००२।।
गौरविली विहीण व्याही। घडिलें कांहीं ठेवूं नका।।तु.गा.३०८८.००३।।
करूं द्यावें व्हावें बरें। ठायींचें कांरे न कळेचि।।तु.गा.३०८८.००४।।
वऱ्हाडियांचे लागे पाठीं। जैसी उटी कातेली।।तु.गा.३०८८.००५।।
तुका म्हणे जोडिला थुंका। पुढें नरका सामग्री।।तु.गा.३०८८.००६।।
दुर्जनाची गंधी विष्ठेचिये परि। देखोनियां दुरी व्हावें तया।।तु.गा.३०८९.००१।।
आइका हो तुम्ही मात हे सज्जन। करूं संघष्टन नये बोलो।।तु.गा.३०८९.००२।।

दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ। वाणी रजस्वला स्त्रवे तैसी।।तु.गा.३०८९.००३।।
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी। पिसाळल्यावरी धांवे श्वान।।तु.गा.३०८९.००४।।
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग। बोलिलासे त्याग देशाचा त्या।।तु.गा.३०८९.००५।।
तुका म्हणे किती सांगावें पृथक । अंग कुंभीपाक दुर्जनाचें।।तु.गा.३०८९.००६।।
नये पाहों मुख मात्रागमन्याचें। तैसें अभक्ताचें गुरूपुत्रा।।तु.गा.३०९०.००१।।
म्हणऊनि बरें धरितां एकांत। तेणें नव्हे घात भजनासी।।तु.गा.३०९०.००२।।
नये होऊं कदा निंदकाची भेटी। जया द्वैत पोटीं चांडाळाच्या।।तु.गा.३०९०.००३।।
तुका म्हणे नका बोलों त्यासी गोष्टी। जयाचिया दृष्टी पाप वाढे।।तु.गा.३०९०.००४।।
हुंदकी पिसवि हालवितो दाढी। माळेमणी ओढी निंदेचे ते।।तु.गा.३०९१.००१।।
त्याचें फळ पाकीं यमाचे ते दंड। घर केलें कुंड कुंभपाकीं ।।तु.गा.३०९१.००२।।
क्रोध पोटीं मांग आणिला अंतरा। भुंकोनि कुतरा जप करी।।तु.गा.३०९१.००३।।
तुका म्हणे स्नान केलें मळमुत्रें। जेविलीं पितरें अमंगळें।।तु.गा.३०९१.००४।।
देखोनि पुराणिकाची दाढी। रडे स्फुंदे नाक ओढी।।तु.गा.३०९२.००१।।
प्रेम खरें दिसे जना। भिन्न अंतरीं भावना।।तु.गा.३०९२.००२।।
आवरितां नावरे। खूर आठवी नेवरे।।तु.गा.३०९२.००३।।
बोलों नये मुखा वाटां। म्हणे होता ब्याचा तोटा।।तु.गा.३०९२.००४।।
दोन्ही शिंगें चारी पाय। खुणा दावी म्हणे होय।।तु.गा.३०९२.००५।।
मना आणितां बोकड। मेला त्याची चरफड।।तु.गा.३०९२.००६।।
होता भाव पोटीं। मुखा आलासे शेवटीं।।तु.गा.३०९२.००७।।
तुका म्हणे कुडें। कळों येतें तें रोकडें।।तु.गा.३०९२.००८।।
आड पडे काडी। तरि ते बहुत पाणी खोडी।।तु.गा.३०९३.००१।।
ऐसे दुर्जन संगती। बहुतांचे घात होती।।तु.गा.३०९३.००२।।
एक पडे माशी। तरी ते बहु अन्न नाशी।।तु.गा.३०९३.००३।।

तुका म्हणे रांड। ऐसी का ते व्याली भांड।।तु.गा.३०९३.००४।।
दोराच्या आधारें पर्वत चढला। पाउलासी केला अपघात।।तु.गा.३०९४.००१।।
अष्टोतरशें व्याधि वैद्यें दवडुनि। तो वैद्य मारूनि उत्तीर्णता।।तु.गा.३०९४.००२।।
नव मास माया वाहिलें उदरीं। ते माता चौबारीं नग्न केली।।तु.गा.३०९४.००३।।
गायत्रीचें क्षीर पिळुनि घेऊनि। उपवासी बांधोनि ताडीतसे।।तु.गा.३०९४.००४।।
तुका म्हणे गुरुनिंदकाचें तोंड। पाहातां नरककुंड पूर्वजांसी।।तु.गा.३०९४.००५।।
दुर्बळें सदैवा। म्हणे नागवेल केव्हां।।तु.गा.३०९५.००१।।
आपणा ऐसें करूं पाहे। स्वभावासी करिल काय।।तु.गा.३०९५.००२।।
मूढ सभे आंत। इच्छी पंडिताचा घात।।तु.गा.३०९५.००३।।
गांढ्या देखुनि शूर। उगीच करी बुरबुर।।तु.गा.३०९५.००४।।
आणिकांचा हेवा। न करीं शरण जाईं देवा।।तु.गा.३०९५.००५।।
तुका म्हणे किती। करूं दुष्टाची फजिती।।तु.गा.३०९५.००६।।
निंबाचिया झाडा साकरेचें आळें। आपुलीं तीं फळें न संडीच।।तु.गा.३०९६.००१।।
तैसें अधमाचें अमंगळ चित्त। वमन तें हित करूनि सांडी।।तु.गा.३०९६.००२।।
परिसाचें अंगीं लाविलें खापर। पालट अंतर नेघे त्याचें।।तु.गा.३०९६.००३।।
तुका म्हणे वेळू चंदना संगती। काय ते असती जवळिकें ।।तु.गा.३०९६.००४।।
न विचारतां ठायाठाव। काय भुंके तो गाढव।।तु.गा.३०९७.००१।।
केला तैसा लाहे दंड। खळ अविचारी लंड।।तु.गा.३०९७.००२।।
करावें लाताळें। ऐसें नेणे कोण्या काळें।।तु.गा.३०९७.००३।।
न कळे उचित। तुका म्हणे नीत हित।।तु.गा.३०९७.००४।।
महाराशी शिवे। कोपे ब्राह्मण तो नव्हे।।तु.गा.३०९८.००१।।
तया प्रायश्चित्त कांहीं। देहत्याग करितां नाहीं।।तु.गा.३०९८.००२।।
नातळे चांडाळ। त्याचा अंतरीं विटाळ।।तु.गा.३०९८.००३।।

ज्याचा संग चित्तीं। तुका म्हणे तो ते याती।।तु.गा.३०९८.००४।।
अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड। काय त्यासी रांड प्रसवली।।तु.गा.३०९९.००१।।
वैष्णव चांभार धन्य त्याची माता। शुद्ध उभयतां कुळ याती।।तु.गा.३०९९.००२।।
ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं। नव्हे माझी वाणी पदरींची।।तु.गा.३०९९.००३।।
तुका म्हणे आगी लागो थोरपणा। दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी।।तु.गा.३०९९.००४।।
मुद्दल जतन जालें। मग लाभाचें काय आलें।।तु.गा.३१००.००१।।
घरीं देऊनि अंतर गांठी। राखा पारख्या न सुटे मिठी।।तु.गा.३१००.००२।।
घाला पडे थोडेंच वाटे। काम मैंदाचें चपेटे।।तु.गा.३१००.००३।।
तुका म्हणे वरदळ खोटें। फांसे अंतरींच्या कपटें।।तु.गा.३१००.००४।।
गाढवाचें तानें। पालटतें क्षणक्षणें।।तु.गा.३१०१.००१।।
तैसे अधमाचे गुण। एकविध नाहीं मन।।तु.गा.३१०१.००२।।
उपजतां बरें दिसे। रूप वाढतां तें नासे।।तु.गा.३१०१.००३।।
तुका म्हणे भुंकते वेळे। वेळ अवेळ न कळे।।तु.गा.३१०१.००४।।
नावडे तरि कां येतील हे भांड। घेउनियां तोंड काळें येथें।।तु.गा.३१०२.००१।।
नासोनियां जाय रस या संगती। खळाचे पंगती नारायणा।।तु.गा.३१०२.००२।।
तोंडावाटे नर्क काढी अमंगळ। मिष्टान्ना विटाळ करी सुणें।।तु.गा.३१०२.००३।।
तुका म्हणे नाहीं संताची मर्यादा। निंदे तोचि निंदा मायझवा।।तु.गा.३१०२.००४।।
जेवीं नवज्वरें तापलें शरीर। लागे तया क्षीर विषतुल्य।।तु.गा.३१०३.००१।।
तेवीं परमार्थ जीहीं दुराविला। तयालागीं झाला सन्निपात।।तु.गा.३१०३.००२।।
कामीन जयाच्या जाहाली नेत्रासी। देखे तो चंद्रासी पीतवर्ण।।तु.गा.३१०३.००३।।
तुका म्हणे मद्यपानाची आवडी। न रुचे त्या गोडी नवनीताची।।तु.गा.३१०३.००४।।
रासभ धुतला महा तीर्थामाजी। नव्हे जैसा तेजी शामकर्ण।।तु.गा.३१०४.००१।।
तेवीं खळा काय केल्या उपदेश। नव्हेचि मानस शुद्ध त्याचें।।तु.गा.३१०४.००२।।

सर्पासी पाजिलें शर्करापीयूष। अंतरींचें विष जाऊं नेणे।।तु.गा.३१०४.००३।।
तुका म्हणे श्वाना क्षिरीचें भोजन। सवेंचि वमन जेवीं तया।।तु.गा.३१०४.००४।।
स्मशान ते भूमी प्रेतरूप जन। सेवाभक्तिहीन ग्रामवासी।।तु.गा.३१०५.००१।।
भरतील पोटें श्वानाचिया परी। वस्ति दिली घरीं यमदूतां।।तु.गा.३१०५.००२।।
अपूज्य लिंग तेथें अतित ने घे थारा। ऐसी वस्ती चोरा कंटकांची।।तु.गा.३१०५.००३।।
तुका म्हणे नाहीं ठावीं स्थिति मती। यमाची निश्चिती कुळवाडी।।तु.गा.३१०५.००४।।
श्वान शीघ्रकोपी। आपणा घातकर पापी।।तु.गा.३१०६.००१।।
नाहीं भीड आणिक धीर। उपदेश न जिरे क्षीर।।तु.गा.३१०६.००२।।
माणसांसि भुंके । विजातीनें द्यावें थुंके ।।तु.गा.३१०६.००३।।
तुका म्हणे चित्त। मळिण करा ते फजित।।तु.गा.३१०६.००४।।
अधमाचें चित्त अहंकारीं मन। उपदेश शीण तया केला।।तु.गा.३१०७.००१।।
पापियांचे मन न करी आचार। विधवेसी शृंगार व्यर्थ केला।।तु.गा.३१०७.००२।।
अधमाचें चित्त दुश्चित ऐकेना। वायां शीण मना करुनि काय।।तु.गा.३१०७.००३।।
गर्दभासी दिली चंदनाची उटी। केशर ललाटीं शूकराच्या।।तु.गा.३१०७.००४।।
पतिवंचकेसी सांगतां उदंड। परि ते पाषांड तिचें मनीं।।तु.गा.३१०७.००५।।
तुका म्हणे तैसें अभाविकां सांगतां। वाउगाचि चित्ता शीण होय।।तु.गा.३१०७.००६।।
दावूनियां मांड। पुरे न करीती भांड।।तु.गा.३१०८.००१।।
जळो जळो तैसें जिणें। फटमर लाजिरवाणें।।तु.गा.३१०८.००२।।
घेतलें तें सोंग। बरवें संपादावें सांग।।तु.गा.३१०८.००३।।
तुका म्हणे धीरें। देव नुपेक्षील खरें।।तु.गा.३१०८.००४।।
घरीं रांड पोरें मरती उपवासीं। सांगें लोकांपासीं थोरपण।।तु.गा.३१०९.००१।।
नेऊनियां घरा दाखवावें काय। काळतोंडा जाय चुकवूनि।।तु.गा.३१०९.००२।।
तुका म्हणे आम्ही जाणों त्या प्रमाण। ठकावे हे जन तैसे नव्हों।।तु.गा.३१०९.००३।।

जातो वाराणसी। निरवी गाई घोडे म्हैसी।।तु.गा.३११०.००१ ।।
गेलों येतों नाहीं ऐसा। सत्य मानारे भरंवसा।।तु.गा.३११०.००२ ।।
नका काढूं माझी पेवें। तुम्ही वरळा भूस खावें।।तु.गा.३११०.००३ ।।
भिकारियाचे पाठीं। तुम्ही घेउनि लागा काठी।।तु.गा.३११०.००४ ।।
सांगाल जेवाया ब्राह्मण। तरी कापाल माझी मान।।तु.गा.३११०.००५ ।।
वोकलिया वोका। म्यां खर्चिला नाहीं रुका।।तु.गा.३११०.००६ ।।
तुम्हीं खावें ताकपाणी। जतन करा माझें लोणी।।तु.गा.३११०.००७ ।।
नाहीं माझे मनीं। पोरें रांडा नागवणी।।तु.गा.३११०.००८ ।।
तुका म्हणे नष्ट। होतें तैसें बोले स्पष्ट।।तु.गा.३११०.००९ ।।
उद्धत त्या जाती। द्रव्यें रंगल्या उद्धती।।तु.गा.३१११.००१ ।।
म्हणऊनि बहु फार। त्यासी असावें अंतर।।तु.गा.३१११.००२ ।।
कैंचें पाठी पोट । गोड विषासी शेवट ।।तु.गा.३१११.००३ ।।
तुका म्हणे सापा । न कळे कुरवाळिलें बापा।।तु.गा.३१११.००४ ।।
बरगासाठीं खादलें शेण। मिळतां अन्न न संडी।।तु.गा.३११२.००१ ।।
फजित तो केला लाहे। ताडण साहे गौरव।।तु.गा.३११२.००२ ।।
ओढाळाची ओंगळ ओढी। उगी खोडी नवजाय।।तु.गा.३११२.००३ ।।
तुका फजीत करी बुच्या। विसरे कुच्या खोडी तेणें।।तु.गा.३११२.००४ ।।
जेवितांहि धरी। नाक हागतियेपरी।।तु.गा.३११३.००१ ।।
ऐसियाचा करी चाळा। आपुलीच अवकळा।।तु.गा.३११३.००२ ।।
सांडावें मांडावें। काय ऐसें नाहीं ठावें।।तु.गा.३११३.००३ ।।
तुका म्हणे करी। ताक दुधा एकसरी।।तु.गा.३११३.००४ ।।
शिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास। बाईल तो त्यास न विसंबे।।तु.गा.३११४.००१ ।।
दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर। तो म्हणे इतर लोक तैसे।।तु.गा.३११४.००२ ।।

तुका म्हणे जया चित्तीं जे वासना। तयाची भावना तयापरी।।तु.गा.३११४.००३।।
चुंभळीशीं करी चुंभळीचा संग। अंगीं वसे गुण क्रियाहीन।।तु.गा.३११५.००१।।
बीजाऐसें फळ दावी परिपाकीं। परिमळ लौकिकीं जातीऐसा।।तु.गा.३११५.००२।।
माकडाच्या गळां रत्न कुळांगना। सांडूनियां सुना बिदी धुंडी।।तु.गा.३११५.००३।।
तुका म्हणे ऐसा व्याली ते गाढवी। फजिती ते व्हावी आहे पुढें।।तु.गा.३११५.००४।।
आधींच आळशी। वरी गुरुचा उपदेशी।।तु.गा.३११६.००१।।
मग त्या कैंची आडकाठीं। विधिनिषेधाची भेटी।।तु.गा.३११६.००२।।
नाचरवे धर्म। न करवे विधिकर्म।।तु.गा.३११६.००३।।
तुका म्हणे ते गाढव। घेती मनासवें धांव।।तु.गा.३११६.००४।।
गाढवाचे अंगीं चंदनाची उटी। राखेसवें भेटी केली तेणें।।तु.गा.३११७.००१।।
सहज गुण जयाचिये देहीं। पालट तो कांहीं नव्हे तया।।तु.गा.३११७.००२।।
माकडाचे गळां मोलाचा तो मणी। घातला चावुनी थुंकोनि टाकी।।तु.गा.३११७.००३।।
तुका म्हणे खळा नावडे हित । अविद्या वाढवीत आपुलें मतें ।।तु.गा.३११७.००४।।
नेणें सुणें चोर पाहुणा मागता। देखून भलता भुंकतसे।।तु.गा.३११८.००१।।
शिकविलें कांहीं न चलती तया। बोलियेले वायां बोल जाती।।तु.गा.३११८.००२।।
क्षीर ओकुनियां खाय अमंगळ। आपुली ते ढाळ जाऊं नेदी।।तु.गा.३११८.००३।।
वंदूं निंदूं काय अभक्त दुराचार। खळाचा विचार तुका म्हणे।।तु.गा.३११८.००४।।
कुचराचें श्रवण। गुणदोषावरी मन।।तु.गा.३११९.००१।।
असोनियां नसे कथें। मूर्ख अभागी तें तेथें।।तु.गा.३११९.००२।।
निरर्थक कारणीं। कान डोळे वेची वाणी।।तु.गा.३११९.००३।।
पापाचे सांगाती। तोंडीं ओढाळांचे माती।।तु.गा.३११९.००४।।
हिताचिया नांवें। वोस पडिलें देहभावें।।तु.गा.३११९.००५।।
फजीत करूनि सोडी। तुका करी बोडोबोडी।।तु.गा.३११९.००६।।

शादीचें तें सोंग। संपादितां राजा व्यंग।।तु.गा.३१२०.००१ ।।
पाहा कैसी विटंबना। मूर्खा अभाग्याची जना।।तु.गा.३१२०.००२ ।।
दिसतें तें लोपी। झिंज्या वोढुनियां पापी।।तु.गा.३१२०.००३ ।।
शिंदळी त्या सती। तुका म्हणे थुंका घेती।।तु.गा.३१२०.००४।।
गयाळाचें काम हिताचा आवारा। लाज फजितखोरा असत नाहीं।।तु.गा.३१२१.००१ ।।
चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें। असावें परतें जवळूनि।।तु.गा.३१२१.००२ ।।
न करावा संग न बोलावी मात। सावधान चित्त नाहीं त्यासी।।तु.गा.३१२१.००३ ।।
तुका म्हणे दु:ख देतील माकडें। घालिती सांकडें उफराटें।।तु.गा.३१२१.००४ ।।
मदें मातलें तें नागवेंचि नाचे। अनुचित वाचे बडबडी।।तु.गा.३१२२.००१ ।।
आतां शिकवावा कोणासी विचार। कर्म ते दुस्तर करवी धीट ।।तु.गा.३१२२.००२ ।।
आले अंगासी ते बळिवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत।।तु.गा.३१२२.००३ ।।
तुका म्हणे कळों येईल तो भाव। अंगावरि घाव उमटतां।।तु.गा.३१२२.००४ ।।
हागिल्याचे सिंके वोणवाचि राहे। अपशकुन पाहे वेडगळ।।तु.गा.३१२३.००१ ।।
अतेता समय नेणतां अवकळा। येऊं नये बळा सिक धरा।।तु.गा.३१२३.००२ ।।
भोजनसमयीं ओकाचा आठव। ठकोनियां जीव कष्टी करी।।तु.गा.३१२३.००३ ।।
तुका म्हणे किती सांगावें उगवून। अभाग्याचे गुण अनावर।।तु.गा.३१२३.००४ ।।
वेडिया उपचार करितां सोहळे। काय सुख कळे तयासी तें। अंधापुढें दीप नाचती नाचणें। भक्तिभावेंविण भक्ति तैसी।।तु.गा.३१२४.००१ ।।
तिमाणें राखण ठेवियेलें सेता। घालुनियां माथां चुना तया । खादलें म्हणूनि सेवटीं बोंबली । ठायींची कां भुली नेणां रया ।।तु.गा.३१२४.००२ ।।
मुकियापासाव सांगतां पुराण। रोगिया मिष्टान्न काय होय। नपुंसका काय करिल पद्मिणी । रुचिविण वाणी तैसी होय ।।तु.गा.३१२४.००३ ।।
हात पाय नाहीं करिल तो काय। वृक्षा फळ आहे अमोलिक । हातां नये तैसा वायांच तळमळी। भावेंविण भोळीं म्हणे तुका।।तु.गा.३१२४.००४ ।।
क्षीर मागे तया रायतेंचि वाढी। पाधानी गधडी ऐशा नांवें।।तु.गा.३१२५.००१ ।।
समयो जाणां समयो जाणां। भलतें नाणां भलतेथें।।तु.गा.३१२५.००२ ।।
अमंगळ वाणी वदवी मंगळी। अशुभ वोंगळी शोभन तें।।तु.गा.३१२५.००३ ।।

तुका म्हणे नेणें समयो ठाया ठाव। रहाडी ते वाव नरकाडी ।।तु.गा.३१२५.००४।।
फोडुनि सांगडी बांधली माजासी। पैल थडी कैसी पावे सहजीं ।।तु.गा.३१२६.००१ ।।
आपला घात आपणचि करी। आणिकां सांगतां नाइके तरी ।।तु.गा.३१२६.००२।।
भुकेभेणें विष घेऊं पाहें आतां। आपलाचि घात करूं पाहे ।।तु.गा.३१२६.००३।।
तुका म्हणे एक चालतील पुढें। तयासी वांकडें जातां ठके ।।तु.गा.३१२६.००४।।
मांडवाच्या दारा। पुढें आणिला म्हातारा ।।तु.गा.३१२७.००१ ।।
म्हणे नवरी आणा रांड। जाळा नवऱ्याचें तोंड।।तु.गा.३१२७.००२।।
समय न कळे। काय उपयोगीं ये वेळे ।।तु.गा.३१२७.००३।।
तुका म्हणे खरा। येथूनियां दूर करा ।।तु.गा.३१२७.००४।।
मातेचीं जो थानें फाडी। तया जोडी कोण ते ।।तु.गा.३१२८.००१ ।।
वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ।।तु.गा.३१२८.००२।।
आगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ।।तु.गा.३१२८.००३।।
तुका जाणें वर्म। येरा नाचविति भ्रम ।।तु.गा.३१२८.००४।।
कर्कशेसंगती। दुःख उदंड फजिती ।।तु.गा.३१२९.००१ ।।
नाहीं इह ना परलोक । मजुर दिसे जैसें रंक ।।तु.गा.३१२९.००२।।
वचन सेंटावरी। त्याचें ठेवूनि धिक्कारी ।।तु.गा.३१२९.००३।।
तुका म्हणे पायीं बेडी। पडिली कपाळीं कुऱ्हाडी ।।तु.गा.३१२९.००४।।
वेडी ते वेडी बहुतच वेडी। चाखतां गोडी चवी नेणे ।।तु.गा.३१३०.००१ ।।
देहा लावी वात। पालव घाली जाली रात ।।तु.गा.३१३०.००२।।
कडिये मूल भोंवतें भोंये। मोकलुनि रडे धाय ।।तु.गा.३१३०.००३।।
लेंकरें वीत पुसे जगा। माझा गोहो कोण तो सांगा ।।तु.गा.३१३०.००४।।
आपुली शुद्धि जया नाहीं। आणिकाची ते जाणे काई ।।तु.गा.३१३०.००५।।
तुका म्हणे ऐसे जन। नरका जातां राखे कोण ।।तु.गा.३१३०.००६।।

अति झालें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सवासीण न म्हणावी ।।तु.गा.३१३१.००१ ।।
उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपण ।।तु.गा.३१३१.००२ ।।
शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ।।तु.गा.३१३१.००३ ।।
तुका म्हणे सोंग पोटाचे उपाई । कारण कमाईवीण नाहीं ।।तु.गा.३१३१.००४ ।।
सावित्रिची विटंबणा । रांडपणा करीतसे ।।तु.गा.३१३२.००१ ।।
काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ।।तु.गा.३१३२.००२ ।।
कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहे फजिती ।।तु.गा.३१३२.००३ ।।
तुका म्हणे ठुणगुण देखें । उगीच मूर्ख फुंदतां ।।तु.गा.३१३२.००४ ।।
सामावे कारण । नाहीं सोसत धरणें ।।तु.गा.३१३३.००१ ।।
लाही थिंके लाजिरवाणी । हीनकमाईची घाणी ।।तु.गा.३१३३.००२ ।।
पुष्प जवळी नाका । दुर्गंधीच्या नांवें थुंका ।।तु.गा.३१३३.००३ ।।
तुका म्हणे किती । उपदेशहीन जाती ।।तु.गा.३१३३.००४ ।।
वडिलें दिलें भूमिदान । तें जो मागे अभिलाषून ।।तु.गा.३१३४.००१ ।।
अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दंड यमा घरीं ।।तु.गा.३१३४.००२ ।।
उभयकुळ समवेत । नरकीं प्रवेशे अद्भुत ।।तु.गा.३१३४.००३ ।।
तप्तलोहा भेटी । तुका म्हणें कल्पकोटी ।।तु.गा.३१३४.००४ ।।
आचरे दोष न धरी धाक ।परीपाक दु:खाचा ।।तु.गा.३१३५.००१ ।।
चांडाळ तो दुराचारी । अंगीकारी कोण त्या ।।तु.गा.३१३५.००२ ।।
नव्हे संतान वोस घर । अंधकार कळासी ।।तु.गा.३१३५.००३ ।।
तुका म्हणे त्याचें दान । घेतां पतन दु:खासी ।।तु.गा.३१३५.००४ ।।
सदा तळमळ । चित्ताचिये हळहळ ।।तु.गा.३१३६.००१ ।।
त्याचें दर्शन न व्हावें । शव असतां तो जिवें ।।तु.गा.३१३६.००२ ।।
कुशब्दाची घाणी । अमंगळविली वाणी ।।तु.गा.३१३६.००३ ।।

नेणे शब्दपर। तुका म्हणे परउपकार।।तु.गा.३१३६.००४।।
काय केलें जलचरीं। ढीवर त्यांच्या घातावरी।।तु.गा.३१३७.००१।।
हा तों ठायींचा विचार। आहे यातिवैराकार।।तु.गा.३१३७.००२।।
श्वापदातें वधी। निरपराधें पारधी।।तु.गा.३१३७.००३।।
तुका म्हणे खळ । संतां पिडिती चांडाळ ।।तु.गा.३१३७.००४।।
अंगीं भरला ताठा । नये वळणी जैसा खुंटा ।।तु.गा.३१३८.००१।।
कैसें न कळे त्या डेंगा । हित आदळलें अंगा ।।तु.गा.३१३८.००२।।
जीव जाते वेळे । भल्याकडे ताठी डोळें ।।तु.गा.३१३८.००३।।
मुसळाचें अनु । तुका म्हणे नव्हे धनु ।।तु.गा.३१३८.००४।।
दर्पणासी बुझे । नकटें तोंड लपवी लाजे ।।तु.गा.३१३९.००१।।
गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासी पीडा करी ।।तु.गा.३१३९.००२।।
चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ।।तु.गा.३१३९.००३।।
तुका म्हणे जन । देवा ऐसें भाग्यहीन ।।तु.गा.३१३९.००४।।
काय ह्याचें घ्यावें। नित्य नित्य कोणें गावें ।।तु.गा.३१४०.००१।।
केलें हरिकथेनें वांज। अंतरोनि जाते नीज।।तु.गा.३१४०.००२।।
काम संसार। अंतरीं हे करकर।।तु.गा.३१४०.००३।।
तुका म्हणे हेंड। ऐसे मानिती ते लंड।।तु.गा.३१४०.००४।।
आणिकाच्या घातें। ज्यांचीं निवतील चित्तें।।तु.गा.३१४१.००१।।
तेचि ओळखावे पापी। निरयवासी शीघ्रकोपी।।तु.गा.३१४१.००२।।
जो कान पसरोनी। ऐके वदे दुष्ट वाणी।।तु.गा.३१४१.००३।।
तुका म्हणे भांडा। धीर नाहीं ज्याच्या तोंडा।।तु.गा.३१४१.००४।।
जाळें घातलें सागरीं। बिंदु न राहे भीतरी।।तु.गा.३१४२.००१।।
तैसें पापियाचें मन। तया नावडे कीर्तन।।तु.गा.३१४२.००२।।

गाढव गंगेसी न्हाणिलें। जाउनि उकरड्यावरि लोळे ।।तु.गा.३१४२.००३ ।।
प्रीतीं पोसिलें काउळें। जाउनि विष्ठेवरी लोळे ।।तु.गा.३१४२.००४ ।।
तुका म्हणे तैसी हरी। कीरव्या नावडे कस्तुरी ।।तु.गा.३१४२.००५ ।।
जीवें जीव नेणे पापी सारिखाची। नळी दुजयाची कापूं बैसें ।।तु.गा.३१४३.००१ ।।
आत्मा नारायण सर्वां घटीं आहे। पशुमध्यें काय कळों नये ।।तु.गा.३१४३.००२ ।।
देखत हा जीव हुंबरे वोरडत। निष्ठुराचे हात वाहाती कैसे ।।तु.गा.३१४३.००३ ।।
तुका म्हणे तया चांडाळासी नर्क ।भोगिती अनेक महादुःखें ।।तु.गा.३१४३.००४ ।।
मेलियांच्या रांडा इच्छिती लेंकरूं ।लाज नाहीं धरूं प्रीत कैशी ।।तु.गा.३१४४.००१ ।।
मागिलां पुढिलां एक सरोबरी। काळाची पेटारी खांदा वाहे ।।तु.गा.३१४४.००२ ।।
आन दिसे परी मरणचि खरें। सांपळा उंदिरें सामाविलीं ।।तु.गा.३१४४.००३ ।।
तुका म्हणे झाली मनाची परती। निवळली ज्योती दिसों आली ।।तु.गा.३१४४.००४ ।।
चाकरीवांचून। खाणें अनुचित वेतन ।।तु.गा.३१४५.००१ ।।
धणी काढोनियां निजा। करील ये कामेंचि पूजा ।।तु.गा.३१४५.००२ ।।
उचितावेगळें। अभिळासें तोंड काळें ।।तु.गा.३१४५.००३ ।।
सांगे तरी तुका। पाहा लाज नाहीं लोकां ।।तु.गा.३१४५.००४ ।।
गहूं एक जाती। परी त्या पाधाणी नासिती ।।तु.गा.३१४६.००१ ।।
वर्म जाणावें तें सार। कोठें काय थोडें फार ।।तु.गा.३१४६.००२ ।।
कमाईचें सार। जाती दाविती प्रकार ।।तु.गा.३१४६.००३ ।।
तुका म्हणे मोल। गुणा मिथ्या फिके बोल ।।तु.गा.३१४६.००४ ।।
गोमट्या बिजाचीं फळेंही गोमटीं। वाहे तेंचि पोटीं समतुक ।।तु.गा.३१४७.००१ ।।
जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांती । परतोनि मागुती फिरों नेणें ।।तु.गा.३१४७.००२ ।।
खऱ्याचें पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळे दुरी ।।तु.गा.३१४७.००३ ।।
तुका म्हणे मज सत्याची आवडी । करितां तांतडी येत नाहीं ।।तु.गा.३१४७.००४ ।।

जाणे वर्तमान। परि तें न वारे त्याच्यानें।।तु.गा.३१४८.००१।।
तोही कारणांचा दास। देव म्हणवितां पावे नास।।तु.गा.३१४८.००२।।
वेंची अनुष्ठान। सिद्धी कराया प्रसन्न।।तु.गा.३१४८.००३।।
तुका म्हणे त्याचें। मुद्दल गेलें हाटवेचें।।तु.गा.३१४८.००४।।
लटिकें तें रुचे। साच कोणाही न पचे।।तु.गा.३१४९.००१।।
ऐसा माजल्याचा गुण। भोगें कळों येईल शीण।।तु.गा.३१४९.००२।।
वाढवी ममता। नाहीं वरपडला तो दूतां।।तु.गा.३१४९.००३।।
न मनी माकड। कांहीं उपदेश हेकड।।तु.गा.३१४९.००४।।
चंदनाचे गांवीं सर्पांची वसति। भोगिते ते होती द्वीपांतरीं।।तु.गा.३१५०.००१।।
एका ओझें एका लाभ घडे देवा। संचिताचा ठेवा वेगळाला।।तु.गा.३१५०.००२।।
क्षीराची वसति अशुद्ध सेवावें। जवळीं तें जावें भोगें दुरी।।तु.गा.३१५०.००३।।
तुका म्हणे ऐसी बुद्धि ज्याची जड। त्याहुनी दगड बरे देवा।।तु.गा.३१५०.००४।।
तोडुनि पुष्पवटिका फळवृक्षयाती। बाभळा राखिती करूनि सार।।तु.गा.३१५१.००१।।
कोण हित तेणें देखिलें आपुलें। आणीक पाहिलें सुख काई।।तु.गा.३१५१.००२।।
धान्य बिजें जेणें जाळोनी सकळें। पेरितों काळें जिरें बीज।।तु.गा.३१५१.००३।।
मोडोनियां वाटा पुढीलांची सोय। आडरानें जाय घेउनि लोकां।।तु.गा.३१५१.००४।।
विषाचें अमृत ठेवूनियां नाम। करितो अधम ब्रह्महत्या।।तु.गा.३१५१.००५।।
तुका म्हणे त्यास नाइके सांगतां। तया हाल करितां पाप नाहीं।।तु.गा.३१५१.००६।।
कामातुरा भय लाज ना विचार। शरीर असार तृणतुल्य।।तु.गा.३१५२.००१।।
नवल हे लीळा कर्त्याचें लाघव। प्रारब्धें भाव दाखविले।।तु.गा.३१५२.००२।।
लोभालोभ एका धनाचिये ठायीं। आणिकांची सोई चाड नाहीं।।तु.गा.३१५२.००३।।
तुका म्हणे भूक न विचारी प्रकार। योजे तेंचि सार यथाकाळें।।तु.गा.३१५२.००४।।
बांधी सोडी हें तों धन्याचिये हातीं। हेंकड गोविती आपणां बळें।।तु.गा.३१५३.००१।।

भुललियासी नाहीं देहाचा आठव। धोतऱ्यानें भाव पालटिला।।तु.गा.३१५३.००२।।
घरांत रिघावें दाराचिये सोई। भिंतीसवें डोई घेऊनि फोडी।।तु.गा.३१५३.००३।।
तुका म्हणे देवा गेलीं विसरोन। आतां वर्म कोण दावी यांसी।।तु.गा.३१५३.००४।।
पूर्वजांसी नरका। जाणें तें एक आइका।।तु.गा.३१५४.००१।।
निंदा करावी चाहाडी। मनीं धरूनि आवडी।।तु.गा.३१५४.००२।।
मात्रागमना ऐसी। जोडी पातकांची रासी।।तु.गा.३१५४.००३।।
तुका म्हणे वाट। कुंभपाकाची ते नीट।।तु.गा.३१५४.००४।।
नाहीं पाइतन भूपतीशीं दावा। धिग त्या कर्तव्या आगी लागो।।तु.गा.३१५५.००१।।
मुंगिचिया मुखा गजाचा आहार। न साहे भार जाय जीवें।।तु.गा.३१५५.००२।।
तुका म्हणे आधीं करावा विचार। शूरपणें तीर मोकलावा।।तु.गा.३१५५.००३।।
सेवटासी जरी आलें। तरी झालें आंधळें।।तु.गा.३१५६.००१।।
स्वहिताचा लेश नाहीं। दगडा कांहीं अंतरीं।।तु.गा.३१५६.००२।।
काय परिसासवें भेटी। खापरखुंटी झालिया।।तु.गा.३१५६.००३।।
तुका म्हणे अधम जन। अवगुणची वाढवी।।तु.गा.३१५६.००४।।
कामातुर चवी सांडी। रळ तोंडीं बरळें।।तु.गा.३१५७.००१।।
रंगलें तें अंगीं दावी। विष देववी आसडे।।तु.गा.३१५७.००२।।
धनसोसें लागे वेड। ते बडबड शमेना।।तु.गा.३१५७.००३।।
तुका म्हणे व्यसनें दोन्ही। नर्कखाणी भोगावया ।।तु.गा.३१५७.००४।।
चालती आड वाटा। आणिकां दाविती जे नीटा।।तु.गा.३१५८.००१।।
न मनीं तयांचे उपकार। नाहीं जोडा तो गंव्हार।।तु.गा.३१५८.००२।।
विष सेवूनि वारी मागें। प्राण जातां जेणें संगें।।तु.गा.३१५८.००३।।
बुडतां हाका मारी। ठाव नाहीं आणिका वारी।।तु.गा.३१५८.००४।।
तुका म्हणे न करीं हेका। गुण घेऊन अवगुण टाका।।तु.गा.३१५८.००५।।

धनवंत एक बहिराट अंधळे। शुभ्र कुष्ठ काळे भोग अंगीं ।।तु.गा.३१५९.००१ ।।
प्रारब्धाची गति न कळे विचित्र। आहे हातीं सूत्र विठोबाचे।।तु.गा.३१५९.००२ ।।
आणीक रोगांची नांवें सांगों किती। अखंड असती जडोनियां।।तु.गा.३१५९.००३ ।।
तुका म्हणे नष्ट संचितांचें दान। खातां पावे पण सुख नेदी।।तु.गा.३१५९.००४ ।।
बैसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि। देखतांचि चिंधी मन धांवे।।तु.गा.३१६०.००१ ।।
व्यभिचाऱ्यापाशीं बैसतां क्षणभरी। देखतांचि नारी मन धांवे।।तु.गा.३१६०.००२ ।।
प्रपंचाचा छंद टाकुनियां गोवा। धरावें केशवा हृदयांत ।।तु.गा.३१६०.००३ ।।
सांडुनियां देईं संसाराची बेडी। कीर्तनाची गोडी धरावी गा।।तु.गा.३१६०.००४ ।।
तुका म्हणे तुला सांगतों मी एक । रुक्मिणीनायक मुखीं गावा।।तु.गा.३१६०.००५ ।।
भल्याचें दर्शन। तेथें शुभचि वचन।।तु.गा.३१६१.००१ ।।
बोलावी हे धर्मनीत। क्षोभें होत नाहीं हित।।तु.गा.३१६१.००२ ।।
मर्यादा ते बरी। वेळ जाणावी चतुरीं।।तु.गा.३१६१.००३ ।।
तुका म्हणे बहु। लागे ऐसें बरें मऊ ।।तु.गा.३१६१.००४ ।।
भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां। पंडित वाचकां ज्ञानियांसी ।।तु.गा.३१६२.००१ ।।
आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ।।तु.गा.३१६२.००२ ।।
तुका म्हणे कृपा करिल नारायण। तरिच हें वर्म पडे ठायीं।।तु.गा.३१६२.००३ ।।
दुधाळ गाढवी जरी झाली पाहें। पावेल ते काय धेनुसरी।।तु.गा.३१६३.००१ ।।
कागाचिया गळां पुष्पांचिया माळा। हंसाची तो कळा काय जाणे।।तु.गा.३१६३.००२ ।।
मर्कटे अंघोळी लावियेले टिळे। ब्राह्मणाचे लीळे वर्तू नेणे।।तु.गा.३१६३.००३ ।।
जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट। तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं।।तु.गा.३१६३.००४ ।।
वाघें उपदेशिला कोल्हा। सुखें खाऊं द्यावें मला।।तु.गा.३१६४.००१ ।।
अंतीं मरसी तें न चुके । मजही मारितोसी भुके ।।तु.गा.३१६४.००२ ।।
येरू म्हणे भला। निवाड तुझ्या तोंडें झाला।।तु.गा.३१६४.००३ ।।

देह तों जाणार। घडेल हा परउपकार।।तु.गा.३१६४.००४।।
येरू म्हणे मनीं। ऐसें जावें समजोनि।।तु.गा.३१६४.००५।।
गांठी पडली ठका ठका। त्याचें वर्म जाणें तुका ।।तु.गा.३१६४.००६।।
देवावरी भार। वृत्ति अयाचित सार।।तु.गा.३१६५.००१।।
देह देवाचे सांभाळी। सार योजे यथाकाळीं।।तु.गा.३१६५.००२।।
विश्वासी निर्धार। विस्तारला विश्वंभर।।तु.गा.३१६५.००३।।
तुका म्हणे व्हावें। बळ एकचि जाणावें।।तु.गा.३१६५.००४।।
म्हातारपणीं थेटें पडसें खोकला। हात कपाळाला लावुनि बैसे।।तु.गा.३१६६.००१।।
खोबरियाची वाटी झालें असे मुख । गळतसे नाक श्लेष्मपुरी ।।तु.गा.३१६६.००२।।
बोलों जातां शब्द नयेचि हा नीट। गडगडी कंठ कफ भारी।।तु.गा.३१६६.००३।।
शेजारीं म्हणती मरेना कां मेला। आणिला कांटाळा येणें आम्हां।।तु.गा.३१६६.००४।।
तुका म्हणे आतां सांडुनि सर्व काम । स्मरा राम राम क्षणाक्षणा।।तु.गा.३१६६.००५।।
तारुण्याच्या मदें न मानी कोणासी। सदा मुसमुसी घुळी जैसा।।तु.गा.३१६७.००१।।
अठोनी वेठोनी बांधला मुंडासा। फिरतसे म्हैसा जनामधीं।।तु.गा.३१६७.००२।।
हातीं दीडपान वरती करी मान। नाहीं तो सन्मान भलियांसी।।तु.गा.३१६७.००३।।
श्वानाचिया परी हिंडे दारोदारीं। पाहे परनारी पापदृष्टी।।तु.गा.३१६७.००४।।
तुका म्हणे ऐसी थोर हानी झाली। करितां टवाळी जन्म गेला।।तु.गा.३१६७.००५।।
बाळपणीं ऐसीं वरुषें गेलीं बारा। खेळतां या पोरा नानामतें।।तु.गा.३१६८.००१।।
विटी दांडु चेंडू लगोऱ्या वाघोडीं। चंपें पेंड घडी एकीबेकी।।तु.गा.३१६८.००२।।
हमामा हुंबरी पकव्याच्या बारे। खेळी जंगी भोंवरे चुंबाचुंबी।।तु.गा.३१६८.००३।।
सेलडेरा आणि निसरभोवंडी। उचली बाळे धोंडी अंगबळें।।तु.गा.३१६८.००४।।
तुका म्हणे ऐसें बाळपण गेलें। मग तारुण्य आलें गर्वमूळ।।तु.गा.३१६८.००५।।
वेचावें तें जीवें। पूजा घडे ऐशा नांवें।।तु.गा.३१६९.००१।।

बिगारीची ते बिगारी। साक्षी अंतरींचा हरी ।।तु.गा.३१६९.००२ ।।

फळ बीजा ऐसें। कार्यकारणासरिसें ।।तु.गा.३१६९.००३ ।।

तुका म्हणे मान। लवणासारिखें लवण ।।तु.गा.३१६९.००४ ।।

प्रायश्चित्त देतो तुका। जातो लोकां सकळां ।।तु.गा.३१७०.००१ ।।

धरितील ते तरतील मनीं। जाती घाणी वायां त्या ।।तु.गा.३१७०.००२ ।।

निग्रहअनुग्रहाचे ठाय। देतो घाय पाहोनि ।।तु.गा.३१७०.००३ ।।

तुका झाला नरसिंहीं। भय नाहीं कृपेनें ।।तु.गा.३१७०.००४ ।।

मुळीं नेणपण। झाला तरी अभिमान ।।तु.गा.३१७१.००१ ।।

वायां जाय हेंचि खरें। केलें तेणेंचि प्रकारें ।।तु.गा.३१७१.००२ ।।

अराणूक नाहीं कधीं। झाली तरि भेदबुद्धि ।।तु.गा.३१७१.००३ ।।

अंतरली नाव। तुका म्हणे नाहीं ठाव ।।तु.गा.३१७१.००४ ।।

विंचा पीडी नांगी। ज्याचा दोष त्याचे अंगीं ।।तु.गा.३१७२.००१ ।।

केला पाहिजे विचार। मन मित्र दावेदार ।।तु.गा.३१७२.००२ ।।

मधुरा उत्तरीं। रांवा खेळे उरावरी ।।तु.गा.३१७२.००३ ।।

तुका म्हणे रेडा। सुखें जाती ऐशा पीडा ।।तु.गा.३१७२.००४ ।।

उकरडा आधीं अंगीं नरकाडी। जातीचे ते जोडी तेचि चित्तीं ।।तु.गा.३१७३.००१ ।।

कासयानें देखे अंधळें माणिकें । चवीविण फिकें वायां जाय ।।तु.गा.३१७३.००२ ।।

काय जाणें विष पालटों उपचारें। मूर्खासी अंतर तोंचि बरें ।।तु.गा.३१७३.००३ ।।

तुका म्हणे काय उपदेश वेड्या। संग होता रेड्यासवें कष्ट ।।तु.गा.३१७३.००४ ।।

विषय तो मरणसंगीं । नेणे सुटिका अभागी ।।तु.गा.३१७४.००१ ।।

शास्त्राचा केला लुंडा। तोंडीं पाडियेला धोंडा ।।तु.गा.३१७४.००२ ।।

अगदीं मोक्ष नाहीं ठावा। काय सांगावें गाढवा ।।तु.गा.३१७४.००३ ।।

तुका म्हणे ग्यानगंड। देवा सुखें पावो नाड ।।तु.गा.३१७४.००४ ।।

आपुल्याचा भोत चाटी। मारी करंटी पारिख्या ।।तु.गा.३१७५.००१ ।।
ऐसें जन भुललें देवा। मिथ्या हेवा वाढवी ।।तु.गा.३१७५.००२ ।।
गळ गिळी आमिषें मासा। प्राण आशा घेतला ।।तु.गा.३१७५.००३ ।।
तुका म्हणे बोकड मोहो। धरी पहा हो खाटिकाचा ।।तु.गा.३१७५.००४ ।।
दधिमाजी लोणी जाणती सकळ। तें काढी निराळें जाणें मथन ।।तु.गा.३१७६.००१ ।।
अग्नि काष्ठामाजीं ऐसें जाणे जन। मथिलियाविण कैसा जाळी ।।तु.गा.३१७६.००२ ।।
तुका म्हणे मुख मळीण दर्पणीं। उजळिल्यावांचूनि कैसें भासे ।।तु.गा.३१७६.००३ ।।
आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी। धड तें नासोनि भलता टाकी ।।तु.गा.३१७७.००१ ।।
सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं। नाशिलें सोनारी अळंकारीं ।।तु.गा.३१७७.००२ ।।
ओल शुद्ध काळीं काळें जिरें बीज। कैचें लागे निज हाता तेथें ।।तु.गा.३१७७.००३ ।।
एक गहू करिती अनेक प्रकार। सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ।।तु.गा.३१७७.००४ ।।
तुका म्हणे विषा रुचि एखा हातीं। पाधानी नासिती नवनीत ।।तु.गा.३१७७.००५ ।।
धन्य शुद्ध जाती। धरीं लौकरी परती ।।तु.गा.३१७८.००१ ।।
ऐकिलें तेंचि कानीं। होय परिपाक मनीं ।।तु.गा.३१७८.००२ ।।
कळवळा पोटीं। सावधान हितासाठीं ।।तु.गा.३१७८.००३ ।।
तुका म्हणे भाव। ज्याचा तोचि जाणा देव ।।तु.गा.३१७८.००४ ।।
महुरा ऐसीं फळें नाहीं। आलीं कांहीं गळती। पक्वदशें येती थोडीं। नास आढी वेचे तों ।।तु.गा.३१७९.००१ ।।
विरळा पावें विरळा पावें। अवघड गोवे शेवटीचे ।।तु.गा.३१७९.००२ ।।
उंच निच परिवार देवी। धन्या ठावी चाकरी। झळे तेथें पावे आणी। ऐसे क्षणी बहु थोडे ।।तु.गा.३१७९.००३ ।।
पावेल तो पैल थडी। म्हणों गडी आपुला। तुका म्हणे उभाऱ्यानें। खरें कोण मानितसे ।।तु.गा.३१७९.००४ ।।
मोहोऱ्याच्या संगें। सुत नव्हे आगीजोगें ।।तु.गा.३१८०.००१ ।।
नाहीं तरी त्याचें भक्ष। काय सांगणें ते साक्ष ।।तु.गा.३१८०.००२ ।।
स्वामीचिया अंगें। रूप नव्हे कोणाजोगें ।।तु.गा.३१८०.००३ ।।

तुका म्हणे खोडी। देवमणी नेदिती दडी।।तु.गा.३१८०.००४।।
राजा चाले तेथें वैभव सांगातें। हें काय लागतें सांगावें त्या।।तु.गा.३१८१.००१।।
कोणी कोणां येथें न मनिजे फुका। कृपेविण एका देवाचिया।।तु.गा.३१८१.००२।।
शृंगारिलें नाहीं तगों येत वरि। उमटे लौकरि जैसें तैसें।।तु.गा.३१८१.००३।।
तुका म्हणे घरीं वसे नारायण। कृपेचि ते खूण दिसों येते।।तु.गा.३१८१.००४।।
घातला दुकान। पढीये तैसा आहे वान।।तु.गा.३१८२.००१।।
आम्ही भांडारी देवाचे। द्यावें घ्यावें माप वाचे।।तु.गा.३१८२.००२।।
उगवूं जाणों मोडी। झाली नव्हे त्याची जोडी।।तु.गा.३१८२.००३।।
तुका म्हणे पुडी। मोल तैसी खरी कुडी।।तु.गा.३१८२.००४।।
भोंवंडीसरिसें। अवघें भोंवतचि दिसे।।तु.गा.३१८३.००१।।
ठायीं राहिल्या निश्चळ। आहे अचळीं अचळ।।तु.गा.३१८३.००२।।
एके हाकेच्या कपाटीं। तेथें आणीक नाद उठीं।।तु.गा.३१८३.००३।।
अभ्रें धांवे शशी। तुका म्हणे दुसरें भासी।।तु.गा.३१८३.००४।।
सांठविला वाण। पैस घातला दुकान।।तु.गा.३१८४.००१।।
जें ज्या पाहिजे जे काळीं। आहे सिद्धचि जवळी।।तु.गा.३१८४.००२।।
निवडिलें साचें। उत्तममध्यमकनिष्ठाचें।।तु.गा.३१८४.००३।।
तुका बैसला दुकानीं। दावी मोलाऐसी वाणी।।तु.गा.३१८४.००४।।
एकाचीं उत्तरें। गोड अमृत मधुरें।।तु.गा.३१८५.००१।।
ऐशा देवाच्या विभूती। भिन्न प्रारब्धाची गती।।तु.गा.३१८५.००२।।
एकाचीं वचनें। कडु अत्यंत तीक्षणें।।तु.गा.३१८५.००३।।
प्रकाराचे तीन। तुका म्हणे केले जन।।तु.गा.३१८५.००४।।
येथील हा ठसा। गेला पडोनियां ऐसा।।तु.गा.३१८६.००१।।
धरी देवाचा अबोला। त्यासि तेचि सवे त्याला।।तु.गा.३१८६.००२।।

नाहीं पहावें लागत। एकाएकींच तें रितें।।तु.गा.३१८६.००३।।
तुका म्हणे जन। तयामध्यें एवढें भिन्न।।तु.गा.३१८६.००४।।
भले म्हणवितां संतांचे सेवक । आइत्याची भीक सुखरूप।।तु.गा.३१८७.००१।।
ठसावितां बहु लागती सायास। चुकल्या घडे नाश अल्प वर्म।।तु.गा.३१८७.००२।।
पाकसिद्धि लागे संचित आइतें। घडतां सोई तें तेव्हां गोड।।तु.गा.३१८७.००३।।
तुका म्हणे बऱ्या सांगतांचि गोष्टी। रणभूमि दृष्टी न पडतां।।तु.गा.३१८७.००४।।
कुंभ अवघा एक आवा । पाकीं एकीं गू फेडावा।।तु.गा.३१८८.००१।।
ऐसे भिन्न भिन्न साटें। केले प्रारब्धानें वांटे।।तु.गा.३१८८.००२।।
हिरे दगड एक खाणी। कैंचे विजातीला पाणी।।तु.गा.३१८८.००३।।
तुका म्हणे शिरीं। एक एकाची पायरी।।तु.गा.३१८८.००४।।
चोराचिया धुडका मनीं। वसे ध्यानीं लांछन।।तु.गा.३१८९.००१।।
यासी आम्हीं करणें काय। वर्षों न्यायें पर्जन्य।।तु.गा.३१८९.००२।।
ज्याच्या बैसे खतावरी। ते चुरचुरी दुखवूनि।।तु.गा.३१८९.००३।।
तुका म्हणे ज्याची खोडी। त्याची जोडी त्या पीडी।।तु.गा.३१८९.००४।।
कल्पतरूखालीं। फळें येती मागीतलीं।।तु.गा.३१९०.००१।।
तेथें बैसल्याचा भाव। विचारूनि बोलें ठाव।।तु.गा.३१९०.००२।।
द्यावें तें उत्तर। येतो प्रीतीचा तो फेर।।तु.गा.३१९०.००३।।
तुका म्हणे मनीं। आपुल्याचि लाभहानि।।तु.गा.३१९०.००४।।
नाहीं लोपों येत गुण। वेधी आणिकां चंदन।।तु.गा.३१९१.००१।।
न सांगतां पडे ताळा। रूप दर्पणीं सकळां।।तु.गा.३१९१.००२।।
सारविलें वरी। आहाच तें क्षणभरी।।तु.गा.३१९१.००३।।
तुका म्हणे वोहळें। सागराच्या ऐसें व्हावें।।तु.गा.३१९१.००४।।
देईल तें उणें नाहीं। याचें कांहीं पदरीं।।तु.गा.३१९२.००१।।

पाहिजे तें संचित आतां। येथें सत्ता करावया।।तु.गा.३१९२.००२।।
गुणां ऐसा भरणा भरी। जो जें चारी तें लाभे।।तु.गा.३१९२.००३।।
तुका म्हणे देवीं देव। फळें भाव आपुला।।तु.गा.३१९२.००४।।
जळो आगी पडो खाण। नारायण भोगिता।।तु.गा.३१९३.००१।।
ऐसी ज्याची वदे वाणी। नारायणीं ते पावे।।तु.गा.३१९३.००२।।
भोजनकाळीं करितां धंदा। म्हणा गोविंदा पावलें।।तु.गा.३१९३.००३।।
तुका म्हणे नलगे मोल। देवा बोल आवडती।।तु.गा.३१९३.००४।।
कल्पतरूअंगीं इच्छिलें तें फळ। अभागी दुर्बळ भावी सिद्धी।।तु.गा.३१९४.००१।।
धन्य त्या जाती धन्य त्या जाती। नारायण चित्तीं सांठविला।।तु.गा.३१९४.००२।।
बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर। गुणाचे प्रकार ज्याचे तया।।तु.गा.३१९४.००३।।
तुका म्हणे कळे पारखिया हिरा। ओझें पाठीं खरा चंदनाचें।।तु.गा.३१९४.००४।।
जया शिरीं कारभार। बुद्धि सार तयाची।।तु.गा.३१९५.००१।।
वर्ते तैसें वर्ते जन। बहुतां गुण एकाचा।।तु.गा.३१९५.००२।।
आपणीयां पाक करीं। तो इतरीं सेविजे।।तु.गा.३१९५.००३।।
तुका म्हणे शूर राखे। गांड्या वाखे सांगातें।।तु.गा.३१९५.००४।।
धनवंता घरीं। करि धनचि चाकरी।।तु.गा.३१९६.००१।।
होय बैसल्या व्यापार। नलगे सांडावेंचि घर।।तु.गा.३१९६.००२।।
रानीं वनीं द्विपीं। असतीं तीं होतीं सोपी।।तु.गा.३१९६.००३।।
तुका म्हणे मोल। देतां कांहीं नव्हे खोल।।तु.गा.३१९६.००४।।
अंतरींचें गोड। राहे आवडीचें कोड।।तु.गा.३१९७.००१।।
संघटणें येती अंगा। गुणदोष मनभंगा।।तु.गा.३१९७.००२।।
उचिताच्या कळा। नाहीं कळत सकळा।।तु.गा.३१९७.००३।।
तुका म्हणे अभावना। भावीं मूळ तें पतना।।तु.गा.३१९७.००४।।

शिळा जया देव। तैसा फळे त्याचा भाव।।तु.गा.३१९८.००१।।
होय जतन तें गोड। अंतराय येती नाड।।तु.गा.३१९८.००२।।
देव जोडे भावें। इच्छेचें तें प्रेम घ्यावें।।तु.गा.३१९८.००३।।
तुका म्हणे मोड दावी। तैशीं फळें आलीं व्हावीं।।तु.गा.३१९८.००४।।
बहु टाळाटाळी। होते भोवताहे कळी।।तु.गा.३१९९.००१।।
बरें नव्हेल शेवटीं। भय असों द्यावें पोटीं।।तु.गा.३१९९.००२।।
मुरगाळीतां कान। घुसमाडील सावधान।।तु.गा.३१९९.००३।।
अबोलणा तुका। ऐसें कोणी लेखूं नका।।तु.गा.३१९९.००४।।
नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची। अवज्ञा देवाची घडे तेणें।।तु.गा.३२००.००१।।
देहाचा निग्रही त्याचा तो सांभाळी। मग नये कळि अंगावरी।।तु.गा.३२००.००२।।
आपलिया इच्छा माता सेवा करी। न बाधी ते थोरी येणें क्षोभें।।तु.गा.३२००.००३।।
तुका म्हणे सांडा देखीचा दिमाख। मोडशीचें दुःख गांड फाडी।।तु.गा.३२००.००४।।
अवघी मिथ्या आटी। राम नाहीं जंव कंठीं।।तु.गा.३२०१.००१।।
सावधान सावधान। उगवीं संकल्पीं हें मन।।तु.गा.३२०१.००२।।
सांडिलें तें मांडे। आग्रह उरल्या काळ दंडे।।तु.गा.३२०१.००३।।
तुका म्हणे आले भागा। देउनि चिंतीं पांडुरंगा।।तु.गा.३२०१.००४।।
फळ देंठींहूनि झडे। मग मागुतें न जोडे।।तु.गा.३२०२.००१।।
म्हणउनि तांतडी खोटी। कारण उचिताचे पोटीं।।तु.गा.३२०२.००२।।
पुढें चढे जरी हात। त्याग मागिलां उचित।।तु.गा.३२०२.००३।।
तुका म्हणे रणीं। नये पाहों परतोनि।।तु.गा.३२०२.००४।।
फळ पिके देंठीं। निमित्य वारियाची भेटी।।तु.गा.३२०३.००१।।
हा तों अनुभव रोकडा। कळों येतो खरा कुडा।।तु.गा.३२०३.००२।।
तोडलिया बळें। वायां जाती काची फळें।।तु.गा.३२०३.००३।।

तुका म्हणे मन। तेथें सकळ कारण ।।तु.गा.३२०३.००४ ।।
वदे साक्षत्वेंसी वाणी। नारायणीं मिश्रित ।।तु.गा.३२०४.००१ ।।
नलगे कांहीं चाचपावें। जातों भावें पेरीत ।।तु.गा.३२०४.००२ ।।
भांडार त्या दातियाचें। मी कैचें ये ठायीं ।।तु.गा.३२०४.००३ ।।
सादावीत जातो तुका। येथें एकाएकीं तो ।।तु.गा.३२०४.००४ ।।
मथनासाठीं धर्माधर्म। त्यांचें वर्म नवनीत ।।तु.गा.३२०५.००१ ।।
तेंचि तें घाटूं नये। आलें जाय नासूनि ।।तु.गा.३२०५.००२ ।।
सांभाळावें वरावर। वर्म दूर नवजावें ।।तु.गा.३२०५.००३ ।।
तुका म्हणे धालें पोट। मग बोटचाटणी ।।तु.गा.३२०५.००४ ।।
आणिकांच्या घातें मानितां संतोष। सुखदुःख दोष अंगीं लागे ।।तु.गा.३२०६.००१ ।।
ऐसे मनीं वाहूं नये ते संकल्प। करूं नये पाप भांडवला ।।तु.गा.३२०६.००२ ।।
किल्मिषाची चित्तीं राहतां कांचणी। अंगीं तें जडोनि ठाव जाळी ।।तु.गा.३२०६.००३ ।।
तुका म्हणे कोपें घडे पुण्यक्षय। होणार तें होय प्रारब्धेंचि ।।तु.गा.३२०६.००४ ।।
जे जे वहावें संकल्प। तेंचि पुण्य तेंचि पाप ।।तु.गा.३२०७.००१ ।।
कारण तें मनापासीं। मेळविल्या मिळे रसीं ।।तु.गा.३२०७.००२ ।।
सांडी मांडी हाली चाली। राहे तरी भली बोली ।।तु.गा.३२०७.००३ ।।
तुका म्हणे सार। नांव जीवनाचें सागर ।।तु.गा.३२०७.००४ ।।
वैभवाचे धनी सकळ शरणागत। सत्यभावें चित्त अर्पिलें तें ।।तु.गा.३२०८.००१ ।।
नेदी उरों देव आपणावेगळें। भावाचिया बळें ठायाठाव ।।तु.गा.३२०८.००२ ।।
जाणोनि नेणोनि अंगा आली दशा। मग होय इच्छा आपणचि।।तु.गा.३२०८.००३ ।।
तुका म्हणे बरें धाकट्याचें जिणें। माता स्तनपानें वाढविते ।।तु.गा.३२०८.००४ ।।
इच्छिलें ते शकुनवंती। होय देती तात्काळ ।।तु.गा.३२०९.००१ ।।
क्षीरानीरा निवाड करी। वरावरी विठ्ठल ।।तु.गा.३२०९.००२ ।।

भाग्यविण कैंचें फळ। अंतर मळमूत्राचें।।तु.गा.३२०९.००३।।
तुका म्हणे संचितकुडें। तें बापुडें करीतसे।।तु.गा.३२०९.००४।।
समर्थाचें केलें। मोडिलें कोणा जाईल।।तु.गा.३२१०.००१।।
वायां करावी ते उरे। खटपट सोस पुरे।।तु.गा.३२१०.००२।।
तो ठेवा ठेविला। आपुलाला तैसा खावा।।तु.गा.३२१०.००३।।
ज्याचें त्याची हातीं। भुंके तयासी फजिती।।तु.गा.३२१०.००४।।
तुका म्हणे कोटी। बाळे झाले शूळ पोटीं।।तु.गा.३२१०.००५।।
जायाचें अंगुलें लेतां नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविलें ।।तु.गा.३२११.००१।।
घुसळितां ताक कांडितां भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वायां ।।तु.गा.३२११.००२।।
तुका म्हणे नाहीं स्वता भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हें ।।तु.गा.३२११.००३।।
बळ बुद्धि वेचुनियां शक्ती । उदक चालवावें युक्ती ।।तु.गा.३२१२.००१।।
नाहीं चळण तया अंगीं । धांवें लवणामागें वेगीं ।।तु.गा.३२१२.००२।।
पाट मोट कळा । भरित पखाला सागळा ।।तु.गा.३२१२.००३।।
बीजा ज्यासी द्यावें । तुका म्हणे तैसें व्हावें ।।तु.गा.३२१२.००४।।
झरा लागला सुखाचा । ऐसा मापारीं कइंचा ।।तु.गा.३२१३.००१।।
जो हें माप तोंडीं धरी । सळे झाली ते आवरी ।।तु.गा.३२१३.००२।।
झाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ।।तु.गा.३२१३.००३।।
तुका म्हणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ।।तु.गा.३२१३.००४।।
कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ।।तु.गा.३२१४.००१।।
शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोषे ।।तु.गा.३२१४.००२।।
पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणें ।।तु.गा.३२१४.००३।।
तुका म्हणे उदारपणें । काय उणें मनाचें ।।तु.गा.३२१४.००४।।
विष पोटीं सर्पा । जन भीतें तया दर्पा ।।तु.गा.३२१५.००१।।

पंच भूतें नाहीं भिन्न । गुण दुःख देती शीण ।।तु.गा.३२१५.००२।।
चंदन प्रिय वासें । आवडती जाती ऐसें ।।तु.गा.३२१५.००३।।
तुका म्हणे दाणा । कुचर मिळों नये अन्ना ।।तु.गा.३२१५.००४।।
शीतळ तें शीतळाहुनी । पायवणी चरणींचें ।।तु.गा.३२१६.००१।।
सेवन हें शिरसा धरीं । अंतरीं ही वरदळा ।।तु.गा.३२१६.००२।।
अवघेंचि नाशी पाप । तीर्थ बाप माझ्याचें ।।तु.गा.३२१६.००३।।
बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ।।तु.गा.३२१६.००४।।
प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ।।तु.गा.३२१७.००१।।
उभी कामधेनु मांगाचें अंगणीं । तिशी काय ब्राह्मणीं वंदूं नये ।।तु.गा.३२१७.००२।।
कोडियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र म्हणोन घेऊं नये ।।तु.गा.३२१७.००३।।
यातिहीन झाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ।।तु.गा.३२१७.००४।।
भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनी तयांचीं तोडें काळीं ।।तु.गा.३२१७.००५।।
न पालटे जाती जीवाचिये साटीं । वाहे तेंचि पोटीं दावी वरी ।।तु.गा.३२१८.००१।।
अंतर सबाह्य सारिखाचि रंग । वीट आणि भंग नाही रसा ।।तु.गा.३२१८.००२।।
घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणे धीरा आपुलिया ।।तु.गा.३२१८.००३।।
तुका म्हणे कढे करावे शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ।।तु.गा.३२१८.००४।।
वचनाचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ।।तु.गा.३२१९.००१।।
जातां घरा मागें उरों नेणे खंती । मिळाल्या बहुती फांकलिया ।।तु.गा.३२१९.००२।।
उदयींच अस्त उदयो संपादिला । कल्पनेचा केला जागेपणें ।।तु.गा.३२१९.००३।।
जाणवूनि गेला हांडोरिया पोरां । सावध इतरां करूनि तुका ।।तु.गा.३२१९.००४।।
या रे हरिदासांनो जिंकों कळिकाळा । आमुचिया बळापुढें किती बापुडे ।।तु.गा.३२२०.००१।।
रंगसुरंग घमंडी नाना छंदें । हास्य विनोदें नामाची आवडी ।।तु.गा.३२२०.००२।।
येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ।।तु.गा.३२२०.००३।।

वांकुडिया माना बोल बोलावे आरुष । येईल तो त्यांस छंद पढीयें गोविंदा ।।तु.गा.३२२०.००४।।
आपुल्या आनंदें एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान ये प्रसंगीं ।।तु.गा.३२२०.००५।।
तुका म्हणे येथें प्रेम भंगूं नये कोणी । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ।।तु.गा.३२२०.००६।।
भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ।।तु.गा.३२२१.००१।।
ऐसें उफराटें वर्म । धर्माअंगींच अधर्म ।।तु.गा.३२२१.००२।।
देव अंतरें तें पाप । कोठें उगवा संकल्प ।।तु.गा.३२२१.००३।।
तुका म्हणे भीड खोटी । लाभ विचाराचे पोटीं ।।तु.गा.३२२१.००४।।
सर्वथाही खोटा संग । उपजे भंग मनासी ।।तु.गा.३२२२.००१।।
बहु रंगें भरलें जन । संपन्नचि अवगुणी ।।तु.गा.३२२२.००२।।
सेविलिया निष्कामबुद्धि । मदें शुद्धि सांडवी ।।तु.गा.३२२२.००३।।
त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ।।तु.गा.३२२२.००४।।
बोलविसी माझे मुखें । परी या जना वाटे दु:ख ।।तु.गा.३२२३.००१।।
जया जयाची आवडी । तयालागीं तें चरफडी ।।तु.गा.३२२३.००२।।
कठीण देतां काढा । जल्पे रोगी मेळवी दाढा ।।तु.गा.३२२३.००३।।
खाऊं नये तेचि मागे । निवारितां रडों लागे ।।तु.गा.३२२३.००४।।
वैद्या भीड काय । अतित्याई जीवें जाय ।।तु.गा.३२२३.००५।।
नये भिडा सांगो आन । पथ्य औषधा कारण ।।तु.गा.३२२३.००६।।
धन माया पुत्र दारा । हें तों आवडी नरका थारा ।।तु.गा.३२२३.००७।।
तुका म्हणे यांत । आवडे ते करा मात ।।तु.गा.३२२३.००८।।
खोट्याचा विकरा । येथें नव्हे कांच हिरा ।।तु.गा.३२२४.००१।।
काय दावायाचें काम । उगाच वाढवावा श्रम ।।तु.गा.३२२४.००२।।
परीक्षकाविण । मिरवो जाणों तें तें हीण ।।तु.गा.३२२४.००३।।
तुका पायां पडे । वाद पुरे हे झगडे ।।तु.गा.३२२४.००४।।

गेली वीरसरी । मग त्यासी रांड मारी ।।तु.गा.३२२५.००१ ।।
मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ।।तु.गा.३२२५.००२ ।।
भंगलिया चित्ता । नये काशानें सांधितां ।।तु.गा.३२२५.००३ ।।
तुका म्हणे धीर । भंगलिया पाठीं कीर ।।तु.गा.३२२५.००४ ।।
चातुर्याच्या अनंत कळा । सत्या विरळा जाणता ।।तु.गा.३२२६.००१ ।।
हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ।।तु.गा.३२२६.००२ ।।
जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ।।तु.गा.३२२६.००३ ।।
तुका म्हणे अंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुकें ।।तु.गा.३२२६.००४ ।।
अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ।।तु.गा.३२२७.००१ ।।
लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनि ।।तु.गा.३२२७.००२ ।।
लागलीसे पाठी लाज । झालें काज नासाया ।।तु.गा.३२२७.००३ ।।
तुका म्हणे कुश्चळ मनीं । विटंबणीं पडिलीं तीं ।।तु.गा.३२२७.००४ ।।
जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता व्यवसायी ।।तु.गा.३२२८.००१ ।।
तृष्णेचीं मजुरें नेणती विसांवा । वाढे हांव हांवा काम कामीं ।।तु.गा.३२२८.००२ ।।
वैभवाचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जाळी ।।तु.गा.३२२८.००३ ।।
तुका म्हणे वाहे मरणाचें भय । रक्षणा उपाय करूनि असे ।।तु.गा.३२२८.००४ ।।
ग्रंथाचे ते अर्थ नेणतां हे खळ । बहु अनर्गळ झाले विषयीं ।।तु.गा.३२२९.००१ ।।
नाहीं भेद म्हणून भलतेंचि आचरे । मोकळा विचरे मनासवें ।।तु.गा.३२२९.००२ ।।
तुका म्हणे विषा नांव तें अमृत । पापपुण्या भीत नाहीं नष्ट ।।तु.गा.३२२९.००३ ।।
पुढें जेणें लाभ घडे । तेचि वेडे नासती ।।तु.गा.३२३०.००१ ।।
येवढी कोठें नागवण । अंधारून विष घ्यावें ।।तु.गा.३२३०.००२ ।।
होणारासी मिळे बुद्धि । नेदी शुद्धी धरूं ते ।।तु.गा.३२३०.००३ ।।
तुका म्हणे जना सोंग । दावी रंग आणीक ।।तु.गा.३२३०.००४ ।।

जोंवरि तोंवरि जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ।।तु.गा.३२३१.००१।।
जोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्ति ब्राह्मणा देखिलें नाहीं ।।तु.गा.३२३१.००२।।
जोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं ।।तु.गा.३२३१.००३।।
जोंवरि तोंवरि शूरत्वांच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ।।तु.गा.३२३१.००४।।
जोंवरि तोंवरि माळामुद्रांची भूषणें । जंव तुकयाचें दर्शन झालें नाहीं ।।तु.गा.३२३१.००५।।
पायरवे अन्न । मग करी खेदक्षीण ।।तु.गा.३२३२.००१।।
ऐसे होती घातपात । लाभेंविण संगें थीत ।।तु.गा.३२३२.००२।।
जन्माची जोडी । वाताहात एके घडी ।।तु.गा.३२३२.००३।।
तुका म्हणे शंका । हित आड या लौकिका ।।तु.गा.३२३२.००४।।
क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न विचारून ।।तु.गा.३२३३.००१।।
धर्म आहे वर्मा अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ।।तु.गा.३२३३.००२।।
द्रव्य आणि कन्या। येथें कुळ कर्म सोधण्या ।।तु.गा.३२३३.००३।।
तुका म्हणे पुण्य गांठी । तरिच उचिताची भेटी ।।तु.गा.३२३३.००४।।
लंकेमाजी घरें किती तीं आइका । सांगतसे संख्या जैसी तैसी ।।तु.गा.३२३४.००१।।
पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटबंदी ।।तु.गा.३२३४.००२।।
कोटी घरें जेथें काशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं सप्त कोटी ।।तु.गा.३२३४.००३।।
तुका म्हणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ।।तु.गा.३२३४.००४।।
सर्वां भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन । उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे ।।तु.गा.३२३५.००१।।
पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजोनि पोशिला साप । करोनि अघोर जप । दुःख विकत घेतलें ।।तु.गा.३२३५.००२।।
भूमी पाहतां नाहीं वेगळी । माळ बरड एक काळीं । उत्तम निराळी । मध्यम आणि कनिष्ठ ।।तु.गा.३२३५.००३।।
म्हणोनि विवेकें । कांहीं करणें तें निकें । तुका म्हणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ।।तु.गा.३२३५.००४।।
मारूं नये सर्प संतांचिया दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ।।तु.गा.३२३६.००१।।
एक सुत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपडितां अंग कांपे ।।तु.गा.३२३६.००२।।

नाहीं साहों येत दु:खाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य झालें ।।तु.गा.३२३६.००३।।
तुका म्हणे दिला नीतीचा संकेत । पूजा नांवें चित्त सुखी तेणें ।।तु.गा.३२३६.००४।।
कारणा कारण वारियलें जेथें । जातों तेणें पंथें सादावीत ।।तु.गा.३२३७.००१।।
संतीं हें पईल लाविलें निशाण । ते खूण पाहोन नाम गर्जे ।।तु.गा.३२३७.००२।।
तुका म्हणे तुम्ही चला याचि वाटे । पांडुरंग भेटे भरंवसेनी ।।तु.गा.३२३७.००३।।
उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ।।तु.गा.३२३८.००१।।
नेम नाहीं लाभ हानि । अवचित घडती दोनी । विचारूनि मनीं । पाहिजे तें प्रयोजावें ।।तु.गा.३२३८.००२।।
जाळ जाळा काळें । करपों नेदावें आगळें । जेवितां वेगळें । ज्याचें त्याचें तेथें शोभे ।।तु.गा.३२३८.००३।।
पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका म्हणे घरीं । शेज जमा शेवटीं ।।तु.गा.३२३८.००४।।
हित जाणे चित्त । कळों येतसे उचित ।।तु.गा.३२३९.००१।।
परिहार ते संपादणी । सत्य कारण कारणीं ।।तु.गा.३२३९.००२।।
वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें तेथें रसीं ।।तु.गा.३२३९.००३।।
तुका म्हणे करूनी खरें । ठेवितां तें पुढें बरें ।।तु.गा.३२३९.००४।।
साधुनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पाहावे ।।तु.गा.३२४०.००१।।
साधुनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ।।तु.गा.३२४०.००२।।
असाध्य तें साधे करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ।।तु.गा.३२४०.००३।।
बाळ बापा म्हणे काका । तरि कां निपराध पारिखा ।।तु.गा.३२४१.००१।।
जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ।।तु.गा.३२४१.००२।।
साखरेसी म्हणतां धोंडा । तरि कां तोंडा न रुचे ।।तु.गा.३२४१.००३।।
तुका म्हणे आरुष बोल । नव्हे फोल आहाच ।।तु.गा.३२४१.००४।।
धाकुट्याच्या मुखीं घांस घाली माता । वरी करी सत्ता शहाणिया ।।तु.गा.३२४२.००१।।
ऐसें जाणपणें पडिलें अंतर । वाढे तों तों थोर अंतराय ।।तु.गा.३२४२.००२।।
दोन्ही उभयतां आपणचि व्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ।।तु.गा.३२४२.००३।।

तुका म्हणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बळें रडतें स्तनीं।।तु.गा.३२४२.००४।।
गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें चराचरीं त्याग केला ।।तु.गा.३२४३.००१।।
गायत्री स्वमुखें भक्षितसे मळ । मिळाल्या वोहोळ गंगाओघ ।।तु.गा.३२४३.००२।।
कागाचिये विष्ठे जन्म पिंपळासि । पांडवकुळासि पाहतां दोष ।।तु.गा.३२४३.००३।।
शकुंतला सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसि ।।तु.गा.३२४३.००४।।
गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहा पां विचार पिंगळेचा ।।तु.गा.३२४३.००५।।
वाल्हा विश्वमित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ।।तु.गा.३२४३.००६।।
न व्हावीं तीं कर्मे जाली नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ।।तु.गा.३२४३.००७।।
तुका म्हणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नरक त्यासी ।।तु.गा.३२४३.००८।।
धनवंतालागीं । सर्वमान्यता हे जगीं ।।तु.गा.३२४४.००१।।
माता पिता बंधु जन । सर्व मानिती वचन ।।तु.गा.३२४४.००२।।
जंव मोठा चाले धंदा । तंव बहिण म्हणे दादा ।।तु.गा.३२४४.००३।।
सदा शृंगारभूषणें । कांता लवे बहुमानें ।।तु.गा.३२४४.००४।।
तुका म्हणे धन । भाग्य अशाश्वत जाण ।।तु.गा.३२४४.००५।।
एकादशीस अन्नपान । जे नर करिती भोजन । श्वानविष्ठे समान । अधम जन ते एक ।।तु.गा.३२४५.००१।।
ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ।।तु.गा.३२४५.००२।।
अशुद्ध विटाळशीचें खळ । विडा भक्षितां तांबूल । सांपडे सबळ । काळाहातीं न सुटे ।।तु.गा.३२४५.००३।।
शेज बाज विलास भोग । करिती कामिनीचा संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ।।तु.गा.३२४५.००४।।
आपण न वजे हरिकीर्तना । आणिकां वारी जातां कोणा । त्याच्या पापें जाणा । ठेंगणा तो महा मेरू ।।तु.गा.३२४५.००५।।
तया दंडी यमदूत । झाले तयाचे अंकित । तुका म्हणे व्रत । एकादशीं चुकलिया ।।तु.गा.३२४५.००६।।
करवितां व्रत अर्ध पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ।।तु.गा.३२४६.००१।।
शुद्धबुद्धि होय दोघां एक मान । चोरासवें कोण जीवें राखे ।।तु.गा.३२४६.००२।।
आपुलें देउनी आपुलाचि घात । न करावा थीत जाणोनियां ।।तु.गा.३२४६.००३।।

देऊनियां वेंच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ||तु.गा.३२४६.००४||
तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मार्ग मोडूं नये ||तु.गा.३२४६.००५||
वंचुनियां पिंड । भाता दान करी लंड ||तु.गा.३२४७.००१||
जैसी याची चाली वरी । तैसा अंतरला दुरी ||तु.गा.३२४७.००२||
मेल्या राखे दिस । ज्यालेपण जालें वोस ||तु.गा.३२४७.००३||
तुका म्हणे देवा । लोभें न पुरेचि सेवा ||तु.गा.३२४७.००४||
आणितां त्या गती । हंस काउळें न होती ||तु.गा.३२४८.००१||
सांडा सांडा रे मठारे । एकी गांठी सवें धुरें ||तु.गा.३२४८.००२||
नाकेंविण मोती । उभ्या बाजारें फजिती ||तु.गा.३२४८.००३||
हुकुमदाज तुका । येथें कोणी फुंदों नका ||तु.गा.३२४८.००४||
बोलावें तें धर्मा मिळे । बरें डोळे उघडूनी ||तु.गा.३२४९.००१||
काशासाठीं खावें शेण । जेणें जन थुंके तें ||तु.गा.३२४९.००२||
दुजें ऐसें कोण बळी । जें या जाळी अग्नीसी ||तु.गा.३२४९.००३||
तुका म्हणे शूर रणीं । गांढें मनीं बुरबुरी ||तु.गा.३२४९.००४||
आणिकां छळावया झालासी शाहाणा । स्वहिता घातलें खान । आडिके पैके करूनि सायास । कृपणें सांचलें धन । न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण । तारुण्य दशे अधम मातला । दवडी हात पाय कान ||तु.गा.३२५०.००१||
काय झालें यांस वायां कां ठकले । हातीं सांपडलें टाकीतसे । घेउनि स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवले आपुले इच्छे ||तु.गा.३२५०.००२||
सिद्धी सेविलें सेविती अधम । पात्रासारिखें फळ । सिंपिला मोतीं जन्मलें स्वातीचें । वरुषलें सर्वत्र जळ । कापुस पट नयेचि कारणा । तयास पातला काळ । तेंचि भुजंगीं धरिलें कंठीं । मा विष झालें त्याची गरळ ||तु.गा.३२५०.००३||
भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलुनि केळें । घालुनियां घसां अंगोळिया । हातें वांती करूं पाहे बळें । कुंथावयाची आवडी ओवा । उन्हवणी रडवी बाळें । तुका म्हणे जे जैसें करिती । ते पावती तैसींच फळें ||तु.गा.३२५०.००४||
दिली चाले वाचा । क्षय मागिल्या तपाचा ||तु.गा.३२५१.००१||
रिद्धि सिद्धी येती घरा । त्याचा करिती पसारा ||तु.गा.३२५१.००२||

मानदंभासाठीं । पडे देवासवें तुटी ।।तु.गा.३२५१.००३।।

तुका म्हणे मेवा । कैंचा वेठीच्या निर्दैवा ।।तु.गा.३२५१.००४।।

कासया पाषाण पूजितसां पितळ । अष्ट धातु खळ भावेंविण ।।तु.गा.३२५२.००१।।

भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियेलें ।।तु.गा.३२५२.००२।।

काय करिल जपमाळा कंठमाळा । करीशी वेळोवेळां विषयजप ।।तु.गा.३२५२.००३।।

काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ।।तु.गा.३२५२.००४।।

काय करिशील कुशळ गायन । अंतरीं मळीन कुबुद्धि ते ।।तु.गा.३२५२.००५।।

तुका म्हणे भाव नाहीं करिसी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ।।तु.गा.३२५२.००६।।

कांहीं न मागे कोणासी । तोचि आवडे देवासी ।।तु.गा.३२५३.००१।।

देव तयासी म्हणावें । त्याचें चरणीं लीन व्हावें ।।तु.गा.३२५३.००२।।

भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ।।तु.गा.३२५३.००३।।

नाहीं नाहीं त्या समान । तुका म्हणे मी जमान ।।तु.गा.३२५३.००४।।

वैद्य वांचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ।।तु.गा.३२५४.००१।।

काय जाणो कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ।।तु.गा.३२५४.००२।।

अंगीं दैवत संचरे । मग तेथें काय उरे ।।तु.गा.३२५४.००३।।

नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ।।तु.गा.३२५४.००४।।

जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ।।तु.गा.३२५४.००५।।

दुर्बळा वाणीच्या एक दोन सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ।।तु.गा.३२५५.००१।।

काय त्याचें वायां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ।।तु.गा.३२५५.००२।।

तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ।।तु.गा.३२५५.००३।।

तुका म्हणे एक वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ।।तु.गा.३२५५.००४।।

पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ।।तु.गा.३२५६.००१।।

बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानि तुटी ज्याची तया ।।तु.गा.३२५६.००२।।

दीपाचिये अंगीं नाहीं दुजा भाव । धणी चोर साव सारिखेचि ।।तु.गा.३२५६.००३।।
काउळें ढोंपरा कंकर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ।।तु.गा.३२५६.००४।।
तुका म्हणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ।।तु.गा.३२५६.००५।।
ढेंकणासी बाज गड । उतरचढ केवढी ।।तु.गा.३२५७.००१।।
होता तैसा कळों भाव । आला वाव अंतरींचा ।।तु.गा.३२५७.००२।।
बोरामध्यें असे अळी । अठोळीच भोंवतीं।।तु.गा.३२५७.००३।।
पोटासाठीं वेंची चणे । राजा म्हणे तोंडें मी ।।तु.गा.३२५७.००४।।
बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर ।।तु.गा.३२५७.००५।।
तुका म्हणे तैसें आहे । काय पाहे त्यांत तें ।।तु.गा.३२५७.००६।।
न कळतां कोणीं मोडियलें व्रत । तया प्रायश्चित्त चालें कांहीं ।।तु.गा.३२५८.००१।।
जाणतियां वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ।।तु.गा.३२५८.००२।।
जातां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तेंचि पाप ।।तु.गा.३२५८.००३।।
काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ।।तु.गा.३२५८.००४।।
तुका म्हणे जना पाहा विचारूनि । सुख वाटे मनीं तेंचि करा ।।तु.गा.३२५८.००५।।
पतिव्रते आनंद मनीं । शिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ।।तु.गा.३२५९.००१।।
जळो वर्म लागो आगी । शुद्धपण भलें जगीं ।।तु.गा.३२५९.००२।।
सुख पुराणीं आचारशीळा । दु:ख वाटे अनर्गळा ।।तु.गा.३२५९.००३।।
शूरा उल्हास अंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ।।तु.गा.३२५९.००४।।
शुद्ध सोनें उजळें अंगीं । हीन काळें धांवें रंगीं ।।तु.गा.३२५९.००५।।
तुका म्हणे तोचि हिरा । घनघायें निवडे पुरा ।।तु.गा.३२५९.००६।।
मन गुंतलें लुलया । जाय धांवोनि त्या ठाया ।।तु.गा.३२६०.००१।।
मागें परतवी तो बळी । शूर एक भूमंडळीं ।।तु.गा.३२६०.००२।।
येऊनियां घालीं घाला । नेणों काय होईल तुला ।।तु.गा.३२६०.००३।।

तुका म्हणे येणें । बहु नाडिले शाहाणे ।।तु.गा.३२६०.००४।।
नसतां अधिकार । उपदेशासी बळात्कार । तरि ते केले चार । माकडा आणि गारोडी ।।तु.गा.३२६१.००१।।
धन धान्य राज्य बोल । वृथा रंजवणें फोल । नाहीं तेथें ओल । बीज वेची मूर्ख तो ।।तु.गा.३२६१.००२।।
नये बांधों गांठी । पदरा आणी ऐसी तुटी । असोन कसोटी । शिष्टाचार अनुभव ।।तु.गा.३२६१.००३।।
उपदेशी तुका । मेघवृष्टीनें आइका । संकल्पासी धोका । सहज तें उत्तम ।।तु.गा.३२६१.००४।।
नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ।।तु.गा.३२६२.००१।।
जाय तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ।।तु.गा.३२६२.००२।।
राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासी टाकी ।।तु.गा.३२६२.००३।।
व्हावा वाटे जना । तुका म्हणे साठीं गुणां ।।तु.गा.३२६२.००४।।
न सांगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ।।तु.गा.३२६३.००१।।
उगीच लागतील पाठीं । होतीं रितींच हिंपुटीं ।।तु.गा.३२६३.००२।।
शिकविल्या गोष्टी । शिकोन न धरिती पोटीं ।।तु.गा.३२६३.००३।।
तुका म्हणे शीण । होइल अनुभवाविण ।।तु.गा.३२६३.००४।।
अवगुण तों कोणीं नाहीं प्रतिष्ठिले । मागें होत आले शिष्टाचार ।।तु.गा.३२६४.००१।।
दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा तों नव्हे बरा सत्यवाद ।।तु.गा.३२६४.००२।।
मद्य आणि मधु एकरासी नांवें । तरि कां तें खावें आधारें त्या ।।तु.गा.३२६४.००३।।
तुका म्हणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद वृष्टिन्यायें ।।तु.गा.३२६४.००४।।
करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ।।तु.गा.३२६५.००१।।
तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं ।।तु.गा.३२६५.००२।।
मजुराचें धन । विळा दोरचि जतन ।।तु.गा.३२६५.००३।।
तुका म्हणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ।।तु.गा.३२६५.००४।।
अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ।।तु.गा.३२६६.००१।।
म्हणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ।।तु.गा.३२६६.००२।।

ऊंस कांदा एक आळां । स्वाद गोडीचा निराळा ।।तु.गा.३२६६.००३।।
तुका म्हणे नव्हे सरी । विष अमृताची परी ।।तु.गा.३२६६.००४।।
देहबुद्धि वसे लोभ जयां चित्तीं । आपुले जाणती परावे जे ।।तु.गा.३२६७.००१।।
तयासी चालतां पाहिजे शिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ।।तु.गा.३२६७.००२।।
तुका म्हणे धर्म रक्षायाकारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ।।तु.गा.३२६७.००३।।
अधिकार तैसा दावियेला मार्ग । चालतां हें मग कळों येतें ।।तु.गा.३२६८.००१।।
जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ।।तु.गा.३२६८.००२।।
तुका म्हणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ।।तु.गा.३२६८.००३।।
न करावी आतां पोटासाठीं चिंता । आहे त्या संचिता माप लावूं ।।तु.गा.३२६९.००१।।
दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपायीं शीण झाला ।।तु.गा.३२६९.००२।।
येथें तंव नाहीं घेईजेसें सवें । कांहीं नये जीवें वेचों मिथ्या ।।तु.गा.३२६९.००३।।
खंडणेचि नव्हे उद्वेग वेरझारीं । बापुडे संसारीं सदा असों ।।तु.गा.३२६९.००४।।
शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ।।तु.गा.३२६९.००५।।
तुका म्हणे आतां सकळांचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ।।तु.गा.३२६९.००६।।
नारडे तरि काय नुजेडे कोंबडें। करूनियां वेडें आग्रहो दावी।।तु.गा.३२७०.००१।।
आइत्याचें साहे फुकाचा विभाग। विक्षेपानें जग छी थू करी।।तु.गा.३२७०.००२।।
नेमून ठेविला करत्यानें काळ। न लाहेसें बळ करूं पुढें।।तु.गा.३२७०.००३।।
तुका म्हणे देव साह्य झाल्यावरी। असांगाचें करी सर्व सांग।।तु.गा.३२७०.००४।।
एक एका साह्य करूं। अवघे धरूं सुपंथ।।तु.गा.३२७१.००१।।
कोण जाणे कैसी परी। पुढें उरी ठेवितां।।तु.गा.३२७१.००२।।
अवघे धन्य होऊं आतां। स्मरवितां स्मरण।।तु.गा.३२७१.००३।।
तुका म्हणे अवघी जोडी। ते आवडी चरणांची।।तु.गा.३२७१.००४।।
सेजेचा एकांत आगीपाशीं कळे। झांकलियां डोळे अधःपात।।तु.गा.३२७२.००१।।

राहो अथवा मग जळो आगीमधीं। निवाड तो आधीं होऊनि गेला ।।तु.गा.३२७२.००२ ।।
भेणें झडपणी नाहीं येथें दुजें। पादरधिटा ओझें हतियारें ।।तु.गा.३२७२.००३ ।।
तुका म्हणे मज नाहीं जी भरंवसा। तोंवरि सहसा निवाड तो ।।तु.गा.३२७२.००४ ।।
गुरुशिष्यपण। हें तों अधम लक्षण ।।तु.गा.३२७३.००१ ।।
भूतीं नारायण खरा। आप तैसाची दुसरा ।।तु.गा.३२७३.००२ ।।
न कळतां दोरी साप। राहू नेदावा तो कांप ।।तु.गा.३२७३.००३ ।।
तुका म्हणे गुणदोषीं। ऐसे न पडावें सोसी।।तु.गा.३२७३.००४ ।।
शाहाणपणें वेद मुका। गोपिका त्या ताकटी ।।तु.गा.३२७४.००१ ।।
कैसें येथें कैसें तेथें। शहाणे ते जाणती ।।तु.गा.३२७४.००२ ।।
यज्ञमुखें खोडी काढी। कोण गोडी बोरांची ।।तु.गा.३२७४.००३ ।।
तुका म्हणे भावाविण। अवघा शीण केला होय ।।तु.गा.३२७४.००४ ।।
मजुराचें पोट भरे। दाता उरे संचला ।।तु.गा.३२७५.००१ ।।
या रे या रे हातोहातीं। काम माती सारावी ।।तु.गा.३२७५.००२ ।।
रोजकीर्दी होतो झाडा। रोकडाचि पर्वत ।।तु.गा.३२७५.००३ ।।
तुका म्हणे खोल पाया। वेचों काया क्लेशेसीं ।।तु.गा.३२७५.००४ ।।
आलें देवाचिया मना। तेथें कोणाचें चालेना ।।तु.गा.३२७६.००१ ।।
हरिश्चंद्र ताराराणी। वाहे डोंबाघरीं पाणी ।।तु.गा.३२७६.००२ ।।
पांडवांचा साहाकारी। राज्याहुनि केले दुरी ।।तु.गा.३२७६.००३ ।।
तुका म्हणे उगेचि राहा। होईल तें सहज पाहा ।।तु.गा.३२७६.००४ ।।
तेलणीशीं रुसला वेडा। रागें कोरडें खातो मिडा ।।तु.गा.३२७७.००१ ।।
आपुलें हित आपण पाहीं। संकोच तो न धरीं कांहीं ।।तु.गा.३२७७.००२ ।।
नाडिलें लोकां टाकिला गोहो। बोडिलें डोकें सांडिला मोहो ।।तु.गा.३२७७.००३ ।।
शेजारणीच्या गेली रागें। कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ।।तु.गा.३२७७.००४ ।।

पिसारागें भाजिलें घर। नागवली ते नेणे फार।।तु.गा.३२७७.००५।।
तुका म्हणे वाच्या रागें। फेडिलें सावलें देखिलें जगें।।तु.गा.३२७७.००६।।
आम्हीं गावें तुम्हीं कोणी कांहीं न म्हणावें। ऐसें तंव आम्हां सांगितलें नाहीं देवें।।तु.गा.३२७८.००१।।
म्हणा रामराम टाळी वाजवा हातें। नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें।।तु.गा.३२७८.००२।।
सहज घडे तया आळस करणें तें काई। अग्नीचें भातुकें हात पोळितां कां पायीं।।तु.गा.३२७८.००३।।
येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हांसे तया घडे ब्रह्महत्या पातक ।।तु.गा.३२७८.००४।।
जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताल विताल या देवा।।तु.गा.३२७८.००५।।
सदैव ज्या कथाकाळीं घडे श्रवण। तुका म्हणे येर जन्मा आले ते पाषाण।।तु.गा.३२७८.००६।।
टाळ दिंडी हातीं। वैकुंठींचे ते सांगाती।।तु.गा.३२७९.००१।।
जाल तरी कोणी जा गा। करा शिदोरी ते वेगा।।तु.गा.३२७९.००२।।
जाती सादावीत। तेथें असों द्यावें चित्त।।तु.गा.३२७९.००३।।
तुका म्हणे बोल। जाती बोलत विठ्ठल।।तु.गा.३२७९.००४।।
पुढें आतां कैंचा जन्म। ऐसा श्रम वारेसा।।तु.गा.३२८०.००१।।
सर्वथाही फिरों नये। ऐसी सोय लागलिया।।तु.गा.३२८०.००२।।
पांडुरंगा ऐसीं नाव। तारूं भाव असतां।।तु.गा.३२८०.००३।।
तुका म्हणे चुकती बापा। पुन्हां खेपा सकळा।।तु.गा.३२८०.००४।।
ब्राह्मण तो याती अंत्यज असतां। मानावा तत्त्वता निश्चयेसीं।।तु.गा.३२८१.००१।।
रामकृष्णनामें उच्चारी सरळें। आठवी सांवळें रूप मनीं।।तु.गा.३२८१.००२।।
शांति क्षमा दया अळंकार अंगीं। अभंग प्रसंगीं धैर्यवंत।।तु.गा.३२८१.००३।।
तुका म्हणे गेल्या षड्ऊर्मी अंग। सांडुनियां मग ब्राह्मण तो।।तु.गा.३२८१.००४।।
धांवे त्यासी फावे। दुजें उगवूनि गोवे।।तु.गा.३२८२.००१।।
घ्यावें भरूनियां घर। मग नाहीं येरझार।।तु.गा.३२८२.००२।।
धणी उभें केलें। पुंडलिकें या उगलें।।तु.गा.३२८२.००३।।

तुका म्हणे ठसा। गेला पडोनियां ऐसा।।तु.गा.३२८२.००४।।
वेळोवेळां हेंचि सांगे। दान मागें जगासी।।तु.गा.३२८३.००१।।
विठ्ठल हे मंगळ वाणी। घेऊं धणी पंगतीसी।।तु.गा.३२८३.००२।।
वेचतसें पळें पळ। केलें बळ पाहिजे।।तु.गा.३२८३.००३।।
तुका म्हणे दुश्चित नका। राहों फुका नाड हा।।तु.गा.३२८३.००४।।
याचि नांवें दोष। राहे अंतरीं किल्मिष।।तु.गा.३२८४.००१।।
मना अंगीं पुण्य पाप। शुभ उत्तम संकल्प।।तु.गा.३२८४.००२।।
बीजाऐसीं फळें। उत्तम कां अमंगळें।।तु.गा.३२८४.००३।।
तुका म्हणे चित्त। शुद्ध करावें हे हीत।।तु.गा.३२८४.००४।।
देह निरसे तरी। बोलावया नुरे उरी।।तु.गा.३२८५.००१।।
येर वाचेचे वाग्जाळ। अळंकारापुरते बोल।।तु.गा.३२८५.००२।।
काचें तरी कढे। जाती ऐसें चित्त ओढे।।तु.गा.३२८५.००३।।
विष्णुदास तुका। पूर्ण धणी जाणे चुका।।तु.गा.३२८५.००४।।
धरितां इच्छा दुरी पळे। पाठी सोहळे उदासा।।तु.गा.३२८६.००१।।
म्हणऊनि असट मन। नका खूण सांगतों।।तु.गा.३२८६.००२।।
आमिषापाशीं अवघें वर्म। सोसें श्रम पाववी।।तु.गा.३२८६.००३।।
तुका म्हणे बीज न्यावें। तेथें यावें फळानें।।तु.गा.३२८६.००४।।
कस्तुरीचे अंगीं मिनली मृत्तिका। मग वेगळी कां येईल लेखों।।तु.गा.३२८७.००१।।
तयापरि भेद नाहीं देवभक्ती। संदेहाच्या युक्ति सरों द्याव्या।।तु.गा.३२८७.००२।।
इंधनें तें आगीं संयोगाच्या गुणें। सागरा दरुषणें वोहोळ तोंचि।।तु.गा.३२८७.००३।।
तुका म्हणे माझें साक्षीचें वचन। येथें तो कारण शुद्ध भाव।।तु.गा.३२८७.००४।।
जाणावें तें सार। नाहीं तरी दगा फार।।तु.गा.३२८८.००१।।
डोळे झांकिलिया रवि। नाहीं ऐसा होय जेवीं।।तु.गा.३२८८.००२।।

बहुथोड्या आड। निवारितां लाभे जाड।।तु.गा.३२८८.००३ ।।
तुका म्हणे खरें। नेलें हातींचें अंधारें ।।तु.गा.३२८८.००४।।
भाग्यवंता हे परवडी। करिती जोडी जन्माची।।तु.गा.३२८९.००१ ।।
आपुलाल्या लाहो भावें। जें ज्या व्हावें तें आहे।।तु.गा.३२८९.००२।।
इच्छाभोजनाचा दाता। नलगे चिंता करावी।।तु.गा.३२८९.००३ ।।
तुका म्हणे आल्या थोऱ्या। वस्तू बऱ्या मोलाच्या।।तु.गा.३२८९.००४।।
करिती तया वेवसाव आहे। येथें व्हा रे साहे एक एकां।।तु.गा.३२९०.००१ ।।
गातां आइकतां समानचि घडे। लाभें लाभ जोडे विशेषता।।तु.गा.३२९०.००२।।
प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं। नटे टाळीं रंगीं शूरत्वेंसी।।तु.गा.३२९०.००३ ।।
तुका म्हणे बहुजन्मांचें खंडण। होईल हा शीण निवारोनि।।तु.गा.३२९०.००४।।
जीव जीती जीवना संगें। मत्स्या मरण त्या वियोगें।।तु.गा.३२९१.००१ ।।
जया चित्तीं जैसा भाव। तया जवळीं तैसा देव।।तु.गा.३२९१.००२ ।।
सकळां पढिये भानु। परि त्या कमळाचें जीवनु।।तु.गा.३२९१.००३ ।।
तुका म्हणे माता। वाहे तान्हुल्याची चिंता।।तु.गा.३२९१.००४।।
दह्याचियें अंगीं निघे ताक लोणी। एका मोलें दोन्ही मागों नये।।तु.गा.३२९२.००१ ।।
आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें। दोहोंशी समान पाहों नये।।तु.गा.३२९२.००२।।
पृथ्वीच्या पोटीं हिरा गारगोटी। दोहोंसी संसाटी करूं नये।।तु.गा.३२९२.००३ ।।
तुका म्हणे तैसें संत आणि जन। दोहोंसी समान भजूं नये।।तु.गा.३२९२.००४।।
वचनेंचि व्हावें आपण उदार। होईल विश्वंभर संतुष्टचि।।तु.गा.३२९३.००१ ।।
सत्यसंकल्पाचीं फळें बीजाऐशीं। शुद्ध नाहीं नाशी पावों येत।।तु.गा.३२९३.००२।।
वंचिलिया काय येइल उपेगा। शरीर हें नरकाचेंचि आळें।।तु.गा.३२९३.००३ ।।
तुका म्हणे जीव जितां थारे लावा। पडिलिया गोवा देशधडी।।तु.गा.३२९३.००४।।
संकल्पासी अधिष्ठान। नारायण गोमटें ।।तु.गा.३२९४.००१ ।।

अवघियांचें पुरे कोड। फिटे जड देहत्व ।।तु.गा.३२९४.००२ ।।
उभय लोकीं उत्तम कीर्ती । देव चित्तीं राहिलिया ।।तु.गा.३२९४.००३ ।।
तुका म्हणे जीव धाय। नये हाय जवळी ।।तु.गा.३२९४.००४ ।।
ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे। कन्या पुत्र घोडे दारा धन ।।तु.गा.३२९५.००१ ।।
निंब घेती रोगी कवणिया सुखें। हरावया दुःखें व्याधि पीडा ।।तु.गा.३२९५.००२ ।।
काय पळे सुखें चोर लागे पाठीं। न घालावीं काठी आड तया ।।तु.गा.३२९५.००३ ।।
जयाचें कारण तोचि जाणे करूं । नये कोणां वारूं आणिकांसी ।।तु.गा.३२९५.००४ ।।
तुका म्हणे तरी सांपडे निधान। द्यावा ओंवाळून जीव बळी ।।तु.गा.३२९५.००५ ।।
पाषाण देव पाषाण पायरी। पूजा एकावरी पाय ठेवी ।।तु.गा.३२९६.००१ ।।
सार तो भाव सार तो भाव। अनुभवीं देव तेचि झाले ।।तु.गा.३२९६.००२ ।।
उदका भिन्न पालट काई। गंगा गोड येरां चवी काय नाहीं ।।तु.गा.३२९६.००३ ।।
तुका म्हणे हें भाविकांचें वर्म। येरें धर्माधर्म विचारावे ।।तु.गा.३२९६.००४ ।।
सकळ गुणें संपन्न। एक देवाचें लक्षण ।।तु.गा.३२९७.००१ ।।
वरकड कोठें कांहीं। एक आहे एक नाहीं ।।तु.गा.३२९७.००२ ।।
षड्गुण ऐश्वर्य संपन्न। एक भगवंत जाण ।।तु.गा.३२९७.००३ ।।
तुका म्हणे जें जें बोला। तें तें साजे या विठ्ठला ।।तु.गा.३२९७.००४ ।।
आगी देखोनियां सती। अंगीं रोमांच उठती ।।तु.गा.३२९८.००१ ।।
हा तो नव्हे उपदेश। सुख अंतरीं उल्हास ।।तु.गा.३२९८.००२ ।।
वित्तगोतांकडे। चित्त न घलीं न रडे ।।तु.गा.३२९८.००३ ।।
आठवूनि एका। उडी घाली म्हणे तुका ।।तु.गा.३२९८.००४ ।।
धांवे माते सोई। बाळ न विचारितां कांहीं ।।तु.गा.३२९९.००१ ।।
मग त्याचें जाणें निकें । अंग वोढवीं कौतुकें ।।तु.गा.३२९९.००२ ।।
नेणें सर्प दोरी। आगी भलते हातीं धरी ।।तु.गा.३२९९.००३ ।।

तीविणें तें नेणें। आणीक कांहीं तुका म्हणे।।तु.गा.३२९९.००४।।
नव्हे मतोळ्याचा वाण। नीच नवा नारायण ।।तु.गा.३३००.००१।।
सुख उपजे श्रवणें। खरें टांकसाळी नाणें।।तु.गा.३३००.००२।।
लाभ हातोहातीं। अधिक पुढतोंपुढती।।तु.गा.३३००.००३।।
तुका म्हणे नेणों किती। पुरोनि उरलें पुढती।।तु.गा.३३००.००४।।
भावापुढें बळ। नाहीं कोणाचें सबळ।।तु.गा.३३०१.००१।।
करी देवावरी सत्ता। कोण त्याहूनि परता।।तु.गा.३३०१.००२।।
बैसे तेथें येती। न पाचारितां सर्व शक्ति।।तु.गा.३३०१.००३।।
तुका म्हणे राहे। तयाकडे कोण पाहे।।तु.गा.३३०१.००४।।
गर्भीं असतां बाळा। कोण पाळी त्याचा लळा।।तु.गा.३३०२.००१।।
कैसा लाघवी सूत्रधारी। कृपाळुवा माझा हरी।।तु.गा.३३०२.००२।।
सर्प पिलीं वितांचि खाय। वांचवी त्या कोण माय।।तु.गा.३३०२.००३।।
गगनीं लागला कोंसरा। कोण पुरवी तेथें चारा।।तु.गा.३३०२.००४।।
पोटीं पाषाणांचे जीव। कवण जीव त्याचा भाव।।तु.गा.३३०२.००५।।
तुका म्हणे निश्चळ राहें। होईल तें सहज पाहें।।तु.गा.३३०२.००६।।
चुकली ते वाट। पुढें सांपडली नीट।।तु.गा.३३०३.००१।।
म्हणउनि गर्भवास। नेणतीं ते हरिचे दास।।तु.गा.३३०३.००२।।
संचिताचा संग। काय जाणों पावे भंग।।तु.गा.३३०३.००३।।
तुका म्हणे दृष्टी। उघडि तो नव्हे कष्टी।।तु.गा.३३०३.००४।।
करितां देवार्चन। घरा आले संतजन।।तु.गा.३३०४.००१।।
देव सारावे परते। संत पूजावे आरते।।तु.गा.३३०४.००२।।
शाळिग्राम विष्णुमूर्ति। संत हो का भलते याती।।तु.गा.३३०४.००३।।
तुका म्हणे संधी। अधिक वैष्णवांची मांदी।।तु.गा.३३०४.००४।।

मार्गीं बहुत। याचि गेले साधुसंत।।तु.गा.३३०५.००१ ।।
नका जाऊं आड रानें । ऐसीं गर्जंती पुराणें।।तु.गा.३३०५.००२ ।।
चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा।।तु.गा.३३०५.००३ ।।
झळकती पताका। गरुड टके म्हणे तुका।।तु.गा.३३०५.००४ ।।
परिमळ म्हणुनि चोळूं नये फूल। खाऊं नये मूल आवडतें।।तु.गा.३३०६.००१ ।।
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद। यंत्र भेदुनि नाद पाहूं नये।।तु.गा.३३०६.००२ ।।
कर्मफळ म्हणुनि इच्छूं नये काम। तुका म्हणे वर्म दावूं लोकां।।तु.गा.३३०६.००३ ।।
वैष्णवमुनिविप्रांचा सन्मान। करावा आपण घेऊं नये।।तु.गा.३३०७.००१ ।।
प्रभु झाला तरी संसाराचा दास। विहित तयास यांची सेवा।।तु.गा.३३०७.००२ ।।
तुका म्हणे हे आशीर्वादें बळी। जाईल तो छळी नरका यासीं।।तु.गा.३३०७.००३ ।।
देव सखा जरी। जग अवघें कृपा करी।।तु.गा.३३०८.००१ ।।
ऐसा असोनि अनुभव। कासाविस होती जीव।।तु.गा.३३०८.००२ ।।
देवाची जतन। तया बाधूं न शके अन्न।।तु.गा.३३०८.००३ ।।
तुका म्हणे हरी। प्रह्लादासी यत्न करी।।तु.गा.३३०८.००४ ।।
साधनाच्या कोटी। केल्या आटी होत्या त्या।।तु.गा.३३०९.००१ ।।
देव कृपा करी जरी। होय उजरी स्वरूपीं।।तु.गा.३३०९.००२ ।।
केले होती वृथाश्रम। चित्ता उपरम न होतां।।तु.गा.३३०९.००३ ।।
तुका म्हणे कळों आलें। सर्व झालें आपरूप।।तु.गा.३३०९.००४ ।।
हारपल्याची नका चित्तीं। धरूं खंती वायांच।।तु.गा.३३१०.००१ ।।
पावलें तें म्हणा देवा। सहज सेवा या नांवें।।तु.गा.३३१०.००२ ।।
होणार तें भोगें घडे। लाभ जोडे संकल्पें।।तु.गा.३३१०.००३ ।।
तुका म्हणे मोकळें मन। अवघें पुण्य या नांवें।।तु.गा.३३१०.००४ ।।
वासनेच्या मुखीं आदळूनि भीतें। निर्वाहापुरतें कारण तें।।तु.गा.३३११.००१ ।।

या नांव अंतरा आला नारायण। चित्तसमाधान खूण त्याची ।।तु.गा.३३११.००२ ।।
सर्वकाळ हाचि करणें विचार। विवेकीं सादर आत्मत्वाचें ।।तु.गा.३३११.००३ ।।
तुका म्हणे जों जों भजनासी वळे । अंगें तों तों कळे सन्निधता ।।तु.गा.३३११.००४ ।।
वचन तें नाहीं तोडीत शरीरा । भेदतें अंतरा वज्रा ऐसें ।।तु.गा.३३१२.००१ ।।
कांहीं न सहावें काशाही कारणें । संदेह निधान देह बळी ।।तु.गा.३३१२.००२ ।।
नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं जड होत पोट तेणें ।।तु.गा.३३१२.००३ ।।
तुका म्हणे जरी गिळी अहंकार । तरी वसे घर नारायण ।।तु.गा.३३१२.००४ ।।
लौकिकासाठीं या पसाऱ्याचा गोवा। कांहीं नाहीं देवा लागों येत ।।तु.गा.३३१३.००१ ।।
ठेवावा माथा तो नुचलावा पायीं । ठायींचिये ठायीं हालों नये ।।तु.गा.३३१३.००२ ।।
डहुळिल्या मनें वितुळेल रूप। नांव ऐसें पाप उपाधीतें ।।तु.गा.३३१३.००३ ।।
तुका म्हणे देव प्रीतीनें कवळीं। ठेवील जवळी उठवूनि ।।तु.गा.३३१३.००४ ।।
येथें दुसरी न सरे आटी। देवा भेटी जावया ।।तु.गा.३३१४.००१ ।।
तोचि ध्यावा एक चित्तें। करूनि रितें कलेवर ।।तु.गा.३३१४.००२ ।।
षड्उर्मी हृदयांत। यांचा अंत पुरवूनि ।।तु.गा.३३१४.००३ ।।
तुका म्हणे खुंटे आस। तेथें वास करी तो ।।तु.गा.३३१४.००४ ।।
देह आणि देहसंबंधें निंदावीं। इतरें वंदावीं श्वानशूकरें ।।तु.गा.३३१५.००१ ।।
येणें नांवें झाला मी माझ्याचा झाडा। मोह नांवें खोडा गर्भवास ।।तु.गा.३३१५.००२ ।।
गृह आणि वित्त स्वदेहा विटावें। इतरा भेटावें श्वापदाझाडां ।।तु.गा.३३१५.००३ ।।
तुका म्हणे मी हें माझें न यो वाचे। येणें नांवें साचे साधुजन ।।तु.गा.३३१५.००४ ।।
तापल्यावांचून नव्हे अळंकार। पिटूनियां सार उरलें तें ।।तु.गा.३३१६.००१ ।।
मग कदाकाळीं नव्हे शुद्ध जाति। नासें शत्रु होती मित्र तेचि ।।तु.गा.३३१६.००२ ।।
कलेवर बरें भोगूं द्यावें भोगा। फांसिलें तें रोगा हातीं सुटे ।।तु.गा.३३१६.००३ ।।
तुका म्हणे मन करावें पाठेळ। राहावेचि जाळ शिजेवरी ।।तु.गा.३३१६.००४ ।।

ठेवा जाणीव गुंडून। येथें भावचि प्रमाण ।।तु.गा.३३१७.००१ ।।
एका अनुसरल्या काज। अवघें जाणे पंढरिराज ।।तु.गा.३३१७.००२ ।।
तर्कवितर्कासी। ठाव नलगे सायासीं ।।तु.गा.३३१७.००३ ।।
तुका म्हणे भावेंविण। अवघा बोलती तो शीण ।।तु.गा.३३१७.००४ ।।
आहार निद्रे नलगे आदर। आपण सादर तेचि होय ।।तु.गा.३३१८.००१ ।।
परिमितीविणें बोलणें तें वायां। फार थोडें काया पिंड पीडी ।।तु.गा.३३१८.००२ ।।
समाधान त्याचें तोचि एक जाणे। आपुलिये खुणे पावोनियां ।।तु.गा.३३१८.००३ ।।
तुका म्हणे होय पीडा ते न करीं। मग राहें परी भलतिये ।।तु.गा.३३१८.००४ ।।
अंतरींचें ध्यान। मुख्य या नांव पूजन ।।तु.गा.३३१९.००१ ।।
उपाधि तें अवघें पाप। गोड निरसतां संकल्प ।।तु.गा.३३१९.००२ ।।
आज्ञा पाळावी हा धर्म। जाणते हो जाणा वर्म ।।तु.गा.३३१९.००३ ।।
तुका म्हणे वृत्ति। अविट हे सहज स्थिती ।।तु.गा.३३१९.००४ ।।
त्याग तरी ऐसा करा। अहंकारा दवडावें ।।तु.गा.३३२०.००१ ।।
मग जैसा तैसा राहें। काय पाहें उरलें तें ।।तु.गा.३३२०.००२ ।।
अंतरींचें विषम जाड। येऊं पुढें न द्यावें ।।तु.गा.३३२०.००३ ।।
तुका म्हणे शुद्ध मन। समाधान पाहिजे ।।तु.गा.३३२०.००४ ।।
योग तप याचि नांवें। गळित व्हावें अभिमानें ।।तु.गा.३३२१.००१ ।।
करणें तें हेंचि करा। सत्य बरा व्यापार ।।तु.गा.३३२१.००२ ।।
तरि खंडें येरझार। नेघे भार देहाचा ।।तु.गा.३३२१.००३ ।।
तुका म्हणे मानामान। हें बंधन नसावें ।।तु.गा.३३२१.००४ ।।
देह नव्हे मी हें सरे। उरला उरे विठ्ठल ।।तु.गा.३३२२.००१ ।।
म्हणउनि लाहो करा। काळ सारा चिंतनें ।।तु.गा.३३२२.००२ ।।
पाळणाची नाहीं चिंता। ठाव रिता देवाचा ।।तु.गा.३३२२.००३ ।।

तुका म्हणे जीवासाठीं। देव पोटीं पडेल ।।तु.गा.३३२२.००४।।
विचारावांचून। न पविजे समाधान ।।तु.गा.३३२३.००१ ।।
देह त्रिगुणांचा बांधा। माजी नाहीं गुण सुधा ।।तु.गा.३३२३.००२ ।।
देवाचिये चाडे। देवा द्यावें जें जें घडे ।।तु.गा.३३२३.००३ ।।
तुका म्हणे होतें। बहु गोमटें उचितें ।।तु.गा.३३२३.००४ ।।
गति अधोगति मनाची हे युक्ति। मन लावा एकांतीं साधुसंगें ।।तु.गा.३३२४.००१ ।।
जतन करा जतन करा । धांवतें सैरा ओढाळ तें ।।तु.गा.३३२४.००२ ।।
मान अपमान मनाचे लक्षण। लाविलिया ध्यान तेंचि करी ।।तु.गा.३३२४.००३ ।।
तुका म्हणे मन उतरी भवसिंधु। मन करी बंधु चौऱ्याशीचा ।।तु.गा.३३२४.००४ ।।
वाढलिया मान न मनावी निश्चिंती। भूतांचिये प्रीती भूतपण ।।तु.गा.३३२५.००१ ।।
म्हणऊनि मना लावावी कांचणी। इंद्रियांचे झणी ओढीभरे ।।तु.गा.३३२५.००२ ।।
एका एकपणें एकाचिया अंगीं। लागे रंग रंगीं मिळालिया ।।तु.गा.३३२५.००३ ।।
तुका म्हणे देव निष्काम निराळा। जीवदशे चाळा चळणाचा ।।तु.गा.३३२५.००४ ।।
आपुलाल्या तुम्ही रूपासी समजा। कासया वरजा आरसिया ।।तु.गा.३३२६.००१ ।।
हें तों नव्हें देहबुद्धिचें कारण। होईल नारायणें दान केलें ।।तु.गा.३३२६.००२ ।।
बब्रूचिया बाणें वर्मासी स्पर्शावें। हें तों नाहीं ठावें मोकलिया ।।तु.गा.३३२६.००३ ।।
तुका म्हणे बहु मुख या वचना। सत्याविण जाणा चाली नाहीं ।।तु.गा.३३२६.००४ ।।
शिखा सूत्र तुझा गुंतला जमान। तोवरी तूं जाण श्रुतिदास ।।तु.गा.३३२७.००१ ।।
त्याची तुज कांहीं चुकतांचि नीत। होसील पतित नरकवासी ।।तु.गा.३३२७.००२ ।।
बहु तूं झालासी चतुर शाहाणा। शुद्ध आचरणा चुकों नको ।।तु.गा.३३२७.००३ ।।
शिखा सूत्र याचा तोडीं तूं संबंध। मग तुज बाध नाहीं नाहीं ।।तु.गा.३३२७.००४ ।।
तुका म्हणे तरि वर्तुनि निराळा। उमटती कळा ब्रह्मींचिया ।।तु.गा.३३२७.००५ ।।
हेचि थोर भक्ति आवडती देवा। संकल्पावी माया संसाराची ।।तु.गा.३३२८.००१ ।।

ठेविलें अनंतें तैसेचि रहावें। चित्तीं असों द्यावें समाधान।।तु.गा.३३२८.००२।।
वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ। भोगणें तें फळ संचिताचें।।तु.गा.३३२८.००३।।
तुका म्हणे घालूं तयावरी भार। वाहूं हा संसार देवापायीं।।तु.गा.३३२८.००४।।
न करी रे संग राहें रे निश्चळ। लागों नेदी मळ ममतेचा।।तु.गा.३३२९.००१।।
या नांव अद्वैत खरें ब्रह्मज्ञान। अनुभवावांचून बडबड ते।।तु.गा.३३२९.००२।।
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय। संकल्पाही न ये वरी मन।।तु.गा.३३२९.००३।।
तुका म्हणे न ये जाणीव अंतरा। अंतरीं या थारा आनंदाचा।।तु.गा.३३२९.००४।।
ऐसा घेईं कां रे संन्यास। करीं संकल्पाचा नाश।।तु.गा.३३३०.००१।।
मग तूं राहें भलते ठायीं। जनीं वनीं खाटे भोई।।तु.गा.३३३०.००२।।
तोडीं जाणिवेची कळा। होई वृत्तीसी वेगळा।।तु.गा.३३३०.००३।।
तुका म्हणे नभा। होईं अणूचाही गाभा।।तु.गा.३३३०.००४।।
ऐसें कां हो न करा कांहीं। पुढें नाहीं नास ज्या।।तु.गा.३३३१.००१।।
विश्वंभरा शरणागत। भूतजात वंदूनि।।तु.गा.३३३१.००२।।
श्रुतीचें कां नेघा फळ। सारमूळ जाणोनि।।तु.गा.३३३१.००३।।
तुका म्हणे पुढें कांहीं। वाट नाहीं यावरी।।तु.गा.३३३१.००४।।
चालें हें शरीर कोणाचिये सत्ते। कोण बोलवितें हरीविण।।तु.गा.३३३२.००१।।
देखवी ऐकवी एक नारायण। तयाचें भजन चुकों नको।।तु.गा.३३३२.००२।।
माणसाची देव चालवी अहंता। मीचि एक कर्ता म्हणो नये।।तु.गा.३३३२.००३।।
वृक्षाचेंही पान हाले त्याची सत्ता। राहिली अहंता मग कोठें।।तु.गा.३३३२.००४।।
तुका म्हणे विठो भरला सबाह्य। उणें काय आहे चराचरीं।।तु.गा.३३३२.००५।।
मानअपमान गोवें। अवघे गुंडूनी ठेवावें।।तु.गा.३३३३.००१।।
हेंचि देवाचें दर्शन। सदा राहे समाधान।।तु.गा.३३३३.००२।।
शांतीची वसती। तेथें खुंटे काळगती।।तु.गा.३३३३.००३।।

आली उर्मी साहे। तुका म्हणे थोडें आहे।।तु.गा.३३३३.००४।।
थोडें आहे थोडें आहे। चित्त साह्य झालिया।।तु.गा.३३३४.००१।।
हर्षामर्ष नाहीं अंगीं। पांडुरंगीं सरले ते।।तु.गा.३३३४.००२।।
अवघ्या साधनांचें सार। न लगे फार शोधावें।।तु.गा.३३३४.००३।।
तुका म्हणे लटिकें पाहे। सांडीं देह अभिमान।।तु.गा.३३३४.००४।।
देवाचिये माथां घालुनियां भार। सांडी कलेवर ओंवाळुनि।।तु.गा.३३३५.००१।।
नाथिला हा छंद अभिमान अंगीं। निमित्याचे वेगीं सारीं ओझें।।तु.गा.३३३५.००२।।
करुणावचनीं लाहो एकसरें। नेदावें दुसरें आड येऊं ।।तु.गा.३३३५.००३।।
तुका म्हणे सांडीं लटिक्याचा संग। आनंद तो मग प्रगटेल।।तु.गा.३३३५.००४।।
आपुला तो एक देव करुनि घ्यावा। तेणेंविण जीवा सुख नव्हे।।तु.गा.३३३६.००१।।
येर तीं माइकें दुःखाचीं जनितीं। नाहीं आदिअंतीं अवसानीं।।तु.गा.३३३६.००२।।
अविनाश करी आपुलिया ऐसें। लावी मना पिसें गोविंदाचें ।।तु.गा.३३३६.००३।।
तुका म्हणे एका मरणेंचि सरे। उत्तमचि उरे कीर्ति मागें।।तु.गा.३३३६.००४।।
किती चौघाचारें। येथें गोविलें वेव्हारें।।तु.गा.३३३७.००१।।
असे बांधविले गळे। होऊं न शकती निराळे।।तु.गा.३३३७.००२।।
आपलें आपण। केलें कां नाहीं जतन।।तु.गा.३३३७.००३।।
तुका म्हणे खंडदंडें। येरझारीं लपती लंडें।।तु.गा.३३३७.००४।।
भेणें पळे डोळसा। न कळे मृत्यु तो सरिसा।।तु.गा.३३३८.००१।।
कैसी झाली दिशाभुली। नवजाति ये वाटचाली।।तु.गा.३३३८.००२।।
संसाराची खंती। मावळल्या तरी शक्ति।।तु.गा.३३३८.००३।।
तुका म्हणे हीणा। बुद्धि चुकली नारायणा।।तु.गा.३३३८.००४।।
जरा कर्णमुळीं सांगों आली गोष्टी। मृत्याचिये भेटी जवळी आली।।तु.गा.३३३९.००१।।
आतां माझ्या मना होई सावधान। ॐ पुण्याची जाण कार्यसिद्धि।।तु.गा.३३३९.००२।।

शेवटली घडी बुडतां नलगे वेळ। साधावा तो काळ जवळी आला ।।तु.गा.३३३९.००३ ।।
तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता। वारावा भोंवता शब्द मिथ्या ।।तु.गा.३३३९.००४ ।।
नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं। जिव्हाळ्याची बरी बोली ठायीं ।।तु.गा.३३४०.००१ ।।
आपुलिया हिता मानिसी कारण। सत्या नारायण साह्य असे ।।तु.गा.३३४०.००२ ।।
निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें। तप्त लोह सुखें धरितां हातीं ।।तु.गा.३३४०.००३ ।।
तुका म्हणे नेमा न टळतां बरें। खऱ्यासीच खरें ऐसें नांव ।।तु.गा.३३४०.००४ ।।
ऐसा हा लौकिक कदा राखवेना। पतितपावना देवराया ।।तु.गा.३३४१.००१ ।।
संसार करितां म्हणती हा दोषी। टाकितां आळसी पोटपोसा ।।तु.गा.३३४१.००२ ।।
आचार करितां म्हणती हा पसारा। न करितां नरा निंदिताती ।।तु.गा.३३४१.००३ ।।
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी। येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ।।तु.गा.३३४१.००४ ।।
धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा। समर्थासी ताठा करिताती ।।तु.गा.३३४१.००५ ।।
बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ। न बोलतां सकळ म्हणती गर्वी ।।तु.गा.३३४१.००६ ।।
भेटिसि नवजातां म्हणती हा निष्ठूर। येतां जातां घर बुडविलें ।।तु.गा.३३४१.००७ ।।
लग्न करूं जातां म्हणती हा मातला। न करितां जाला नपुंसक ।।तु.गा.३३४१.००८ ।।
निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ। पातकांचें मूळ पोरवडा ।।तु.गा.३३४१.००९ ।।
लोक जैसा ओक धरितां धरवेना। अभक्ता जिरेना संतसंग ।।तु.गा.३३४१.०१० ।।
तुका म्हणे आतां आइका वचन। त्यजुनियां जन भक्ति करा ।।तु.गा.३३४१.०११ ।।
जळतें संचित। ऐसी आहे धर्मनीत ।।तु.गा.३३४२.००१ ।।
माझ्या विठोबाचे पाय। वेळोंवेळां मनीं ध्याय ।।तु.गा.३३४२.००२ ।।
नेदी कर्म घडों। कोठें आडरानें पडो ।।तु.गा.३३४२.००३ ।।
तुका म्हणे मळ। राहो नेदी तापजाळ ।।तु.गा.३३४२.००४ ।।
न चलवे पंथ वचन नसतां पालवीं। शरीर विटंबिले वाटे भीक मागावी ।।तु.गा.३३४३.००१ ।।
न करीं रे तैसें आपआपणां। नित्य राम राम तुम्ही सकळही म्हणा ।।तु.गा.३३४३.००२ ।।

राम म्हणवितां रांडा पोरें निरविशी। पडसी यमा हातीं जाचविती चौऱ्याशीं।।तु.गा.३३४३.००३।।
मुखीं नाहीं राम तोही आत्महत्यारा। तुका म्हणे लाज नाहीं तया गव्हारा।।तु.गा.३३४३.००४।।
थडियेसी निघतां पाषाणाच्या सांगडी । बुडतां मध्यभागीं तेथें कोण घाली उडी।।तु.गा.३३४४.००१।।
न करीं रे तैसें आपआपणिया। पतंग जाय वायां जीवें ज्योती घालूनियां।।तु.गा.३३४४.००२।।
सावधपणें सोमल वाटी भरोनियां प्याला। मरणाअंतीं वैद्य बोलावितो वहिला।।तु.गा.३३४४.००३।।
तुका म्हणे करीं रे ठायींचाचि विचार। जंव नाहीं पातला यमाचा किंकर।।तु.गा.३३४४.००४।।
बरें सावधान। राहावें समय राखोन।।तु.गा.३३४५.००१।।
नाहीं सारखिया वेळा। अवघ्या पावतां अवकळा।।तु.गा.३३४५.००२।।
लाभ अथवा हानी। थोड्यामध्येंच भोवनी।।तु.गा.३३४५.००३।।
तुका म्हणे राखा। आपणा नाहीं तोंचि वाखा।।तु.गा.३३४५.००४।।
जरी माझी कोणी कापितील मान। तरी नको आन वदों जिव्हे।।तु.गा.३३४६.००१।।
सकळां इंद्रियां हे माझी विनंती। नका होऊं परतीं पांडुरंगा।।तु.गा.३३४६.००२।।
आणिकांची मात नाइकावी कानीं। आणिकां नयनीं न पहावें।।तु.गा.३३४६.००३।।
चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित। होऊनि निश्चित एकविध।।तु.गा.३३४६.००४।।
चाला पाय हात हेंचि काम करा। माझ्या नमस्कारा विठोबासी।।तु.गा.३३४६.००५।।
तुका म्हणे तुम्हां भय काय करीं। आमुचा कैवारी नारायण।।तु.गा.३३४६.००६।।
पोटाचे ते नट पाहों नये छंद। विषयाचे भेद विषयरूप।।तु.गा.३३४७.००१।।
अर्थीं परमार्थ कैसा घडों शके । चित्त लोभी भीके सोंग वायां।।तु.गा.३३४७.००२।।
देवाचें चरित्र दाखविती लीळा। लाघवाच्या कळा मोहावया।।तु.गा.३३४७.००३।।
तुका म्हणे चित्तीं राहे अभिलास। दोघां नरकवास सारिखाचि।।तु.गा.३३४७.००४।।
पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान। विलास मिष्टान्न करूनियां।।तु.गा.३३४८.००१।।
शरीर रक्षावें हा धर्म बोलती। काय असे हातीं तयांचिया।।तु.गा.३३४८.००२।।
क्षणभंगुर हें जाय न कळतां। ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं।।तु.गा.३३४८.००३।।

कर्वतिला देह कापियेलें मांस। गेले वनवासा शुकादिक ।।तु.गा.३३४८.००४।।
तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाव जळें।।तु.गा.३३४८.००५।।
दाढी डोई मुंडी मुंडुनियां सर्व। पांघुरती बरवीं वस्त्रें काळीं।।तु.गा.३३४९.००१।।
उफराटी कांठी घेऊनियां हातीं। उपदेश देती सर्वत्रांसी।।तु.गा.३३४९.००२।।
चाळवुनि रांडा देऊनियां भेष। तुका म्हणे त्यास यम दंडी।।तु.गा.३३४९.००३।।
अतिवादी लावी। एका बोट सोंग दावी।।तु.गा.३३५०.००१।।
त्याचा बहुरूपी नट। नव्हे वैष्णव तो चाट।।तु.गा.३३५०.००२।।
प्रतिपादी वाळी। एका पुजी एक छळी।।तु.गा.३३५०.००३।।
तुका म्हणे नाहीं। भूतदया ज्याचे ठायीं।।तु.गा.३३५०.००४।।
फिरंगी वाखर लोखंडाचे विळे। परि ते निराळे गुणामोल।।तु.गा.३३५१.००१।।
पायरी प्रतिमा एकचि पाषाण। परि तें महिमान वेगळेंचि।।तु.गा.३३५१.००२।।
तुका म्हणे तैशा नव्हतील परी। संतजना सरी सारखिया।।तु.गा.३३५१.००३।।
जप करितां राग। आला जवळी तो मांग।।तु.गा.३३५२.००१।।
नको भोंवतालें जगीं। पाहों जवळी राख अंगीं।।तु.गा.३३५२.००२।।
कुड्याचे संगती। सदा भोजन पंगती।।तु.गा.३३५२.००३।।
तुका म्हणे ब्रह्म। साधी विरहित कर्म।।तु.गा.३३५२.००४।।
अंगीं देवी खेळे। कां रे तुम्हांसी न कळे। कोणाचे हे चाळे। सुख दुःख न मानितां।।तु.गा.३३५३.००१।।
मी तों आतां येथें नाहीं। ओळखी वचनाच्या ठायीं। पालटाच घेईं। भाव खरा लोपेना।।तु.गा.३३५३.००२।।
आपुलाले तुम्ही पुसा। सोवा पेव्याच सरिसा। स्थिरावल्या कैसा। काय जाणों विचार।।तु.गा.३३५३.००३।।
तुका म्हणे लाभकाळ। तेथें नसावें शीतळ। मग तैशी वेळ। कोठें जाते सांपडो।।तु.गा.३३५३.००४।।
म्हणविती ऐसे आइकतों संत। न देखिजे होत डोळां कोणीं।।तु.गा.३३५४.००१।।
ऐसियांचा कोण मानितो विश्वास। निवडे तो रस घाईंडाईं।।तु.गा.३३५४.००२।।
पर्जन्याचे काळीं वोहोळाचे नद। ओसरतां बुंद न थारेचि।।तु.गा.३३५४.००३।।

हिऱ्याऐशा गारा दिसती दुरोन। तुका म्हणे घन न भेटे तों ।।तु.गा.३३५४.००४ ।।
भुंकती तीं द्यावी भुंकों। आपण नये त्यांचे शिकों ।।तु.गा.३३५५.००१ ।।
भाविकांनीं दुर्जनांचें। कांहीं मानूं नये साचें ।।तु.गा.३३५५.००२ ।।
होईल तैसें बळ। फजीत करावे ते खळ ।।तु.गा.३३५५.००३ ।।
तुका म्हणे त्याचें। पाप नाही ताडणाचें ।।तु.गा.३३५५.००४ ।।
जग अवघें देव। मुख्य उपदेशाची ठेव ।।तु.गा.३३५६.००१ ।।
आधीं आपणयां नासी। तरि उतरी ये कसीं ।।तु.गा.३३५६.००२ ।।
ब्रह्मज्ञानाचें कोठार। तें या निश्चयें उत्तर ।।तु.गा.३३५६.००३ ।।
तुका म्हणे ते उन्मनी। नाश कारया कारणीं ।।तु.गा.३३५६.००४ ।।
दाता तोचि एक जाणा। नारायणा स्मरवी ।।तु.गा.३३५७.००१ ।।
आणीक नाशिवंतें काय। न सरे हाय ज्याच्यानें ।।तु.गा.३३५७.००२ ।।
यावें तया काकुलती। जे दाविती सुपंथ ।।तु.गा.३३५७.००३ ।।
तुका म्हणे उरी नुरे। त्याचे खरे उपकार ।।तु.गा.३३५७.००४ ।।
कांहीं जाणों नये पांडुरंगाविण। पाविजेल शीण संदेहानें ।।तु.गा.३३५८.००१ ।।
भलतियां नांवें आळविला पिता। तरी तो जाणता कळवळा ।।तु.गा.३३५८.००२ ।।
अहंकार जातो गौरवितां वाणी। सर्व गात्रां धणी हरिकथा ।।तु.गा.३३५८.००३ ।।
तुका म्हणे उपजे विल्हाळ आवडी। करावा तो घडीघडी लाहो ।।तु.गा.३३५८.००४ ।।
भ्रमणा पाउलें वेंचिताती वाव। प्रवेशाचा ठाव एका द्वारें ।।तु.गा.३३५९.००१ ।।
सार तीं पाउलें विठोबाची जीवीं। कोणीं न विसंबावीं क्षणभरी ।।तु.गा.३३५९.००२ ।।
सुलभ हें केलें सकळां जीवन। फुंकावेचि कान न लगे कांहीं ।।तु.गा.३३५९.००३ ।।
तुका म्हणे येथें सकळही कोड। पुरे मूळ खोड विस्ताराचें ।।तु.गा.३३५९.००४ ।।
आणीक या काळें न चले उपाय। धरावे ते पाय विठोबाचे ।।तु.गा.३३६०.००१ ।।
अवघेंचि पुण्य असे तया पोटीं। अवघिया तुटी होय पापा ।।तु.गा.३३६०.००२ ।।

अवघे मोकळें अवघिया काळें। उद्धरतीं कुळें नरनारी।।तु.गा.३३६०.००३।।
काळ वेळ नाहीं गर्भवासदु:खें। उच्चारितां मुखें नाम एक ।।तु.गा.३३६०.००४।।
तुका म्हणे कांहीं न लगे सांडावें। सांगतसें भावें घेती तयां।।तु.गा.३३६०.००५।।
बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल। करावा विठ्ठल जीवभाव।।तु.गा.३३६१.००१।।
येणें सोसें मन झालें हांवभरी। परती माघारी घेत नाहीं।।तु.गा.३३६१.००२।।
बंधनापासोनि उकलली गांठी । देतां आली मिठी सावकाश ।।तु.गा.३३६१.००३।।
तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें। कामक्रोधें केलें घर रिते।।तु.गा.३३६१.००४।।
घेईं घेईं माझे वाचे। गोड नाम विठोबाचें।।तु.गा.३३६२.००१।।
तुम्ही घ्यारे डोळे सुख। पहा विठोबाचें मुख।।तु.गा.३३६२.००२।।
तुम्ही आइकारें कान। माझ्या विठोबाचे गुण।।तु.गा.३३६२.००३।।
मना तेथें धांव घेईं। राहें विठोबाचें पायीं।।तु.गा.३३६२.००४।।
तुका म्हणे जीवा। नको सोडूं या केशवा।।तु.गा.३३६२.००५।।
ऐसी जिव्हा निकी। विठ्ठल विठ्ठल कां न घोकी।।तु.गा.३३६३.००१।।
जेणें पाविजे उद्धार। तेथें राखावें अंतर।।तु.गा.३३६३.००२।।
गुंफोनि चावटी। तेथें कोण लाभभेटी।।तु.गा.३३६३.००३।।
तुका म्हणे काळ। देवाविण अमंगळ।।तु.गा.३३६३.००४।।
जळों ते जाणीव जळों ते शाहाणीव। राहो माझा भाव विठ्ठलपायीं।।तु.गा.३३६४.००१।।
जळों तो आचार जळों तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ।।तु.गा.३३६४.००२।।
जळों हा लौकिक जळों दंभमान। लागो मना ध्यान विठ्ठलाचें।।तु.गा.३३६४.००३।।
जळों हें शरीर जळों हा संबंध। राहो परमानंद माझ्या कंठीं।।तु.गा.३३६४.००४।।
तुका म्हणे येथें अवघेंचि होय। धरीं मना सोय विठोबाची।।तु.गा.३३६४.००५।।
आणिक कांहीं या उत्तराचें काज। नाहीं आतां मज बोलावया।।तु.गा.३३६५.००१।।
भिन्न भेद हे भावना स्वभाव। नव्हे कांहीं देव एकविध।।तु.गा.३३६५.००२।।

गुण दोष कोणें निवडावे धर्म। कोण जाणे कर्म अकर्म तें ।।तु.गा.३३६५.००३ ।।
तरि भले आतां न करावा संग। दुःखाचे प्रसंग तोडावया ।।तु.गा.३३६५.००४ ।।
तुका म्हणे गुण गाईं या देवाचे। घेईं माझे वाचे हेचि धणी ।।तु.गा.३३६५.००५ ।।
आतां पुढें धरी। माझे आठव वैखरी ।।तु.गा.३३६६.००१ ।।
नको बडबडूं भांडे। कांहीं वाउगें तें रांडे ।।तु.गा.३३६६.००२ ।।
विठ्ठल विठ्ठल। ऐसे सांडोनियां बोल ।।तु.गा.३३६६.००३ ।।
तुका म्हणे आण। तुज स्वामीची हे जाण ।।तु.गा.३३६६.००४ ।।
आतां येथें लाजे नाहीं तुझें काम। जाय मज राम आठवूं दे ।।तु.गा.३३६७.००१ ।।
तुझे भिडे माझें बहु झाले घात। केलों या अंकित दुर्जनाचा ।।तु.गा.३३६७.००२ ।।
माझें केलें मज पारिखें माहेर। नष्ट तूं साचार चाळविलें ।।तु.गा.३३६७.००३ ।।
सुखासाठीं एक वाहियेलें खांदीं। तेणें बहु मांदी मेळविली ।।तु.गा.३३६७.००४ ।।
केला चौघाचार नेलों पांचांमधीं। नाहीं दिली शुद्धी धरूं आशा ।।तु.गा.३३६७.००५ ।।
तुका म्हणे आतां घेईन कांठीवरी। धनी म्यां कैवारी केला देव ।।तु.गा.३३६७.००६ ।।
आजिवरी होतों तुझे सत्ते खालीं। तोंवरी त्वां केली विटंबणा ।।तु.गा.३३६८.००१ ।।
आतां तुज राहों नेदी या देशांत। ऐसा म्यां समर्थ केला धनी ।।तु.गा.३३६८.००२ ।।
सापें रिग केला कोठें बाळपणीं। होतीसी पापिणी काय जाणो ।।तु.गा.३३६८.००३ ।।
तुका म्हणे हा म्यां बुडविला वेव्हार। तुझेचि ढोपर सोलावया ।।तु.गा.३३६८.००४ ।।
चित्ता ऐसी नको देऊं आठवण। जेणें देवाचें चरण अंतरे तें ।।तु.गा.३३६९.००१ ।।
आलिया वचन रामनामध्वनि। ऐकावी कानीं ऐसी गोडी ।।तु.गा.३३६९.००२ ।।
मत्सराचा ठाव शरीरीं नसावा। लाभेंविण जीवा दुःख देतो ।।तु.गा.३३६९.००३ ।।
तुका म्हणे राहे अंतरीं शीतळ। शांतीचें तें बळ क्षमा अंगीं ।।तु.गा.३३६९.००४ ।।
सांगतों या मना तें माझें नाइकें । घातावरी टेंके चांडाळ हें ।।तु.गा.३३७०.००१ ।।
म्हणऊनि पाहे तरतें बुडतें। न लाहे पुरतें बळ करूं ।।तु.गा.३३७०.००२ ।।

काय तें संचित न कळे पाहतां। मतिमंदचिंता उपजते ।।तु.गा.३३७०.००३ ।।
तुका म्हणे ऐसें बळ नाहीं अंगीं। पावोनियां वेगीं पार ठाकीं ।।तु.गा.३३७०.००४ ।।
मायारूपें ऐसें मोहिलेसें जन। भोगिती पतन नानाकर्मे ।।तु.गा.३३७१.००१ ।।
काय याची प्रीती करितां आदर। दुरवितां दूर तेंचि भलें ।।तु.गा.३३७१.००२ ।।
नाना छंदें अंगीं वसती विकार। छळियेले फार तपोनिधी ।।तु.गा.३३७१.००३ ।।
तुका म्हणे ऐसें शिकवितों तुज। आतां धरीं लाज मना पुढें ।।तु.गा.३३७१.००४ ।।
करीं हेंचि काम। मना जपे राम राम ।।तु.गा.३३७२.००१ ।।
लागो हाचि छंद। मना गोविंद गोविंद ।।तु.गा.३३७२.००२ ।।
तुका म्हणे मना। मज भीक द्यावी दीना ।।तु.गा.३३७२.००३ ।।
नको घालूं झांसां। मना उपाधी वोळसा ।।तु.गा.३३७३.००१ ।।
जे जे वाहावे संकल्प। पुण्य तरी तेंचि पाप ।।तु.गा.३३७३.००२ ।।
उपजतो भेव। होतो कासावीस जीव ।।तु.गा.३३७३.००३ ।।
तुका म्हणे पाहों। होईल तें निवांत साहों ।।तु.गा.३३७३.००४ ।।
आतां असो मना अभक्ताची कथा। न होईं दुश्चिता हरिनामीं ।।तु.गा.३३७४.००१ ।।
नये त्याची कदा गोष्टी करूं मात। जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवें ।।तु.गा.३३७४.००२ ।।
प्रभातें न घ्यावें नांव माकडांचे । तैसें अभक्ताचें सर्वकाळ ।।तु.गा.३३७४.००३ ।।
तुका म्हणे आतां आठवूं मंगळ। जेणें सर्वकाळ सुखरूप ।।तु.गा.३३७४.००४ ।।
हरिनामवेली पावली विस्तार। फळीं पुष्पीं भार वोल्हावली ।।तु.गा.३३७५.००१ ।।
तेथें माझ्या मना होईं पक्षीराज। साधावया काज तृप्तीचें या ।।तु.गा.३३७५.००२ ।।
मुळींचिया बीजें दाखविली गोडी। लवकरचि जोडी झालियाची ।।तु.गा.३३७५.००३ ।।
तुका म्हणे क्षणक्षणा जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ।।तु.गा.३३७५.००४ ।।
रिकामें तूं नको मना । राहों क्षणक्षणाही ।।तु.गा.३३७६.००१ ।।
वेळोवेळां पारायण । नारायण हें करीं ।।तु.गा.३३७६.००२ ।।

भ्रमणाच्या मोडी वाटा । न भरें फाटा आडरानें ।।तु.गा.३३७६.००३।।

तुका म्हणे माझ्या जीवें। हेंचि ध्यावें धणीवरी।।तु.गा.३३७६.००४।।

फजितखोरा मना किती तुज सांगों। नको कोणा लागों मागें मागें।।तु.गा.३३७७.००१।।

स्नेहवादें दु:ख जडलेसें अंगीं। निष्ठुर हें जगीं प्रेमसुख।।तु.गा.३३७७.००२।।

निंदा स्तुती कोणी करो दया माया। न धरीं चाड या सुखदु:खा।।तु.गा.३३७७.००३।।

योगीराज कारे न राहाती बैसोनी। एकिये आसनीं याचि गुणें।।तु.गा.३३७७.००४।।

तुका म्हणे मना पाहें विचारून। होईं रे कठीण वज्राऐसें।।तु.गा.३३७७.००५।।

मना एक करी। म्हणे मी जाईन पंढरी। उभा विटेवरी। तो पाहेन सांवळा।।तु.गा.३३७८.००१।।

करीन सांगसी तें काम। जरी जपसी हें नाम। नित्य वाचें राम। हरी कृष्ण गोविंद।।तु.गा.३३७८.००२।।

लागें संतांचिया पायां। कथे उल्हास गावया। आलों मागावया। शरण देईं उचित।।तु.गा.३३७८.००३।।

नाचें रंगीं वाहे टाळी। होय सादर ते काळीं। तुका म्हणे मळी। सांडूनियां अंतरींची।।तु.गा.३३७८.००४।।

देवाचिये पायीं देईं मना बुडी। नको धांवों ओढी इंद्रियांचे।।तु.गा.३३७९.००१।।

सर्व सुखें तेथें होतीं एकवेळे। न सरती काळें कल्पांतींही।।तु.गा.३३७९.००२।।

जाणें येणें खुंटे धांव वेरझार। नलगे डोंगर उसंतावे।।तु.गा.३३७९.००३।।

सांगणें तें तुज इतुलेचि आतां। मानी धन कांता विषतुल्य।।तु.गा.३३७९.००४।।

तुका म्हणे तुझे हातीं उपकार। उतरों हा पार भवसिंधु।।तु.गा.३३७९.००५।।

न करीं रे मना कांहींच कल्पना। चिंतीं या चरणा विठोबाच्या।।तु.गा.३३८०.००१।।

येथें सुखाचिया अमुपचि रासी। पुढें कल्पनेसी ठाव नाहीं।।तु.गा.३३८०.००२।।

सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख। शोक मोह दु:ख पाहातां नासे।।तु.गा.३३८०.००३।।

तुका म्हणे येथें होईल विसांवा। तुटतील धांवा पुढिलांच्या।।तु.गा.३३८०.००४।।

प्रारब्धेंचि जोडें धन। प्रारब्धेंचि वाढे मान।।तु.गा.३३८१.००१।।

सोस करिसी वायां। भजे मना पंढरीराया।।तु.गा.३३८१.००२।।

प्रारब्धेंचि होय सुख। प्रारब्धेंचि पावें दु:ख।।तु.गा.३३८१.००३।।

प्रारब्धेंचि भरे पोट। तुका करीना बोभाट।।तु.गा.३३८१.००४।।
अधीरा माझ्या मना ऐक एक मात। तूं कां रे दुश्चित निरंतर।।तु.गा.३३८२.००१।।
हेचि चिंता काय खावें म्हणऊनि। भले तुजहूनि पक्षिराज।।तु.गा.३३८२.००२।।
पाहा ते चातक नेघे भूमिजळा। वरुषे उन्हाळा मेघ तया।।तु.गा.३३८२.००३।।
सकळ यातींमध्यें ठक हा सोनार। त्या घरीं व्यापार झारियाचा।।तु.गा.३३८२.००४।।
तुका म्हणे जळीं वनीं जीव एक । तयापाशीं लेख काय असे।।तु.गा.३३८२.००५।।
नको नको मना गुंतू मायाजाळीं। काळ आला जवळीं ग्रासावया।।तु.गा.३३८३.००१।।
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां। सोडविना तेव्हां मायबाप।।तु.गा.३३८३.००२।।
सोडविना राजा देशींचा चौधरी। आणिक सोयरीं भलीं भलीं।।तु.गा.३३८३.००३।।
तुका म्हणे तुला सोडविना कोणी। एका चक्रपाणी वांचोनियां।।तु.गा.३३८३.००४।।
ऐका ऐका भाविकजन। व्हाल कोण कोण ते।।तु.गा.३३८४.००१।।
तार्किकांचा टाका संग। पांडुरंग स्मरा हो।।तु.गा.३३८४.००२।।
नका शोधूं मतांतरें। नुमगे खरें बुडाल।।तु.गा.३३८४.००३।।
कलीमध्यें दास तुका। जातों लोकां सांगत।।तु.गा.३३८४.००४।।
परिमळें काष्ठ ताजवां तुळविलें। आणिक नांवांची थोडीं। एक तीं कांतिवें उभविलीं धवळारें। एकाचिया कुड मेडी। एक दीनरूप आणितीं मोळिया। एक ती बांधोनि माडी। अवघियां बाजार एकचि झाला। मां विकलीं आपुलाल्या पाडीं।।तु.गा.३३८५.००१।।
गुण तो सार रूप मध्यकार। अवगुण तो फार पीडीतसे।।तु.गा.३३८५.००२।।
एक गुणें आगळें असती। अमोल्य नांवाचे खडे। एक समर्थ दुर्बळा घरीं। फार मोलाचें थोडे। एक झगझग करिती वाळवंटीं। कोणी न पाहाती तयांकडे। सभाग्य संपन्न आपुलाले परी । मी येक दैन्यवाणें बापुडें।।तु.गा.३३८५.००३।।
एक नामें रूपें सारिख्या असती। अनेक प्रकार याती। ज्याचिया संचितें जैसें आलें पुढें। तयाची तैसीच गति। एक उंचपदीं बैसोनि सुखें। दास्य करवी एका हातीं। तुका म्हणे कां मानिती सुख। चुकलियां वायां खंती।।तु.गा.३३८५.००४।।
ओलें मूळ भेदी खडकाचें अंग। अभ्यासासी सांग कार्यसिद्धि।।तु.गा.३३८६.००१।।
नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड। नाहीं कईवाड तोचि वरि।।तु.गा.३३८६.००२।।

दोरें चिरा कापे पडिला कांचणीं। अभ्यासें सेवनीं विष पडे ।।तु.गा.३३८६.००३ ।।
तुका म्हणे कैंचा बैसण्यासी ठाव। जठरीं बाळा वाव एकाएकीं ।।तु.गा.३३८६.००४ ।।
कास घालोनि बळकट। झालों कळिकाळावरी नीट । केली पायवाट। भवसिंधूवरूनि ।।तु.गा.३३८७.००१ ।।
या रे या रे लहान थोर। याति भलते नारीनर। करावा विचार। न लगे चिंता कोणासी ।।तु.गा.३३८७.००२ ।।
कामी गुंतले रिकामे। जपी तपी येथें जमे। लाविले दमामे। मुक्त आणि मुमक्षा ।।तु.गा.३३८७.००३ ।।
एकंदर शिक्का। पाठविला येही लोका। आलों म्हणे तुका। मी नामाचा धारक ।।तु.गा.३३८७.००४ ।।
आम्ही वैकुंठवासी। आलों याचि कारणासी। बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया ।।तु.गा.३३८८.००१ ।।
झाडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग। उच्छिष्टाचा भाग। शेष उरला तो सेवूं ।।तु.गा.३३८८.००२ ।।
अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें। विषयलोभीं मनें। साधन हें बुडविलें ।।तु.गा.३३८८.००३ ।।
पिटूं भक्तीचा डांगोरा। कळीकाळासी दरारा। तुका म्हणे करा। जयजयकार आनंद ।।तु.गा.३३८८.००४ ।।
नये माझा तुम्हां होऊं शब्दस्पर्श। विप्र तुम्ही विद्वांस ब्राह्मणांसी ।।तु.गा.३३८९.००१ ।।
म्हणोनियां तुम्हां करितो विनंती। द्यावें शेष हातीं उरलें तें ।।तु.गा.३३८९.००२ ।।
वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित। करावी ते नीत विचारूनि ।।तु.गा.३३८९.००३ ।।
तुमचा स्वधर्म माझा अधिकार। भोजन उत्तर तुका म्हणे ।।तु.गा.३३८९.००४ ।।
कस्तुरी भिनली जये मृत्तिकेसी। तये आणिकासी कैसी सरी ।।तु.गा.३३९०.००१ ।।
लोखंडाचे अंगीं लागला परिस। तया आणिकास कैसी सरी ।।तु.गा.३३९०.००२ ।।
तुका म्हणे मी नवजें यातीवरी। पूज्यमान करी वैष्णवासी ।।तु.गा.३३९०.००३ ।।
माझा पहा अनुभव। केला देव आपुला ।।तु.गा.३३९१.००१ ।।
बोलविलें तेंचि द्यावें। उत्तर व्हावें ते काळीं ।।तु.गा.३३९१.००२ ।।
सोडिलिया जग निंद। मग गोविंद म्हणियारा ।।तु.गा.३३९१.००३ ।।
तुका म्हणे धीर केला। तेणें याला गोविलें ।।तु.गा.३३९१.००४ ।।
नेणे फुंको कान। नाहीं एकांतीचें ज्ञान ।।तु.गा.३३९२.००१ ।।
तुम्ही आइका हो संत। माझा सादर वृत्तांत ।।तु.गा.३३९२.००२ ।।

नाहीं देखिला तो डोळां। देव दाखवूं सकळां ।।तु.गा.३३९२.००३ ।।
चिंतनाच्या सुखें। तुका म्हणे नेणें दुःखें ।।तु.गा.३३९२.००४ ।।
आहाच तो मोड वाळलिया मधीं। अधीराची बुद्धि तेणें न्यायें ।।तु.गा.३३९३.००१ ।।
म्हणऊनि संग न करीं दुसरें। चित्त मळीन द्वारें दोड पडे ।।तु.गा.३३९३.००२ ।।
विषासाठीं सर्पा भयाभीत लोक । हें तों सकळीक जाणतसां ।।तु.गा.३३९३.००३ ।।
तुका म्हणे काचें राहे कुळाकुड। अवगुण तो नाड ज्याचा तया ।।तु.गा.३३९३.००४ ।।
असंतीं कांटाळा हा नव्हे मत्सर। ब्रह्म तें विकारविरहित ।।तु.गा.३३९४.००१ ।।
तरि म्हणा त्याग प्रतिपादलासे। अनादि हा असे वैराकार ।।तु.गा.३३९४.००२ ।।
शिजलें हिरवें एका नांवें धान्य। सेवनापें भिन्न निवडे तें ।।तु.गा.३३९४.००३ ।।
तुका म्हणे भूतीं साक्षी नारायण। अवगुणीं दंडण गुणीं पूजा ।।तु.गा.३३९४.००४ ।।
नये स्तवूं काचें होतें क्रियानष्ट। फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ ।।तु.गा.३३९५.००१ ।।
नाहीं परमार्थ साधत लौकिकें । धरून होतों फिकें अंगा आलें ।।तु.गा.३३९५.००२ ।।
पारखिया पुढें नये घालूं तोंड। तुटी लाभा खंड होतो माना ।।तु.गा.३३९५.००३ ।।
तुका म्हणे तरी मिरवते परवडी। कामावल्या गोडी अविनाश ।।तु.गा.३३९५.००४ ।।
अमृत अव्हेरें उचंबळलें जातां। विष आर्तभूतां आवश्यक ।।तु.गा.३३९६.००१ ।।
आदरासी मोल नये लावूं केजें। धीर शुद्धबीजें गोमटा तो ।।तु.गा.३३९६.००२ ।।
खऱ्याचिये अंगीं आपणचि चाली। लावणी लाविली काय लागे ।।तु.गा.३३९६.००३ ।।
तुका म्हणे चाडे करा वेवसाव। आम्हांसी तो वाव धीर आहे ।।तु.गा.३३९६.००४ ।।
परद्रव्य परकांता। नातळे जयाचिये चित्ता। आणिक कर्मीं तो तत्त्वता। बांधला नवजाय ।।तु.गा.३३९७.००१ ।।
ऐसा अनुभव रोकडा। विश्वासी तो जीवा जोडा। एकांत त्या पुढां। अवघा करी उकल ।।तु.गा.३३९७.००२ ।।
सकट आंबलें तें अन्न। शोधी तेंचि मद्यपान। विषमानें भिन्न। केलें शुद्धाशुद्ध ।।तु.गा.३३९७.००३ ।।
तुका म्हणे नित। बरवें अनुभवें उचित। तरी काय हित। मोलें घ्यावें लागतें ।।तु.गा.३३९७.००४ ।।
पाषाणप्रतिमा सोन्याच्या पादुका। हें तो हातीं एका समर्थाचे ।।तु.गा.३३९८.००१ ।।

अनामिका हातीं समर्थाचा शिक्का। न मानितां लोकां येईल कळों।।तु.गा.३३९८.००२।।
तुका म्हणे येथें दुराग्रह खोटा। आपुल्या अदृष्टा शरण जावें।।तु.गा.३३९८.००३।।
रडोनियां मान। कोण मागतां भूषण।।तु.गा.३३९९.००१।।
देवें दिलें तरी गोड। राहे रुचि आणि कोड।।तु.गा.३३९९.००२।।
लावितां लावणी। विके भीके केज्या दानी।।तु.गा.३३९९.००३।।
तुका म्हणे धीरा–। विण कैसा होतो हिरा।।तु.गा.३३९९.००४।।
उजळितां उजळे दीपकाची वाती। स्वयंभ ते ज्योति हिऱ्या अंगीं।।तु.गा.३४००.००१।।
एकीं महाकष्टें मेळविलें धन। एकासी जतन दैवयोगें।।तु.गा.३४००.००२।।
परिमळें कळें चंदनाचें चिन्ह। निवडी ते भिन्न गाढव तो।।तु.गा.३४००.००३।।
तुका म्हणे जया अंगीं नामठसा। तो तरे सहसा वंद्य होय।।तु.गा.३४००.००४।।
पापाचिया मुळें। झालें सत्याचें वाटोळें ।।तु.गा.३४०१.००१।।
दोष झाले बळिवंत। नाहीं ऐसी झाली नीत।।तु.गा.३४०१.००२।।
मेघ पडों भीती। पिकें सांडियली क्षिति।।तु.गा.३४०१.००३।।
तुका म्हणे कांहीं। वेदा वीर्य शक्ति नाहीं।।तु.गा.३४०१.००४।।
निरोप सांगतां। न धरी भय न करीं चिंता।।तु.गा.३४०२.००१।।
असो ज्याचे त्याचे माथां। आपण करावी ते कथा।।तु.गा.३४०२.००२।।
उतरावा भार। किंवा न व्हावें सादर।।तु.गा.३४०२.००३।।
तुका म्हणे वाहे धाक । तया इह ना परलोक ।।तु.गा.३४०२.००४।।
निगमाचें वन। नका शोधूं करूं शीण।।तु.गा.३४०३.००१।।
या रे गौळियांचे घरीं। बांधलें तें दावेंवरी।।तु.गा.३४०३.००२।।
पीडलेती भ्रमें। वाटा नकळतां वर्मे।।तु.गा.३४०३.००३।।
तुका म्हणे भार। माथां टाका अहंकार।।तु.गा.३४०३.००४।।
चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर। क्षोभवितें दूर तेचि भलें ।।तु.गा.३४०४.००१।।

ऐसी परंपरा आलीसे चालत। भलत्याची नीत त्यागावरी ।।तु.गा.३४०४.००२ ।।
हो कां पिता पुत्र बंधु कोणी तेही। विजाति संग्रहीं धरूं नये ।।तु.गा.३४०४.००३ ।।
तुका म्हणे सत्य पाळावें वचन। अन्यथा आपण करूं नये ।।तु.गा.३४०४.००४ ।।
भक्ति तो कठिण शुळावरील पोळी। निवडे तो बळी विरळा शूर ।।तु.गा.३४०५.००१ ।।
जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत। पायाविण भिंत तांतडीची ।।तु.गा.३४०५.००२ ।।
कामावलें तरि पाका ओज घडे। रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ।।तु.गा.३४०५.००३ ।।
तुका म्हणे मना पाहिजे अंकुश। नित्य नवा दिस जागृतीचा ।।तु.गा.३४०५.००४ ।।
सर्प विंचू दिसे। धन अभाग्या कोळसे ।।तु.गा.३४०६.००१ ।।
आला डोळ्यांसि कवळ। तेणें मळलें उजळ ।।तु.गा.३४०६.००२ ।।
अंगाचे भोवंडी। भोय झाडें फिरती धोंडी ।।तु.गा.३४०६.००३ ।।
तुका म्हणे नाड। पाप ठाके हिताआड ।।तु.गा.३४०६.००४ ।।
यथार्थ वाद सांडूनि उपचार। बोलती ते अघोर भोगितील ।।तु.गा.३४०७.००१ ।।
चोरा धरितां सांगे कुठोऱ्याचें नांव। दोघांचेहि पाव हात जाती ।।तु.गा.३४०७.००२ ।।
तुका म्हणे असे पुराणीं निवाड। माझी हे बडबड नव्हे कांहीं ।।तु.गा.३४०७.००३ ।।
एक तटस्थ मानसीं। एक सहजचि आळसी ।।तु.गा.३४०८.००१ ।।
दोन्ही दिसती सारखीं। वर्म जाणे तो पारखी ।।तु.गा.३४०८.००२ ।।
एक ध्यानीं करिती जप। एक बैसुनी घेती झोंप ।।तु.गा.३४०८.००३ ।।
एका सर्वस्वाचा त्याग। एखा पोटासाठीं जोग ।।तु.गा.३४०८.००४ ।।
एका भक्ति पोटासाठीं। एका देवासवें गांठी ।।तु.गा.३४०८.००५ ।।
वर्म पोटीं एका। फळें दोन सांगे तुका ।।तु.गा.३४०८.००६ ।।
चित्त समाधान। तरी विष वाटे सोनें ।।तु.गा.३४०९.००१ ।।
बहु खोटा अतिशय। जाणा भले सांगों काय ।।तु.गा.३४०९.००२ ।।
मनाच्या तळमळें। चंदनेंही अंग पोळे ।।तु.गा.३४०९.००३ ।।

तुका म्हणे दुजा। उपचार पीडा पूजा।।तु.गा.३४०९.००४।।
भूतीं भगवंत। हा तों जाणतों संकेत।।तु.गा.३४१०.००१।।
भारी मोकलितो बाण। ज्याचा त्यासी कळे गुण।।तु.गा.३४१०.००२।।
करावा उपदेश। निवडोनि तरि दोष।।तु.गा.३४१०.००३।।
तुका म्हणे वाटे। चुकतां आडरानें कांटे।।तु.गा.३४१०.००४।।
हेंहि ऐसें तेंही तैसें। उभय पिसें अविचार।।तु.गा.३४११.००१।।
अभिमानाचे ठेलाठेलीं। मधीं झालीं हिंपुटी।।तु.गा.३४११.००२।।
धीरा शांती ठाव नुरे। हाचि उरे आबाळ्या।।तु.गा.३४११.००३।।
कौतुक हें पाहे तुका। कढतां लोकां अधणीं।।तु.गा.३४११.००४।।
निंदावें हें जग। ऐसा भागा आला भाग।।तु.गा.३४१२.००१।।
होतें तैसें आलें फळ। गेलें निवडूनि सकळ।।तु.गा.३४१२.००२।।
दुसऱ्याच्या मता। मिळेनासें झालें चित्ता।।तु.गा.३४१२.००३।।
तुका झाला सांडा। विटंबिती पोरें रांडा।।तु.गा.३४१२.००४।।
हित सांगे तेणें दिलें जीवदान। घातकी तो जाण मनामागें।।तु.गा.३४१३.००१।।
बळें हे वारावे अधर्म करितां। अंधळें चालतां आडरानें।।तु.गा.३४१३.००२।।
द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी। नेदावें चोरासी चंद्रबळ।।तु.गा.३४१३.००३।।
तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं। नाहीं माझी वाणी पदरींची।।तु.गा.३४१३.००४।।
आपुली कसोटी शुद्ध राखी कारण। आगीनें भूषण अधिक पुटा।।तु.गा.३४१४.००१।।
नाहीं कोणासवें बोलणें लागत। निश्चिंतीनें चित्तसमाधान।।तु.गा.३४१४.००२।।
लपविलें तेंही ढेंकरें उमटे। खोटियाचें खोटें उर फोडी।।तु.गा.३४१४.००३।।
तुका म्हणे निंदा स्तुति दोन्ही वाव। आपुलाला भाव फळा येतो।।तु.गा.३४१४.००४।।
अनुभवें आलें अंगा। तें या जगा देतसें।।तु.गा.३४१५.००१।।
नव्हती हाततुके बोल। मूळ ओल अंतरिंची।।तु.गा.३४१५.००२।।

उतरूनि दिलें कशी। शुद्धरसीं सरतें ।।तु.गा.३४१५.००३ ।।

तुका म्हणे दुसरें नाहीं। ऐसी ग्वाही गुजरली ।।तु.गा.३४१५.००४ ।।

क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं। दुष्ट तयाप्रति काय करी ।।तु.गा.३४१६.००१ ।।

तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि। जाय तो विझोनि आपसया ।।तु.गा.३४१६.००२ ।।

तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित। धरा अखंडित सुखरूप ।।तु.गा.३४१६.००३ ।।

ज्याची जया आस। तया जवळी त्याचा वास ।।तु.गा.३४१७.००१ ।।

येर जवळी तें दुरी। वत्स सांडी धेनु घरीं ।।तु.गा.३४१७.००२ ।।

गोडी प्रियापाशीं। सुख उपजे येरासी ।।तु.गा.३४१७.००३ ।।

तुका म्हणे वोल। घडे तया ठायीं मोल ।।तु.गा.३४१७.००४ ।।

संतसंगतीं न करावा वास। एखादे गुणदोष अंगा येती ।।तु.गा.३४१८.००१ ।।

मग तया दोषा नाहीं परिहार। होय अपहार सुकृताचा ।।तु.गा.३४१८.००२ ।।

तुका म्हणे नमस्कारावे दुरून। अंतरीं धरून राहें रूप ।।तु.गा.३४१८.००३ ।।

एका म्हणतां भलें। आणिका सहजचि निंदिलें ।।तु.गा.३४१९.००१ ।।

कांहीं न करितां सायास। सहज घडले ते दोष ।।तु.गा.३४१९.००२ ।।

बरेवाईटाचें। नाहीं मज कांहीं साचें ।।तु.गा.३४१९.००३ ।।

तुका म्हणे वाणी। खंडोनि राहावें चिंतनीं ।।तु.गा.३४१९.००४ ।।

करी आणिकांचा अपमान। खळ छळवादी ब्राह्मण। तया देता दान। नरका जाती उभयतां ।।तु.गा.३४२०.००१ ।।

तैसें झालें दोघांजणां। मागतिया यजमाना। जाळियलें वना। आपणासहित कांचणी ।।तु.गा.३४२०.००२ ।।

घडतां दगडाची नाव। मोल क्लेश गेले वाव। तरता नाहीं ठाव। बुडवी तारूं तरतिया ।।तु.गा.३४२०.००३ ।।

चोरा दिधला साटां। तेणें मारियेल्या वाटा। तुका म्हणे ताठा। हें तंव दोघें नाडती ।।तु.गा.३४२०.००४ ।।

सतीचें तें घेतां वाण। बहु कठीण परिणामीं ।।तु.गा.३४२१.००१ ।।

जिवासाठीं गौरव वाढे। आहाच जोडे तें नव्हे ।।तु.गा.३४२१.००२ ।।

जरि होय उघडी दृष्टी। तरिच गोष्टी युद्धाच्या ।।तु.गा.३४२१.००३ ।।

तुका म्हणे अंगा येतां। तरी सत्ता धैर्याची ।।तु.गा.३४२१.००४।।
न म्हणे सान थोर। दुष्ट पापी अथवा चोर ।।तु.गा.३४२२.००१।।
सकळा द्यावी एकी चवी। तहान हरूनि निववी ।।तु.गा.३४२२.००२।।
न म्हणे दिवस राती। सर्व काळ सर्वांभूतीं ।।तु.गा.३४२२.००३।।
तुका म्हणे झारी। घेतां तांब्यानें खापरी ।।तु.गा.३४२२.००४।।
योगाचें तें भाग्य क्षमा। आधीं दमा इंद्रियें ।।तु.गा.३४२३.००१।।
अवघीं भाग्यें येतीं घरा। देव सोयरा झालिया ।।तु.गा.३४२३.००२।।
मिरासीचें म्हूण शेत। नाहीं देत पीक उगें ।।तु.गा.३४२३.००३।।
तुका म्हणे उचित जाणा । उगीं शिणा काशाला ।।तु.गा.३४२३.००४।।
द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग। म्हणोनियां संग खोटा त्याचा ।।तु.गा.३४२४.००१।।
निरयाचें मूळ घालुनियां मागें। मांडिली प्रसंगें कथा पुढें ।।तु.गा.३४२४.००२।।
आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा। पुढील भार देवावरी घाला ।।तु.गा.३४२४.००३।।
प्रारब्ध कांहीं न पालटे सोसें। तृष्णेचें हें पिसें वायांविण ।।तु.गा.३४२४.००४।।
तुका म्हणे घेईं राहे ऐसें धन। सादर श्रवण करोनियां ।।तु.गा.३४२४.००५।।
जीवन्मुक्त ज्ञानी जरि झाले पावन। त्यजावा दुर्जनसंग तिहीं ।।तु.गा.३४२५.००१।।
बहुत अन्न विष मोहरीच्या मानें। अवघेंचि तेणें विष होय ।।तु.गा.३४२५.००२।।
तुका म्हणे जेणें आपुले स्वहित। तैसी करा नीत विचारूनि ।।तु.गा.३४२५.००३।।
विधीनें सेवन। विषयत्यागातें समान ।।तु.गा.३४२६.००१।।
मुख्य धर्म देव चित्तीं। आदि अवसानीं अंतीं ।।तु.गा.३४२६.००२।।
बहु अतिशय खोटा। तर्कें होती बहु वाटा ।।तु.गा.३४२६.००३।।
तुका म्हणे भावें। कृपा करिजेते देवें ।।तु.गा.३४२६.००४।।
चालिले सोबती। काय मानिली निश्चिंती ।।तु.गा.३४२७.००१।।
काय करिसी एकला। काळ सन्निध पातला ।।तु.गा.३४२७.००२।।

कांहीं सावध तों बरवा। करीं आपुला काढावा।।तु.गा.३४२७.००३ ।।
चालिले अगळे। हळूच कान केश डोळे।।तु.गा.३४२७.००४ ।।
वोसरले दांत। दाढा गडबडल्या आंत।।तु.गा.३४२७.००५ ।।
एकली तळमळे। जिव्हां भलतेंचि चावळे।।तु.गा.३४२७.००६ ।।
तुका म्हणे यांनीं। तुझी मांडिली घालणी।।तु.गा.३४२७.००७ ।।
आशा तृष्णा माया अपमानाचें बीज। नासिलिया पूज्य होईजेतें।।तु.गा.३४२८.००१ ।।
अधीरासी नाहीं चालों जातां मान। दुर्लभ दर्शन धीर त्याचें।।तु.गा.३४२८.००२ ।।
तुका म्हणे नाहीं आणिकासी बोल। वायां जाय मोल बुद्धिपाशीं।।तु.गा.३४२८.००३ ।।
शोकें शोक वाढे। हिमतीचें धीर गाढे।।तु.गा.३४२९.००१ ।।
येथें केलें नव्हे काई। लंडीपण खोटें भाई।।तु.गा.३४२९.००२ ।।
करिती होया होय। परी नव्हे कोणी साह्य।।तु.गा.३४२९.००३ ।।
तुका म्हणे घडी। साधिलिया एक थोडी।।तु.गा.३४२९.००४ ।।
दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कंटकाचें।।तु.गा.३४३०.००१ ।।
धर्मनीतीचा हा ऐकावा वेव्हार। निवडिलें सार असार तें।।तु.गा.३४३०.००२ ।।
पाप त्याचें नांव न विचारितां नीत। भलतेंचि उन्मत्त करी सदा।।तु.गा.३४३०.००३ ।।
तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं। देवासही आटी जन्म घेणें।।तु.गा.३४३०.००४ ।।
मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव। दुःखें तरी लव धडधडी।।तु.गा.३४३१.००१ ।।
न लभे हा काळ न सुटे हातींचा। न बोलवे वाचा वेडावली।।तु.गा.३४३१.००२ ।।
न पवे धांवणें न पवेचि लाग। न लगेचि माग धरावया।।तु.गा.३४३१.००३ ।।
भेणें तरी अंगा लावियेल्या राखा। तरी त्यासी वाखा करीतसें।।तु.गा.३४३१.००४ ।।
तुका म्हणे हाका मारूं नेदी देवा। लोकांपाठी हेवा लागलासे।।तु.गा.३४३१.००५ ।।
नको होऊं देऊं भावीं अभावना। याचि नांवें जाणा बहु दोष।।तु.गा.३४३२.००१ ।।
मेघवृष्टि येथें होते अनिवार। जिव्हाळ्या उखर लाभ नाड।।तु.गा.३४३२.००२ ।।

उत्तम विभागें कनिष्ठाची इच्छा। कल्पतरु तैसा फळे त्यासी ।।तु.गा.३४३२.००३ ।।
तुका म्हणे जिणें बहु थोडें आहे। आपुलिया पाहें पुढें बरें ।।तु.गा.३४३२.००४ ।।
पूर आला आनंदाचा। लाटा उसळती प्रेमाच्या ।।तु.गा.३४३३.००१ ।।
बांधूं विठ्ठलसांगडी। पोहोनि जाऊं पैल थडी। अवघे जन गडी। घाला उडी भाईनो ।।तु.गा.३४३३.००२ ।।
हें तों नाहीं सर्वकाळ। अमुप आनंदाचें जळ ।।तु.गा.३४३३.००३ ।।
तुका म्हणे थोरा पुण्यें। ओघ आला पंथें येणें ।।तु.गा.३४३३.००४ ।।
विट नेघे ऐसें रांधा। जेणें बाधा उपजे ना ।।तु.गा.३४३४.००१ ।।
तरीच तें गोड राहे। निरें पाहे स्वयंभ ।।तु.गा.३४३४.००२ ।।
आणिकां गुणां पोटीं वाव। दावी भाव आपुला ।।तु.गा.३४३४.००३ ।।
तुका म्हणे शुद्ध जाती। ते मागुती परतेना ।।तु.गा.३४३४.००४ ।।
पूज्या एकासनीं आसनीं आसन। बैसतां गमन मातेशीं तें ।।तु.गा.३४३५.००१ ।।
सांगतों ते धर्म नीतीचा संकेत। सावधान हित व्हावें तरी ।।तु.गा.३४३५.००२ ।।
संतां ठाया ठाव पूजनाची इच्छा। जीवनींच वळसा सांपडला ।।तु.गा.३४३५.००३ ।।
तुका म्हणे एकाएकीं वरासन। दुजें तेथें भिन्न अशोभ तें ।।तु.गा.३४३५.००४ ।।
मागें नेणपणें घडलें ते क्षमा। आतां देतों सीमा करूनियां ।।तु.गा.३४३६.००१ ।।
परनारीचें जया घडेल गमन। दावी तो वदन जननीरत ।।तु.गा.३४३६.००२ ।।
उपदेशावरी मन नाहीं हातीं। तो आम्हां पुढती पाहूं नये ।।तु.गा.३४३६.००३ ।।
तुका म्हणे साक्षी असों द्यावें मन। घातली ते आण पाळावया ।।तु.गा.३४३६.००४ ।।
रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी। आव्हेरुनी दुरी अधिकारें ।।तु.गा.३४३७.००१ ।।
जातीचा स्वभाव आला डोळ्यां आड। तया घडे नाड न कळतां ।।तु.गा.३४३७.००२ ।।
कामधेनु देखे जैशा गाई म्हैसी। आणिका त्या ऐसी करोनियां ।।तु.गा.३४३७.००३ ।।
तुका म्हणे काय बोलोनियां फार। जयाचा वेव्हार तया साजे ।।तु.गा.३४३७.००४ ।।
भोग तो न घडे संचितावांचूनि। करावें तें मनीं समाधान ।।तु.गा.३४३८.००१ ।।

म्हणऊनि मनीं मानूं नये खेदू। म्हणावा गोविंदू वेळोवेळां ।।तु.गा.३४३८.००२ ।।
आणिकां रुसावें नलगे बहुतां। आपुल्या संचितावांचूनियां ।।तु.गा.३४३८.००३ ।।
तुका म्हणे भार घातलियावरी। होईल कैवारी नारायण ।।तु.गा.३४३८.००४ ।।
मृगाचिया अंगीं कस्तुरीचा वास। असे ज्याचा त्यास नसे ठावा ।।तु.गा.३४३९.००१ ।।
भाग्यवंत घेती वेंचूनियां मोल। भारवाही मेले वाहतां ओझें ।।तु.गा.३४३९.००२ ।।
चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा। भ्रमरासी चारा सुगंधाचा ।।तु.गा.३४३९.००३ ।।
अधिकारी येथें घेती हातवटी। परीक्षवंता दृष्टी रत्न जैसें ।।तु.गा.३४३९.००४ ।।
तुका म्हणे काय अंधळिया हातीं। दिलें जैसें मोतीं वायां जाय ।।तु.गा.३४३९.००५ ।।
विषम वाटे दुरवरी। चालूनि परती धरी। मागील ते उरी। उरली नाहीं भयाची ।।तु.गा.३४४०.००१ ।।
मुख्य न व्हावा तो नाड। शेवटाचें हातीं गोड। सरलिया चाड। मग कैंचे उद्वेग ।।तु.गा.३४४०.००२ ।।
होता पहिला अभ्यास। समयीं घालावया कास। तेव्हां लटिके दोष। योगें अनुपाताच्या ।।तु.गा.३४४०.००३ ।।
तुका म्हणे आहे। बुद्धि केलीयानें साहे। जवळीच पाहें। देव वाट स्मरणाची ।।तु.गा.३४४०.००४ ।।
वत्स पळे धेनु धांवे पाठी लागे। प्रीतीचा तो अंगें आविर्भाव ।।तु.गा.३४४१.००१ ।।
शिकविलें काय येईल कारणा। सूत्र ओढी मना आणिकाच्या ।।तु.गा.३४४१.००२ ।।
सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां। म्हणऊनि लाता मागें सारीं ।।तु.गा.३४४१.००३ ।।
तुका म्हणे आग्रह करावा न लगे। सांगतसे हा गे अनुभव ।।तु.गा.३४४१.००४ ।।
भांडवी माउली कवतुकें बाळा। आपणा सकळां साक्षित्वेसीं ।।तु.गा.३४४२.००१ ।।
माझी माझी म्हणे एकएका मारी। हें तों नाहीं दुरी उभयतां ।।तु.गा.३४४२.००२ ।।
तुझें थोडें भातें माझें बहु फार। छंद करकर वाद मिथ्या ।।तु.गा.३४४२.००३ ।।
तुका म्हणे एके ठायीं आहे वर्म। हेंचि होय श्रम निवारितें ।।तु.गा.३४४२.००४ ।।
बहुत प्रकार गव्हांचे। जिव्हा नाचे आवडी ।।तु.गा.३४४३.००१ ।।
सरले परि आवडी नवी। सिंधु दावी तरंग ।।तु.गा.३४४३.००२ ।।
घेतलें घ्यावें वेळोवेळां। माय बाळा न विसंबे ।।तु.गा.३४४३.००३ ।।

तुका म्हणे रस वचनीं । पडताळूनि तोचि सेवी ।।तु.गा.३४४३.००४ ।।
शक्ती द्याव्या देवा । नाहीं पार्थिवाची सेवा ।।तु.गा.३४४४.००१ ।।
मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ।।तु.गा.३४४४.००२ ।।
मना पोटीं देव । जाणा जैसा तैसा भाव ।।तु.गा.३४४४.००३ ।।
तुका म्हणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ।।तु.गा.३४४४.००४ ।।
साधनाचे कष्ट मोठे । भय वाटे थोर हें ।।तु.गा.३४४५.००१ ।।
मुखें गावें भावें गीत । सर्व हित बैसलिया ।।तु.गा.३४४५.००२ ।।
दासा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ।।तु.गा.३४४५.००३ ।।
तुका म्हणे आत्मनिष्ठा । भोग चेष्टा मनाची ।।तु.गा.३४४५.००४ ।।
करावें चिंतन । तेंचि बरें न भेटून ।।तु.गा.३४४६.००१ ।।
बरवा अंगीं राहे भाव । तंग तोचि जाणा देव ।।तु.गा.३४४६.००२ ।।
दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ।।तु.गा.३४४६.००३ ।।
तुका म्हणे मन । तेथें सकळ कारण ।।तु.गा.३४४६.००४ ।।
पाहतां ठायाठाव । जातो अंतरोनि देव ।।तु.गा.३४४७.००१ ।।
नये वाटों गुणदोषीं । मना जतन येविशीं ।।तु.गा.३४४७.००२ ।।
त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ।।तु.गा.३४४७.००३ ।।
तुका म्हणे धीरें– । विण कैसें होतें बरें ।।तु.गा.३४४७.००४ ।।
परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ।।तु.गा.३४४८.००१ ।।
थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढतां इंधनीं वाढविला ।।तु.गा.३४४८.००२ ।।
पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देव वसे ।।तु.गा.३४४८.००३ ।।
तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ।।तु.गा.३४४८.००४ ।।
सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ।।तु.गा.३४४९.००१ ।।
पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ।।तु.गा.३४४९.००२ ।।

वेंचल्याचा पाहे वरावरी झाडा। बळाचा निधडा पुढिलिया ।।तु.गा.३४४९.००३ ।।
तुका म्हणे जैशी दाखवावी वाणी। ते द्यावी भरोनी शेवट तों ।।तु.गा.३४४९.००४ ।।
आदि मध्य अंत दाखविलें दीपें। हा तों आपणापें यत्न बरा ।।तु.गा.३४५०.००१ ।।
दास्यत्वें दाविलें धन्याचें भांडार। तों तों नव्हे सार येथुनियां ।।तु.गा.३४५०.००२ ।।
उपायानें सोस नासला सकळ। सत्तेसत्ताबळ अंगा आलें ।।तु.गा.३४५०.००३ ।।
तुका म्हणे दृष्टी सकळांचें शिरीं। वचनेंचि करी बैसोनियां ।।तु.गा.३४५०.००४ ।।
गौरव गौरवापुरतें। फळ सत्याचे संकल्पें ।।तु.गा.३४५१.००१ ।।
कठिण योगाहुनी क्षेम। वोकलिया होतो श्रम ।।तु.गा.३४५१.००२ ।।
पावलें मरे शिवेपाशीं। क्लेश उतरत क्लेशीं ।।तु.गा.३४५१.००३ ।।
तुका म्हणे बहु आणी। कठिण निघालिया रणीं ।।तु.गा.३४५१.००४ ।।
आपल्याच फुंदें। जेथें तेथें घेती छंदे ।।तु.गा.३४५२.००१ ।।
पडिला सत्याचा दुष्काळ। बहु फार झाली घोळ ।।तु.गा.३४५२.००२ ।।
विश्वाचे माठ। त्याचे कपाळीं तें नाट ।।तु.गा.३४५२.००३ ।।
तुका म्हणे घाणा। मूढा तीर्थी प्रदक्षिणा ।।तु.गा.३४५२.००४ ।।
भोग द्यावे देवा। त्याग भोगींच बरवा ।।तु.गा.३४५३.००१ ।।
आपण व्हावें एकीकडे। देव कळेवरी जोडे ।।तु.गा.३४५३.००२ ।।
योजे यथाकाळें। उत्तम पाला कंद मुळें ।।तु.गा.३४५३.००३ ।।
वंचकासी दोष। तुका म्हणे मिथ्या सोस ।।तु.गा.३४५३.००४ ।।
देव होईजेत देवाचे संगती। पतन पंगती जगाचिया ।।तु.गा.३४५४.००१ ।।
दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा। करितील सांठा आपुलाला ।।तु.गा.३४५४.००२ ।।
दाखविले परी नाहीं वर्जिजेता। आला तोचि चित्ता भाग वरी ।।तु.गा.३४५४.००३ ।।
तुका म्हणे अंगीं आवडीचें बळ। उपदेश मूळ बीजपात्र ।।तु.गा.३४५४.००४ ।।
पाषाण परिस भूमि जांबूनद। वंशाचा संबंध धातयाचा ।।तु.गा.३४५५.००१ ।।

सोनियाची पुरी समुद्राचा वेढा। समुदाय गाढा राक्षसांचा ।।तु.गा.३४५५.००२ ।।
ऐंशी सहस्र ज्या सुंदरा कामिनी। माजी मुखराणी मंदोदरी ।।तु.गा.३४५५.००३ ।।
पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी। मुख्य पुत्र हरी इंद्रा आणी ।।तु.गा.३४५५.००४ ।।
चौदा चौकडियां आयुष्यगणना। बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ।।तु.गा.३४५५.००५ ।।
तुका म्हणे ज्याचे देव बांदवडी। सांगातें कवडी गेली नाहीं ।।तु.गा.३४५५.००६ ।।
आवडी येते गुणें। कळों चिन्हें उमटती ।।तु.गा.३४५६.००१ ।।
पोटीचें ओठीं उभें राहे। चित्त साहे मनासी ।।तु.गा.३४५६.००२ ।।
डोहोळियाची भूक गर्भा। ताटीं प्रभा प्रतिबिंबे ।।तु.गा.३४५६.००३ ।।
तुका म्हणे मागून घ्यावें। मना खावें वाटे तें ।।तु.गा.३४५६.००४ ।।
लांब धांवे पाय चोरी। भरोवरी जनाच्या ।।तु.गा.३४५७.००१ ।।
आतां कैसे होय याचें। शिजतां काचें राहिलें ।।तु.गा.३४५७.००२ ।।
खाय ओकी वेळोवेळां। कैसी कळा राहेल ।।तु.गा.३४५७.००३ ।।
तुका म्हणे भावहीन । त्याचा शीण पावावा ।।तु.गा.३४५७.००४ ।।
काय दिस गेले अवघेचि वराडें। तें आलें सांकडें कथेमाजी ।।तु.गा.३४५८.००१ ।।
क्षण एके ठायीं मन स्थिर नाहीं। अराणूक कईं होईल पुढें ।।तु.गा.३४५८.००२ ।।
कथेचा विसर दोषामुळें होय। तरणोपाय कैंचा मग ।।तु.गा.३४५८.००३ ।।
काय सांचवुनि उरलें हें मागें। घटिका एक संगें काय गेली ।।तु.गा.३४५८.००४ ।।
तेचि वाणी येथें करा उजळणी। काढावीं मथूनि शब्दरत्नें ।।तु.गा.३४५८.००५ ।।
तुका म्हणे हेंचि बोलावया चाड। नाम घेतां गोड हित असे ।।तु.गा.३४५८.००६ ।।
केला मातीचा पशुपति। परि मातीसी काय महती। शिवपूजा शिवासि पावे। माती मातीमाजी सामावे ।।तु.गा.३४५९.००१ ।।
तैसे पूजिती आम्हां संत। पूजा घेतो भगवंत। आम्ही किंकर संतांचे दास। संत पदवी नको आम्हांस ।।तु.गा.३४५९.००२ ।।
केला पाषाणाचा विष्णु। परी पाषाण नव्हे विष्णु। विष्णुपूजा विष्णुसि अर्पे। पाषाण राहे पाषाणरूपें ।।तु.गा.३४५९.००३ ।।
केली कांशाची जगदंबा। परि कांसें नव्हे अंबा। पूजा अंबेची अंबेला घेणें। कांसें राहें कांसेंपणें ।।तु.गा.३४५९.००४ ।।

ब्रह्मानंद पूर्णामाजी। तुका म्हणे केली कांजी।  ज्याची पूजा तेणेंचि घेणें। आम्हां पाषाणरूप राहणें।।तु.गा.३४५९.००५।।
जातिविजातीची व्हावयासि भेटी। संकल्प तो पोटीं वाहों नये।।तु.गा.३४६०.००१।।
होणार तें घडो होणाराच्या गुणें। होइल नारायणें निर्मिलें तें।।तु.गा.३४६०.००२।।
व्याघ्राचिये भुकें वधावी ते गाय। याचें नांव काय पुण्य असे।।तु.गा.३४६०.००३।।
तुका म्हणे न करी विचार पुरता। गरज्याची माता पिता खर।।तु.गा.३४६०.००४।।
आइत्याची राशी। आली पाकसिद्धीपाशीं।।तु.गा.३४६१.००१।।
आतां सोडोनि भोजन। भिके जावें वेडेपण।।तु.गा.३४६१.००२।।
उसंतिली वाट। मागें परतावें फुकट।।तु.गा.३४६१.००३।।
तुका म्हणे वाणी। वेचों बैसोन ठाकणीं।।तु.गा.३४६१.००४।।
मुळाचिया मुळें। दु:खें वाढती सकळें।।तु.गा.३४६२.००१।।
ऐसा योगियांचा धर्म। नव्हें वाढवावा श्रम।।तु.गा.३४६२.००२।।
न कळे आवडी। कोण आहे कैसी घडी।।तु.गा.३४६२.००३।।
तुका म्हणे थीतें। दु:ख पाववावें चित्तें।।तु.गा.३४६२.००४।।
एकल्या नव्हे खेळ चांग। धरिला संग म्हणऊनि।।तु.गा.३४६३.००१।।
उमटे तेव्हां कळे नाद। भेदाभेद निवडेना।।तु.गा.३४६३.००२।।
दुसऱ्या परी एक ऐसा। न वजे रिसा निकुरेंही।।तु.गा.३४६३.००३।।
तुका म्हणे कळत्यां कळे। येर खेळे खेळ म्हणो।।तु.गा.३४६३.००४।।
लोह कफ गार सिद्ध हे सामुग्री। अग्नि टणत्कारी दिसों येतो।।तु.गा.३४६४.००१।।
सांगावें तें काई सांगावें तें काई। चित्ता होय ठायीं अनुभव तो।।तु.गा.३४६४.००२।।
अन्नें सांगों येतो तृप्तीचा अनुभव। करूनि उपाय घेऊं हेवा।।तु.गा.३४६४.००३।।
तुका म्हणे मिळे जीवनीं जीवन। तेथें कोणा कोण नांव ठेवी।।तु.गा.३४६४.००४।।
निवडोनि वाण काढिले निराळे। प्रमाण डोहळे यावरि ते।।तु.गा.३४६५.००१।।
जयाचा विभाग तयासीच फळे। देखणें निराळें कौतुकासी।।तु.गा.३४६५.००२।।

शूर तो ओळखे घायडायहात। येरां होईल मात सांगायाची।।तु.गा.३४६५.००३।।
तुका म्हणे माझी केवळ ते वाणी। केला निजस्थानीं जानवसा।।तु.गा.३४६५.००४।।
एकीं असे एक हेवा। येर अनावडी जीवां।।तु.गा.३४६६.००१।।
देवें केल्या भिन्न जाती। उत्तम कनिष्ठ मध्यस्ती।।तु.गा.३४६६.००२।।
प्रीतीसाठीं भेद। कोणी पूज्य कोणी निंद्य।।तु.गा.३४६६.००३।।
तुका म्हणे लळा। त्याचा जाणे हा कळवळा।।तु.गा.३४६६.००४।।
अनुभवें वदे वाणी। अंतर ध्यानीं आपुलें।।तु.गा.३४६७.००१।।
कैंची चिका दुधचवी। जरी दावी पांढरे।।तु.गा.३४६७.००२।।
जातीऐसा दावी रंग। बहु जग या नांव।।तु.गा.३४६७.००३।।
तुका म्हणे खद्योत तें। ढुंगाभोंवतें आपुलिया।।तु.गा.३४६७.००४।।
न सरे भांडार। भरलें वेचितां अपार।।तु.गा.३४६८.००१।।
मवित्याचें पोट भरें। पुढिलासी पुढें उरे।।तु.गा.३४६८.००२।।
कारणापुरता। लाहो आपुलाल्या हिता।।तु.गा.३४६८.००३।।
तुका म्हणे देवा। पुढें केला चाले हेवा।।तु.गा.३४६८.००४।।
निवडुनि दिलें नवनीत। संचित ते भोगीते।।तु.गा.३४६९.००१।।
आतां पुढें भाव सार। जीवना थोर पाहावया।।तु.गा.३४६९.००२।।
पारखियाचे पडिलें हातीं। चांचपती आंधळीं।।तु.गा.३४६९.००३।।
तुका म्हणे सेवन घडे। त्यासी जोडे लाभ हा।।तु.गा.३४६९.००४।।
वाखर घेउनि आले। त्यासी तरवारेनें हाले।।तु.गा.३४७०.००१।।
नव्हे आपुलें उचित। करूनि टाकावे फजित।।तु.गा.३४७०.००२।।
अंगुळिया मोडी। त्यासी काय सिलें घोडीं।।तु.गा.३४७०.००३।।
नपुंसकासाठीं। तुका म्हणे नलगे जेठी।।तु.गा.३४७०.००४।।
शिळें खातां आला वीट। सुने धीट पाय धरी।।तु.गा.३४७१.००१।।

कान्होबा ते जाणे खूण। उन उन घांस घाली ।।तु.गा.३४७१.००२ ।।

आपुले ठायींचें घ्यावें। लाड भावें पाळावा ।।तु.गा.३४७१.००३ ।।

तुका म्हणे मी जुनाट सुनें। मोहो तेणें परतला ।।तु.गा.३४७१.००४ ।।

आम्हां कांहीं आम्हां कांहीं। आतां नाहीं या बोलें ।।तु.गा.३४७२.००१ ।।

मोल सांगा मोल सांगा। घेणें तिहीं गा पुसावें ।।तु.गा.३४७२.००२ ।।

कैसें घडें कैसें घडें। बडबड तुज मज ।।तु.गा.३४७२.००३ ।।

मुद्दलें साठीं मुद्दलें साठीं। लाभ पोटीं त्यामधीं ।।तु.गा.३४७२.००४ ।।

तुका म्हणे साठवूं घरीं। आडल्या काळें पुसती तरी ।।तु.गा.३४७२.००५ ।।

मोटळें हाटीं सोडिल्या गांठी। विकऱ्या घातले कण। ज्याचे भाग त्यासी देऊनि निवारिलें। सारूनि लिगाड दान। खरें माप हातीं बैसलों । मानिती तेचि चौघे जण। खरें वित्त तेथें आलें चोजवीत। गिऱ्हाईक संतजन ।।तु.गा.३४७३.००१ ।।

झाडिला पालव केला हाट वेच। झाली सकळींच आराणूक । याल तरि तुम्हीं करा लगबग। आमचे ते कोणी लोक ।।तु.गा.३४७३.००२ ।।

एक ते उत्तम मध्यम कनिष्ठ। वित्ताचे प्रकार तीन। बहुतां जनांचे बहुत प्रकार। वेगळाले वाण। लाभ हाणि कोणा मुद्दल झालें। कोणासी पडिलें खाण। अर्धमर्ध कोणी गुंतोनि राहिली। थोडे तैसे बहु जन ।।तु.गा.३४७३.००३ ।।

एक सांते आले एके गांवींहून। ये कामेंचि नव्हे जाणें। येतां जातां रुजू नाहीं दिवाणा। काळतोंडीं एकी तेणें। लाग भाग एकी एकानीं गोविली। मागील पुढिलां ऋणें। तुका म्हणे आतां पाहूं नये वास। साधावें आपुलें घेणें ।।तु.गा.३४७३.००४ ।।

नारायण ऐसा। सेवूं नेणतील रसा ।।तु.गा.३४७४.००१ ।।

जेणें भवव्याध तुटे। दुःख मागुतें न भेटे ।।तु.गा.३४७४.००२ ।।

नलगे कांहीं आटी। बाधा राहों न शके पोटीं ।।तु.गा.३४७४.००३ ।।

कैवल्य तें जोडे। कृपा लवकरी घडे ।।तु.गा.३४७४.००४ ।।

जन्ममरण दुःख अटें। जाळें अवघेंचि तुटें ।।तु.गा.३४७४.००५ ।।

तुका म्हणे झाला। याचा गुण बहुतांला ।।तु.गा.३४७४.००६ ।।

मान इच्छी तो अपमान पावे। अमंगळ सवें अभ्याग्याची ।।तु.गा.३४७५.००१ ।।

एकाचिये अंगीं दुजियाचा वास। आशा पुढें नाश सिद्ध करी ।।तु.गा.३४७५.००२ ।।

आधीक फळासी कोठें पावों शके । वासनेची भिकेवरी चाली ।।तु.गा.३४७५.००३ ।।
तुका म्हणे राजहंस ढोरा नांवें । काय तया घ्यावें अळंकाराचें ।।तु.गा.३४७५.००४ ।।
करूनि कडविड । जमा घडिली लगड ।।तु.गा.३४७६.००१ ।।
होतें तेचि झालें । नाम ठायींचें पडिलें ।।तु.गा.३४७६.००२ ।।
उतरलें डाईं । उत्तम ते सुलाखताई ।।तु.गा.३४७६.००३ ।।
हिंडवितां देशोदेश । तुका म्हणे नाहीं नाश ।।तु.गा.३४७६.००४ ।।
एक परि बहिरे बरे । परि तीं ढोरें ग्यानगंडें ।।तु.गा.३४७७.००१ ।।
कपाळासी लागली आगी । अभागी कां जीतसे ।।तु.गा.३४७७.००२ ।।
एक परि बरें वेडें । तर्की कुडें जळो तें ।।तु.गा.३४७७.००३ ।।
तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ।।तु.गा.३४७७.००४ ।।
तरीच हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ।।तु.गा.३४७८.००१ ।।
एक एका शोभवावें । केलें कवतुक देवें ।।तु.गा.३४७८.००२ ।।
काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ।।तु.गा.३४७८.००३ ।।
तुका म्हणे धुरें । डोळे भरिले परि खरे ।।तु.गा.३४७८.००४ ।।
तीर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ।।तु.गा.३४७९.००१ ।।
मिळालिया संतसंग । समर्पितां भलें अंग ।।तु.गा.३४७९.००२ ।।
तीर्थी भाव फळे । येथें अनाड तें वळे ।।तु.गा.३४७९.००३ ।।
तुका म्हणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ।।तु.गा.३४७९.००४ ।।
हा रस आनंदाचा । घोष करा हरिनामाचा । कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ।।तु.गा.३४८०.००१ ।।
पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरींचें संचित । होईल करीत । आला अधिकारी तो ।।तु.गा.३४८०.००२ ।।
काय पाहातां हे भाई । हरुषें नाचा धरा घाई । पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा ।।तु.गा.३४८०.००३ ।।
जें सुख दृष्टी आहे । तेंच अंतरीं जो लाहे । तुका म्हणे काय । कळिकाळ तें बापुडें ।।तु.गा.३४८०.००४ ।।
देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंतीं ।।तु.गा.३४८१.००१ ।।

तुका म्हणे जाण। तेंच भल्याचें वचन ।।तु.गा.३४८६.००४ ।।
अहो उभया विटेवरी। भरोवरी चुकविली ।।तु.गा.३४८७.००१ ।।
निवारलें येणें जाणें। कोणा कोणें रुसावें ।।तु.गा.३४८७.००२ ।।
संकल्पासी वेंचे बळ। भारे फळ निर्माण ।।तु.गा.३४८७.००३ ।।
तुका म्हणे उभयतां। भेटी सत्ता लोभाची ।।तु.गा.३४८७.००४ ।।
आनंदाचा थारा। सुखें मोहरला झरा ।।तु.गा.३४८८.००१ ।।
ऐसी प्रभुची ज्या कळा। त्याच्या कोण पाहे बळा ।।तु.गा.३४८८.००२ ।।
अंकिता ऐसिया। होईल पावविलें ठाया ।।तु.गा.३४८८.००३ ।।
तुका म्हणे ऐसें। दिलें आभंड प्रकाशें ।।तु.गा.३४८८.००४ ।।
आवडीचे भेटी निवे। चित्त पावे विश्रांति ।।तु.गा.३४८९.००१ ।।
बरवियाचा छंद मना। नारायणा अवीट।।तु.गा.३४८९.००२ ।।
तुळणें कांहीं साम्या पुरे। हें तों नुरे ये रुचि ।।तु.गा.३४८९.००३ ।।
तुका म्हणे बरवें झालें। फावलें हें कळे त्या ।।तु.गा.३४८९.००४ ।।
ज्याचे माथां जो जो भार। तोचि फार तयासी ।।तु.गा.३४९०.००१ ।।
मागें पुढें अवघें रितें। कळों येतें अनुभवें ।।तु.गा.३४९०.००२ ।।
परिसा अंगीं अमुप सोनें। पोटीं हीन धातुचें ।।तु.गा.३४९०.००३ ।।
आपुला तो करी धर्म। जाणे वर्म तुका तें ।।तु.गा.३४९०.००४ ।।
साच हा विठ्ठल साच हें करणें। संत जीं वचनें बोलियेले ।।तु.गा.३४९१.००१ ।।
साच तें स्वहित साच ते प्रचित। साच वेदें नीत सांगितली ।।तु.गा.३४९१.००२ ।।
तुका म्हणे घेती साच साच भावें। लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ।।तु.गा.३४९१.००३ ।।
ज्वरल्यासी काढा औषध पाचन। मूढा नारायण स्मरवितो ।।तु.गा.३४९२.००१ ।।
भवव्याधि येणें तुटेल रोकडा। करूनियां झाडा निश्चयेसी ।।तु.गा.३४९२.००२ ।।
आणिकां उपायां अनुपान कठिण। भोगे बरें शीण शीघ्रव्रत ।।तु.गा.३४९२.००३ ।।

तुका म्हणे केला उघडा पसारा। भाग्य आलें घरा दारावरी।।तु.गा.३४९२.००४।।
लावुनियां गोठी। चुकवूं आदरिली दिठी। देऊनियां मिठी। पडे महिया माथुले।।तु.गा.३४९३.००१।।
पुढें तेचि करी आड। तिचा लोभ तिसी नाड। लावूनि चरफड। हात गोऊनि पळावें।।तु.गा.३४९३.००२।।
आधीं काकुलती। मोहो घालावा पुढती। तोंडीं पडे माती। फिरतां मागें कैंचा तो।।तु.गा.३४९३.००३।।
तुका म्हणे देवा। यासी रडवी याचा हेवा। भावें कां हे सेवा। सुखें तुम्हां नार्पिती।।तु.गा.३४९३.००४।।
जग अमंगळ। लागे देखतां विटाळ।।तु.गा.३४९४.००१।।
धर्म भूतांची ते दया। संत कारण ऐसीया।।तु.गा.३४९४.००२।।
नव्हे माझें मत। साक्षी करूनि सांगे संत।।तु.गा.३४९४.००३।।
तुका म्हणे जीवें। दावी उमटूनि अनुभवें।।तु.गा.३४९४.००४।।
करितां तडातोडी। वत्स माते सोई ओढी।।तु.गा.३४९५.००१।।
करित्याचा आग्रह उरे। एक एकासाठीं झुरे।।तु.गा.३४९५.००२।।
भुके इच्छी अन्न । तेंही त्यासाठीं निर्माण।।तु.गा.३४९५.००३।।
तुका म्हणे जाती। एक एकाचिये चित्तीं।।तु.गा.३४९५.००४।।
दिली मान तरी नेघावी शत्रुची। शरण आलें त्यासी जतन जीवें।।तु.गा.३४९६.००१।।
समर्थांसी असे विचाराची आण। भलीं पाप पुण्य विचारावें।।तु.गा.३४९६.००२।।
काकुळतीसाठीं सत्याचा विसर। पडिलें अंतर न पाहिजे।।तु.गा.३४९६.००३।।
तुका म्हणे यश कीर्ति आणि मान। करितां जतन देव जोडे।।तु.गा.३४९६.००४।।
वाइटानें भलें। हीनें दाविलें चांगलें।।तु.गा.३४९७.००१।।
एकाविण एका। कैंचें मोल होतें फुका।।तु.गा.३४९७.००२।।
विषें दाविलें अमृत। कडू गोड घातें हित।।तु.गा.३४९७.००३।।
काळिमेनें ज्योती। दिवसें कळों आली राती।।तु.गा.३४९७.००४।।
उंच नीच गारा। हिरा परिस मोहरा।।तु.गा.३४९७.००५।।
तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनी कळलें।।तु.गा.३४९७.००६।।

आशाबद्ध तो जगाचा दास। पूज्य तो उदास सर्वजना ।।तु.गा.३४९८.००१ ।।
आहे तें अधीन आपुले हातीं। आणिकां ठेविती काय बोल ।।तु.गा.३४९८.००२ ।।
जाणतियां पाठीं लागला उपाध। नेणता तो सिद्ध भोजनासी ।।तु.गा.३४९८.००३ ।।
तुका म्हणे भय बांधलें गांठीं। चोर लागे पाठी दुम तया ।।तु.गा.३४९८.००४ ।।
केलें पाप जेणें दिलें अनुमोदन। दोघांसि पतन सारिखेंचि ।।तु.गा.३४९९.००१ ।।
विष नवनीता विष करी संगें। दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ।।तु.गा.३४९९.००२ ।।
देखिलें ओढाळ निघालिया शेता। टाळावें निमित्ता थैक म्हूण ।।तु.गा.३४९९.००३ ।।
तुका म्हणे जोडे केल्याविण कर्म। देखतां तो श्रम न मानितां ।।तु.गा.३४९९.००४ ।।
पतनासि नेति। तिचा खोटा स्नेह प्रीती ।।तु.गा.३५००.००१ ।।
विधिपुरतें कारण। बहू वारावें वचन ।।तु.गा.३५००.००२ ।।
सर्वस्वासी नाडी। ऐसी लाघवाची बेडी ।।तु.गा.३५००.००३ ।।
तुका म्हणे दुरीं। राखतां हे तेचि बरी ।।तु.गा.३५००.००४ ।।
मागील ते आटी येणें घडे सांग। सुतविलें अंग एका सूत्रें ।।तु.गा.३५०१.००१ ।।
पहिपाहुणेर ते सोहळ्यापुरतें। तेथूनि आरते उपचार ते ।।तु.गा.३५०१.००२ ।।
आवश्यक तेथें आगळा आदर। चाली थोडे फार संपादतें ।।तु.गा.३५०१.००३ ।।
तुका म्हणे ऋण फिटे एके घडी। अलभ्य ते जोडी हातां आल्या ।।तु.गा.३५०१.००४ ।।
संचितांवांचून। पंथ न चलवे कारण ।।तु.गा.३५०२.००१ ।।
कोरडी ते अवघी आटी। वायां जाय लाळ घोटी ।।तु.गा.३५०२.००२ ।।
धनवित्तें जोडे। देव ऐसें तों न घडे ।।तु.गा.३५०२.००३ ।।
तुका म्हणे आड। स्वहितासी बहु नाड ।।तु.गा.३५०२.००४ ।।
आडवा तो उभा। असे दाटोनिया प्रभा ।।तु.गा.३५०३.००१ ।।
देव नाहीं एकविध। एक भाव असे शुद्ध ।।तु.गा.३५०३.००२ ।।
भेदाभेद आटी। नाहीं फार कोठें तुटी ।।तु.गा.३५०३.००३ ।।

तुका म्हणे गोवा। उगवा वेव्हाराचा हेवा।।तु.गा.३५०३.००४।।
अवघ्या वाटा झाल्या क्षीण। कळी न घडे साधन। उचित विधी विधान। न कळे न घडे सर्वथा।।तु.गा.३५०४.००१।।
भक्तिपंथ बहु सोपा। पुण्य नागवे या पापा। येणें जाणें खेपा। येणेंचि एके खंडती।।तु.गा.३५०४.००२।।
उभारोनि बाहे। विठो पालवीत आहे। दासां मीचि साहे। मुखें बोले आपुल्या।।तु.गा.३५०४.००३।।
भाविक विश्वासी। पार उतरिलें त्यासी। तुका म्हणे नासी। कुतर्क्याचे कपाळीं।।तु.गा.३५०४.००४।।
करितां होय होय चित्तची नाहीं। घटापटा कांहीं करूं नये।।तु.गा.३५०५.००१।।
मग हालतचि नाहीं जवळून। करावा तो शीण शीणवितो।।तु.गा.३५०५.००२।।
साहतचि नाहीं कांहीं पाकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ।।तु.गा.३५०५.००३।।
तुका म्हणे तरी बोलावे झांकून। येथें खुणें खूण पुरतेंचि।।तु.गा.३५०५.००४।।
मथनें भोगे सार। तार्के घडे उपकार।।तु.गा.३५०६.००१।।
बरवी सायासाची जोडी। अनुभविया ठावी गोडी।।तु.गा.३५०६.००२।।
पाक आणि रूचि। जेथें तेथें ते कइंची।।तु.गा.३५०६.००३।।
वाढितो पंगती। तुका आवडी संगती।।तु.गा.३५०६.००४।।
जग तरि आम्हां देव। परि हे निंदितों स्वभाव।।तु.गा.३५०७.००१।।
येतो हिताचा कळवळा। पडती हातीं म्हणुनी काळा।।तु.गा.३५०७.००२।।
नाहीं कोणी सखा। आम्हां निपराध पारिखा।।तु.गा.३५०७.००३।।
उपक्रमें वदे। तुका वर्मासी तें भेदें।।तु.गा.३५०७.००४।।
ऐकतों दाट। आले एकाचे बोभाट।।तु.गा.३५०८.००१।।
नका विश्वासों यावरी। चोर देहाचे खाणोरी।।तु.गा.३५०८.००२।।
हेचि यांची जोडी। सदां बोडकी उघडीं।।तु.गा.३५०८.००३।।
तुका म्हणे न्यावें। ज्याचें त्यासी नाहीं ठावें।।तु.गा.३५०८.००४।।
चंदन तो चंदनपणें। सहज गुणें संपन्न।।तु.गा.३५०९.००१।।
वेधलिया धन्य जाती। भाग्यें होती सन्मुख।।तु.गा.३५०९.००२।।

परिसा अंगीं परिसपण। बाणोनि तें राहिलें।।तु.गा.३५०९.००३।।
तुका म्हणे कैंची खंती। सुजाती ते टाकणी।।तु.गा.३५०९.००४।।
सोसें वाढे दोष। झाला न पालटे कस।।तु.गा.३५१०.००१।।
ऐसें बरवें वचन। करिता तो नारायण।।तु.गा.३५१०.००२।।
असे प्रारब्ध नेमें। श्रमचि उरे श्रमें।।तु.गा.३५१०.००३।।
सुख देते शांती। तुका म्हणे धरितां चित्तीं।।तु.गा.३५१०.००४।।
वैरागरापाशीं रत्नाचिया खाणी। हेचि घ्यावी धणी फावेल तों।।तु.गा.३५११.००१।।
येथें नाहीं तर्कवितर्कांची चाड। होतसे निवाड खऱ्याखोट्या।।तु.गा.३५११.००२।।
उगाच सारावा वाढिला तो ठाव। वाढितिया भाव कळतसें।।तु.गा.३५११.००३।।
तुका म्हणे नव्हे टांचणीचें पाणी। येथें झरवणी जैशा तैसें।।तु.गा.३५११.००४।।
कौलें भरियेली पेंठ। निग्रहाचें खोटे तंट।।तु.गा.३५१२.००१।।
ऐसें माता जाणे वर्म। बाळा वाढवितां धर्म।।तु.गा.३५१२.००२।।
कामवितां लोहो कसे। तांतडीनें काम नासे।।तु.गा.३५१२.००३।।
तुका म्हणे खडे। देतां अक्षर तें जोडे।।तु.गा.३५१२.००४।।
नाहीं कोणी दिस जात वायांविण। साध्य नाहीं शीण लटिकाची।।तु.गा.३५१३.००१।।
एकाचिये माथां असावें निमित्त। नसो नाहीं हित कपाळीं तें ।।तु.गा.३५१३.००२।।
कांहीं एक तरी बोलायाचा जागा। नेदिती वाउगा उभा ठाकों।।तु.गा.३५१३.००३।।
तुका म्हणे वर्म कळों येतें कांहीं। ओळखी जे ठायीं होईल ते।।तु.गा.३५१३.००४।।
चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म।।तु.गा.३५१४.००१।।
तैसी नव्हे भोळी सेवा। एक भावचि कारण देवा।।तु.गा.३५१४.००२।।
तपें इंद्रियां आघात। क्षण एक वाताहात।।तु.गा.३५१४.००३।।
मंत्र चळे थोडा। तरि धडचि होय वेडा।।तु.गा.३५१४.००४।।
व्रत करितां सांग। तरी एक चुकतां भंग।।तु.गा.३५१४.००५।।

धर्मधर्मा सत्वचि कारण। नाहीं तरी केला सिण।।तु.गा.३५१४.००६ ।।
भूतदयेसि आघात। उंचनीच पाहे चित्त।।तु.गा.३५१४.००७ ।।
तुका म्हणे दुजें। विधिनिषेधाचें ओझें।।तु.गा.३५१४.००८ ।।
ज्याची खरी सेवा। त्याच्या भय काय जीवा।।तु.गा.३५१५.००१ ।।
करितां स्वामीसवे वाद। अधिक अधिक आनंद।।तु.गा.३५१५.००२ ।।
असावा तो धर्म। मग साहों जातें वर्म।।तु.गा.३५१५.००३ ।।
वदे वाग्देवी। तुका विठ्ठलीं गौरवी।।तु.गा.३५१५.००४ ।।
करावें गोमटें। बाळा माते तें उमटे।।तु.गा.३५१६.००१ ।।
आपुलिया जीवाहुनी। असे वाल्हें तें जननी।।तु.गा.३५१६.००२ ।।
वियोग तो तिस। त्याच्या उपचारें विष।।तु.गा.३५१६.००३ ।।
तुका म्हणे पाय। डोळा सुखावें त्या न्यायें।।तु.गा.३५१६.००४ ।।
अधिकार तैसा करूं उपदेश। साहे ओझें त्यास तेंचि द्यावें।।तु.गा.३५१७.००१ ।।
मुंगीवरी भार गजाचें पालाण। घालितां ते कोण कार्यसिद्धि।।तु.गा.३५१७.००२ ।।
तुका म्हणे फांसे वाघुरा कुऱ्हाडी। प्रसंगीं ते काढी पारधी तो।।तु.गा.३५१७.००३ ।।
आम्हांपाशीं सरे एक शुद्ध भाव। चतुराई जाणीव नलगे कळा।।तु.गा.३५१८.००१ ।।
सर्व जाण माझा स्वामी पांडुरंग। तया अंगसंग गोपाळासी।।तु.गा.३५१८.००२ ।।
तुका म्हणे कर्में धर्में नये हातां। तयावरी सत्ता भाविकांची।।तु.गा.३५१८.००३ ।।
नव्हों वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले। भलते द्यावे पाले भलत्यासी।।तु.गा.३५१९.००१ ।।
कुपथ्य करूनि विटंबावे रोगी। काय हे सलगी भीड त्यांची।।तु.गा.३५१९.००२ ।।
तुका म्हणे लासूं फांसू देऊं डाव। सुखाचा उपाव पुढें आहे।।तु.गा.३५१९.००३ ।।
ज्यानें ज्यानें जैसें घ्यावें। तैसें व्हावें कृपाळें।।तु.गा.३५२०.००१ ।।
सगुणनिर्गुणांचा ठाव। विटे पाव धरियेले।।तु.गा.३५२०.००२ ।।
अवघें साकरेचें अंग। नये व्यंग निवडितां।।तु.गा.३५२०.००३ ।।

तुका म्हणे जें जें करी । तें तें हरी भोगिता ।।तु.गा.३५२०.००४ ।।
अभिमानाची स्वामिनी शांति । महत्त्व येती सकळ ।।तु.गा.३५२१.००१ ।।
कळोनिही न कळे वर्म । तरि श्रम पावती ।।तु.गा.३५२१.००२ ।।
सर्व सत्ता धरितां धीर । वीर्या वीर आगळा ।।तु.गा.३५२१.००३ ।।
तुका म्हणे तिखट तिखें । मृद सखे आवडी ।।तु.गा.३५२१.००४ ।।
गंगा न देखे विटाळ । तेंचि रांजणीही जळ ।।तु.गा.३५२२.००१ ।।
अल्प महदा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ।।तु.गा.३५२२.००२ ।।
काय खंडिली भूमिका । वर्णा पायरी कां लोकां ।।तु.गा.३५२२.००३ ।।
तुका म्हणे आगीविण । बीज वेगळें तों भिन्न ।।तु.गा.३५२२.००४ ।।
गंधर्वनगरीं क्षण एक न राहावें । तैंचि करावें मूळक्षेत्र ।।तु.गा.३५२३.००१ ।।
खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ।।तु.गा.३५२३.००२ ।।
वंध्यापुत्राच्या लग्नाचा सोहळा । आपुलियां डोळां पाहा वेगीं ।।तु.गा.३५२३.००३ ।।
मृगजळीं पोहे घालूनि सज्ञाना । तापलिया जना तोषवावें ।।तु.गा.३५२३.००४ ।।
तुका म्हणे मिथ्या देहेंद्रियकर्म । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ।।तु.गा.३५२३.००५ ।।
पोटीं जन्मती रोग । तरि कां म्हणावें आप्तवर्ग ।।तु.गा.३५२४.००१ ।।
रानीं वसती औषधी । तरि कां म्हणाव्या निपराधी ।।तु.गा.३५२४.००२ ।।
तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्व आप्तें ।।तु.गा.३५२४.००३ ।।
ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ।।तु.गा.३५२५.००१ ।।
तरीच जोडिलें तें भोगे । कांहीं आघात नलगे ।।तु.गा.३५२५.००२ ।।
वाढवावी थोरी । मुखें म्हणे तुझे हरी ।।तु.गा.३५२५.००३ ।।
तुका म्हणे हे गोमटी । दासा न घालावी तुटी ।।तु.गा.३५२५.००४ ।।
नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ।।तु.गा.३५२६.००१ ।।
कांहीं न धरावी खंती । हित होइल धरा चित्तीं ।।तु.गा.३५२६.००२ ।।

खोटी ते अहंता। वाट टाकिली सांगतां।।तु.गा.३५२६.००३।।
ज्याचें तोचि जाणे। मी मापाडें तुका म्हणे।।तु.गा.३५२६.००४।।
जैसें तैसें राहे देवाचें हें देणें। यत्न करितां तेणें काय नव्हे।।तु.गा.३५२७.००१।।
दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा। अंतरींची व्यथा कळे त्यासी।।तु.गा.३५२७.००२।।
मागों नेणे परी माय जाणें वर्म। बाळा नेदी श्रम पावों कांहीं।।तु.गा.३५२७.००३।।
तुका म्हणे मज अनुभव अंगें। वचन वाउगें मानेना हें।।तु.गा.३५२७.००४।।
अवगुणांचे हातीं। आहे अवघीच फजीती।।तु.गा.३५२८.००१।।
नाहीं पात्रासवें चाड। प्रमाण तें फिकें गोड।।तु.गा.३५२८.००२।।
विष तांब्या वाटी। भरली लाऊं नये होटीं।।तु.गा.३५२८.००३।।
तुका म्हणे भाव। शुद्ध बरा सोंग वाव।।तु.गा.३५२८.००४।।
वळितें जें गाई। त्यासी फार लागे काई।।तु.गा.३५२९.००१।।
निवे भावाचे उत्तरीं। भलते एके धणी वरी।।तु.गा.३५२९.००२।।
न लगती प्रकार। कांहीं मानाचा आदर।।तु.गा.३५२९.००३।।
सांडी थोरपणा। तुका म्हणे सवें दीना।।तु.गा.३५२९.००४।।
भाव देवाचें उचित। भाव तोचि भगवंत।।तु.गा.३५३०.००१।।
धन्य धन्य शुद्ध जाती। संदेह कैंचा तेथें चित्तीं।।तु.गा.३५३०.००२।।
बहुत बराडी। देवावरी ते आवडी।।तु.गा.३५३०.००३।।
तुका म्हणे हे रोकडे। लाभ अधिकारी चोखडे।।तु.गा.३५३०.००४।।
नये जरी कांहीं। तरी भलतेंचि वाहीं।।तु.गा.३५३१.००१।।
म्हणविल्या दास। कोणी न धरी वेठीस।।तु.गा.३५३१.००२।।
समर्थांच्या नांवें। भलतैसें विकावें।।तु.गा.३५३१.००३।।
तुका म्हणे सत्ता। वरी असे त्या बहुतां।।तु.गा.३५३१.००४।।
पाठीं पोटीं देव। कैंचा हरिदासां भेव।।तु.गा.३५३२.००१।।

करा आनंदें कीर्तन। नका आशंकित मन।।तु.गा.३५३२.००२।।
एथें कोठें काळ। करील देवापाशीं बळ।।तु.गा.३५३२.००३।।
तुका म्हणे धनी। सपुरता काय वाणी।।तु.गा.३५३२.००४।।
लागलिया मुख स्तना। घाली पान्हा माउली।।तु.गा.३५३३.००१।।
उभयतां आवडी लाड। कोडें कोड पुरतसे।।तु.गा.३५३३.००२।।
मेळवितां अंगें अंग। प्रेमरंग वाढतो।।तु.गा.३५३३.००३।।
तुका म्हणे जड भारी। अवघें शिरीं जननीचे।।तु.गा.३५३३.००४।।
चिंतिलें तें मनिंचें जाणे। पुरवी खुणे अंतरींचें।।तु.गा.३५३४.००१।।
रात्री न कळें दिवस न कळे। अंगीं खेळे दैवत हें।।तु.गा.३५३४.००२।।
नवसियाचे पुरवी नवस। भोगी त्यासी भिन्न नाहीं।।तु.गा.३५३४.००३।।
तुका म्हणे समचि देणें। समचरणीं उभा असे।।तु.गा.३५३४.००४।।
गंगेचिया अंतेविण काय चाड। आपुलें तें कोड तृषेपाशीं।।तु.गा.३५३५.००१।।
विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर। घालूं निरंतर हृदयपुटीं।।तु.गा.३५३५.००२।।
कारण तें असे नवनीतापाशीं। गबाळ तें सोसी येर कोण।।तु.गा.३५३५.००३।।
बाळाचे सोईतें घांस घाली माता। अट्टाहास चिंता नाहीं तया।।तु.गा.३५३५.००४।।
गाऊं नाचूं करूं आनंदसोहळा। भावचि वेगळा नाहीं आतां।।तु.गा.३५३५.००५।।
तुका म्हणे अवघें झालें एकमय। परलोकीची काय चाड आतां।।तु.गा.३५३५.००६।।
गावे म्हणउनि गीत। धरूनि राहे तैसें चित्त।।तु.गा.३५३६.००१।।
हेंचि थोर अवघड आहे। अन्न देखोनि भूक राहे।।तु.गा.३५३६.००२।।
ऐकावी म्हूण कथा। राहे तैसें धरूनि चित्ता।।तु.गा.३५३६.००३।।
तुका म्हणे धणी। नव्हे जेविल्यावांचूनि।।तु.गा.३५३६.००४।।
चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया। ऐकिलिया वायां वारता त्या।।तु.गा.३५३७.००१।।
ऐका जी वोजे पडतसें पायां। भावाचि ते जाया वाट नव्हे।।तु.गा.३५३७.००२।।

व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव। सांगतां तो भाव येत नाहीं।।तु.गा.३५३७.००३।।
तुका म्हणे येथें पाहिजे आरालें। बिंबीं निवळलें तरि भासे।।तु.गा.३५३७.००४।।
जन देव तरि पायाचि पडावें। त्याचिया स्वभावें चाड नाहीं।।तु.गा.३५३८.००१।।
अग्नीचें सौजन्य शीतनिवारण। पालवीं बांधोन नेतां नये।।तु.गा.३५३८.००२।।
तुका म्हणे विंचू सर्प नारायण। वंदावें दुरोन शिवों नये।।तु.गा.३५३८.००३।।
देव होसी जरी आणीकांतें करिसी। संदेह येविशीं करणें न लगे।।तु.गा.३५३९.००१।।
दुष्ट होसी तरी आणिकांतें करिसी। संदेह येविशीं करणें न लगे।।तु.गा.३५३९.००२।।
तुका म्हणे जें दर्पणीं बिंबलें। तें तया बाणलें निश्चयेसीं।।तु.गा.३५३९.००३।।
आर्तभूतांप्रति। उत्तम योजाव्या त्या शक्ति।।तु.गा.३५४०.००१।।
फळ आणि समाधान। तेथें उत्तम कारण।।तु.गा.३५४०.००२।।
अल्पें तो संतोषी। स्थळीं सांपडे उद्देशीं।।तु.गा.३५४०.००३।।
सहज संगम। तुका म्हणे तो उत्तम।।तु.गा.३५४०.००४।।
कोठें नाहीं अधिकार। गेले नर वायां ते।।तु.गा.३५४१.००१।।
ऐका हें सोपें वर्म। नलगे श्रम चिंतना।।तु.गा.३५४१.००२।।
मृत्याचिये अंगीं छायें। उपायचि खुंटता।।तु.गा.३५४१.००३।।
तुका म्हणे अवघे जन। येथें मन असों द्या।।तु.गा.३५४१.००४।।
गोड नांवें क्षीर। परी साकरेचा धीर।।तु.गा.३५४२.००१।।
तैसें जाणा ब्रह्मज्ञान। बापुडें तें भक्तीविण।।तु.गा.३५४२.००२।।
रूची नेदी अन्न। ज्यांत नसतां लवण।।तु.गा.३५४२.००३।।
अंधळ्याचे श्रम। शिकविल्याचेचि नाम।।तु.गा.३५४२.००४।।
तुका म्हणे तारा। नांव तंबुऱ्याच्या सारा।।तु.गा.३५४२.००५।।
उगविल्या गुंती। ऐशा मागें नेणों किती।।तु.गा.३५४३.००१।।
ख्याती केली अजामेळें। होतें निघालें दिवाळें।।तु.गा.३५४३.००२।।

मोकलिला प्रायश्चित्तीं। कोणी न धरिती हातीं।।तु.गा.३५४३.००३।।
तुका म्हणे मुक्त वाट। वैकुंठीची घडघडाट।।तु.गा.३५४३.००४।।
सुखें न मनी अवगुण। दुःख भोगी त्याचें कोण।।तु.गा.३५४४.००१।।
हें कां ठायींचें न कळे। राती करा झांकुनी डोळे।।तु.गा.३५४४.००२।।
चालोनियां आड वाटे। पायीं मोडविले कांटे ।।तु.गा.३५४४.००३।।
तुका म्हणे कोणा। बोल ठेवितो शहाणा।।तु.गा.३५४४.००४।।
उपेक्षिला येणें कोणी शरणागत। ऐसी नाहीं मात आईकिली।।तु.गा.३५४५.००१।।
आतां काय ब्रीद सांडील आपुलें। ठायींचें धरिलें जाणोनियां।।तु.गा.३५४५.००२।।
माझ्या दोषासाठीं होइल पाठमोरा। ऐसा कोण पुरा भोग बळी।।तु.गा.३५४५.००३।।
तुका म्हणे रूप आमुच्या कैवारें। धरिलें गोजिरें चतुर्भुज।।तु.गा.३५४५.००४।।
तडामोडी करा। परिउत्तम तें भरा।।तु.गा.३५४६.००१।।
जेणें खंडे एके खेपे। जाय तेथें लाभें वोपे।।तु.गा.३५४६.००२।।
दाविल्या सारिखें। मागें नसावे पारिखें।।तु.गा.३५४६.००३।।
मागें पुढें ऋण। तुका म्हणे फिटे हीण।।तु.गा.३५४६.००४।।
जीवें व्हावें साटी। पडे संवसारें तुटी।।तु.गा.३५४७.००१।।
ऐशीं बोलिलों वचनें। सवें घेऊनि नारायण।।तु.गा.३५४७.००२।।
येणें नाहीं जाणें। केलें कोणा न मागणें।।तु.गा.३५४७.००३।।
नाहीं जन्मा आलों। करील ऐसें नेदी बोलों।।तु.गा.३५४७.००४।।
ठाव पुसी शेणें। तुका म्हणे खुंटों येणें।।तु.गा.३५४७.००५।।
राहिलों निराळा। पाहों कवतुक डोळां ।।तु.गा.३५४८.००१।।
करूं जगाचा विनोद। डोळां पाहोनियां छंद।।तु.गा.३५४८.००२।।
भुललिया संसारें। आलें डोळ्यासीं माजिरें।।तु.गा.३५४८.००३।।
तुका म्हणे माथा। कोणी नुचली सर्वथा।।तु.गा.३५४८.००४।।

क्षोभ आणि कृपा मातेचि समान। विभाग जतन करूनि ठेवी ।।तु.गा.३५४९.००१ ।।
क्षणभंगुर ते उपजली चिंता। खरी अखंडिता आवडीची ।।तु.गा.३५४९.००२ ।।
शिकवूं जाणे ते गोमटियासाठीं। लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ।।तु.गा.३५४९.००३ ।।
अवघेंचि मिथ्या समया आरतें। देतां तें उचितें काय जाणे ।।तु.गा.३५४९.००४ ।।
न करी अव्हेर गांजूं नेदी कोणा। भेडसावी तान्हा हाऊ आला ।।तु.गा.३५४९.००५ ।।
तुका म्हणे करी जिवासी जतन। दचकुनि मन जवळी आणी ।।तु.गा.३५४९.००६ ।।
प्रेम नये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे ।।तु.गा.३५५०.००१ ।।
कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी। दुधा नाहीं भेटी अंगसंगें ।।तु.गा.३५५०.००२ ।।
पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा। उपजत लपा म्हणऊनि ।।तु.गा.३५५०.००३ ।।
बोलों नेणें परी जाणे गोड क्षार। अंतरीं विचार त्यासी ठावा ।।तु.गा.३५५०.००४ ।।
तुका म्हणे बरें विचारावें मनीं। आणिक भल्यांनीं पुसों नये ।।तु.गा.३५५०.००५ ।।
काळाच सारिखीं वाहाती नक्षत्रें। करितां दुसरें फळ नाहीं ।।तु.गा.३५५१.००१ ।।
ऐसें करत्यानें ठेविलें करून। भरिलें भरून माप नेमें ।।तु.गा.३५५१.००२ ।।
शीतउष्णकाळीं मेघा वरुषाव। वरुषतां वाव होय शीण ।।तु.गा.३५५१.००३ ।।
तुका म्हणे विष अमृताचे किडे। पालट न घडे जिणें तया ।।तु.गा.३५५१.००४ ।।
कोरडिया ऐशा काय सारूं गोष्टी। करूं उठाउठीं हित आधीं ।।तु.गा.३५५२.००१ ।।
खोळंबला राहे आपुला मारग। पहावी ते मग तुटी कोठें ।।तु.गा.३५५२.००२ ।।
लौकिकाचा आड येईल पसारा। मग येरझारा दुःख देती ।।तु.गा.३५५२.००३ ।।
तुका म्हणे डांकलागे अळंकारें। मग नव्हे खरे पुटेविण ।।तु.गा.३५५२.००४ ।।
देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा। लाजे नका थारा देऊं कोणी ।।तु.गा.३५५३.००१ ।।
मोडिले रांडेनें सुपंथ मारग। चालविलें जग यमपंथें ।।तु.गा.३५५३.००२ ।।
परिचारी केली आपुलीच रूढी। पोटींची ती कुडी ठावी नाहीं ।।तु.गा.३५५३.००३ ।।
तुका म्हणे आणा राउळा धरून। फजित करून सोडूं मग ।।तु.गा.३५५३.००४ ।।

लागपाठ केला। आतां वांटा नीट त्याला ।।तु.गा.३५५४.००१ ।।
करा जोडीचा हव्यास। आलें दुरील घरास ।।तु.गा.३५५४.००२ ।।
फोडिलीं भांडारें। मोहोरलीं एकसरें ।।तु.गा.३५५४.००३ ।।
अवघियांपुरतें। तुका म्हणे घ्यावें हातें ।।तु.गा.३५५४.००४ ।।
आग्रहा नांवें पाप। योगीं सारावें संकल्प ।।तु.गा.३५५५.००१ ।।
सहज ऐसें भांडवल। असोनि कां सारा बोल ।।तु.गा.३५५५.००२ ।।
तैं न भेटें तें काय। मना अंगींचे उपाय ।।तु.गा.३५५५.००३ ।।
तुका म्हणे धरीं सोय। वासनेची फोडा डोय ।।तु.गा.३५५५.००४ ।।
ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला। कुसंगें नाडला साधु तैसा ।।तु.गा.३५५६.००१ ।।
ओढाळाच्या संगें सात्विक नासलीं। क्षण एक नाडलीं समागमें ।।तु.गा.३५५६.००२ ।।
डांकाचें संगती सोनें हीन झालें। मोल तें तुटलें लक्ष कोडी ।।तु.गा.३५५६.००३ ।।
विषानें पक्वानें गोड कडू झाली। कुसंगानें केली तैसी परी ।।तु.गा.३५५६.००४ ।।
भावें तुका म्हणे सत्संग हा बरा। कुसंग हा फेरा चौऱ्याशीचा ।।तु.गा.३५५६.००५ ।।
देहबुद्धि वसे जयाचिये अंगीं। पूज्यता ते जगीं सुख मानीं ।।तु.गा.३५५७.००१ ।।
थोर असे दगा झाला त्यासी हाटीं। सोडोनियां गांठी चोरीं नेली ।।तु.गा.३५५७.००२ ।।
गांठींचें जाऊनि नव्हे तो मोकळा। बांधविला गळा दंभलोभें ।।तु.गा.३५५७.००३ ।।
पुढिल्या उदिमा झालेंसें खंडण। दिसे नागवण पडे गांठी ।।तु.गा.३५५७.००४ ।।
तुका म्हणे ऐसे बोलतील संत। जाणूनियां घात कोण करी ।।तु.गा.३५५७.००५ ।।
फटकाळ तो देव्हारा फटकाळ अंगारा। फटकाळ विचारा चाळविलें ।।तु.गा.३५५८.००१ ।।
फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त। करवितो घात आणिका जीवा ।।तु.गा.३५५८.००२ ।।
तुका म्हणे अवघें फटकाळ हें जिणें। अनुभवी ये खुणें जाणतील ।।तु.गा.३५५८.००३ ।।
निवडे जेवण शेवटींच्या घांसें। होय त्याच्या ऐसें सकळही ।।तु.गा.३५५९.००१ ।।
न पाहिजे झाला बुद्धिचा पालट। केली खटपट जाय वायां ।।तु.गा.३५५९.००२ ।।

संपादिलें व्हावें धरिलें तें सोंग। विटंबना व्यंग पडिलिया।।तु.गा.३५५९.००३।।
तुका म्हणे वर्म नेणतां जो रांधी। पाववी ते बुद्धि अवकळा।।तु.गा.३५५९.००४।।
यासी कोणी म्हणे निंदेचीं उत्तरें। नागवला खरें तोचि एक ।।तु.गा.३५६०.००१।।
आड वाट जातां लावी नीट सोई। धर्मनीती तेही ऐसी आहे।।तु.गा.३५६०.००२।।
नाइकतां सुखें करावें ताडण। पाप नाहीं पुण्य असे फार।।तु.गा.३५६०.००३।।
जन्म व्याधि फार चुकतील दु:खें। खंडावा हा सुखें मान त्याचा।।तु.गा.३५६०.००४।।
तुका म्हणे निंब दिधल्यावांचून। अंतरींचा शीण कैसा जाय।।तु.गा.३५६०.००५।।
हित नाहीं ठावें जननीजनका। दाविला लौकिकाचार तिहीं।।तु.गा.३५६१.००१।।
अंधळ्याचें काठी लागले अंधळे। घात एके वेळे पुढें मागें।।तु.गा.३५६१.००२।।
न धरावी चाली करावा विचार। वरील आहार गळीं लावी।।तु.गा.३५६१.००३।।
तुका म्हणे केला निवाड रोकडा। राऊत हा घोडा हातोहातीं।।तु.गा.३५६१.००४।।
कैसा होतो कृपावंत। बहु संत सांगती।।तु.गा.३५६२.००१।।
पुसणें नाहीं याती कुळ। लागों वेळ नेदावी।।तु.गा.३५६२.००२।।
ऐसी काय जाणों किती। उतरती उतरलीं।।तु.गा.३५६२.००३।।
दावी वैकुंठींच्या वाटा। पाहतां मोठा संपन्न।।तु.गा.३५६२.००४।।
अभिमान तो नाहीं अंगीं। भक्तालागीं न बैसे।।तु.गा.३५६२.००५।।
आलें घ्यावें भलत्या काळें। विठ्ठल बळें आगळा।।तु.गा.३५६२.००६।।
तुका म्हणे आळस निद्रा। नाहीं थारा ते ठायीं।।तु.गा.३५६२.००७।।
मायबाप सर्वें नये धनवित्त। करावें संचित भोगावें तें।।तु.गा.३५६३.००१।।
म्हणऊनि लाभ काय तो विचारीं। नको चालीवरी चित्त ठेवूं।।तु.गा.३५६३.००२।।
आयुष्य शेवटीं सांडूनि जाणार। नव्हेचि साचार शरीर हें।।तु.गा.३५६३.००३।।
तुका म्हणे काळें लावियेलें माप। जमा धरी पापपुण्याचीही।।तु.गा.३५६३.००४।।
आतां हेंचि सार हेंचि सार। मूळबीज रे आइका।।तु.गा.३५६४.००१।।

आवडीनें आवडी उरे। जें ज्या झुरे तें त्यासी ।।तु.गा.३५६४.००२ ।।
प्रेमाचिया सूत्रदोरी। नाहीं उरी उरवी ।।तु.गा.३५६४.००३ ।।
तुका म्हणे चिंतन बरें। आहे खरें खऱ्यापें ।।तु.गा.३५६४.००४ ।।
मुख्य आधीं विषयत्याग। विधि भाग पाळणें ।।तु.गा.३५६५.००१ ।।
मन पावें समाधान। हेंचि दान देवाचें ।।तु.गा.३५६५.००२ ।।
उदासीन वृत्ती देहीं। चाड नाहीं पाळणें ।।तु.गा.३५६५.००३ ।।
तुका म्हणे नाहीं भय। सम सोय विषमाची ।।तु.गा.३५६५.००४ ।।
काय करूं सांगतांही न कळे तें वर्म। उपस्थित भ्रम उपजवितो ।।तु.गा.३५६६.००१ ।।
मन आधीं ज्याचें आलें होईल हातां। तयावरी सत्ता केली चाले ।।तु.गा.३५६६.००२ ।।
अभुकेचे अंगीं चवी ना सवाद। मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ।।तु.गा.३५६६.००३ ।।
तुका म्हणे आप राखावें आपणा। संकोचोचि कोणा नये आतां ।।तु.गा.३५६६.००४ ।।
उभा ऐल थडी। तेणें घालूं नये उडी ।।तु.गा.३५६७.००१ ।।
पुढें गेल्याचे उपाय। करावे ते केले काय ।।तु.गा.३५६७.००२ ।।
दिसतें आहारीं। नये जाऊं ऐशावरी ।।तु.गा.३५६७.००३ ।।
आळसाची धाडी। तुका म्हणे बहु नाडी ।।तु.गा.३५६७.००४ ।।
शिजल्यावरी जाळ। वायां जायाचें तें मूळ ।।तु.गा.३५६८.००१ ।।
ऐसा वारावा तो श्रम। अतिशयीं नाहीं काम ।।तु.गा.३५६८.००२ ।।
सांभाळावें वर्म। उचिताच्या काळें धर्म ।।तु.गा.३५६८.००३ ।।
तुका म्हणे कळे। ऐसें कारणाचे वेळे ।।तु.गा.३५६८.००४ ।।
आवडीची सलगी पूजा। विषम दुजा भाव तो ।।तु.गा.३५६९.००१ ।।
ऐसीं उफराटीं वर्में। कळों भ्रमें न येती ।।तु.गा.३५६९.००२ ।।
नलगे समाधाना मोल। रूचती मोल प्रीतीचे ।।तु.गा.३५६९.००३ ।।
तुका म्हणे एका जीवें। सूत्र व्हावें गुंतलें ।।तु.गा.३५६९.००४ ।।

भूक पोटापुरती। तृष्णा भरवी वाखती। करवी फजिती। हांवें भार वाढला।।तु.गा.३५७०.००१।।
कुळिकेसी लांस फांस। डोई दाढी बोडवी दोष। अविहित नाश। करवी वचन चुकतां।।तु.गा.३५७०.००२।।
विधिसेवनें विहितें। कार्य कारणापुरतें। न बाटे जो चित्तें। अधर्माचा तो त्यागी।।तु.गा.३५७०.००३।।
आज्ञा पाळणें ते सेवा। भय धरोनियां जीवा। तुका म्हणे ठेवा। ठेविला तो जतन।।तु.गा.३५७०.००४।।
भांडणचि झालें। मग जीवाचें काय आलें।।तु.गा.३५७१.००१।।
येऊं नेदावी पुढती। आड भयाची ते जाती।।तु.गा.३५७१.००२।।
करितां सरोबरी। कांहीं न ठेवावी उरी।।तु.गा.३५७१.००३।।
तुका म्हणे शूर। व्हावें धुरेसींच धूर।।तु.गा.३५७१.००४।।
पाडावी ते बरी। गांठी धुरेसवें खरी।।तु.गा.३५७२.००१।।
नये मरों लंडीपणें। काय बापुडें तें जिणें।।तु.गा.३५७२.००२।।
लुटावें भांडार। तरी जया नाहीं पार।।तु.गा.३५७२.००३।।
तुका म्हणे नांवें। कीर्ति आगळीनें ज्यावें।।तु.गा.३५७२.००४।।
अहंकार तो नासा भेद। जगीं निंद्य ओवळा।।तु.गा.३५७३.००१।।
नातळे तो धन्य यासी। झाला वंशीं दीपक ।।तु.गा.३५७३.००२।।
करवितो आत्महत्या। नेदी आप्ता आतळों।।तु.गा.३५७३.००३।।
तुका म्हणे गुरुगुरी। माथां थोरी धरोनि।।तु.गा.३५७३.००४।।
तीर्थाचिये असे पंथें तो निदैव। पाविजेतो ठाव अंतराय।।तु.गा.३५७४.००१।।
म्हणऊनि भलें निश्चळचि स्थळीं। मनाचिये मुळीं बैसोनियां।।तु.गा.३५७४.००२।।
संकल्पारूढ तें पराधीन जिणें। कार्यचि कारणें वाढतसे।।तु.गा.३५७४.००३।।
तुका म्हणे कामा नाहीं एक मुख। जिरवितां सुख होतें पोटीं।।तु.गा.३५७४.००४।।
आपणा लागे काम वाण्याघरीं गूळ। त्याचें यातिकुळ काय कीजे।।तु.गा.३५७५.००१।।
उकरड्यावरी वाढली तुळसी। टाकावी ते कैसी ठायागुणें।।तु.गा.३५७५.००२।।
गाईचा जो भक्ष अमंगळ खाय। तिचें दूध काय सेवूं नये।।तु.गा.३५७५.००३।।

तुका म्हणे काय सालपटासी काज। फणसांतील बीज काढुनि घ्यावें।।तु.गा.३५७५.००४।।
आम्हां देणें धरा सांगतों तें कानीं। चिंता पाय मनीं विठोबाचे।।तु.गा.३५७६.००१।।
तेणें माझें चित्ता होय समाधान। विलास मिष्टान्न नलगे सोनें।।तु.गा.३५७६.००२।।
व्रत एकादशी द्वारीं वृंदावन। कंठीं ल्या रे लेणें तुळसीमाळा।।तु.गा.३५७६.००३।।
तुका म्हणे त्याचे घरींची उष्टावळी। मज ते दिवाळी दसरा सण।।तु.गा.३५७६.००४।।
स्तुती अथवा निंदा करावी देवाची। अधम तो वेंचि व्यर्थ वाणी।।तु.गा.३५७७.००१।।
आइकोनि होती बहिर हे बोल। वेंचूनि ते मोल नरका जाती।।तु.गा.३५७७.००२।।
इहलोकीं थुंका उडे तोंडावरी। करणें अघोरीं वास लागे।।तु.गा.३५७७.००३।।
तुका म्हणे माप वाचेऐसें निकें । भरलें नरकें निंदेसाठीं।।तु.गा.३५७७.००४।।
मोक्ष देवापाशीं नाहीं। लटिक्या घाईं विव्हळत।।तु.गा.३५७८.००१।।
काय खर न धरी शुद्धी। गेली बुद्धी भ्रमलें।।तु.गा.३५७८.००२।।
अहंकारा उरलें काई। पांचांठायीं हें वाटे।।तु.गा.३५७८.००३।।
तुका म्हणे कुंथें भारें। लटिकें खरें मानुनियां।।तु.गा.३५७८.००४।।
नका दंतकथा येथें सांगों कोणी। कोरडें ते मानी बोल कोण।।तु.गा.३५७९.००१।।
अनुभव येथें पाहिजे साचार। न चलती चार आम्हांपुढें।।तु.गा.३५७९.००२।।
वरी कोण मानी रसाळ बोलणें। नाहीं झाली मनें वोळखी तो ।।तु.गा.३५७९.००३।।
निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ।।तु.गा.३५७९.००४।।
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचे। येर गाबाळाचें काय काम।।तु.गा.३५७९.००५।।
पिकवावें धन। ज्याची आस करी जन।।तु.गा.३५८०.००१।।
पुरोनि उरे खातां देतां। नव्हे खंडन मवितां।।तु.गा.३५८०.००२।।
खोलीं पडे ओलीं बीज। तरीच हातीं लागे निज।।तु.गा.३५८०.००३।।
तुका म्हणे धणी। विठ्ठल अक्षरें या तिन्ही।।तु.गा.३५८०.००४।।
हितावरी यावें। कोणी बोलिलों या भावें।।तु.गा.३५८१.००१।।

नव्हे विनोदउत्तर। केले रंजवाया चार।।तु.गा.३५८१.००२।।
केली अटाअटी। अक्षरांची देवासाठीं।।तु.गा.३५८१.००३।।
तुका म्हणे खिजों। नका जागा येथें निजों।।तु.गा.३५८१.००४।।
मांस चर्म हाड। देवा अवघींच गोड।।तु.गा.३५८२.००१।।
जे जे हरिरंगीं रंगलें। कांहीं न वचे वायां गेले।।तु.गा.३५८२.००२।।
वेद खाय शंखासुर। त्याचें वागवी कलेवर।।तु.गा.३५८२.००३।।
तुका म्हणे ऐसा। बराडी या भक्तिरसा।।तु.गा.३५८२.००४।।
अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें। हिंवें तोचि तापे जाऊनियां।।तु.गा.३५८३.००१।।
उदक म्हणे काय या हो मज प्यावें। तृषित तो धावें सेवावयां।।तु.गा.३५८३.००२।।
काय वस्त्र म्हणे या हो मज नेसा। आपुले स्वइच्छा जग वेढी।।तु.गा.३५८३.००३।।
तुकया स्वामी म्हणे काय मज स्मरा। आपुल्या उद्धारा लागूनियां।।तु.गा.३५८३.००४।।
घ्या रे लुटी प्रेमसुख। फेडा आजि धणी। चुकला तो मुकला। झाली वेरझारें हाणी।।तु.गा.३५८४.००१।।
घाला घातला वैकुंठीं। करूनियां जीवें साटी। पुरविली पाठी। वैष्णवीं काळाची।।तु.गा.३५८४.००२।।
अवघे आणिलें अंबर। विठोसहित तेथें धूर। भेदूनि जिव्हार। नामबाणीं धरियेला।।तु.गा.३५८४.००३।।
संचित प्रारब्ध क्रियमाण। अवघीं झालीं गहन। केलीं पापपुण्यें। देशधडी बापुडीं।।तु.गा.३५८४.००४।।
आनंदें गर्जती निर्भर। घोष करिती निरंतर। कांपती असुर। वीर कवणा नागवती।।तु.गा.३५८४.००५।।
जें दुर्लभ ब्रह्मादिकां। आजि सांपडलें फुका। घ्या रे म्हणे तुका। सावचित्त होऊनी।।तु.गा.३५८४.००६।।
मढें झांकुनियां करिती पेरणी। कुणबियाची वाणी लवलाहें।।तु.गा.३५८५.००१।।
तयापरी करीं स्वहित आपुलें। जयासी फावलें नरदेह।।तु.गा.३५८५.००२।।
ओटीच्या परिस मुठीचें तें वाढें । यापरि कैवाडें स्वहिताचें।।तु.गा.३५८५.००३।।
नाहीं काळसत्ता आपुलिये हातीं। जाणते हे गुंती उगविती।।तु.गा.३५८५.००४।।
तुका म्हणे पाहे आपुली सूचना । करि तो शाहाणा मृत्युलोकीं ।।तु.गा.३५८५.००५।।
दीप न देखे अंधारा। आतां हेंचि जतन करा।।तु.गा.३५८६.००१।।

नारायण नारायण। गांठी धन बळकट।।तु.गा.३५८६.००२।।
चिंतामणीपाशीं चिंता। तत्त्वता ही न येल।।तु.गा.३५८६.००३।।
तुका म्हणे उभयलोकीं। हेंचि निकी सामग्री।।तु.गा.३५८६.००४।।
काळ सारावा चिंतनें। एकांतवासी गंगास्नानें। देवाचे पूजनें। प्रदक्षणा तुळशीच्या।।तु.गा.३५८७.००१।।
युक्त आहार विहार। नेम इंद्रियांसी सार। नसावी बासर। निद्रा बहु भाषण।।तु.गा.३५८७.००२।।
परमार्थ महाधन। जोडी देवाचे चरण। व्हावया जतन। हे उपाय लाभाचे।।तु.गा.३५८७.००३।।
देह समर्पिजे देवा। भार कांहींच न घ्यावा। होईल आघवा। तुका म्हणे आनंद।।तु.गा.३५८७.००४।।
प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही। एकही निदानीं नव्हे त्यासी।।तु.गा.३५८८.००१।।
दोहीं पेंवांवरी ठेऊं जातां हात। होय अपघात शरीराचा ।।तु.गा.३५८८.००२।।
तुका म्हणे तया दोहींकडे धक्का। शेवटीं तो नरकामाजी पडे।।तु.गा.३५८८.००३।।
लटिका तो प्रपंच एक हरिनाम साच। हरिविण आहाच सर्व इंद्रियें।।तु.गा.३५८९.००१।।
लटिकें तें मौन भ्रमाचें स्वप्न। हरिविण ध्यान नश्वर आहे।।तु.गा.३५८९.००२।।
लटिकिया वित्पत्ति हरिविण करिती। हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा।।तु.गा.३५८९.००३।।
तुका म्हणे हरि हे धरिसी निर्धारी। तरी तूं झडकरी जासी वैकुंठासी।।तु.गा.३५८९.००४।।
ब्रह्मचारी धर्म घोकावीं अक्षरें। आश्रमीं विचार षट्कर्मी।।तु.गा.३५९०.००१।।
वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग। संन्यास तो त्याग संकल्पाचा।।तु.गा.३५९०.००२।।
परमहंस तरी जाणे सहज वर्म। तेथें याति धर्म कुळ नाहीं।।तु.गा.३५९०.००३।।
बोले वर्म जो चाले याविरहित। तो जाणा पतित श्रुति बोले।।तु.गा.३५९०.००४।।
तुका म्हणे कांहीं नाहीं नेमाविण। मोकळा तो शीण दुःख पावे।।तु.गा.३५९०.००५।।
द्रव्याचिया कोटी। नये गांडीची लंगोटी।।तु.गा.३५९१.००१।।
अंतीं बोळवणेसाठीं। पांडुरंग धरा कंठीं।।तु.गा.३५९१.००२।।
लोभाचीं लोभिकें । यांचें सन्निधान फिकें ।।तु.गा.३५९१.००३।।
तुका म्हणे हितें। जग नहो पडों रितें।।तु.गा.३५९१.००४।।

भवसिंधूचें काय कोडें। दावी वाट चाले पुढें।।तु.गा.३५९२.००१ ।।
तारूं भला पांडुरंग। पाय भिजों नेदी अंग।।तु.गा.३५९२.००२ ।।
मागें उतरिले बहुत। पैल तिरीं साधुसंत।।तु.गा.३५९२.००३ ।।
तुका म्हणे लागवेगें। जाऊं तयाचिया मागें।।तु.गा.३५९२.००४ ।।
जैसें चित्त जयावरि। तैसें जवळी तें दुरी।।तु.गा.३५९३.००१ ।।
नलगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर । असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी।।तु.गा.३५९३.००२ ।।
अवघें जाणे सूत्रधारी। कोण नाचे कोणेपरी।।तु.गा.३५९३.००३ ।।
तुका म्हणे बुद्धि। ज्याची तया तेच सिद्धि ।।तु.गा.३५९३.००४ ।।
असत्य वचन होतां सर्व जोडी। जरी लग्नघडी परउपकार।।तु.गा.३५९४.००१ ।।
जाईल पतना यासी संदेह नाहीं। साक्ष आहे कांहीं सांगतों ते।।तु.गा.३५९४.००२ ।।
वदविलें मुखें नारायणें धर्मा। अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला।।तु.गा.३५९४.००३ ।।
तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें। अंतरींचें कुडें देईल दुःख ।।तु.गा.३५९४.००४ ।।
परस्त्रीतें म्हणतां माता। चित्त लाजवितें चित्ता।।तु.गा.३५९५.००१ ।।
काय बोलोनियां तोंडें। मनामाजी कानकोंडें।।तु.गा.३५९५.००२ ।।
धर्मधारिष्ट गोष्टी सांगे। उष्ट्या हातें नुडवी काग।।तु.गा.३५९५.००३ ।।
जें जें कर्म वसें अंगीं। तें तें आठवें प्रसंगीं।।तु.गा.३५९५.००४ ।।
बोले तैसा चाले। तुका म्हणे तो अमोल।।तु.गा.३५९५.००५ ।।
देवासाठीं जाणा तयासीच आटी। असेल ज्या गांठीं पुण्यराशी।।तु.गा.३५९६.००१ ।।
निर्बळा पाठवी बळें वाराणसी। मेला आला त्यासी अर्ध पुण्य।।तु.गा.३५९६.००२ ।।
कथे निद्राभंग करावा भोजनीं। तया सुखा धणी पार नाहीं।।तु.गा.३५९६.००३ ।।
यागीं ऋण घ्यावें द्यावें सुख लाही। बुडतां चिंता नाहीं उभयतां।।तु.गा.३५९६.००४ ।।
तुका म्हणे वर्म जाणोनि करावें। एक न घालावें एकावरी।।तु.गा.३५९६.००५ ।।
तप तीर्थ दान व्रत आचरण। गातां हरिगुण वारूं नये।।तु.गा.३५९७.००१ ।।

कोटिकुळें त्याची वाटुली पहाती। त्या तया घडती ब्रह्महत्या।।तु.गा.३५९७.००२।।
आपुलिया पापें न सुटे सायासें। कोणा काळें ऐसें निस्तरेल।।तु.गा.३५९७.००३।।
व्हावें साह्य तया न घालावें भय। फुकासाठीं पाहें लाभ घात।।तु.गा.३५९७.००४।।
तुका म्हणे हित माना या वचना। सुख दुःख जाणा साधे फुका।।तु.गा.३५९७.००५।।
कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद। आनंदें आनंद वाढवावा।।तु.गा.३५९८.००१।।
बहुतांच्या भाग्यें लागलें जहाज। येथें आतां काज लवलाहो।।तु.गा.३५९८.००२।।
अलभ्य तें आलें दारावरी फुका। येथें आतां चुका न पाहिजे।।तु.गा.३५९८.००३।।
तुका म्हणे जिव्हा श्रवणाच्या द्वारें। माप भरा बरें शिगेवरी।।तु.गा.३५९८.००४।।
चिंतनासी नलगे वेळ। सर्वकाळ करावें।।तु.गा.३५९९.००१।।
सदा वाचे नारायण। तें वदन मंगळ।।तु.गा.३५९९.००२।।
पढिये सर्वोत्तमा भाव। येर वाव पसारा।।तु.गा.३५९९.००३।।
ऐसें उपदेशी तुका। अवघ्या लोकां सकळां।।तु.गा.३५९९.००४।।
निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म। निर्धार हें वर्म चुकों नये।।तु.गा.३६००.००१।।
निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास। पाहों नये वास आणिकाची।।तु.गा.३६००.००२।।
तुका म्हणे ऐसा कोण उपेक्षिला। नाहीं ऐकिला ऐसा कोणीं।।तु.गा.३६००.००३।।
नको सांडूं अन्न नको सेवूं वन। चिंतीं नारायण सर्व भोगीं।।तु.गा.३६०१.००१।।
मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण। भावना त्या भिन्न मुंडाविया।।तु.गा.३६०१.००२।।
नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं। लावुनि सरे अंगीं देवाचिया।।तु.गा.३६०१.००३।।
तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां। उपदेश वेगळा उरला नाहीं।।तु.गा.३६०१.००४।।
किती या काळाचा सोसावा वळसा। लागला सरिसा पाठोवाठीं।।तु.गा.३६०२.००१।।
लक्ष चौऱ्यांशीची करा सोडवण। रिघा या शरण पांडुरंगा।।तु.गा.३६०२.००२।।
उपजल्या पिंडा मरण सांगातें। मरतें उपजतें सवेंचि तें।।तु.गा.३६०२.००३।।
तुका म्हणे माळ गुंतलीं राहाटीं। गाडग्याची सुटी फुटलिया।।तु.गा.३६०२.००४।।

देव कैंचा तया दुरी। भाकी वरी करूणा।।तु.गा.३६०३.००१।।
आळवित्या नलगे घर। माय जाणे रे भातुकें ।।तु.गा.३६०३.००२।।
नावेवरी ज्याचा भार। पैल पार जवळी त्या।।तु.गा.३६०३.००३।।
आतां परदेशी तुका। झाला लोकां वेगळा।।तु.गा.३६०३.००४।।
बीज पेरी शेतीं। मग गाडेवरी वाहाती।।तु.गा.३६०४.००१।।
वायां गेलें ऐसें दिसे। लाभ त्याचें अंगीं वसे।।तु.गा.३६०४.००२।।
पाल्याची जतन। तरि प्रत्यया येती कण।।तु.गा.३६०४.००३।।
तुका म्हणे आळा। उदक देतां लाभे फळा।।तु.गा.३६०४.००४।।
सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण। जोंवरी हा प्राण जाय त्याचा।।तु.गा.३६०५.००१।।
आणिकांचा धाक न धरावा मनीं। निरोपावचनीं ढळों नये।।तु.गा.३६०५.००२।।
समय सांभाळुनी आगळें उत्तर। द्यावें भेदी वज्र तयापरी।।तु.गा.३६०५.००३।।
तुका म्हणे तरी म्हणवावें सेवक। खादलें तें हाक अन्न होय।।तु.गा.३६०५.००४।।
घालीं भार देवा। नलगे देश डोई घ्यावा।।तु.गा.३६०६.००१।।
देह प्रारब्धा अधीन। सोसें अधिक वाढें शीण।।तु.गा.३६०६.००२।।
व्यवसाय निमित्त। फळ देतसे संचित।।तु.गा.३६०६.००३।।
तुका म्हणे फिरे। भोवंडीनें दम जिरे।।तु.गा.३६०६.००४।।
भाग्यवंत म्हणों तयां। शरण गेले पंढरीराया।।तु.गा.३६०७.००१।।
तरलें तरती हा भरंवसा। नामधारकाचा ठसा।।तु.गा.३६०७.००२।।
भुक्तिमुक्तिचें तें स्थळ। भोळेभाविकां निर्मळ।।तु.गा.३६०७.००३।।
गाईलें पुराणीं। तुका म्हणे वेदवाणी।।तु.गा.३६०७.००४।।
नयो वाचे अनुचित वाणी। नसो मनीं कुडी बुद्धि।।तु.गा.३६०८.००१।।
ऐसें मागा अरे जना। नारायणा विनवूनि।।तु.गा.३६०८.००२।।
काम क्रोधां पडो चिरा। ऐसा बरा सायास।।तु.गा.३६०८.००३।।

तुका म्हणे नानाछंदें। या विनोदें न पडावें।।तु.गा.३६०८.००४।।
सत्यकर्म आचरें रे। बापा सत्यकर्म आचरें रे। सत्यकर्म आचरें होईल हित । वाढेल दु:ख असत्याचें ।।तु.गा.३६०९.००१।।
ऊंस वाढवितां वाढली गोडी। गूळ साकर हे त्याची परवडी।।तु.गा.३६०९.००२।।
साकरेच्या आळां लाविला कांदा। स्थूळ साना परी वाढे दुर्गंधा।।तु.गा.३६०९.००३।।
सत्य असत्य हें ऐसिया परी। तुका म्हणे याचा विचार करीं।।तु.गा.३६०९.००४।।
पर उपकारें कायावाचामन। वेंची सुदर्शन रक्षी तया।।तु.गा.३६१०.००१।।
याजसाठीं असे योजिलें श्रीपति। संकल्पाचे हातीं सर्व जोडी।।तु.गा.३६१०.००२।।
परपीडे ज्याची जिव्हा मुडताळे। यमदूत टाळे करिती पूजा।।तु.गा.३६१०.००३।।
तुका म्हणे अंबऋषी दुर्योधना। काय झालें नेणां दुर्वासया।।तु.गा.३६१०.००४।।
पंडित वाचक जरी झाला पुरता। तरी कृष्णकथा ऐके भावें। क्षीर तुपा साकरे झालिया भेटीं। तैसी पडे मिठी गोडपणें।।तु.गा.३६११.००१।।
जाणोनियां लाभ घेई हा पदरीं। गोड गोडावरी सेवीं बापा। जाणिवेचें मूळ उपडोनी खोड। जरी तुज चाड आहे तुझी।।तु.गा.३६११.००२।।
नाना परिमळद्रव्यउपचार। अंगीं उटी सार चंदनाची। जेविलियाविण शून्य ते शृंगार। तैसी गोडी हरिकथेविण।।तु.गा.३६११.००३।।
ज्याकारणें वेदश्रुति ही पुराणें। तेंचि विठ्ठलनाणें तिष्ठे कथें। तुका म्हणे येर दगडाचीं पेवें। खळखळींचें अवघें मूळ तेथें।।तु.गा.३६११.००४।।
ऐका पंडितजन। तुमचे वंदितों चरण।।तु.गा.३६१२.००१।।
नका करूं नरस्तुती। माझी परिसा हे विनंती।।तु.गा.३६१२.००२।।
अन्न आच्छादन। हें तों प्रारब्धा अधीन।।तु.गा.३६१२.००३।।
तुका म्हणे वाणी। सुखें वेचा नारायणीं।।तु.गा.३६१२.००४।।
भागल्याचें तारूं शिणल्याची साउली। भुकेलिया घाली प्रेमपान्हा।।तु.गा.३६१३.००१।।
ऐसी ही कृपाळू अनाथांचा वेशी। सुखाचीच राशी पांडुरंग।।तु.गा.३६१३.००२।।
सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी। पाहें बहु भेटी उतावीळ।।तु.गा.३६१३.००३।।
तुका म्हणे येथें आतां उरे कैंचा । अनंता जन्मींचा शीणभाग।।तु.गा.३६१३.००४।।
घ्या रे भाई घ्या रे भाई। कोणी कांहीं थोडें बहु।।तु.गा.३६१४.००१।।
येच हाटीं येच हाटीं। बांधा गांठीं पारखून।।तु.गा.३६१४.००२।।

वेंच आहे वेंच आहे। सरलें पाहें मग कोठें।।तु.गा.३६१४.००३।।
उघडें दुकान उघडें दुकान। रात्री झाली कोण सोडी मग।।तु.गा.३६१४.००४।।
तुका म्हणे अंतकाळीं। जाती टाळीं बैसोनि।।तु.गा.३६१४.००५।।
नका वांटूं मन विधिनिषेधासी। स्मरावा मानसीं पांडुरंग।।तु.गा.३६१५.००१।।
खादलिया अन्ना माशी बोळों नये। अवघेंचि जाय एका घांसें।।तु.गा.३६१५.००२।।
जोडी होते परी ते बहु कठिण। करितां जतन सांभाळावें।।तु.गा.३६१५.००३।।
तुका म्हणे येथें न मना विषाद। निंबेंविण व्याध तुटों नये।।तु.गा.३६१५.००४।।
मारगीं चालतां पाउलापाउलीं। चिंतावी माउली पांडुरंग।।तु.गा.३६१६.००१।।
सर्व सुख लागे घेऊनियां पाठीं। आवडीचा कंठीं रस ओती।।तु.गा.३६१६.००२।।
पीतांबर छाया करी लोभापर। पाहे तें उत्तर आवडीचें ।।तु.गा.३६१६.००३।।
तुका म्हणे हेंचि करावें जीवन। वाचे नारायण ताहान भूक ।।तु.गा.३६१६.००४।।
मेघवृष्टीनें करावा उपदेश। परि गुरूनें न करावा शिष्य। वाटां लाभे त्यास। केल्या अर्धकर्माचा।।तु.गा.३६१७.००१।।
द्रव्य वेचावें अन्नछत्रीं। भूतीं द्यावें सर्वत्र। न घ्यावा हा पुत्र। उत्तम याती पोसणा।।तु.गा.३६१७.००२।।
बीज न पेरावें खडकीं। ओल नाहीं ज्याचे बुडखीं। थीतां ठकें शेखीं । पाठीं लागे दिवाण।।तु.गा.३६१७.००३।।
गुज बोलावें संतांसी। पत्नी राखावी जैसी दासी। लाड देतां तयेसी। वांटा पावे कर्माचा।।तु.गा.३६१७.००४।।
शुद्ध कसूनि पाहावें। वरिल्या रंगा न भुलावें। तुका म्हणे घ्यावें। जया नये तुटी तें।।तु.गा.३६१७.००५।।
बहुतां पुरे ऐसा वाण। आलें धन घरासी।।तु.गा.३६१८.००१।।
घ्या रे फुका मोलेंविण। नारायण न भुला।।तु.गा.३६१८.००२।।
ऐका निवळल्या मनें। बरव्या कानें सादर।।तु.गा.३६१८.००३।।
तुका म्हणे करूनि अंतीं। निश्चिंती हे ठेवावी।।तु.गा.३६१८.००४।।
चालिलें न वाटे। गाऊनियां जातां वाटे।।तु.गा.३६१९.००१।।
बरवा वैष्णवांचा संग। येतो सामोरा श्रीरंग।।तु.गा.३६१९.००२।।
नाहीं भय आड। कांहीं विषमाचें जड।।तु.गा.३६१९.००३।।

तुका म्हणे भक्ति। सुखरूप आदीं अंतीं।।तु.गा.३६१९.००४।।
देह तंव असे भोगाचे अधीन। याचें सुख शीण क्षणभंगुर।।तु.गा.३६२०.००१।।
अविनाश जोडी देवापायीं भाव। कल्याणाचा ठाव सकळाही।।तु.गा.३६२०.००२।।
क्षणभंगुर हा येथील पसारा। आलिया आकारा अवघें नासे।।तु.गा.३६२०.००३।।
तुका म्हणें येथें सकळ विश्रांति। आठवावा चित्तीं नारायण।।तु.गा.३६२०.००४।।
सरलें आतां नाहीं। न म्हणे वेळकाळ कांहीं।।तु.गा.३६२१.००१।।
विठ्ठल कृपाळु माउली। सदा प्रेमें पान्हायेली।।तु.गा.३६२१.००२।।
शीण न विचारीं भाग। नव्हे निष्ठुर नाहीं राग।।तु.गा.३६२१.००३।।
भेदाभेद नाहीं। तुका म्हणे तिच्याठायीं।।तु.गा.३६२१.००४।।
जतन करा रे जतन करा। घालूं पाहें घरावरी घाला चोरटें।।तु.गा.३६२२.००१।।
अवघेचि निजों नका अवघिये ठायीं। वेळ अवेळ तरी सांभाळावी कांहीं।।तु.गा.३६२२.००२।।
सींतरिली फार खाती भोंवताले फेरे। गेलें नये हाता शेखीं तळमळ उरे।।तु.गा.३६२२.००३।।
तुका म्हणे आम्हीं करूं आपुलें जतन। नलगे कांहीं कोणां द्यावें उघडारे कान।।तु.गा.३६२२.००४।।
कथनी पठणी करूनि काय। वांचूनि रहणी वायां जाय।।तु.गा.३६२३.००१।।
मुखीं वाणी अमृतगोडी। मिथ्या भुकें चरफडी।।तु.गा.३६२३.००२।।
पिळणीं पाक करितां दगडा। काय जडा होय तें।।तु.गा.३६२३.००३।।
मधु मेळवूनि माशी। आणिकां सांसी पारधिया।।तु.गा.३६२३.००४।।
मेळवूनि धन मेळवी माती। लोभ्या हातीं तेंचि मुखीं।।तु.गा.३६२३.००५।।
आपुलें केलें आपण खाय। तुका वंदी त्याचे पाय।।तु.गा.३६२३.००६।।
मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धींचें कारण। मोक्ष अथवा बंधन। सुख समाधान इच्छा ते।।तु.गा.३६२४.००१।।
मनें प्रतिमा स्थापिली। मनें मना पूजा केली। मनें इच्छा पुरविली। मन माउली सकळांची।।तु.गा.३६२४.००२।।
मन गुरू आणि शिष्य। करी आपुलेंचि दास्य। प्रसन्न आपआपणांस। गति अथवा अधोगति।।तु.गा.३६२४.००३।।
साधक वाचक पंडित। श्रोतें वक्ते ऐका मात। नाहीं नाहीं आन दैवत। तुका म्हणे दुसरें।।तु.गा.३६२४.००४।।

होऊं नको कांहीं या मना आधीन। नाईकें वचन याचे कांहीं।।तु.गा.३६२५.००१ ।।
हटियाची गोष्टी मोडून टाकावी। सोई ही धरावी विठोबाची।।तु.गा.३६२५.००२ ।।
आपुलें आधीन करूनियां ठेवा। नाहीं तरी जीवा घातक हें।।तु.गा.३६२५.००३ ।।
तुका म्हणे झाले जे मना आधीन। तयांसी बंधन यम करी।।तु.गा.३६२५.००४ ।।
हालवूनि खुंट। आधीं करावा बळकट।।तु.गा.३६२६.००१ ।।
मग तयाच्या आधारें। करणें तें अवघें बरें।।तु.गा.३६२६.००२ ।।
सुखदु:ख साहे। हर्षामर्षीं भंगा नये।।तु.गा.३६२६.००३ ।।
तुका म्हणे जीवें। आधीं मरोनि राहावें।।तु.गा.३६२६.००४ ।।
जिंकावा संसार। येणें नांवें तरी शूर।।तु.गा.३६२७.००१ ।।
येर काय ती बापुडीं। कीर अहंकाराची घोडी।।तु.गा.३६२७.००२ ।।
पण ऐशा नांवें। देव धरिजेतो भावें।।तु.गा.३६२७.००३ ।।
तुका म्हणे ज्यावें। सत्कीर्तीनें बरवें।।तु.गा.३६२७.००४ ।।
थोर ते गळाली पाहिजे अहंता। उपदेश घेतां सुख वाटे।।तु.गा.३६२८.००१ ।।
व्यर्थ भरोवरी केलें पाठांतर। जोंवरी अंतर शुद्ध नाहीं।।तु.गा.३६२८.००२ ।।
घोडें काय थोडें वागवितें ओझें। भावेंविण तैसें पाठांतर।।तु.गा.३६२८.००३ ।।
तुका म्हणे धरा निष्ठावंत भाव। जरी पंढरीराव पाहिजे तो।।तु.गा.३६२८.००४ ।।
निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें। साधन बरवें हेंचि एक ।।तु.गा.३६२९.००१ ।।
तरीच अंगीकार करील नारायण। बडबड तो शीण येणेविण।।तु.गा.३६२९.००२ ।।
सोईरें पिशुन समानचि घडें। चित्त पर ओढें उपकारी।।तु.गा.३६२९.००३ ।।
तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ। तरिच सकळ केलें होय।।तु.गा.३६२९.००४ ।।
तरिच जन्मा यावें। दास विठोबाचें व्हावें।।तु.गा.३६३०.००१ ।।
नाहीं तरि काय थोडीं। श्वानशूकरें बापुडीं।।तु.गा.३६३०.००२ ।।
ज्याल्याचें तें फळ। अंगीं लागों नेदी मळ।।तु.गा.३६३०.००३ ।।

तुका म्हणे भले। ज्याच्या नांवें मानवलें।।तु.गा.३६३०.००४।।
आलियां भोगासी असावें सादर। देवावरी भार घालूनियां।।तु.गा.३६३१.००१।।
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें। येर तें बापुडें काय रंक ।।तु.गा.३६३१.००२।।
भयाचिये पोटीं दु:खाचिया रासी। शरण देवासी जातां भले।।तु.गा.३६३१.००३।।
तुका म्हणे नव्हे काय त्या करितां। चिंतावा तो आतां विश्वंभर।।तु.गा.३६३१.००४।।
भावें गावें गीत। शुद्ध करूनियां चित्त।।तु.गा.३६३२.००१।।
तुज व्हावा आहे देव। तरि हा सुलभ उपाव।।तु.गा.३६३२.००२।।
आणिकांचे कानीं। गुण दोष मना नाणी।।तु.गा.३६३२.००३।।
मस्तक ठेंगणा। करीं संतांच्या चरणा।।तु.गा.३६३२.००४।।
वेचीं तें वचन। जेणें राहें समाधान।।तु.गा.३६३२.००५।।
तुका म्हणे फार। थोडा तरी परउपकार।।तु.गा.३६३२.००६।।
सांडुनियां सर्व लौकिकाची लाज। आळवा यदुराज भक्तिभावें।।तु.गा.३६३३.००१।।
पाहुनियां झाडें ओरबडुनि पाला। खाऊनि विठ्ठला आळवावें।।तु.गा.३६३३.००२।।
वेंचुनियां चिंध्या भरोनियां धागा। गुंडाळोनि ढुंगा आळवावे।।तु.गा.३६३३.००३।।
तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण। तया नारायण उपेक्षीना।।तु.गा.३६३३.००४।।
शांतीपरतें नाहीं सुख। येर अवघेंचि दु:ख।।तु.गा.३६३४.००१।।
म्हणउनी शांती धरा। उतराल पैल तीरा।।तु.गा.३६३४.००२।।
खवळलिया काम क्रोधीं। अंगीं भरती आधिव्याधी।।तु.गा.३६३४.००३।।
तुका म्हणे त्रिविध ताप । मग जाती आपेंआप।।तु.गा.३६३४.००४।।
विटाळ तो परद्रव्य परनारी। येथुनि जो दुरी सोंवळा तो।।तु.गा.३६३५.००१।।
गद्य पद्य कांहीं न धरावी उपाधी। स्वाधीनचि बुद्धि करूनी ठेवा।।तु.गा.३६३५.००२।।
विचारानें कांहीं करा रे स्वहित। पापपुण्यातीत भांडवल।।तु.गा.३६३५.००३।।
तुका म्हणे न लगे जावें वनांतरा। विश्वविश्वंभरा सारिखेंचि।।तु.गा.३६३५.००४।।

साधनें तरी हींच दोन्ही। जरी कोणी साधील।।तु.गा.३६३६.००१ ।।
परद्रव्य परनारी। याचा धरी विटाळ।।तु.गा.३६३६.००२ ।।
देव भाग्य घरा येती। संपत्ती त्या सकळा।।तु.गा.३६३६.००३ ।।
तुका म्हणे तें शरीर। घर भांडार देवाचें।।तु.गा.३६३६.००४ ।।
नये जरी तुज मधुर उत्तर। दिधला सुस्वर नाहीं देवें।।तु.गा.३६३७.००१ ।।
नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल। येईल तैसा बोल रामकृष्ण।।तु.गा.३६३७.००२ ।।
देवापाशीं मागें आवडीची भक्ति। विश्वासेंशीं प्रीति भावबळें।।तु.गा.३६३७.००३ ।।
तुका म्हणे मना सांगतों विचार। धरावा निर्धार दिसेंदिस।।तु.गा.३६३७.००४ ।।
सवंग झालें सवंग झालें। घरा आलें बंदरींचे।।तु.गा.३६३८.००१ ।।
आतां हेवा करूं सोस। भक्तिरस बहु गोड।।तु.गा.३६३८.००२ ।।
पाउल वेचे चिंता नाहीं। आड कांहीं मग नये।।तु.गा.३६३८.००३ ।।
तुका म्हणे संचिताचें। नेणें काचें राहे तें।।तु.गा.३६३८.००४ ।।
कृष्ण ध्यातां चित्तीं कृष्ण गातां गीतीं। तेंही कृष्ण होती कृष्णध्यानें।।तु.गा.३६३९.००१ ।।
आसनीं शयनीं भोजनीं जेवितां। म्हणा रे भोगितां नारायण।।तु.गा.३६३९.००२ ।।
ओंवियें दळणीं गावा नारायण। कांडितां कांडण करितां काम।।तु.गा.३६३९.००३ ।।
नर नारी याति हो कोणी भलतीं। भावें एका प्रीतीं नारायणा।।तु.गा.३६३९.००४ ।।
तुका म्हणे एका भावें भजा हरि। कांति ते दुसरी रूप एक।।तु.गा.३६३९.००५ ।।
पोटापुरतें काम। परि अगत्य तो राम।।तु.गा.३६४०.००१ ।।
कारण तें हेंचि करीं। चित्तीं पांडुरंग धरीं।।तु.गा.३६४०.००२ ।।
प्रारब्धीं हेवा। जोडी देवाची ते सेवा।।तु.गा.३६४०.००३ ।।
तुका म्हणे बळ। बुद्धि वेंचुनि सकळ।।तु.गा.३६४०.००४ ।।
कोणाशीं विचार करावा शेवटीं। एवढ्या लाभें तुटी झाल्या तरें।।तु.गा.३६४१.००१ ।।
सांभाळितो शूर आला घावडाव। पुढें दिला पाव न करी मागें।।तु.गा.३६४१.००२ ।।

घात तो या नांवें येथें अंतराय। अंतरल्या पाय गोविंदाचे ।।तु.गा.३६४१.००३ ।।
तुका म्हणे गडसंदीचा हा ठाव। केला तो उपाव कार्या येतो ।।तु.गा.३६४१.००४ ।।
संवसारसांते आले हो आईका। तुटीचें तें नका केणें भरूं ।।तु.गा.३६४२.००१ ।।
लाभाचा हा काळ अवघे विचारा। पारखी ते करा साह्य येथें ।।तु.गा.३६४२.००२ ।।
शृंगारिलें दिसे न कळे अंतर। गोविला पदर उगवेना ।।तु.गा.३६४२.००३ ।।
तुका म्हणे खोटें गुंफता विसारें। हातिंचिया खरें हातीं घ्यावें ।।तु.गा.३६४२.००४ ।।
येऊनि नरदेहा विचारावें सार। धरावा पैं धीर भजनमार्गीं ।।तु.गा.३६४३.००१ ।।
चंचळ चित्तासी ठेवुनियां ठाई। संताचिये पायीं लीन व्हावें ।।तु.गा.३६४३.००२ ।।
भावाच्या पैं हातें धरावा निश्चय। तेणें भवभय देशधडी ।।तु.गा.३६४३.००३ ।।
नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं। आवडीनें गाई सर्वकाळ ।।तु.गा.३६४३.००४ ।।
तुका म्हणे वंश धन्य त्या नराचा। ऐशा निश्चयाचा मेरू झाला ।।तु.गा.३६४३.००५ ।।
क्षणक्षणा हाचि करावा विचार। तरावया पार भवसिंधु ।।तु.गा.३६४४.००१ ।।
नाशिवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान ।।तु.गा.३६४४.००२ ।।
संतसमागमीं धरूनि आवडी। करावी तांतडी परमार्थी ।।तु.गा.३६४४.००३ ।।
तुका म्हणे इहलोकींच्या वेव्हारें। नये डोळे धुरें भरूनि राहों ।।तु.गा.३६४४.००४ ।।
सावधान ऐसें काय तें विचारा। आले हो संसारा सकळही ।।तु.गा.३६४५.००१ ।।
अंतसमयाचा करणें विचार । वेंचती सादर घटिका पळें ।।तु.गा.३६४५.००२ ।।
मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट।।तु.गा.३६४५.००३ ।।
तुका म्हणे देव अंतरला दुरी। डोळिया अंधारी पडलीसे ।।तु.गा.३६४५.००४ ।।
सुख पाहतां जवापाडें। दुःख पर्वताएवढें ।।तु.गा.३६४६.००१ ।।
धरीं धरीं आठवण। मानीं संतांचें वचन ।।तु.गा.३६४६.००२ ।।
नेलें रात्रीनें तें अर्ध। बाळपण जराव्याध ।।तु.गा.३६४६.००३ ।।
तुका म्हणे पुढा। घाणा जुंतीजसी मूढा ।।तु.गा.३६४६.००४ ।।

सुख नाहीं कोठें आलियां संसारीं। वायां हांवभरी होऊं नका ।।तु.गा.३६४७.००१ ।।
दु:खबांदवडी आहे हा संसार। सुखाचा विचार नाहीं कोठें ।।तु.गा.३६४७.००२ ।।
चौदा कल्पेंवरी आयुष्य जयाला। परी तो राहिला ताटीखालीं ।।तु.गा.३६४७.००३ ।।
तुका म्हणे वेगीं जाय सुटोनियां। धरूनि हृदयामाजी हरि ।।तु.गा.३६४७.००४ ।।
चळलें तें काय न करीं बडबड। न म्हणे फिकें गोड भुकेलें तें ।।तु.गा.३६४८.००१ ।।
उमजल्याविण न धरी सांभाळ। असो खळखळ जनाची हे ।।तु.गा.३६४८.००२ ।।
गरज्या न कळे आपुलिया चाडा। करावी ते पीडा कोणा काई ।।तु.गा.३६४८.००३ ।।
तुका म्हणे भोग भोगितील भोगें। संचित तें जोगें नाहीं कोणा ।।तु.गा.३६४८.००४ ।।
संसारा आलिया एक सुख आहे। आठवावे पाय विठोबाचें ।।तु.गा.३६४९.००१ ।।
येणें होय सर्व संसार सुखाचा। नलगें दु:खाचा लेश कांहीं ।।तु.गा.३६४९.००२ ।।
घेतील तयांसी सोपें आहे सुख। बोलियेलें मुखें नारायण ।।तु.गा.३६४९.००३ ।।
सांगितली सोय करूणासागरें । तुम्हां कां हो बरें न वाटें तें ।।तु.गा.३६४९.००४ ।।
तुका म्हणे तेणें उपकार केला । भोळ्याभाविकांला तरायासी ।।तु.गा.३६४९.००५ ।।
मथनीचें नवनीत। सर्व हितकारक ।।तु.गा.३६५०.००१ ।।
दंडवत दंडापरी। मागें उरी नुरावी ।।तु.गा.३६५०.००२ ।।
वचनाचा तो पसरू काई। तांतडी डोईपाशींच ।।तु.गा.३६५०.००३ ।।
तुका म्हणे जगजेठी। लावीं कठीं उचलूनि ।।तु.गा.३६५०.००४ ।।
सुखाचे व्यवहारीं सुखलाभ झाला। आनंद कोंदला मागें पुढें ।।तु.गा.३६५१.००१ ।।
संगती पंगती देवासवें घडे। नित्या नित्य पडे तेचि साचा ।।तु.गा.३६५१.००२ ।।
समर्थाचे घरीं सकळ संपदा। नाहीं तुटीं कदा कासयाची ।।तु.गा.३६५१.००३ ।।
तुका म्हणे येथें लाभाचिया कोटी। बहु वाव पोटीं समर्थाचे ।।तु.गा.३६५१.००४ ।।
राजा करी तैसे दाम। चाम तेही चालती ।।तु.गा.३६५२.००१ ।।
कारण ते सत्ता शिरीं। कोण करी अव्हेर ।।तु.गा.३६५२.००२ ।।

वाहिलें तें सुनें खांदी। चाले पदीं बैसविलें।।तु.गा.३६५२.००३।।
तुका म्हणे विश्वंभरें। करुणाकरें रक्षिलें।।तु.गा.३६५२.००४।।
त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं। आमुचें त्या काई असेल ओझें।।तु.गा.३६५३.००१।।
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर। तया मुखीं चार कोण घाली।।तु.गा.३६५३.००२।।
पक्षी अजगर न करी संचित। तयासी अनंत प्रतिपाळीं।।तु.गा.३६५३.००३।।
तुका म्हणे तया भार घातलिया। उपेक्षीना दयासिंधु माझा।।तु.गा.३६५३.००४।।
धन्य भावशीळ। ज्याचे हृदय निर्मळ।।तु.गा.३६५४.००१।।
पूजी प्रतिमेचे देव। संत म्हणती तेथें भाव।।तु.गा.३६५४.००२।।
विधिनिषेध नेणती। एक निष्ठा धरूनी चित्तीं।।तु.गा.३६५४.००३।।
तुका म्हणे तैसें देवा। होणें लागें त्यांच्या भावा।।तु.गा.३६५४.००४।।
देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें। सूत्र ओढे दोरें एका एक ।।तु.गा.३६५५.००१।।
आहाच हें नव्हे विटायासारिखें। जीव जीवनीं देखें सामावलें।।तु.गा.३६५५.००२।।
आणिकाचें सुख दुःख उमटे अंतरीं। येथील इतरीं तेणें न्यावें।।तु.गा.३६५५.००३।।
तुका म्हणे ठसावलें शुद्ध जाती। शोभाचि पुढती विशेषता।।तु.गा.३६५५.००४।।
आम्हां घरीं एक गाय दुभताहे। पान्हा न समाये त्रिभुवनीं।।तु.गा.३६५६.००१।।
वान ते सांवळी नांव तें श्रीधरा। चरे वसुंधरा चौदा भुवनें।।तु.गा.३६५६.००२।।
वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय। कुर्वाळी तो लाहे भावभरणा।।तु.गा.३६५६.००३।।
चहूं धारीं क्षीर वोळली अमुप। धाले सनकादिक सिद्ध मुनी।।तु.गा.३६५६.००४।।
तुका म्हणे माझी भूक तेथें काय। जोगाविते माय तिन्हीं लोक ।।तु.गा.३६५६.००५।।
सुखरूप चाली। हळूहळू उसंतिली।।तु.गा.३६५७.००१।।
बाळगोपाळांची वाट। सेव्य सेवकता नीट।।तु.गा.३६५७.००२।।
जरी झाला श्रम। तरी पडों नये भ्रम।।तु.गा.३६५७.००३।।
तुका म्हणे दासां। देव सरिसासारिसा।।तु.गा.३६५७.००४।।

नाहीं काष्ठाचा गुमान। गोवी भ्रमरा सुमन।।तु.गा.३६५८.००१।।
प्रेम प्रीतीचें बांधलें। तें न सुटे कांहीं केलें।।तु.गा.३६५८.००२।।
पदरीं घालीं पिळा। बाप निर्बळ साटी बाळा।।तु.गा.३६५८.००३।।
तुका म्हणे भावें। भेणें देवें आकारावें ।।तु.गा.३६५८.००४।।
स्वामिकाज गुरुभक्ति। पितृवचन सेवा पति।।तु.गा.३६५९.००१।।
हेचि विष्णूचि महापूजा। आनु भाव नाहीं दुजा।।तु.गा.३६५९.००२।।
सत्य बोले मुखें। दुखवे आणिकांच्या दु:खें।।तु.गा.३६५९.००३।।
निश्चयाचें बळ। तुका म्हणे तेंच फळ।।तु.गा.३६५९.००४।।
न करि त्याचें गांढेपण। नारायण सिद्ध उभा।।तु.गा.३६६०.००१।।
भवसिंधुचा थडवा केला। बोलाविला पाहिजे।।तु.गा.३६६०.००२।।
याचे सोई पाउल वेंचे। मग कैंचे अडथळे।।तु.गा.३६६०.००३।।
तुका म्हणे खरें खोटें। न म्हणे मोठें लहान।।तु.गा.३६६०.००४।।
सोंवळा तो झाला। अंगीकार देवें केला।।तु.गा.३६६१.००१।।
येर करिती भोजन। पोट पोसाया दुर्जन।।तु.गा.३६६१.००२।।
चुकला हा भार। तयाचीच येरझार।।तु.गा.३६६१.००३।।
तुका म्हणे दास। झाला तया नाहीं नास।।तु.गा.३६६१.००४।।
जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार। येर मांस पर हाता न कळे ।।तु.गा.३६६२.००१।।
देखावें नेत्रीं बोलावें मुखें। चित्ता सुखदु:खें कळों येती।।तु.गा.३६६२.००२।।
परिमळासी घ्राण ऐकती श्रवण। एकाचें कारण एका नव्हे।।तु.गा.३६६२.००३।।
एके देहीं भिन्न ठेवियेल्या कळा। नाचवी पुतळा सूत्रधारी।।तु.गा.३६६२.००४।।
तुका म्हणे ऐशी जयाची सत्ता। कां तया अनंता विसरलेती।।तु.गा.३६६२.००५।।
जें जें केलें तें तें साहे। कैसें पाहें भाविक ।।तु.गा.३६६३.००१।।
ओंवाळूनि माझी काया। सांडिली यावरूनि।।तु.गा.३६६३.००२।।

काय होय नव्हे करूं । नेणें धरूं सत्ता ते ।।तु.गा.३६६३.००३ ।।
तुका म्हणे कटीं कर । उभें धीर धरूनि ।।तु.गा.३६६३.००४ ।।
सादाविलें एका । सरें अवघियां लोकां ।।तु.गा.३६६४.००१ ।।
आतां आवडीच्या हातीं । भेद नाहीं ये पंगतीं ।।तु.गा.३६६४.००२ ।।
मोकळीच पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ।।तु.गा.३६६४.००३ ।।
तुका म्हणे बरा । आहें ढसाळ वेव्हारा ।।तु.गा.३६६४.००४ ।।
वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची सांगो नये ।।तु.गा.३६६५.००१ ।।
उदंडचि झाले जन्मोनियां मेले । होऊनियां गेले राव रंक ।।तु.गा.३६६५.००२ ।।
त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ।।तु.गा.३६६५.००३ ।।
अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ।।तु.गा.३६६५.००४ ।।
तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरणव्यथा दूर होती ।।तु.गा.३६६५.००५ ।।
जैसा निर्मळ गंगाओघ । तैसा भाग वोगरीं ।।तु.गा.३६६६.००१ ।।
प्रेम वाढें ग्रासोग्रासीं । ब्रह्मरसीं भोजन ।।तु.गा.३६६६.००२ ।।
तृप्तीवरि आवडी उरे । ऐसे बरे प्रकार ।।तु.गा.३६६६.००३ ।।
तुका म्हणे पाख मन । नारायण तें भोगीं ।।तु.गा.३६६६.००४ ।।
बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्नवस्त्रदाता ।।तु.गा.३६६७.००१ ।।
काय आम्हां करणें अधिक सांचुनी । देव झाला ऋणी पुरविता ।।तु.गा.३६६७.००२ ।।
दयाळ मायाळ जाणे कळवळा । शरणागतां ळळा राखों जाणे ।।तु.गा.३६६७.००३ ।।
नलगे सांगणें मागणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ।।तु.गा.३६६७.००४ ।।
तुका म्हणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ।।तु.गा.३६६७.००५ ।।
आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ।।तु.गा.३६६८.००१ ।।
जें जया रूचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ।।तु.गा.३६६८.००२ ।।
ठायीं पडिलियां तेंचि लागे खावें । ठायींचेंचि घ्यावें विचारूनि ।।तु.गा.३६६८.००३ ।।

बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ। डोरलीस केळ कैचें लागे।।तु.गा.३६६८.००४।।
तुका म्हणे देवा कांहीं बोल नाहीं। तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा।।तु.गा.३६६८.००५।।
आपुलियां बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची।।तु.गा.३६६९.००१।।
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी। शिकविता धणी वेगळाची।।तु.गा.३६६९.००२।।
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें।।तु.गा.३६६९.००३।।
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा। वागवी पांगुळा पायांवीण।।तु.गा.३६६९.००४।।
उद्धाराचा संदेह नाहीं। याच्या कांहीं सेवकां।।तु.गा.३६७०.००१।।
पांडुरंग अभिमानी। जीवदानी कोंवसा।।तु.गा.३६७०.००२।।
बुडतां जळीं जळतां आगीं। तें प्रसंगीं राखावें।।तु.गा.३६७०.००३।।
तुका म्हणे आम्हांसाठीं। कृपा पोटीं वागवी।।तु.गा.३६७०.००४।।
भाविकाचें काज अंगें देव करी। काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें।।तु.गा.३६७१.००१।।
उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं। आवडी तयांची मोठी देवा।।तु.गा.३६७१.००२।।
काय देवा घरीं न मिळेची अन्न। मागे भाजीपान द्रौपदीसी।।तु.गा.३६७१.००३।।
अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें। संकटें बहुतें निवारीलीं।।तु.गा.३६७१.००४।।
तुका म्हणे ऐसीं आवडती लडिवाळें। जाणीवेचें काळें तोंड देवा।।तु.गा.३६७१.००५।।
पाहातां रूप डोळां भरे। अंतर नुरे वेगळें। इच्छावशें खेळ मांडी। अवघें सांडी बाहेरी।।तु.गा.३६७२.००१।।
तो हा नंदा नंदन बाइये। यासी काय परिचार वो।।तु.गा.३६७२.००२।।
दिसतो हा नोहे तैसा। असे दिशाव्यापक । लाघव हा खेळासाटीं। होतां भेटी परतेना।।तु.गा.३६७२.००३।।
म्हणोनि उभी ठाकलिये। परतलीये या वाटा। आड करोनियां तुका। जो या लोकां दाखवितो।।तु.गा.३६७२.००४।।
बोलिलों उत्कर्षें। प्रेमरसें दासत्वें ।।तु.गा.३६७३.००१।।
साच करिता नारायण। जया शरण गेलों तो।।तु.गा.३६७३.००२।।
समर्थ तो आहे ऐसा। धरिली इच्छा पुरवीतो।।तु.गा.३६७३.००३।।
तुका म्हणे लडिवाळाचें। द्यावें साचें करूनियां।।तु.गा.३६७३.००४।।

सोडिला संसार। माया तयावरी फार।।तु.गा.३६७४.००१।।
धांवे चाले मागें मागें। सुखदु:ख साहे अंगें।।तु.गा.३६७४.००२।।
यानें घ्यावें नाम। तीसी करणें त्याचें काम।।तु.गा.३६७४.००३।।
तुका म्हणे भोळी । विठ्ठलकृपेची कोंवळीं।।तु.गा.३६७४.००४।।
शुकसनकादिकीं उभारिला बाहो। परिक्षिती लाहो दिसां सातां।।तु.गा.३६७५.००१।।
उठाउठीं करी स्मरणाचा धांवा। धरवत देवा नाहीं धीर।।तु.गा.३६७५.००२।।
त्वरा जाली गरुडा टाकियेले मागें। द्रौपदीच्या लागें नारायणें।।तु.गा.३६७५.००३।।
तुका म्हणे करी बहुच तांतडी। प्रेमाची आवडी लोभा पूर।।तु.गा.३६७५.००४।।
गौळीयाचीं ताकपीरें। कोण पोरें चांगलीं।।तु.गा.३६७६.००१।।
येवढा त्यांचा छंद देवा। काय सेवा भक्ति ते।।तु.गा.३६७६.००२।।
काय उपास पडिले होते। कण्यांभोंवते विदुराच्या।।तु.गा.३६७६.००३।।
तुका म्हणे कुब्जा दासी। रूपरासी हीनकळा।।तु.गा.३६७६.००४।।
विश्वाचा जनिता। म्हणे यशोदेसी माता।।तु.गा.३६७७.००१।।
ऐसा भक्ताचा अंकित। लागे तैसी लावी प्रीत।।तु.गा.३६७७.००२।।
निष्काम निराळा। गोपी लावियेल्या चाळा।।तु.गा.३६७७.००३।।
तुका म्हणे आलें। रूपा अव्यक्त चांगलें।।तु.गा.३६७७.००४।।
तयास नेणतीं बहु आवडती। होय जया चित्तीं एक भाव।।तु.गा.३६७८.००१।।
उपमन्यु धुरू हे काय जाणती। प्रह्लादाच्या चित्तीं नारायण।।तु.गा.३६७८.००२।।
कोळी भिल्ल पशु श्वापदें अपारें। कृपेच्या सागरें तारियेलीं।।तु.गा.३६७८.००३।।
काय तीं गोपाळें चांगलीं शाहाणीं। तयां चक्रपाणी जेवी सवें।।तु.गा.३६७८.००४।।
तुका म्हणे भोळा भाविक हा देव। आम्ही त्याचे पाव धरूनी ठेलों।।तु.गा.३६७८.००५।।
म्हणउनि शरण जावें। सर्वभावें देवासी।।तु.गा.३६७९.००१।।
तो हा उतरील पार। भवदुस्तर नदीचा।।तु.गा.३६७९.००२।।

बहु आहे करुणावंत। अनंत हें नाम ज्या ।।तु.गा.३६७९.००३ ।।
तुका म्हणे साक्षी आलें। तरी केलें प्रगट।।तु.गा.३६७९.००४ ।।
देवें केलें कैसें कैसें। उद्धरिलें अनायासें ।।तु.गा.३६८०.००१ ।।
ऐका नवलयाची ठेव। नेणतांही भक्तिभाव ।।तु.गा.३६८०.००२ ।।
कैलासासी नेला। भिल्ल पानेडीं बैसला ।।तु.गा.३६८०.००३ ।।
पांखांच्या फडत्कारीं। उद्धरूनी नेली घारी ।।तु.गा.३६८०.००४ ।।
चोरें पिंडीं दिला पाव। त्या पूजनें धाय देव ।।तु.गा.३६८०.००५ ।।
तुका म्हणे भोळा। स्वामी माझा हा कोंवळा ।।तु.गा.३६८०.००६ ।।
ऐका महिमा आवडीची। बोरें खाय भिल्लटीचीं ।।तु.गा.३६८१.००१ ।।
थोर प्रेमाचा भुकेला। हाचि दुष्काळ तयाला ।।तु.गा.३६८१.००२ ।।
पोहे सुदामदेवाची। फके मारी कोरडेचि ।।तु.गा.३६८१.००३ ।।
न म्हणे उच्छिष्ट अथवा थोडें। तुका म्हणे भक्तीपुढें ।।तु.गा.३६८१.००४ ।।
अंगीकार ज्याचा केला नारायणें। निंद्य तेंही तेणें वंद्य केलें ।।तु.गा.३६८२.००१ ।।
अजामेळ भिल्ली तारिली कुंटणी। प्रत्यक्ष पुराणी वंद्य केली ।।तु.गा.३६८२.००२ ।।
ब्रह्महत्या राशी पातकें अपार। वाल्मीक किंकर वंद्य केला ।।तु.गा.३६८२.००३ ।।
तुका म्हणे येथें भजन प्रमाण। काय थोरपण जाळावें तें ।।तु.गा.३६८२.००४ ।।
उंच नीच कांहीं नेणें भगवंत। तिष्ठे भावभक्ती देखोनियां ।।तु.गा.३६८३.००१ ।।
दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी। दैत्या घरीं रक्षी प्रह्लादासी ।।तु.गा.३६८३.००२ ।।
चर्म रंगूं लागे रोहिदासासंगें। कबिराचे मागें शेले विणी ।।तु.गा.३६८३.००३ ।।
सजन कसाया विकूं लागे मांस। माळ्या सांवत्यास खुरपूं लागे ।।तु.गा.३६८३.००४ ।।
नरहरी सोनारा घडूं फुंकूं लागे। चोख्यामेळ्या संगें ढोरें ओढी ।।तु.गा.३६८३.००५ ।।
नामयाची जनीसवें वेची शेणीं। धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ।।तु.गा.३६८३.००६ ।।
नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित। ज्ञानियाची भिंत अंगें ओढी ।।तु.गा.३६८३.००७ ।।

अर्जुनाचे रथीं होय हा सारथी। भक्षी पोहें प्रीतीं सुदाम्याचे।।तु.गा.३६८३.००८।।
गौळियांचे घरीं अंगें गाई वळी। द्वारपाळ बळींद्वारी जाला।।तु.गा.३६८३.००९।।
येकोबाचे ऋण फेडी हृषीकेशी। आंबऋषीचे सोशी गर्भवास।।तु.गा.३६८३.०१०।।
मिराबाईसाठीं घेतों विषप्याला। दामाजीचा जाला पाडेवार।।तु.गा.३६८३.०११।।
घडी माती वाहे गोऱ्याकुंभाराची। हुंडी त्या मेहत्याची अंगें भरी।।तु.गा.३६८३.०१२।।
पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत। तुका म्हणे मात धन्य त्याची।।तु.गा.३६८३.०१३।।
कांहीं न मागती देवा। त्यांची करूं धांवें सेवा।।तु.गा.३६८४.००१।।
हळुहळू फेडी ऋण। होवोनियां रूपें दीन।।तु.गा.३६८४.००२।।
होऊं न शके वेगळा। क्षण त्या एक निराळा।।तु.गा.३६८४.००३।।
तुका म्हणे भक्तिभाव। तोचि देवाचाही देव।।तु.गा.३६८४.००४।।
भक्तऋणी देव बोलती पुराणें। निर्धार वचनें साच खरीं।।तु.गा.३६८५.००१।।
मागें काय जाणों आइकिली वार्ता। कबिरा सातें जातां घड्या वांटीं।।तु.गा.३६८५.००२।।
माघारिया धन आणिलें घरासी। ने घे केला त्यासी त्याग तेणें।।तु.गा.३६८५.००३।।
नामदेवाचिया घरासी आणिलें। तेणें लुटियेलें द्विजां हातीं।।तु.गा.३६८५.००४।।
प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण। येकोबाचे ऋण फेडियलें।।तु.गा.३६८५.००५।।
बीज दळोनियां केली आराधना। लागे नारायणा पेरणें तें।।तु.गा.३६८५.००६।।
तुका म्हणे ऐसा नाहीं ज्या निर्धार। नाडेल साचार तोचि एक ।।तु.गा.३६८५.००७।।
सांठविला हरि। जींहीं हृदयमंदिरीं।।तु.गा.३६८६.००१।।
त्यांची सरली वेरझार। झाला सफळ व्यापार।।तु.गा.३६८६.००२।।
हरी आला हाता। मग कैंचीं भय चिंता।।तु.गा.३६८६.००३।।
तुका म्हणे हरी। कांहीं उरों नेदी उरी।।तु.गा.३६८६.००४।।
हरिहरा भेद। नाहीं करूं नये वाद।।तु.गा.३६८७.००१।।
एक एकाचे हृदयीं। गोडी साखरेच्या ठायीं।।तु.गा.३६८७.००२।।

भेदकासी नाड। एक वेलांटीच आड।।तु.गा.३६८७.००३।।
उजवे वाम भाग। तुका म्हणे एकचि अंग।।तु.गा.३६८७.००४।।
अंतरींची घेतो गोडी। पाहे जोडी भावाची।।तु.गा.३६८८.००१।।
देव सोयरा देव सोयरा। देव सोयरा दीनाचा।।तु.गा.३६८८.००२।।
आपुल्याच वैभवें। शृंगारावें निर्मळें।।तु.गा.३६८८.००३।।
तुका म्हणे जेवी सवें। प्रेम द्यावें प्रीतीचें।।तु.गा.३६८८.००४।।
देव बासर देव बासर। असे निरंतर जेथें तेथें।।तु.गा.३६८९.००१।।
देव खोळंबा देव खोळंबा। मज झळंबा म्हूण कोंडी।।तु.गा.३६८९.००२।।
देव लागट देव लागट। लाविलिया चट जीवीं जडे।।तु.गा.३६८९.००३।।
देव बावळा देव बावळा। भावें जवळा लुडबुडी।।तु.गा.३६८९.००४।।
देव न व्हावा देव न व्हावा। तुका म्हणे गोवा करी कामीं।।तु.गा.३६८९.००५।।
देव घ्या कोणी देव घ्या कोणी। आइता आला घर पुसोनी।।तु.गा.३६९०.००१।।
देव नलगे देव नलगे। सांठवणीचे रूंधले जागे।।तु.गा.३६९०.००२।।
देव मंदला देव मंदला। भाव बुडाला काय करूं।।तु.गा.३६९०.००३।।
देव घ्या फुका देव घ्या फुका। नलगे रूका मोल कांहीं।।तु.गा.३६९०.००४।।
दुबळा तुका भावेंवीण। उधारा देव घेतला ऋण।।तु.गा.३६९०.००५।।
देव निढळ देव निढळ। मूळ नाहीं डाळ परदेशी।।तु.गा.३६९१.००१।।
देव अकुळी देव अकुळी। भलतें स्थळीं सोयरीक ।।तु.गा.३६९१.००२।।
देव लिगाड्या देव लिगाड्या। तुका म्हणे भाड्या दंभें ठकी।।तु.गा.३६९१.००३।।
देव मजूर देव मजूर। नाहीं उजूर सेवेपुढें।।तु.गा.३६९२.००१।।
देव गांढ्याळ देव गांढ्याळ। देखोनियां बळ लपतसे।।तु.गा.३६९२.००२।।
देव तर काई देव तर काई। तुका म्हणे राई तरी मोठी।।तु.गा.३६९२.००३।।
देव बराडी देव बराडी। घाली देंठासाठीं उडी।।तु.गा.३६९३.००१।।

देव भ्याड देव भ्याड। राखें बळीचे कवाड।।तु.गा.३६९३.००२।।
देव भाविक देव भाविक। होय दासांचा सेवक।।तु.गा.३६९३.००३।।
देव होया देव होया। जैसा म्हणे तैसा तया।।तु.गा.३६९३.००४।।
देव लहान देव लहान। तुका म्हणे अनुरेण।।तु.गा.३६९३.००५।।
देव दयाळ देव दयाळ। साहे कोल्हाळ बहुतांचा।।तु.गा.३६९४.००१।।
देव उदार देव उदार। थोड्यासाटीं फार देऊं जाणे।।तु.गा.३६९४.००२।।
देव चांगला देव चांगला। तुका लागला चरणीं।।तु.गा.३६९४.००३।।
देव भला देव भला । मिळोनि जाय तैसा त्याला।।तु.गा.३६९५.००१।।
देव उदार उदार। देतां नाहीं थोडें फार।।तु.गा.३६९५.००२।।
देव बळी देव बळी। जोडा नाहीं भूमंडळीं।।तु.गा.३६९५.००३।।
देव व्हावा देव व्हावा। आवडे तो सर्वां जीवां।।तु.गा.३६९५.००४।।
देव चांगला देव चांगला । तुका चरणीं लागला।।तु.गा.३६९५.००५।।
देव पाहों देव पाहों। उंच ठायीं उभें राहों।।तु.गा.३६९६.००१।।
देव देखिला देखिला। तो नाहीं कोणा भ्याला।।तु.गा.३६९६.००२।।
देवासी कांहीं मागों मागों। जीव भाव त्यासी सांगों।।तु.गा.३६९६.००३।।
देव जाणे देव जाणे। पुरवी मनींचिये खुणे।।तु.गा.३६९६.००४।।
देव कातर देव कातर। तुका म्हणे अभ्यंतर।।तु.गा.३६९६.००५।।
देव आमचा आमचा। जीव सकळ जीवांचा।।तु.गा.३६९७.००१।।
देव आहे देव आहे। जवळी आम्हां अंतरबाहे।।तु.गा.३६९७.००२।।
देव गोड देव गोड। पुरवी कोडाचेंही कोड।।तु.गा.३६९७.००३।।
देव आम्हां राखे राखे। घाली कळिकाळासी काखें।।तु.गा.३६९७.००४।।
देव दयाळ देव दयाळ। करी तुक्याचा सांभाळ।।तु.गा.३६९७.००५।।
देवाच्या प्रसादें करा रे भोजन। व्हाल कोण कोण अधिकारी ते।।तु.गा.३६९८.००१।।

ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट। नका मानूं वीट ब्रह्मरसीं।।तु.गा.३६९८.००२।।
अवघियांपुरतें वोसंडलें पात्र। अधिकार सर्वत्र आहे येथें।।तु.गा.३६९८.००३।।
इच्छादानी येथें ओळला समर्थ। अवघेंचि आर्त पुरवितो।।तु.गा.३६९८.००४।।
सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं। पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें।।तु.गा.३६९८.००५।।
तुका म्हणे पाक लक्ष्मुमीच्या हातें। कामारी सांगातें निरुपम।।तु.गा.३६९८.००६।।
देवाची ते खूण आला ज्याच्या घरा। त्याचे पडे चिरा संसारासी।।तु.गा.३६९९.००१।।
देवाची ते खूण करावें वाटोळें। आपणावेगळें राहों नेदी।।तु.गा.३६९९.००२।।
देवाची ते खूण गुंतों नेदी आशा। ममतेच्या पाशा शिवों नेदी।।तु.गा.३६९९.००३।।
देवाची ते खूण करावें तोंडाळ। आणिक सकळ जग हरी।।तु.गा.३६९९.००४।।
देवाची ते खूण झाला ज्यासी संग। त्याचा झाला भंग मनुष्यपणा।।तु.गा.३६९९.००५।।
देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा। लागों असत्याचा मळ नेदी।।तु.गा.३६९९.००६।।
पहा देवें तेंची बळकाविलें स्थळ। तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं।।तु.गा.३६९९.००७।।
प्रथमभेटी आलिंगण। मग चरण वंदावे।।तु.गा.३७००.००१।।
ऐसा माझा भोळा बाप। हरी ताप कवळोनि।।तु.गा.३७००.००२।।
न सांगतां शीण भाग । पांडुरंग जाणतसे।।तु.गा.३७००.००३।।
तुका म्हणे कृपावंतें। द्यावे भातें न मागतां।।तु.गा.३७००.००४।।
आवडीनें धरिलीं नांवें। प्रियभावें चिंतन।।तु.गा.३७०१.००१।।
वेडा झाला वेडा झाला। लांचावला भक्तीसी।।तु.गा.३७०१.००२।।
निचाड हा चाड धरी। तुळसी करीं दळ मागें।।तु.गा.३७०१.००३।।
धरिला मग न करी बळ। तुका म्हणे कळ पायीं।।तु.गा.३७०१.००४।।
देव राखे तया मारील कोण। न मोडे कांटा हिंडतां वन।।तु.गा.३७०२.००१।।
न जळे न बुडे नव्हे कांहीं। विष तेंही अमृत पाहीं।।तु.गा.३७०२.००२।।
न चुके वाट न पडे फंदीं। नव्हे कधीं यमबाधा।।तु.गा.३७०२.००३।।

तुका म्हणे नारायण। येतां गोळ्या वारी बाण ।।तु.गा.३७०२.००४ ।।
भक्त देवाघरिंचा सुना। देव भक्ताचा पोसणा ।।तु.गा.३७०३.००१ ।।
येर येरां जडलें कैसें। जीवा अंग जैसें तैसें ।।तु.गा.३७०३.००२ ।।
देव भक्ताची कृपाळु माता। भक्त देवाचा जनिता ।।तु.गा.३७०३.००३ ।।
तुका म्हणे अंगें। एक एकाचिया संगें ।।तु.गा.३७०३.००४ ।।
भक्ताविण देवा। कैंचें रूप घडे सेवा ।।तु.गा.३७०४.००१ ।।
शोभविलें येरयेरां। सोनें एके ठायीं हिरा ।।तु.गा.३७०४.००२ ।।
देवाविण भक्ता। कोण देतें निष्कामता ।।तु.गा.३७०४.००३ ।।
तुका म्हणे पुरवी बाळ । माता जैसें स्नेहजाळ ।।तु.गा.३७०४.००४ ।।
घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करीतो ।।तु.गा.३७०५.००१ ।।
भक्ता राखे पायापासीं । दुर्जनासी संहारी ।।तु.गा.३७०५.००२ ।।
अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ।।तु.गा.३७०५.००३ ।।
तुका म्हणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ।।तु.गा.३७०५.००४ ।।
करितां कोणाचेंही काज। नाहीं लाज देवासी ।।तु.गा.३७०६.००१ ।।
बरें करावें हें काम। धरिलें नाम दीनबंधु ।।तु.गा.३७०६.००२ ।।
करूनि अराणूक पाहे। भलत्या साह्य व्हावया ।।तु.गा.३७०६.००३ ।।
बोले तैसी करणी करी। तुका म्हणे एक हरी ।।तु.गा.३७०६.००४ ।।
कृपावंत किती। दीन बहु आवडती ।।तु.गा.३७०७.००१ ।।
त्यांचा भार वाहे माथां। करी योगक्षेमचिंता ।।तु.गा.३७०७.००२ ।।
भुलों नेदी वाट। करीं धरूनि दावी नीट ।।तु.गा.३७०७.००३ ।।
तुका म्हणे जीवें। अनुसरल्या एक भावें ।।तु.गा.३७०७.००४ ।।
एवढा प्रभू भावें । तेणें संपुष्टीं रहावें ।।तु.गा.३७०८.००१ ।।
होय भक्ती केला तैसा। पुरवी धरावी ते इच्छा ।।तु.गा.३७०८.००२ ।।

एवढा जगदानी। मागे तुळसीदळ पाणी ।।तु.गा.३७०८.००३।।
आला नांवारूपा । तुका म्हणे झाला सोपा।।तु.गा.३७०८.००४।।
अनंत ब्रह्मांडें । एकें रोमीं ऐसें धेंडें ।।तु.गा.३७०९.००१।।
तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ।।तु.गा.३७०९.००२।।
मारिले दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ।।तु.गा.३७०९.००३।।
तुका म्हणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ।।तु.गा.३७०९.००४।।
लाभ पुढें करी। घात नारायण वारी।।तु.गा.३७१०.००१।।
ऐसी भक्तांची माउली। करी कृपेची साउली।।तु.गा.३७१०.००२।।
माया बाळकासी। जीव भाव वेंची तैसी।।तु.गा.३७१०.००३।।
तुका म्हणे नाड। नाहीं शरणागता आड।।तु.गा.३७१०.००४।।
शूरत्वासी मोल। नये कामा फिके बोल।।तु.गा.३७११.००१।।
केला न संडी कैवाड। जीवेंसाठीं तों हे होड।।तु.गा.३७११.००२।।
धीर तो कारण। साह्य होतो नारायण।।तु.गा.३७११.००३।।
तुका म्हणे हरि। दासां रक्षितो निर्धारीं।।तु.गा.३७११.००४।।
सत्य सत्य देतो फळ। नाहीं लागतचि बळ।।तु.गा.३७१२.००१।।
ध्यावे देवाचे ते पाय। धीर सकळ उपाय।।तु.गा.३७१२.००२।।
करावीच चिंता। नाहीं लागत तत्त्वता।।तु.गा.३७१२.००३।।
तुका म्हणे भावें। होतें सकळ बरवें।।तु.गा.३७१२.००४।।
भाविकां हें वर्म सांपडलें निकें। सेंविती कवतुकें धणीवरि।।तु.गा.३७१३.००१।।
इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें। वंदितील पदें सकुमारें।।तु.गा.३७१३.००२।।
विसरले मुक्ति भक्तिच्या अभिळासें। ओढत सरिसें सुख आलें।।तु.गा.३७१३.००३।।
तुका म्हणे नाहीं मागायाची आस। पांडुरंग त्यास विसंबेना।।तु.गा.३७१३.००४।।
चित्तीं नाहीं आस। त्याचा पांडुरंग दास।।तु.गा.३७१४.००१।।

असे भक्तांचिये घरीं। काम न सांगतां करी।।तु.गा.३७१४.००२।।
अनाथाचा बंधु। अंगीं असे हा संबंधु।।तु.गा.३७१४.००३।।
तुका म्हणे भावें। देवा सत्ता राबवावें ।।तु.गा.३७१४.००४।।
वैद्य एक पंढरिराव। अंतर्भाव तो जाणे।।तु.गा.३७१५.००१।।
रोगाऐशा द्याव्या वल्ली। जाणे झाली बाधा ते।।तु.गा.३७१५.००२।।
नेदी रूका वेंचों मोल। पाहे बोल प्रीतीचे।।तु.गा.३७१५.००३।।
तुका म्हणे दयावंता। सदा चिंता दीनांची।।तु.गा.३७१५.००४।।
अभिमानी पांडुरंग। गोवा काशाचा हो मग।।तु.गा.३७१६.००१।।
अनुसरा लवलाहीं। नका विचार करूं कांहीं।।तु.गा.३७१६.००२।।
कोठें राहातील पापें। झालिया हो अनुतापें।।तु.गा.३७१६.००३।।
तुका म्हणे येचि घडी। उभ्या पावईल थडी।।तु.गा.३७१६.००४।।
भय हरिजनीं। कांहीं न धरावें मनीं।।तु.गा.३७१७.००१।।
नारायणा ऐसा सखा। काय जगाचा हा लेखा।।तु.गा.३७१७.००२।।
चित्त वित्त हेवा। समर्पून राहा देवा।।तु.गा.३७१७.००३।।
तुका म्हणे मन। असों द्यावें समाधान।।तु.गा.३७१७.००४।।
मधुरा उत्तरासवें नाहीं चाड। अंतरंगीं वाढ प्रेम असो।।तु.गा.३७१८.००१।।
प्राणावेगळा न करी नारायण। मग नसो ज्ञान मूर्ख बरा।।तु.गा.३७१८.००२।।
जननिंदा होय तो बरा व्यापार। थोरवीचा भार कामा नये।।तु.गा.३७१८.००३।।
तुका म्हणे भाव निष्ठावंत चित्तीं। दया क्षमा शांती सर्वांभूतीं।।तु.गा.३७१८.००४।।
न करावी चिंता। भय न धरावें सर्वथा।।तु.गा.३७१९.००१।।
दासां साहे नारायण। होय रक्षिता आपण।।तु.गा.३७१९.००२।।
नलगे परिहार। कांहीं योजावें उत्तर।।तु.गा.३७१९.००३।।
न धरावी शंका। नये बोलों म्हणे तुका।।तु.गा.३७१९.००४।।

पाववील ठाया। पांडुरंग चिंतिलिया।।तु.गा.३७२०.००१।।
त्यासी चिंतिलिया मनीं। चित्ता करी गंवसणी।।तु.गा.३७२०.००२।।
पावावयां फळ। अंगीं असावें हें बळ।।तु.गा.३७२०.००३।।
तुका म्हणे तईं। सिद्धि वोळगती पायीं।।तु.गा.३७२०.००४।।
धीर नव्हे मनें। काय तयापाशीं उणें।।तु.गा.३७२१.००१।।
भार घातलियावरी। दासां नुपेक्षील हरी।।तु.गा.३७२१.००२।।
याच्या ऐसी आटी। द्यावी द्रव्याचिये साटी।।तु.गा.३७२१.००३।।
तुका म्हणे पोटें। देवा बहु केलें खोटें।।तु.गा.३७२१.००४।।
वर्णावे ते किती। केले पवाडे श्रीपति।।तु.गा.३७२२.००१।।
विश्वासिया घडे लाभ। देइल तरी पद्मनाभ।।तु.गा.३७२२.००२।।
भाव शुद्ध तरी। सांगितलें काम करी।।तु.गा.३७२२.००३।।
तुका म्हणे भोळा देव। परि हा नागवी संदेह।।तु.गा.३७२२.००४।।
याचा तंव हाचि मोळा। देखिला डोळा उदंड।।तु.गा.३७२३.००१।।
नेदी मग फिरों मागें। अंगा अंग संचरे।।तु.गा.३७२३.००२।।
कां गा याची नेणां खोडी। जीभा जोडी करितसे।।तु.गा.३७२३.००३।।
पांघरे तें बहु काळें। घोंगडेंही ठायींचें।।तु.गा.३७२३.००४।।
अंगीं वसेचि ना लाज। न म्हणे भाज कोणाची।।तु.गा.३७२३.००५।।
सर्वसाक्षी अबोल्यानें। दुश्चित कोणे नसावें।।तु.गा.३७२३.००६।।
तुका म्हणे धरिला हातीं। मग निश्चिंती हरीनें।।तु.गा.३७२३.००७।।
पाचारितां धांवे। ऐसी ठायींची ही सवे।।तु.गा.३७२४.००१।।
बोले करूणावचनीं। करी कृपा लावी स्तनीं।।तु.गा.३७२४.००२।।
जाणे कळवळा। भावसिद्धींचा सोहळा।।तु.गा.३७२४.००३।।
तुका म्हणे नाम। मागें मागें धांवे प्रेम।।तु.गा.३७२४.००४।।

विश्वंभरा वोळे। बहुत हात कान डोळे।।तु.गा.३७२५.००१।।
जेथें असे तेथें देखे। मागितलें तें आईके।।तु.गा.३७२५.००२।।
जें जें वाटे गोड। तैसें पुरवितो कोड।।तु.गा.३७२५.००३।।
तुका म्हणे भेटी। कांहीं पडो नेदी तुटी।।तु.गा.३७२५.००४।।
देव भक्तालागीं करूं नेदी संसार। अंगें वारावार करोनि ठेवी।।तु.गा.३७२६.००१।।
भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा। म्हणोनि करंटा करोनि ठेवी।।तु.गा.३७२६.००२।।
स्त्री द्यावी गुणवंती तीपें गुंते आशा। यालागीं कर्कशा करूनि ठेवी।।तु.गा.३७२६.००३।।
तुका म्हणे साक्ष मज आली देखा। आणीक या लोकां काय सांगो।।तु.गा.३७२६.००४।।
करीं ऐसीं धांवाधांवी। चित्त लावीं चरणापें।।तु.गा.३७२७.००१।।
मग तो माझा मायबाप। घेइल ताप हिरूनी।।तु.गा.३७२७.००२।।
बहुतांच्या मतें गोवा। होऊं जीवा नेदावा।।तु.गा.३७२७.००३।।
तुका म्हणे करूणाबोलें। धीर विठ्ठलें निघेना।।तु.गा.३७२७.००४।।
जाणे अंतरींचा भाव। तोचि करितो उपाव।।तु.गा.३७२८.००१।।
नलगे सांगावें मागावें। जीवें भावें अनुसरावें।।तु.गा.३७२८.००२।।
अविनाश घ्यावें। फळ धीर धरोनि।।तु.गा.३७२८.००३।।
बाळा न मागतां भोजन। माता घाली पाचारून।।तु.गा.३७२८.००४।।
तुका म्हणे तरी। एकीं लंघियेले गिरी।।तु.गा.३७२८.००५।।
काळाचिये सत्ता ते नाहीं घटिका। पंढरीनायका आठवितां।।तु.गा.३७२९.००१।।
सदा काळ गणना करी आयुष्याची। कथेचे वेळेची आज्ञा नाहीं।।तु.गा.३७२९.००२।।
याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति। आहे हे त्रीजगतीं थोर वाट।।तु.गा.३७२९.००३।।
तुका म्हणे जन्मा आलियाचें फळ। स्मरावा गोपाळ तेंचि खरें।।तु.गा.३७२९.००४।।
सत्य संकल्पाचा दाता नारायण। सर्व करी पूर्ण मनोरथ।।तु.गा.३७३०.००१।।
येथें अळंकार शोभती सकळ। भावबळें फळ इच्छेचें तें।।तु.गा.३७३०.००२।।

अंतरींचें बीज जाणे कळवळा। व्यापक सकळां ब्रह्मांडाचा।।तु.गा.३७३०.००३।।
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी। प्राप्त काळ घडी आल्याविण।।तु.गा.३७३०.००४।।
मायबापें सांभाळिती। लोभाकारणें पाळिती।।तु.गा.३७३१.००१।।
तैसा नव्हे देवराव। त्याचा कृपाळू स्वभाव।।तु.गा.३७३१.००२।।
मनासारिखें न होतां। बाळकासी मारी माता।।तु.गा.३७३१.००३।।
तुका म्हणे सांगूं किती। बाप लेंकासी मारिती।।तु.गा.३७३१.००४।।
न मिळती एका एक। जये नगरींचे लोक।।तु.गा.३७३२.००१।।
भलीं तेथें राहूं नये। क्षणें होईल न कळे काय।।तु.गा.३७३२.००२।।
न करितां अन्याय। बळें करीती अपाय।।तु.गा.३७३२.००३।।
नाहीं पुराणाची प्रीति। ठायीं ठायीं पंचाइती।।तु.गा.३७३२.००४।।
भल्या बुऱ्या मारी। होतां कोणी न विचारी।।तु.गा.३७३२.००५।।
अविचाऱ्या हातीं। देऊनि प्रजा नागविती।।तु.गा.३७३२.००६।।
तुका म्हणे दरी। सुखें सेवावी ते बरी।।तु.गा.३७३२.००७।।
लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा। न कळे ओंगळा उपदेश।।तु.गा.३७३३.००१।।
वचनचर्येची न कळे चांचणी। ऐसीं संघष्टनी अमंगळ।।तु.गा.३७३३.००२।।
समय न कळे वेडगळ बुद्धि। विजाती ते शुद्धि चांच चाट।।तु.गा.३७३३.००३।।
तुका म्हणे याचा धिक्कारचि बरा। बहुमति खराहूनि हीन।।तु.गा.३७३३.००४।।
हेंदऱ्याचे भरितां कान। हलवी मान भोंक रितें।।तु.गा.३७३४.००१।।
नाहीं मी येथें सांगों स्पष्ट। भावें नष्ट घेत नाहीं।।तु.गा.३७३४.००२।।
अवगुणी बाटलें चित्त। तया हित आतळें ना।।तु.गा.३७३४.००३।।
तुका म्हणे फजितखोरा। म्हणतां बरा उगा रहा।।तु.गा.३७३४.००४।।
अतित्याई बुडे गंगे। पाप लागे त्याचें त्या।।तु.गा.३७३५.००१।।
हें तों आपुलिया गुणें। असे जेणें योजिलें।।तु.गा.३७३५.००२।।

अवचटें अग्नि जाळी। न सांभाळी तो दु:ख पावे।।तु.गा.३७३५.००३।।
जैसें तैसें दावी आरसा। नकट्या कैसा पालटे।।तु.गा.३७३५.००४।।
गेला तरी जावो सुखें नरकासी। कळंकी याविशीं शिवों नये।।तु.गा.३७३६.००१।।
रजस्वला करी वेलासी आघात। अंतर तों हित दुरी बरें।।तु.गा.३७३६.००२।।
उगीच कां आलीं नासवावीं फळें। विटाळ विटाळें कालवूनि।।तु.गा.३७३६.००३।।
तुका म्हणे लोणी घालोनि शेणांत। उपेगाची मात काय असे।।तु.गा.३७३६.००४।।
जीवींचें जाणावें या नांवें आवडी। हेकड तें ओढी अमंगळ।।तु.गा.३७३७.००१।।
चित्ताच्या संकोचें कांहींच न घडे। अतिशयें वेडे चार तेचि।।तु.गा.३७३७.००२।।
काळाविण कांहीं नाहीं रूचों येत। करूनि संकेत ठेवियेला।।तु.गा.३७३७.००३।।
तुका म्हणे कळे वचनें चांचणी। काय बोलवूनि वेळोवेळां।।तु.गा.३७३७.००४।।
वेशा नाहीं बोल अवगुणा दूषिलें। ऐशा बोला भले झणीं क्षोभा।।तु.गा.३७३८.००१।।
कोण नेणे अन्न जीवाचें जीवन। विष मेळवण विष होय।।तु.गा.३७३८.००२।।
सोनें शुद्ध नेणे कोण हा विचार। डांकें हीनवर केलें त्यासी।।तु.गा.३७३८.००३।।
याती शुद्ध परि अधम लक्षण। वायां गेलें तेणें सोंग हित।।तु.गा.३७३८.००४।।
तुका म्हणे शूर तोचि पावे मान। आणीक मंडण भार वाही।।तु.गा.३७३८.००५।।
आचरणा ठाव। नाहीं अंगीं स्वतां भाव।।तु.गा.३७३९.००१।।
करवी आणिकांचे घात। खोडी काढूनि पंडित।।तु.गा.३७३९.००२।।
श्वानाचिया परी। मिष्टान्नासी विटाळ करी।।तु.गा.३७३९.००३।।
तुका म्हणे ऐसा। सटवेची ना पांचा दिसां।।तु.गा.३७३९.००४।।
तेज्या इशारती। तट्टा फोकावरी घेती।।तु.गा.३७४०.००१।।
काय सांगावें त्याहुनि। ऐका रे धरा मनीं।।तु.गा.३७४०.००२।।
नव्हे भांडखोर। धरूं ओढोनि पदर।।तु.गा.३७४०.००३।।
तुका म्हणे तोंड। काळें करा खालीं मुंड।।तु.गा.३७४०.००४।।

हरि ॐ तत्सदिती सूत्राचें जें सार। कृपेचा सागर पांडुरंग।।तु.गा.३७४१.००१ ।।
हरि ॐ दत्त उदात्त अनुदात्त। प्रचुररहित पांडुरंग।।तु.गा.३७४१.००२।।
सर्वस्व व्यापिलें सर्वाही निराळें। वेदाचें जें मूळ तुका म्हणे।।तु.गा.३७४१.००३।।
पाहतां तंव एकला दिसे। कैसा असे व्यापक।।तु.गा.३७४२.००१ ।।
ज्याचें त्याचें मिळणीं मिळे। तरी खेळे बहुरूपी।।तु.गा.३७४२.००२।।
जाणिवेचें नेदी अंग। दिसों रंग निवडेना।।तु.गा.३७४२.००३।।
तुका म्हणे हेचि ठायीं। हें तों नाहीं सर्वत्र।।तु.गा.३७४२.००४।।
जीवाचे जीवन अमृताची तनु। ब्रह्मांडभूषणु नारायण।।तु.गा.३७४३.००१ ।।
सुखाचा सांगात अंतकासी अंत। निजाचा निवांत नारायण।।तु.गा.३७४३.००२।।
गोडाचेंही गोड हर्षाचेंही कोड। प्रीतीचाही लाड नारायण।।तु.गा.३७४३.००३।।
भावाचा निज भाव नांवांचाही नांव। अवघा पंढरिराव अवतरलासे।।तु.गा.३७४३.००४।।
तुका म्हणे जें हें साराचेंही सार। माझा अंगीकार तेणें केला।।तु.गा.३७४३.००५।।
जयापासोनि सकळ। महीमंडळ हें झालें।।तु.गा.३७४४.००१ ।।
तो एक पंढरीचा राणा। नये अनुमाना श्रुतीसी।।तु.गा.३७४४.००२।।
विवादती जयासाठीं। जगजेठी तो विठ्ठल।।तु.गा.३७४४.००३।।
तुका म्हणे आकळ। आहे सकळ व्यापक।।तु.गा.३७४४.००४।।
पाहा रे हें दैवत कैसें। भक्तिपिसें भाविका।।तु.गा.३७४५.००१ ।।
पाचारिल्यासरिसें पावे। ऐसी सवे बराडी।।तु.गा.३७४५.००२।।
शुष्ककाष्ठीं गुरगुरी। लाज हरि न धरितां।।तु.गा.३७४५.००३।।
तुका म्हणे अर्धनारी। ऐसीं धरीं रुपडीं हा।।तु.गा.३७४५.००४।।
देव जाणता देव जाणता। आपलिया सत्ता एकाएकीं।।तु.गा.३७४६.००१ ।।
देव चतुर देव चतुर। जाणोनि अंतर वर्ततसे ।।तु.गा.३७४६.००२।।
देव निराळा देव निराळा। अलिप्त विटाळा तुका म्हणे।।तु.गा.३७४६.००३।।

ब्रह्म न लिंपे त्या मेळें। कर्मा अकर्मावेगळें।।तु.गा.३७४७.००१।।
तोचि एक तया जाणे। पावे अनुभविलें खुणें।।तु.गा.३७४७.००२।।
शौच अशौचाचे संधी। तन आळा तनामधीं।।तु.गा.३७४७.००३।।
पापपुण्या नाहीं ठाव। तुका म्हणे सहज भाव ।।तु.गा.३७४७.००४।।
लक्षूनियां योगी पाहाती आभास। तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें।।तु.गा.३७४८.००१।।
कर दोनी कटीं राहिलासे उभा। सांवळी हे प्रभा अंगकांती।।तु.गा.३७४८.००२।।
व्यापूनि वेगळें राहिलेंसें दुरी। सकळा अंतरीं निर्विकार।।तु.गा.३७४८.००३।।
रूप नाहीं रेखा नामही जयासी। आपुल्या मानसीं शिव ध्याय।।तु.गा.३७४८.००४।।
अंत नाहीं पार वर्णां नाहीं थार। कुळा याति शिर हस्त पाद।।तु.गा.३७४८.००५।।
अचेत चेतलें भक्तीचिया सुखें। आपुल्या कौतुकें तुका म्हणे।।तु.गा.३७४८.००६।।
तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती। राहिल्या त्या श्रुती मौनपणें।।तु.गा.३७४९.००१।।
मौनपणें वाचा थोंटावल्या चारी। ऐसें तुझें हरी रूप आहे।।तु.गा.३७४९.००२।।
रूप तुझें ऐसें डोळां न देखवे। जेथें हे झकवे ब्रह्मादिक।।तु.गा.३७४९.००३।।
ब्रह्मादिक देवा कर्माची कचाटी। म्हणोनि आटाटी फार त्यांसी।।तु.गा.३७४९.००४।।
तुका म्हणे तुझें गुण नाम रूप। आहेसी अमूप वाणूं काई।।तु.गा.३७४९.००५।।
स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा। तेथें माझा धंदा कोणीकडे।।तु.गा.३७५०.००१।।
परी हे वैखरी गोडावली सुखें। रसना रस मुखें इच्छीतसे।।तु.गा.३७५०.००२।।
रूप वर्णावया कोठें पुरे मती। रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं।।तु.गा.३७५०.००३।।
तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा। ऐसी तंव वाचा झाली नाहीं।।तु.गा.३७५०.००४।।
ज्याचे गर्जतां पवाडे। श्रुतिशास्त्रां मौन पडे।।तु.गा.३७५१.००१।।
तेथें माझी वाचा किती। पुरे करावया स्तुति।।तु.गा.३७५१.००२।।
शिणलीं सहस्त्र तोंडें । शेष फणी ऐसें धेंडें।।तु.गा.३७५१.००३।।
तुका म्हणे मही। पत्र सिंधु न पुरे शाई।।तु.गा.३७५१.००४।।

आवडीसारिखें संपादिलें सोंग। अनंत हीं मग झालीं नामें।।तु.गा.३७५२.००१ ।।
कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा। दुर्गम या नभाचाही साक्षी।।तु.गा.३७५२.००२ ।।
हातें जेवी एक मुखें मागें घांस। माउली जयास तैसी बाळा।।तु.गा.३७५२.००३ ।।
तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी। तैसीच गोजिरी दिसे मूर्ति।।तु.गा.३७५२.००४ ।।
तुज वर्णीं ऐसा तुजविण नाहीं। दुजा कोणी तीही त्रिभुवनीं।।तु.गा.३७५३.००१ ।।
सहस्त्रमुखें शेष शिणला बापुडा। चिरलिया धडा जिव्हा त्याच्या।।तु.गा.३७५३.००२ ।।
अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा। निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा।।तु.गा.३७५३.००३ ।।
रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा। होसी भाव तैसा त्याकारणें।।तु.गा.३७५३.००४ ।।
तुका म्हणे जरी दाविसी आपणा। तरिच नारायणा कळों येसी।।तु.गा.३७५३.००५ ।।
जाणोनि नेणतें करी माझें मन। तुझी प्रेमखूण देऊनियां।।तु.गा.३७५४.००१ ।।
मग मी व्यवहारीं असेन वर्तत। जेवीं जळा आंत पद्मपत्र।।तु.गा.३७५४.००२ ।।
ऐकोनि नाइकें निंदास्तुती कानीं । जैसा कां उन्मनीं योगिराज।।तु.गा.३७५४.००३ ।।
देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी। स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या जेवीं।।तु.गा.३७५४.००४ ।।
तुका म्हणे ऐसें जालियावांचून। करणें तो शीण वाटतसें।।तु.गा.३७५४.००५ ।।
उपाधिवेगळे तुम्ही निर्विकार। कांहींच संसार तुम्हां नाहीं।।तु.गा.३७५५.००१ ।।
ऐसें मज करूनि ठेवा नारायणा। समूळ वासना नुरवावी।।तु.गा.३७५५.००२ ।।
नि:संग तुम्हांसी राहणें एकट। नाहीं कटकट साहों येत।।तु.गा.३७५५.००३ ।।
तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा। रंगासी सकळा स्फटिकाची।।तु.गा.३७५५.००४ ।।
पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें। संकल्प ते मनें जिरवले।।तु.गा.३७५६.००१ ।।
चेष्टविलें तरी सांगावें कारण। भक्ती ते जीवन करावया।।तु.गा.३७५६.००२ ।।
लावूनियां दृष्टी घातली सामोरी। बैसली जिव्हारीं डसोन ते।।तु.गा.३७५६.००३ ।।
तुका म्हणे जीवा लाविला तो चाळा। करावें गोपाळा शीघ्र दान।।तु.गा.३७५६.००४ ।।
गायनाचे रंगीं। शक्ति अद्भुत हे अंगीं।।तु.गा.३७५७.००१ ।।

हें तों देणें तुमचें देवा। घ्यावी अखंडित सेवा।।तु.गा.३७५७.००२।।
अंगीं प्रेमाचें भरतें। नेघे उतार चढतें।।तु.गा.३७५७.००३।।
तुका म्हणे वाणी। प्रेम अमृताची खाणी।।तु.गा.३७५७.००४।।
आम्ही तरी आस। झालों टाकोनि उदास।।तु.गा.३७५८.००१।।
आतां कोण भय धरी। पुढें मरणाचें हरी।।तु.गा.३७५८.००२।।
भलते ठायीं पडो। देह तुरंगीं हा चढों।।तु.गा.३७५८.००३।।
तुमचें तुम्हापाशीं। आम्ही आहों जैसीं तैसीं।।तु.गा.३७५८.००४।।
गेले मानापान। सुखदु:खाचें खंडन।।तु.गा.३७५८.००५।।
तुका म्हणे चित्तीं। नाहीं वागवीत खंती।।तु.गा.३७५८.००६।।
आम्ही जाणों तुझा भाव। कैंचा भक्त कैंचा देव। बीजा नाहीं ठाव। कैंचें फळ शेवटीं।।तु.गा.३७५९.००१।।
संपादिलें बहु रूप। कैंचें पुण्य कैंचें पाप। नव्हतों आम्ही आप। आपणासी देखिलें।।तु.गा.३७५९.००२।।
एके ठायीं घरिच्याघरीं। न कळतां झाली चोरी। तेथेंचि तें दुरी। जाणें येणें खुंटले।।तु.गा.३७५९.००३।।
तुका म्हणे धरूनि हातीं। उरी ठेविली मागुती। एकांतीं लोकांतीं। देवभक्तसोहळा।।तु.गा.३७५९.००४।।
भोगावरि आम्हीं घातला पाषाण। मरणा मरण आणियेलें।।तु.गा.३७६०.००१।।
विश्व तूं व्यापक काय मी निराळा। काशासाठीं बळा येऊं आतां।।तु.गा.३७६०.००२।।
काय सारूनियां काढावें बाहेरी। आणूनि भीतरी काय ठेवूं।।तु.गा.३७६०.००३।।
केला तरी उरे वादच कोरडा। बळें घ्यावी पीडा स्वप्नींची ते।।तु.गा.३७६०.००४।।
अवघेचि वाण आले तुम्हां घरा। मजुरी मजुरा रोजकीर्दी।।तु.गा.३७६०.००५।।
तुका म्हणे कांहीं नेणें लाभ हानी। असेल तो धनी राखो वाडा।।तु.गा.३७६०.००६।।
तरुवर बीजापोटीं। बीज तरुवरा शेवटीं।।तु.गा.३७६१.००१।।
तैसें तुम्हां आम्हां झाले। एकीं एक सामावलें।।तु.गा.३७६१.००२।।
उदकावरील तरंग। तरंग उदकाचें अंग।।तु.गा.३७६१.००३।।
तुका म्हणे बिंबछाया। ठायीं पावली विलया।।तु.गा.३७६१.००४।।

क्षरला सागर गंगा ओघीं मिळे। आपणचि खेळे आपणाशीं ।।तु.गा.३७६२.००१ ।।
मधील ते वाव अवघी उपाधि। तुम्हां आम्हांमधीं तेचि परि ।।तु.गा.३७६२.००२ ।।
घट मठ झाले आकाशाचे पोटीं। वचनेंचि तुटी तेथेंचि ते ।।तु.गा.३७६२.००३ ।।
तुका म्हणे बीजें बीज दाखविलें। पत्र पुष्प आलें गेलें वायां ।।तु.गा.३७६२.००४ ।।
दूरि तोंचि होतों आपुलें आशंकें। नव्हतें ठाऊके मूळ भेद ।।तु.गा.३७६३.००१ ।।
आतां जेथें तेथें येईन सांगातें। लपायापुरतें उरों नेदी ।।तु.गा.३७६३.००२ ।।
मिथ्या मोहें मज लाविला उशीर। तरी हें अंतर झालें होतें ।।तु.गा.३७६३.००३ ।।
तुका म्हणे कां रे दाखविसी भिन्न। लटिकाची शीण लपंडाईं ।।तु.गा.३७६३.००४ ।।
लवण मेळवितां जळें। काय उरलें निराळें ।।तु.गा.३७६४.००१ ।।
तैसा समरस झालों। तुजमाजी हरपलों ।।तु.गा.३७६४.००२ ।।
अग्निकर्पूराच्या मेळीं। काय उरली काजळी ।।तु.गा.३७६४.००३ ।।
तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योती ।।तु.गा.३७६४.००४ ।।
तुज मज नाहीं भेद। केला सहज विनोद ।।तु.गा.३७६५.००१ ।।
तूं माझा आकार। मी तों तूंचि निर्धार ।।तु.गा.३७६५.००२ ।।
मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगें सेवा ।।तु.गा.३७६५.००३ ।।
मी तुजमाजी अचळ। मजमाजी तुझें बळ ।।तु.गा.३७६५.००४ ।।
तूं बोलसी माझ्या मुखें। मी तो तुजमाजी सुखें ।।तु.गा.३७६५.००५ ।।
तुका म्हणे देवा। विपरीत ठायीं नांवा ।।तु.गा.३७६५.००६ ।।
जें जें कांहीं करितों देवा। तें तें सेवा समर्पें ।।तु.गा.३७६६.००१ ।।
भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ।।तु.गा.३७६६.००२ ।।
आम्ही दुजें नेणों कोणा। हेंचि मना मन साक्ष ।।तु.गा.३७६६.००३ ।।
तुका म्हणे जगन्नाथा। हें अन्यथा नव्हे कीं ।।तु.गा.३७६६.००४ ।।
रज्जु धरूनियां हातीं। भेडसाविलीं नेणतीं। कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ।।तु.गा.३७६७.००१ ।।

तुम्हांआम्हांमध्यें हरी। झाली होती तैसी परी। मृगजळाचे पुरीं। ठाव पाहों तरावया।।तु.गा.३७६७.००२।।
सरी चिताक भोंवरी। अळंकाराचिया परी। नामें झालीं दुरी। एक सोनें आटितां।।तु.गा.३७६७.००३।।
पिसांची पारवीं। करोनि बाजेगिरी दावी। तुका म्हणे तेवीं। मज नको चाळवूं।।तु.गा.३७६७.००४।।
खडा रवाळी साकर। झाला नामाचाची फेर। न दिसे अंतर। गोडी ठायीं निवडतां।।तु.गा.३७६८.००१।।
तुम्ही आम्ही पांडुरंगा। भिन्न ऐसें काय सांगा। चाळविलें जगा। मी हें माझें यासाठीं।।तु.गा.३७६८.००२।।
पायीं हातीं नाकीं शिरीं। हेम राहे अळंकारीं। मुसे आल्यावरी। काय निवडे वेगळें।।तु.गा.३७६८.००३।।
निजलिया लाभ हानी। तोंच खरी ते स्वप्नीं। तुका म्हणे दोन्ही। निवारलीं जागतां।।तु.गा.३७६८.००४।।
अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा। पासूनि अंधारा दुरि झालों।।तु.गा.३७६९.००१।।
साक्षत्वें या झालों गुणाचा देखणा। करीं नारायणा तरी खरें।।तु.गा.३७६९.००२।।
आठवें विसरू पडियेला मागें। आलें तेचि भागें यत्न केलें।।तु.गा.३७६९.००३।।
तुका म्हणे माझा विनोद देवासी। आम्ही तुम्हां ऐसीं दोन्ही नव्हों।।तु.गा.३७६९.००४।।
धन्य मी मानीन आपुलें संचित। राहिलीसे प्रीत तुझे नामीं।।तु.गा.३७७०.००१।।
धन्य झालों आतां यासी संदेह नाहीं। न पडे या वाहीं काळा हातीं।।तु.गा.३७७०.००२।।
ब्रह्मरस करूं भोजन पंगती। संतांचे संगती सर्वकाळ।।तु.गा.३७७०.००३।।
तुका म्हणे पोट धालेंचि न धाय। खादलेंचि खाय आवडीनें।।तु.गा.३७७०.००४।।
कासयानें पूजा करूं केशीराजा। हाचि संदेह माझा फेडी आतां।।तु.गा.३७७१.००१।।
उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें। तेथें काय माझें वेंचे देवा।।तु.गा.३७७१.००२।।
गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ। तेथें मी दुर्बळ काय करूं।।तु.गा.३७७१.००३।।
फळदाता तूंच तांबोल अक्षता। तेथें काय आतां वाहों तुज।।तु.गा.३७७१.००४।।
वाहूं दक्षिणा तरी धातु नारायण। ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई।।तु.गा.३७७१.००५।।
गातां तूं ॐकार टाळी नादेश्वर। नाचावया थार नाहीं कोठें।।तु.गा.३७७१.००६।।
तुका म्हणे मज अवघें तुझें नाम। धूप दीप रामकृष्णहरि।।तु.गा.३७७१.००७।।
कवणाचें कारण नलगेचि कांहीं। सर्वी सर्वांठायीं तूं मज एक।।तु.गा.३७७२.००१।।

काया वाचा मन ठेविलें तुझ्या पायीं। आतां उरलें काई न दिसे देवा ।।तु.गा.३७७२.००२ ।।
कवणा पाषाणासी धरूनियां भाव। कवणावरी पाव ठेवूं आतां ।।तु.गा.३७७२.००३ ।।
म्हणऊनि निश्चिंत राहिलों मनीं। तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ।।तु.गा.३७७२.००४ ।।
जळें जळ काय धोविलें एक। कवण तें पातक हरलें तेथें ।।तु.गा.३७७२.००५ ।।
पापपुण्य हे वासना सकळ। ते तुज समूळ समर्पिली ।।तु.गा.३७७२.००६ ।।
पितरस्वरूपी तूंचि जनार्दन। सव्य तें कवण अपसव्य ।।तु.गा.३७७२.००७ ।।
तुका म्हणे जीत पिंड तुझे हातीं। देऊनि निश्चिंती मानियेली ।।तु.गा.३७७२.००८ ।।
जन्ममरणाची विसरलों चिंता। तूं माझा अनंता मायबाप ।।तु.गा.३७७३.००१ ।।
होतील ते डोळां पाहेन प्रकार। भय आणि भार निसरलीं ।।तु.गा.३७७३.००२ ।।
लिगाडाचे मुळें होती पंचभूतें। ज्याचें त्यापुरतें विभागिलें ।।तु.गा.३७७३.००३ ।।
तुका म्हणे झाला प्रपंच पारिखा। जिवासी तूं सखा पांडुरंग ।।तु.गा.३७७३.००४ ।।
वंदीन मी भूतें। आतां अवघींचि समस्तें ।।तु.गा.३७७४.००१ ।।
तुमची करीन भावना। पदोपदीं नारायणा ।।तु.गा.३७७४.००२ ।।
गाळूनियां भेद। प्रमाण तो ऐसा वेद ।।तु.गा.३७७४.००३ ।।
तुका म्हणे मग। नव्हे दुजियाचा संग ।।तु.गा.३७७४.००४ ।।
जेथें जेथें जासी। तेथें मजचि तूं पाहासी ।।तु.गा.३७७५.००१ ।।
ऐसा पसरीन भाव। रिता नाहीं कोणी ठाव ।।तु.गा.३७७५.००२ ।।
चित्त जडलें पायीं। पाळती हें ठायीं ठायीं ।।तु.गा.३७७५.००३ ।।
तुका म्हणे पोटीं। देवा घालूनि सांगे गोष्टी ।।तु.गा.३७७५.००४ ।।
आम्ही न देखों अवगुणां। पापी पवित्र शहाणा ।।तु.गा.३७७६.००१ ।।
अवघीं रूपें तुझीं देवा। वंदूं भावें करूं सेवा ।।तु.गा.३७७६.००२ ।।
मज भक्तीसवें चाड। नेणें पाषाण धातु वाड ।।तु.गा.३७७६.००३ ।।
तुका म्हणे घोटीं। विष अमृत तुजसाठीं ।।तु.गा.३७७६.००४ ।।

तुज करितां होते ऐसे। मूढ चतुर पंडित पिसे।।तु.गा.३७७७.००१।।
परि हें वर्म नेणती कोणी। पीडा खाणी भोगितील।।तु.गा.३७७७.००२।।
उल्लंघिती पांगुळ गिरी। मुकें करी अनुवाद।।तु.गा.३७७७.००३।।
पापी होती पुण्यवंत। न करी घात दुर्जन।।तु.गा.३७७७.००४।।
अवघें हेळामात्रें हरि। मुक्त करी ब्रह्मांड।।तु.गा.३७७७.००५।।
तुका म्हणे खेळे लीळा। पाहे वेगळा व्यापुनि।।तु.गा.३७७७.००६।।
कडसणी धरितां अडचणीचा ठाव। म्हणऊनि जीव त्रासलासे।।तु.गा.३७७८.००१।।
लौकिकाबाहेरि राहिलों निराळा। तुजविण वेगळा नाहीं दुजा।।तु.गा.३७७८.००२।।
संकोचानें नाहीं होत धणीवरी। उरवूनि उरी काय काज।।तु.गा.३७७८.००३।।
तुका म्हणे केले इच्छेची सारिखें। नाहींसे पारिखें येथें कोणी।।तु.गा.३७७८.००४।।
अंतरायें पडे गोविंदीं अंतर। जो जो घ्यावा भार तो तो बाधी।।तु.गा.३७७९.००१।।
बैसलिये ठायीं आठवीन पाय। पाहीन तो ठाय तुझा देवा।।तु.गा.३७७९.००२।।
अखंड तें खंडें संकल्पीं विकल्प। मनोजन्य पाप रज्जुसर्प।।तु.गा.३७७९.००३।।
तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे। राहों ऐसें दशे सुखरूप।।तु.गा.३७७९.००४।।
माझिया देहाची मज नाहीं चाड। कोठें करूं कोड आणिकांचें।।तु.गा.३७८०.००१।।
इच्छिताती मान मागा देवापाशीं । असा संचितासी गुंतले हो ।।तु.गा.३७८०.००२।।
देह आम्हीं केला भोगाचे सांभाळीं । राहिलों निराळीं मानामाना ।।तु.गा.३७८०.००३।।
तुका म्हणे कोणें वेंचावें वचन । नसतां तो शीण वाढवावा ।।तु.गा.३७८०.००४।।
बोळविला देह आपुलेनि हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ।।तु.गा.३७८१.००१।।
एकवेळें झालें सकळ कारण। आतां नारायण नारायण।।तु.गा.३७८१.००२।।
अमृतसंजीवनी निवविली खाई। अंगें तये ठायीं हारपलीं।।तु.गा.३७८१.००३।।
एकादशीविध जागरण उपवास। बारावा दिवस भोजनाचा।।तु.गा.३७८१.००४।।
अवघीं कर्में झालीं घटस्फोटापाशीं। संबंध एकेसी उरला नामीं।।तु.गा.३७८१.००५।।

तुका म्हणे आतां आनंदीं आनंदु। गोविंदें गोविंदु विस्तारला ।।तु.गा.३७८१.००६ ।।
नलगे मरावें। ऐसा ठाव दिला देवें ।।तु.गा.३७८२.००१ ।।
माझ्या उपकारासाठीं। वागविला म्हूण कंठीं ।।तु.गा.३७८२.००२ ।।
घरीं दिला ठाव। अवघा सकळही वाव ।।तु.गा.३७८२.००३ ।।
तुका म्हणे एके ठायीं। केलें माझें तुझें नाहीं ।।तु.गा.३७८२.००४ ।।
एकाएकीं आतां असावेंसें वाटें। तरिच हे खोटे चाळे केले ।।तु.गा.३७८३.००१ ।।
वाजवूनि तोंड घातलें बाहेरी। कुल्प करूनि दारीं माजी वसा ।।तु.गा.३७८३.००२ ।।
उजेडाचा केला दाटोनि अंधार। सवें हुद्देदार चेष्टविला ।।तु.गा.३७८३.००३ ।।
तुका म्हणे भय होतें तोंचि वरी। होती कांहीं उरी स्वामिसेवा ।।तु.गा.३७८३.००४ ।।
सोसोनि विपत्ती। जोडी दिली तुझे हातीं ।।तु.गा.३७८४.००१ ।।
त्याचा हाचि उपकार। अंतीं आम्हाशीं वेव्हार ।।तु.गा.३७८४.००२ ।।
नामरूपा केला ठाव। तुज कोण म्हणते देव ।।तु.गा.३७८४.००३ ।।
तुका म्हणे हरी। तुज ठाव दिला घरीं ।।तु.गा.३७८४.००४ ।।
जेथें देखें तेथें उभा। अवघ्या गगनाचा गाभा ।।तु.गा.३७८५.००१ ।।
डोळां बैसलें बैसलें। ध्यान राहोनि संचलें ।।तु.गा.३७८५.००२ ।।
सरसावलें मन। केले सोज्वळ लोचन ।।तु.गा.३७८५.००३ ।।
तुका म्हणे सवें। आतां असिजेत देवें ।।तु.गा.३७८५.००४ ।।
हेचि तुझी पूजा। आतां करीन केशीराजा ।।तु.गा.३७८६.००१ ।।
अवघीं तुझींच ही पदें। नमस्कारीन अभेदें ।।तु.गा.३७८६.००२ ।।
न वर्जित दिशा। जाय तेथेंचि सरिसा ।।तु.गा.३७८६.००३ ।।
नव्हे एकदेशी। तुका म्हणे गुणदोषी।।तु.गा.३७८६.००४ ।।
वेठी ऐसा भाव। न करी आहाच उपाव ।।तु.गा.३७८७.००१ ।।
रूप डसवीन जीवा। अवघा येच ठायीं हेवा ।।तु.गा.३७८७.००२ ।।

कृपणाचे परी। लेखा पळ निमेष वरी।।तु.गा.३७८७.००३।।
तुका म्हणे असा। संनिधचि जगदीशा।।तु.गा.३७८७.००४।।
नेलें सळेंबळें। चित्तावित्ताचें गांठोळें।।तु.गा.३७८८.००१।।
साह्य झालीं घरिच्या घरीं। होतां ठायींच कुठोरी।।तु.गा.३७८८.००२।।
मी पातलों या भावा। कपट तें नेणें देवा।।तु.गा.३७८८.००३।।
तुका म्हणे उघडें केलें। माझें माझ्या हातें नेलें।।तु.गा.३७८८.००४।।
एक वेळे केलें रितें कलेवर। आतां दिली थार पांडुरंगा।।तु.गा.३७८९.००१।।
पाळण पोषण नलगे ते सोई। देहाचे ते काई सर्वभाव।।तु.गा.३७८९.००२।।
माझिया मरणें झाली हे वसती। लागली ते ज्योती अविनाश।।तु.गा.३७८९.००३।।
झाला ऐसा एका घायें येथें नाहीं। तुका ऐसें कांहीं बोलों नये।।तु.गा.३७८९.००४।।
नटनाट्य तुम्हीं केलें याचसाठीं। कवतुकें दृष्टी निववावी।।तु.गा.३७९०.००१।।
नाहीं तरि काय कळलेंचि आहे। वाघ आणि गाय लांकडाची।।तु.गा.३७९०.००२।।
अभेदचि असे मांडियेलें खेळा। केल्या दीपकळा बहु एकी।।तु.गा.३७९०.००३।।
तुका म्हणे रूप नाहीं दर्पणांत। संतोषाची मात दुसरें तें।।तु.गा.३७९०.००४।।
मुसावलें अंग। रंगीं मेळविला रंग।।तु.गा.३७९१.००१।।
एकीं एक दृढ झालें। मुळा आपुलिया आलें।।तु.गा.३७९१.००२।।
सागरीं थेंबुटा। पडिल्या निवडे कोण्या वाटा।।तु.गा.३७९१.००३।।
तुका म्हणे नवें। नव्हे जाणावें हें देवें।।तु.गा.३७९१.००४।।
तुझे पाय माझें राहियेलें चित्तीं। ते मज दाविती वर्म देवा।।तु.गा.३७९२.००१।।
आम्हां अंधा तुझ्या पायांचा आधार। जाणसी विचार चालवितां।।तु.गा.३७९२.००२।।
मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ। हें तों माझें बळ नव्हे देवा।।तु.गा.३७९२.००३।।
पापपुण्य भेद नाशिलें तिमिर। त्रिगुणें शरीर सांडियेलें।।तु.गा.३७९२.००४।।
तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा। मी जाणें दातारा शरणागत।।तु.गा.३७९२.००५।।

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हातीं धरूनियां ।।तु.गा.३७९३.००१ ।।
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार। चालविसी भार सवें माझा ।।तु.गा.३७९३.००२ ।।
बोलों जातां बरळ करिसी तें नीट। नेली लाज धीट केलों देवा ।।तु.गा.३७९३.००३ ।।
अवघे जन मज झाले लोकपाळ। सोईरे सकळ प्राणसखे ।।तु.गा.३७९३.००४ ।।
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें। झालें तुझें सुख अंतर्बाहीं ।।तु.गा.३७९३.००५ ।।
रूपीं जडले लोचन। पायीं स्थिरावलें मन ।।तु.गा.३७९४.००१ ।।
देहभाव हरपला। तुज पाहातां विठ्ठला ।।तु.गा.३७९४.००२ ।।
कळों नये सुखदुःख। तहान हरपली भूक ।।तु.गा.३७९४.००३ ।।
तुका म्हणे नव्हे परती। तुझ्या दर्शनें मागुती ।।तु.गा.३७९४.००४ ।।
तेव्हां होतों भोगाधीन। तुम्हां भिन्न पासुनि ।।तु.गा.३७९५.००१ ।।
आतां बोलों नये ऐसें। अनारिसे वेगळें ।।तु.गा.३७९५.००२ ।।
सन्मुख झालों स्वामीकडे। भव आंगडे निराळें ।।तु.गा.३७९५.००३ ।।
चिंतिलें तें चिंतामणी। फिटे धणी तों द्यावे ।।तु.गा.३७९५.००४ ।।
सहज स्थिति आहे अंगीं। प्रसंगीं ते वंचेना ।।तु.गा.३७९५.००५ ।।
तुमची देवा धरिली कास। केला नास प्रपंचा ।।तु.गा.३७९५.००६ ।।
तुका म्हणे जाणोनि वर्मे। कर्माकर्में ठेविलीं ।।तु.गा.३७९५.००७ ।।
देव सखा आतां केलें नव्हे काई। येणें सकळहीं सोइरींच ।।तु.गा.३७९६.००१ ।।
भाग्यवंत झालों गोतें सपुरतीं। आतां पुण्या नीति पार नाहीं ।।तु.गा.३७९६.००२ ।।
पाहातां दिसती भरलीया दिशा। ठसावला ठसा लोकत्रयीं ।।तु.गा.३७९६.००३ ।।
अविनाश जोडी आम्हां भाग्यवंता। झाली होती सत्ता संचिताची ।।तु.गा.३७९६.००४ ।।
पायांवरी डोई ठेवाया आरोथा। झाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ।।तु.गा.३७९६.००५ ।।
तुका म्हणे जीव पावला विसांवा। म्हणवितां देवा तुमचींसीं ।।तु.गा.३७९६.००६ ।।
तेणें सुखें माझें निवविलें अंग। विठ्ठल हें जग देखियेलें ।।तु.गा.३७९७.००१ ।।

कवतुकें करूणा भाकीतसें लाडें। आवडी बोबडें बोलोनियां।।तु.गा.३७९७.००२।।
मज नाहीं दशा अंतरीं दु:खाची। भावना भेदाची सर्व गेली।।तु.गा.३७९७.००३।।
तुका म्हणे सुख झालें माझ्या जीवा। रंगलों केशवा तुझ्या रंगें।।तु.गा.३७९७.००४।।
दिला जीवभाव। तेव्हां सांडिला म्यां ठाव।।तु.गा.३७९८.००१।।
आतां वर्ते तुझी सत्ता। तेथें सकळ अनंता।।तु.गा.३७९८.००२।।
माझिया मरणें। तुम्हीं बैसविलें ठाणें ।।तु.गा.३७९८.००३।।
तुका म्हणे कांहीं। मी हें माझें येथें नाहीं।।तु.गा.३७९८.००४।।
आपुलिया काजा। आम्हीं सांडियेलें लाजा।।तु.गा.३७९९.००१।।
तुम्हां असों जागवीत। आपुलिया हातीं हित।।तु.गा.३७९९.००२।।
तुम्हीं देहशून्य। आम्हां कळे पापपुण्य।।तु.गा.३७९९.००३।।
सांगायासी लोकां। उरउरीत उरला तुका।।तु.गा.३७९९.००४।।
पदोपदीं दिलें अंग। झालें सांग कारण।।तु.गा.३८००.००१।।
रुधवूनि ठेलों ठाव। जागा वाव सकळ।।तु.गा.३८००.००२।।
पुढती चाली मना लाहो। वाढे देहो संतोष।।तु.गा.३८००.००३।।
तुका म्हणे क्षरभागीं। झालों जगीं व्यापक।।तु.गा.३८००.००४।।
तुझें अंगभूत। आम्ही जाणतों समस्त।।तु.गा.३८०१.००१।।
येरा वाटतसे जना। गुढारसें नारायणा।।तु.गा.३८०१.००२।।
ठावा थारा मारा। घरचिया संवचोरा।।तु.गा.३८०१.००३।।
तुका म्हणे भेदाभेद। करूनि करितसें वाद।।तु.गा.३८०१.००४।।
नाहीं मज कोणी उरला दुर्जन। मायबापाविण ब्रह्मांडात।।तु.गा.३८०२.००१।।
कासया जिकीर करणें येविसीं। भयाची मानसीं चिंता खंती।।तु.गा.३८०२.००२।।
विश्वंभराचिये लागलों सांभाळीं। सत्तेनें ती चाली आपुलिये।।तु.गा.३८०२.००३।।
तुका म्हणे माझें पाळण पोषण। करितां आपण पांडुरंगा।।तु.गा.३८०२.००४।।

जो वितो तो माझा पिता। उखता तो उखत्याचा ।।तु.गा.३८०३.००१ ।।
जनार्दनीं सरती कर्में । बाधा भ्रमें अन्यत्र ।।तु.गा.३८०३.००२ ।।
अपसव्य सव्यामधीं। ऐसी शुद्धी न धरितां ।।तु.गा.३८०३.००३ ।।
तुका म्हणे खांद्या पानें। सिंचितां भिन्न कोरडीं ।।तु.गा.३८०३.००४ ।।
चित्ताचा चाळक। त्याचें उभय सूत्र एक ।।तु.गा.३८०४.००१ ।।
नाचवितो नाचेछंदें। सुखें आपुल्या विनोदें ।।तु.गा.३८०४.००२ ।।
चंद्र कमळणी। नाहीं धाडीत सांगोनि ।।तु.गा.३८०४.००३ ।।
तुका म्हणे उठी। लोह चुंबकाचे दृष्टी ।।तु.गा.३८०४.००४ ।।
काय नाहीं माझे अंतरीं वसति। व्यापक हा भूतीं सकळां नांदे ।।तु.गा.३८०५.००१ ।।
चित्तासी प्रसाद होईल चळण। तेंचि तें वळण मनासही ।।तु.गा.३८०५.००२ ।।
सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंठित। नाहीं केलें होत आपुलें तें ।।तु.गा.३८०५.००३ ।।
तुका म्हणे दोरी खांबसूत्र्या हातीं। नाचवी नाचती जडें तैसीं ।।तु.गा.३८०५.००४ ।।
चित्त तें चिंतन कल्पनेची धांव। जे जे वाढे हांव इंद्रियांची ।।तु.गा.३८०६.००१ ।।
हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ।।तु.गा.३८०६.००२ ।।
रवीचिये अंगीं प्रकाश सकळां। वचनें निराळा भेद दिला ।।तु.गा.३८०६.००३ ।।
तुका म्हणे माप वचनाच्या अंगीं। मौन्य काय रंगीं निवडावें ।।तु.गा.३८०६.००४ ।।
परिसाचें अंगें सोनें झाला विळा। वाकणिया कळाहीन नव्हे ।।तु.गा.३८०७.००१ ।।
अंतरीं पालट घडला कारण। मग समाधान तेंचि गोड ।।तु.गा.३८०७.००२ ।।
पिकलिया सेंद पूर्वकर्मा नये। अव्हेरू तो काय घडे मग ।।तु.गा.३८०७.००३ ।।
तुका म्हणे आणा पंगती सुरण। पृथक ते गुण केले पाकें ।।तु.गा.३८०७.००४ ।।
शुद्धाशुद्ध निवडे कैसें। चर्म मांस भिन्न नाहीं ।।तु.गा.३८०८.००१ ।।
कांहीं अधिक नाहीं उणें। कवण्या गुणें देवासी ।।तु.गा.३८०८.००२ ।।
उदक भिन्न असे काई। वोहोळ बावी सरिता नई ।।तु.गा.३८०८.००३ ।।

सूर्य तेजें निवडे काय। रश्मी रसा सकळा खाय।।तु.गा.३८०८.००४।।
वर्णां भिन्न दुधा नाहीं । सकळा गाईं सारखें।।तु.गा.३८०८.००५।।
करितां भिन्न नाहीं माती। मडक्या गति भिन्न नांवें।।तु.गा.३८०८.००६।।
वर्ते एकविध अग्नि। नाहीं मनीं शुद्धाशुद्ध।।तु.गा.३८०८.००७।।
तुका म्हणे पात्र चाड। किंवा विष अमृत गोड।।तु.गा.३८०८.००८।।
घालुनियां मापीं। देव भक्त बैसले जपीं।।तु.गा.३८०९.००१।।
तैसीं होते सांडउलंडी। निजनिजांची मुर्कंडी।।तु.गा.३८०९.००२।।
अमुपीं उखतें। आपण वोस आपणयातें।।तु.गा.३८०९.००३।।
देव आतां झाला। उगवी संकोच वहिला।।तु.गा.३८०९.००४।।
अखंड नेलें वेठी। भार सत्याविण गांठी।।तु.गा.३८०९.००५।।
आडकिला झोंपा। रिता कलेवराचा खोंपा।।तु.गा.३८०९.००६।।
गोदातीरीं आड। करिते करवितें द्वाड।।तु.गा.३८०९.००७।।
तुका म्हणे बळें। उपदेशाचें तोंड काळें।।तु.गा.३८०९.००८।।
ब्रह्मरूपाची कर्मे ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती।।तु.गा.३८१०.००१।।
ठेविलिया दिसे रंगीऐसी शिळा। उपाधि निराळा स्फटिक मणि।।तु.गा.३८१०.००२।।
नानाभाषामतें आळवितां बाळा। प्रबोध तो मूळा जननीठायीं।।तु.गा.३८१०.००३।।
तुका म्हणे माझें नमन जाणतियां। लागतसे पायां वेळोवेळां।।तु.गा.३८१०.००४।।
स्वयें पाक करी। संशय तोचि धरी। संदेहसागरीं। आणिकां परी बुडविती।।तु.गा.३८११.००१।।
जाणे विरळा एक। झाले तेथेचि हें सुख। देखिलें बहुतेक। पुसतां वाट चुकले।।तु.गा.३८११.००२।।
तोचि जाणे सोंवळें। शोधी विकल्पाचीं मुळें। नाचती पाल्हाळें। जे विटाळे कोंडिले।।तु.गा.३८११.००३।।
तोचि साधी संधी। सावध त्रिकाळ जो बुद्धि। संदेहाच्या संधी। वेठी आणीक धरियेले।।तु.गा.३८११.००४।।
अखंड तें ध्यान। समबुद्धि समाधान। सोंग वायांविण। ते झांकुन बैसती।।तु.गा.३८११.००५।।
करणें जयासाठीं। जो नातुडे कवणे आटी। तुका म्हणे साटी । चित्तवित्तेंवाचूनि।।तु.गा.३८११.००६।।

प्रसिद्ध हा असे जगा। अवघ्या रंगारंगाचा।।तु.गा.३८१२.००१।।
तरी वाटा न वजे कोणी। नारायणीं घरबुडीं।।तु.गा.३८१२.००२।।
बहुतां ऐसें केलें मागें। लाग लागें लागेना।।तु.गा.३८१२.००३।।
हो कां नर अथवा नारी। लहान थोरीं आदर।।तु.गा.३८१२.००४।।
झालें वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ।।तु.गा.३८१२.००५।।
कळेना तो आहे कैसा। कोणी दिशा बहु थोडा।।तु.गा.३८१२.००६।।
तुका म्हणे दुसऱ्या भावें। छाया नांवें न देखवे।।तु.गा.३८१२.००७।।
नाहीं रूप नाहीं नांव। नाहीं ठाव धराया।।तु.गा.३८१३.००१।।
जेथें जावें तेथें आहे। विठ्ठल मायबहीण।।तु.गा.३८१३.००२।।
नाहीं आकार विकार। चराचर भरलेंसे।।तु.गा.३८१३.००३।।
नव्हे निर्गुण सगुण। जाणे कोण तयासी।।तु.गा.३८१३.००४।।
तुका म्हणे भावाविण। त्याचें मन वोळेना।।तु.गा.३८१३.००५।।
अनुसरे तो अमर झाला। अंतरला संसारा।।तु.गा.३८१४.००१।।
न देखती गर्भवास। कधीं दास विष्णूचे।।तु.गा.३८१४.००२।।
विसंबेना माता बाळा। तैसा लळा पाळावा।।तु.गा.३८१४.००३।।
त्रिभुवनीं ज्याची सत्ता। तुकया रक्षिता तो जाला।।तु.गा.३८१४.००४।।
पंडित तोचि एक भला। नित्य भजे जो विठ्ठला।।तु.गा.३८१५.००१।।
अवघें सम ब्रह्म पाहे। सर्वां भूतीं विठ्ठल आहे।।तु.गा.३८१५.००२।।
रिता नाहीं कोणी ठाव। सर्वां भूतीं वासुदेव।।तु.गा.३८१५.००३।।
तुका म्हणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष।।तु.गा.३८१५.००४।।
देवें देऊळ सेविलें। उदक कोरडेंचि ठेविलें।।तु.गा.३८१६.००१।।
नव्हे मत गूढ उमान कांहीं। तूं आपआपणापें पाहीं।।तु.गा.३८१६.००२।।
पाटें पूर वोसंडला। सरिता सागर तुंबोनि ठेला।।तु.गा.३८१६.००३।।

वांझें घरीं बाळ तान्हा । एक बाळी दो कांना ।।तु.गा.३८१६.००४ ।।
तुका म्हणे पैस। अनुभविया ठावा गोडी रस ।।तु.गा.३८१६.००५ ।।
सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा। न लिंपे विटाळा अग्नि जैसा ।।तु.गा.३८१७.००१ ।।
सत्यवादी करी संसार सकळ। अलिप्त कमळ जळीं जैसें ।।तु.गा.३८१७.००२ ।।
घडे ज्या उपकार भूतांची ते दया। आत्मस्थिति तया अंगीं वसे ।।तु.गा.३८१७.००३ ।।
न बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनी तो जनीं जनार्दन ।।तु.गा.३८१७.००४ ।।
तुका म्हणे वर्म जाणितल्याविण। पावे करितां शीण सांडीमांडी ।।तु.गा.३८१७.००५ ।।
आहे सकळां वेगळा। खेळे कळा चोरोनि ।।तु.गा.३८१८.००१ ।।
खांबसूत्राचिये परी। देव दोरी हालवितो ।।तु.गा.३८१८.००२ ।।
आपण राहोनि निराळा। कैसी कळा नाचवी ।।तु.गा.३८१८.००३ ।।
जेव्हां असुडितो दोरी। भुमीवरी पडे तेव्हां ।।तु.गा.३८१८.००४ ।।
तुका म्हणे तो जाणावा। सखा करावा आपला ।।तु.गा.३८१८.००५ ।।
संवसार तीहीं केला पाठमोरा। नाहीं द्रव्यदारा जया चित्तीं ।।तु.गा.३८१९.००१ ।।
शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं। जनार्दन जगीं होऊनि ठेला ।।तु.गा.३८१९.००२ ।।
तुका म्हणे देह दिला एकसरें। जयासी दुसरें नाहीं मग ।।तु.गा.३८१९.००३ ।।
भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं। तया घरीं शांति क्षमा दया ।।तु.गा.३८२०.००१ ।।
अष्ट महासिद्धि वोळगती द्वारीं। नवजती दूरी दवडितां ।।तु.गा.३८२०.००२ ।।
तेथे दुष्ट गुण न मिळे निःशेष। चैतन्याचा वास झाला माजी ।।तु.गा.३८२०.००३ ।।
संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ। तुटली हळहळ त्रिगुणाची ।।तु.गा.३८२०.००४ ।।
तुका म्हणे त्याचा देव सर्व भार। चालवी कामार होउनियां ।।तु.गा.३८२०.००५ ।।
देव तिहीं बळें धरिला सायासें। करूनियां नास उपाधीचा ।।तु.गा.३८२१.००१ ।।
पूर्वपक्षी धातु धिक्कारिलें जन। स्वयें जनार्दन तेचि झाले ।।तु.गा.३८२१.००२ ।।
तुका म्हणे यासी न चले तांतडी। अनुभवें गोडी येईल कळों ।।तु.गा.३८२१.००३ ।।

मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं। बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंता ।।तु.गा.३८२२.००१ ।।
सुख पावे शांती धरूनि एकांत। दु:खी तो लोकांत दंभ करी ।।तु.गा.३८२२.००२ ।।
तुका म्हणे लागे थोडाच विचार। परी हे प्रकार नागविती ।।तु.गा.३८२२.००३ ।।
भूतांचिये नांदे जीवीं। गोसावीच सकळां ।।तु.गा.३८२३.००१ ।।
क्षणक्षणां जागा ठायीं। दृढ पायीं विश्वास ।।तु.गा.३८२३.००२ ।।
दावूनियां सोंग दुजें। अंतर बीजें वसतसे ।।तु.गा.३८२३.००३ ।।
तुका म्हणे जाणें धर्म। धरी तें वर्म चिंतन ।।तु.गा.३८२३.००४ ।।
अग्नीमाजी पडे धातु। लीन होऊनि राहे आंतु ।  होय शुद्ध न पावे घातु। पटतंतुप्रमाणें ।।तु.गा.३८२४.००१ ।।
बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघेंचि भूषण।  गर्व ताठा हें अज्ञान। मरण सवें वाहातसे ।।तु.गा.३८२४.००२ ।।
पुरें मातलिया नदी। लव्हाळा नांदे जीवनसंधी।  वृक्ष उन्मळोनि भेदी। परि तो कधीं भंगेना ।।तु.गा.३८२४.००३ ।।
हस्ती परदळ जो भंगी। तया पायीं न मरे मुंगी।  कोण जाय संगीं। पाणोवाणी तयाच्या ।।तु.गा.३८२४.००४ ।।
पिटितां घणें वरी सैरा। तया पोटीं राहे हिरा।  तैशा काय तगती गारा। तया थोरा होऊनि ।।तु.गा.३८२४.००५ ।।
लीन दीन हेचि सार। भव उतरावया पार।  बुडे माथां भार। तुका म्हणे वाहोनि ।।तु.गा.३८२४.००६ ।।
योग्याची संपदा त्याग आणि शांति। उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ।।तु.गा.३८२५.००१ ।।
येरयेरांवरी जायांचें उसणें। भाग्यस्थळीं देणें झाडा वेसीं ।।तु.गा.३८२५.००२ ।।
केलीया फावला ठायींचा तो लाहो। तृष्णेचा तो काहो कहवितो ।।तु.गा.३८२५.००३ ।।
तुका म्हणे  लाभ अकर्तव्या नांवें। शिवपद जीवें भोगिजेल ।।तु.गा.३८२५.००४ ।।
ओनाम्याच्या काळें। खडे मांडविले बाळें ।।तु.गा.३८२६.००१ ।।
तेंचि पुढें पुढें काई। मग लागलिया सोई ।।तु.गा.३८२६.००२ ।।
रज्जु सर्प होता। तोंवरी न कळतां ।।तु.गा.३८२६.००३ ।।
तुका म्हणे साचें। भय नाहीं बागुलाचें ।।तु.गा.३८२६.००४ ।।
आहे तें सकळ कृष्णासि अर्पण। न कळतां मन दुजें भावी ।।तु.गा.३८२७.००१ ।।
म्हणऊनी पाठी लागतील भुतें। येती गिवसीत पांचजणें ।।तु.गा.३८२७.००२ ।।

ज्याचें त्या वंचलें आठव न होतां। दंड या निमित्ताकारणें हा ।।तु.गा.३८२७.००३।।
तुका म्हणे काळें चेपियेला गळा। मी मी वेळोवेळा करीतसे।।तु.गा.३८२७.००४।।
देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव। तो तो वसे ठाव विश्वंभर।।तु.गा.३८२८.००१।।
लोभाचे संकल्प पळालियावरी। कैंची तेथें उरी पापपुण्या।।तु.गा.३८२८.००२।।
शुद्ध भक्ती मन झालिया निर्मळ। कुश्चळी विटाळ वज्रलेप।।तु.गा.३८२८.००३।।
तुका म्हणे ज्याचें तयासीच कळे। प्रांत येतो फळें कळों मग।।तु.गा.३८२८.००४।।
चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई। स्वहित तें ठायीं आपणापें।।तु.गा.३८२९.००१।।
मनासी विचार तोचि साच भाव। व्यापक हा देव अंतर्बाहीं।।तु.गा.३८२९.००२।।
शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार। उमटे साचार आणिके ठायीं।।तु.गा.३८२९.००३।।
भोगित्यासी काज अंतरींचें गोड। बाहिरल्या चाड नाहीं रंगें।।तु.गा.३८२९.००४।।
तुका म्हणे भाव शुद्ध हें कारण। भाट नारायण होईल त्याचा।।तु.गा.३८२९.००५।।
कुशळ वक्ता नव्हे जाणीव तो श्रोता। राहे भाव चित्ता धरोनियां।।तु.गा.३८३०.००१।।
धन्य तो जगीं धन्य तो जगीं। ब्रह्म तया अंगीं वसतसे ।।तु.गा.३८३०.००२।।
न धोवी तोंड न करी अंघोळी। जपे सदाकाळीं रामराम।।तु.गा.३८३०.००३।।
जप तप ध्यान नेणे योग युक्ती। कृपाळु जो भूतीं दयावंत।।तु.गा.३८३०.००४।।
तुका म्हणे होय जाणोनि नेणता। आवडे अनंता जीवाहूनि।।तु.गा.३८३०.००५।।
भूमि अवघी शुद्ध जाणा। अमंगळ हे वासना।।तु.गा.३८३१.००१।।
तैसे वोसपले जीव। सांडी नसतां अंगीं घाव।।तु.गा.३८३१.००२।।
जीव अवघे देव। खोटा नागवी संदेह।।तु.गा.३८३१.००३।।
तुका म्हणे शुद्ध। मग तुटलिया भेद।।तु.गा.३८३१.००४।।
निघालें दिवाळें। झालें देवांचे वाटोळें।।तु.गा.३८३२.००१।।
आतां वेंचूं नये वाणी। विचारावें मनिंच्या मनीं।।तु.गा.३८३२.००२।।
गुंडाळिलीं पोतीं। भीतरी लावियेली वाती।।तु.गा.३८३२.००३।।

तुका म्हणे करा। ऐसा राहे माजी घरा।।तु.गा.३८३२.००४।।
भूतीं भगवद्भाव। मात्रासहित जीव। अद्वैत तो ठाव। निरंजन एकला।।तु.गा.३८३३.००१।।
ऐसीं गर्जती पुराणें। वेदवाणी सकळ जन। संत गर्जतील तेणें। अनुभवें निर्भर।।तु.गा.३८३३.००२।।
माझें तुझें हा विकार। निरसतां एकंकार। नलगे कांहीं फार। विचारचि करणें।।तु.गा.३८३३.००३।।
तुका म्हणे दुजें। हें तों नाहींच सहजें। संकल्पाच्या काजें। आपेंआप वाढलें।।तु.गा.३८३३.००४।।
मुक्त होता परि बळें झाला बद्ध। घेउनियां छंद माझें माझें।।तु.गा.३८३४.००१।।
पाप पुण्य अंगीं घेतलें जडून। वर्म नेणें कोण करिता तो।।तु.गा.३८३४.००२।।
तुका म्हणे गेले व्यर्थ वायांविण। जैसा मृग शीण मृगजळीं।।तु.गा.३८३४.००३।।
प्रगटलें ज्ञान। नारायण भूतीं तें।।तु.गा.३८३५.००१।।
अनुभवचि घेऊं हावा। विनंती देवा करूनियां।।तु.गा.३८३५.००२।।
देखोवेखीं वदे वाणी। पडिल्या कानीं प्रमाण।।तु.गा.३८३५.००३।।
तुका म्हणे योगक्षेम। घडे तें वर्म साधावें।।तु.गा.३८३५.००४।।
देव आहे सुकाळ देशीं। अभाग्यासी दुर्भिक्ष।।तु.गा.३८३६.००१।।
नेणती हा करूं सांटा। भरले फांटा आडरानें।।तु.गा.३८३६.००२।।
वसवूनि असे घर। माग दूर घातला।।तु.गा.३८३६.००३।।
तुका म्हणे मन मुरे। मग जें उरे तेंचि तूं।।तु.गा.३८३६.००४।।
आहे ऐसा देव वदवावी वाणी। नाहीं ऐसा मनीं अनुभवावा।।तु.गा.३८३७.००१।।
आवडी आवडी कलेवरा कलेवरीं। वरिलें अंतरीं ताळा पडे।।तु.गा.३८३७.००२।।
अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी। रडे मागे तुटी हर्षयोगें।।तु.गा.३८३७.००३।।
तुका म्हणे एकें कळतें दुसरें। बरियानें बरें आहाचें आहाच।।तु.गा.३८३७.००४।।
होईल झाला अंगें देव जो आपण। तयासी हे जन अवघे देव।।तु.गा.३८३८.००१।।
येरांनीं सांगावीं रेमट कहाणीं। चित्ता रंजवणी करावया।।तु.गा.३८३८.००२।।
धाला आणिकांची नेणे तहानभूक। सुखें पाहे सुख आपुलिया।।तु.गा.३८३८.००३।।

तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव। शब्दांचें गौरव कामा नये ।।तु.गा.३८३८.००४।।
तेंही नव्हे जें करितां कांहीं। ध्याता ध्यायी तेंही नव्हे ।।तु.गा.३८३९.००१ ।।
तेंही नव्हे जें जाणवी जना। वाटे मना तेंही नव्हे ।।तु.गा.३८३९.००२ ।।
त्रास मानिजे कांटाळा। अशुभ वाचाळा तेंही नव्हे ।।तु.गा.३८३९.००३ ।।
तेंही नव्हे जें भोवतीं भोंवे। नागवें धावें तेंही नव्हें ।।तु.गा.३८३९.००४ ।।
तुका म्हणे एकचि आहे। सहजीं पाहें सहज ।।तु.गा.३८३९.००५ ।।
पहिली माझी ओवी ओवीन जगत्र। गाईन पवित्र पांडुरंग ।।तु.गा.३८४०.००१ ।।
दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें। जनीं वनीं भेटे पांडुरंग ।।तु.गा.३८४०.००२ ।।
तिसरी माझी ओवी तिला नाहीं ठाव। अवघाचि देव जनीं वनीं ।।तु.गा.३८४०.००३ ।।
चवथी माझी ओवी वैरिलें दळण। गाईन निधान पांडुरंग ।।तु.गा.३८४०.००४ ।।
पांचवी माझी ओवी माझिया माहेरा। गाईन निरंतरा पांडुरंगा ।।तु.गा.३८४०.००५ ।।
सहावी माझी ओवी साहाही आटली। गुरूमूर्ति भेटली पांडुरंग ।।तु.गा.३८४०.००६ ।।
सातवी माझी ओवी आठवीं वेळावेळां। बैसलासे डोळां पांडुरंग ।।तु.गा.३८४०.००७ ।।
आठवी माझी ओवी अठ्ठावीस युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ।।तु.गा.३८४०.००८ ।।
नववी माझी ओवी सरले दळण। चुकलें मरण संसारींचें ।।तु.गा.३८४०.००९ ।।
दहावी माझी ओवी दाहा अवतारा। न यावें संसारा तुका म्हणे ।।तु.गा.३८४०.०१० ।।
क्षणक्षणां सांभाळितों। साक्षी होतों आपुला ।।तु.गा.३८४१.००१ ।।
न घडवी पायीं तुटी। मनें मिठी घातली ।।तु.गा.३८४१.००२ ।।
विचार तो वचना आधीं । धरूनि शुद्धी ठेविली ।।तु.गा.३८४१.००३ ।।
तुका म्हणे मागें भ्यालों। तरी झालों जागृत ।।तु.गा.३८४१.००४ ।।
भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग। ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ।।तु.गा.३८४२.००१ ।।
देहाच्या निरसनें पाविजे या ठाया। माझी ऐसी काया जंव नव्हे ।।तु.गा.३८४२.००२ ।।
उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक। एकाविण एक कामा नये ।।तु.गा.३८४२.००३ ।।

तुका म्हणे मज कळते चांचणी। बडबडीची वाणी अथवा सत्य ।।तु.गा.३८४२.००४।।
देखीचा दिमाख शिकोनियां दावी। हिऱ्याऐसी केवीं गारगोटी ।।तु.गा.३८४३.००१।।
मर्यादा ते जाणे अरे अभागिया। देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ।।तु.गा.३८४३.००२।।
काय पडिलासी लटिक्याचे भरी। वोंवाळुनि थोरी परती सांडी ।।तु.गा.३८४३.००३।।
तुका म्हणे पुढें दिसतसे घात। करितों फजित म्हणऊनि ।।तु.गा.३८४३.००४।।
आधीं सोज्वळ करावा मारग। चालतां ते मग गोवी नाहीं ।।तु.गा.३८४४.००१।।
ऐसा चालोनियां आला शिष्टाचार। गोवीचा वेव्हार पापपुण्य ।।तु.गा.३८४४.००२।।
पळणें ते पळा सांडूनि कां बळें। उपाधीच्या मुळें लाग पावे ।।तु.गा.३८४४.००३।।
तुका म्हणे येथें शूर तो निवडे। पडिलें बापुडे काळचक्रीं ।।तु.गा.३८४४.००४।।
एकविध नारायण। तेथें विषमाचा शीण। पालटोंचि भिन्न। नये अणुप्रमाण ।।तु.गा.३८४५.००१।।
अवघें सारावें गाबाळ। चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ। एकाएकीं एकांत ।।तु.गा.३८४५.००२।।
कायावाचामन। स्वरूपींचे अनुसंधान। लक्ष भेदी बाण। येणेंपाडें लवलाहो ।।तु.गा.३८४५.००३।।
तुका म्हणे आळस निद्रा। येथें देउनियां चिरा। देउनियां धीरा। मिठी जाणा जागृती ।।तु.गा.३८४५.००४।।
शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान। करा मन सादर ।।तु.गा.३८४६.००१।।
रवि रसां सकळां शोषी। गुणदोषीं न लिंपे ।।तु.गा.३८४६.००२।।
कोणासवें नाहीं चोरी। सकळांवरी समत्व ।।तु.गा.३८४६.००३।।
सत्य तरी ऐसें आहे। तुका पाहे उपदेशीं ।।तु.गा.३८४६.००४।।
जें जें जेथें पावे। तें तें समर्पावें सेवे ।।तु.गा.३८४७.००१।।
सहज पूजा याचि नांवें। गळित अभिमान व्हावें ।।तु.गा.३८४७.००२।।
अवघें भोगिता गोसावी। आदीं अवसानीं जीवीं ।।तु.गा.३८४७.००३।।
तुका म्हणे शीण। न धरितां नव्हे भिन्न ।।तु.गा.३८४७.००४।।
अक्षरांचा श्रम केला। फळा आला तेणें तो ।।तु.गा.३८४८.००१।।
अवघियाचा तळ धरी। जीवा उरी नुरवुनी ।।तु.गा.३८४८.००२।।

फळलें तें लवे भारें । पिक खरें आलें तईं ।।तु.गा.३८४८.००३ ।।
तुका म्हणे हा गे देव। पुढें भाव सारावा ।।तु.गा.३८४८.००४ ।।
संदेह बाधक आपआपणातें। रज्जुसर्पवत भासतसे। भेऊनियां काय देखिलें येणें। मारें घायेंविण लोळतसे ।।तु.गा.३८४९.००१ ।।
आपणचि तारी आपणचि मारी। आपण उद्धरी आपणयां। शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय। विचारूनि पाहें मोकळिया ।।तु.गा.३८४९.००२ ।।
पापपुण्य कैसे भांजिले अंक। दशकाचा एक उरविला। जाणोनियां काय होतोसी नेणता। शून्य ठाव रिता नाहीं नाहीं ।।तु.गा.३८४९.००३ ।।
दुरा दृष्टी पाहें न्याहाळूनि। मृगजळा पाणी न म्हणे चाडा। धांवतांचि फुटे नव्हे समाधान। तुका म्हणे जाण पावे पीडा ।।तु.गा.३८४९.००४ ।।
आशा ते करविते बुद्धिचा तो लोप। संदेह तें पाप कैसें नव्हे ।।तु.गा.३८५०.००१ ।।
आपुला आपण करावा विचार। प्रसन्न तें सार मन ग्वाही ।।तु.गा.३८५०.००२ ।।
नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ। होतें ते निर्मळ शुद्ध बुद्ध ।।तु.गा.३८५०.००३ ।।
अंधळ्यासी नये देखण्याची चाली। चाले ऐसी बोली तुका बोले ।।तु.गा.३८५०.००४ ।।
साहोनियां टोले उरवावें सार। मग अंगीकार खऱ्या मोलें ।।तु.गा.३८५१.००१ ।।
भोगाचे सांभाळीं द्यावें कलेवर। संचिताची थार मोडूनियां ।।तु.गा.३८५१.००२ ।।
महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा। विटवावें नष्टा पंचभूतां ।।तु.गा.३८५१.००३ ।।
तुका म्हणे मग कैंचा संवसार। जयाचा आदर तेंचि व्हावें ।।तु.गा.३८५१.००४ ।।
भोग भोगावरी द्यावा। संचिताचा करूनी ठेवा ।।तु.गा.३८५२.००१ ।।
शांती धरणें जिवासाटीं। दशा उत्तम गोमटी ।।तु.गा.३८५२.००२ ।।
देह लेखावा असार। सत्य परउपकार ।।तु.गा.३८५२.००३ ।।
तुका म्हणे हे मिरासी। बुडी द्यावी ब्रह्मरसीं ।।तु.गा.३८५२.००४ ।।
नटनाट्य अवघें संपादिलें सोंग। भेद दाऊं रंग न पालटे ।।तु.गा.३८५३.००१ ।।
मांडियेला खेळ कौतुकें बहुरूप। आपलें स्वरूप जाणतसों ।।तु.गा.३८५३.००२ ।।
स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे। भाव दावी पिंवळे लाल संगें ।।तु.गा.३८५३.००३ ।।
तुका म्हणे आम्ही या जनाविरहित। होउनि निश्चिंत क्रीडा करूं ।।तु.गा.३८५३.००४ ।।
काय नव्हेसी तूं एक। देखों कासया पृथक ।।तु.गा.३८५४.००१ ।।

मुंग्या कैंचे मुंगळे। नटनाट्य तुझे चाळे।।तु.गा.३८५४.००२।।
जाली तरी मर्यादा। किंवा त्रासावें गोविंदा।।तु.गा.३८५४.००३।।
तुका म्हणे साचा। कोठें जासी हृदयींचा।।तु.गा.३८५४.००४।।
मज पाहातां हें लटिकें सकळ। कोठें मायाजाळ दावीं देवा।।तु.गा.३८५५.००१।।
कोणाचा कोणासी न धरें संबंध। आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं।।तु.गा.३८५५.००२।।
काढा जी आपुलें मोह बुंथी जाळें। नका लावूं बळें वेड आम्हां।।तु.गा.३८५५.००३।।
जीव शिव कांहीं ठेवियेलीं नांवें। सत्य तुम्हां ठावे असोनियां।।तु.गा.३८५५.००४।।
सेवेच्या अभिळासें न धराचि विचार। आम्हां दारोदार हिंडविलें ।।तु.गा.३८५५.००५।।
आहे तैसें आतां कळलियावरी। परतें सांडा दूरी दुजेपण।।तु.गा.३८५५.००६।।
तुका म्हणे काय छायेच्या अभिळासें। हंस पावे नाश तारांगणी।।तु.गा.३८५५.००७।।
आपुलें आपण जाणावें स्वहित। जेणें राहे चित्त समाधान।।तु.गा.३८५६.००१।।
बहुरंगें माया असे विखुरली। कुंठितचि चाली होतां बरी।।तु.गा.३८५६.००२।।
पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं। भाव विश्वंभरीं समर्पावा।।तु.गा.३८५६.००३।।
तुका म्हणे गेला फिटोनियां भेव। मग होतो देव मनाचाचि।।तु.गा.३८५६.००४।।
चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ। वाजवी खळाळ उदकासी।।तु.गा.३८५७.००१।।
सोपें वर्म परि मन नाहीं हातीं। हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा।।तु.गा.३८५७.००२।।
रविबिंब नाहीं तुटत उदका। छायेची ते नका सरी धरूं।।तु.गा.३८५७.००३।।
तुका म्हणे भय धरी रज्जुसाठीं। नाहीं साच पोटीं कळलें तों।।तु.गा.३८५७.००४।।
दुजें खंडे तरी। उरला तो अवघा हरि। आपणाबाहेरी। न लगे ठाव धुंडावा।।तु.गा.३८५८.००१।।
इतुलें जाणावया जाणा। कोड तरी मनें मना। पारधीच्या खुणा। जाणतेणेचि साधाव्या।।तु.गा.३८५८.००२।।
देह आधीं काय खरा। देहसंबंधपसारा। बुजगावणे चोरा। रक्षणसें भासतें।।तु.गा.३८५८.००३।।
तुका करी जागा। नको वासपूं वाउगा। आहेसि तूं अंगा। अंगीं डोळे उघडी।।तु.गा.३८५८.००४।।
मृगजळा काय करावा उतार। पावावया पार पैलथडी।।तु.गा.३८५९.००१।।

खापराचे होन खेळती लेंकुरें। काय त्या वेव्हारें लाभ हानी।।तु.गा.३८५९.००२।।
मंगळदायकें करिती कुमारी। काय त्यांची खरी सोयरीक।।तु.गा.३८५९.००३।।
स्वप्नींचें जें सुख दुःख झालें कांहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव।।तु.गा.३८५९.००४।।
सारी झाली मेली लटिकें वचन। बद्ध मुक्त शीण तुका म्हणे।।तु.गा.३८५९.००५।।
माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया। अंग आणि छाया जयापरी।।तु.गा.३८६०.००१।।
तोडितां न तुटे सारितां निराळी। लोटांगणतळीं हारपती।।तु.गा.३८६०.००२।।
दुजें नाही तेथें बळ कोणासाठीं । आणीक ते आटी विचाराची।।तु.गा.३८६०.००३।।
तुका म्हणे उंच वाढे उंचपणें। ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं।।तु.गा.३८६०.००४।।
सहज पावतां भगवंतीं। परि हीं विकल्पें परतीं। फुकाची हे चित्तीं। आठवण न धरिती।।तु.गा.३८६१.००१।।
हरि व्यापक सर्वगत। हा तंव मुख्यत्वें वेदांत। चिंतनासी चित्त। असों द्यावें सावध।।तु.गा.३८६१.००२।।
विरजाहोम याचि नांवें। देह नव्हे मी हें जाणावें। मग कां जी यावें। वरी लागे संकल्पा।।तु.गा.३८६१.००३।।
कामक्रोधें देह मळिण। स्वाहाकारीं कैंचें पुण्य। मंत्रीं पूजिलियां यज्ञानें। मुंडण नव्हेचि।।तु.गा.३८६१.००४।।
अनन्यभक्तीचे उपाय। ते या विठोबाचे पाय। ध्याइल तो काय। चुकों जाणे मारग।।तु.गा.३८६१.००५।।
आतां सांगे तुका। एक तुम्ही चुकों नका। सांडीमांडी धोका। शरण रिघतां गोमटे।।तु.गा.३८६१.००६।।
हेचि याच्या ऐसें मागावें दान। वंदुनि चरण नारायण।।तु.गा.३८६२.००१।।
धीर उदारींव निर्मळ निर्मत्सर। येणें सर्वेश्वर ऐसें नाव।।तु.गा.३८६२.००२।।
हाचि होईजेल याचिया विभागें। अनुभव अंगें अनुभविल्या।।तु.गा.३८६२.००३।।
जोडे तयाचे कां न करावें सायास। झाला तरि आळस दीनपणें।।तु.गा.३८६२.००४।।
फांवल्या मागें कां न घलावी धांव। धरिल्या तरि हांव बळ येतें।।तु.गा.३८६२.००५।।
तुका म्हणे घालूं खंडीमध्यें टाक। देवाचे हें एक करूनी घेऊं।।तु.गा.३८६२.००६।।
इच्छा चाड नाहीं। न धरीं संकोचही कांहीं।।तु.गा.३८६३.००१।।
उदका नेलें तिकडे जावें। केलें तैसें सहज व्हावें।।तु.गा.३८६३.००२।।
मोहरी कांदा ऊंस। एक वाफा भिन्न रस।।तु.गा.३८६३.००३।।

तुका म्हणे सुख। पीडा इच्छा पावे दुःख।।तु.गा.३८६३.००४।।
सर्वस्वाची साटी। तरिच देवासवें गांठी।।तु.गा.३८६४.००१।।
नाहीं तरी जया तैसा। भोग भोगविल इच्छा।।तु.गा.३८६४.००२।।
द्यावें तेंचि घ्यावें। म्हणऊनि ज्यावें जीवें।।तु.गा.३८६४.००३।।
तुका म्हणे उरी। मागें नुरवितां बरी।।तु.गा.३८६४.००४।।
अमर आहां अमर आहां। खरें कीं पहा खोटें हें।।तु.गा.३८६५.००१।।
न म्हणा देह माझा ऐसा। मग भरंवसा कळेल।।तु.गा.३८६५.००२।।
कैंचा धाक कैंचा धाक। सकळिक हें आपुलें।।तु.गा.३८६५.००३।।
देवचि बरे देवचि बरें। तुका म्हणे खरे तुम्ही।।तु.गा.३८६५.००४।।
सरतें माझें तुझें। तरि हें उतरतें ओझें।।तु.गा.३८६६.००१।।
नलगे सांडावें मांडावे। आहे शुद्धचि स्वभावें।।तु.गा.३८६६.००२।।
घातला तो आशा। मोहोजाळें गळां फासा।।तु.गा.३८६६.००३।।
सुखाचा तो मान। नाहीं दुःखाचा तो शीण।।तु.गा.३८६६.००४।।
करितां नारायण। एवढें वेंचितां वचन।।तु.गा.३८६६.००५।।
तैसा मान अपमान। लाभ हानि हें समान।।तु.गा.३८६६.००६।।
तुका म्हणे याचे । नांव सोंवळें हें साचें।।तु.गा.३८६६.००७।।
चित्ताचें बांधलें जवळी तें वसे। प्रकाशीं प्रकाशे सर्व काळ।।तु.गा.३८६७.००१।।
अंतरीं वसावी उत्तम ते भेटी। होऊं कांहीं तुटी न शकेची।।तु.गा.३८६७.००२।।
ब्रह्मांड कवळे आठवणेसाठीं। धरावा तो पोटीं वाव बरा।।तु.गा.३८६७.००३।।
तुका म्हणे लाभ घरिचिया घरीं। प्रेमतंतु दोरी न तुटतां।।तु.गा.३८६७.००४।।
नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी। नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो।।तु.गा.३८६८.००१।।
हर्षामर्षा अंगीं आदळती लाटा। कामक्रोधें तटा सांडियेलें।।तु.गा.३८६८.००२।।
न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं। उपरति नाहीं जेथें चित्ता।।तु.गा.३८६८.००३।।

तुका म्हणे सुख देहनिरसेनें। चिंतनें चिंतनें तद्रूपता ।।तु.गा.३८६८.००४ ।।
देह हा सादर पाहावा निश्चित। सर्व सुख येथें नाम आहे ।।तु.गा.३८६९.००१ ।।
ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें। शरीर तें झालें ब्रह्मरूप ।।तु.गा.३८६९.००२ ।।
यजन याजन तप व्रतें करिती। विकल्पें नागवती शुद्ध पुण्या ।।तु.गा.३८६९.००३ ।।
तुका म्हणे सर्व सुख येथें आहे। भ्रांति दूर पाहें टाकुनियां ।।तु.गा.३८६९.००४ ।।
साधावा तो देव सर्वस्वाचे साटीं। प्रारब्ध तुटी क्रियमाण ।।तु.गा.३८७०.००१ ।।
मग कासयानें पुन्हा संवसार। बीजाचे अंकुर दग्ध होती ।।तु.गा.३८७०.००२ ।।
जिणें दिल्हें त्यासी द्यावा पिंडदान। उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ।।तु.गा.३८७०.००३ ।।
तुका म्हणे निज भोगईल निजतां। नाहीं होईल सत्ता दुजियाची ।।तु.गा.३८७०.००४ ।।
विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म। भेदाभेदभ्रम अमंगळ ।।तु.गा.३८७१.००१ ।।
आइका जी तुम्ही भक्त भागवत। कराल तें हित सत्य करा ।।तु.गा.३८७१.००२ ।।
कोणाही जीवाचा न घडावा मत्सर। वर्म सर्वेश्वरपूजनाचें ।।तु.गा.३८७१.००३ ।।
तुका म्हणे एका देहाचे अवयव। सुख दुःख जीव भोग पावे ।।तु.गा.३८७१.००४ ।।
पुसावें तें ठाईं आपुल्या आपण। अहंकारा शून्य घालूनियां ।।तु.गा.३८७२.००१ ।।
येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान ते ।।तु.गा.३८७२.००२ ।।
फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ। उपनावें मूळ न पालटे ।।तु.गा.३८७२.००३ ।।
तुका म्हणे अवघे गव्हाचे प्रकार। सोने अळंकार मिथ्या नांव ।।तु.गा.३८७२.००४ ।।
पंचभूतांचा गोंधळ। केला एके ठायीं मेळ। लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ।।तु.गा.३८७३.००१ ।।
तेथें काय मी तें माझें। कोण वागवी तें ओझें। देहा केवीं रिझे। हें काळाचें भातुकें ।।तु.गा.३८७३.००२ ।।
जीवन देखें मरण। धरी नवी सांडी जीर्ण। संचित प्रमाण। भोग शुभा अशुभासी ।।तु.गा.३८७३.००३ ।।
इच्छा वाढविते वेल। खुंटावा तो खरा बोल। तुका म्हणे मोल। झांकलें तों पावेल ।।तु.गा.३८७३.००४ ।।
मी हें ऐसें काय जाती। अवघड किती पाहातां ।।तु.गा.३८७४.००१ ।।
नाहीं होत उल्लंघन। नसतां भिन्न दुसरें ।।तु.गा.३८७४.००२ ।।

अंधारानें तेज नेलें। दृष्टीखालें अंतर ।।तु.गा.३८७४.००३ ।।
तुका म्हणे सर्वे देव। घेतां ठाव दावील ।।तु.गा.३८७४.००४ ।।
मुक्त कासया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें ।।तु.गा.३८७५.००१ ।।
सुखें करितों कीर्तन। भय विसरलें मन ।।तु.गा.३८७५.००२ ।।
देखिजेना नास। घालूं कोणावरी कास ।।तु.गा.३८७५.००३ ।।
तुका म्हणे साहे। देव आहे तैसा आहे ।।तु.गा.३८७५.००४ ।।
रूप नांव माया बोलावया ठाव। भागा आले भाव तयापरी ।।तु.गा.३८७६.००१ ।।
शींव वाटे परी न खंडे पृथिवी। शाहाणे ते जीवीं समजती ।।तु.गा.३८७६.००२ ।।
पोटा आलें तिच्या लोळे मांडीवरी। पारखी न करी खंती चित्तीं ।।तु.गा.३८७६.००३ ।।
तुका म्हणे भक्तिसाठीं हरिहर। अरूपीच क्षरविभाग हे ।।तु.गा.३८७६.००४ ।।
सुख सुखा विरजण झालें। तें मथिलें नवनीत ।।तु.गा.३८७७.००१ ।।
हाले डोले हरूषें काया। निवती बाह्या नयन ।।तु.गा.३८७७.००२ ।।
प्रबळ तो नारायण। गुणें गुण वाढला ।।तु.गा.३८७७.००३ ।।
तुका म्हणे भरली शीग। वरी मग वोसंडे ।।तु.गा.३८७७.००४ ।।
कासया जी ऐसा माझे माथां ठेवा। भार तुम्ही देवा संतजन ।।तु.गा.३८७८.००१ ।।
विचित्र विंदानी नानाकळा खेळे। नाचवी पुतळे नारायण ।।तु.गा.३८७८.००२ ।।
काय वानराचे अंगीची ते शक्ति। उदका तरती वरी शिळा ।।तु.गा.३८७८.००३ ।।
तुका म्हणे करी निमित्यचि आड । चेष्टवूनि जड दावी पुढें ।।तु.गा.३८७८.००४ ।।
देवाची भांडारी। आदा विनियोग करी ।।तु.गा.३८७९.००१ ।।
आतां न माखे हातपाय। नेणों होतें कैसें काय ।।तु.गा.३८७९.००२ ।।
देवें नेली चिंता। झाला सकळ करिता ।।तु.गा.३८७९.००३ ।।
तुका म्हणे धणी। त्यासी अवघी पुरवणी ।।तु.गा.३८७९.००४ ।।
आतां येणेंविण नाहीं मज चाड। कोण बडबड करी वायां ।।तु.गा.३८८०.००१ ।।

सुख तेंचि दु:ख पुण्य पाप खरें। हें तों आम्हां बरें कळों आलें।।तु.गा.३८८०.००२।।
तुका म्हणे वाचा वाहिली अनंता। बोलायाचें आतां काम नाहीं।।तु.गा.३८८०.००३।।
बहुतां जातीचा केला अंगीकार। बहुतही फार सर्वोत्तमें।।तु.गा.३८८१.००१।।
सरलाचि नाहीं कोणाचिये वेंचे। अक्षोभ्य ठायीचें ठायीं आहे।।तु.गा.३८८१.००२।।
लागतचि नाहीं घेतां अंतपार। वसवी अंतर अणूचेंही।।तु.गा.३८८१.००३।।
तुका म्हणे केला होय ठाकी ऐसा। पुरवावी इच्छा धरिली तें।।तु.गा.३८८१.००४।।
नव्हे शब्द एक देशी। सांडी गिवशी कोणाला।।तु.गा.३८८२.००१।।
झाली माझी वैखरी। विश्वंभरी व्यापक।।तु.गा.३८८२.००२।।
मोकलिलें जावें बाणें। भाता जेणें वाहिला।।तु.गा.३८८२.००३।।
आतां येथें कैंचा तुका। बोले शिक्का स्वामीचा।।तु.गा.३८८२.००४।।
आपुलें तों कांहीं। येथें सांगिजेसें नाहीं।।तु.गा.३८८३.००१।।
परि हे वाणी वायचळे ।छंद करवितें बरळे।।तु.गा.३८८३.००२।।
पंचभूतांचा हा मेळा। देह सत्यत्वें निराळा।।तु.गा.३८८३.००३।।
तुका म्हणे भुली। इच्या उफराट्या चाली।।तु.गा.३८८३.००४।।
हीन शूर बुद्धीपासीं। आकृतीसी भेद नाहीं।।तु.गा.३८८४.००१।।
एक दांडी एक खांदी। पदोपदीं भोगणे।।तु.गा.३८८४.००२।।
एकाऐसें एक नाहीं। भिन्न पाहीं प्रकृती।।तु.गा.३८८४.००३।।
तुका म्हणे भूमी खंडे। पीक दंडे जेथें तें।।तु.गा.३८८४.००४।।
देवासी तो पुरे एकभाव गांठीं। तोचि त्याचे मिठी देईल पायीं।।तु.गा.३८८५.००१।।
पाहोनि राहीन कवतुकें निराळा। मी मजवेगळा होऊनियां।।तु.गा.३८८५.००२।।
कांहीं नेघें शिरीं निमित्ताचा भार। नलगें उत्तर वेंचावेंचि।।तु.गा.३८८५.००३।।
तुका म्हणे जीवें पडिलिया गाठी। मग नाहीं मिठी सुटों येत।।तु.गा.३८८५.००४।।
जाय तिकडे लागे पाठी। नाहीं तुटी आठवाची।।तु.गा.३८८६.००१।।

हिरोनियां नेलें चित्त। माझें थीत भांडवल।।तु.गा.३८८६.००२।।
दावूनियां रूप डोळां। मन चाळा लावियलें।।तु.गा.३८८६.००३।।
आणीक तोंडा पडिली मिठी। कान गोठी नाइकती।।तु.गा.३८८६.००४।।
बोलिल्याचा आठव न घडे। वाणी ओढे ते सोई।।तु.गा.३८८६.००५।।
तुका म्हणे प्रेमधगी। भरली अंगीं अखंड।।तु.गा.३८८६.००६।।
देवाचें घरीं देवें केली चोरी। देवें देव नागवूनि केला भिकारी।।तु.गा.३८८७.००१।।
धांवणियां धांवा धांवणियां धांवा। मागचि नाहीं जावें कवणिया गांवा।।तु.गा.३८८७.००२।।
सवेंचि होता चोर घरिचिया घरीं। अवघें केलें वाटोळें फांवलियावरी।।तु.गा.३८८७.००३।।
तुका म्हणे येथें कोणीच नाहीं। नागवलें कोण गेलें कोणाचें काई।।तु.गा.३८८७.००४।।
झालें आतां साठे। कासयाचें लहान मोठे।।तु.गा.३८८८.००१।।
एक एका पडिलों हातीं। झाली तेव्हांची निश्चिंती।।तु.गा.३८८८.००२।।
नाहीं फिरों येत मागें। झालें साक्षीचिया अंगें।।तु.गा.३८८८.००३।।
तुका म्हणे देवा। आतां येथें नाहीं हेवा।।तु.गा.३८८८.००४।।
वचनें ही नाड। न बोलतें मुकें खोड।।तु.गा.३८८९.००१।।
दोहीं वेगळें ते हित। बोली अबोलणी नीत।।तु.गा.३८८९.००२।।
अंधार प्रकाशी। जाय दिवस पावे निशी।।तु.गा.३८८९.००३।।
बीज पृथिवीच्या पोटीं। तुका म्हणे दावी दृष्टी।।तु.गा.३८८९.००४।।
वसवावें घर। देवें बरें निरंतर।।तु.गा.३८९०.००१।।
संग आसनीं शयनीं। घडे भोजनीं गमनीं।।तु.गा.३८९०.००२।।
संकल्प विकल्प। मावळोनि पुण्यपाप।।तु.गा.३८९०.००३।।
तुका म्हणे काळ। अवघा गोविंदीं सुकाळ।।तु.गा.३८९०.००४।।
याजसाठीं भक्ति। जगीं रूढवावया ख्याति।।तु.गा.३८९१.००१।।
नाहीं तरी कोठें दुजें। आहे बोलावया सहजें।।तु.गा.३८९१.००२।।

हेंचि ब्रह्मांड आम्हांसी। ऐसीं अगणित अंडें कैशीं।।तु.गा.३८९७.००३।।
विराटाचे अंगीं तैसे। मोजूं जातां अगणित केश।।तु.गा.३८९७.००४।।
ऐशा विराटाच्या कोटी। सांठवल्या ज्याच्या पोटीं।।तु.गा.३८९७.००५।।
तो हा नंदाचा बाळमुकुंद। तान्हा म्हणवी परमानंद।।तु.गा.३८९७.००६।।
ऐशी अगम्य ईश्वरी लीला। ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला।।तु.गा.३८९७.००७।।
भरला दिसे हाट। अवघी वाढली खटपट। संचिताची वाट । वाटा होऊनि फांकती।।तु.गा.३८९८.००१।।
भोगा ऐसे ठायाठाव। कर्मा त्रिविधाचे भाव। द्रष्टा येथें देव। विरहित संकल्पा।।तु.गा.३८९८.००२।।
दिला पाडुनियां धडा। पापपुण्याचा निवाडा। आचरती गोडा। आचरणें आपुलाल्या।।तु.गा.३८९८.००३।।
तुका म्हणे पराधीनें। झालीं ओढलीया ऋणें। तुटती बंधनें। जरि देवा आळविती।।तु.गा.३८९८.००४।।
तोंचि हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें। नाहीं विश्वंभरे वोळखी तों।।तु.गा.३८९९.००१।।
नारायण विश्वंभर विश्वपिता। प्रमाण तो होतां सकळ मिथ्या।।तु.गा.३८९९.००२।।
रवि नुगवे तों दीपिकांचें काज। प्रकाशें तें तेज सहज लोपे।।तु.गा.३८९९.००३।।
तुका म्हणे देहसंबंधें संचितें। कारण निरुतें नारायणीं।।तु.गा.३८९९.००४।।
ब्रह्मरसगोडी तयासी फावली। वासना निमाली समूळ ज्याची।।तु.गा.३९००.००१।।
नाहीं त्या विटाळ अखंड सोंवळा। उपाधीवेगळा जाणिवेच्या।।तु.गा.३९००.००२।।
मन हें निश्चळ झालें एके ठायीं। तया उणें काई निजसुखा।।तु.गा.३९००.००३।।
तेचि पुण्यवंत तेचि परउपकारी। प्रबोधी त्या नारींनरलोकां।।तु.गा.३९००.००४।।
तुका म्हणे त्याचे पायीं पायपोस। होऊनियां वास करिन तेथें।।तु.गा.३९००.००५।।
नेसणें आलें होतें गळ्या । लोक रळ्या करिती।।तु.गा.३९०१.००१।।
आपणियां सांवरिलें। जग भलें आपण।।तु.गा.३९०१.००२।।
संबंध तो तुटला येणें। जागेपणें चेष्टांच्या।।तु.गा.३९०१.००३।।
भलती सवा होती अंगें। वासर वेगें पडिलें।।तु.गा.३९०१.००४।।
सांवरिलें नीट वोजा। दृष्टिलाजा पुढिलांच्या।।तु.गा.३९०१.००५।।

मन वोळी मना। बुद्धि बुद्धि क्षणक्षणां ।।तु.गा.३९०७.००१ ।।
मीच मज राखण झालों। ज्यानें तेथेंचि धरिलों ।।तु.गा.३९०७.००२ ।।
जें जें जेथें उठी। तें तें तया हातें खुंटी ।।तु.गा.३९०७.००३ ।।
भांजणी खांजनी। तुका साक्ष उरला दोन्ही ।।तु.गा.३९०७.००४ ।।
एक वेळ प्रायश्चित्त। केलें चित्त मुंडण ।।तु.गा.३९०८.००१ ।।
अहंकारा नांवें दोष। त्याचे वोस पाडिले ।।तु.गा.३९०८.००२ ।।
अनुतापें स्नानविधि। यज्ञ सिद्धि देहहोम ।।तु.गा.३९०८.००३ ।।
जीवशिवा होता चुका। तेथे तुका विनटला ।।तु.गा.३९०८.००४ ।।
उत्तम घालावें आमुचिये मुखीं। निवारावें दु:खी होऊं नेदी ।।तु.गा.३९०९.००१ ।।
न बैसे न वजे जवळूनि दूरी। मागें पुढें वारी घातपात ।।तु.गा.३९०९.००२ ।।
नाहीं शंका असो भलतिये ठायीं। मावळलें पाहीं द्वैताद्वैत ।।तु.गा.३९०९.००३ ।।
तुका म्हणे भार घेतला विठ्ठलें। अंतरीं भरलें बाह्य रूप ।।तु.गा.३९०९.००४ ।।
सांपडला हातीं। तरी झाली हे निश्चिंती ।।तु.गा.३९१०.००१ ।।
नाहीं धांवा घेत मन। इंद्रियांचें समाधान ।।तु.गा.३९१०.००२ ।।
सांडियेला हेवा। अवघा संचिताचा ठेवा ।।तु.गा.३९१०.००३ ।।
तुका म्हणे काम । निरसुनियां घेतों नाम ।।तु.गा.३९१०.००४ ।।
ऐसिया संपत्ती आम्हां संवसारीं। भोगाचिया परि काय सांगों ।।तु.गा.३९११.००१ ।।
काम तो कामना भोगीतसे देवा। आलिंगनें हेवा चरणचुंबीं ।।तु.गा.३९११.००२ ।।
शांतीच्या संयोगें निरसला ताप। दुसरें ते पाप भेदबुद्धि ।।तु.गा.३९११.००३ ।।
तुका म्हणे पाहें तिकडे सारिखें। आपुलें पारिखें निरसलें ।।तु.गा.३९११.००४ ।।
भक्तिचिया पोटीं रत्नाचिया खाणी। ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ।।तु.गा.३९१२.००१ ।।
माउलीचे मागें बाळकांची हारी। एका सूत्रें दोरी ओढतसे ।।तु.गा.३९१२.००२ ।।
जेथील जें मागें तें रायासमोर। नाहींसें उत्तर येत नाहीं ।।तु.गा.३९१२.००३ ।।

सेवेचिये सत्ते धनीच सेवक। आपुलें तें एक न वंची कांहीं।।तु.गा.३९१२.००४।।
आदि अंत ठाव असे मध्यभाग। भोंवतें भासें जग उच्चासनीं।।तु.गा.३९१२.००५।।
भावारूढ तुका झाला एकाएकीं। देवचि लौकिकीं अवघा केला।।तु.गा.३९१२.००६।।
जाणपण बरें देवाचे ते शिरीं। आम्ही ऐसीं बरीं नेणतींच।।तु.गा.३९१३.००१।।
देखणियापुढें रुचे कवतुक। उभयतां सुख वाढतसे।।तु.गा.३९१३.००२।।
आशंकेची बाधा नाहीं लडिवाळां। चित्त वरि खेळा समबुद्धि।।तु.गा.३९१३.००३।।
तुका म्हणे दिशा मोकळ्या सकळां। अवकाशीं खेळा ठाव झाला।।तु.गा.३९१३.००४।।
जळों आतां नांव रूप। माझें पाप गांठीचें।।तु.गा.३९१४.००१।।
संताचिया चरणरजें। उतरूं ओझें मातीचें।।तु.गा.३९१४.००२।।
लटिक्याचा अभिमान। होता शीण पाववीत।।तु.गा.३९१४.००३।।
तुका म्हणे अरूपींचें। सुख साचें निवांवें।।तु.गा.३९१४.००४।।
नव्हतियाचा सोस होता। झडों आतां पदर।।तु.गा.३९१५.००१।।
देखणें तें देखियेलें। आतां भलें साक्षित्वें।।तु.गा.३९१५.००२।।
लाभ कळों आली हानि। राहों दोन्हीं निराळीं।।तु.गा.३९१५.००३।।
तुका म्हणे एकाएकीं। हा कां लोकीं पसारा।।तु.गा.३९१५.००४।।
समर्पिली वाणी। पांडुरंगीं घेते धणी।।तु.गा.३९१६.००१।।
पूजा होते मुक्ताफळीं। रस वोविया मंगळीं।।तु.गा.३९१६.००२।।
धार अखंडीत। ओघ चालियेला नित्य।।तु.गा.३९१६.००३।।
पूर्णाहुति जीव। तुका घेउनि ठेला भाव।।तु.गा.३९१६.००४।।
अवघाचि आकार ग्रासियेला काळें। एकचि निराळें हरिचें नाम।।तु.गा.३९१७.००१।।
धरूनि राहिलों अविनाश कंठीं। जीवन हें पोटीं सांठविलें।।तु.गा.३९१७.००२।।
शरीरसंपत्ति मृगजळभान। जाईल नासोन खरें नव्हे।।तु.गा.३९१७.००३।।
तुका म्हणे आतां उपाधीच्या नांवें। आणियेला देवें वीट मज।।तु.गा.३९१७.००४।।

बोलणेंचि नाहीं। आतां देवाविण कांहीं।।तु.गा.३९१८.००१।।
एकसरें केला नेम। देवा दिले क्रोध काम।।तु.गा.३९१८.००२।।
पाहेन ते पाय। जोंवरि हे दृष्टि धाय।।तु.गा.३९१८.००३।।
तुका म्हणे मनें। हेचि संकल्प वाहाणें।।तु.गा.३९१८.००४।।
पट्टे ढाळूं आम्हीं विष्णुदास जगीं। लागों नेदूं अंगीं पापपुण्य।।तु.गा.३९१९.००१।।
निर्भर अंतरीं सदासर्वकाळ। घेतला सकळ भार देवें।।तु.गा.३९१९.००२।।
बळिवंत जेणें रचिलें सकळ। आम्हां त्याचें बळ अंकितासी।।तु.गा.३९१९.००३।।
तुका म्हणे आम्ही देखतचि नाहीं। देवाविण कांहीं दुसरें तें।।तु.गा.३९१९.००४।।
पाणिपात्र दिंगबरा। हस्त करा सारिखे।।तु.गा.३९२०.००१।।
आवश्यक देव मनीं। चिंतनींच सादर।।तु.गा.३९२०.००२।।
भिक्षा कामधेनु ऐशी। अवकाशीं शयन।।तु.गा.३९२०.००३।।
पांघरोनि तुका दिशा। केला वास अलक्षीं।।तु.गा.३९२०.००४।।
सांगतां गोष्टी लागती गोडा । हा तो रोकडा अनुभव ।।तु.गा.३९२१.००१।।
सुख झालें सुख झालें । नये बोले बोलतां ।।तु.गा.३९२१.००२।।
अंतर तों नये दिसों । आतां सोस कासया ।।तु.गा.३९२१.००३।।
तुका म्हणे जतन करूं । हेंचि धरूं जीवेंसी ।।तु.गा.३९२१.००४।।
आठवूंचि नेदी आवडी आणीक। भरूनियां लोक तिन्हीं राहे।।तु.गा.३९२२.००१।।
मन धावें तेथें तिचेंचि दुभते। संपूर्ण आइतें सर्वकाळ।।तु.गा.३९२२.००२।।
नलगे वळावीं इंद्रियें धांवतां। ठाव नाहीं रिता उरों दिला।।तु.गा.३९२२.००३।।
तुका म्हणे समपाउलाचा खुंट। केला बळकट हालों नेदी।।तु.गा.३९२२.००४।।
साधनें आमुची आज्ञेचीं धारकें। प्रमाण सेवकें स्वामिसत्ता।।तु.गा.३९२३.००१।।
प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें। रवि कर्म रसें अलिप्त त्या।।तु.गा.३९२३.००२।।
सांगणें तें नाहीं करणें आपण। मोलाही वचन वाढ झालें।।तु.गा.३९२३.००३।।

तुका म्हणे आम्हां भांडवल हातीं। येरझार खाती केवढिये ।।तु.गा.३९२३.००४।।
आमुचें जीवन हें कथाअमृत। आणिकही संत समागम ।।तु.गा.३९२४.००१।।
सारूं एके ठायीं भोजन परवडी। स्वादरसें गोडी पदोपदीं ।।तु.गा.३९२४.००२।।
धालिया ढेंकर येती आनंदाचे। वोसंडलें वाचे प्रेमसुख ।।तु.गा.३९२४.००३।।
पिकलें स्वरूप आलिया घुमरी। राशी ते अंबरी न समाये ।।तु.गा.३९२४.००४।।
मोजितां तयाचा अंत नाहीं पार। खुंटला व्यापार तुका म्हणे ।।तु.गा.३९२४.००५।।
जोडिलें तें आतां न सरे सारितां। जीव बळी देतां हाता आलें ।।तु.गा.३९२५.००१।।
संचित सारूनि बांधिलें धरणें। तुंबिलें जीवन साक्षेपें हें ।।तु.गा.३९२५.००२।।
शीत उष्ण तेथें सुखदु:ख नाहीं। अंतर सबाहीं एक झालें ।।तु.गा.३९२५.००३।।
बीज तो अंकुर पत्र शाखा फळ। प्राप्तबीज मूळ अवघें नासे ।।तु.गा.३९२५.००४।।
तुका म्हणे नामीं राहिलीसे गोडी। बीजाच्या परवडी होती जाती ।।तु.गा.३९२५.००५।।
परम अमृतें रसना ओलावली। मनाची राहिली वृत्ति पायीं ।।तु.गा.३९२६.००१।।
सकळही तेथें वोळलीं मंगळें। वृष्टी केली जळें आनंदाच्या ।।तु.गा.३९२६.००२।।
सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप। ओतलें स्वरूप माजी तया ।।तु.गा.३९२६.००३।।
तुका म्हणे जेथें वसे भक्तराव। तेथें नांदे देव संदेह नाहीं ।।तु.गा.३९२६.००४।।
तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें। मानावया जग आप्तपणें। नाहीं चाड भीड संसाराचें कोड। उदासीन सर्व गुणें। भय मोह लज्जा निरसली शंका। अवघियां एकचिपणें। विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं। भागलीं नुठित तेणें ।।तु.गा.३९२७.००१।।
आतां त्यांसी काय चालें माझें बळ। झालोंसें दुर्बळ सत्वहीन। दग्ध पट दिसे संगति बरवंट। काय त्याचें कारण ।।तु.गा.३९२७.००२।।
आळस दृष्टी न पाहे आपुलें। एकचि देखिलें सर्वरूप। मानामान तेथें खुंटोनि राहिलें। पिशुन तो कोण बाप। ज्योति न अंधार अवघा एकंकार। तेथें काय पुण्यपाप। विठ्ठलावांचुनि कांहींच नावडे। वेगळाल्या भावें रूप ।।तु.गा.३९२७.००३।।
बळबडिवार लौकिक वेव्हार। गेली आशा तृष्णा माया। सुखदु:खाची वार्ता नाइके। अंतरलों दुरी तया। मीतूंपणा निष्काम होऊनि। राहिलों आपुलिया ठाय ठायां। तुजवीण आतां मज नाहीं कोणी। तुका म्हणे देवराया ।।तु.गा.३९२७.००४।।
वेद जया गाती। आम्हां तयाची संगती ।।तु.गा.३९२८.००१।।

नाम धरियेलें कंठीं। अवघा सांठविला पोटीं।।तु.गा.३९२८.००२।।
ॐकाराचें बीज। हातीं आमुचें तें निज।।तु.गा.३९२८.००३।।
तुका म्हणे बहु मोठें। अणुरेणुयां धाकुटें।।तु.गा.३९२८.००४।।
जेथें माझी दृष्टी जाय। तेथें पाय भावीन।।तु.गा.३९२९.००१।।
असेन या समाधीनें। पूजा मनें करीन।।तु.गा.३९२९.००२।।
अवघाच अवघे देशी। सुखराशीं संपन्न।।तु.गा.३९२९.००३।।
तुका म्हणे बंधन नाहीं। ऐसें कांहीं ते करूं।।तु.गा.३९२९.००४।।
उपाधीचें बीज। जळोनि राहिलें सहज।।तु.गा.३९३०.००१।।
आम्हां राहिली तें आतां। चाली देवाचियां सत्ता।।तु.गा.३९३०.००२।।
पराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणें।।तु.गा.३९३०.००३।।
तुका म्हणे जाणें पाय। खुंटले आणीक उपाय।।तु.गा.३९३०.००४।।
नव्हती हीं माझीं जायाचीं भूषणें। ऐसें नारायणें उचित केलें।।तु.गा.३९३१.००१।।
शब्दाच्या वोवणीं रत्नाचिया माळा। मुळींचा जिव्हाळा झरवणी।।तु.गा.३९३१.००२।।
अर्थांतरीं असे अनुभवसेवन। परिपाकीं मन साक्ष येथें।।तु.गा.३९३१.००३।।
तुका म्हणे मज सरतें परतें। हें नाहीं अनंतें उरों दिलें।।तु.गा.३९३१.००४।।
बहु नांवें ठेविलीं स्तुतीची आवडी। बहुत या गोडी आली रसा।।तु.गा.३९३२.००१।।
बहु सोसें सेवन केलें बहुवस। बहु झाला दिस गोमट्याचा।।तु.गा.३९३२.००२।।
बहुतां पुरला बहुतां उरला। बहुतांचा केला बहु नट।।तु.गा.३९३२.००३।।
बहु तुका झाला बहु निकट वृत्ती। बहु काकुलती येऊनियां।।तु.गा.३९३२.००४।।
हा तों नव्हे कांहीं निराशेचा ठाव। भलें पोटीं वाव राखिलिया।।तु.गा.३९३३.००१।।
विश्वंभरें विश्व सामाविलें पोटीं। तेथेंचि शेवटीं आम्ही असों।।तु.गा.३९३३.००२।।
नेणतां चिंतन करितों अंतरीं। तेथें अभ्यंतरीं उमटेल।।तु.गा.३९३३.००३।।
तुका म्हणे माझा स्वामी अबोलणा। पुरवूं खुणें खुणा जाणतसों।।तु.गा.३९३३.००४।।

न संडावा आतां ऐसा वाटे ठाव । भयासी उपाव रक्षणाचा ।।तु.गा.३९३४.००१।।
म्हणऊनि मनें वळियेलें मन । कारियाकारण चाड नाहीं ।।तु.गा.३९३४.००२।।
नाणावी उपाधि करूनियां मूळ । राखतां विटाळ तेंचि व्हावें ।।तु.गा.३९३४.००३।।
तुका म्हणे येथें न वेंचे वचन । निजीं निजखुण सांपडली ।।तु.गा.३९३४.००४।।
सत्तेचें भोजन समयीं आतुडे । सेवनही घडे रुचिनेसी ।।तु.गा.३९३५.००१।।
वर्मे भ्रम नेला झाले एकमय । हृदयस्थीं सोय संग झाला ।।तु.गा.३९३५.००२।।
कोथळीस जमा पडिलें संचित । मापल्याचा वित्त नेम झाला ।।तु.गा.३९३५.००३।।
तुका म्हणे धणी ऐसा झालों आतां । करीन ते सत्ता माझी आहे ।।तु.गा.३९३५.००४।।
कोण होईल आतां संसारपांगिलें । आहे उगवलें सहजचि ।।तु.गा.३९३६.००१।।
केला तो चालवीं आपुला प्रपंच । काय कोणां वेंच आदा घे दे ।।तु.गा.३९३६.००२।।
सहजचि घडे आतां मोळ्याविण । येथें काय शीण आणि लाभ ।।तु.गा.३९३६.००३।।
तुका म्हणे झालों सहज देखणा । ज्याच्या त्यानें खुणा दाखविल्या ।।तु.गा.३९३६.००४।।
म्हणऊनि झालों क्षेत्रींचे संन्यासी । चित्त आशापाशीं आवरूनि ।।तु.गा.३९३७.००१।।
कदापिही नव्हे सीमा उल्लंघन । केलें विसर्जन आव्हानींच ।।तु.गा.३९३७.००२।।
पारिखा तो आतां झाला दुजा ठाव । दृढ केला भाव एकविध ।।तु.गा.३९३७.००३।।
तुका म्हणे कार्यकारणाचा हेवा । नाहीं जीव देवा समर्पिला ।।तु.गा.३९३७.००४।।
शुद्धरसें ओलावली । रसना धाली न धाये ।।तु.गा.३९३८.००१।।
कळों नये झाली धणी । नारायणीं पूर्णता ।।तु.गा.३९३८.००२।।
आवडे तें तेंचि यांसी । ब्रह्मरसीं निरसें ।।तु.गा.३९३८.००३।।
तुका म्हणे बहुतां परी । करूनि करीं सेवन ।।तु.गा.३९३८.००४।।
मीच विखळ मीच विखळ । येर सकळ बहु बरें ।।तु.गा.३९३९.००१।।
पहिजे हें क्षमा केलें । येणें बोलें विनवणी ।।तु.गा.३९३९.००२।।
मीच माझें मीच माझें । झालें ओझें अन्याय ।।तु.गा.३९३९.००३।।

आधीं आंचवला आधीं आंचवला । तुका जाला निर्मनुष्य ।।तु.गा.३९३९.००४।।
हेचि भेटी साच रुपाचा आठव । विसांवला जीव आवडीपें ।।तु.गा.३९४०.००१।।
सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या तहान भूक जाय ।।तु.गा.३९४०.००२।।
दुरील जवळी आपणचि होतें । कवळिलें चित्तें जीवनासी ।।तु.गा.३९४०.००३।।
तुका म्हणे नाम घेतां वेळोवेळां । होतील शीतळा सकळा नाडी ।।तु.गा.३९४०.००४।।
कां रे तुम्हीं ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोढवलें ।।तु.गा.३९४१.००१।।
भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ।।तु.गा.३९४१.००२।।
पुसिलें पडळ तिमिर विठ्ठलें । जगचि भरलें ब्रह्मानंदें ।।तु.गा.३९४१.००३।।
तुका म्हणे केलों कामनेवेगळा । आवडी गोपाळा असे वरी ।।तु.गा.३९४१.००४।।
शरणागत झालों । तेणें मीपणा मुकलों ।।तु.गा.३९४२.००१।।
आतां दिल्याचीच वाट । पाहों नाहीं खटपट ।।तु.गा.३९४२.००२।।
नलगे उचित । कांहीं पाहावें संचित ।।तु.गा.३९४२.००३।।
तुका म्हणे सेवा । माने तैसी करूं देवा ।।तु.गा.३९४२.००४।।
आसन शयन भोजन गोविंदें । भरलें आनंदें त्रिभुवन ।।तु.गा.३९४३.००१।।
अवघियां केली काळें तडातोडी । अवसर घडी पुरो नये ।।तु.गा.३९४३.००२।।
वांटणी घातले शरीराचे भाग । दुजियाचा लाग खंडियेला ।।तु.गा.३९४३.००३।।
आवडीच्या आलें आहारासी रुप । पृथक संकल्प मावळले ।।तु.गा.३९४३.००४।।
काम तरी क्रोध बुद्धि मन नासे । भ्रमाचे वोळसे गिळिलें शांती।।तु.गा.३९४३.००५।।
तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ।।तु.गा.३९४३.००६।।
आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ।।तु.गा.३९४४.००१।।
काय सांगों झालें कांहींचियाबाई । पुढें चाली नाहीं आवडीनें ।।तु.गा.३९४४.००२।।
गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ।।तु.गा.३९४४.००३।।
तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा आला ।।तु.गा.३९४४.००४।।

नाहीं लाग माग । न देखेंसें झालें जग ।।तु.गा.३९४५.००१।।
आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ।।तु.गा.३९४५.००२।।
निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ।।तु.गा.३९४५.००३।।
तुका म्हणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ।।तु.गा.३९४५.००४।।
धवळलें जगदाकार । अंधार तो निरसला ।।तु.गा.३९४६.००१।।
लपों जातां ठाव नाहीं। प्रगट पाहीं पसारा ।।तु.गा.३९४६.००२।।
खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ।।तु.गा.३९४६.००३।।
तुका म्हणे जीवें साठीं । पडिली मिठी धुरेसी ।।तु.गा.३९४६.००४।।
रुसलों संसारा । आम्ही आप आणि परा ।।तु.गा.३९४७.००१।।
म्हणऊनि केली सांडी । देउनि पडिलों मुरकुंडी ।।तु.गा.३९४७.००२।।
परतेचि ना मागें । मोहो निष्ठुर झालों अंगें ।।तु.गा.३९४७.००३।।
सांपडला देव । तुका म्हणे गेला भेव ।।तु.गा.३९४७.००४।।
एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाठीं ।।तु.गा.३९४८.००१।।
घेतों काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ।।तु.गा.३९४८.००२।।
धांवें मागें मागें । जाय तिकडे चालत लागे ।।तु.गा.३९४८.००३।।
तुका म्हणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ।।तु.गा.३९४८.००४।।
कोणापाशीं द्यावें माप । आपेआप राहिलें ।।तु.गा.३९४९.००१।।
कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ।।तु.गा.३९४९.००२।।
एकें दाखविले दहा । फांटा पाहा पुसून ।।तु.गा.३९४९.००३।।
तुका म्हणे सरलें वोझें । आतां माझें सकळ ।।तु.गा.३९४९.००४।।
प्रवृत्तिनिवृत्तीचे आटूनियां भाग । उतरिलें चांग रसायन ।।तु.गा.३९५०.००१।।
ज्ञानाग्निहुताशीं कडशिले वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ।।तु.गा.३९५०.००२।।
ब्रह्मीं ब्रह्मरस सिद्ध झाला पाक । घेतला रूचक प्रतीतीमुखें ।।तु.गा.३९५०.००३।।

स्वानुभव अंगीं झाला समरस । साधनीं निजध्यास ग्रासोग्रासीं ।।तु.गा.३९५०.००४।।
आरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरवला रंगीं निजात्मरंगें ।।तु.गा.३९५०.००५।।
विचारिलें आधीं आपुल्या मानसीं । वाचों येथें कैसी कोण्या द्वारें ।।तु.गा.३९५१.००१।।
तंव साह्य झाला हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नाश नाहीं ।।तु.गा.३९५१.००२।।
उद्वेगाचे होतों पडिलों समुद्रीं । कोणे रीती तीरीं पाविजेल ।।तु.गा.३९५१.००३।।
तुका म्हणे दुःखें आला आयुर्भाव । झाला बहु जीव कासावीस ।।तु.गा.३९५१.००४।।
आतां नव्हे गोड करितां संसार । आणीक संचार झाला माजी ।।तु.गा.३९५२.००१।।
ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ।।तु.गा.३९५२.००२।।
रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निवविलें ।।तु.गा.३९५२.००३।।
तुका म्हणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ।।तु.गा.३९५२.००४।।
चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मा सांपडलों ।।तु.गा.३९५३.००१।।
पाठी लागे करी नास । गर्भवास भोगवी ।।तु.गा.३९५३.००२।।
माझें तुझें भिन्नभावें । गळां दावें मोहाचें ।।तु.गा.३९५३.००३।।
तुका म्हणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ।।तु.गा.३९५३.००४।।
पाहातां हें बरवें झालें । कळों आलें यावरी ।।तु.गा.३९५४.००१।।
मागिलांचा झाला झाडा । त्या निवाडास्तव हे ।।तु.गा.३९५४.००२।।
विसांवलें अंग दिसे । सरिसें सरिसें अनुभवें ।।तु.गा.३९५४.००३।।
तुका म्हणे बरें झालें । देवें नेलें गवसूनि ।।तु.गा.३९५४.००४।।
चक्रफेरीं गळीं गळा । होता गोवियेला माळा ।।तु.गा.३९५५.००१।।
फुटोनियां गेला कुंभ । झालों निष्काम स्वयंभ ।।तु.गा.३९५५.००२।।
धरितचि नाहीं थारा । वेठी भ्रमण खोंकरा ।।तु.गा.३९५५.००३।।
तुका म्हणे कोडें । आगी काय जाणे मढें ।।तु.गा.३९५५.००४।।
माझिया मनाची बैसली आवडी । अवसान घडी एकी नेघे ।।तु.गा.३९५६.००१।।

पाय चित्तीं रुप डोळांच बैसलें । चिंतनें गोविलें मुख सदा ।।तु.गा.३९५६.००२।।
अवघियांचा झाला विसरु हा मागें । वेध हा श्रीरंगें लावियेला ।।तु.गा.३९५६.००३।।
तुका म्हणे कानीं आइकिली मात । तोचि झाला घात जीवपणा ।।तु.गा.३९५६.००४।।
याची कोठें लागली चट । बहु तंट झालेंसे ।।तु.गा.३९५७.००१।।
देवपिसी देवपिसी । मज ऐसी जग म्हणे ।।तु.गा.३९५७.००२।।
एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ।।तु.गा.३९५७.००३।।
तुका म्हणे याचे भेटी । झाली तुटी आपल्यासी ।।तु.गा.३९५७.००४।।
पडिलिया ताळा । मग अवघा निर्वाळा । तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ।।तु.गा.३९५८.००१।।
जोडिलें तें लागे हातीं । आपआपलीं निश्चिंती । हर्ष आणि खंती । तेथें दोनी नासलीं ।।तु.गा.३९५८.००२।।
सहज सरलिया कारण । मग एकला आपण । दिसेतरी भिन्न । वचनाचा प्रसंग ।।तु.गा.३९५८.००३।।
करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी म्हूण लागती ।।तु.गा.३९५८.००४।।
स्वामीचिया सत्ता । आधीं वर्मे येती हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ।।तु.गा.३९५९.००१।।
करीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचें ।।तु.गा.३९५९.००२।।
मन मेळविलें मना । नाहीं अभावी शहाणा । अंतरींच्या खुणा । वरी दिल्या उमटोनि ।।तु.गा.३९५९.००३।।
पराश्रमें काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ।।तु.गा.३९५९.००४।।
एके ठायीं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ।।तु.गा.३९६०.००१।।
वेळोवेळां जागवितों । दुजें येईल म्हूण भीतों ।।तु.गा.३९६०.००२।।
नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ।।तु.गा.३९६०.००३।।
तुका झालासे शहाणा । आड लपे नारायणा ।।तु.गा.३९६०.००४।।
हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ।।तु.गा.३९६१.००१।।
नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ।।तु.गा.३९६१.००२।।
अवघा रुधविला ठाव । नेला वाव मी माझें ।।तु.गा.३९६१.००३।।
तुका म्हणे एके ठायीं । असो नाहीं क्षण भिन्न ।।तु.गा.३९६१.००४।।

भय होतें आम्हीपणें । पाठी येणें घातलें ।।तु.गा.३९६२.००१।।
अवघा आपुलाचि देश । काळा लेश उरेचि ना ।।तु.गा.३९६२.००२।।
समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची ।।तु.गा.३९६२.००३।।
तुका म्हणे नारायणें । केलें जिणें सुखाचें ।।तु.गा.३९६२.००४।।
विश्वीं विश्वंभर । बोले वेदांताचें सार ।।तु.गा.३९६३.००१।।
जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ।।तु.गा.३९६३.००२।।
व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ।।तु.गा.३९६३.००३।।
जनीं जनार्दन । संत बोलती वचन ।।तु.गा.३९६३.००४।।
सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ।।तु.गा.३९६३.००५।।
मागें पुढें नाहीं । दुजें यावेगळें कांहीं ।।तु.गा.३९६४.००१।।
नाहीं उरलें आणीक । केला झाला सकळिक ।।तु.गा.३९६४.००२।।
विश्वासावांचून । नांवें दुजियाचें शून्य ।।तु.गा.३९६४.००३।।
तुका म्हणे कांहीं । बोलायाची उरी नाहीं ।।तु.गा.३९६४.००४।।
म्हणऊनि झाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ।।तु.गा.३९६५.००१।।
दाखविलें देंवें वर्म । अवघा भ्रम नासला ।।तु.गा.३९६५.००२।।
हातें मुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ।।तु.गा.३९६५.००३।।
तुका म्हणे एकांतसुखें । अवघीं गोतें गुंतलीं ।।तु.गा.३९६५.००४।।
तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ।।तु.गा.३९६६.००१।।
आर्तचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ।।तु.गा.३९६६.००२।।
तुका म्हणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ।।तु.गा.३९६६.००३।।
उपचारासी वांझ झालों । नका बोलों यावरी ।।तु.गा.३९६७.००१।।
असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ।।तु.गा.३९६७.००२।।
दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहुमतें ।।तु.गा.३९६७.००३।।

एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ।।तु.गा.३९६७.००४।।
मागें बहुत झाले खेळ । आतां बळ वोसरलें ।।तु.गा.३९६८.००१।।
हालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ।।तु.गा.३९६८.००२।।
भाजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ।।तु.गा.३९६८.००३।।
तुका म्हणे पाहातां घडी । जगा जोडी अंगारा ।।तु.गा.३९६८.००४।।
शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ।।तु.गा.३९६९.००१।।
म्हणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्य अभिषेक ।।तु.गा.३९६९.००२।।
एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनुहात ध्वनी गगन गर्जे ।।तु.गा.३९६९.००३।।
तुकया स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनी उल्हासा सप्रेमता ।।तु.गा.३९६९.००४।।
मानूं कांहीं आम्ही आपुलिया इच्छा । ना तरी सरसा रंकरावो ।।तु.गा.३९७०.००१।।
आपुल्या उदास आहों देहभावीं । मग लज्जा जीवीं चाड नाहीं ।।तु.गा.३९७०.००२।।
तुका म्हणे आम्ही खेळों सहज लीळे । म्हणोनि निराळे सुखदु:खा ।।तु.गा.३९७०.००३।।
लटिकें हासें लटिकें रडें । लटिकें उडें लटिक्यापें ।।तु.गा.३९७१.००१।।
लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ।।तु.गा.३९७१.००२।।
लटिकें गाय लटिकें ध्याय । लटिकें जाय लटिक्यापें ।।तु.गा.३९७१.००३।।
लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जगमाया ।।तु.गा.३९७१.००४।।
लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ।।तु.गा.३९७१.००५।।
ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित पालटे काया ।।तु.गा.३९७२.००१।।
तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण झाला हरि ।।तु.गा.३९७२.००२।।
चित्तचैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरुप अवघी सृष्टि ।।तु.गा.३९७२.००३।।
तुका म्हणे सांगों काय । एकाएकीं वृत्ति हरिमय ।।तु.गा.३९७२.००४।।
देव झाले अवघे जन । दोष गुण हारपले ।।तु.गा.३९७३.००१।।
बरवें झालें बरवें झालें । चित्त धालें महालाभें ।।तु.गा.३९७३.००२।।

दर्पणीचें दुसरें भासें । परि तें असे एक तें ।।तु.गा.३९७३.००३।।
तुका म्हणे सिंधुभेटी । उदका तुटी वोहोळासी ।।तु.गा.३९७३.००४।।
मायबापाचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा ।।तु.गा.३९७४.००१।।
भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ।।तु.गा.३९७४.००२।।
उत्तम तें बाळासाठीं । लावी ओठीं माउली ।।तु.गा.३९७४.००३।।
तुका म्हणे झाली धणी । आनंद मनीं न समाये ।।तु.गा.३९७४.००४।।
ज्यांच्या संगें होतों पडिलों भोवणीं । ते केली धोवनी झाडोनियां ।।तु.गा.३९७५.००१।।
आतां एकाएकीं मनासीं विचार । करूं नाहीं भार दुजियाचा ।।तु.गा.३९७५.००२।।
प्रसादसेवनें आली उष्टावळी । उचित ते काळीं अवचित ।।तु.गा.३९७५.००३।।
तुका म्हणे वर्म सांपडलें हातीं । सांडिली ते खंती चिंता देवा ।।तु.गा.३९७५.००४।।
गोडपणें जैसा गुळ । तैसा देव झाला सकळ ।।तु.गा.३९७६.००१।।
आतां भजों कवणें परी । देव सबाह्य अंतरीं ।।तु.गा.३९७६.००२।।
उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ।।तु.गा.३९७६.००३।।
हेम अळंकार नामीं । तुका म्हणे तैसे आम्ही ।।तु.गा.३९७६.००४।।
येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ।।तु.गा.३९७७.००१।।
उंच देवाचे चरण । तेथें झालें अधिष्ठान ।।तु.गा.३९७७.००२।।
आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ।।तु.गा.३९७७.००३।।
तुका म्हणे स्थळ । धरूनि राहिलों अचळ ।।तु.गा.३९७७.००४।।
रंगलिया रंग पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ।।तु.गा.३९७८.००१।।
सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें कैसें शोभा देती ।।तु.गा.३९७८.००२।।
पवित्र झालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळा आडवरी ।।तु.गा.३९७८.००३।।
तुका म्हणे काळें काळे केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ।।तु.गा.३९७८.००४।।
अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ।।तु.गा.३९७९.००१।।

मदें माते तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ।।तु.गा.३९७९.००२।।
आणिकांची वाणी वदे तेणें मुखें । उपचार दुःखें नाठवती ।।तु.गा.३९७९.००३।।
तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ।।तु.गा.३९७९.००४।।
तुका म्हणे बाह्य रंग जो विटला । अंतरीं निवाला ब्रह्मरसें ।।तु.गा.३९७९.००५।।
बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जनीं आम्हां ।।तु.गा.३९८०.००१।।
भोगीं त्याग झाला संगींच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ।।तु.गा.३९८०.००२।।
तुका म्हणे नव्हें दिसतो मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा ।।तु.गा.३९८०.००३।।
उपाधीच्या नांवें घेतला शिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ।।तु.गा.३९८१.००१।।
काशासाठीं हात भरूनि धुवावे । चालतिया गोवे मारगासि ।।तु.गा.३९८१.००२।।
कांहीं नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ।।तु.गा.३९८१.००३।।
तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविले ।।तु.गा.३९८१.००४।।
चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तेंचि किती काळ वाढवावें ।।तु.गा.३९८२.००१।।
अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ।।तु.गा.३९८२.००२।।
करूं आला तो तो केला लवलाहो । उरोंचि संदेहो दिला नाहीं ।।तु.गा.३९८२.००३।।
तुका म्हणे मोहो परतेचि ना मागें । म्हणउनि त्यागें त्याग झाला ।।तु.गा.३९८२.००४।।
कृष्णांजनें झाले सोज्वळ लोचन । तेणें दिले वाण निवडुनी ।।तु.गा.३९८३.००१।।
निरोपाच्या मापें करी लडबड । त्याचें तेणें गोड नारायणें ।।तु.गा.३९८३.००२।।
भाग्यवंताघरीं करितां विश्वासें । कार्य त्यासरिसें होईजेतें ।।तु.गा.३९८३.००३।।
तुका म्हणे पोट भरे बऱ्या वोजा । निज ठाव निजा निजस्थानीं ।।तु.गा.३९८३.००४।।
अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ।।तु.गा.३९८४.००१।।
तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न समाये । उपमेशीं काय देऊं सुखा ।।तु.गा.३९८४.००२।।
भावाचें मथिलें निर्गुण संचलें । तें हें उभें केलें विटेवरी ।।तु.गा.३९८४.००३।।
तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी साठवण ।।तु.गा.३९८४.००४।।

श्रमपरिहारा । मूळ झालों दातारा ।।तु.गा.३९८५.००१।।
देह निवेदूनि पायीं । झालों निष्काम उतराई ।।तु.गा.३९८५.००२।।
आपली ते सत्ता । येथें असों नेदी आतां ।।तु.गा.३९८५.००३।।
राहिला निराळा । तुका खटपटीवेगळा ।।तु.गा.३९८५.००४।।
मनाचिये साक्षी झाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपला तो ।।तु.गा.३९८६.००१।।
तुम्हां परामर्ष घेतां सत्ताबळें । धरितां निराळें कैसीं वांचों ।।तु.गा.३९८६.००२।।
मी माझें सांडून यावया पसारा । आणीक दातारा काय काज ।।तु.गा.३९८६.००३।।
तुका म्हणे आम्ही तुजविण एका । निढळ लौकिकामाजी असों ।।तु.गा.३९८६.००४।।
पंचभूतांचे सांपडलों संदीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ।।तु.गा.३९८७.००१।।
आपल्या आपण बांधविला गळा । नेणेंचि निराळा असतांही ।।तु.गा.३९८७.००२।।
कासया हा सत्य मानिला संसार । कां हें केले चार माझें माझें ।।तु.गा.३९८७.००३।।
कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ।।तु.गा.३९८७.००४।।
किंचित सुखाचा धरिला अभिळास । तेणें बहु नास केला पुढें ।।तु.गा.३९८७.००५।।
तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करूनि सांडूं होळी संचिताची ।।तु.गा.३९८७.००६।।
देवासी लागे सकळांसी पोसावें । आम्हां नलगे खावें काय चिंता ।।तु.गा.३९८८.००१।।
देवा विचारावें लागे पापपुण्य । आम्हांसी हें जन अवघें भलें ।।तु.गा.३९८८.००२।।
देवासी उत्पत्ति लागला संहार । आम्हां नाहीं फार थोडें कांहीं ।।तु.गा.३९८८.००३।।
देवासी काम लागला धंदा । आम्हांसी ते सदा रिकामीक ।।तु.गा.३९८८.००४।।
तुका म्हणे आम्हीं भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ।।तु.गा.३९८८.००५।।
यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारिये कारणा । पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ।।तु.गा.३९८९.००१।।
एक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये अंगीं । धन्य तोचि जगीं । आदि अंत सांभाळी ।।तु.गा.३९८९.००२।।
आवश्यक तो शेवट । येर अवघी खटपट । चालों जाणें वाट । ऐसा विरळा एखादा ।।तु.गा.३९८९.००३।।
तुका होवोनि निराळा । क्षराअक्षरा वेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ।।तु.गा.३९८९.००४।।

थुंकोनियां मान । दंभ करितो कीर्तन ।।तु.गा.३९९०.००१।।
झालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ।।तु.गा.३९९०.००२।।
अर्थ अनर्थासारिखा । करूनि ठेविला पारिखा ।।तु.गा.३९९०.००३।।
उपाधि वेगळा । तुका राहिला सोंवळा ।।तु.गा.३९९०.००४।।
अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिली भूमि ।।तु.गा.३९९१.००१।।
अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ।।तु.गा.३९९१.००२।।
अवघींच तीर्थे व्रतें केले याग । अवघेंचि सांग झालें कर्म ।।तु.गा.३९९१.००३।।
अवघेंचि फळ आलें आम्हां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ।।तु.गा.३९९१.००४।।
तुका म्हणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ।।तु.गा.३९९१.००५।।
मज अंगाच्या अनुभवें । कांहीं वाईट बरें ठावे ।।तु.गा.३९९२.००१।।
झालों दोहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ।।तु.गा.३९९२.००२।।
वोस वसती ठावी । परि हे चाली दु:ख पावी ।।तु.गा.३९९२.००३।।
तुका म्हणे घेऊं देवा । सवें करूनि बोळावा ।।तु.गा.३९९२.००४।।
संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा जाला नारायण ।।तु.गा.३९९३.००१।।
नाहीं आम्हांसी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ।।तु.गा.३९९३.००२।।
द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें ।।तु.गा.३९९३.००३।।
तुका म्हणे हरि । आम्हांमाजी क्रीडा करी ।।तु.गा.३९९३.००४।।
पिंडदान पिंडें ठेविलें करून । तिळीं तिळवण मूळत्रयीं ।।तु.गा.३९९४.००१।।
सारिलें संकल्प एकाचि वचनें । ब्रह्मीं ब्रह्मार्पणें शेवटींच्या ।।तु.गा.३९९४.००२।।
सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । एका एक वर्म एकोविष्णु ।।तु.गा.३९९४.००३।।
पित्या पुत्रत्वाचें झालें अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ।।तु.गा.३९९४.००४।।
आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधियेला ।।तु.गा.३९९४.००५।।
तुका म्हणे केला अवघ्यांचा उद्धार । आतां नमस्कार शेवटींचा ।।तु.गा.३९९४.००६।।

नभोमय झालें जळ । एकीं सकळ हरपलें ।।तु.गा.३९९५.००१।।
आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ।।तु.गा.३९९५.००२।।
कैंचा तेथ यावा सांडी । आप कोंडी आपणा ।।तु.गा.३९९५.००३।।
तुका म्हणे कल्प झाला । अस्त गेला उदय ।।तु.गा.३९९५.००४।।
उद्योगाची धांव बैसली आसनीं । पडिलें नारायणीं मोटळें हें ।।तु.गा.३९९६.००१।।
सकळ निश्चिंती झाली हा भरंवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ।।तु.गा.३९९६.००२।।
आपुलिया सत्तें नाहीं आम्हां जिणें । अभिमान तेणें नेला देवें ।।तु.गा.३९९६.००३।।
तुका म्हणे चळे एकाचिया सत्तें । आपुलें मी रितेपणें असें ।।तु.गा.३९९६.००४।।
सहज लीळा मी साक्षी याचा । नये वंचूं वाचा ऐसें झालें ।।तु.गा.३९९७.००१।।
उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जे कोठें बंधनीं गुंफों नेणें ।।तु.गा.३९९७.००२।।
तमनासी परी वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ।।तु.गा.३९९७.००३।।
तुका म्हणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हां नये तोंड दावूं ।।तु.गा.३९९७.००४।।
भयाची तों आम्हां चित्तीं । राहों खंती शकेचिना ।।तु.गा.३९९८.००१।।
समर्पिलों जीवेंभावें । काशा भ्यावें कारणें ।।तु.गा.३९९८.००२।।
करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभेल ।।तु.गा.३९९८.००३।।
तुका म्हणे माप भरूं । दिवस सारुं कवतुकें ।।तु.गा.३९९८.००४।।
इहलोकीं आम्हां वस्तीचें तें पेणें । उदासीन तेणें देहभावीं ।।तु.गा.३९९९.००१।।
कार्यापुरतें कारण मारगीं । उल्लंघूनि वेगीं जावें स्थळा ।।तु.गा.३९९९.००२।।
सोंगसंपादणी चालवितों वेव्हार । अत्यंतीं आदर नाहीं गोवा ।।तु.गा.३९९९.००३।।
तुका म्हणे वेंच लाविला संचिता । होइल घेतां देतां लाभ कोणा ।।तु.गा.३९९९.००४।।
नाहीं आम्हां शत्रु सोईरें पिशुन । दाटलें हें धन माहियेर ।।तु.गा.४०००.००१।।
पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ।।तु.गा.४०००.००२।।
लाज भय कांहीं आम्हां चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगती ।।तु.गा.४०००.००३।।

तुका म्हणे आम्ही सदैवाचीं बाळें । झालों लडिवाळें सकळांचीं ।।तु.गा.४०००.००४।।
शुभ झाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ।।तु.गा.४००१.००१।।
हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे तेही ।।तु.गा.४००१.००२।।
सुखदु:खाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हित फळें ।।तु.गा.४००१.००३।।
तुका म्हणे आतां आम्हांसी हे भले । अवघेचि झाले जीव जंत ।।तु.गा.४००१.००४।।
जालें पीक आम्हां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ।।तु.गा.४००२.००१।।
झाली आराणूक अवघियांपासून । अवघा गेला शीणभाग आतां ।।तु.गा.४००२.००२।।
अवघा झाला आम्हां एक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ।।तु.गा.४००२.००३।।
अवघेंचि आम्ही ल्यालों अळंकार । शोभलोंहि फार अवघ्यांवरी ।।तु.गा.४००२.००४।।
तुका म्हणे आम्ही सदैवाचे दास । करणें नलगे आस आणिकांची ।।तु.गा.४००२.००५।।
संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ।।तु.गा.४००३.००१।।
आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनियां घरीं ।।तु.गा.४००३.००२।।
नाहीं कामा हातीं । आराणूक दिवसराती ।।तु.गा.४००३.००३।।
तुका म्हणे सत्ता । आतां पुरे पराधीनता ।।तु.गा.४००३.००४।।
आतां बरें झालें । माझें माथांचें निघालें ।।तु.गा.४००४.००१।।
चुकली हे मरमर । भार माथांचें डोंगर ।।तु.गा.४००४.००२।।
नसतां कांहीं जोडी । केली बहुतें तडातोडी ।।तु.गा.४००४.००३।।
झाला झाडापाडा । तुका म्हणे गेली पीडा ।।तु.गा.४००४.००४।।
भावाचिया बळें । आम्ही निर्भर दुबळें ।।तु.गा.४००५.००१।।
नाहीं आणिकांची सत्ता । सदा समाधान चित्ता ।।तु.गा.४००५.००२।।
तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ।।तु.गा.४००५.००३।।
एकछत्री राज । तुकया पांडुरंगीं काज ।।तु.गा.४००५.००४।।
धालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेवूं तोंवरी ।।तु.गा.४००६.००१।।

क्रीडा करूं निरंजनीं । न पुरे धणी हरिसवें ।।तु.गा.४००६.००२।।
अवघें खेळों अवघ्यामधीं । डाईं न पडों ऐसी बुद्धि ।।तु.गा.४००६.००३।।
तुका म्हणे वांचवितां । आम्हां सत्ता समर्थ ।।तु.गा.४००६.००४।।
आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ।।तु.गा.४००७.००१।।
मायबापाचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ।।तु.गा.४००७.००२।।
नाहीं निपराध । कोणां आम्हांमध्यें भेद ।।तु.गा.४००७.००३।।
तुका म्हणे नाम । अवघें आमचें हें धाम ।।तु.गा.४००७.००४।।
विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ।।तु.गा.४००८.००१।।
माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ।।तु.गा.४००८.००२।।
लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ।।तु.गा.४००८.००३।।
तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ।।तु.गा.४००८.००४।।
आनंदाच्या कोटी । सांठवल्या आम्हां पोटीं ।।तु.गा.४००९.००१।।
प्रेमा चालिला प्रवाहो । नाम ओघ लवलाहो ।।तु.गा.४००९.००२।।
अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ।।तु.गा.४००९.००३।।
थडी अहिक्य परत्र । तुका म्हणे समतीर ।।तु.गा.४००९.००४।।
तान्हे तहान प्याली । भूक भुकेनें खादली ।।तु.गा.४०१०.००१।।
जेथें तेंच नाहीं झालें । झाडा घेतला विठ्ठलें ।।तु.गा.४०१०.००२।।
वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ।।तु.गा.४०१०.००३।।
शेष उरला तुका । जीवीं जीवा झाला चुका ।।तु.गा.४०१०.००४।।
घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवीं । तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षी वर्तनें ।।तु.गा.४०११.००१।।
भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं । विचित्र ये रंगीं । रंगें रंगला गोसावी ।।तु.गा.४०११.००२।।
देह संकल्पासारिखें । एकएकांसी पारिखें । सुख आणि दुःखें । अंगीं कर्मे त्रिविध ।।तु.गा.४०११.००३।।
तुका म्हणे कोडें । नकळे तयासी सांकडें । त्याचिया निवाडें । उगवे केलें विंदान ।।तु.गा.४०११.००४।।

आम्ही क्षेत्रींचे संन्यासी । देह भरित हृषीकेशी । नाहीं केली ऐशी । आशाकामबोहरी ।।तु.गा.४०१२.००१।।
आलें अयाचित अंगा । सहज तें आम्हां भागा । दाता पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिती ।।तु.गा.४०१२.००२।।
दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडन । बंदी बंदाची कौपीन । बहिरवास औटडें ।।तु.गा.४०१२.००३।।
काळें साधियेला काळ । मन करूनि निश्चळ । लौकिकीं विटाळ । धरूनि असों एकांत ।।तु.गा.४०१२.००४।।
कार्यकारणाची चाली । वाचावाचत्वें नेमिली । एका नेमें केली । स्वरुपींच वोळखी ।।तु.गा.४०१२.००५।।
नव्हे वेषधारी । तुका आहाच वरिवरि । आहे तैसीं बरीं । खंडें निवडी वेदांचीं ।।तु.गा.४०१२.००६।।
काम नाहीं काम नाहीं । झालों पाहीं रिकामा ।।तु.गा.४०१३.००१।।
फावल्या त्या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनि ।।तु.गा.४०१३.००२।।
नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विव्हळतसे ।।तु.गा.४०१३.००३।।
एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं निराळा ।।तु.गा.४०१३.००४।।
सर्वरसीं मीनलें चित्त । अखंडित आनंदु ।।तु.गा.४०१४.००१।।
गोत पति विश्वंभरीं । झाला हरि सोयरा ।।तु.गा.४०१४.००२।।
वोळखी ते एका नांवें । इतर वाव खंडणा ।।तु.गा.४०१४.००३।।
तुका म्हणे नांवें रुपें । दुसरी पापें हारपलीं ।।तु.गा.४०१४.००४।।
ज्या ज्या आम्हापाशीं होतील ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अळंकारूं ।।तु.गा.४०१५.००१।।
अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणा ठाव पुसियेला ।।तु.गा.४०१५.००२।।
ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ।।तु.गा.४०१५.००३।।
तुका म्हणे येथें उरला विठ्ठल । खाय बोले बोल गाय नाचे ।।तु.गा.४०१५.००४।।
याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ।।तु.गा.४०१६.००१।।
आतां निश्चिंतीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ।।तु.गा.४०१६.००२।।
कवतुक वाटे झालिया वेंचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ।।तु.गा.४०१६.००३।।
तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ।।तु.गा.४०१६.००४।।
अनुभवें अनुभव अवघाचि साधिला । तरि स्थिरावला मन ठायीं ।।तु.गा.४०१७.००१।।

पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ।।तु.गा.४०१७.००२।।
एकचि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्रयीं ।।तु.गा.४०१७.००३।।
तुका म्हणे आम्हीं जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोबाचे ।।तु.गा.४०१७.००४।।
खादलेंच खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ।।तु.गा.४०१८.००१।।
वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त तें ।।तु.गा.४०१८.००२।।
हृदयाची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ।।तु.गा.४०१८.००३।।
तुका म्हणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ।।तु.गा.४०१८.००४।।
आतां मी सर्वथा नव्हें गा दुर्बळ । यातिहीनकुळ दैन्यवाणा ।।तु.गा.४०१९.००१।।
माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ।।तु.गा.४०१९.००२।।
बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकासी ।।तु.गा.४०१९.००३।।
दुष्ट नव्हों आम्ही अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ।।तु.गा.४०१९.००४।।
संवसार आम्हां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ।।तु.गा.४०१९.००५।।
तुका म्हणे झालों निर्भर मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ।।तु.गा.४०१९.००६।।
स्वप्नींचिया गोष्टी । मज धरिलें होतें वेठी । झालिया शेवटीं । जागे लटिकें सकळ ।।तु.गा.४०२०.००१।।
वायां भाकिली करुणा । मूळ पावावया शीणा । राव रंक राणा । कैंचे स्थानावरी आहे ।।तु.गा.४०२०.००२।।
सोशिलें तें अंगें । खरें होतें नव्हतां जागें । अनुभवही सांगे । दुःखें डोळे उघडीले ।।तु.गा.४०२०.००३।।
तुका म्हणे संतीं । सावचित्त केलें अंतीं । नाहीं तरि होती । टाळी बैसोनि राहिली ।।तु.गा.४०२०.००४।।
न देखोनि कांहीं । म्यां पाहिलें सकळही ।।तु.गा.४०२१.००१।।
झालों अवघियांपरी । मी हें माझें ठेलें दुरी ।।तु.गा.४०२१.००२।।
न घेतां घेतलें । हात पाय उसंतिलें ।।तु.गा.४०२१.००३।।
खादलें न खातां । रसना रस झाली घेतां ।।तु.गा.४०२१.००४।।
न बोलोनि बोलें । केलें प्रगट झांकिलें ।।तु.गा.४०२१.००५।।
नाइकिलें कानीं । तुका म्हणे आलें मनीं ।।तु.गा.४०२१.००६।।

निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ।।तु.गा.४०२२.००१।।
मज हेंही नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहींपासुनी ।।तु.गा.४०२२.००२।।
देहभोग भोगें घडे । जें जें जोडें तें तें बरें ।।तु.गा.४०२२.००३।।
अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुकयाचें ।।तु.गा.४०२२.००४।।
जन विजन झालें आम्हां । विठ्ठलनामाप्रमाणें ।।तु.गा.४०२३.००१।।
पाहें तिकडे मायबाप । विठ्ठल आहे रखुमाई ।।तु.गा.४०२३.००२।।
वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता झाला ।।तु.गा.४०२३.००३।।
आठव नाहीं सुखदु:खा । नाचे तुका कौतुकें ।।तु.गा.४०२३.००४।।
माझिया मीपणा । झाला यावरी उगाणा ।।तु.गा.४०२४.००१।।
भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ।।तु.गा.४०२४.००२।।
टाळिलें निमित्त । फार थोडे घात हित ।।तु.गा.४०२४.००३।।
यावें कामावरी । तुका म्हणे नाहीं उरी ।।तु.गा.४०२४.००४।।
माझें माझ्या हाता आलें । आतां भलें सकळ ।।तु.गा.४०२५.००१।।
काशासाठीं विषम थारा । तो अंतरा विटाळ ।।तु.गा.४०२५.००२।।
झालीं तया दु:खें तुटी । मागिल पोटीं नसावें ।।तु.गा.४०२५.००३।।
तुका म्हणे शुद्ध कुळ । तेथें मळ काशाचा ।।तु.गा.४०२५.००४।।
निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलोंसें।।तु.गा.४०२६.००१।।
निराभासीं पूर्ण झालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आम्ही ।।तु.गा.४०२६.००२।।
तुका म्हणे आतां नाहीं अहंकार । झालों तदाकार नित्य शुद्ध ।।तु.गा.४०२६.००३।।
पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ।।तु.गा.४०२७.००१।।
जीवशिवा शेज रचिली आनंदें । आउटाविए पदीं आरोहण ।।तु.गा.४०२७.००२।।
निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहत बाळका हल्लरू गाती ।।तु.गा.४०२७.००३।।
रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ।।तु.गा.४०२८.००१।।

तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि झाली । कल्पना निमाली द्वैताद्वैत ।।तु.गा.४०२८.००२।।

देशकाळवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ।।।तु.गा.४०२८.००३।।

न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ।।तु.गा.४०२८.००४।।

तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ।।तु.गा.४०२८.००५।।

बीज भाजुनि केली लाही । आम्हां जन्ममरण नाहीं ।।तु.गा.४०२९.००१।।

आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष झाला देव ।।तु.गा.४०२९.००२।।

साकरेचा नोहे ऊंस । आम्हा कैंचा गर्भवास ।।तु.गा.४०२९.००३।।

तुका म्हणे अवघा जोग । सर्वांघटीं पांडुरंग ।।तु.गा.४०२९.००४।।

पिकलिया सेंद कडुपण गेलें । तैसें आम्हां केलें पांडुरंगें ।।तु.गा.४०३०.००१।।

काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि झाली ।।तु.गा.४०३०.००२।।

आठव नाठव गेले भावाभाव । झाला स्वयमेव पांडुरंग ।।तु.गा.४०३०.००३।।

तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ।।तु.गा.४०३०.००४।।

सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ।।तु.गा.४०३१.००१।।

सर्वसुख ल्यालों सर्व अळंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ।।तु.गा.४०३१.००२।।

असों ऐसा कोठें आठवचि नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ।।तु.गा.४०३१.००३।।

तुका म्हणे आम्हीं झालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ।।तु.गा.४०३१.००४।।

पुण्यपापा ठाव नाहीं सुखदुःखा । हानिलाभशंका नासलिया ।।तु.गा.४०३२.००१।।

जितां मरण आलें आप पर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ।।तु.गा.४०३२.००२।।

अधिकार जात वर्णधर्मयात । ठाव नाहीं सत्य असत्याशीं ।।तु.गा.४०३२.००३।।

जन वन भिन्न अचेत चळण । नाहीं दुर्जेपण ठाव यासी ।।तु.गा.४०३२.००४।।

तुका म्हणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्व पूजा ।।तु.गा.४०३२.००५।।

भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग । इंद्रियांचा लाग । आम्हांवरूनि चुकला ।।तु.गा.४०३३.००१।।

करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ।।तु.गा.४०३३.००२।।

तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंची चारा धरी । आणुनियां घरीं । मुखीं घाली बाळका ।।तु.गा.४०३३.००३ ।।
तुका म्हणे ये आवडी । आम्हीं पायीं दिली बुडी । आहे तेथें जोडी । जन्मातरींचें ठेवणें ।।तु.गा.४०३३.००४ ।।
बाहिर पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासी जीवें वेटाळिलों ।।तु.गा.४०३४.००१ ।।
एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडिलें ।।तु.गा.४०३४.००२ ।।
झालीं दोनी नामें एकाचि मथनीं । दुसरिया गुणीं वेगळालीं ।।तु.गा.४०३४.००३ ।।
तुका म्हणे दाखविली मुक्ताफळीं । शिंपलेचि स्वस्थळीं खुंटलिया ।।तु.गा.४०३४.००४ ।।
बहुतां दिसांचि आजि झालि भेटी । झाली होती तुटी काळगती ।।तु.गा.४०३५.००१ ।।
येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ।।तु.गा.४०३५.००२ ।।
बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ।।तु.गा.४०३५.००३ ।।
बहु दिस होता सांडिला मारग । क्लेशाचा त्या त्याग आजि झाला ।।तु.गा.४०३५.००४ ।।
बहु होती केली सोंगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ।।तु.गा.४०३५.००५ ।।
तुका म्हणे येथें झालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ।।तु.गा.४०३५.००६ ।।
न मनावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ।।तु.गा.४०३६.००१ ।।
ज्याणें लौकिक हा केला । तो हा निवारिता भला ।।तु.गा.४०३६.००२ ।।
माझे इच्छे काय । होणार तें एके ठाय ।।तु.गा.४०३६.००३ ।।
सुखा आणि दुःखा । म्हणे वेगळा मी तुका ।।तु.गा.४०३६.००४ ।।
आम्ही मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ।।तु.गा.४०३७.००१ ।।
सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा तो पुतळा नाचे छंदें ।।तु.गा.४०३७.००२ ।।
बोलतसें जैसें बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ।।तु.गा.४०३७.००३ ।।
पाप पुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आम्हांसवें ।।तु.गा.४०३७.००४ ।।
तुका म्हणे तुम्ही आइका हो मात । आम्ही या अतीत देहाहूनी ।।तु.गा.४०३७.००५ ।।
आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो झाला सोहळा अनुपम्य ।।तु.गा.४०३८.००१ ।।
आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ।।तु.गा.४०३८.००२ ।।

एकदेशी होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ।।तु.गा.४०३८.००३।।
फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी झालों ।।तु.गा.४०३८.००४।।
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ।।तु.गा.४०३८.००५।।
तुका म्हणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ।।तु.गा.४०३८.००६।।
मरण माझें मरोन गेलें । मज केले अमर ।।तु.गा.४०३९.००१।।
ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभाव ।।तु.गा.४०३९.००२।।
आला होता गेला पूर । धरिला धीर जीवनीं ।।तु.गा.४०३९.००३।।
तुका म्हणे बुनादीचें । झालें साचें उजवणें ।।तु.गा.४०३९.००४।।
जगा काळ खाय । आम्हीं माथां दिले पाय ।।तु.गा.४०४०.००१।।
नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंग करी साहे ।।तु.गा.४०४०.००२।।
हरिच्या गुणें धाला । होता खातचि भुकेला ।।तु.गा.४०४०.००३।।
तुका म्हणे हळु । झाला कढत शितळु ।।तु.गा.४०४०.००४।।
हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कलेवरा पाठी ।।तु.गा.४०४१.००१।।
नेऊनि निजविलें स्मशानीं । माणसें जाळी तें ठिकाणीं ।।तु.गा.४०४१.००२।।
काढिलें तें ओढें । मागील उपचाराचें पुढें ।।तु.गा.४०४१.००३।।
नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगिता देव ।।तु.गा.४०४१.००४।।
याजसाठीं हें निर्वाण । केलें कसियेलें मन ।।तु.गा.४०४१.००५।।
तुका म्हणे अनुभव बरा । नाहीं तरीं हस्त पाय चोरा ।।तु.गा.४०४१.००६।।
मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ।।तु.गा.४०४२.००१।।
नासोनियां गेली खंती । सहजस्थिती भोगाची ।।तु.गा.४०४२.००२।।
न देखेंसें झालें श्रम । आलें वर्म हाता हें ।।तु.गा.४०४२.००३।।
तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ।।तु.गा.४०४२.००४।।
जाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानींचा ।।तु.गा.४०४३.००१।।

रडती रात्रंदिवस कामक्रोधमाया । म्हणती हायहाय यमधर्म ।।तु.गा.४०४३.००२।।
वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि लागला ब्रह्मत्वेंसी ।।तु.गा.४०४३.००३।।
फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य ध्वनि बोंब झाली ।।तु.गा.४०४३.००४।।
दिली तिळांजुळी कुळनामरूपासी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ।।तु.गा.४०४३.००५।।
तुका म्हणे रक्षा झाली आपोआप । उजळता दीप गुरुकृपा ।।तु.गा.४०४३.००६।।
कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ।।तु.गा.४०४४.००१।।
सत्ता झाली त्रिभुवनीं । चक्रपाणी कोंवसा ।।तु.गा.४०४४.००२।।
लडिवाळांचा भार वाहे । उभा आहे कुढावया ।।तु.गा.४०४४.००३।।
तुका म्हणे घटिका दिस । निमिषही न विसंबे ।।तु.गा.४०४४.००४।।
आम्हां शरणागतां । एवढी काय करणें चिंता ।।तु.गा.४०४५.००१।।
परि हे कौतुकाचे खेळ । अवघे पाहातों सकळ ।।तु.गा.४०४५.००२।।
अभयदान वदे । आम्हां कैचीं भयद्वंद्वें ।।तु.गा.४०४५.००३।।
तुका म्हणे आम्ही । हरिजन साधनाचे स्वामी ।।तु.गा.४०४५.००४।।
अणुरेणुया थोकडा । तुका आकाशा एवढा ।।तु.गा.४०४६.००१।।
गिळुनी सांडिले कळिवर । भवभ्रमाचा आकार ।।तु.गा.४०४६.००२।।
सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ।।तु.गा.४०४६.००३।।
तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता ।।तु.गा.४०४६.००४।।
माझे मनोरथ पावले जैं सिद्धी । तईं पायीं बुद्धि स्थिरावली ।।तु.गा.४०४७.००१।।
समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ।।तु.गा.४०४७.००२।।
त्रिविध तापाचें झालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ।।तु.गा.४०४७.००३।।
महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगोअंगीं संग अखंडित ।।तु.गा.४०४७.००४।।
जीवनाचा झाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं मावळलें ।।तु.गा.४०४७.००५।।
तुका म्हणे माप भरूं आलें सिगे । धारबोळ गंगे पूर वाहे ।।तु.गा.४०४७.००६।।

अहो उभया विटेवरी । भरोवरी चुकविली ।।तु.गा.४०४८.००१।।
निवारलें येणें जाणें । कोणा कोणें रुसावें ।।तु.गा.४०४८.००२।।
संकल्पासी वेंचे बळ । भारे फळ निर्माण ।।तु.गा.४०४८.००३।।
तुका म्हणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ।।तु.गा.४०४८.००४।।
कां रे माझा तुझ नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ।।तु.गा.४०४९.००१।।
अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ।।तु.गा.४०४९.००२।।
कां हें चित्त नाहीं पावत विश्रांती । इंद्रियांची गति खुंटेचि ना ।।तु.गा.४०४९.००३।।
तुका म्हणे कां हो धरियला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा ।।तु.गा.४०४९.००४।।
विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ।।तु.गा.४०५०.००१।।
विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारूं । उतरील पारूं भवनदीचा ।।तु.गा.४०५०.००२।।
विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणी बंधु ।।तु.गा.४०५०.००३।।
विठ्ठल हें जन विठ्ठल माझें मन । सोइरा सज्जन विठ्ठल माझा ।।तु.गा.४०५०.००४।।
तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा । नस्वरित गांवा जाइन त्याच्या ।।तु.गा.४०५०.००५।।
देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ।।तु.गा.४०५१.००१।।
पाहातां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ।।तु.गा.४०५१.००२।।
आरुष हे वाणी । गोड करुनि घेतां कानीं ।।तु.गा.४०५१.००३।।
आवडीनें खेळे । तुका पुरवावे सोहळे ।।तु.गा.४०५१.००४।।
लाडकी लेक मी संताची । मजवरी कृपा बहुतांची ।।तु.गा.४०५२.००१।।
अखई चुडा हातीं आला । आंकण मोती नाकाला ।।तु.गा.४०५२.००२।।
बोध मुराळी श्रृंगारिला । चवऱ्यायशीचा सिक्का केला ।।तु.गा.४०५२.००३।।
तुका तुर्की उतरला । साहानकेचा कौल दिला ।।तु.गा.४०५२.००४।।
उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ।।तु.गा.४०५३.००१।।
बोलविले बोलें बोल । धनी विठ्ठल सन्निध ।।तु.गा.४०५३.००२।।

तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ।।तु.गा.४०५३.००३।।

तुका म्हणे नये आम्हां । पुढें कामा गाबाळ ।।तु.गा.४०५३.००४।।

पुसतसे सांगा मी हें माझें ऐसें काई । रुसूं नका नुगवे तो झवे आपुली आई ।।तु.गा.४०५४.००१।।

कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनी फार राहे गुंफोनियां थोडें ।।तु.गा.४०५४.००२।।

सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । ज्यालें जीवो मेलें मरों प्रारब्धा हातीं ।।तु.गा.४०५४.००३।।

तुका म्हणे अभिमान सांडावा सकळीं । नये अंगावरी वायां येऊं देऊं कळी ।।तु.गा.४०५४.००४।।

वासुगीच्या बनीं सीता शोक करी । कांहो अंतरले रघुनाथ दुरी । येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी । कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ।।तु.गा.४०५५.००१।।

सांग वो त्रीजटे सखिये ऐसी मात । देईल कां नेदी भेटी रघुनाथ । मन उतावीळ जाला दुरी पंथ । राहों न सके प्राण माझा कुडी आंत ।।तु.गा.४०५५.००२।।

काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें । तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगिलें । गाईवत्सा पत्नीपुरुषा बिघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ।।तु.गा.४०५५.००३।।

नाडियेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिले रघुनाथा पाठिलागे तेणें। उल्लंघिली आज्ञा माव काय मी जाणें । देखुनी सुनाट घेउनि आलें सुनें ।।तु.गा.४०५५.००४।।

नाहीं मूळ मारग लागे आणीक सोय । एकाविण नामें रघुनाथाच्या माय । उपटी पक्षिया एक देऊनि पाय । उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काय ।।तु.गा.४०५५.००५।।

जनकाची नंदिनी दु:खें ग्लांती थोरी । चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी । संबोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी । घेईल तुकयास्वामी राम लंकापुरी ।।तु.गा.४०५५.००६।।

अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्यतारका । अगा जनार्दना जगव्यापका । अगा पालका भक्तांचिया ।।तु.गा.४०५६.००१।।

अगा ये वसुदेवदेवकीनंदना । अगा ये गोपिकारमणा । अगा बळिबंधा वामना । अगा निधाना गुणनिधी ।।तु.गा.४०५६.००२।।

अगा ये द्रौपदीबांधवा । अगा ये सखया पांडवा । अगा जिवाचिये जीवा । अगा माधवा मधुसूदना ।।तु.गा.४०५६.००३।।

अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरी गरुडध्वजा । अगा सुंदरा सहस्त्रभुजा । पार मी तुझा काय वर्णुं ।।तु.गा.४०५६.००४।।

अगा अंबऋषि परंपरा । निरालंबा निर्विकारा । अगा गोवर्धनधरणीधरा । अगा माहेरा दीनाचिया ।।तु.गा.४०५६.००५।।

अगा धर्मराया धर्मशीळा । अगा कृपासिंधु कृपाळा । अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळाप्रवीणा ।।तु.गा.४०५६.००६।।
अगा चतुरा सुजाणा । मधुरगिरा सुलक्षणा । अगा उदारा असुरमर्दना । राखे शरणा तुकयाबंधु ।।तु.गा.४०५६.००७।।
देवा मी चांडाळ चांडाळ । म्हणतां लागताहे वेळ । नसे पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ।।तु.गा.४०५७.००१।।
जन्मा उपजलियापासूनी । असत्य कर्म ते अझूनी । सत्य आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ।।तु.गा.४०५७.००२।।
भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहवें वार्ता । अखंड विषयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनीं ।।तु.गा.४०५७.००३।।
काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर । यांचें तरी माहेरघर । परउपकार वैरी जैसा ।।तु.गा.४०५७.००४।।
निंदा द्रेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये ते केले संतउपहास । अभक्ष तेंही भक्षिलें ।।तु.गा.४०५७.००५।।
पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलो नये घडलें ऐसें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरूनी ।।तु.गा.४०५७.००६।।
काया मनें वाचा इंद्रियांशीं । सकळ पापांचीच राशी । तुकयाबंधु म्हणे ऐसियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ।।तु.गा.४०५७.००७।।
काय काय करितों या मना । परी नाइके नारायणा । करूं नये त्याची करी विवंचना । पतना नेऊं आदरिलें ।।तु.गा.४०५८.००१।।
भलतिया सवें धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारी कुडें कांहीं कपट । घात बळकट मांडियेला ।।तु.गा.४०५८.००२।।
न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्तही पाताळें आकाशा । घालीं उडी बळेचि देखोनि फांसा । केलों या देशा पाहुणा ।।तु.गा.४०५८.००३।।
चेतवूनी इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुराविलीं शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ।।तु.गा.४०५८.००४।।
आतां काय ऐसें करावें यासी । बहु जाचिलों केलों कासावीसी । तुकयाबंधु म्हणे हृषीकेशी । धांव मज ऐसी परी जाली ।।तु.गा.४०५८.००५।।
एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणांसी । न पडे ऐसी कृपा करीं ।।तु.गा.४०५९.००१।।
नको दुजी बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धि परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ।।तु.गा.४०५९.००२।।
मना येईल तो जन्म देईं । भलते कुळीं भलते ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहुनी तुवां न वजावें ।।तु.गा.४०५९.००३।।
इतुकें करीं भलत्यापरी । भलत्याभावें तुझे द्वारीं । राहेन दास होऊनी कामारी । वदो वैखरी नित्य नाम ।।तु.गा.४०५९.००४।।
नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ।।तु.गा.४०५९.००५।।
तूं बळिया शिरोमणी । आहेसी माजी ये त्रिभुवनीं । रिघालों पाठी तुझी म्हणउनी । आतां करीन मी असेल तें ।।तु.गा.४०६०.००१।।
तूं देवा प्रतापदिनकर । सुराअसुरांचा सुर । महावीरा वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ।।तु.गा.४०६०.००२।।
कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवांची बंदीशाळ । संहारूनि राक्षसदळ । शरणागत राज्यीं स्थापिला ।।तु.गा.४०६०.००३।।
उपक्रम करावा बहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत । उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ।।तु.गा.४०६०.००४।।

किती म्यां काय विनवावें । शरण आलों जीवेंभावें । तुकयाबंधु म्हणे करावें । क्षेम अवघें येणें काळें ।।तु.गा.४०६०.००५।।
उभा देखिला भीमातीरीं । कर मिरविले कटावरी । पाउलें तरी समचि साजिरीं । नाम तरि अनंत अतिगोड ।।तु.गा.४०६१.००१।।
शंखचक्रांकित भूषणें । जडितमेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभें गोरेपणें । लोपली तेणें रवितेजें ।।तु.गा.४०६१.००२।।
श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिकामाळ । दंत ओळी हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखरासी ।।तु.गा.४०६१.००३।।
कडीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळां । मृगनाभीं रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ।।तु.गा.४०६१.००४।।
सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । धन्य ते माता प्रसवली ।।तु.गा.४०६१.००५।।
कईं देखतां होईन डोळीं । सकळां भूतीं मूर्ति सांवळी । जीवा नाव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ।।तु.गा.४०६२.००१।।
ऐसी कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडईन । होईल स्थान अनुतापीं ।।तु.गा.४०६२.००२।।
ऐसा कईं येईन दैवास । दृश्य नासोनि जाईल आस । सदा संतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष धणीवरी।।तु.गा.४०६२.००३।।
कईं नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वी जळ सागर । वाहाती पूर आनंदाचे ।।तु.गा.४०६२.००४।।
प्रसन्न दया क्षमा शांति । कईं नवविधा होईल भक्ति । भोगीन वैराग्यसंपत्ति । मनोरथ कळती तई पुरले ।।तु.गा.४०६२.००५।।
तुकयाबंधु म्हणे सांग । नव्हे तुजविण निरसेना पांग । म्हणोनी घातलें साष्टांग । पांडुरंगा चरणावरी ।।तु.गा.४०६२.००६।।
दु:खें दुभागलें हृदयसंपुष्ट । गहिंवरें कंठ दाटताहे ।।तु.गा.४०६३.००१।।
ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनियां वनामाजी ।।तु.गा.४०६३.००२।।
आक्रंदती बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी फुटों पाहे ।।तु.गा.४०६३.००३।।
काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां ।।तु.गा.४०६३.००४।।
तुज ठावे आम्हां कोणी नाहीं सखा । उभयलोकीं तुका तुजविण ।।तु.गा.४०६३.००५।।
कान्हा म्हणे तुझ्या वियोगें पोरटीं । झालों दे रे भेटी बंधुराया ।।तु.गा.४०६३.००६।।
सख्यत्वासी गेलों करित सलगी । नेणेचि अभागी महिमा तुझा ।।तु.गा.४०६४.००१।।
पावलों आपुलें केलें लाहें रस । निर्दैवा परिस काय होय ।।तु.गा.४०६४.००२।।
कष्टविलासी म्यां चांडाळें संसारीं । अद्यापिवरि तरी उपदेशीं ।।तु.गा.४०६४.००३।।
उचित अनुचित सांभाळिलें नाहीं । कान्हा म्हणे कांहीं बोलों आतां ।।तु.गा.४०६४.००४।।
असो आतां कांहीं करोनियां ग्लांती । कोणा काकुलती येइल येथें ।।तु.गा.४०६५.००१।।

करूं कांहीं दिस राहे तो सायास । झोंबों त्या लागास भावाचिये ।।तु.गा.४०६५.००२।।
करितां रोदना बापुडें म्हणती । परि नये अंतीं कामा कोणी ।।तु.गा.४०६५.००३।।
तुकयाबंधु म्हणे पडिलिया वनीं । विचार तो मनीं बोलिला हें ।।तु.गा.४०६५.००४।।
चरफडें चरफड शोकें शोक होय । कार्यमूळ आहे धीरापाशीं ।।तु.गा.४०६६.००१।।
कल्पतसे मज ऐसें हे पाहातां । करावी ते चिंता मिथ्या खोटी ।।तु.गा.४०६६.००२।।
न चुके होणार सांडिल्या शूरत्वा । फुकटचि सत्वा होईल हानी ।।तु.गा.४०६६.००३।।
तुकयाबंधु म्हणे दिला बंद मना । वांचुनी निधाना न पवीजे ।।तु.गा.४०६६.००४।।
नलगे चिंता आतां अनुमोदन हाता । आलें मूळ भ्राता गेला त्याचें ।।तु.गा.४०६७.००१।।
घरभेद्या येथें आहे तें सुकानु । धरितों कवळून पाय दोन्ही ।।तु.गा.४०६७.००२।।
त्याचें त्याचिया मुखें पडियेलें ठावें । नलगे सारावें मागें पुढें ।।तु.गा.४०६७.००३।।
तुकयाबंधु म्हणे करील भेटी भावा । सोडीन तेधवां या विठ्ठला ।।तु.गा.४०६७.००४।।
मूळ स्थळ ज्याचें गोमतीचे तीरीं । तो हा सारी दोरी खेळवितो ।।तु.गा.४०६८.००१।।
ऐसें हें कळलें असावें सकळां । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ।।तु.गा.४०६८.००२।।
वैष्णव हे हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगितली ।।तु.गा.४०६८.००३।।
तुकयाबंधु म्हणे आलें अनुभवास । तेणेंच आम्हांस नागविलें ।।तु.गा.४०६८.००४।।
नये सोमसरी उपचाराची हरी । करकरेचें करीं काळें तोंड ।।तु.गा.४०६९.००१।।
मागतों इतुकें जोडूनियां कर । ठेऊनियां शीर पायावरी ।।तु.गा.४०६९.००२।।
तुम्हां आम्हां एके ठायीं सहवास । येथें द्वैत द्वेष काय खरा ।।तु.गा.४०६९.००३।।
तुकयाबंधु म्हणे बहुतां बहुतां रीती । अनंता विनंती परिसावी हे ।।तु.गा.४०६९.००४।।
बरा रे निर्गुणा नष्ट नारायणा । घरबुडवणा भेटलासी ।।तु.गा.४०७०.००१।।
एके घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी अपरापरी केली आम्हां ।।तु.गा.४०७०.००२।।
कान्हा म्हणे कां रे निष्काम देखिलें । म्हणोनी मना आलें करितोसी ।।तु.गा.४०७०.००३।।
निनांव हें तुला । नांव साजे रे विठ्ठला । बरा शिरविला । फाटक्यामध्यें पाव ।।तु.गा.४०७१.००१।।

कांहीं तरी विचारिलें । पापपुण्य ऐसें केलें । भुरळें घातलें । एकाएकीं भावासीं ।।तु.गा.४०७१.००२।।
मुद्रा धारण माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे । हातीं फांशांचें गुंडाळें । कोण चाळे गृहस्था हे ।।तु.गा.४०७१.००३।।
तुकयाबंधु म्हणे मिस्किन । करितोसीं देखोन । पाहा दुरीवरी विच्छिन्न । केला परी संसार ।।तु.गा.४०७१.००४।।
लालुचाईसाठीं बळकाविसी भावा । परि मी जाण देवा जिरों नेदी ।।तु.गा.४०७२.००१।।
असों द्या निश्चय हा मनीं मानसीं । घातली येविशीं दृढ कास ।।तु.गा.४०७२.००२।।
मज आहे बळ आळीचें सबळ । फोडीन अंत्राळ हृदय तुझें ।।तु.गा.४०७२.००३।।
करुणारसें तुकयाबंधु म्हणे भुलवीन । काढूनी घेईन निज वस्तु ।।तु.गा.४०७२.००४।।
भक्ति मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणोन भावा वेगीं ।।तु.गा.४०७३.००१।।
रिद्धि सिद्धि मोक्ष ठेवीं गुंडाळून । दे माझ्या आणून भावा वेगीं ।।तु.गा.४०७३.००२।।
नको आपुलियां नेऊं वैकुंठासी । दे माझ्या भावासी आणून वेगीं ।।तु.गा.४०७३.००३।।
नको होऊं कांहीं होसील प्रसन्न । दे माझ्या आणून भावा वेगीं ।।तु.गा.४०७३.००४।।
तुकयाबंधु म्हणे पहा हो नाहीं तरी । हत्या होईल शिरीं पांडुरंगा ।।तु.गा.४०७३.००५।।
धींद धींद तुझ्या करीन चिंधड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ।।तु.गा.४०७४.००१।।
केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरी नास आरंभिला ।।तु.गा.४०७४.००२।।
मरावें मारावें या आलें प्रसंगा । बरे पांडुरंगा कळलें सावें ।।तु.गा.४०७४.००३।।
तुकयाबंधु म्हणे तुझी माझी उरी । उडाली न धरीं भीड कांहीं ।।तु.गा.४०७४.००४।।
तुझीं वर्मे आम्हां ठावीं नारायणा । परी तूं शाहाणा होत नाहीं ।।तु.गा.४०७५.००१।।
मग कालाभुली हाका देते वेळे । होतोसी परि डोळे नुघडिसी ।।तु.गा.४०७५.००२।।
जाणोनी अज्ञान करावें मोहरे । खोटी खोडी हे रे तुझी देवा ।।तु.गा.४०७५.००३।।
तुकयाबंधु म्हणे कारण प्रचिती । पाहातों वेळ किती तेच गुण ।।तु.गा.४०७५.००४।।
मुख्य आहे आम्हां मातेचा पटंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी ।।तु.गा.४०७६.००१।।
नको लावूं आम्हां सवे तूं तोंवरी । पहा दूरवरी विचारूनी ।।तु.गा.४०७६.००२।।
साहे संतजन केले महाराज । न घडें आतां तुज भेईन मी ।।तु.गा.४०७६.००३।।

तुकयाबंधु म्हणे आईक्यें ऐक्यता । वाढतें अनंता दुःखें दुःख ।।तु.गा.४०७६.००४।।
नाहीं घटिका म्हणसी । लाग लागला तुजपाशीं । पडिला हृषीकेशी । जाब सकळ करणें ।।तु.गा.४०७७.००१।।
माझें नेलें पांघरुण । ठावें असोन दुर्बळ दीन । माणसामधून । उठविलें खाणोऱ्या ।।तु.गा.४०७७.००२।।
आम्हीं हे जगवूनि होतों पाणी । संदी देवदेव करूनी । जालासी कोठोनी । पैदा चोरा देहाच्या ।।तु.गा.४०७७.००३।।
तुकयाबंधु म्हणे केलें । उघडें मजचि उमगिलें । ऐसें काय गेलें । होतें तुज न पुरतें ।।तु.गा.४०७७.००४।।
अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ।।तु.गा.४०७८.००१।।
म्हणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळीं धरिलीं एकें दूरी ।।तु.गा.४०७८.००२।।
एका सुख द्यावें घेऊनी वोसंगा । एकें दारीं गळा श्रमविती ।।तु.गा.४०७८.००३।।
एकां नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अन्न करितील ।।तु.गा.४०७८.००४।।
एकें वाटतील नवजावीं दूर । एकांचा मत्सर जवळी येतां ।।तु.गा.४०७८.००५।।
तुकयाबंधु म्हणे नावडती त्यांस । कासया व्यालास नारायणा ।।तु.गा.४०७८.००६।।
कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । म्हणवितोसी परि केवळ । गळेकाटू दिसतोसी ।।तु.गा.४०७९.००१।।
काय केलें होतें आम्ही । सांग तुझें एक ये जन्मीं । झालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया ।।तु.गा.४०७९.००२।।
भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करूनी बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ।।तु.गा.४०७९.००३।।
तुकयाबंधु म्हणे भला । कैसें म्हणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहीं तरी ।।तु.गा.४०७९.००४।।
आतां कळों आले गुण । अवघेचि वावरून । चोखट लक्षण । धरियेलें हें घरघेणें ।।तु.गा.४०८०.००१।।
या नांवें कृपासिंधु । म्हणवितोसी दीनबंधु । मज तरी मैंदु । दिसतोसी पहातां ।।तु.गा.४०८०.००२।।
अंमळ दया नाहीं पोटीं । कठीण तैसाचि कपटी । आंधळ्याची काठी । माझी गुदरसीच ना ।।तु.गा.४०८०.००३।।
तुकयाबंधु म्हणे पुरता । नाहीं म्हणा बरें अनंता । एरवीं असतां । तुझा घोंट भरियेला ।।तु.गा.४०८०.००४।।
काय सांगों हृषीकेशा । आहे अनुताप आला ऐसा । गिळायासी निमिषा । निमिष लागों नेदावे ।।तु.गा.४०८१.००१।।
माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लाविलीं काहार । तारातीर करोनि ।।तु.गा.४०८१.००२।।
जीव घ्यावा किंवा द्यावा । तुझा आपुला केशवा । इतुकें उरलें आहे देवा । भावाचिया निमित्यें ।।तु.गा.४०८१.००३।।
तुकयाबंधु म्हणे जग । बरें वाईट म्हणो मग । याकारणें परि लाग । न संडावा सर्वथा ।।तु.गा.४०८१.००४।।

मायबाप निमाल्यावरी । घातलें भावाचे आभारीं । तोहि परि हरी । तुज जाला असमाई ।।तु.गा.४०८२.००१।।
हें कां भक्तीचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता व्यवहार । शेवटीं हे झालासी ।।तु.गा.४०८२.००२।।
एका जीवावरी । होतों दोनी कुटुंबारी । चाळवूं तो तरी । तुज येतो निर्लज्जा ।।तु.गा.४०८२.००३।।
तुकयाबंधु म्हणे भला । आणीक काय म्हणावें तुला । वेडा त्यानें केला । तुजसवे संबंधु ।।तु.गा.४०८२.००४।।
पूर्वी पूर्वजांची गती । हेचि आइकिली होती । सेवे लावूनी श्रीपती । निश्चिती केली तयांची ।।तु.गा.४०८३.००१।।
कांरे पाठी लागलासी । ऐसा सांग हृषीकेशी । अद्यापवरी न राहासी । अंत पाहासी किती म्हूण ।।तु.गा.४०८३.००२।।
जन्मजन्मांतरीं दावा । आम्हां आपणां केशवा । निमित्य चालवा । काईसयास्तव हें ।।तु.गा.४०८३.००३।।
तुकयाबंधु म्हणे अदेखणा । किती होसी नारायणा । देखों शकवेना । खातयासी न खात्या ।।तु.गा.४०८३.००४।।
निसुर संसार करून । होतों पोट भरून । केली विवसी निर्माण । देवपण दाखविलें ।।तु.गा.४०८४.००१।।
ऐसा काढियेला नीस । काय म्हूण सहित वंश । आणिलें शेवटास । हाउस तरी न पुरे ।।तु.गा.४०८४.००२।।
उरलों पालव्या शेवटीं । तेंही न देखवे दृष्टी । दोघांमध्यें तुटी । रोकडीचि पाडिली ।।तु.गा.४०८४.००३।।
तुकयाबंधु म्हणे गोड । बहु जालें अति वाड । म्हणोनी कां बुड । मुळ्यांसहित खावें ।।तु.गा.४०८४.००४।।
बरा जाणतोसी धर्मनीति । उचित अनुचित श्रीपति । करूं येते राती । ऐसी डोळे झांकूनी ।।तु.गा.४०८५.००१।।
आतां जाब काय कैसा । देसी तो दे जगदीशा । आणिला वोळसा । आपणाभोंवता ।।तु.गा.४०८५.००२।।
सेवेचिया सुखास्तव । बळें धरिलें अज्ञानत्व । येईल परि हा भाव । ज्याचा त्यासी कारणा ।।तु.गा.४०८५.००३।।
तुकयाबंधु म्हणे नाहीं । आतां आम्हां बोल कांहीं । जडोनिया पायीं । तुझे त्वांचि घेतलें ।।तु.गा.४०८५.००४।।
कांहीं विपत्ति आपत्यां । आतां आमुचिया होतां । काय होईल अनंता । पहा बोलों कासया ।।तु.गा.४०८६.००१।।
बरें अनासायें जालें । सायासेंविण बोले चाले । काबाड चुकले । केलें कष्टांवेगळें ।।तु.गा.४०८६.००२।।
बरा सांपडलासी वोजा । वर्मावरी केशीराजा । बोलायासी तुझा । उजुरचि नाहींसा ।।तु.गा.४०८६.००३।।
तुकयाबंधु म्हणे दगा । बरा दिला होता बगा । झडकरी चला गा । चांग दैवें पांवलों ।।तु.गा.४०८६.००४।।
देवा तुजपें माझ्या पूर्वजांचें ऋण । आहे तें कां नेदिसी अझून । अवगलासी झोंडपणें । परि मी जाण जीवें जिरों नेदीं ।।तु.गा.४०८७.००१।।
कळों येईल रोकडें । उभा करीन संतांपुढें । तुझें काय एवढें । भय आपुलें मागतां ।।तु.गा.४०८७.००२।।
आजीवरी होतों नेणतां । तों तुज फावलें रे अनंता । कवडीचा तों आतां । पडों नेदीन फेर ।।तु.गा.४०८७.००३।।

ठेविला ये जीवनीं जीव । म्हणे तुकयाचा बांधव । माझा गळा तुझा पाव । एके ठायीं बांधीन ।।तु.गा.४०८७.००४।।

मागें असतासी कळला । उमस घेऊं नसता दिला । तेणेंचि काळें केला । असतां अवघा निवाडा ।।तु.गा.४०८८.००१।।

इतका न लागतां उशीर । न धरितों भीडभार । सिद्धासी व्यवहार । कासयासी लागला ।।तु.गा.४०८८.००२।।

असोनियां माल खरा । किती केल्या येरझारा । धरणेंही दिवस तेरा । माझ्या भावें घेतलें ।।तु.गा.४०८८.००३।।

अझून तरी इतक्यावरी । चुकवीं अनाचार हरी । तुकयाबंधु म्हणे उरी । नाहीं तरी नुरे कांहीं ।।तु.गा.४०८८.००४।।

आतां न राहें क्षण एक । तुझा कळला रे लौकिक । नेदीं हालों एक । कांहीं केल्यावांचूनी ।।तु.गा.४०८९.००१।।

संबंध पडिला कोणाशीं । काय डोळें झांकितोसी । नेईन पांचांपाशीं । दे नाहीं तरी वोढूनी ।।तु.गा.४०८९.००२।।

सुखें नेदीस जाणवलें । नास केल्याविण उगलें । तरि तेंही विचारिलें । आम्हीं आहे तुज आधीं ।।तु.गा.४०८९.००३।।

असेंच करूनी किती । नागविली नाहीं नीती । तुकयाबंधु म्हणे अंतीं । न सोडिसी ते खोडी ।।तु.गा.४०८९.००४।।

तुज ते सवे आहे ठावें । घ्यावें त्याचें बुडवावें । परि तें आम्हांसवें । आतां न फावें कांहीं ।।तु.गा.४०९०.००१।।

नव्हों सोडायाचे धणी । कष्टें मेळविलें करोनी । पाहा विचारोनी । ओढी धरोनी काम नाहीं ।।तु.गा.४०९०.००२।।

अवघे राहिले प्रकार । झालों जिवासी उदार । असा हा निर्धार । कळला असावा असेल ।।तु.गा.४०९०.००३।।

आतां निदसुर नसावें । गांठ पडली कुणब्यासवें । तुकयाबंधु म्हणे राखावें । देवा महत्त्व आपुलें ।।तु.गा.४०९०.००४।।

बहू बोलणें नये कामा । वाउगें तें पुरुषोत्तमा । एकाचि वचनें आम्हां । काय सांगणें तें सांगा ।।तु.गा.४०९१.००१।।

देणें आहे कीं भंडाई । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा ।।तु.गा.४०९१.००२।।

मागें गेलें जें होऊनी । असो तें धरित नाहीं मनीं । आतां पुढें येथूनी । कैसा काय विचार ।।तु.गा.४०९१.००३।।

सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळतें सकळ । तुकयाबंधु म्हणे खळखळ । करावी ते उरले ।।तु.गा.४०९१.००४।।

आतां हें न सुटे न चुके । बोल कां दवडिसी फिके । जन लोक पारिखें । अवघें केलें म्यां यासाठीं ।।तु.गा.४०९२.००१।।

नये सरतां नव्हे भलें । तुझें लक्षण कळलें । बैसलासी काढीलें । देहाचें मुळीं दिवाळें ।।तु.गा.४०९२.००२।।

दिसतोसी बरा बोल कोंवळे । गुण मैंदाचे चाळे । दिसताती ये वेळे । काय करूं विसंबोनी ।।तु.गा.४०९२.००३।।

तुकयाबंधु म्हणे देखतां । अंध बधिर ऐकतां । कैसें व्हावें आतां । इतुकिया उपरी ।।तु.गा.४०९२.००४।।

तिहीं ताळीं हेचि हाक । म्हणती पांढरा स्फटिक । अवघा बुडविला लौकिक । सुखेंची भिके लाविली ।।तु.गा.४०९३.००१।।

थोंटा नांव शिरोमणी । नाहीं जोडा त्रिभुवनीं । म्हणोनी शहाणे ते कोणी । तुझे दारीं बैसतीना ।।तु.गा.४०९३.००२।।

निर्गुण निलाजिरा निनांवा । लंड झोंड कुडा देवा । नागवणा या नांवा । वांचूनि दुजा नाइकों ।।तु.गा.४०९३.००३।।
सर्वगुणें संपन्न । कळों आलासी संपूर्ण । तुकयाबंधु म्हणे चरण । आतां जीवें न सोडीं ।।तु.गा.४०९३.००४।।
तोचि प्रसंग आला सहज । गुज धरितां नव्हे काज । न संडितां लाज । पुढें वोज न दिसे ।।तु.गा.४०९४.००१।।
तूं तर न होसी शहाणा । नये सांगतों तेंही मना । आपण आपणा । आतां प्रयत्न देखावा ।।तु.गा.४०९४.००२।।
न पुरवी पाहातां वाट । द्यावें प्रमाण चोखट । कास घालूनियां नीट । चौघाचार करावा ।।तु.गा.४०९४.००३।।
आतां श्रमाचें कारण । नव्हें व्हावें उदासीन । न पडे तयाविण । गांठी तुकयाबंधु म्हणे ।।तु.गा.४०९४.००४।।
हळुहळू जाड । होत चालिलें लिगाड । जाणवेल निवाड । न करिसी परि पुढें ।।तु.गा.४०९५.००१।।
मी तो सांगून उतराई । झालों आतां तुज काई । कळों येईल भाई । तैसा करीं विचार ।।तु.गा.४०९५.००२।।
मागें युगें अठ्ठावीस । जालीं दिवसांचा दिवस । मुदल व्याज कासावीस । होसी देवा ये कामें ।।तु.गा.४०९५.००३।।
तुकयाबंधु म्हणे राखें । आतां टाकीं तुझीं तीं सुखें । जगजाहिर ठाउकें । झालें नाहीं खंडलेंसें ।।तु.गा.४०९५.००४।।
पत्र उचटिलें प्रयत्नें । ग्वाही करायाकारणें । नाहीं तरी पुण्यें । तुझ्या काय उणें आम्हां ।।तु.गा.४०९६.००१।।
नांव तुझेंचि करोनी । आहों सुखें पोट भरोनी । केली केली जाणवणी । म्हणउनि नाहीं म्हणसील ।।तु.गा.४०९६.००२।।
आतां इतुकियाउपरी । दे नको भलतें करीं । म्हणती ऋणकरी । आमुचा इतकें उदंड ।।तु.गा.४०९६.००३।।
तुकयाबंधु जागा । आळवावया पांडुरंगा । केला कांहीं मागा । याची नव्हती गरज ।।तु.गा.४०९६.००४।।
माझ्या भावें केली जोडी । न सरेसी कल्पकोडी । आणियेलें धाडीं । घालूनी अवघें वैकुंठ ।।तु.गा.४०९७.००१।।
आतां नलगें यावें जावें । कोठें कांहींच करावें । जन्मोजन्मीं सुखें खावें । बैसोनसें जालें ।।तु.गा.४०९७.००२।।
असंख्य संख्या नाहीं पार । आनंदें दाटलें अंबर । न माये अपार । त्रिभुवनीं सांठवितां ।।तु.गा.४०९७.००३।।
अवघें भरलें सदोदित । जाले सुखाचे पर्वत । तुकयाबंधु म्हणे परमार्थ । धन अद्भुत सांपडलें ।।तु.गा.४०९७.००४।।
आतां चुकलें देशावर । करणें अकरणें सर्वत्र । घरासी आगर । आला सकळ सिद्धींचा ।।तु.गा.४०९८.००१।।
जालों निधाई निधानें । लागलें अनंतगुणरत्न । जन्माचें विच्छिन्न। दुःख झालें दारिद्र ।।तु.गा.४०९८.००२।।
तारूं सागरिंचें अवचितें । हेंदोवलें आलें येथें । ओढिलें संचितें । पूर्वदत्तें लाधलें ।।तु.गा.४०९८.००३।।
तुकयाबंधु म्हणे सीमा । नाहीं आमुचिया दैवा । आतां पुरुषोत्तमा । ऐसा सौदागर सांपडला ।।तु.गा.४०९८.००४।।
सांपडलें जुनें । आमुच्या वडिलांचें ठेवणें । केली नारायणें । कृपा पुण्यें पूर्वीचिया ।।तु.गा.४०९९.००१।।

सुखें आनंदरूप आतां । आम्हीं आहों याकरितां । निवारिली चिंता । देणें घेणें चुकलें ।।तु.गा.४०९९.००२।।
जालें भांडवल घरींचें । अमूप नाम विठ्ठलाचें । सुकृत भावाचें । हें तयानें दाविलें ।।तु.गा.४०९९.००३।।
तुकयाबंधु म्हणे फिटला । पांग नाहीं बोलायाला । चाड दुसरी विठ्ठला । वांचूनियां आणिक ।।तु.गा.४०९९.००४।।
कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ।।तु.गा.४१००.००१।।
दीनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहों केलें पापपुण्य ।।तु.गा.४१००.००२।।
पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरिले ।।तु.गा.४१००.००३।।
तुकयाबंधु म्हणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ।।तु.गा.४१००.००४।।
वचन ऐका कमळापती । मज रंकाची विनंती ।।तु.गा.४१०१.००१।।
कर जोडितों कथेकाळीं । आपण असावें जवळीं ।।तु.गा.४१०१.००२।।
घेईं घेईं माझी भाक । जरि कां मागेन आणिक ।।तु.गा.४१०१.००३।।
तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुकाची राखावा ।।तु.गा.४१०१.००४।।
करूनी उचित । प्रेम घाली हृदयांत ।।तु.गा.४१०२.००१।।
आलों दान मागायास । थोर करूनियां आस ।।तु.गा.४१०२.००२।।
चिंतनसमयीं । सेवा आपुलीच देई ।।तु.गा.४१०२.००३।।
तुकयाबंधु म्हणे भावा । मज निरवावें देवा ।।तु.गा.४१०२.००४।।
कामक्रोध अहंकार नको देहीं । आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं । वास पंढरीचा जन्म सदा देईं । आणीक दुजें मागणें तुज नाहीं ।।तु.गा.४१०३.००१।।
ये हरी मज कृपा देईं दान । नाशीं तिमिर दाखवीं चरण । आर्त पुरवावें भेटी देऊन । नको उपेक्षूं आलिया शरण ।।तु.गा.४१०३.००२।।
नाम अखंड हृदयीं राहों वाणी । न पडो विसर क्षण जागृतीं स्वप्नीं । संतसमागम ऐसा दे लावूनी । आणीक दुजें कांहीं नेणें तुजवांचूनी ।।तु.गा.४१०३.००३।।
पंथपुरिंचा रविसुत पुरे आतां । आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता । नाहीं आडताळा त्रैलोक्यामाजी सरता । विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवुनि माथा ।।तु.गा.४१०३.००४।।
आतां मागतों तें ऐक नारायणा । भावपूर्वक मनापासूनिया ।।तु.गा.४१०४.००१।।

असों दे मोकळी जिव्हा जरी गाईल गुण । नाहीं तरी खिळुन टाकीं परती ।।तु.गा.४१०४.००२।।
मातेचिया परि देखती परनारी । ठेवीं नेत्र तरी नाहीं तरी नको ।।तु.गा.४१०४.००३।।
तरी बरे कांटाळा करिती निंदास्तुतीचा । नाहीं तरि कानांचाही देख प्रेत्न ।।तु.गा.४१०४.००४।।
सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक । राखावीं पृथक तोडोनि भ्रम ।।तु.गा.४१०४.००५।।
तुकयाबंधु म्हणे तेचि वाट प्राणां । पडतां नारायणा विसर तुझा ।।तु.गा.४१०४.००६।।
नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनेंसहित आलों शरण ।।तु.गा.४१०५.००१।।
करीं अंगीकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रीदें करावीं खरीं ।।तु.गा.४१०५.००२।।
नेणें भक्तिभाव तुझा म्हणवितों दास । जरी देसी अंतर तरी लज्जा कोणास ।।तु.गा.४१०५.००३।।
म्हणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाय । आतां कोण दुजा ऐसा आम्हांसी आहे ।।तु.गा.४१०५.००४।।
तूंच मायबाप बंधु सखा आमुचा । वित्त गोत जिवलग जीवाचा ।।तु.गा.४१०६.००१।।
आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां ।।तु.गा.४१०६.००२।।
तूंच क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ । तूंच तप तीर्थ व्रत गुरू सकळ ।।तु.गा.४१०६.००३।।
म्हणे तुकयाबंधु करिता कारयिता देवा । तूंच भाव भक्ति पूजा पुरस्कार आघवा ।।तु.गा.४१०६.००४।।
गाऊं वाहूं टाळी रंगीं नाचों उदास । सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ।।तु.गा.४१०७.००१।।
बळियाचा बळी तो कैवारी आमुचा । भुक्तिमुक्तिदाता सकळांही सिद्धींचा ।।तु.गा.४१०७.००२।।
मारूं शब्दशस्त्रें बाण निःशंक अनिवार । कंटकांचा चूर शिर फोडूं काळाचे ।।तु.गा.४१०७.००३।।
म्हणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ।।तु.गा.४१०७.००४।।
सांडूनी वैकुंठ । उभा विटेवरी नीट ।।तु.गा.४१०८.००१।।
आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ।।तु.गा.४१०८.००२।।
पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनियां करी ।।तु.गा.४१०८.००३।।
तुकयाबंधु म्हणे अंबर । गजर होतो जयजयकार ।।तु.गा.४१०८.००४।।
कृपाळू भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ।।तु.गा.४१०९.००१।।
उभा न पाचारितां दारीं । न सांगतां काम करी ।।तु.गा.४१०९.००२।।

भाव देखोनि निर्मळ । रजां वोडवी कृपाळ ।।तु.गा.४१०९.००३।।
तुकयाबंधु म्हणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ।।तु.गा.४१०९.००४।।
केला अंगीकार पंढरीच्या देवें । आतां काय करितील काळ मशक मानवें ।।तु.गा.४११०.००१।।
घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यानें । बैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ।।तु.गा.४११०.००२।।
लागों नेदी वारा दुजियांचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आम्हांसी ।।तु.गा.४११०.००३।।
म्हणे तुकयाबंधु नलगे करावी चिंता । कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां ।।तु.गा.४११०.००४।।
अगोचरीं बोलिलों आज्ञेविण आगळें । परी तें आतां न संडावें राउळें ।।तु.गा.४१११.००१।।
जाईन रोकडा बोल न पुसती आम्हां । तुझा तुझें म्हणविलें पहा पुरुषोत्तमा ।।तु.गा.४१११.००२।।
न व्हावा न वजावा न कळतां अन्याय । न धरावें तें मनीं भलता करा उपाय ।।तु.गा.४१११.००३।।
म्हणे तुकयाबंधु हीन मी म्हणोनि लाजसी । वारा लागों पाहाताहे उंच्या झाडासीं ।।तु.गा.४१११.००४।।
मरोनि जाईन गुणनामावरूनी । तुझ्या चक्रपाणी मायबापा ।।तु.गा.४११२.००१।।
चुकविलीं दु:खें मायेचा वोळसा । तोडोनियां आशा पाश तेणें ।।तु.गा.४११२.००२।।
केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंता तळमळ नाहीं ऐसी ।।तु.गा.४११२.००३।।
काळे तोंड काळ करूनि राहिले । भूतमात्र झालें सज्जनसखें ।।तु.गा.४११२.००४।।
तुकयाबंधु म्हणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ।।तु.गा.४११२.००५।।
कोण या पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं । जाहाज पृथ्वीपति । केली ख्याती अद्‌भुत ।।तु.गा.४११३.००१।।
भला रे पुंडलिका भला । महिमा नव जाये वर्णिला । दगा देउनि अवघियांला । सांठविलें अविनाश ।।तु.गा.४११३.००२।।
केलें एके घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें । दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ।।तु.गा.४११३.००३।।
तुकयाबंधु म्हणे किल्ल्या । संताचें हातीं दिल्या । आंगावेगळे आपुल्या । टाकुनि झाला महिमा ।।तु.गा.४११३.००४।।
चवदा भुवनें लोक तिन्ही दाढें जो कवळी । संपुष्ट तो संबळीमध्यें देखा ।।तु.गा.४११४.००१।।
उत्पत्ति संहार करिता जो पाळण । तो नंदानंदन म्हणवितसे ।।तु.गा.४११४.००२।।
असूर तोडरीं दैत्यांचा काळ । झाला द्वारपाळ बळीचा तो ।।तु.गा.४११४.००३।।
लक्षुमीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्टकवळा पसरी मुख ।।तु.गा.४११४.००४।।

तुकयाबंधु म्हणे चतुरांचा रावो । भावें तो पाहा हो केला वेडा ।।तु.गा.४११४.००५।।
चित्तीं बैसलें चिंतन । नारायण नारायण ।।तु.गा.४११५.००१।।
नलगे गोड कांहीं आतां । आणीक दुसरें सर्वथा ।।तु.गा.४११५.००२।।
हरपला द्वैत भाव । तेणें देह झाला वाव ।।तु.गा.४११५.००३।।
तुकयाबंधु म्हणे आम्हीं । झालों निष्काम ये कामीं ।।तु.गा.४११५.००४।।
व्यापिलें सर्वत्र । बाहेरी भीतरीं अंतर ।।तु.गा.४११६.००१।।
ऐसें गोंविंदें गोविलें । बोलें नवजाये बोलिलें ।।तु.गा.४११६.००२।।
संचिताची होळी । करूनि जीव घेतला बळी ।।तु.गा.४११६.००३।।
तुकयाबंधु म्हणे नाहीं । आतां संसारा उरी कांहीं ।।तु.गा.४११६.००४।।
केली हार्णाळां अंघोळी । येउनि बैसलों राउळीं ।।तु.गा.४११७.००१।।
आजिचें जालें भोजन । राम कृष्ण नारायण ।।तु.गा.४११७.००२।।
तुकयाबंधु म्हणे नास । नाहीं कल्पांतीं जयास ।।तु.गा.४११७.००३।।
राम म्हणतां कामक्रोधांचे दहन । होय अभिमान देशधडी ।।तु.गा.४११८.००१।।
राम म्हणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम शीण स्वप्नामाजी ।।तु.गा.४११८.००२।।
राम म्हणतां जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्रास पात्र कधीं ।।तु.गा.४११८.००३।।
राम म्हणतां यम शरणागत बापुडें । अढळपद पुढें काय तेथें ।।तु.गा.४११८.००४।।
राम म्हणतां धर्म घडती सकळ । तिमिरपडळ नासे हेळा ।।तु.गा.४११८.००५।।
राम म्हणतां म्हणे तुकयाचा बंधु । तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ।।तु.गा.४११८.००६।।
तट्टाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लहान नेणें ।।तु.गा.४११९.००१।।
परि त्या विशेष मनुष्य होऊनि । करि खंड मान वडिलांचा ।।तु.गा.४११९.००२।।
बेरसा गाढव माय ना बहिण । भुंके चवीविण भलतेंचि ।।तु.गा.४११९.००३।।
तुकयाबंधु म्हणे बोकड मातलें । न विचारी आपुले तोंडीं मुते ।।तु.गा.४११९.००४।।
मायझवा खर गाढवाचें बीज । तें ऐसें सहज कळों येतें ।।तु.गा.४१२०.००१।।

अपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन । तेचि त्याची खूण ओळखावी ॥तु.गा.४१२०.००२॥
मद्यपी तो पुरा अधम यातीचा । तया उपदेशाचा राग वायां ॥तु.गा.४१२०.००३॥
तुकयाबंधु म्हणे पिसाळलें सुने । आप पर तेणें न विचारावें ॥तु.गा.४१२०.००४॥
हम दास तिन्हके सुनाहो लोकां । रावन मार बिभीषण दिई लंका ॥तु.गा.४१२१.००१॥
गोवरधन नखपर गोकुल राखा । बर्सन लागा जब मेहु फत्तरका ॥तु.गा.४१२१.००२॥
वैकुंठनायक काल कौंसा सुरका । दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥तु.गा.४१२१.००३॥
स्तंभ फोड पेट चिरीया कश्यपका । प्रह्लादके लिये कहे भाई तुकयाका ॥तु.गा.४१२१.००४॥
चुराचुराकर माखन खाया । गौलनीका नंदकुमर कन्हैया ॥तु.गा.४१२२.००१॥
काहे बराई दिखावत मोहि । जानतहुं प्रभुपना तेरा सबहि ॥तु.गा.४१२२.००२॥
और बात सुन उखलसुं गला । बांधलिया आपना तूं गोपाला ॥तु.गा.४१२२.००३॥
फेरत बनबन गाऊं घराबत । कहे तुकयाबंधु लकरी लेले हात ॥तु.गा.४१२२.००४॥
मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथिवीचा भार वाहावया ॥तु.गा.४१२३.००१॥
काय धाक आम्हां कासयाची चिंता । ऐसा तो असतां साहाकारी ॥तु.गा.४१२३.००२॥
शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तांसाठीं ॥तु.गा.४१२३.००३॥
पांडवा जोहरीं राखिलें कुसरी । तो हा बंधुचा कैवारी तुकयाच्या ॥तु.गा.४१२३.००४॥
नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥तु.गा.४१२४.००१॥
परउपकारीं वेंचियेल्या शक्ती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥तु.गा.४१२४.००२॥
द्वैताद्वैतभाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥तु.गा.४१२४.००३॥
जयाचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिती जाणीलती ॥तु.गा.४१२४.००४॥
उचित अनुचित जाणे धर्मनीती । दृढ भावभक्ति मानव तो ॥तु.गा.४१२४.००५॥
तुकयाबंधु म्हणे वरकड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥तु.गा.४१२४.००६॥
उठा भागलेती उजगरा । जाला स्वामी निद्रा करा ॥तु.गा.४१२५.००१॥
वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक सांवरूनी ॥तु.गा.४१२५.००२॥

केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ।।तु.गा.४१२५.००३।।

लागतो चरणां । तुकयाबंधु नारायणा ।।तु.गा.४१२५.००४।।

कंसरावें गर्भ वधियेले सात । म्हणोनि गोकुळासी आले अनंत । घ्यावया अवतार झालें हेंचि निमित्त । असुर संहारुनी तारावे भक्त ।।तु.गा.४१२६.००१।।

जय देव जय देव जय विश्वरूपा श्रीविश्वरूपा । ओवाळीन तुज देहदीपें बापा ।।तु.गा.४१२६.००२।।

स्थूळरूप होउनि धरितसे सानें । जैसा भाव तैसा तयां कारणें । दैत्यांसी भासला सिंह गजानें । काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ।।तु.गा.४१२६.००३।।

अनंत वर्णी कोणा न कळेचि पार । सगुण कीं निर्गुण हाही निर्धार । पांगलीं साही अठरा करितां वेव्हार । तो वळितसे गौळियांचें खिल्लार ।।तु.गा.४१२६.००४।।

तेहतीस कोटी तिहीं देवांसी श्रेष्ठ । पाउलें पाताळीं स्वर्गीं मुगुट । गिळिलीं चौदा भुवनें तरी न भरेचि पोट । तो खाउन धाला गोपाळांचें उच्छिष्ट ।।तु.गा.४१२६.००५।।

महिमा वर्णूं परि पांगलिया श्रुति । सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुति । भावेंविण कांहीं न चलेचि युक्ति । राखे शरण तुकयाबंधु करी विनंति ।।तु.गा.४१२६.००६।।

सुकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ । सांवळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ । झळकती दिव्य तेजें दंत माज पातळ । मिरवलीं मयूरपत्रें मुगुट कुंडलें माळ ।।तु.गा.४१२७.००१।।

जय देवा जगदीश्वरा । धन्य रखुमाईवरा । आरती करीन काया । ओंवाळीन सुंदरा ।।तु.गा.४१२७.००२।।

गोजिरें ठाणमान भुजा मंडित चारी । शोभती शंख चक्र गदा पद्म मोहरी । हृदयीं ब्रह्मपद बाणलें श्रृंगारीं । गर्जती चरणीं वांकी कंठ कोकिळस्वरीं ।।तु.गा.४१२७.००३।।

घवघवित उटी अंगीं बावन चंदनाची । लल्लाटीं कस्तुरीचा कास पितांबराची । कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोतियांची । संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाची ।।तु.गा.४१२७.००४।।

सौभाग्यसुखसागर गुणलावण्यखाणी । लाघवी दीनवत्सल विश्व लाविलें ध्यानीं । आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनि । धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ।।तु.गा.४१२७.००५।।

वर्णिता ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति । रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती । उदार सुर गंभीर पूर्ण आनंदमूर्ति । तुकयाबंधु म्हणे स्तवूं मी काय किती ।।तु.गा.४१२७.००६।।

परमानंदा परमपुरुषोत्तमरामा । अच्युता अनंता हरिमेघश्यामा । अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळापति न कळे महिमा ।।तु.गा.४१२८.००१ ।।

जयदेव जयदेव जयश्रीपती । मंगळशुभदायका करीन आरती ।।तु.गा.४१२८.००२ ।।

गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना । मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा । दीनवत्सल सकळां मूळजयनिधाना ।।तु.गा.४१२८.००३ ।।

विश्वंभरा सर्वेश्वरा जगदाधारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा । सुखसागर गुण आगर मुगुटमणी शूरा । कल्याण कैवल्यमूर्ति मनोहरा ।।तु.गा.४१२८.००४ ।।

गरुडासना शेषशयना नरहरी । नारायणा ध्याना सुरवरहरगौरी । नंदा नंदनवंदन त्रिभुवनाभीतरी । अनंतनामीं ठसा अवतारावरी ।।तु.गा.४१२८.००५ ।।

सगुण निर्गुण साक्ष श्रीमंत संतां । भगवाना भगवंता कालकृतांता। उत्पत्तिपालनापासून संहारणसत्ता। शरण तुकयाबंधु तारीं रितीं बहुतां ।।तु.गा.४१२८.००६ ।।

म्हणसी दावीन अवस्था। तैसें नको रे अनंता ।।तु.गा.४१२९.००१ ।।

होऊनियां सहाकार। रूप दाखवीं सुंदर ।।तु.गा.४१२९.००२ ।।

मृगजळाचियापरी। तैसें न करावें हरी ।।तु.गा.४१२९.००३ ।।

तुकयाबंधु म्हणे हरी। कामा नये बाह्यात्कारीं ।।तु.गा.४१२९.००४ ।।

उदार कृपाळ सांगसी जना। तरी कां त्या रावणा मारियेलें। नित्य नित्य पूजा करी श्रीकमळीं। तेणें तुझें काय केलें ।।तु.गा.४१३०.००१ ।।

काय बडिवार सांगसी वायां। ठावा पंढरिराया आहेसि आम्हां। एकलाचि जरी देऊं परिहार। आहे दुरिवरी सीमा ।।तु.गा.४१३०.००२ ।।

कर्णाऐसा वीर उदार झुंजार। तो तुवां जर्जर केला बाणीं। पडिला भूमी परी नयेची करुणा। दांत पाडियेले दोन्ही ।।तु.गा.४१३०.००३ ।।

श्रियाळ बापुडें सात्विकवाणी। खादलें कापूनि त्याचे पोर। ऐसा कठिण कोण होईल दुसरा । उखळीं कांडविलें शिर ।।तु.गा.४१३०.००४ ।।

शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग। त्याचें चिरलें अंग ठायीं ठायीं। जाचउनि प्राण घेतला मागें। पुढें न पाहतां कांहीं ।।तु.गा.४१३०.००५ ।।

बळीचा अन्याय सांग होता काय। बुडविला तो पाय देउनि माथां। कोंडिले दार हा काय कहार। सांगतोसी चित्र कथा ।।तु.गा.४१३०.००६ ।।

हरिश्चंद्राचे राज्य घेउनियां सर्व। विकविला जीव डोंबाघरीं। पाडिला विघड नळदमयंतीमधीं। ऐसी तुझी बुद्धि बुरी ।।तु.गा.४१३०.००७ ।।

आणिकही गुण सांगावे किती। केलिया विपत्ति माउसीच्या। वधियेला मामा सखा पुरुषोत्तमा। म्हणे बंधु तुकयाचा ।।तु.गा.४१३०.००८ ।।

तुम्हां आम्हांसी दरुषण। जालें दुर्लभ भाषण ।।तु.गा.४१३१.००१ ।।

म्हणऊनि करितों आतां। दंडवत घ्या समस्तां।।तु.गा.४१३१.००२।।
भविष्याचें माथां देह। कोण जाणे होइल काय।।तु.गा.४१३१.००३।।
म्हणे तुकयाचा बांधव। आमचा तो झाला भाव।।तु.गा.४१३१.००४।।
अनंतजन्में जरी केल्या तपराशी। तरी हा न पावसी म्हणे देह।।तु.गा.४१३२.००१।।
ऐसें जें निधान लागलेंसे हातीं। त्याची केली माती भाग्यहीना।।तु.गा.४१३२.००२।।
उत्तमाचें सार वेदांचें भांडार। ज्याच्यानें पवित्र तीर्थें होतीं।।तु.गा.४१३२.००३।।
म्हणे तुकयाबंधु आणिक उपमा। नाहीं या तों जन्मा द्यावयासी।।तु.गा.४१३२.००४।।
न गमे न गमे न गमे हरिविण । न गमे न गमे न गमे मेळवा शाम कोणी गे।।तु.गा.४१३३.००१।।
तळमळ करी तैसा जीव जळाविण मासा। दिसती दिशा ओसा वो।।तु.गा.४१३३.००२।।
नाठवे भूक तान विकळ जालें मन। घडि जाय प्राण जुगा एकी वो।।तु.गा.४१३३.००३।।
जरी तुम्ही नोळखा सांगतों ऐका। तुकयाबंधुचा सखा जगजीवन।।तु.गा.४१३३.००४।।
विठ्ठला रे तुझे वर्णितां गुणवाद। विठ्ठला रे दग्ध झालीं पापें।।तु.गा.४१३४.००१।।
विठ्ठला रे तुझे पाहातां श्रीमुख। विठ्ठला रे सुख झालें नयना।।तु.गा.४१३४.००२।।
विठ्ठला रे तुज देतां आलिंगन। विठ्ठला तनमन निवल्या बाह्या।।तु.गा.४१३४.००३।।
विठ्ठला रे तुझी ऐकतां कीर्ति। विठ्ठला हे विश्रांती पावले स्मरणें।।तु.गा.४१३४.००४।।
विठ्ठला रे तुकयाबंधु म्हणे देहभाव। विठ्ठला जीवीं पाव धरितां गेला।।तु.गा.४१३४.००५।।
आकारवंत मूर्ति। जेव्हां देखेन मी दृष्टीं।।तु.गा.४१३५.००१।।
मग मी राहेन निवांत। ठेवूनियां तेथें चित्त।।तु.गा.४१३५.००२।।
श्रुति वाखाणिती । तैसा येसील प्रचिती।।तु.गा.४१३५.००३।।
म्हणे तुकयाचा सेवक। उभा देखेन सन्मुख।।तु.गा.४१३५.००४।।
बरवा बरवा बरवा रे देवा तूं। जीवाहूनि आवडसी जीवा रे देवा तूं ।।तु.गा.४१३६.००१।।
पाहतां वदन संतुष्ट लोचन। झाले आइकतां गुण श्रवण रे देवा।।तु.गा.४१३६.००२।।
अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण। वर्णितां लक्षण रे देवा।।तु.गा.४१३६.००३।।

मन जालें उन्मन अनुपम ग्रहण। तुकयाबंधु म्हणे महिमा नेणें रे।।तु.गा.४१३६.००४।।
पहा हो कलिचें महिमान। असत्यासी रिझलें जन । पापा देती अनुमोदन। करिती हेळण संतांचें।।तु.गा.४१३७.००१।।
ऐसें अधर्माचें बळ। लोक झकविले सकळ। केलें धर्माचें निर्मूळ। प्रळयकाळ आरंभला।।तु.गा.४१३७.००२।।
थोर या युगाचें आश्चर्य। ब्रह्मकर्म उत्तम सार। सांडुनियां द्विजवर। दावलपीर स्मरताती।।तु.गा.४१३७.००३।।
ऐसे यथार्थाचे अनर्थ। झाला बुडाला परमार्थ। नाहीं झाली ऐसी नीत। आहा भूत पातलें।।तु.गा.४१३७.००४।।
शांती क्षमा दया। भावभक्ति सत्क्रिया। ठाव नाहीं सांगावया। सत्व धैर्य भंगिलें।।तु.गा.४१३७.००५।।
राहिलें वर्णाश्रमधर्म। अन्योन्य विचरती कर्म। म्हणवितां रामराम। श्रम महा मानिती।।तु.गा.४१३७.००६।।
येर भोरपाचेविशी। धांवती भूतें आमिषा तैसीं। कथा पुराण म्हणतां सिसी। तिडिक उठीं नकऱ्याचे।।तु.गा.४१३७.००७।।
विषयलोभासाठीं। सर्वार्थेंसीं प्राण साठी। परमार्थी पीठ मुठी। मागतां उठती खुनींसी।।तु.गा.४१३७.००८।।
धनाढ्य देखोनि अनामिक। तयातें मानिती आवश्यक। अपमानिलें वेदपाठक। सात्विक शास्त्रज्ञ संपन्न।।तु.गा.४१३७.००९।।
पुत्र ते पितियापाशीं। सेवा घेती सेवका ऐसी। सुनांचिया दासी। सासा झाल्या आंदण्या।।तु.गा.४१३७.०१०।।
खोटें झालें आली विवसी। केली मर्यादा नाहींसी। भार्या भ्रतारासी। रंक तैसीं मानिती।।तु.गा.४१३७.०११।।
नमस्कारावया हरिदासां। लाजती धरिती कांहीं गर्वसा। पोटासाठीं खौसा। वंदिती मलिंच्छाच्या।।तु.गा.४१३७.०१२।।
बहुत पाप जालें उचंबळ। उत्तम न म्हणती चांडाळ। अभक्ष भक्षिती विटाळ। कोणी न धरी कोणाचा।।तु.गा.४१३७.०१३।।
कैसें झालें नष्ट वर्तमान। एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण। अविंदवाणी वदताती।।तु.गा.४१३७.०१४।।
कामिनी विटंबल्या कुळवंती। वदनें दासींची चुंबिति। सोवळ्याच्या स्फीती। जगीं मिरविती पवित्रता।।तु.गा.४१३७.०१५।।
मद्यपानाची सुराणी। नवनीता न पुसें कोणी। केळवल्या व्यभिचारिणी। दैन्यवाणी पतिव्रता।।तु.गा.४१३७.०१६।।
केवढी दोषाची सबळता। झाली पहा हो भगवंता। पुण्य धुडावोनि संता। तीर्थां हारी आणिली।।तु.गा.४१३७.०१७।।
भेणें मंद झाली मेघवृष्टी। आकांतली कांपे सृष्टी। देव रिगाले कपाटीं। आटाआटी प्रवर्तली।।तु.गा.४१३७.०१८।।
अपीक धान्यें दिवसें दिवसें। गाई म्हैसी चेवल्या गोरसें। नगरें दिसती उध्वंसें। पिकलीं बहुवसें पाखांडें।।तु.गा.४१३७.०१९।।
होम हरपलीं हवनें। यज्ञयाग अनुष्ठानें। जपतपादि साधनें। आचरणें भ्रष्टलीं।।तु.गा.४१३७.०२०।।
अठरा यातींचा व्यापार। करिती तस्कराई विप्र। सांडोनिया शुद्ध शुभ्र। वस्त्रें निळीं पांघरती।।तु.गा.४१३७.०२१।।
गीता लोपली गायत्री। भरले चमत्कार मंत्रीं। अश्वाचिये परी। कुमारी विकिती वेदवक्ते।।तु.गा.४१३७.०२२।।

वेदाध्ययनसंहितारुचि। भकांद्या करिती तयांची। आवड पंडितांची। मुसाफावरी बैसली।।तु.गा.४१३७.०२३।।
मुख्य सर्वोत्तम साधनें। तीं उच्छेदुनि केलीं दीनें। कुडीं कापट्यें महा मौन्यें। मिरविताती दुर्जनें।।तु.गा.४१३७.०२४।।
कळा कुशळता चतुराई। तर्कवादी भेद निंदेठायीं। विधिनिषेधाच्या वाही। एकहीं ऐसीं नाडलीं।।तु.गा.४१३७.०२५।।
संन्यासी तापसी ब्रह्मचारी। होता दिगांबर निस्पृही वैराग्यकारी। कामक्रोधें व्यापिले भारी। इच्छेकरी न सुटती।।तु.गा.४१३७.०२६।।
कैसें विनाशकाळाचें कौतुक। राजे झाले प्रजांचे अंतक। पिते पुत्र सहोदर एकाएक। शत्रुघातें वर्तती।।तु.गा.४१३७.०२७।।
केवढी ये रांडेची अंगवण। भ्रमविले अवघें जन। याती अठरा चाऱ्ही वर्ण। कर्दम करूनि विटाळिले।।तु.गा.४१३७.०२८।।
पूर्वी होतें भविष्य केलें। संतीं तें यथार्थ झालें। ऐकत होतों तें देखिलें। प्रत्यक्ष लोचनीं।।तु.गा.४१३७.०२९।।
आतां असो हें आघवें। मति नव्हे कळीमध्यें वावरावें। देवासी भाकोनि करुणारवें। वेगें स्मरावें अंतरीं।।तु.गा.४१३७.०३०।।
अगा ये वैकुंठनायका। काय पाहतोसि या कौतुका। धांव कलीनें गांजिलें लोकां। देतो हाका सेवक तुकयाचा।।तु.गा.४१३७.०३१।।
तुकाराम तुकाराम। नाम घेतां कांपे यम।।तु.गा.४१३८.००१।।
धन्य तुकोबा समर्थ। जेणें केला पुरुषार्थ।।तु.गा.४१३८.००२।।
जळीं दगडासहित वह्या। तारियल्या जैशा लाह्या।।तु.गा.४१३८.००३।।
म्हणे रामेश्वरभट्ट द्विजा। तुका विष्णु नाहीं दुजा।।तु.गा.४१३८.००४।।
पंडित वैदिक अथवा दशग्रंथी। परि सरी न पवती तुकयाची।।तु.गा.४१३९.००१।।
शास्त्रेंही पुराणें गीता नित्य नेम। वाचिताती वर्म न कळे त्यांसी।।तु.गा.४१३९.००२।।
कर्मअभिमानें वर्णअभिमानें। नाडले ब्राह्मण कलियुगीं।।तु.गा.४१३९.००३।।
तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई। भाव त्याचा पायीं विठोबाचे।।तु.गा.४१३९.००४।।
अमृताची वाणी वरूषला शुद्ध। करी त्या अशुद्ध ऐसा कोण।।तु.गा.४१३९.००५।।
चहूं वेदांचें हें केलें विवरण। अर्थही गहन करूनियां।।तु.गा.४१३९.००६।।
उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळे। करूनि निराळे ठेविले ते।।तु.गा.४१३९.००७।।
भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा। ऐसा नाहीं डोळां देखियेला।।तु.गा.४१३९.००८।।
जपतप यज्ञ लाजविलीं दानें। हरिनाम कीर्तन करूनियां।।तु.गा.४१३९.००९।।
मागें कवीश्वर झाले थोर थोर। नेलें कलेवर कोणें सांगा।।तु.गा.४१३९.०१०।।

म्हणे रामेश्वर सकळां पुसोनि। गेला तो विमानीं बैसोनियां।।तु.गा.४१३९.०११।।
माझी मज आली रोकडी प्रचीत। होऊनि फजित दुःख पावे।।तु.गा.४१४०.००१।।
कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं। व्यथा या शरीरीं बहुत झाली।।तु.गा.४१४०.००२।।
ज्ञानेश्वरें मज केला उपकार। स्वप्नीं सविस्तर सांगितलें।।तु.गा.४१४०.००३।।
तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर। कां जो अवतार नामयाचा।।तु.गा.४१४०.००४।।
त्याची तुज कांहीं घडली रे निंदा। म्हणुनि हे बाधा जडली तुज।।तु.गा.४१४०.००५।।
आतां एक करीं सांगेन तें तुला। शरण जाई त्याला निश्चयेंसी।।तु.गा.४१४०.००६।।
दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार। होय तो विचार सांगितला।।तु.गा.४१४०.००७।।
तोचि हा विश्वास धरोनि मानसीं। जाय कीर्तनासी नित्यकाळ।।तु.गा.४१४०.००८।।
म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें। झालें हें आराम देह माझें।।तु.गा.४१४०.००९।।
वैष्णवांची याती वाणी जो आपण। भोगी तो पतन कुंभपाकीं।।तु.गा.४१४१.००१।।
ऐेशी वेदश्रुति बोलती पुराणें। नाहीं ती दूषणें हरिभक्तां।।तु.गा.४१४१.००२।।
उंच नीच वर्ण न म्हणावा कोणीं। जे कां नारायणीं प्रिय झालें।।तु.गा.४१४१.००३।।
चहूं वर्णांसीही असे अधिकार। करितां नमस्कार दोष नाहीं।।तु.गा.४१४१.००४।।
जैसा शालिग्राम न म्हणावा पाषाण। होय पूज्यमान सर्वत्रांसी।।तु.गा.४१४१.००५।।
गुरू परब्रह्म देवाचा ही देव। त्यासी तो मानव म्हणूं नये।।तु.गा.४१४१.००६।।
म्हणे रामेश्वर नामीं जे रंगले। स्वयें तेचि झाले देवरूप।।तु.गा.४१४१.००७।।
आरती तुकारामा। स्वामी सद्गुरु धामा। सच्चिदानंदमूर्ति। पाय दाखवी आम्हां।।तु.गा.४१४२.००१।।
राघवें सागरांत। पाषाण तारियेलें। तैसें हे तुकोबाचे। अभंग रक्षिले।।तु.गा.४१४२.००२।।
तुकितां तुळणेसी। ब्रह्म तुकासी आलें। म्हणोनि रामेश्वरें। चरणीं मस्तक ठेविलें।।तु.गा.४१४२.००३।।
तूंचि आत्माराम नव्हे जी देहधारी। स्तुति जरी होय झडो माझी वैखरी। पातकी मूढजन पडतील अघोरीं। यालागीं अवतार केला महीवरी।।तु.गा.४१४३.००१।।
जय जय भक्तराया धर्ममूर्ति तुकया। आरती ओंवाळीं भावें तुझिया पायां।।तु.गा.४१४३.००२।।

तुझे ठायीं असे भ्रम कोणा न कळे नेम। जन हें काय जाणे अनुभवितों राम। टाकोनि अभिमान जीवीं धरिलें प्रेम। बोलोनि महिमा तुझा जना दिला विश्राम ।।तु.गा.४१४३.००३ ।।

अद्भुत महिमा तुझा काय वर्णूं दातारा। उदकेंविण अन्न दिवस क्रमिलें तेरा। आतां हे ऐसी प्राप्ति काय घडेल येरा। उदकीं कागद दिन रक्षिले अठरा ।।तु.गा.४१४३.००४ ।।

ऐकतां तुझें वचन मन होय उन्मन। सच्चिदानंद गाभा तुजसाठीं पूर्ण। नित्य हें असो माझें तुझें ठायीं अनुसंधान। करूनि कृपादान देईं इतुकें दान ।।तु.गा.४१४३.००५ ।।

शास्त्र आणि वेदांत शिष्टाचार समस्त । आणिला एक वाक्या जन लोक कृतार्थ। विशेष रामेश्वरा प्रेम दिलें बहुत। विनवितों तुज आतां ठेवीं मस्तकीं हात ।।तु.गा.४१४३.००६ ।।

भक्त भागवत जीवनमुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं ।।तु.गा.४१४४.००१ ।।

ऐसिया अनंता माजी तूं अनंत। लीलावेश होत जगत्राता ।।तु.गा.४१४४.००२ ।।

ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका। तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ।।तु.गा.४१४४.००३ ।।

शास्त्रशिष्टाचार अविरुद्ध क्रिया। तुझी भक्तराया देखियेली ।।तु.गा.४१४४.००४ ।।

देउनि तिळांजुळी काम्यनिषिद्धासी। विधिविनियोगेशीं ब्रह्मार्पण ।।तु.गा.४१४४.००५ ।।

संतग्रहमेळीं जगदांध्या गिळी। पैल उदयाचळीं भानु तुका ।।तु.गा.४१४४.००६ ।।

संतवृंदे तीर्थें गौतमी हरिकथा। तुकया नरसिंहस्ता भेटों आली ।।तु.गा.४१४४.००७ ।।

शांतिपतिव्रते झालें परिणयन। कामसंतर्पण निष्कामता ।।तु.गा.४१४४.००८ ।।

क्षमा क्षमेपणें प्रसिद्ध प्रथा जगीं। तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ।।तु.गा.४१४४.००९ ।।

दया दीनानाथा तुंवा जीवविली। विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी ।।तु.गा.४१४४.०१० ।।

वेदवाक्य बाहो उभारिला ध्वज। पूजिले देवद्विज सर्वभावें ।।तु.गा.४१४४.०११ ।।

अधर्म क्षयव्याधि धर्माशीं स्पर्शला। तो त्वां उपचारिला अनन्य भक्ति ।।तु.गा.४१४४.०१२ ।।

ब्रह्म ऐक्य भावें भक्ति विस्तारिली। वाक्यें सफल केलीं वेदविहितें ।।तु.गा.४१४४.०१३ ।।

देहबुद्धि जात्या अभिमानें वंचलों। तो मी उपेक्षिलों न पाहिजे ।।तु.गा.४१४४.०१४ ।।

न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार। मागे रामेश्वर रामचंद्रा ।।तु.गा.४१४४.०१५ ।।

राम हरे राम हरे राम हरे । रघुराज हरे ।।तु.गा.क्षे.००१.०१।।
राम जपतां बीज मंत्र नळा । सींधु तरती ज्याच्या प्रतापें सीळा ।।तु.गा.क्षे.००१.०२।।
कंठ सीतळ जपतां शुळपाणी । राम जपतां आवीनास भोवाणी ।।तु.गा.क्षे.००१.०३।।
तारक मंत्र स्त्रवण कासी । राम जपतां वाल्मीक रुसी ।।तु.गा.क्षे.००१.०४।।
अहील्या जेणे तारीली रामें । वैस्या परलोका नेली नामें।।तु.गा.क्षे.००१.०५।।
ध्यान जप जीवन मुनी जना । तुकया स्वामी रघुनंदना ।।तु.गा.क्षे.००१.०६।।
नामाचिया बळें कैवल्य साधन । उगेंची निधान हाता चढे ।।तु.गा.क्षे.००२.०१।।
जाणोनि हें वर्म भक्त भागवत । राहीलें नीवांत प्रेमबोधें ।।तु.गा.क्षे.००२.०२।।
कोण जप तप वाहे हें काबाड । म्हणती अवघड यारे नाचों ।।तु.गा.क्षे.००२.०३।।
उघडी समाधी हरीकथा सोहळा । नर नारी बाळा लाहानथोरें ।।तु.गा.क्षे.००२.०४।।
छंदें वाती टाळी गावो नामावळी । जेजेकारी होळी दहन दोष।।तु.गा.क्षे.००२.०५।।
येणें ब्रह्मानंदे दुमदुमीले जग । सुलभ हा मार्ग सापडला ।।तु.गा.क्षे.००२.०६।।
तुका म्हणे हरीभक्तीचे उल्हास । आणीलासे त्रास येमदुतां ।।तु.गा.क्षे.००२.०७।।
नाहीं ऐसें गाठी पुन्ये । जेणे घडे दरूषेण । करुनी चींतन । काळ सारु या रीती ।।तु.गा.क्षे.००३.०१।।
नाचैईन या संतांपुढे । लाज सांडुनी उघडें । सेवीन तो कोडें । उच्छिष्टाचा प्रसाद ।।तु.गा.क्षे.००३.०२।।
घालुनियां कास । होईन मोकळा उदास । करुं ब्रह्मरस । सेवन हा आनंदें ।।तु.गा.क्षे.००३.०३।।
आला तोची घ्यावा । होईल संचिताचा ठेवा । पुढीलाचा हेवा । तुका म्हणे अनुचीत ।।तु.गा.क्षे.००३.०४।।
जे या धाले ब्रह्मानंदे । आम्हां सोये त्याची पदें । संताच्या संवादे । मथैल तें नवनीत ।।तु.गा.क्षे.००४.०१।।
याचकासी कस्ट नाहीं । वेळ राखोनियां राहीं । भोजन समई । होईल येकी पंगती।।तु.गा.क्षे.००४.०२।।
विश्वास हे उपासना । भांडवल आम्हां दीना । आणीका त्या हीणा । सर्व शक्ती खुंटीत ।।तु.गा.क्षे.००४.०३।।
तुका म्हणे वर्म । हाचि येक सर्व धर्म । मागणें ते प्रेम । आम्हां भीक्षां उद्देश ।।तु.गा.क्षे.००४.०४।।
कर्मभूमी उत्तम ठाव । साहे भाव जालीयां ।।तु.गा.क्षे.००५.०१।।
पावीजैल ऊर्ध्व गती । ब्रह्मस्थीती जीवासी ।।तु.गा.क्षे.००५.०२।।

धीराचीये अंगीं फळ । जालें बळ कारण ।।तु.गा.क्षे.००५.०३।।
तुका म्हणे देव भाग्यें । अवघी मागें पाहाती ।।तु.गा.क्षे.००५.०४।।
माझा दंड पायां पडणें । हे वचनें वारांवी ।।तु.गा.क्षे.००६.०१।।
तो वरी तो ना बोलावें । पोटें जीव गेलीयां।।तु.गा.क्षे.००६.०२।।
अवघें पाप याची नावें । सत्य ठावें असो द्या ।।तु.गा.क्षे.००६.०३।।
तुका म्हणे वीज्ञापना । अवघ्या जणा परीसा हे।।तु.गा.क्षे.००६.०४।।
नाहीं कोठें अधीकार । गेलें नर वायां तें ।।तु.गा.क्षे.००७.०१।।
आईका हें सोपें वर्म । न लगे श्रम चींतना ।।तु.गा.क्षे.००७.०२।।
मृत्याचीये आंग छायें । उपायेची खुंटतां ।।तु.गा.क्षे.००७.०३।।
तुका म्हणे अवघे जन । येथें मन आसों दया ।।तु.गा.क्षे.००७.०४।।
नीजों नल्हे सकाळी वेळी । राती काळीं चीनचीनी ।।तु.गा.क्षे.००८.०१।।
वोंगळानें घेतली पाठी । केली साटी जीवासी ।।तु.गा.क्षे.००८.०२।।
मेळउनीया रबनें । चीतां नेणें देवळीच ।।तु.गा.क्षे.००८.०३।।
तुका म्हणे आलों घरा । तो डागोरा बाईलचा ।।तु.गा.क्षे.००८.०४।।
लेवलीला तैसा शोभे अळंकार । केला तैसा थोर लाहान ही।।तु.गा.क्षे.००९.०१।।
गोवी पडों नेदी अधीकारा ऐसी । गुणाची हे रासी पांडुरंग ।।तु.गा.क्षे.००९.०२।।
जाणत्या जाणता नेणत्या सारीषा । न दीसे पारीषा जीवाहुनी ।।तु.गा.क्षे.००९.०३।।
तुका म्हणे पाहे चींतनाची वाट । मग घ्यावी नीट धांव नेटे ।।तु.गा.क्षे.००९.०४।।
आठ प्रहर माता । वाहे वेडी याची चींता ।।तु.गा.क्षे.०१०.०१।।
तैसें करुणी माझे आई । ठावें देउन राखें पाई।।तु.गा.क्षे.०१०.०२।।
काढीतां तळमळी । बाहेरी जीवना मासोळी ।।तु.गा.क्षे.०१०.०३।।
तुका म्हणे कुडी । जेवी प्राणाचे आवडी ।।तु.गा.क्षे.०१०.०४।।
अवघाच अन्यायी । तेथें एकल्याचें काई ।।तु.गा.क्षे.०११.०१।।

आतां अवघे एक वेळे । जळोनि सरो तें निराळें ।।तु.गा.क्षे.०११.०२ ।।
काय माझें खरें । एवढेंच राखों बरें ।।तु.गा.क्षे.०११.०३ ।।
तुका म्हणे आतां । परिहार नलगे चित्ता ।।तु.गा.क्षे.०११.०४ ।।
अवघ्या कोल्ह्यांचें वर्म अंडीं। धरितां तोंडीं खीळ पडे।।तु.गा.क्षे.०१२.०१ ।।
भुंकूं नका भुंकू नका। आला तुका विष्णुदास।।तु.गा.क्षे.०१२.०२ ।।
कवणे ठायीं सादर व्हावें। नाहीं ठावें गाढवा।।तु.गा.क्षे.०१२.०३ ।।
दुर्जनासी पंचानन। तुका रजरेण संतांचा।।तु.गा.क्षे.०१२.०४ ।।
छळी विष्णुदासां कोणी। त्याची अमंगळ वाणी।।तु.गा.क्षे.०१३.०१ ।।
येऊं न द्यावा समोर। अभागी तो दुराचार।।तु.गा.क्षे.०१३.०२ ।।
नावडे हरिकथा। त्याची व्यभिचारीण माता।।तु.गा.क्षे.०१३.०३ ।।
तुका म्हणे याति। भ्रष्ट तयाची ते मति।।तु.गा.क्षे.०१३.०४ ।।
धन्य देहू गांव पुण्यभूमि ठाव। तेथें नांदे देव पांडुरंग।।तु.गा.क्षे.०१४.०१ ।।
धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे। उच्चारिती वाचे नामघोष।।तु.गा.क्षे.०१४.०२ ।।
कर कटीं उभा विश्वाचा जनिता। वामांगीं ते माता रखुमादेवी।।तु.गा.क्षे.०१४.०३ ।।
गरूड पारीं उभा जोडूनियां कर। अश्वत्थ समोर उत्तरामुख।।तु.गा.क्षे.०१४.०४ ।।
दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर। शोभे गंगानीर इंद्रायणी।।तु.गा.क्षे.०१४.०५ ।।
लक्ष्मीनारायण बल्लाळाचें बन। तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर।।तु.गा.क्षे.०१४.०६ ।।
विघ्नराज द्वारीं बहिरव बाहेरी। हनुमंत शेजारीं सहित दोघे।।तु.गा.क्षे.०१४.०७ ।।
तेथें दास तुका करितो कीर्तन। हदयीं चरण विठोबाचे।।तु.गा.क्षे.०१४.०८ ।।
माझें म्हणतां याला कां रे नाहीं लाज। कन्या पुत्र भाज धन वित्त।।तु.गा.क्षे.०१५.०१ ।।
कोणी सोडवीना काळाचे हातींचें। एकाविण साचें नारायणा।।तु.गा.क्षे.०१५.०२ ।।
तुका म्हणे किती सांगावें चांडाळा। नेणें जीवकळा कोण्या जीतो।।तु.गा.क्षे.०१५.०३ ।।
ज्यासी नावडे एकादशी। तो जिताचि नरकवासी।।तु.गा.क्षे.०१६.०१ ।।

किती एका दिवशीं। बुद्धि झाली होती ऐसी।।तु.गा.क्षे.०२१.०१।।
कांहीं करावें स्वहित। तों हें न घडे उचित।।तु.गा.क्षे.०२१.०२।।
अवलंबूनी भीक। लाज सांडली लौकिक।।तु.गा.क्षे.०२१.०३।।
तुका म्हणे दीन। जालों मनुष्यपणा हीन।।तु.गा.क्षे.०२१.०४।।
काय बा करिसी सोंवळें ओवळें। मन नाहीं निर्मळ वाउगेंचि।।तु.गा.क्षे.०२२.०१।।
काय बा करीसी पुस्तकाची मोट। घोकितां हृदय स्फोट होतां नये।।तु.गा.क्षे.०२२.०२।।
काय बा करिसी टाळ आणि मृदंग। जेथें पांडुरंग रंगला नाहीं।।तु.गा.क्षे.०२२.०३।।
काय बा करिसी ज्ञानाचिया गोष्टी । करणी नाहीं पोटीं बोलण्याची ।।तु.गा.क्षे.०२२.०४।।
काय बा करीसी दंभ लौकिकांतें। हित नाहीं मात तुका म्हणे।।तु.गा.क्षे.०२२.०५।।
काय फार जरी झालों मी शहाणा। तरी नारायणा नातुडसी।।तु.गा.क्षे.०२३.०१।।
काय झालें जरी मानी मज जन। परि नातुडती चरण तुझे देवा।।तु.गा.क्षे.०२३.०२।।
काय झालें जरी झालों उदासीन। परि वर्म भिन्न तुझें देवा।।तु.गा.क्षे.०२३.०३।।
काय झालें जरी केले म्यां सायास। म्हणवितो दास भक्त तुझा।।तु.गा.क्षे.०२३.०४।।
तुका म्हणे तुज दाविल्या वांचुन। तुझें वर्म कोण जाणे देवा।।तु.गा.क्षे.०२३.०५।।
काय तुझी थोरी वर्णु मी पामर। होसी दयाकर कृपासिंधु।।तु.गा.क्षे.०२४.०१।।
तुज ऐसी दया नाहीं आणिकांसी। ऐसे हृषीकेशी नवल एक।।तु.गा.क्षे.०२४.०२।।
कुरुक्षेत्र भूमिवरी पक्षी व्याले। तृणामाजीं केलें कोठें त्यानीं।।तु.गा.क्षे.०२४.०३।।
अकस्मात तेथें रणखांब रोविला। युद्धाचा नेमिला ठाव तेथें।।तु.गा.क्षे.०२४.०४।।
कौरव पांडव दळभार दोन्ही। झुंजावया रणीं आले तेथें।।तु.गा.क्षे.०२४.०५।।
तये काळीं तुज पक्षी आठवीती। पाव बा श्रीपती म्हणोनियां।।तु.गा.क्षे.०२४.०६।।
हाथी घोडे रथ तेथें धांवतील। पाषाण होतील शतचूर्ण।।तु.गा.क्षे.०२४.०७।।
ऐशिये आकांतीं वांचों कैसें परी। धांव बा श्रीहरी लवलाहे।।तु.गा.क्षे.०२४.०८।।
टांकोनियां पिलीं कैसें जावें आतां। पावें जगन्नाथ लवलाही।।तु.गा.क्षे.०२४.०९।।

आली तिये काळीं कृपा तुझ्या चित्ता। अनाथांच्या नाथा नारायणा ।।तु.गा.क्षे.०२४.१० ।।
एका गजाचिया कंठीं घंटा होती। पडिली अवचिती तयांवरी ।।तु.गा.क्षे.०२४.११ ।।
अठरा दिवस तेथें द्वंद्वयुद्ध झालें। वारा ऊन लागलें नाहीं तया ।।तु.गा.क्षे.०२४.१२ ।।
झुंज झाल्यावरी दाविलें अर्जुना। तुम्ही नारायणा पक्षियांसी ।।तु.गा.क्षे.०२४.१३ ।।
पाहे आपुलिया दासां म्यां रक्षिलें। रणीं वांचविलें कैशा परी ।।तु.गा.क्षे.०२४.१४ ।।
ऐसी तुज माया आपुल्या भक्तांची। माउली आमुची तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.०२४.१५ ।।
नामाचें सामर्थ्य कां रे दवडिसी। कां रे विसरसी पवाडे हे ।।तु.गा.क्षे.०२५.०१ ।।
खणखणां हाणती खर्गे प्रल्हादासी। न रुपे आंगासी किंचितही ।।तु.गा.क्षे.०२५.०२ ।।
राम कृष्ण हरि ऐसी मारी हांक। तेणें पडे धाक बळियासी ।।तु.गा.क्षे.०२५.०३ ।।
असों द्या सामर्थ्ये ऐसीया कीर्तीचीं। आवडी तुकयाची भेटी देई ।।तु.गा.क्षे.०२५.०४ ।।
नामधारकासी नाहीं वर्णावर्ण। लोखंड प्रमाण नाना जात ।।तु.गा.क्षे.०२६.०१ ।।
शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार। परिसी संस्कार सकळ हेम ।।तु.गा.क्षे.०२६.०२ ।।
पर्जन्य वर्षतां जीवना वाहावट। तें समसकट गंगे मिळे ।।तु.गा.क्षे.०२६.०३ ।।
सर्व तें हें जाय गंगाचि होऊन। तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ।।तु.गा.क्षे.०२६.०४ ।।
महापुरीं जैसें जातसे उदक। मध्यें तें तारक नाव जैसी ।।तु.गा.क्षे.०२६.०५ ।।
तये नावेसंगें ब्राह्मण तरती। केवीं ते बुडती अनामिक ।।तु.गा.क्षे.०२६.०६ ।।
नाना काष्टजात पडतां हुताशनीं। ते जात होउनी एकरूप ।।तु.गा.क्षे.०२६.०७ ।।
तेथें निवडेना घुरे कीं चंदन। तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ।।तु.गा.क्षे.०२६.०८ ।।
पूर्वानुवोळख तेंचि पैं मरण। जरि पावे जीवन नामामृत ।।तु.गा.क्षे.०२६.०९ ।।
नामामृतें झालें मुळीचें स्मरण। सहज साधन तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.०२६.१० ।।
नाम आहे जयापाशीं। जेथें राहे तेथेंची काशी ।।तु.गा.क्षे.०२७.०१ ।।
ऐसा नामाचा महिमा। जाणे वाल्मीक शंकर उमा ।।तु.गा.क्षे.०२७.०२ ।।
नामें प्रल्हादबाळ। जाणे पापी अजामेळ ।।तु.गा.क्षे.०२७.०३ ।।

नाम जाणे तो नारद। नामें ध्रुवा अक्षयपद।।तु.गा.क्षे.०२७.०४।।
नाम गणिकेतें तारी। पशु गजेंद्र उद्धरी।।तु.गा.क्षे.०२७.०५।।
नाम जाणे हनुमंत। जाणताती महासंत।।तु.गा.क्षे.०२७.०६।।
नाम जाणे शुकमूर्ति। जाणे राजा परिक्षिती।।तु.गा.क्षे.०२७.०७।।
नाम जाणे तुका। नाहीं संसाराचा धोका।।तु.गा.क्षे.०२७.०८।।
न लगावी दिठी। माझी तुझे मुखवटी।।तु.गा.क्षे.०२८.०१।।
आधीं पाउलें पाउलें। तें मी पाहेन तें भलें।।तु.गा.क्षे.०२८.०२।।
देईन हे काया। वरी सांडणें सांडाया।।तु.गा.क्षे.०२८.०३।।
तुका म्हणे देवा। बहु आवडसी जीवा।।तु.गा.क्षे.०२८.०४।।
धांवोनियां आलों पाहावया मुख। गेलें माझें दुःख जन्मांतरिचें।।तु.गा.क्षे.०२९.०१।।
ऐकिलेंही होतें तैसेंचि पाहिलें। मन स्थिरावलें तुझ्या पायीं।।तु.गा.क्षे.०२९.०२।।
तुका म्हणे माझी इच्छा पूर्ण झाली। कांहीं न राहिली वासना हे।।तु.गा.क्षे.०२९.०३।।
धिग तो दुर्जन नाहीं भूतदया। व्यर्थ तया माया प्रसवली।।तु.गा.क्षे.०३०.०१।।
कठिण हृदय तया चांडाळाचें। जो नेणें पराचें दुःख कांहीं।।तु.गा.क्षे.०३०.०२।।
आपुला हा प्राण तैसें सकल लोक। न करी विवेक पशु जैसा।।तु.गा.क्षे.०३०.०३।।
तुका म्हणे सुखें कापितसे गळे। आपुलिया वेळे रडतसे।।तु.गा.क्षे.०३०.०४।।
धन्या आतां काय करूं। माझें तान्हुले लेंकरूं।।तु.गा.क्षे.०३१.०१।।
धन्या अवचित मरण आलें। मज कोणासी निरविलें।।तु.गा.क्षे.०३१.०२।।
माझें दार नका पाडूं। त्याचे हात पाय तोडूं।।तु.गा.क्षे.०३१.०३।।
एके हातीं धरिली दाढी। दुजें हातीं घे कुऱ्हाडी।।तु.गा.क्षे.०३१.०४।।
येरी घाव घालूं पाहे। तंव तो उठोनि उभा राहे।।तु.गा.क्षे.०३१.०५।।
तुका म्हणे अवघीं चोरें। सेखीं रामनाम सोइरें।।तु.गा.क्षे.०३१.०६।।
धडकला अग्नि आह्या येती वरी। गोपाळ श्रीहरी विनविती।।तु.गा.क्षे.०३२.०१।।

तुझिये कृपेचें भरितें। आणीक काय राहिलें तेथें। मारग सिद्धाच्यानि पंथें। पावविसी तेथें तूंचि एक।।तु.गा.क्षे.०३७.०२।।
आरंभा आदि तुझें वंदन। सकळ करितां कारण। देव ऋषिमुनि आदि करून। ग्रंथ पुराण निर्माणीं।।तु.गा.क्षे.०३७.०३।।
काय वर्णू तुझी गति। एवढी कैंची मज मति। दीनानाथ तुज म्हणती। करीं सत्य वचन हेंचि आपुलें।।तु.गा.क्षे.०३७.०४।।
मज वाहावतां मायेच्या पुरीं। बुडतां डोहीं भवसागरीं। तुजवांचूनि कोण तारी। पाव झडकरी तुका म्हणे।।तु.गा.क्षे.०३७.०५।।
प्रगट व्हावें हे अज्ञानवासना। माझी नारायणा हीनबुद्धि।।तु.गा.क्षे.०३८.०१।।
खाणीवाणी होसी काष्ठीं तूं पाषाणीं। जंतु जीवजनीं प्रसिद्ध हा।।तु.गा.क्षे.०३८.०२।।
ज्ञानहीन तुज पाहे अल्पमति। लहान हा चित्तीं धरोनियां।।तु.गा.क्षे.०३८.०३।।
परि तूं कृपाळ होसी देवराणा। ब्रीदें तुझीं जना प्रसिद्ध हें।।तु.गा.क्षे.०३८.०४।।
उतावीळ बहु भक्तांचिया काजा। होसी केशीराजा तुका म्हणे।।तु.गा.क्षे.०३८.०५।।
पंढरी चोहटा मांडियेला खेळ। वैष्णव मिळोनी सकळ रे। टाळ टिपरी मांदळे एक नाद रे। झाला बसवंत देवकीचा बाळ रे।।तु.गा.क्षे.०३९.०१।।
चला तें कवतुक भाई रे। पाहों डोळां कामीं गुंतलेती काई रे ।भाग्यवंत कोणी गेले सांगाती। ऐसें सुख त्रिभुवनीं नाहीं रे।।तु.गा.क्षे.०३९.०२।।
आनंदाचे वाद सुखाचे संवाद। एक एका दाखविती छंद रे। साही अठरा चारी घालूनियां घाई। नाचती फेरीं टाळ शुद्ध रे।।तु.गा.क्षे.०३९.०३।।
भक्तीचीं भूषणें मुद्रा आभरणें। शोभती चंदनाच्या उट्या रे। सत्व सुंदर कास घालुनि कुसरी। गर्जती नाम बोभाटीं रे।।तु.गा.क्षे.०३९.०४।।
हरि हर ब्रह्मा तीर्थांसहित भीमा । देव कोटी तेहतीस रे। विस्मित होऊनि ठाकले सकळ जन। अमरावती केली ओस रे।।तु.गा.क्षे.०३९.०५।।
वाणितील थोरी वैकुंठींचि परी। नपवे पंढरीची सरी रे। तुकयाचा दास म्हणे नका आळस करूं। सांगतों नरनारीसं रे।।तु.गा.क्षे.०३९.०६।।
पोट लागलें पाठीशीं। हिंडवितें देशोदेशीं।।तु.गा.क्षे.०४०.०१।।
पोटाभेणें जिकडे जावें। तिकडे पोट येतें सवें ।।तु.गा.क्षे.०४०.०२।।
जप तप अनुष्ठान। पोटासाठीं झाले दीन।।तु.गा.क्षे.०४०.०३।।
पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी।।तु.गा.क्षे.०४०.०४।।
पोट काशियानें भरे। तुका म्हणे झुरझुरूं मरे।।तु.गा.क्षे.०४०.०५।।
पांडुरंगा आतां ऐका हे विनंती। बहु माझे चित्तीं भय वाटे ।।तु.गा.क्षे.०४१.०१।।
नाहीं आइकिलें संतांचिया मुखें। तें या मज लोकें भेडसाविलें।।तु.गा.क्षे.०४१.०२।।
विष्णुदासां गति नाहीं तरावया। म्हणती गेलें वायां कष्टतही।।तु.गा.क्षे.०४१.०३।।

धिक्कारिती मज करितां कीर्तन। काय सांगों शीण ते काळींचा।।तु.गा.क्षे.०४१.०४।।
तुका म्हणे मज वाटतें उदास। काय करूं यास पांडुरंगा।।तु.गा.क्षे.०४१.०५।।
पायां लावुनियां दोरी। भृंग बांधिला लेंकुरीं।।तु.गा.क्षे.०४२.०१।।
तैसा पावसी बंधन। मग सोडवील कोण।।तु.गा.क्षे.०४२.०२।।
गळां बांधोनियां दोरी। वानर हिंडवी घरोघरीं।।तु.गा.क्षे.०४२.०३।।
तुका म्हणे पाहें। रीस धांपा देत आहे।।तु.गा.क्षे.०४२.०४।।
पाया झाला नारू। तेथें बांधला कापरू।।तु.गा.क्षे.०४३.०१।।
तेथें बिबव्याचें काम। अधमासी तो अधम।।तु.गा.क्षे.०४३.०२।।
रुसला गुलाम। धणी करितो सलाम।।तु.गा.क्षे.०४३.०३।।
तेथें चाकराचें काम। अधमासी तों अधम।।तु.गा.क्षे.०४३.०४।।
रूसली घरची दासी। धणी समजावी तियेसी।।तु.गा.क्षे.०४३.०५।।
तेथें बटकीचें काम। अधमासी तो अधम।।तु.गा.क्षे.०४३.०६।।
देव्हाऱ्यावरी विंचू आला। देवपूजा नावडे त्याला।।तु.गा.क्षे.०४३.०७।।
तेथें पैंजारेचें काम। अधमासी तो अधम।।तु.गा.क्षे.०४३.०८।।
तुका म्हणे जाती। जातीसाठीं खाती माती।।तु.गा.क्षे.०४३.०९।।
पापी तो नाठवी आपुल्या संचिता। ठेवी भगवंता वरी बोल।।तु.गा.क्षे.०४४.०१।।
भेईना करितां पापाचे डोंगर। दुर्जन पामर दुराचारी।।तु.गा.क्षे.०४४.०२।।
नाठवी तो खळ आपुली करणी। देवासी निंदोनी बोलतसे।।तु.गा.क्षे.०४४.०३।।
तुका म्हणे त्याच्या तोंडा लागो कांटी। नाहीं जगजेठी जया चित्तीं।।तु.गा.क्षे.०४४.०४।।
पापाचीं संचितें देहासी दंडणा। तुज नारायणा बोल नाहीं।।तु.गा.क्षे.०४५.०१।।
पेरी कडू जिरें मागें अमृतफळें। अर्कवृक्षा केळें कैसीं येती।।तु.गा.क्षे.०४५.०२।।
सुख अथवा दुःख भोग हा देहाचा। नाश हा ज्ञानाचा न करावा।।तु.गा.क्षे.०४५.०३।।
तुका म्हणे आतां देवा कां रुसावें। मनासी पुसावें काय केलें।।तु.गा.क्षे.०४५.०४।।

श्रीराम सखा ऐसा धरी भाव। मीपणाचा ठाव पुसीं मना ।।तु.गा.क्षे.०४६.०१ ।।
शरण निरंतर म्हण तूं गोविंदा। वाचे लावी धंदा नारायण ।।तु.गा.क्षे.०४६.०२ ।।
यापरि सोपान नाहीं रे साधन। वाहातसे आण तुझी मना ।।तु.गा.क्षे.०४६.०३ ।।
नको कांहीं करूं आळस अंतरीं। जपें निरंतरीं रघुपती ।।तु.गा.क्षे.०४६.०४ ।।
तुका म्हणे मोठा लाभ नरदेहीं। देहींच विदेही होती नामें ।।तु.गा.क्षे.०४६.०५ ।।
श्रीमुख वोणवा गिळीत चालिलें। भ्यासुर वांसिलें वदनांबुज ।।तु.गा.क्षे.०४७.०१ ।।
विक्राळ त्या दाढा भ्यानें पाहावेना। घाऊंनी रसना ज्वाळ गिळी ।।तु.गा.क्षे.०४७.०२ ।।
जिव्हा लांब धांवे गोळा करी ज्वाल। मोठें मुखकमळ त्यांत घाली ।।तु.गा.क्षे.०४७.०३ ।।
तुका म्हणे आवघा वोणवा गिळीला। आनंद जाहला गोपाळांसी ।।तु.गा.क्षे.०४७.०४ ।।
शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती बहुत। परि नाहीं चित्त हाता आलें ।।तु.गा.क्षे.०४८.०१ ।।
क्षणा एका साठीं न धरवे धीर। तेणें हा रघुवीर अंतरतो ।।तु.गा.क्षे.०४८.०२ ।।
तोळाभर सोनें रतिभार राई। मेलविल्या पाहीं नास होतों।।तु.गा.क्षे.०४८.०३ ।।
हरीचे अंकित असती विरळागत। तयांसी अच्युत कृपा करी ।।तु.गा.क्षे.०४८.०४ ।।
तुका म्हणे काय धुडवण्या गोष्टी। जंव नाहीं गांठीं चित्त आलें ।।तु.गा.क्षे.०४८.०५ ।।
वृंदावना केलें साकरेचें आलें। न संडे वेगळें कडुपण ।।तु.गा.क्षे.०४९.०१ ।।
कावळ्याचें पिलूं कौतुकें पोशिलें। न राहें उगलें विष्ठेविण ।।तु.गा.क्षे.०४९.०२ ।।
क्षेम देतां अंगा गांधेलाची पोळी। करवी नादळी महाशब्द ।।तु.गा.क्षे.०४९.०३ ।।
तुका म्हणे ऐसे न होती ते भले। घालिती ते घाले साधुजना ।।तु.गा.क्षे.०४९.०४ ।।
मायबापें केवळ काशी। तेणें नवजावें तीर्थासी ।।तु.गा.क्षे.०५०.०१ ।।
पुंडलीकें काय केलें। परब्रह्म उभें ठेलें ।।तु.गा.क्षे.०५०.०२ ।।
तैसा होईं सावधान। हृदयीं घरीं नारायण ।।तु.गा.क्षे.०५०.०३ ।।
तुका म्हणे मायबापें। अवघीं देवाचीं स्वरूपें ।।तु.गा.क्षे.०५०.०४ ।।
कोठें देवा बोलों। तुम्हां भीड घालूं गेलों ।।तु.गा.क्षे.०५१.०१ ।।

करावया सत्वहानी। भांडवलाची टांचणी।।तु.गा.क्षे.०५१.०२।।
दुर्बळा मागतां। त्याच्या प्रवर्तला घाता।।तु.गा.क्षे.०५१.०३।।
तुका म्हणे नाहीं। मज कळलें ऐसें कांहीं।।तु.गा.क्षे.०५१.०४।।
मुंगी होउनि साकर खावी। निजवस्तूची भेटी घ्यावी।।तु.गा.क्षे.०५२.०१।।
वाळवंटी साकर पडे। गज येउनि काय रडे।।तु.गा.क्षे.०५२.०२।।
झाला हरिदास गोसावी । अवघी मायिक क्रिया दावी ।।तु.गा.क्षे.०५२.०३।।
पाठ पाठांतरिक विद्या। जन रंजवणी संध्या।।तु.गा.क्षे.०५२.०४।।
प्रेम नसतां अंगा आणी। दृढ भाव नाहीं मनीं।।तु.गा.क्षे.०५२.०५।।
ब्रह्मज्ञान वाचे बोले। करणी पाहातां न निवती डोळे।।तु.गा.क्षे.०५२.०६।।
मिथ्या भगल वाढविती। आपुली आपण पूजा घेती।।तु.गा.क्षे.०५२.०७।।
तुका म्हणे धाकुटें व्हावें। निजवस्तूसी मागुनि घ्यावें।।तु.गा.क्षे.०५२.०८।।
मुरु कूश दोन्ही मारिले असुर। दुर्वास ऋषीश्वर सुखी केला।।तु.गा.क्षे.०५३.०१।।
मारियेला मुरु म्हणोनी मुरारी। नाम तुझें हरि पाडियेलें।।तु.गा.क्षे.०५३.०२।।
पूर्वीहुनी ऐसा भक्तप्रतिपाळ। केला त्वां सांभाळ नारायणा।।तु.गा.क्षे.०५३.०३।।
तुका म्हणे येचि वेळे काय झालें। कां सोंग धरिलें मोहनाचें।।तु.गा.क्षे.०५३.०४।।
मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा। पाषाण पिळितां रस कैंचा।।तु.गा.क्षे.०५४.०१।।
वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं। गारा त्या अधणीं न सीजती।।तु.गा.क्षे.०५४.०२।।
नवखंड पृथ्वी पिकें मृगजळें। डोंगर भेटे बळें असमानासी।।तु.गा.क्षे.०५४.०३।।
नैश्वर देह तैसें तेव्हां होय ब्रह्म। तुका म्हणे श्रम करुनी काय।।तु.गा.क्षे.०५४.०४।।
मूर्तिमंत देव नांदतो पंढरी । येर दिगंतरीं प्रतिमारूप।।तु.गा.क्षे.०५५.०१।।
जाउनियां वना करावें कीर्तन। मानुनी पाषाण विठ्ठलरूप।।तु.गा.क्षे.०५५.०२।।
तुका म्हणे मुख्य पाहिजे हा भाव। भावापासी देव शीघ्र उभा।।तु.गा.क्षे.०५५.०३।।
म्हणे विठ्ठल पाषाण। त्याच्या तोंडावरी वाहण।।तु.गा.क्षे.०५६.०१।।

नको नको दर्शन त्याचें। गलितकुष्ट भरो वाचे ।।तु.गा.क्षे.०५६.०२ ।।
शाळिग्रामासि म्हणे धोंडा। किडे पडोत त्याच्या तोंडा ।।तु.गा.क्षे.०५६.०३ ।।
भावी सद्गुरू मनुष्य। त्याचें खंडो कां आयुष्य ।।तु.गा.क्षे.०५६.०४ ।।
हरिभक्ताच्या करी चेष्टा। त्याचे तोंडीं पडो विष्टा ।।तु.गा.क्षे.०५६.०५ ।।
तुका म्हणे किती ऐकों। कोठवरी मर्यादा राखों ।।तु.गा.क्षे.०५६.०६ ।।
माझिया तों जीवें घेतला हा सोस। पाहें तुझी वास भेटावया ।।तु.गा.क्षे.०५७.०१ ।।
मातेवीण बाळ न मनीं आणिकां। सर्व काळ धोका स्तनपान ।।तु.गा.क्षे.०५७.०२ ।।
वोसंगा निघाल्यावांचूनि न राहे। त्याचें आर्त माय पुरवीते ।।तु.गा.क्षे.०५७.०३ ।।
तुका म्हणे माते भक्ता तूं कृपाळ। गिळियले जाळ वनांतरीं ।।तु.गा.क्षे.०५७.०४ ।।
महा जी महादेवा महाकालमर्दना। मांडियेलें उग्र तप महादीप्त दारुणा। परिधान व्याघ्रांबर चिताभस्मलेपना। स्मशान क्रीडास्थळ तुम्हां जी त्रिनयना ।।तु.गा.क्षे.०५८.०१ ।।
जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा। आरती ओंवाळीन कैवल्यदातारा ।।तु.गा.क्षे.०५८.०२ ।।
रुद्र हें नाम तुम्हां उग्र संहारासी। शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं। उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी। आपुलें पद दासां ठाव देईं कैलासीं ।।तु.गा.क्षे.०५८.०३ ।।
त्रैलोक्यव्यापका हो जन आणि विजन। विराट स्वरूप हें तुझें साजिरें ध्यान। करिती वेद स्तुती कीर्ति मुखें आपण। जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ।।तु.गा.क्षे.०५८.०४ ।।
बोलतां नाममहिमा असें आश्चर्य जगीं। उपदेश केल्यानंतर पापें जळती वेगीं। हरहर वाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं। राहिली दृष्टि चरणीं रंग मीनला रंगीं ।।तु.गा.क्षे.०५८.०५ ।।
पूजूनि लिंग उभा तुका जोडोनि हात। करितो विज्ञापना परिसावी हे मात। अखंड राहूं द्यावें माझें चरणीं चित्त । घातले साष्टांग मागें मस्तकीं हात ।।तु.गा.क्षे.०५८.०६ ।।
माझा घात पात अथवा हित फार। अवघा विचार तुझ्या हातीं ।।तु.गा.क्षे.०५९.०१ ।।
ठेवुनि जीवभाव तुझ्या ठायीं चित्त। राहिलों निवांत पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.०५९.०२ ।।
चित्ताचा चाळक बुद्धीचा जनिता। काय नाहीं सत्ता तुझे हातीं ।।तु.गा.क्षे.०५९.०३ ।।

तुका म्हणे काय करिसी तें पाहीन। ठेविसी राहीन सुखें तेथें।।तु.गा.क्षे.०५९.०४।।
मनीं भाव असे कांहीं। तेथें देव येती पाहीं।।तु.गा.क्षे.०६०.०१।।
पाहा जनाई सुंदरी। तेथें देव पाणी भरी।।तु.गा.क्षे.०६०.०२।।
शुद्ध पाहोनियां भाव। त्याचे हृदयीं वसे देव।।तु.गा.क्षे.०६०.०३।।
तुका म्हणे विठोबासी। ठाव देई चरणापासीं।।तु.गा.क्षे.०६०.०४।।
मुखें सांगे ब्रह्मज्ञान। जन लोकांची कापितो मान।।तु.गा.क्षे.०६१.०१।।
ज्ञान सांगतो जनासी। नाहीं अनुभव आपणांसी।।तु.गा.क्षे.०६१.०२।।
कथा करितो देवाची। अंतरीं आशा बहु लोभाची।।तु.गा.क्षे.०६१.०३।।
तुका म्हणे तोचि वेडा। त्याचें हाणूनि थोबाड फोडा।।तु.गा.क्षे.०६१.०४।।
मस्तकीं सहावें टांकियासी जाण। तेव्हां देवपण भोगावें गा।।तु.गा.क्षे.०६२.०१।।
आपुलिये स्तुती निंदा अथवा मान। टाकावा थुंकोन पैलीकडे।।तु.गा.क्षे.०६२.०२।।
सद्गुरुसेवन तेंचि अमृतपान। करूनी प्राशन बैसावें गा।।तु.गा.क्षे.०६२.०३।।
आपुल्या मस्तकीं पडोत डोंगर। सुखाचें माहेर टाकूं नये।।तु.गा.क्षे.०६२.०४।।
तुका म्हणे आतां सांगूं तुला किती। जिण्याची फजिती करूं नये।।तु.गा.क्षे.०६२.०५।।
वेढा वेढा रे पंढरी। मोर्चे लावा भीमातिरीं।।तु.गा.क्षे.०६३.०१।।
चला चला संत जन। करा देवाशीं भांडण।।तु.गा.क्षे.०६३.०२।।
लुटा लुटा पंढरपूर। धरा रखुमाईचा वर।।तु.गा.क्षे.०६३.०३।।
तुका म्हणे चला। घाव निशाणीं घातला।।तु.गा.क्षे.०६३.०४।।
वेद नेलें शंखासुरें। केलें ब्रह्मानें गाऱ्हाणें।।तु.गा.क्षे.०६४.०१।।
धांव धांव झडकरी। ऐसें कृपाळुवा हरी।।तु.गा.क्षे.०६४.०२।।
गजेंद्र नाडियें गांजिला। तेणें तुझा धांवा केला।।तु.गा.क्षे.०६४.०३।।
तुका म्हणे पद्मनाभा। जेथें पाहे तेथें उभा।।तु.गा.क्षे.०६४.०४।।
वैभव तें राज्य संपत्ती टाकावी। उदरार्थ मागावी माधोकरी।।तु.गा.क्षे.०६५.०१।।

आपुलें तें आधीं करावें स्वहित। ऐसी आहे नीत स्वधर्माची ।।तु.गा.क्षे.०६५.०२ ।।
वर्ण कुळ जाति याचा अभिमान। त्यजावा सन्मान लौकिकाचा ।।तु.गा.क्षे.०६५.०३ ।।
तुका म्हणे राहें एकाकी निशंक। देऊनियां हाक कंठीं काळ ।।तु.गा.क्षे.०६५.०४ ।।
रामा अयोध्येच्या राया। दीनानाथा रे सखया ।।तु.गा.क्षे.०६६.०१ ।।
पाप ताप विघ्न हरी । दीनानाथा सुख करीं ।।तु.गा.क्षे.०६६.०२ ।।
भिलटीचिया रे उच्छिष्टा। स्वीकारिसी रे तूं भ्रष्टा ।।तु.गा.क्षे.०६६.०३ ।।
मी तों सलगीचें मूल । तुका म्हणे तूं सखोल ।।तु.गा.क्षे.०६६.०४ ।।
विठोबाचे पायीं जीव म्यां ठेविला। भक्तिभावें केला देव ऋणी ।।तु.गा.क्षे.०६७.०१ ।।
देव माझा ऋणी आहे सहाकारी। परस्परें वारी भवभय ।।तु.गा.क्षे.०६७.०२ ।।
भवभयडोहीं बुडों नेदी पाहीं। धरूनियां बाहीं तारी मज ।।तु.गा.क्षे.०६७.०३ ।।
तारियेले दास पडिल्या संकटीं। विष केलें पोटीं अमृतमय ।।तु.गा.क्षे.०६७.०४ ।।
अमृतातें सेवीतसे नामरसा। तोडियेला फांसा जाणों बंधनाचा ।।तु.गा.क्षे.०६७.०५ ।।
बंधनाचा फांसा आम्हीं काहीं नेणों । पाय तुझे जाणों पद्मनाभा ।।तु.गा.क्षे.०६७.०६ ।।
पद्मनाभा नाभिकमळीं ब्रह्मादिक। त्रैलोक्यनायक म्हणविसी ।।तु.गा.क्षे.०६७.०७ ।।
म्हणविसी देवा दासांचा अंकित। मनाचा संकेत पाहोनियां ।।तु.गा.क्षे.०६७.०८ ।।
पाहोनियां दृढ निश्चय तयाचा। तोचि दास साचा जवळीक ।।तु.गा.क्षे.०६७.०९ ।।
जवळीक झाली ब्रह्मीं सुखावले। मार्ग दाखविले मूढा जना ।।तु.गा.क्षे.०६७.१० ।।
मूढा जनामाजी दास तुझा मूढ। कास तुझी दृढ धरियेली ।।तु.गा.क्षे.०६७.११ ।।
धरियेले तुझे पाय रे विठ्ठला। तुका सुखी झाला तुझ्या नामें ।।तु.गा.क्षे.०६७.१२ ।।
विधवेसी एक सुत। अहर्निशीं तेथें चित्त ।।तु.गा.क्षे.०६८.०१ ।।
तैसा तूं मज एकला। नको मोकलूं विठ्ठला ।।तु.गा.क्षे.०६८.०२ ।।
सुपुत्रालागीं बाप। अवघे तेथेंचि संकल्प ।।तु.गा.क्षे.०६८.०३ ।।
तुका म्हणे चित्तीं। पतिव्रते जैसा पति ।।तु.गा.क्षे.०६८.०४ ।।

विटेवरी समचरण। तो हा रुक्मिणीरमण।।तु.गा.क्षे.०६९.०१।।
वेदशास्त्रां माहेर। केले दासां उपकार।।तु.गा.क्षे.०६९.०२।।
नामापाशीं चारीं मुक्ति। पाहा हृदयीं प्रतीति।।तु.गा.क्षे.०६९.०३।।
तुका म्हणे कळा। अंगीं जयाचा सकळा।।तु.गा.क्षे.०६९.०४।।
वासुदेवा दीनानाथा। कमललोचना श्रीअच्युता। निजभक्तांसी सौख्यदाता। तुजवीण सर्वथा असेचिना।।तु.गा.क्षे.०७०.०१।।
विठ्ठला अनंता विश्वपति। विराटस्वरूपा वामनमूर्ति। ब्रह्मादिकर्ता वैकुंठपति। अगम्यस्थिति वेदशास्त्रां।।तु.गा.क्षे.०७०.०२।।
अद्वैत अखंडभरिता। विश्वबाहू अपरिमिता। विश्वचक्षु विश्वदेवता। आदिपिता ब्रह्मयाचा।।तु.गा.क्षे.०७०.०३।।
भक्ताधीना भवभयभंगा। परमपुरुषा पांडुरंगा। अनादि अखिल अंतरंगा। संगा असंगा वेगळाचि।।तु.गा.क्षे.०७०.०४।।
हे विराटस्वरूप भोळिया भक्तांसी। सर्वथा न कळे हृषीकेशी। सगुणरूप धरूनी त्यासी। लावी भजनासी तुका म्हणे।।तु.गा.क्षे.०७०.०५।।
लेखी दुखण्यासमान। वेंचला नारायणीं क्षण। उद्यांचें आजिच मरण। आणोनि म्हणे हरि भोक्ता।।तु.गा.क्षे.०७१.०१।।
नाहीं कांहीं पडों येत तुटी। जाणे तों आहे शेवटीं। लाभ विचारोनि पोटीं। होईं शेवटीं जागृत।।तु.गा.क्षे.०७१.०२।।
आहे तें उरे कटा। लावुनि चळे आपुला फाटा। पुरे हें न पुरे शेवटा। तरण्या बळकटा सदा वास।।तु.गा.क्षे.०७१.०३।।
म्हणोनि मोडावा कांटाळा। अविद्यात्मक कोंवळा। होतील प्रबळा। आशा तृष्णा माया।।तु.गा.क्षे.०७१.०४।।
क्षण या देहाच्या अंतीं । जड होउनि राहेल माती। परदेश ते परवर होती। चिळसविता नाकडोळे।।तु.गा.क्षे.०७१.०५।।
जंव या नाहीं पातल्या विपत्ति। आयुष्य भविष्य आहे हातीं। लाभ विचारोनी गुंती। तुका म्हणे अंतीं सर्व पिसुनें।।तु.गा.क्षे.०७१.०६।।
रामनाम हाचि मांडिला दुकान। आहे वानोवाण घ्या रे कोणी।।तु.गा.क्षे.०७२.०१।।
नका कोणी करूं घेतां रे आळस। वांटतों तुम्हांस फुकांचें हें।।तु.गा.क्षे.०७२.०२।।
संचितासारखें पडे त्याच्या हातां। फारसें मागतां तरी नये।।तु.गा.क्षे.०७२.०३।।
तुका म्हणे आम्ही सांठविलें सार। उरलिया थार विचारितां।।तु.गा.क्षे.०७२.०४।।
रामनामाचे पवाडे। अखंड ज्याची वाचा पढे।।तु.गा.क्षे.०७३.०१।।
धन्य तो एक संसारीं। रामनाम जो उच्चारी।।तु.गा.क्षे.०७३.०२।।
रामनाम गर्जे वाचा। काळ आज्ञाधारक त्याचा।।तु.गा.क्षे.०७३.०३।।
तुका म्हणे रामनामीं। कृतकृत्य झालों आम्ही।।तु.गा.क्षे.०७३.०४।।

रायाछत्रपति ऐकावें वचन । रामदासीं ध्यान लावा वेगीं ।।तु.गा.क्षे.०७४.०१।।
रामदासस्वामी सोयरा सज्जन । यासी तूं नमन अर्पी बापा ।।तु.गा.क्षे.०७४.०२।।
मारुतीअवतार स्वामी प्रगटला । उपदेश केला तुजलागीं ।।तु.गा.क्षे.०७४.०३।।
रामनाम मंत्र तारक केवळ । झालासे सीतळ उमाकांत ।।तु.गा.क्षे.०७४.०४।।
उफराठीं नामें जपतां वाल्मीक । झाला पुण्य लोक तात्कालिक ।।तु.गा.क्षे.०७४.०५।।
तेंच बीज त्यासी वरिष्ठ उपदेश । त्याहूनी विशेष काय आहे ।।तु.गा.क्षे.०७४.०६।।
आतां धरूं नका भलत्याचा संग । राम पांडुरंग कृपा करी ।।तु.गा.क्षे.०७४.०७।।
धरुं नको आस आमुची भूपाळा । रामदासीं डोळा लावा वेंगी ।।तु.गा.क्षे.०७४.०८।।
तुझी चाड नाहीं आम्हां छत्रपति । आम्ही पत्रपती त्रैलोक्याचे ।।तु.गा.क्षे.०७४.०९।।
चारीं दिशीं आम्हां भिक्षेचा अधिकार । न मिळे भाकर भक्षावया ।।तु.गा.क्षे.०७४.१०।।
पांडुरंगीं आमुची झाली पूर्ण भेटी । हातांत नरोटी दिधली देवें ।।तु.गा.क्षे.०७४.११।।
आतां पडूं नको आमुचिया काजा । पवित्र तूं राजा रामभक्त ।।तु.गा.क्षे.०७४.१२।।
विठ्ठलाचे दास केवळ भिकारी । आम्हां लागीं हरी उपेक्षीना ।।तु.गा.क्षे.०७४.१३।।
शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगीं घालीं त्यासी ।।तु.गा.क्षे.०७४.१४।।
तुका म्हणे राया मुला असो कल्याण । सद्गुरु शरण असे बापा ।।तु.गा.क्षे.०७४.१५।।
ये गा महाविष्णु अनंत भुजांच्या । आम्हां अनाथांच्या माहेरा ये ।।तु.गा.क्षे.०७५.०१।।
भेटावया तुज ओढे माझा जीव । एकवेळां पाय दावीं डोळा ।।तु.गा.क्षे.०७५.०२।।
आणीक हें आर्त नाहीं नारायणा । ओढे हे वासना भेटावया ।।तु.गा.क्षे.०७५.०३।।
वाटे चित्तीं काय करावा विचार । चरण सुंदर पाहावया ।।तु.गा.क्षे.०७५.०४।।
तुका म्हणे माझे पुरवीं मनोरथ । येईं गा सांवरीत पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.०७५.०५।।
येईल घरा देव न धरीं संदेहा । फकिराचा यावा व्हावा जेव्हां ।।तु.गा.क्षे.०७६.०१।।
होईल फकीर योगी महानुभाव । घडी घडी देव सांभाळील ।।तु.गा.क्षे.०७६.०२।।
तुका म्हणे ऐसें बोलती बहुत । येणें गुणें संत झाले राम ।।तु.गा.क्षे.०७६.०३।।

सांग त्वां कोणासी तारिलें । संतावेगळें उद्धरिलें ।।तु.गा.क्षे.०७७.०१।।
संत शब्द उपदेशी । मग तूं हो म्हणशी ।।तु.गा.क्षे.०७७.०२।।
तुका म्हणे नाहीं तुझा उपकार । करूं संतांचा उच्चार ।।तु.गा.क्षे.०७७.०३।।
पर्वकाळीं धर्म न करी नासरी। खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी।।तु.गा.क्षे.०७८.०१।।
सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा। कोंडितो ठोंबरा संतांलागीं।।तु.गा.क्षे.०७८.०२।।
बाइलेच्या गोता आवडीनें पोसी। मातापितरांसी दवडोनी।।तु.गा.क्षे.०७८.०३।।
श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण। गोवार मागून सावडीतो।।तु.गा.क्षे.०७८.०४।।
नेतो पानें फुलें वेश्येला उदंड। ब्राह्मणासी खांड नेदी एक।।तु.गा.क्षे.०७८.०५।।
हातें मोऱ्या शोधी कष्ट करी नाना। देवाच्या पूजना कांटाळतो।।तु.गा.क्षे.०७८.०६।।
सारा वेळ धंदा करितां श्रमेना। साधूच्या दर्शना जातां कुंथे।।तु.गा.क्षे.०७८.०७।।
हरीच्या कीर्तनीं गुंगायासी लागे। येरवीं तो जागे उगलाची।।तु.गा.क्षे.०७८.०८।।
पुराणी बैसतां नाहीं रिकामटी। खेळतो सोंगटी अहोरात्र।।तु.गा.क्षे.०७८.०९।।
देवाच्या विभूति न पाहे सर्वथा। करी पानवथा नेत्रभिक्षा।।तु.गा.क्षे.०७८.१०।।
गाईला देखोनी बदबदा मारी। घोड्याची चाकरी गोड लागे।।तु.गा.क्षे.०७८.११।।
ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा। प्रेमें घेतो घाटा घटघटां।।तु.गा.क्षे.०७८.१२।।
तुका म्हणे ऐसे प्रपंचीं गुंतले। जन्मोनी मुकले विठोबासी।।तु.गा.क्षे.०७८.१३।।
समर्थाचे सेवे बहुत असें हित । विचार हृदयांत करूनी पाहें ।।तु.गा.क्षे.०७९.०१।।
वरकडा ऐसा नव्हे हा समर्थ । क्षणेंचि घडित सृष्टि नासे ।।तु.गा.क्षे.०७९.०२।।
ज्याची कृपा होतां आपणा ऐसें करी । उरों नेदी उरी दारिद्रांची ।।तु.गा.क्षे.०७९.०३।।
ऐशालागीं मन वोळगे अहर्निशीं । तेणें वंद्य होशी ब्रह्मादिकां ।।तु.गा.क्षे.०७९.०४।।
तुका म्हणे हेंचि आहे पैं मुद्दल । सत्य माझा बोल हाचि माना ।।तु.गा.क्षे.०७९.०५।।
समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा । भगिनी ते रमा शंखाची या ।।तु.गा.क्षे.०८०.०१।।
मेहुणा जयाचा द्वारकेचा हरि । शंख दारोदारीं भीक मागें।।तु.गा.क्षे.०८०.०२।।

दृष्ट हें जाणावें आपुलें स्वहित । तुका म्हणे मात ऐसी आहे ।।तु.गा.क्षे.०८०.०३।।
सर्वांपरी तुझे गुण गा उत्तम। तुझे ठायीं प्रेम राहो माझें।।तु.गा.क्षे.०८१.०१।।
माउलीपरीस आहेसी उदार। तरी कां निष्ठुर मन केलें।।तु.गा.क्षे.०८१.०२।।
गजेंद्राकारणें केलें त्वां धांवणें। तरी कां निर्वाण पाहातोसि।।तु.गा.क्षे.०८१.०३।।
प्रल्हादा संकटीं रक्षिलें त्वां देवा। तरी कां केशवा सांडी केली।।तु.गा.क्षे.०८१.०४।।
अन्यायी अजामेळ तो झाला पावन। ऐसें हें पुराण हाका मारी।।तु.गा.क्षे.०८१.०५।।
तुका म्हणे माझे थोर अपराध । नाम करी छेद क्षणमात्रें।।तु.गा.क्षे.०८१.०६।।
साही शास्त्रां अति दुरी। तो परमात्मा श्रीहरि। तो दशरथाचे घरीं। क्रीडतो राम।।तु.गा.क्षे.०८२.०१।।
शिवाचें निजध्येय। वाल्मिकाचें निजगुह्य। तो भिल्लटीचीं फळें खाय। श्रीराम तो।।तु.गा.क्षे.०८२.०२।।
योगियांचे मनीं। नातुडे चिंतनीं। तो वानरांचे कानीं। गोष्टी सांगें।।तु.गा.क्षे.०८२.०३।।
चरणें शिळा उद्धरी। नामें गणिका तारी। तो कोळिया घरीं। पाहुणा राम।।तु.गा.क्षे.०८२.०४।।
क्षण एक सुरवरां। नातुडे नमस्कारां। तो रिसां आणि वानरां। क्षेम दे राम।।तु.गा.क्षे.०८२.०५।।
राम सांवळा सगुण। राम योगियांचे ध्यान। राम राजीवलोचन। तुका चरण वंदितो।।तु.गा.क्षे.०८२.०६।।
सांग पांडुरंगा मज हा उपाव। जेणें तुझे पाव आतुडती।।तु.गा.क्षे.०८३.०१।।
न कळे हा निर्धार ब्रह्मादिकां पार। कायसा विचार माझा तेथें।।तु.गा.क्षे.०८३.०२।।
तुका म्हणे आतां धरूनियां धीर। राहूं कोठवर मायबापा।।तु.गा.क्षे.०८३.०३।।
सांडियलें रूप विक्राळ भ्यासुर। झालें सकुमार कोडिसवाणें।।तु.गा.क्षे.०८४.०१।।
श्याम चतुर्भुज मुकुट कुंडलें। सुंदर दंडलें नव बाळ।।तु.गा.क्षे.०८४.०२।।
गोपाळ म्हणती कैसें रे बा कृष्णा। रूप नारायणा धरियेलें।।तु.गा.क्षे.०८४.०३।।
कैसा वाढलासी विक्राळ झालासी। गटगटा ज्वाळांसि गिळियेलें।।तु.गा.क्षे.०८४.०४।।
तुका म्हणे भावें पुसती गोपाळ। अनाथवत्सल म्हणोनियां।।तु.गा.क्षे.०८४.०५।।
सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे। प्रेममिठी पडे वदनासी।।तु.गा.क्षे.०८५.०१।।
व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी। आला दुराचारी पारधी तो।।तु.गा.क्षे.०८५.०२।।

वृक्षाचिया माथां सोडिला ससाणा। धनुष्यासि बाणा लावियेलें।।तु.गा.क्षे.०८५.०३।।
तये काळीं तुज पक्षी आठविती। धावें गा श्रीपती मायबापा।।तु.गा.क्षे.०८५.०४।।
उडोनियां जातां ससाणा मारील। बैसतां विंधील पारधी तो।।तु.गा.क्षे.०८५.०५।।
ऐकोनियां धांवा तया पक्षियांचा। धरिला सर्पाचा वेष वेगीं।।तु.गा.क्षे.०८५.०६।।
डंखोनि पारधी भूमिसी पाडिला। बाण तो लागला ससाण्यासी।।तु.गा.क्षे.०८५.०७।।
ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा। होशील कोंवसा संकटींचा।।तु.गा.क्षे.०८५.०८।।
तुका म्हणे तुझी कीर्ति त्रिभुवनीं। वेदाचिये वाणी वर्णवेना।।तु.गा.क्षे.०८५.०९।।
गाबाळाचे ग्रंथीं कां रे पडा सदा। मिथ्या भेदवादा वागवितां।।तु.गा.क्षे.०८६.०१।।
संसारगाबाळीं पडसी निखळ। झालासी तूं खळ तेणें मानें।।तु.गा.क्षे.०८६.०२।।
साधनसंकटीं गुंतसीं कासया। व्यर्थ गा अपायामाजी गुंती।।तु.गा.क्षे.०८६.०३।।
निर्मळ फुकाचें नाम गोविदांचें। अनंत जन्मांचे फेडी मळ।।तु.गा.क्षे.०८६.०४।।
तुका म्हणे नको करूं कांहीं कष्ट। नाम वाचे स्पष्ट हरि बोले।।तु.गा.क्षे.०८६.०५।।
गरुडावरी बैसोनि येतो जगजेठी। त्याचे चरणीं मिठी घालूं चला।।तु.गा.क्षे.०८७.०१।।
सांवळें रूपडें देखिलें लोचनीं। शंख चक्र दोन्ही शोभताहे।।तु.गा.क्षे.०८७.०२।।
पितांबर झळके हेचि त्याची खूण। वांकी रुणझुण करीताती।।तु.गा.क्षे.०८७.०३।।
गरुडाचा चपेटा येत असे नेटें। कस्तुरी मळवट शोभताहे।।तु.गा.क्षे.०८७.०४।।
पदक एकावळी शोभताहे कंठीं। तुका म्हणे मिठी घालूं चला।।तु.गा.क्षे.०८७.०५।।
गव्हाराचें ज्ञान अवघा रजोगुण। सुखवासी होऊन विषय भोगी।।तु.गा.क्षे.०८८.०१।।
त्यासी जरी ज्ञानउपदेश केला। संगेविण त्याला राहवेना।।तु.गा.क्षे.०८८.०२।।
तुका म्हणे संग उत्तम असावा। याविण उपावा काय सांगों।।तु.गा.क्षे.०८८.०३।।
कोणाही केंडावें हा आम्हां अधर्म। जो जो पावे श्रम तो तो देव।।तु.गा.क्षे.०८९.०१।।
म्हणउनि चित्ता शिकविलें वोजें। आतां हेंचि दुजें न बोलावें।।तु.गा.क्षे.०८९.०२।।
हालविलें जरी परउपकारें। जिव्हे पाप खरें उपाधीचें।।तु.गा.क्षे.०८९.०३।।

तुका म्हणे जीव प्रारब्धा आधीन। कोण वाहे सीण करुणा शोभे।।तु.गा.क्षे.०८९.०४।।
कोणी निंदा कोणी वंदा। आम्हां स्वहिताचा धंदा।।तु.गा.क्षे.०९०.०१।।
काय तुम्हांसी गरज। आम्ही भजूं पंढरिराज।।तु.गा.क्षे.०९०.०२।।
तुम्हांसारिखें चालावें। तेव्हां स्वहिता मुकावें।।तु.गा.क्षे.०९०.०३।।
तुका म्हणे होकां कांहीं। गळा दिला विठ्ठलपायीं।।तु.गा.क्षे.०९०.०४।।
कोपोनियां पिता बोले प्रल्हादासी। सांग हृषीकेशी कोठें आहे।।तु.गा.क्षे.०९१.०१।।
येरु म्हणे काष्ठीं पाषाणीं सकळीं। आहे वनमाळी जेथें तेथें।।तु.गा.क्षे.०९१.०२।।
खांबावरी लात मारिली दुर्जनें। खांबीं नारायण म्हणतांचि।।तु.गा.क्षे.०९१.०३।।
तुका म्हणे कैसा खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं।।तु.गा.क्षे.०९१.०४।।
गोपाळ प्रीतीनें कैसें विनविती । विक्राळ श्रीपती होऊं नको।।तु.गा.क्षे.०९२.०१।।
नको रे बा कृष्णा धरूं ऐसें रूप। आम्हां चळकांप सुटलासे।।तु.गा.क्षे.०९२.०२।।
होईं बा धाकुटा श्यामचतुर्भुज। बैसोनियां गुज सुखें बोलों।।तु.गा.क्षे.०९२.०३।।
वोणव्याच्या रागें गिळिशील आम्हां। तुका मेघश्यामा पायां लागे।।तु.गा.क्षे.०९२.०४।।
चित्त गुंतलें प्रपंचें। झालें वेडें ममतेचें।।तु.गा.क्षे.०९३.०१।।
आतां सोडवीं पांडुरंगा। आलें निवारी तें अंगा।।तु.गा.क्षे.०९३.०२।।
गुंतली चावटी। नामीं रूपीं झाली तुटी।।तु.गा.क्षे.०९३.०३।।
तुका म्हणे चाली। पुढें वाट खोळंबली।।तु.गा.क्षे.०९३.०४।।
चहूंकडूनियां येती ते कल्लोळ। सभोंवते ज्वाळ जवळीं आले।।तु.गा.क्षे.०९४.०१।।
सकुमार मूर्ति श्रीकृष्ण धाकुटी। घोंगडी आणि कांठी खांद्यावरी।।तु.गा.क्षे.०९४.०२।।
लहान लेंकरूं होतें तें सगुण। विक्राळ वदन पसरिलें।।तु.गा.क्षे.०९४.०३।।
जाभाड तें एक गगनीं लागलें। एक तें ठेविलें भूमिवरी।।तु.गा.क्षे.०९४.०४।।
तये वेळीं अवघे गोपाळही भ्याले। तुकेंही लपालें भिऊनियां।।तु.गा.क्षे.०९४.०५।।
गोपाळांचें कैसें केलें समाधान। देऊनि आलिंगन निवविले।।तु.गा.क्षे.०९५.०१।।

ज्वाळाबरोबरी तुम्हां कां ग्रासीन। अवतार घेणें तुम्हांसाठीं।।तु.गा.क्षे.०९५.०२।।
निर्गुण निर्भय मी सर्वां निराळा। प्रकृति वेगळा गुणातीत।।तु.गा.क्षे.०९५.०३।।
चिन्मय चिद्रुप अवघे चिदाकार। तुका म्हणे पार नेणें ब्रह्मा।।तु.गा.क्षे.०९५.०४।।
गुळ सांडुनि गोडी घ्यावी। मीठ सांडुनि चवी चाखावी।।तु.गा.क्षे.०९६.०१।।
ऐसा प्रपंच सांडुनि द्यावा। मग परमार्थ जोडावा।।तु.गा.क्षे.०९६.०२।।
साकरेचा नव्हे ऊंस। आम्हां कैंचा गर्भवास।।तु.गा.क्षे.०९६.०३।।
बीज भाजुनि केली लाही। जन्म मरण आम्हां नाहीं।।तु.गा.क्षे.०९६.०४।।
आकारासी कैंचा ठाव। देह प्रत्यक्ष जाला वाव।।तु.गा.क्षे.०९६.०५।।
तुका म्हणे अवघे जग । सर्वां घटीं पांडुरंग।।तु.गा.क्षे.०९६.०६।।
गांवलोकीं कांहीं लावियेलें पिसें। काय सांगों ऐसें तुजपाशीं।।तु.गा.क्षे.०९७.०१।।
तोंड काळें केलें फिरविलें मज। नाहीं धरिली लाज पांडुरंगा।।तु.गा.क्षे.०९७.०२।।
काय तुजपाशीं सांगों हें गाऱ्हाणें। मग काय जिणें तुझें माझें।।तु.गा.क्षे.०९७.०३।।
कोणासाठीं आतां करावा संसार। केली वारावार आपणचि।।तु.गा.क्षे.०९७.०४।।
तुका म्हणे आम्ही मोडिला घरचार। धरियेला धीर तुझ्या पायीं।।तु.गा.क्षे.०९७.०५।।
जुनाट हे धन अंत नाहीं पार। खात आलें फार सरलें नाहीं।।तु.गा.क्षे.०९८.०१।।
नारद हा मुनि शुकसनकादिक। उरलें अमूप तुम्हां आम्हां।।तु.गा.क्षे.०९८.०२।।
येथूनियां धना खाती बहुत जन। वाल गुंज उणें झालें नाहीं।।तु.गा.क्षे.०९८.०३।।
तुका म्हणे धना नाहीं अंतपार। कुंठित हे चार वाचा तेथें।।तु.गा.क्षे.०९८.०४।।
जातीचा ब्राह्मण। न करितां संध्यास्नान।।तु.गा.क्षे.०९९.०१।।
तो एक नांवाचा ब्राह्मण। होय हीनाहूनि हीन।।तु.गा.क्षे.०९९.०२।।
सांडुनियां शाळिग्राम। नित्य वेश्येचा समागम।।तु.गा.क्षे.०९९.०३।।
नेघे संतांचें जो तीर्थ। अखंड वेश्येचा जो आर्त।।तु.गा.क्षे.०९९.०४।।
तुका म्हणे ऐसे पापी। पाहूं नका पुनरपि।।तु.गा.क्षे.०९९.०५।।

जातां पंढरीच्या मार्गें। काय वर्णूं सुखा मग।।तु.गा.क्षे.१००.०१।।
घडे लाभ लक्षकोटि। परब्रह्मीं होईल भेटी।।तु.गा.क्षे.१००.०२।।
नाम गर्जत येती संत। त्यांच्या दर्शनें होइजे मुक्त।।तु.गा.क्षे.१००.०३।।
जो अलक्ष्य ब्रह्मादिकां। आला सन्निध म्हणे तुका।।तु.गा.क्षे.१००.०४।।
जागा घरटी फिरे। तस्कराची दिवसा राती।।तु.गा.क्षे.१०१.०१।।
नीदसुरें नाडिलीं। असो ऐसी मार्गें किती।।तु.गा.क्षे.१०१.०२।।
हाटकरी सकळ जन। वस्तु करा रे जतन।।तु.गा.क्षे.१०१.०३।।
हुशार ठायीं। निज निजेलिया पाही।।तु.गा.क्षे.१०१.०४।।
सावचित्त असे खरा। लाभ घेऊन जावें घरा।।तु.गा.क्षे.१०१.०५।।
तराळ बोंबे उतराई। राखा आपुलिया भाई।।तु.गा.क्षे.१०१.०६।।
हरिच्या नामीं घालूं जागा। तुका म्हणे हुशार गा।।तु.गा.क्षे.१०१.०७।।
जळो जळो तें गुरुपण। जळो जळो तें चेलेपण ।।तु.गा.क्षे.१०२.०१।।
गुरू आला वेशीद्वारीं । शिष्य पळतो खिंडोरीं ।।तु.गा.क्षे.१०२.०२।।
काशासाठीं झालें येणें। त्याचें आलें वर्षासन।।तु.गा.क्षे.१०२.०३।।
तुका म्हणे चेला। गुरु दोघेहि नरकाला।।तु.गा.क्षे.१०२.०४।।
जरी न भरे पोट। तरी सेवूं दरकूट।।तु.गा.क्षे.१०३.०१।।
परी न घालूं तुज भार। हाचि आमुचा निर्धार।।तु.गा.क्षे.१०३.०२।।
तुझें नाम अमोलिक। नेणती हे ब्रह्मादिक।।तु.गा.क्षे.१०३.०३।।
ऐसें नाम तुझें खरें। तुका म्हणे भासे पुरें।।तु.गा.क्षे.१०३.०४।।
जरी तुझा नसता आधार। कैसा हा संसार दुऱ्हावता।।तु.गा.क्षे.१०४.०१।।
ऐसा बळी कोण होईल पुरता । जो हे वारी चिंता आशापाश।।तु.गा.क्षे.१०४.०२।।
मायामोहफांसा लोकलाजबेडी। तुजविण तोडी कोण एक।।तु.गा.क्षे.१०४.०३।।
हें तों मज कळों आलें अनुभवें। बरें माझ्या जीवें पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१०४.०४।।

तुका म्हणे यास तूंचि माझा ग्वाही। परी भाव नाहीं जनां लोकां ।।तु.गा.क्षे.१०४.०५ ।।
जन्मोजन्मींचें संचित। भेटी झाली अकस्मात ।।तु.गा.क्षे.१०५.०१ ।।
आतां सोडितां सुटेना। तंतु प्रीतीचा तुटेना ।।तु.गा.क्षे.१०५.०२ ।।
माझें चित्त तुझ्या पायां। मिठी पडली पंढरीराया ।।तु.गा.क्षे.१०५.०३ ।।
तुका म्हणे अंतीं। तुझी माझी एक गति ।।तु.गा.क्षे.१०५.०४ ।।
जनाचिया मना जावें काशियेसी। माझी वाराणसी पांडुरंग ।।तु.गा.क्षे.१०६.०१ ।।
तेथें भागीरथी येथें भीमरथी । अधिक म्हणती चंद्रभागा ।।तु.गा.क्षे.१०६.०२ ।।
तेथें माधवराव येथें यादवराव। जाणोनिया भाव पुंडलिकाचा ।।तु.गा.क्षे.१०६.०३ ।।
विष्णुपद गया तेचि येथें आहे। प्रत्यक्ष हें पाहें विटेवरी ।।तु.गा.क्षे.१०६.०४ ।।
तुका म्हणे हेंचि प्रपंच उद्धरी। आतां पंढरपुरीं घडो बापा ।।तु.गा.क्षे.१०६.०५ ।।
जगीं ऐसा बाप व्हावा। ज्याचा वंश मुक्तिस जावा ।।तु.गा.क्षे.१०७.०१ ।।
पोटा येतां हरलें पापा। ज्ञानदेवा मायबापा ।।तु.गा.क्षे.१०७.०२ ।।
मुळीं बाप होतां ज्ञानी। तरी आम्ही लागलों ध्यानीं।।तु.गा.क्षे.१०७.०३ ।।
तुका म्हणे मी पोटीचें बाळ। माझी पुरवा ब्रह्मींची आळ ।।तु.गा.क्षे.१०७.०४ ।।
तुझें नाम गाया नसे पेंडवळा। गाऊं कळवळा प्रेमाचिया ।।तु.गा.क्षे.१०८.०१ ।।
येईल आवडी जैशी अंतरींची। तैसी नामाची कीर्ति गाऊं ।।तु.गा.क्षे.१०८.०२ ।।
माझे मुख नामीं रंगो सर्वकाळ। गोविंद गोपाळ रामकृष्ण ।।तु.गा.क्षे.१०८.०३ ।।
अबद्ध चांगलें गाऊं जैसें तैसें। बाहे बाळ जैसें मायबापा ।।तु.गा.क्षे.१०८.०४ ।।
तुका म्हणे मज न लावी वांकडें। मी तुझें बोबडें बाळ तान्हें ।।तु.गा.क्षे.१०८.०५ ।।
तुझें पाय माझी काशी। कोण जाय माझे काशी ।।तु.गा.क्षे.१०९.०१ ।।
तुझें रूप तेंचि ध्यान। तेंचि माझें अनुष्ठान ।।तु.गा.क्षे.१०९.०२ ।।
तुझें चरण तेंचि गया। झाले गयावर्जन देहा ।।तु.गा.क्षे.१०९.०३ ।।
तुका म्हणे सकळ तीर्थं। तुझें पायीं वसती येथें ।।तु.गा.क्षे.१०९.०४ ।।

तुझी माझी आहे जुनी सोयरीक । आधीं बंधु लेंक मग जालें ।।तु.गा.क्षे.११०.०१ ।।
वाटेकरी म्हूण न पुसती आतां । परी आहे सत्ता करीन ते ।।तु.गा.क्षे.११०.०२ ।।
लेंकीचें लेंकरूं नातु जाल्यावरी । मंगळाही दुरि अंतरलों ।।तु.गा.क्षे.११०.०३ ।।
बाइलेचा भाऊ पिसुन सोयरा । म्हणउनि करा विनोद हा ।।तु.गा.क्षे.११०.०४ ।।
आकुळीं तों करूं नये तेंचि केलें । न बोलावें भलें तोंचि आतां ।।तु.गा.क्षे.११०.०५ ।।
म्हणसी लेंकी माऊसी बहिणी । आम्हां केलें धणी पापाचे त्या ।।तु.गा.क्षे.११०.०६ ।।
बहु पांचाजणीं केली विटंबना । नये दाऊं जना तोंड ऐसें ।।तु.गा.क्षे.११०.०७ ।।
तुका म्हणे आधीं मूळ तेंच धरूं । मागील तें करूं उरी आतां ।।तु.गा.क्षे.११०.०८ ।।
तुझी कीर्ति सांगों तुजपुढें जरी । ब्रह्मांडींही हरी माईना ते ।।तु.गा.क्षे.१११.०१ ।।
मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरेचि ।।तु.गा.क्षे.१११.०२ ।।
अनंत अपार आपंगिले भक्त । माझेंचि संचित ओढवेना ।।तु.गा.क्षे.१११.०३ ।।
तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा । पामरें म्यां सेवा केली नाहीं ।।तु.गा.क्षे.१११.०४ ।।
तुझिया नामाचा विसर न पडावा । ध्यानीं तो रहावा पांडुरंग ।।तु.गा.क्षे.११२.०१ ।।
सांगितला मंत्र श्रीराम नामाचा । सर्व काळ वाचा हेंचि बोले ।।तु.गा.क्षे.११२.०२ ।।
उफराटें नाम वाल्मीक बोलिला । तोही वंद्य केला नारायणें ।।तु.गा.क्षे.११२.०३ ।।
तुका म्हणे मज तुझाचि भरंवसा । धांवुनिया कैसा येसी देवा ।।तु.गा.क्षे.११२.०४ ।।
तुजविण चाड आणिकांची कांहीं । धरीन हें नाहीं तुज ठावें ।।तु.गा.क्षे.११३.०१ ।।
तरण उपाय योगक्षेम माझा । ठेवियेला तुझ्या पायीं देवा ।।तु.गा.क्षे.११३.०२ ।।
कोण मज आळी काय हे तांतडी । सोनियाची घडी जाय दिस ।।तु.गा.क्षे.११३.०३ ।।
तुझिया नामाचें ल्यालोंसे भूषण । कृपा संतजन करितील ।।तु.गा.क्षे.११३.०४ ।।
तुका म्हणे झाला आनंदाचा वास । हृदया या नास नव्हे कधीं ।।तु.गा.क्षे.११३.०५ ।।
तुज केलिया नव्हे ऐसें काई । डोंगराची राई क्षणमात्रें ।।तु.गा.क्षे.११४.०१ ।।
मज या लोकांचा न साहे आघात । देखणें प्रचित जीव घेती ।।तु.गा.क्षे.११४.०२ ।।

सहज विनोदें बोलियेलों गोष्टी। आरंभीं तों पोटीं न धरावी।।तु.गा.क्षे.११४.०३।।
दीनरूप मज करावें नेणतां। याहुनी अनंता आहें तैसा।।तु.गा.क्षे.११४.०४।।
तुका म्हणे जेणें मज तूं भोगसी। तें करीं जनासी चाड नाहीं।।तु.गा.क्षे.११४.०५।।
तुका उतरला तुकीं। नवल जालें तिहीं लोकीं।।तु.गा.क्षे.११५.०१।।
नित्य करितों कीर्तन। हेंचि माझें अनुष्ठान।।तु.गा.क्षे.११५.०२।।
तुका बैसला विमानीं। संत पाहाती लोचनीं।।तु.गा.क्षे.११५.०३।।
देव भावाचा भुकेला। तुका वैकुंठासी नेला।।तु.गा.क्षे.११५.०४।।
तीर्थें फळती काळें जन्में आगळिया। संतदृष्टी पाया हेळा मात्रें।।तु.गा.क्षे.११६.०१।।
सुखाचे सुगम वैष्णवांचे पाय। अंतरीचा जाय महाभेव।।तु.गा.क्षे.११६.०२।।
काळेही नसरे तपें समाधान। कथें मूढजन समाधिस्थ।।तु.गा.क्षे.११६.०३।।
उपमा द्यावया सांगतां आणिक। नाहीं तिन्ही लोक धुंडाळितां।।तु.गा.क्षे.११६.०४।।
तुका म्हणे मी राहिलों येणें सुखें। संतसंगें दु:खें नासावया।।तु.गा.क्षे.११६.०५।।
डळमळिला मेरु आणि तो मांदार। पाताळीं फणिवर डोई झाडी।।तु.गा.क्षे.११७.०१।।
लोपे तेजें सूर्य आणीक हा चंद्र। कांपतसे इंद्र थरथरां।।तु.गा.क्षे.११७.०२।।
ऐसें रूप उग्र हरीनें धरिलें। दैत्या मारियेलें मांडिवरी।।तु.गा.क्षे.११७.०३।।
तुका म्हणे भक्ताकारणें श्रीहरि। बहु दुराचारी निर्दाळिले।।तु.गा.क्षे.११७.०४।।
त्रैलोकींचा नाथ सकळांचा आधार। बळीचें तुवां घर धरियेलें।।तु.गा.क्षे.११८.०१।।
आम्हां मोकलिलें कोणां निरविलें। कोणां हातीं दिलें तिन्ही लोक।।तु.गा.क्षे.११८.०२।।
अनाथांचा बंधु दासांचा कैवारी। ब्रीदें तुझीं हरी जाती वायां।।तु.गा.क्षे.११८.०३।।
तुका म्हणे ऐसें बोलिला दुर्वास । वाटला संतोष पांडुरंगा।।तु.गा.क्षे.११८.०४।।
ते काय पवाडे नाहीं म्यां ऐकिलें। गोपाळ रक्षिलें वनांतरीं।।तु.गा.क्षे.११९.०१।।
मावेचा वोणवा होऊनी राक्षस। लागला वनास चहूंकडे।।तु.गा.क्षे.११९.०२।।
गगनासी उवाळा लागती तुंबळ। गोधनें गोपाळ वेडावलीं।।तु.गा.क्षे.११९.०३।।

तुका म्हणे तेथें पळावया वाट। नाहीं बा निपट ऐसें झालें।।तु.गा.क्षे.११९.०४।।
तुम्ही गोपीबाळा मज कैशा नेणा। इंद्र अमरराणा म्यांचि केला।।तु.गा.क्षे.१२०.०१।।
इंद्र चंद्र सूर्य ब्रह्मा तिन्ही लोक। माझे सकळीक यमधर्म।।तु.गा.क्षे.१२०.०२।।
मजपासूनियां झाले जीवशिव। देवांचाही देव मीच कृष्ण।।तु.गा.क्षे.१२०.०३।।
तुका म्हणे त्यांसी बोले नारायण। व्यर्थ मी पाषाण जन्मा आलों।।तु.गा.क्षे.१२०.०४।।
तुम्हां सांगतों कलयुगफळ। पुढें होईल ब्रह्मघोळ।।तु.गा.क्षे.१२१.०१।।
आम्हां म्हणतील कंटक। ऐसा पाडिती दंडक।।तु.गा.क्षे.१२१.०२।।
स्त्रिया पूजुनि सरे देती। भलते स्त्रियेसी भलते जाती।।तु.गा.क्षे.१२१.०३।।
श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस। अंगिकारिति मद्यमांस।।तु.गा.क्षे.१२१.०४।।
चारी वर्ण अठरा याती। केवळ करिती एक पंक्ती।।तु.गा.क्षे.१२१.०५।।
म्हणती अंबेचा क्रीडाकल्लोळ। शिवरूप प्राणी सकळ।।तु.गा.क्षे.१२१.०६।।
ऐसें होईल शकून देतो। अगोदर सांगून जातो।।तु.गा.क्षे.१२१.०७।।
तुका सद्गुरुदास्य करी। सिद्धि पाणी वाहे घरीं।।तु.गा.क्षे.१२१.०८।।
तुझें वर्म आम्हां कळों आलें सुखें। संतांचियां मुखें पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१२२.०१।।
अवघाचि नट वाउगा पसारा। चेईला तो खरा तूंचि एक।।तु.गा.क्षे.१२२.०२।।
म्हणऊनि देहबुद्धि नासिवंता। नातळे या चित्ता नेदावया।।तु.गा.क्षे.१२२.०३।।
सोय हे लागली पुढिलांची वाट। पावले जे नीट तुजपाशीं।।तु.गा.क्षे.१२२.०४।।
तुका म्हणे नाहीं कोणासवें काज । बोलायाचें मज अंतरींचें।।तु.गा.क्षे.१२२.०५।।
तुझें प्रेम माझ्या हृदयीं आवडी। चरण न सोडीं पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१२३.०१।।
कासया सिणविसी थोरीवाकारणें। काय तुझें उणें होईल देवा।।तु.गा.क्षे.१२३.०२।।
चातकाची चिंता हरली जळधरें। काय त्यांचे सरे थोरपण ।।तु.गा.क्षे.१२३.०३।।
चंद्र चकोरांचा पुरवी सोहळा । काय त्याची कळा न्यून होय।।तु.गा.क्षे.१२३.०४।।
तुका म्हणे मज अनाथा सांभाळीं। हृदयकमळीं स्थिर राहें।।तु.गा.क्षे.१२३.०५।।

तुझें नाम पंढरिनाथा। भावेंविण नये हातां ||तु.गा.क्षे.१२४.०१ ||
दाहां नये विसां नये। पन्नासां साठां नये ||तु.गा.क्षे.१२४.०२ ||
शतां नये सहस्त्रां नये। लक्षकोटीलागीं नये ||तु.गा.क्षे.१२४.०३ ||
तुका म्हणे पंढरिनाथा। भावेंविण नये हातां ||तु.गा.क्षे.१२४.०४ ||
तुझे नामीं दीनानाथा। आम्ही उघडा घातला माथा ||तु.गा.क्षे.१२५.०१ ||
आतां न धरावें दुरी। बोल येईल ब्रीदावरी ||तु.गा.क्षे.१२५.०२ ||
पतित होतों ऐसा ठावा। आधीं कां न विचारावा ||तु.गा.क्षे.१२५.०३ ||
तुका म्हणे तुझे पायीं। आम्ही मिरास केली पाहीं ||तु.गा.क्षे.१२५.०४ ||
देवीं आणि दैतीं सिंधु घुसळिला। भार पृथ्वीस झाला सहावेना ||तु.गा.क्षे.१२६.०१ ||
झालासी कासव धरिली पाठीवरी। चिंता तुज हरी सकळांची ||तु.गा.क्षे.१२६.०२ ||
तये काळीं देव करिताती स्तुति। कृपाळु श्रीपती म्हणोनियां ||तु.गा.क्षे.१२६.०३ ||
तुका म्हणे ऐसे उदंड पवाडे। ज्यासी सहस्त्र तोंडें सिणला तोही ||तु.गा.क्षे.१२६.०४ ||
देवा बोलें आतां बोला। त्वां कां धरिला अबोला ||तु.गा.क्षे.१२७.०१ ||
भेऊं नको देईं भेटी। तूं कां पडलासी संकटीं ||तु.गा.क्षे.१२७.०२ ||
तुझ्या जीवींचें मी जाणें। म्हणसी मुक्ती आम्हां देणें ||तु.गा.क्षे.१२७.०३ ||
तुका म्हणे नलगे कांहीं। चित्त राहो तुझे पायीं ||तु.गा.क्षे.१२७.०४ ||
देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती। होतील विपत्ति ज्या ज्या कांहीं ||तु.गा.क्षे.१२८.०१ ||
नेघे माझी वाचा पुढें कांहीं वाव। आणि दुजें भाव बोलायाचे ||तु.गा.क्षे.१२८.०२ ||
मनाची वाटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ||तु.गा.क्षे.१२८.०३ ||
तुका म्हणे घेईं विठ्ठलाचा छंद। आनंदाचा कंद विस्तारेल ||तु.गा.क्षे.१२८.०४ ||
देव धरी नाना सोंगें। नाम श्रेष्ठ पांडुरंग ||तु.गा.क्षे.१२९.०१ ||
तो हा गवळियांचे घरीं। नाम सरितो मुरारी ||तु.गा.क्षे.१२९.०२ ||
धन्य यशोदेचें प्रारब्ध। नाचे अंगणीं गोविंद ||तु.गा.क्षे.१२९.०३ ||

ऐशीं भक्तासाठीं देवें। नाना धरियेलीं नांवें।।तु.गा.क्षे.१२९.०४।।
होय दासांचा जो दास। तुका म्हणे विठ्ठलास।।तु.गा.क्षे.१२९.०५।।
देव जडला जाइना अंगा। यासी काय करूं सांगा।।तु.गा.क्षे.१३०.०१।।
वरकड देव येती जाती। हा देव जन्माचा सांगाती।।तु.गा.क्षे.१३०.०२।।
अंगीं भरलें देवाचे वारें। देव जगचि दिसे सारें।।तु.गा.क्षे.१३०.०३।।
भूत न बोले निरुतें। कांहीं केल्या न सुटे तें।।तु.गा.क्षे.१३०.०४।।
जीव खादला दैवतें। माझा येणें महाभूतें।।तु.गा.क्षे.१३०.०५।।
तुका म्हणे वाडें कोडें। उभें पुंडलिका पुढें।।तु.गा.क्षे.१३०.०६।।
देव गावा ध्यावा ऐसें झालें। परदेशी नाही उगलें। वडील आणि धाकुलें। नाहीं ऐसें झालें दुसरें तें।।तु.गा.क्षे.१३१.०१।।
नाहीं लागत मूळीहूनि। सुहृद जन आणि जननी। लागल्या लागें त्यागें सांडुनि । लोभीये मांडणीसंयोगाची।।तु.गा.क्षे.१३१.०२।।
शिव बाटला जीवदशे। बहुत ओतत आले ठसे। हीन झाले भूषणाचे इच्छें। निवडती कैसें गुणागुण।।तु.गा.क्षे.१३१.०३।।
आतां हें हुतांश तों बरें। अवघे एकच मोहरें। पिटिलियाविण नव्हे खरें। निवडे बरें जाति शुद्ध।।तु.गा.क्षे.१३१.०४।।
तुका उताविळ याजसाठीं। आहे तें निवेदीन पोटीं। आवडी द्यावी जी येथें लाटी। तुझी जगजेठी कीर्ति वाखाणीन।।तु.गा.क्षे.१३१.०५।।
दुर्वासें निरोप आणिला ये रीतीं। मग वाढलेती नारायणा।।तु.गा.क्षे.१३२.०१।।
ठेविले चरण बळीचिये द्वारीं। शिर अंगावरी लांबविलें।।तु.गा.क्षे.१३२.०२।।
पाडियेलें द्वार द्वारावतियेसी। वरी हृषीकेशी निघालेती।।तु.गा.क्षे.१३२.०३।।
तेथूनियां नाम पडिलें द्वारका। वैकुंठनायका तुका म्हणे।।तु.गा.क्षे.१३२.०४।।
दुर्वासया स्वामी गुंतलो भाकेसी । पुसा जा बळीसी निरोप द्यावा।।तु.गा.क्षे.१३३.०१।।
त्याचे आज्ञेविण आम्हां येतां नये। द्वारपाळ राहें होउनियां।।तु.गा.क्षे.१३३.०२।।
पुसे दुर्वासया बळीसी जाऊनी। येरू म्हणे झणी बोलों नका।।तु.गा.क्षे.१३३.०३।।
तुका म्हणे केला अन्यत्राचा त्याग । तेव्हां पांडुरंग सखा झाला।।तु.गा.क्षे.१३३.०४।।
दिवाळखोर नारायण। यावरी बहुतांचें ऋण।।तु.गा.क्षे.१३४.०१।।
उठतांचि उभे द्वारीं । अवघे दे दे म्हणती हरी।।तु.गा.क्षे.१३४.०२।।

माजघरीं दडे हरी। माया तडकी आड करी।।तु.गा.क्षे.१३४.०३।।
युगायुगीचें हें ऋण । म्हणउनि धरिलें मौन्य।।तु.गा.क्षे.१३४.०४।।
रोखापत्र पाही। वेदशास्त्र देती ग्वाही।।तु.गा.क्षे.१३४.०५।।
धनको नाम तुका वाणी। रिणको नाम विठ्ठलधणी।।तु.गा.क्षे.१३४.०६।।
दिवसा व्यापार चावटी । रात्रीं कुटुंब चिंता मोठी ।।तु.गा.क्षे.१३५.०१।।
काय करूं या मनासी । नाठवे कां हृषीकेशी ।।तु.गा.क्षे.१३५.०२।।
वेश्येपाशीं रात्रीं जागे । हरिकीर्तनीं निद्रा लागे ।।तु.गा.क्षे.१३५.०३।।
तुका म्हणे काय झालासी । वृथा संसारा आलासी ।।तु.गा.क्षे.१३५.०४।।
दर्दुराचें पिलूं म्हणे रामराम। नाहीं उदक उष्ण होऊं दिलें।।तु.गा.क्षे.१३६.०१।।
कढेमाजी बाळ करी तळमळ। गोविंद गोपाळ पावे वेगीं।।तु.गा.क्षे.१३६.०२।।
आज्ञा तये काळीं केली पावकासी। झणी पिलियांसी तापवीसी।।तु.गा.क्षे.१३६.०३।।
तुका म्हणे तुझे ऐसे हे पवाडे। वर्णितां निवाडे सुख वाटे।।तु.गा.क्षे.१३६.०४।।
आतां तुज मज नाहीं दुजेपण। दाखवीं चरण पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१३७.०१।।
तुज रूप रेखा नाम गुण नाहीं। एक स्थान पाही गाव सीव।।तु.गा.क्षे.१३७.०२।।
नावडे संगती तुज दुजयाची। आपुल्या भक्तांची प्रीति तुम्हां।।तु.गा.क्षे.१३७.०३।।
परि आम्हांसाठीं होसील सगुण। स्तंभासी फोडून जयापरि।।तु.गा.क्षे.१३७.०४।।
तुका म्हणे तैसें तुज काय उणें। देईं दर्शन चरणांचें।।तु.गा.क्षे.१३७.०५।।
आतां आम्हां भय नाहीं बा कोणाचें। बळ विठोबाचें झालें असे।।तु.गा.क्षे.१३८.०१।।
धीर दिला आम्हां येणें पांडुरंगे । न पांगो या पांगें संसाराच्या।।तु.गा.क्षे.१३८.०२।।
तुका म्हणे माझा कैवारी हा देव। नाहीं भवभेव त्याच्या संगें।।तु.गा.क्षे.१३८.०३।।
आणीक कोणापुढें वांसूं मुख सांग। माझें अंतरंग कोण जाणें।।तु.गा.क्षे.१३९.०१।।
पाहें तुजकडे येऊनी जाऊनी। पांडुरंगा मनीं विचारावें ।।तु.गा.क्षे.१३९.०२।।
भयचिंता अवघे उद्योग सांडिले । आठवुनी पाउलें असें तुझीं।।तु.गा.क्षे.१३९.०३।।

नका विसरूं मज वैकुंठनायका। विनवीतसे तुका बंदीजन।।तु.गा.क्षे.१३९.०४।।
आनंदाचा कंद गाइयेला गीतीं। पाहियेला चित्तीं देवराव।।तु.गा.क्षे.१४०.०१।।
देवराव तोही आहे निश्चयेंसी। अखंड नामासी बोलावितो।।तु.गा.क्षे.१४०.०२।।
बोलवितो मज कृपा तो करूनि। तुका म्हणे मनीं धरा भाव।।तु.गा.क्षे.१४०.०३।।
आधीं देह पाहतां वाव। कैंचा प्रारब्धासी ठाव।।तु.गा.क्षे.१४१.०१।।
कां रे रडतोसी माना। लागें विठ्ठलचरणा।।तु.गा.क्षे.१४१.०२।।
दुर्जेपण झालें वाव। त्रिभुवनीं नाहीं ठाव।।तु.गा.क्षे.१४१.०३।।
तुका म्हणे खरें पाहें। विठ्ठल पाहोनियां राहें।।तु.गा.क्षे.१४१.०४।।
आतां बरें झालें। सकाळींच कळों आलें।।तु.गा.क्षे.१४२.०१।।
मज न ठेवी इहलोकीं। आलों तेव्हां झाली चुकी।।तु.गा.क्षे.१४२.०२।।
युगमहिमा ठावा । नव्हता ऐसा पुढें देवा।।तु.गा.क्षे.१४२.०३।।
तुका म्हणे ठेवीं। भोगासाठीं निरयगांवीं।।तु.गा.क्षे.१४२.०४।।
अनंत लक्षणें वाणितां अपार। संताचें तें घर सांपडेना।।तु.गा.क्षे.१४३.०१।।
जये घरीं संत राहाती आपण। तें तुम्हां ठिकाण आतुडेना।।तु.गा.क्षे.१४३.०२।।
ठिकाण धरूनी पाहावे ते संत। उगाच आकांत करूं नये।।तु.गा.क्षे.१४३.०३।।
संत होऊनियां संतासी पहावें। तरिच तरावे तुका म्हणे।।तु.गा.क्षे.१४३.०४।।
अंधळें तें सांगे सांगितल्या खुणा। अनुभव देखणा प्रगट त्या।।तु.गा.क्षे.१४४.०१।।
नांदणूक सांगें वडिलांचें बळ। कैसा तो दुर्बळ सुख पावे।।तु.गा.क्षे.१४४.०२।।
तुका म्हणे नांदों आपल्या प्रतापें। तयाची लोकांपें स्तुति सांगों।।तु.गा.क्षे.१४४.०३।।
अग्निकुंडामाजीं घातला प्रल्हाद। तरी तो गोविंद विसरेना।।तु.गा.क्षे.१४५.०१।।
पितियासी म्हणे व्यापक श्रीहरि। नांदतो मुरारी सर्वांठायीं।।तु.गा.क्षे.१४५.०२।।
अग्निरूपें माझा सखा नारायण। प्रल्हाद गर्जून हांक मारी।।तु.गा.क्षे.१४५.०३।।
तुका म्हणे अग्नि जाहला शीतळ। प्रताप सबळ विठो तुझा।।तु.गा.क्षे.१४५.०४।।

अंगीं ज्वर तया नावडे साकर। जाणे तो इतर गोडी जाणे ।।तु.गा.क्षे.१४६.०१ ।।
एकाचिये तोंडीं पडियेली माती। अवघे ते खाती पोटभरी ।।तु.गा.क्षे.१४६.०२ ।।
चारितां बळें येत असे दांतीं। मागोनियां घेती भाग्यवंत ।।तु.गा.क्षे.१४६.०३ ।।
तुका म्हणे नसे संचित हें बरें। तयासी दुसरें काय करी ।।तु.गा.क्षे.१४६.०४ ।।
आलिया संसारीं देखिली पंढरी। कीर्तिमहाद्वारीं वाणूं तुझी ।।तु.गा.क्षे.१४७.०१ ।।
पताकांचे भार नामाचे गजर। देखिल्या संसार सफळ झाला ।।तु.गा.क्षे.१४७.०२ ।।
साधुसंतांचिया धन्य झाल्या भेटी। सांपडली लुटी मोक्षाची हे ।।तु.गा.क्षे.१४७.०३ ।।
तुका म्हणे आतां हेंचि पैं मागणें। पुढती नाहीं येणें संसारासी ।।तु.गा.क्षे.१४७.०४ ।।
आयुष्य वेंचुनि कुटुंब पोसिलें । काय हित केलें सांग बापा ।।तु.गा.क्षे.१४८.०१ ।।
फुकाचा चाकर झालासी काबाडी। नाहीं सुख घडी भोगावया ।।तु.गा.क्षे.१४८.०२ ।।
दुर्लभ मनुष्यजन्म कष्टें पावलासी। दिला कुटुंबासी कामभोग ।।तु.गा.क्षे.१४८.०३ ।।
तुका म्हणे ऐसें आयुष्य नाशिलें। पाप तें सांचिलें पतनासी ।।तु.गा.क्षे.१४८.०४ ।।
भक्तांची सांकडीं स्वयें सोसी देव। त्यांपाशीं केशव सर्वकाळ ।।तु.गा.क्षे.१४९.०१ ।।
जये ठायीं कीर्तन वैष्णव करिती। तेथें हा श्रीपति उभा असे ।।तु.गा.क्षे.१४९.०२ ।।
तुका म्हणे देव सर्वांठायीं झाला। भरूनी उरला पांडुरंग ।।तु.गा.क्षे.१४९.०३ ।।
बोली मैंदाची बरवी असे। वाटे अंतरीं घालावें फांसे ।।तु.गा.क्षे.१५०.०१ ।।
कैसा वरिवरि दिसताहे चांग। नव्हे भाविक केवळ मांग ।।तु.गा.क्षे.१५०.०२ ।।
टिळा टोपी माळा कंठीं। अंधारीं नेउनि चेची घांटी ।।तु.गा.क्षे.१५०.०३ ।।
तुका म्हणे तो केवळ पुंड। त्यावरि वाजती यमदंड ।।तु.गा.क्षे.१५०.०४ ।।
होतें तैसें पायीं केलें निवेदन। अंतरलों दीन बहुत होतों ।।तु.गा.क्षे.१५१.०१ ।।
संबोखुनी केलें समाधान चित्त। वोगरूनि भातें प्रेमरसें ।।तु.गा.क्षे.१५१.०२ ।।
नामरत्नमणी करूनी भूषण। अलंकार मंडण माळा दिली ।।तु.गा.क्षे.१५१.०३ ।।
तुका म्हणे सुखें झालों निरामय। नामीं नाम सोय निमग्नता ।।तु.गा.क्षे.१५१.०४ ।।

हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं। वरदानें बळी शंकराच्या ।।तु.गा.क्षे.१५२.०१ ।।
इंद्रपदराज्य घेतलें हिरोनी। देवा चक्रपाणी म्हणती धांव ।।तु.गा.क्षे.१५२.०२ ।।
तईं पांडुरंगा शूकर झालेती। तया दैत्यपती मारियेलें ।।तु.गा.क्षे.१५२.०३ ।।
तुका म्हणे ज्यांचीं राज्यें त्यांसी दिलीं। ऐसी तूं माउली पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.१५२.०४ ।।
हिरा ठेवितां काळें गाहाण। मोल न तुटे दुकाळीं जाण ।।तु.गा.क्षे.१५३.०१ ।।
तैसें संतजन पाहीं। विनटले श्रीहरिपायीं ।।तु.गा.क्षे.१५३.०२ ।।
तुका म्हणे तैसें भक्त। तयांसी जन हें निंदित ।।तु.गा.क्षे.१५३.०३ ।।
हेचि वेळा देवा नका मागें घेऊं। तुम्हांविण जाऊं शरण कोणा ।।तु.गा.क्षे.१५४.०१ ।।
नारायणा ये रे पाहें विचारून। तुजविण कोण आहे मज ।।तु.गा.क्षे.१५४.०२ ।।
रात्र दिवस तुज आठवूनि आहें। पाहातोसी काय सत्व माझें ।।तु.गा.क्षे.१५४.०३ ।।
तुका म्हणे किती येऊं काकुलती। कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ।।तु.गा.क्षे.१५४.०४ ।।
स्त्रिया धन हें बा खोटें। नागवले मोठे मोठे ।।तु.गा.क्षे.१५५.०१ ।।
म्हणोनि सांडा दोनी। सुख पावाल निदानीं ।।तु.गा.क्षे.१५५.०२ ।।
सर्व दुःखासी कारण। हींच दोन्हींच प्रमाण ।।तु.गा.क्षे.१५५.०३ ।।
आशा सर्वस्वें सांडावी। तेणें निजपदवी पावावी ।।तु.गा.क्षे.१५५.०४ ।।
देहलोभें नाडला। घाला यमाचा पडला ।।तु.गा.क्षे.१५५.०५ ।।
तुका म्हणे निरापेक्षा। कांहीं न धरावी अपेक्षा ।।तु.गा.क्षे.१५५.०६ ।।
स्वयें आपणचि रिता। रडे पुढिलांच्या हिता ।।तु.गा.क्षे.१५६.०१ ।।
सेखीं हें ना तैसें झालें। बोलणें तितुकें वायां गेलें ।।तु.गा.क्षे.१५६.०२ ।।
सुखसागरीं नेघे वस्ती। अंगीं ज्ञानपणाची मस्ती ।।तु.गा.क्षे.१५६.०३ ।।
तुका म्हणे गाढव लेखा। जेथें भेटेल तेथें ठोका ।।तु.गा.क्षे.१५६.०४ ।।
स्वामिसेवा गोड। माते बाळकाचें कोड ।।तु.गा.क्षे.१५७.०१ ।।
जें जें मागावें भातुकें। तें तें पुरवी कौतुकें ।।तु.गा.क्षे.१५७.०२ ।।

खेळविलें कोडें। हरुषें बोले कीं बोबडें।।तु.गा.क्षे.१५७.०३।।
तुका म्हणे लाड। तेथें पुरे माझें कोड।।तु.गा.क्षे.१५७.०४।।
स्वामी तूंही कैसा न पडसी डोळां। सुंदर सांवळा घवघवीत।।तु.गा.क्षे.१५८.०१।।
चतुर्भुज माळा रूळे एकावळी। कस्तुरी निढळीं रेखिलीसे।।तु.गा.क्षे.१५८.०२।।
शंख चक्र गदा रुळे वैजयंती। कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही।।तु.गा.क्षे.१५८.०३।।
तुका म्हणे स्वामी आतां दावीं पाय। पांडुरंगे माये कृपावंते।।तु.गा.क्षे.१५८.०४।।
स्वगोत्रींचा पुत्र परगोत्री अर्पिला । विभागा मुकला पितृधना।।तु.गा.क्षे.१५९.०१।।
तैसें मजलागीं न धरावें दुरी। नव्हे परगोत्री पोटींचाचि।।तु.गा.क्षे.१५९.०२।।
सुतकासी त्याचे नाहीं प्रयोजन। जनिता म्हणोनि तीन दिवस।।तु.गा.क्षे.१५९.०३।।
तुका म्हणे नाहीं ठावें हें कोणासी। पुसावें वेदांसी देती ग्वाही।।तु.गा.क्षे.१५९.०४।।
स्वप्नींचें धन चित्रींच्या ब्राह्मणा। जातकर्म जाणा वांटिती पैं।।तु.गा.क्षे.१६०.०१।।
तैंसे शब्दज्ञान करिती चावटी। ज्ञान पोटासाठीं विकूनियां।।तु.गा.क्षे.१६०.०२।।
बोलाचीच कढी बोलाचाचि भात। जेवुनिवां तृप्त कोण झाला।।तु.गा.क्षे.१६०.०३।।
कागदीं लिहितां नामाची साखर। चाखता मधुर केवीं लागे।।तु.गा.क्षे.१६०.०४।।
तुका म्हणे जळो तैसें ज्ञानबंड। यमपुरीं दंड कठिण आहे।।तु.गा.क्षे.१६०.०५।।
बहु क्लेशी झालों या हो नरदेहीं। कृपादृष्टी पाहीं पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१६१.०१।।
पांडुरंगा सर्व देवांचिया देवा। घ्यावी माझी सेवा दीनानाथा।।तु.गा.क्षे.१६१.०२।।
दीनानाथ ब्रीद त्रिभुवनीं तुझें। मायबापा ओझें उतरावें।।तु.गा.क्षे.१६१.०३।।
उतरीं सत्वर पैलथडी नेई। पूर्णसुख देई पायांपाशीं।।तु.गा.क्षे.१६१.०४।।
पायापाशीं मज ठेवीं निरंतर। आशा तुझी फार दिवस केली।।तु.गा.क्षे.१६१.०५।।
केली आस तुझी वाट मी पाहातों। निशिदिनी ध्यातों नाम तुझें।।तु.गा.क्षे.१६१.०६।।
नाम तुझें गोड स्वभक्तां आवडे। भक्तांलागीं कडे खांदा घेसी।।तु.गा.क्षे.१६१.०७।।
घेसी खांद्यावरी खेळविसी लोभें। पाऊल तें शोभे विटेवरी।।तु.गा.क्षे.१६१.०८।।

आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलांचे दोषगुण वाखाणिती ।।तु.गा.क्षे.१६७.०३ ।।
विषयाचे ध्यासें जग बांधियेलें। म्हणोनि लागलें जन्ममृत्यु ।।तु.गा.क्षे.१६७.०४ ।।
तुका म्हणे माझे संचितचि असे। देवाजीचें पिसें सहजगुण ।।तु.गा.क्षे.१६७.०५ ।।
संसाराचें ओझें वाहता वाहविता। तुजविण अनंता नाहीं कोणी।।तु.गा.क्षे.१६८.०१ ।।
गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे। योगक्षेमकाज करणें त्याचें ।।तु.गा.क्षे.१६८.०२ ।।
चतुर्भुजा करीं वारू श्रृंगारावे। सारथ्य करावें अर्जुनाचें ।।तु.गा.क्षे.१६८.०३ ।।
श्वपच अंत्यज भक्तिस्नेंहें झाला। अचळपदीं केला ध्रुव तुका ।।तु.गा.क्षे.१६८.०४ ।।
संसारीं असतां हरिनाम घेसी। तरीच उद्धरसी पूर्वजेंसी ।।तु.गा.क्षे.१६९.०१ ।।
अवघींच इंद्रियें न येतील कामा । जिव्हे रामनामा उच्चारी वेगीं ।।तु.गा.क्षे.१६९.०२ ।।
शरीरसंपत्ति नव्हे रे आपुली । भ्रांतीची साउली अवघी व्यर्थ ।।तु.गा.क्षे.१६९.०३ ।।
तुका म्हणे सार हरिनाम उच्चार । येऱ्हवीं येरझार हरीविण ।।तु.गा.क्षे.१६९.०४ ।।
स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावूनियां ।।तु.गा.क्षे.१७०.०१ ।।
पुंजाळले नेत्र झाले अर्धोन्मीलित । कंठ सद्गदित रोमांच आले ।।तु.गा.क्षे.१७०.०२ ।।
चित्त चाकाटलें स्वरुपामाझारी । न निघे बाहेरी सुखावलों ।।तु.गा.क्षे.१७०.०३ ।।
सुनीळ प्रकाश उदैजला दिन । अमृताचें पान जीवनकळा ।।तु.गा.क्षे.१७०.०४ ।।
शशिसूर्या झाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ।।तु.गा.क्षे.१७०.०५ ।।
तुका म्हणे सुखें प्रेमेंसी डुल्लत । विरालों निश्चित निश्चितीनें ।।तु.गा.क्षे.१७०.०६ ।।
भक्तिऋण घेतलें माझें । चरण गाहाण आहेत तुझे ।।तु.गा.क्षे.१७१.०१ ।।
प्रेमव्याज देंई हरी । माझा हिशेब लवकरी करीं ।।तु.गा.क्षे.१७१.०२ ।।
माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ।।तु.गा.क्षे.१७१.०३ ।।
तुझे नामीं आहे खत । सुखें करी पंचाईत ।।तु.गा.क्षे.१७१.०४ ।।
तुका म्हणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ।।तु.गा.क्षे.१७१.०५ ।।
बरवें दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ।।तु.गा.क्षे.१७२.०१ ।।

सारअसाराचीं पोतीं । ग्राहक पाहोनि करा रितीं ।।तु.गा.क्षे.१७२.०२।।
उगेचि फुगवूं नका गाल । पूर्ण साठवावा माल।।तु.गा.क्षे.१७२.०३।।
सत्य तराजू पैं धरा। नका कृत्रिम विकरा।।तु.गा.क्षे.१७२.०४।।
तुका झाला वाणी। चुकवूनि चौऱ्यायसींच्या खाणी।।तु.गा.क्षे.१७२.०५।।
फट्याचें बडबडे चवी ना सवाद । आपुलाचि वाद आपणासी।।तु.गा.क्षे.१७३.०१।।
कोणें या शब्दाचे मरावें घसणी। अंतरें शाहाणी राहिजे हो।।तु.गा.क्षे.१७३.०२।।
गाढवाचा भुंक आइकतां कानीं। काय कोड वाणी ऐसियेचें।।तु.गा.क्षे.१७३.०३।।
तुका म्हणे ज्यासी करावें वचन। त्याचे येती गुण आंगास ते।।तु.गा.क्षे.१७३.०४।।
प्रेम जडलें तुझे पायीं। आणीक न सुचे मजला कांहीं।।तु.गा.क्षे.१७४.०१।।
रात्रीदिवस तुझें ध्यान। तेंचि माझें अनुष्ठान।।तु.गा.क्षे.१७४.०२।।
नामापरतें नेणें दुजें। ऐसें कळलें मजला निज।।तु.गा.क्षे.१७४.०३।।
तुका म्हणे अंतकाळीं। आम्हां सोडवीं तात्काळीं।।तु.गा.क्षे.१७४.०४।।
बहुत कृपाळू दीनांचा दयाळू। जगीं भक्तवत्सलू नाम तुझें।।तु.गा.क्षे.१७५.०१।।
मानियेला चित्तीं बळीचा उपकार। अझूनी त्याचें द्वार राखशील।।तु.गा.क्षे.१७५.०२।।
काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं। नाहीं तुज हरी कृपा बहु।।तु.गा.क्षे.१७५.०३।।
तुका म्हणे भक्तजनांची ममता। तुम्हांसी अनंता अलौकिक।।तु.गा.क्षे.१७५.०४।।
भाग्यालागीं लांचावले। देवधर्म ते राहिले।।तु.गा.क्षे.१७६.०१।।
कथे जातां आळसे मन। प्रपंचाचें मोठें ज्ञान।।तु.गा.क्षे.१७६.०२।।
अखंड प्रीति जाया। नेणें भजनाच्या ठाया।।तु.गा.क्षे.१७६.०३।।
कथाकीर्तन धनाचें। सर्वकाळ विषयीं नाचे।।तु.गा.क्षे.१७६.०४।।
तुका म्हणे पंढरीराया। ऐसे जन्मविलें वायां।।तु.गा.क्षे.१७६.०५।।
संत कृपा जाली। इमारत फळा आली।।तु.गा.क्षे.१७७.०१।।
ज्ञानदेवें रचिला पाया। उभारिलें देवालया।।तु.गा.क्षे.१७७.०२।।

नामा तयाचा किंकर। तेणें केला हा विस्तार।।तु.गा.क्षे.१७७.०३ ।।
जनार्दन एकनाथ। ध्वज उभारिला भागवत।।तु.गा.क्षे.१७७.०४ ।।
तुका झालासे कळस। भजन करा सावकाश।।तु.गा.क्षे.१७७.०५ ।।
संतचरणीं नाहीं गोडी। ज्यासी विषयीं आवडी।।तु.गा.क्षे.१७८.०१ ।।
त्यासी कैंचा भेटे देव। संतचरणीं नाहीं भाव।।तु.गा.क्षे.१७८.०२ ।।
संतसेवेसी आंग चोरी। दृष्टि न पडो तयावरी।।तु.गा.क्षे.१७८.०३ ।।
पाहे गुणदोष संतांचे । जळो काळें तोंड त्याचें।।तु.गा.क्षे.१७८.०४ ।।
तुका म्हणे संतसेवा। आमुच्या पूर्वजांचा ठेवा।।तु.गा.क्षे.१७८.०५ ।।
संतजना माझी यावया करुणा। म्हणउनी दीन हीन जालों।।तु.गा.क्षे.१७९.०१ ।।
नेणें योग युक्ती नाहीं ज्ञान मति। गातसें या गीतीं पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१७९.०२ ।।
भाव भक्ति नेणें तप अनुष्ठान। करितों कीर्तन विठ्ठलाचें।।तु.गा.क्षे.१७९.०३ ।।
ब्रह्मज्ञान ध्यान न कळे धारणा। एका नारायणा वांचूनियां।।तु.गा.क्षे.१७९.०४ ।।
तुका म्हणे माझा विठोबासी भार। जाणे हा विचार तोचि माझा।।तु.गा.क्षे.१७९.०५ ।।
संतापायीं विन्मुख जाला। तो जरि संगति मागों आला।।तु.गा.क्षे.१८०.०१ ।।
तरी त्याहुनि दुरी जावें। सुखें एकांतीं बैसावें।।तु.गा.क्षे.१८०.०२ ।।
आत्मचर्चा नाहीं जेथें। आगी लावुनि द्यावी तेथें।।तु.गा.क्षे.१८०.०३ ।।
तुका म्हणे नाहीं। चित्ता समाधान कांहीं।।तु.गा.क्षे.१८०.०४ ।।
संकल्पिला तुज सकळही भाव। कोण एक ठाव उरला तेथें।।तु.गा.क्षे.१८१.०१ ।।
इंद्रियव्यापार जें जें कांहीं कर्म। करितों ते धर्म सकळ तुझे।।तु.गा.क्षे.१८१.०२ ।।
माझें हित फार लागला विचार। तुज सर्व भार चालवणें।।तु.गा.क्षे.१८१.०३ ।।
जो कांहीं लौकिक करिसी तो तुझा। अपमान पूजा कांहीं तरी।।तु.गा.क्षे.१८१.०४ ।।
तुका म्हणे मी तों राहिलों निश्चिंत। तुज कळे हित तैसें करी।।तु.गा.क्षे.१८१.०५ ।।
हात पाय मिळोनि मेळा। चला म्हणती पाहों डोळां।।तु.गा.क्षे.१८२.०१ ।।

देखणी नव्हे देखती कैसे। सकळांचा देखणा डोळाचि असे।।तु.गा.क्षे.१८२.०२।।
डोळ्याचा डोळा पाहों गेला। तुका म्हणे तो पाहों ठेला।।तु.गा.क्षे.१८२.०३।।
सोइरे धाइरे दिल्या घेतल्याचे। अंत हे काळींचें नाहीं कोणी।।तु.गा.क्षे.१८३.०१।।
सख्या गोत्रबहिणी सुखाचे सांगाती। मोकलुनी देती अंतकाळीं।।तु.गा.क्षे.१८३.०२।।
आपुलें शरीर आपणा पारिखें। परावीं होतील नवल काई।।तु.गा.क्षे.१८३.०३।।
तुका म्हणे आतां सोड यांची आस। धरीं रे या कास पांडुरंगा।।तु.गा.क्षे.१८३.०४।।
भाव धरिला चरणीं म्हणवितों दास। अहर्निशीं ध्यास करितसें।।तु.गा.क्षे.१८४.०१।।
करितसे ध्यास हृदयीं सकळ। भाव तो सबळ धरियेला।।तु.गा.क्षे.१८४.०२।।
धरिले निश्चळ न सोडीं ते पाय। तुका म्हणे सोय करीं माझी।।तु.गा.क्षे.१८४.०३।।
भाते भरूनि हरिनामाचे। वीर गर्जती विठ्ठलाचे।।तु.गा.क्षे.१८५.०१।।
अनंत नामाची आरोळी। एक एकाहूनि बळी।।तु.गा.क्षे.१८५.०२।।
नाहीं आणिकांचा गुमान। ज्याचें अंकित त्यावांचून।।तु.गा.क्षे.१८५.०३।।
रिद्धिसिद्धि ज्या कामारी। तुका म्हणे ज्याचें घरीं।।तु.गा.क्षे.१८५.०४।।
बा रे कृष्णा तुझें मुख कीं कोमळ। कैसें येवढे ज्वाळ ग्रासियेले।।तु.गा.क्षे.१८६.०१।।
बा रे कृष्णा तुझी जिव्हा कीं कोंवळी। होईल पोळली नारायणा।।तु.गा.क्षे.१८६.०२।।
बैसें कृष्णा तुझें पाहूं मुखकमळ। असेल पोळलें कोणे ठायीं।।तु.गा.क्षे.१८६.०३।।
धोंगडिया खालीं घालूनियां तळीं। वरी वनमाळी बैसविती।।तु.गा.क्षे.१८६.०४।।
तुका म्हणे भावें आकळिला देव। कृपासिंधु राव त्रैलोक्याचा।।तु.गा.क्षे.१८६.०५।।
बारा वर्षें बाळपण। तेंही वेंचलें अज्ञानें।।तु.गा.क्षे.१८७.०१।।
ऐसा जन्म गेला वायां। न भजतां पंढरीराया।।तु.गा.क्षे.१८७.०२।।
बाकी उरलीं अठ्यायशी। तीस वेंचिलीं कामासी।।तु.गा.क्षे.१८७.०३।।
बाकी उरलीं अठ्ठावन्न। तीस वेंचलीं ममतेनें।।तु.गा.क्षे.१८७.०४।।
बाकी उरलीं आठ्ठावीस। देहगेह विसरलास।।तु.गा.क्षे.१८७.०५।।

तुका म्हणे ऐसा झाडा। संसार हा आहे थोडा।।तु.गा.क्षे.१८७.०६।।
नीट पाट करूनी थाट दावीतसे तोरा। आपणाकडे पाहों कोणी निघाली बाजारा।।तु.गा.क्षे.१८८.०१।।
ते सौरी नव्हे निकी भक्तीविण फिकी।।तु.गा.क्षे.१८८.०२।।
चांग भांग करूनी सोंग दावी माळा मुदी। रूकयाची आस धरूनी हालवी ती फूदी।।तु.गा.क्षे.१८८.०३।।
थोरे घरीं करी फेरी तेथें नाचे बरी। जेथें निघे रुका तेथें हालवी टिरी।।तु.गा.क्षे.१८८.०४।।
आंत मांग बाहेर चांग सौरी ती नव्हे तेग। तुका दास नटतसे न करी त्याचा संग।।तु.गा.क्षे.१८८.०५।।
निंदक तो परउपकारी। काय वर्णू त्याची थोरी। तो रजकाहुनि भला। परि सर्व गुणें आगळा।।तु.गा.क्षे.१८९.०१।।
नेघे मोल धुतो फुका। पाप वरच्यावरीं देखा। करीतसे साधका। शुद्ध सरते तिहीं लोकीं।।तु.गा.क्षे.१८९.०२।।
मुख संवदणी सांगातें। अवघें सांठविलें तेथें। जिव्हा साबण निरुतें। दोष काढी जन्माचे।।तु.गा.क्षे.१८९.०३।।
तया ठाव यमपुरीं। वास करणें अघोरीं। त्यासी दंडण करी। तुका म्हणे न्हाणी ते।।तु.गा.क्षे.१८९.०४।।
निजसेजेची अंतुरी। पादलिया कोण मारी।।तु.गा.क्षे.१९०.०१।।
तैसा आम्हासी उबगतां। तुका विनवितो संतां।।तु.गा.क्षे.१९०.०२।।
मूल मांडिवरी हागलें । ते बा कोणें रे त्यागिलें।।तु.गा.क्षे.१९०.०३।।
दासी कामासी चुकली। ते बा कोणें रे विकली।।तु.गा.क्षे.१९०.०४।।
पांडुरंगाचा तुका पापी । संतसाह्यें काळासी दापी।।तु.गा.क्षे.१९०.०५।।
मन उतावीळ। झालें न राहें निश्चळ।।तु.गा.क्षे.१९१.०१।।
दे रे भेटी पंढरीराया। उभारोनि चारी बाह्या ।।तु.गा.क्षे.१९१.०२।।
सर्वांग तळमळी। हात पाय रोमावळी।।तु.गा.क्षे.१९१.०३।।
तुकया बंधु म्हणे कान्हा। भूक लागली नयना।।तु.गा.क्षे.१९१.०४।।
मणि पडिला दाढेसी मकरतोंडी। सुखें हस्तेंचि काढवेल प्रौढी।।तु.गा.क्षे.१९२.०१।।
परी मूर्खाचें चित्त बोधवेना। दुधें कूर्मीच्या पाळवेल सेना।।तु.गा.क्षे.१९२.०२।।
सकळ पृथ्वी हिंडतां कदाचित। ससीसिंगाची प्राप्ति होय तेथें।।तु.गा.क्षे.१९२.०३।।
अतिप्रयत्नें गाळितां वाळुवेतें। दिव्य तेलाचि प्राप्ति होय तेथें।।तु.गा.क्षे.१९२.०४।।

अति क्रोधें खवळला फणी पाही । धरूं येतो मस्तकीं पुष्पप्रायीं ।।तु.गा.क्षे.१९२.०५ ।।
पाहा ब्रह्मानंदेंचि एकीं हेळा। महापातकी तो तुका मुक्त केला ।।तु.गा.क्षे.१९२.०६ ।।
उपजोनी मरो किती वेळोवेळां। कोणा कळवळा येत माझा ।।तु.गा.क्षे.१९३.०१ ।।
म्हणवुनी धांवा करी काकुलती। यावें बा श्रीपती सोडावया ।।तु.गा.क्षे.१९३.०२ ।।
बहुत या काळें केलों भयाभीत। येतो गिवसीत पाठीलागीं ।।तु.गा.क्षे.१९३.०३ ।।
तुका म्हणे तुम्ही दावितां स्वरूप। माझें कांहीं पाप निरसतें ।।तु.गा.क्षे.१९३.०४ ।।
अज्ञान हा देह स्वरूपीं मिनला। सर्व वोसावला देहपात ।।तु.गा.क्षे.१९४.०१ ।।
ज्ञानस्वरूपाची सांगड मिळाली। अंतरीं पाहिली ज्ञानज्योति ।।तु.गा.क्षे.१९४.०२ ।।
तुका म्हणे चित्त स्वरूपीं राहिलें। देह विसावलें तुझ्या पायीं ।।तु.गा.क्षे.१९४.०३ ।।
अवतारनामभेद गणा आदि अगाध। यासी पार नाहीं पुढें खुंटला वाद। एकचि दंत शोभे मुख विक्राळ दोंद। ब्रह्मांडामाजी दावी अनंत हे छंद ।।तु.गा.क्षे.१९५.०१ ।।
जयजया गणपति ओवाळीन आरती। साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ।।तु.गा.क्षे.१९५.०२ ।।
हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका। भोंवरी फेर देतां असुर मर्दिले एका। घातले तोडरीं हो भक्तजनपालका। सहस्त्र नाम तुज भक्तिमुक्तिदायका ।।तु.गा.क्षे.१९५.०३ ।।
सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें। उपमा काय देऊं असे आणिक दुजें। रविशशितारांगणें जयामाजीं सहजें। उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ।।तु.गा.क्षे.१९५.०४ ।।
वर्णितां शेष लीला तया भागलीं मुखें। पांगुळले वेद चारी कैसे राहिले मुके। अवतार जन्मला हो लिंगनामीं या मुखें। अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ।।तु.गा.क्षे.१९५.०५ ।।
विश्व हें रूप तुझें हस्तपाद मुखडें। ऐसाचि भाव देई तया नाचतां पुढें। धूप पंचारति ओंवाळिन निवाडें। राखें या शरणांगता तुका खेळतां लाडें ।।तु.गा.क्षे.१९५.०६ ।।
अरे कृष्णा तुवां काळिया नाथिला। दाढे रगडिला रिठासूर ।।तु.गा.क्षे.१९६.०१ ।।
अरे कृष्णा तुवां पुतना शोषिली। दुर्बुद्धि कळली अंतरींची ।।तु.गा.क्षे.१९६.०२ ।।
गोपाळ करुणा ऐसी नानापरी। भाकिती श्रीहरि तुज पुढें ।।तु.गा.क्षे.१९६.०३ ।।

तुझें नाम कामधेनु करुणेची। तुका म्हणे त्यांची आली कृपा।।तु.गा.क्षे.१९६.०४।।
आम्ही रामाचे राऊत। वीर झुंजार बहुत।।तु.गा.क्षे.१९७.०१।।
मनपवन तुरंग। हातीं नामाची फिरंग।।तु.गा.क्षे.१९७.०२।।
वारू चालवूं चहुंखुरीं। घाला घालूं यमपुरीं।।तु.गा.क्षे.१९७.०३।।
तुका म्हणे पेणें। आम्हां वैकुंठासी जाणें।।तु.गा.क्षे.१९७.०४।।
आम्ही भाग्याचे भाग्याचे । आम्हां तांबे भोपळ्याचे।।तु.गा.क्षे.१९८.०१।।
लोकां घरीं गाई म्हैसी। आम्हां घरीं उंदिरघुसी।।तु.गा.क्षे.१९८.०२।।
लोकां घरीं तांबे थाळे । आम्हां घरीं परळ काळें।।तु.गा.क्षे.१९८.०३।।
लोकां घरीं हत्ती घोडे। आम्हां आधोडीचे जोडे।।तु.गा.क्षे.१९८.०४।।
तुका म्हणे आम्ही सुडके। आम्हां देखोनि काळ धाके।।तु.गा.क्षे.१९८.०५।।
आम्ही जातो आपुल्या गांवा। आमचा रामराम घ्यावा ।।तु.गा.क्षे.१९९.०१।।
तुमची आमची हेचि भेटी । येथुनिया जन्मतुटी ।।तु.गा.क्षे.१९९.०२।।
आतां असों द्यावी दया। तुमच्या लागतसें पायां।।तु.गा.क्षे.१९९.०३।।
येतां निजधामीं कोणी। विठ्ठल विठ्ठल बोला वाणी।।तु.गा.क्षे.१९९.०४।।
रामकृष्ण मुखीं बोला। तुका जातो वैकुंठाला।।तु.गा.क्षे.१९९.०५।।
अरे कृष्णा आम्ही तुझे निजगडी । नवनीत आवडी देत होतों ।।तु.गा.क्षे.२००.०१।।
अरे कृष्णा आतां राखें कैसें तरी। संकटां भीतरीं पडियेलों।।तु.गा.क्षे.२००.०२।।
वरूषला इंद्र जेव्हां शिळाधारीं। गोवर्धन गिरी उचलिला।।तु.गा.क्षे.२००.०३।।
तुका म्हणे तुझे पवाडे गोपाळ। वर्णिती सकळ नारायणा।।तु.गा.क्षे.२००.०४।।
अर्थेविण पाठांतर कासया करावें। व्यर्थचि मरावें घोकुनियां।।तु.गा.क्षे.२०१.०१।।
घोकुनियां काय वेगीं अर्थ पाहे। अर्थरूप राहे होऊनियां।।तु.गा.क्षे.२०१.०२।।
तुका म्हणे ज्याला अर्थीं आहे भेटी। नाहीं तरी गोष्टी बोलों नका।।तु.गा.क्षे.२०१.०३।।
एक वेळे तरी जाईन माहेरा। बहुजन्म फेरा झाल्यावरी।।तु.गा.क्षे.२०२.०१।।

चित्ता हे बैसली अविट आवडी। पालट ती घडी नेघे एकी ।।तु.गा.क्षे.२०२.०२ ।।
करावें तें करी कारण शरीर। अंतरीं त्या धीर जीवनाचा ।।तु.गा.क्षे.२०२.०३ ।।
तुका म्हणे तरी होईल विलंब। परी माझा लाभ खरा झाला ।।तु.गा.क्षे.२०२.०४ ।।
एक म्हणती मुख वासी नारायणा। पाहों दे वदना डोळेभरी ।।तु.गा.क्षे.२०३.०१ ।।
वांसूनिया मुख पाहाती सकळ। अवघे गोपाळ व्योमाकार ।।तु.गा.क्षे.२०३.०२ ।।
म्हणती गोपाळ बेटे हो हा देव। स्वरूपाचा ठाव न कळे याच्या ।।तु.गा.क्षे.२०३.०३ ।।
तुका म्हणे अवघे विठोबा भोंवते। मिळाले नेणते लहानथोर ।।तु.गा.क्षे.२०३.०४ ।।
एक म्हणती कृष्णा वासिलें त्वां मुख । तेव्हां थोर धाक पडिला आम्हां ।।तु.गा.क्षे.२०४.०१ ।।
गिळों लागलासी अग्नीचे कल्लोळ। आम्ही चळचळां कापतसों ।।तु.गा.क्षे.२०४.०२ ।।
ज्वाळांबरोबरी गिळशील आम्हां। ऐसें मेघश्यामा भय वाटे ।।तु.गा.क्षे.२०४.०३ ।।
तुका म्हणे ऐसें भाग्याचे गोपाळ। फुटकें कपाळ आमुचेंचि ।।तु.गा.क्षे.२०४.०४ ।।
उमा रमा एक सरी। वाराणसी ते पंढरी ।।तु.गा.क्षे.२०५.०१ ।।
दोघे सारिखे सारिखे। विश्वनाथ विठ्ठल सखे ।।तु.गा.क्षे.२०५.०२ ।।
तेथें असे भागीरथी। येथें जाणा भीमरथी ।।तु.गा.क्षे.२०५.०३ ।।
वाराणसी त्रिशुलावरी। सुदर्शनावरी पंढरी ।।तु.गा.क्षे.२०५.०४ ।।
मनकर्णिका मनोहर। चंद्रभागा सरोवर ।।तु.गा.क्षे.२०५.०५ ।।
वाराणसी भैरवकाळ। पुंडलीक क्षेत्रपाळ ।।तु.गा.क्षे.२०५.०६ ।।
धुंडिराज दंडपाणी। उभा गरुड कर जोडुनि ।।तु.गा.क्षे.२०५.०७ ।।
गया तेचि गोपाळपूर। प्रयाग निरानिरसिंगपूर ।।तु.गा.क्षे.२०५.०८ ।।
तेथें असती गयावळ। येथें गाई आणि गोपाळ ।।तु.गा.क्षे.२०५.०९ ।।
शमीपत्र पिंड देती । येथें काला निजसुखप्राप्ती ।।तु.गा.क्षे.२०५.१० ।।
संतसज्जनीं केला काला। तुका प्रसाद लाधला ।।तु.गा.क्षे.२०५.११ ।।
कळे परि न सुटे गांठीं। जालें पोटीं कुपथ्य ।।तु.गा.क्षे.२०६.०१ ।।

अहंकाराचें आंदणे जीव । राहे कींव केली ते ।।तु.गा.क्षे.२०६.०२ ।।
हेंकडाची एकीच वोढी। तेही खोडी सांगती ।।तु.गा.क्षे.२०६.०३ ।।
तुका म्हणे सांगों किती । कांहीं चित्तीं न राहे ।।तु.गा.क्षे.२०६.०४ ।।
कलियुगामाजी थोर झालें बंड। नष्ट लोक लंड झाले फार ।।तु.गा.क्षे.२०७.०१ ।।
न धरिती सोय न पुसती कोणां। येतें जैसें मना तैसें चाले ।।तु.गा.क्षे.२०७.०२ ।।
सज्जनाचा वारा टेकों नेंदीं द्वारा। ऐेसिया पामरा तारी कोण ।।तु.गा.क्षे.२०७.०३ ।।
विश्वास तयाचा बैसेना कोठेंही। स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ।।तु.गा.क्षे.२०७.०४ ।।
तुका म्हणे कैसें केलें नारायणें। जाणावें हें कोणें तयाविण ।।तु.गा.क्षे.२०७.०५ ।।
ओवाळूं आरती पंढरीराया। सर्व भावें शरण आलों तुझिया पायां ।।तु.गा.क्षे.२०८.०१ ।।
सर्व व्यापून कैसें रूप आकळ। तो हा गौळयाघरीं झाला कृष्ण बाळ ।।तु.गा.क्षे.२०८.०२ ।।
स्वरूप गुणातीत झाला अवतारधारी। तो हा पांडुरंग उभा विटेवरी ।।तु.गा.क्षे.२०८.०३ ।।
भक्तीचिया काजा कैसा रूपासी आला। ब्रीदाचा तोडर चरणीं मिरविला ।।तु.गा.क्षे.२०८.०४ ।।
आरतें आरती कैसी ओंवाळिली। वाखाणितां कीर्ति वाचा परतली ।।तु.गा.क्षे.२०८.०५ ।।
भावभक्तीबळें होसी कृपाळू देवा। तुका म्हणे पांडुरंगा तुझ्या न कळती मावा ।।तु.गा.क्षे.२०८.०६ ।।
हांका मारी ज्याच्या नांवें। त्याचें गांवचि नाहीं ठावें ।।तु.गा.क्षे.२०९.०१ ।।
काय गातों हें कळेना। राग आळवितों नाना ।।तु.गा.क्षे.२०९.०२ ।।
आशा करूनियां मनीं। कांहीं देईल म्हणउनी ।।तु.गा.क्षे.२०९.०३ ।।
वितीभरी पोटासाठीं। तुका म्हणे पडिली तुटी ।।तु.गा.क्षे.२०९.०४ ।।
जेणे तुझी कास भावें धरियेली। त्याची नाहीं केली सांडी देवा ।।तु.गा.क्षे.२१०.०१ ।।
काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुम्ही डोळे झांका देवा ।।तु.गा.क्षे.२१०.०२ ।।
राव रंक तुम्हां सारिखेचि जाणा। नाहीं थोर साना तुम्हापाशीं ।।तु.गा.क्षे.२१०.०३ ।।
तुका म्हणे तुम्हीं अपंगिलें भक्तां। माझिया संचिता कृपा नये ।।तु.गा.क्षे.२१०.०४ ।।
जो का निर्गुण निराकार । तेणें धरियेले अवतार ।।तु.गा.क्षे.२११.०१ ।।

निर्गुण होता तो सगुणासी आला। भक्तीसाठीं प्रगटला ।।तु.गा.क्षे.२११.०२।।
जो का त्रिभुवनचाळक। तो हा नंदाचा बाळक ।।तु.गा.क्षे.२११.०३।।
सोडविलें वसुदेव देवकीसी। अवतार धरिला तिचे कुशीं ।।तु.गा.क्षे.२११.०४।।
मारियेला कंसराणा। राज्यीं स्थापिलें उग्रसेना ।।तु.गा.क्षे.२११.०५।।
तुका म्हणे देवाधिदेव। तो हा उभा पंढरिराव ।।तु.गा.क्षे.२११.०६।।
ज्यासी विषयाचें ध्यान। त्यासी कैंचा नारायण ।।तु.गा.क्षे.२१२.०१।।
साधु कैंचा पापीयासी। काय चांडाळासी काशी ।।तु.गा.क्षे.२१२.०२।।
काय पतितासी पिता। काय अधमासी गीता ।।तु.गा.क्षे.२१२.०३।।
तुका म्हणे निरंजनीं । शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ।।तु.गा.क्षे.२१२.०४।।
भावभक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ।।तु.गा.क्षे.२१३.०१।।
अन्न पाणी धन द्रव्य नारायण। विठ्ठलावांचून बोलूं नये ।।तु.गा.क्षे.२१३.०२।।
सप्रेम करावें देवाचें कीर्तन। भय द्या सोडून शरीराचें ।।तु.गा.क्षे.२१३.०३।।
तरी मग जोडे विठ्ठल निधान। केलिया कीर्तन सिद्धि पावे ।।तु.गा.क्षे.२१३.०४।।
देव जोडीलिया तया काय उणें। तुका म्हणे मन नीट करा ।।तु.गा.क्षे.२१३.०५।।
बाईल चालिली माहेरा। संगें दिधला म्हातारा ।।तु.गा.क्षे.२१४.०१।।
सिधा सामग्री पोटाची। सवें स्वारी बइलाची ।।तु.गा.क्षे.२१४.०२।।
जातां पाडिली ढोरानें। सिव्या देती अन्योविन्ये ।।तु.गा.क्षे.२१४.०३।।
न सांवरी आपणातें। नग्न सावलें वरतें ।।तु.गा.क्षे.२१४.०४।।
फजित केलें जन लोकीं। मेला म्हणे पडे नरकीं ।।तु.गा.क्षे.२१४.०५।।
गोहाची हे गेली लाज। गांजितां कां तुम्हीं मज ।।तु.गा.क्षे.२१४.०६।।
तुका म्हणे जनीं। छी थूं केली विटंबणी ।।तु.गा.क्षे.२१४.०७।।
बळी म्हणे आजी दुर्वासया स्वामी। मागों नका तुम्ही नारायणा ।।तु.गा.क्षे.२१५.०१।।
बहुतां प्रयासीं जोडला श्रीहरी। बैसविला द्वारीं राखावया ।।तु.गा.क्षे.२१५.०२।।

पातला दुर्वास मग हो तेथूनी। चिंतातुर मनीं उद्वेगला ।।तु.गा.क्षे.२१५.०३ ।।
काय तूं एकाचा आहेसी अंकित। होईल कृपावंत तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.२१५.०४ ।।
बा रे पांडुरंगा केव्हां येशी भेटी। जाहालों हिंपुटी तुजवीण ।।तु.गा.क्षे.२१६.०१ ।।
तुजवीण सखे न वाटे मज कोणी। वाटतें चरणीं घालूं मिठी ।।तु.गा.क्षे.२१६.०२ ।।
ओंवाळावी काया चरणांवरोनी। केव्हां चक्रपाणी भेटशील ।।तु.गा.क्षे.२१६.०३ ।।
तुका म्हणे माझी पुरवीं आवडी। वेगीं घालीं उडी नारायणा ।।तु.गा.क्षे.२१६.०४ ।।
भाग्यासाठीं गुरू केला। नाहीं आम्हांसी फळला ।।तु.गा.क्षे.२१७.०१ ।।
याचा मंत्र पडतां कानीं। आमुच्या पेवांत गेलें पाणी ।।तु.गा.क्षे.२१७.०२ ।।
गुरू केला घरवासी। आमुच्या चुकल्या गाईम्हशी ।।तु.गा.क्षे.२१७.०३ ।।
स्वामी आपुली बुटबुट घ्यावी। आमुची प्रताप टाकुन द्यावी ।।तु.गा.क्षे.२१७.०४ ।।
तुका म्हणे ऐसे नष्ट। त्यांसी दुणे होती कष्ट ।।तु.गा.क्षे.२१७.०५ ।।
स्वामीच्या सामर्थ्यें। चाले बोलिला पुरुषार्थ ।।तु.गा.क्षे.२१८.०१ ।।
पाठी देवाचें हें बळ। मग लाभे हातीं काळ ।।तु.गा.क्षे.२१८.०२ ।।
देव ज्यासी साह्य। तेणें केलें सर्व होय ।।तु.गा.क्षे.२१८.०३ ।।
तुका म्हणे स्वामीसत्ता। मग नाहीं भय चिंता ।।तु.गा.क्षे.२१८.०४ ।।
स्वप्नींच्या व्यवहारा कळांतर लेखा। जागृतीसी रूका गांठीं नाहीं ।।तु.गा.क्षे.२१९.०१ ।।
तेवीं शब्दज्ञानें करिती चावटी। ज्ञान पोटासाठीं विकूं नये ।।तु.गा.क्षे.२१९.०२ ।।
बोलाचीच कढी बोलाचाचि भात। जेवुनियां तृप्त कोण झाला ।।तु.गा.क्षे.२१९.०३ ।।
कागदीं लिहिली नांवाची साखर। चाटितां मधुर केवीं लागे ।।तु.गा.क्षे.२१९.०४ ।।
तुका म्हणे जळो जळो त्याचें ज्ञान। यमपुरीं कोण दंड साहे ।।तु.गा.क्षे.२१९.०५ ।।
संवदड आपटा रानचारा। हा तो दसऱ्याचा तुरा ।।तु.गा.क्षे.२२०.०१ ।।
एरवीं यासी पुसे कोण। एका देवासाठीं मान ।।तु.गा.क्षे.२२०.०२ ।।
मातीची ते घागरी। पाण्यासाठीं बैसे शिरीं ।।तु.गा.क्षे.२२०.०३ ।।

तुका म्हणे माय जाण । धान्यासाठीं घेणें देणें ।।तु.गा.क्षे.२२०.०४।।
संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं। सांगितलें सिद्धी नव जाय।।तु.गा.क्षे.२२१.०१।।
ज्याचा जैसा ठेवा तो त्यापाशीं धांवे। न लगती करावें उपदेश।।तु.गा.क्षे.२२१.०२।।
घेऊन उठती आपुलाले गुण। भविष्याप्रमाणें तुका म्हणे।।तु.गा.क्षे.२२१.०३।।
सोडियेल्या गाई नवलक्ष गोपाळीं। सवें वनमाळी चालियेला।।तु.गा.क्षे.२२२.०१।।
सुदिन सुवेळीं भाग्याच्या उदयीं। चरावया गाई वनामाजी।।तु.गा.क्षे.२२२.०२।।
गाई गोपाळांच्या संगें चाले हरि । क्रिडा नानापरि खेळताती ।।तु.गा.क्षे.२२२.०३।।
काठी कांबळीया मोहरिया पोंवा। सिदोरी गांजिवा खांद्यावरी।।तु.गा.क्षे.२२२.०४।।
गोधनें संवगडे खेळे नानापरि। आले भीमातीरीं वेणूनादा।।तु.गा.क्षे.२२२.०५।।
तेथें उभा ठेला गोपाळांसहित। सिदोरियां सोडीत बैसे तेथें।।तु.गा.क्षे.२२२.०६।।
तुका म्हणे ज्यांनी आणिल्या भाकरी। नेऊनियां हरी पुढें देती।।तु.गा.क्षे.२२२.०७।।
बरें झालीयाचे अवघे सांगाती। वाइटाचें अंतीं कोणी नाहीं।।तु.गा.क्षे.२२३.०१।।
नोहे मातापिता नोहे कांता सुत। इतरांचे मात काय सांगों।।तु.गा.क्षे.२२३.०२।।
तुका म्हणे जन दूतोंडी सावज। सांपडे सहज तिकडे धरी।।तु.गा.क्षे.२२३.०३।।
ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म। गवसे परब्रह्म नामें एका।।तु.गा.क्षे.२२४.०१।।
लहानथोरांसी करितों प्रार्थना। दृढ नारायणा मनीं धरा।।तु.गा.क्षे.२२४.०२।।
सर्वांप्रति माझी हेचि असे विनंती। आठवा श्रीपती मनामाजी।।तु.गा.क्षे.२२४.०३।।
केशव नारायण करितां आचमन। तेचि संध्या स्नान कर्म क्रिया।।तु.गा.क्षे.२२४.०४।।
नामें करा नित्य भजन भोजन। ब्रह्मकर्मे ध्यान याचे पायीं।।तु.गा.क्षे.२२४.०५।।
तुका म्हणे हेंचि निर्वाणींचें शस्त्र। म्हणोनि सर्वत्र स्मरा वेगीं।।तु.गा.क्षे.२२४.०६।।
बहुजन्मां शेवटीं स्वामी तुझी भेटी। बहु मोह पोटीं थोर झाला।।तु.गा.क्षे.२२५.०१।।
बहुपुरें पाहिलीं बहु दिशा शोधिली। बहु चिंता वाहिली दुर्भराची।।तु.गा.क्षे.२२५.०२।।
बहु काळ गेले अनुचित केलें। बहु नाहीं गाइलें नाम तुझें।।तु.गा.क्षे.२२५.०३।।

ऐसा मी अपराधी अगा कृपानिधि। बहू संतां संनिधि ठेवीं तुका।।तु.गा.क्षे.२२५.०४।।
ज्यां जैसी आवडी त्यां तैसा विभाग। देत पांडुरंग तृप्ति झाली।।तु.गा.क्षे.२२६.०१ ।।
मुखींचें उच्छिष्ट हिरोनियां खातां। विस्मित विधाता देखोनियां।।तु.गा.क्षे.२२६.०२।।
दिलें जें गोपाळां तें नाहीं कोणासी। विस्मित मानसीं सुरवर।।तु.गा.क्षे.२२६.०३।।
देव ऋषि मुनि सिद्ध हे चारण। शिव मरुद्गण चंद्र सूर्य।।तु.गा.क्षे.२२६.०४।।
तुका म्हणे आले सकळही सुरवर । आनंदें निर्भर पाहावया।।तु.गा.क्षे.२२६.०५।।
सदगुरूनें मज आशीर्वाद दिला । हरुष भरला हृदयीं माझे ।।तु.गा.क्षे.२२७.०१।।
हृदयींचा भाव कळला गुरूसी । आनंद उल्हासीं बोले मज ।।तु.गा.क्षे.२२७.०२।।
बोले मज कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं आनंदलों ।।तु.गा.क्षे.२२७.०३।।
सद्गुरूवांचूनि प्रेतरूप वाणी। बोलती पुराणीं व्यास ऋषि।।तु.गा.क्षे.२२८.०१।।
म्हणोनि तयाचें पाहूं नये तोंड। निगुरा अखंड सुतकाळा।।तु.गा.क्षे.२२८.०२।।
कोणे परी तया नव्हेचि सुटका। देह त्याचा लटिका जाणा तुम्ही।।तु.गा.क्षे.२२८.०३।।
तुका म्हणे ऐसी बोलती पुराणें। संतांचीं वचनें मागिलां हो।।तु.गा.क्षे.२२८.०४।।
समश्रुळित असतां वाचा। घोष न करिसी कां नामाचा।।तु.गा.क्षे.२२९.०१ ।।
कां रे वैष्णव नव्हेसी। कवण्या दंभें नागवलासी।।तु.गा.क्षे.२२९.०२।।
हरि हरि म्हणतां लाजसी। गर्वें फुगोनि चालसी।।तु.गा.क्षे.२२९.०३।।
तारुण्यें उताणा। पुंसेविण बांडा सुना।।तु.गा.क्षे.२२९.०४।।
जालेंसि महिमेचे वेडें। नाचों लाजसी दिंडीपुढें।।तु.गा.क्षे.२२९.०५।।
अळंकारांच्यानि बळें। वंचलासी तुळसीमाळें।।तु.गा.क्षे.२२९.०६।।
स्नान न करिसी आंघोळी। विभूति न लाविसी कपाळीं।।तु.गा.क्षे.२२९.०७।।
कैसा सकुमार जालासी। म्हणसी नटके एकादशी।।तु.गा.क्षे.२२९.०८।।
वरिवरि न्याहाळिसी त्वचा। उपयोग नाहीं मांसाचा।।तु.गा.क्षे.२२९.०९।।
पद्मनाभी विश्वनाथ। तुका अझून रडत।।तु.गा.क्षे.२२९.१०।।

सरे आम्हांपाशीं एक शुद्धभाव। नाहीं तरी वाव उपवार।।तु.गा.क्षे.२३०.०१।।
कोण मानी वरी  रसाळ बोलणें। नाहीं झाली मनें ओळखी तों।।तु.गा.क्षे.२३०.०२।।
तुका म्हणे आम्हां जाणिवेचें दु:ख। न पाहों त्या मुख दुर्जनाचें।।तु.गा.क्षे.२३०.०३।।
सांवळें सुंदर पाहें दृष्टीभरी। ऐसें काहीं करीं मना माझें।।तु.गा.क्षे.२३१.०१।।
मना तुज ठाव दिला त्याचे पायीं। राहे विठाबाईसवें सदा।।तु.गा.क्षे.२३१.०२।।
मना नको धरूं आणिकांचा संग। नाहीं पांडुरंग जयामनीं।।तु.गा.क्षे.२३१.०३।।
वरपंग भाव नको म्हणे तुका। करीं प्राणसखा नारायण।।तु.गा.क्षे.२३१.०४।।
सेकीं हें ना तैसें झालें। बोलणें तितुकें वायां गेलें।।तु.गा.क्षे.२३२.०१।।
स्वयें आपणचि रिता। रडे पुढिलांच्या हिता।।तु.गा.क्षे.२३२.०२।।
सुखसागरीं नेघे वस्ती। अंगीं ज्ञानपणाची मस्ती।।तु.गा.क्षे.२३२.०३।।
तुका म्हणे गाढव लेखा। जेथें भेटेल तेथें ठोका।।तु.गा.क्षे.२३२.०४।।
गव्हांच्या घुगऱ्या। नाचण्यांच्या पुऱ्या। बऱ्या त्याची बऱ्या। पाधाणी त्या पाधाणी।।तु.गा.क्षे.२३३.०१।।
काय थोरपण। वायां जाळावा तो शीण। कारणापें भिन्न। निवडे तें निराळें।।तु.गा.क्षे.२३३.०२।।
रूचि वोजेपाशीं। गरज ते जैशी तैशी। करूं नका नाशी। खावें खाणें झालें तें।।तु.गा.क्षे.२३३.०३।।
तुका म्हणे मोठा। काय करावा तो ताठा। नाहीं वीण नीटा । पाविजेत मारग।।तु.गा.क्षे.२३३.०४।।
गणेश शारदा करिती गायना। आणि देवांगना रंभेऐशा।।तु.गा.क्षे.२३४.०१।।
तेथें मानवांही विनवावें तें काय। सुरवर पाय वंदिती जेथें।।तु.गा.क्षे.२३४.०२।।
ज्याच्या गायनासी तटस्थ शंकर। त्याही परि पार न कळे तुझा।।तु.गा.क्षे.२३४.०३।।
तुका म्हणे आम्ही किंकर ते किती। इंद्राचीहि मति नागविशी।।तु.गा.क्षे.२३४.०४।।
कोण तो उपाव करूं भेटावया। जाळावी हे काया ऐसें वाटे।।तु.गा.क्षे.२३५.०१।।
सोडोनियां गांव जाऊं वनांतरा। रुक्मादेवीवरा पाहावया।।तु.गा.क्षे.२३५.०२।।
करूं उपवास शोधूं हें शरीर। न धरवे धीर नारायणा।।तु.गा.क्षे.२३५.०३।।
जाती आयुष्याचे दिवस हे चारी। मग केव्हां हरी भेटशील।।तु.गा.क्षे.२३५.०४।।

तुका म्हणे कांहीं सांगा विचारोनी। विठो तुझे मनीं असेल तें।।तु.गा.क्षे.२३५.०५।।
सद्गुरूचे चरणीं ठेविला मस्तक। देउनियां हस्तक उठविलें।।तु.गा.क्षे.२३६.०१।।
उठविलें मज देउनियां प्रेम। भावार्थें सप्रेम नमस्कारी।।तु.गा.क्षे.२३६.०२।।
नमस्कारी त्याला सद्गुरुरायाला। तुका म्हणे बोला नाम वाचे।।तु.गा.क्षे.२३६.०३।।
कोरडिया गोष्टी नावडती मना। नाहीं ब्रह्मज्ञानाविण चाड।।तु.गा.क्षे.२३७.०१।।
दाखवी आपुलें सगुण रूपडें। वंदीन मी कोडें पाय तुझे।।तु.गा.क्षे.२३७.०२।।
नलगे तो मोक्ष मज सायुज्यता। नावडे हे वार्ता शून्याकारी।।तु.गा.क्षे.२३७.०३।।
तुका म्हणे चाड धरीन श्रीमुखें। येशील कवतुकें जवळीक।।तु.गा.क्षे.२३७.०४।।
कृपा करावी भगवंतें। ऐसा शिष्य द्यावा मातें।।तु.गा.क्षे.२३८.०१।।
व्हावा माझें व्रत जो चालवी। त्यासी द्यावें त्वां पालवी।।तु.गा.क्षे.२३८.०२।।
व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा। तिहीं लोकीं ज्याचा झेंडा।।तु.गा.क्षे.२३८.०३।।
तुका तुका हाका मारी। माझ्या विठोबाच्या द्वारीं।।तु.गा.क्षे.२३८.०४।।
चाल माझ्या राघो। डोंगरी दिवा लागो।।तु.गा.क्षे.२३९.०१।।
घर केलें दार केलें घरीं नाहीं वरो। सेजारणी पापिणीचीं पांच पोरें मरो।।तु.गा.क्षे.२३९.०२।।
घरीं पांच पोरें तीं मजहुनि आहेत थोरें। पांचांच्या बळें खादली बावन केळें।।तु.गा.क्षे.२३९.०३।।
घर केलें दार केलें दुकान केला मोठा । पाटाची राणी धांगडधिंगा तिचा मोटा ।।तु.गा.क्षे.२३९.०४।।
दुकान केला मोठा तर पदरीं रूका खोटा।।तु.गा.क्षे.२३९.०५।।
हिजडा म्हणसी जोगी तर सोळा सहस्त्र भोगी। तुका म्हणे वेगीं तर हरि म्हणा जगीं।।तु.गा.क्षे.२३९.०६।।
चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती। प्रत्यक्ष हे मूर्ति विठोबाची।।तु.गा.क्षे.२४०.०१।।
चहूं युगांचें हें साधन साधिलें। अनुभवा आलें आपुलिया।।तु.गा.क्षे.२४०.०२।।
एवढें करूनि आपण निराळा। प्रत्यक्ष हें डोळां दाखविलें।।तु.गा.क्षे.२४०.०३।।
दावूनि सकळ प्रमाणांच्या युक्ति। जयजयकार करिती अवघे भक्त।।तु.गा.क्षे.२४०.०४।।
भक्ति नवविधा पावली मूळची। जनार्दन नामाची संख्या झाली।।तु.गा.क्षे.२४०.०५।।

नवसें ओंव्या आदरें वाचितां। त्याच मनोरथा कार्य सिद्धि ।।तु.गा.क्षे.२४०.०६ ।।
सीमा न करवे आणीक ही सुखा। तुका म्हणे देखा पांडुरंग ।।तु.गा.क्षे.२४०.०७ ।।
चला वळूं गाई। दूर अंतरल्या भाई ।।तु.गा.क्षे.२४१.०१ ।।
खेळ खेळतां झाला शीण। कोण करी वणवण ।।तु.गा.क्षे.२४१.०२ ।।
गाई हकारी कान्हया। म्हणोनि लागती ते पायां ।।तु.गा.क्षे.२४१.०३ ।।
तुका म्हणे द्यावें। नामसंकीर्तन बरवें ।।तु.गा.क्षे.२४१.०४ ।।
चला आळंदीला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ।।तु.गा.क्षे.२४२.०१ ।।
होतिल संतांचिया भेटी। सुखाचिया सांगों गोष्टी ।।तु.गा.क्षे.२४२.०२ ।।
ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर। मुखीं म्हणतां चुकती फेर ।।तु.गा.क्षे.२४२.०३ ।।
तुम्हां जन्म नाहीं एक। तुका म्हणे माझी भाक ।।तु.गा.क्षे.२४२.०४ ।।
चालती आड वाटा । आणिका दाविती जे नीटा ।।तु.गा.क्षे.२४३.०१ ।।
न मनीं तयांचें उपकार। नाहीं जोडा तो गव्हार ।।तु.गा.क्षे.२४३.०२ ।।
विष सेवूनि वारी मागें। प्राण जातां जेणें संगें ।।तु.गा.क्षे.२४३.०३ ।।
बुडतां हाक मारी। ठाव नाहीं आणिका वारी ।।तु.गा.क्षे.२४३.०४ ।।
तुका म्हणे न करी हिंका। गुण घेऊन अवगुण टाका ।।तु.गा.क्षे.२४३.०५ ।।
चरणीं नमन सद्गुरूच्या पूर्ण। नित्य हरिगुण गाऊं सदा ।।तु.गा.क्षे.२४४.०१ ।।
गोवर्धन जेणें नखीं हो धरिला। काळ्या नाथिला महाबळी ।।तु.गा.क्षे.२४४.०२ ।।
ऐसे हरिगुण गातो वाचेवरी। पतितासी तारी जनार्दन ।।तु.गा.क्षे.२४४.०३ ।।
तुका म्हणे हेंचि सज्जना जीवन। वाचेसी स्मरण गोविंदाचें ।।तु.गा.क्षे.२४४.०४ ।।
ग्रासोग्रासीं भाव। तरी देहींच जेवी देव ।।तु.गा.क्षे.२४५.०१ ।।
धरीं स्मरण तें सार। नाहीं दुरी तें अंतर ।।तु.गा.क्षे.२४५.०२ ।।
भोगितां तूं भावें। देव जेवूं बैसे सवें ।।तु.गा.क्षे.२४५.०३ ।।
तुज पावो देवा। भावें अंतरींची सेवा ।।तु.गा.क्षे.२४५.०४ ।।

गुंतला साधनीं। देव नाहीं त्रिभुवनीं।।तु.गा.क्षे.२४५.०५।।
तुका म्हणे हातीं। न धरितां गमाविती।।तु.गा.क्षे.२४५.०६।।
गुरुपादाग्रींचें जळ। त्यास मानी जो विटाळ।।तु.गा.क्षे.२४६.०१।।
संतीं वाळिला जो खळ। नरकीं पचे चिरकाळ।।तु.गा.क्षे.२४६.०२।।
गुरुतीर्थीं अनमान। यथा सांग मद्यपान।।तु.गा.क्षे.२४६.०३।।
गुरु अंगुष्टा न चोखी। मुख घाली वेश्ये मुखीं।।तु.गा.क्षे.२४६.०४।।
तुका म्हणे सांगों किती। मुखीं पडो त्याचे माती।।तु.गा.क्षे.२४६.०५।।
गुरुचिया मुखें होइल ब्रह्मज्ञान। न कळे प्रेमखुण विठोबाची।।तु.गा.क्षे.२४७.०१।।
वेदातें विचारा पुराणांतें पुसा। विठोबाचा कैसा प्रेमभाव।।तु.गा.क्षे.२४७.०२।।
तुका म्हणे सांडा जाणीवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत।।तु.गा.क्षे.२४७.०३।।
ज्याचें जैसें भावी मन। त्यासी देणें दरूषण।।तु.गा.क्षे.२४८.०१।।
पुरवूं जाणें मनिंची खूण। समाधान करोनी।।तु.गा.क्षे.२४८.०२।।
आपणियातें प्रगट करी। छाया बरी कृपेंची।।तु.गा.क्षे.२४८.०३।।
तुका म्हणे केलें दान। मन उन्मन हरिनामीं।।तु.गा.क्षे.२४८.०४।।
झालासी पंडित पुराण सांगसी। परी तूं नेणसी मी हें कोण।।तु.गा.क्षे.२४९.०१।।
गाढवभरी पोथ्या उलथिसी पानें। परी गुरुगम्य खुणे नेणसी बापा।।तु.गा.क्षे.२४९.०२।।
तुका कुणबियाचा नेणें शास्त्रमत। एक पंढरिनाथ विसंबेना।।तु.गा.क्षे.२४९.०३।।
जीवशिवाच्या मांडुनि हाला। अहं सोहं दोन्ही भेटती भला।।तु.गा.क्षे.२५०.०१।।
घाली हुतुतू फिरोनी पाही आपणासी। पाहीपळिया तो मागिला तुटी पुढिलासी।।तु.गा.क्षे.२५०.०२।।
खेळिया तो हाल सांभाळी। धूम घाली पडे तो पाताळीं।।तु.गा.क्षे.२५०.०३।।
बळियां गांढ्या तोचि खेळे। दम पुरे तो वेळोवेळां खेळे।।तु.गा.क्षे.२५०.०४।।
हातीं पडे तोचि ढांग। दम पुरे तो खेळिया चांग।।तु.गा.क्षे.२५०.०५।।
मागें पुढें पाहे तो जिंके। हातीं तोचि आधार फिके।।तु.गा.क्षे.२५०.०६।।

आपल्या बळें खेळे रे भाई। गढियाची सांडोनी सोई ।।तु.गा.क्षे.२५०.०७।।
तुका म्हणे मी खेळिया नव्हे। जिकडे पडे त्याची सवें।।तु.गा.क्षे.२५०.०८।।
जाली गाढवी दुधाळ। महिमा गाईची पावेल।।तु.गा.क्षे.२५१.०१।।
श्वान झालेंसें चांगलें। तरी का सांगातें जेवील।।तु.गा.क्षे.२५१.०२।।
झाली सिंदळी चांगली। तरी का पतिव्रता झाली।।तु.गा.क्षे.२५१.०३।।
तुका म्हणे ऐशा जाति। काय उंचपण पावती।।तु.गा.क्षे.२५१.०४।।
जयजय म्हणा राम। हातें टाळी वाचे नाम।।तु.गा.क्षे.२५२.०१।।
आटाआटी नाहीं ज्यास। न वेंचे मोल न पडे खांस।।तु.गा.क्षे.२५२.०२।।
आपण म्हणे आणिकां हातीं। यज्ञादिकीं नये ते गति।।तु.गा.क्षे.२५२.०३।।
आसन भोजन करितां काम। ध्यान समाधि म्हणतां राम।।तु.गा.क्षे.२५२.०४।।
मंत्र जपा हाचि सार। वर्णा याती जयजयकार।।तु.गा.क्षे.२५२.०५।।
म्हणतां राम म्हणे तुका। वेळोवेळां चुकों नका।।तु.गा.क्षे.२५२.०६।।
जन्मा आलिया गेलिया परी भक्ति नाहीं केली। माझें माझें म्हणोनियां गुंतगुंतों मेलीं।।तु.गा.क्षे.२५३.०१।।
येथें कांहीं नाहीं लव गुरूच्या पायीं। चाल रांडे टाकीं रूका नको करूं बोल। गुरुविण मार्ग नाहीं करिसी तें फोल।।तु.गा.क्षे.२५३.०२।।
खाऊनी जेऊनी लेऊनी नेसूनी म्हणती आम्ही बऱ्या। साधु संत घरा आल्या होती पाठमोऱ्या ।।तु.गा.क्षे.२५३.०३।।
वाचोनी पढोनी झाले शाहाणे म्हणती आम्ही संत । परनारी देखोनी त्यांचे चंचल झाले चित्त ।।तु.गा.क्षे.२५३.०४।।
टिळा टोपी घालूनी माळा म्हणती आम्ही साधु। दयाधर्म चित्तीं नाहीं ते जाणावें भोंदु।।तु.गा.क्षे.२५३.०५।।
कलियुगीं घरोघरीं संत झाले फार। वीतिभरी पोटासाठीं हिंडती दारोदार।।तु.गा.क्षे.२५३.०६।।
संत म्हणती केली निंदा निंदा नव्हे भाई। तुका असे अनन्य भावें शरण संतांपायीं।।तु.गा.क्षे.२५३.०७।।
तुझे म्हणों आम्हां। मग उणें पुरुषोत्तमा।।तु.गा.क्षे.२५४.०१।।
ऐसा धर्म काय। अमृतानें मृत्यू होय।।तु.गा.क्षे.२५४.०२।।
कल्पवृक्षां तळीं। गांठीं बांधलिया झोळी।।तु.गा.क्षे.२५४.०३।।
तुका म्हणे परीस। सांपडल्या उपवास।।तु.गा.क्षे.२५४.०४।।

तुझा म्हणविलों दास। केली उच्छिष्टाची आस।।तु.गा.क्षे.२५५.०१।।
मुखीं घालावा कवळ। जरी तूं होशील कृपाळ।।तु.गा.क्षे.२५५.०२।।
सीण भाग माझा पुसे । तुका म्हणे न करीं हांसें।।तु.गा.क्षे.२५५.०३।।
तुजविण तिळभरी रिता ठाव। नाहीं ऐसें विश्व बोलतसे।।तु.गा.क्षे.२५६.०१।।
बोलियेले योगी मुनी साधु संत। आहेसी या आंत सर्वांसाठीं।।तु.गा.क्षे.२५६.०२।।
मी तया विश्वासें आलों शरणांगत। पूर्वींचें अपत्य आहे तुझें।।तु.गा.क्षे.२५६.०३।।
अनंत ब्रह्मांडें भरोनि उरलासी। मजला झालासी कोठें नाहीं।।तु.गा.क्षे.२५६.०४।।
अंतपार नाहीं माझिया रूपासी। काय सेवकासी भेट देऊं।।तु.गा.क्षे.२५६.०५।।
ऐसें विचारिलें म्हणोनी न येशी। सांग हृषीकेशी मायबापा।।तु.गा.क्षे.२५६.०६।।
तुका म्हणे काय करावा उपाय। जेणें तुझे पाय आतुडती।।तु.गा.क्षे.२५६.०७।।
तुजवांचून कोणा शरण। जाऊं आतां कर जोडून।।तु.गा.क्षे.२५७.०१।।
कोण करील माझें साहे। चित्तीं विचारूनी पाहें।।तु.गा.क्षे.२५७.०२।।
तूं तंव कृपेचा सागर। दीनबंधु जगदोद्धार।।तु.गा.क्षे.२५७.०३।।
तुका म्हणे निका। भवसिंधुतारक नौका।।तु.गा.क्षे.२५७.०४।।
तुज मज ऐसी परी। जैसें तरंग सागरीं।।तु.गा.क्षे.२५८.०१।।
दोन्हींमाजी एक जाणा। विठ्ठल पंढरीचा राणा।।तु.गा.क्षे.२५८.०२।।
देव भक्त ऐसी बोली। जंव भ्रांति नाहीं गेली।।तु.गा.क्षे.२५८.०३।।
तंतु पट जेवीं एक। तैसा विश्वेंसीं व्यापक।।तु.गा.क्षे.२५८.०४।।
ठाव देऊनियां राखें पायांपासीं। मी तों आहे राशी पातकांची।।तु.गा.क्षे.२५९.०१।।
पातकांची राशी म्हणतां लागे वेळ। ऐके तो कृपाळ नारायण।।तु.गा.क्षे.२५९.०२।।
नारायण नामें अवघें सांग झालें। असंगचि केलें एकमय।।तु.गा.क्षे.२५९.०३।।
एकमय झालें विठोबाच्या नामें। भेदाभेद कर्मे आणिक कांहीं।।तु.गा.क्षे.२५९.०४।।
तुका म्हणे चित्तीं चिंतिलें जें होतें। तें होय आपैतें नामें याच्या।।तु.गा.क्षे.२५९.०५।।

डोळियांचें दैव आजि उभें ठेलें। निधान देखिलें पंढरीये।।तु.गा.क्षे.२६०.०१।।

काय तें वानावें वाचेचे पालवें। वेदा न बोलवे रूप ज्याचें।।तु.गा.क्षे.२६०.०२।।

आनंदाच्या रसें ओतींव चांगलें। देखतां रंगलें चित्त माझें।।तु.गा.क्षे.२६०.०३।।

तुका म्हणे मी तों सगळाच विरालों। विठ्ठलचि झालों दर्शनानें।।तु.गा.क्षे.२६०.०४।।

डिवेना डसेना बुजेना निर्मळ। परी अमंगळ स्वीकारीना।।तु.गा.क्षे.२६१.०१।।

परंतु गर्दभ अपवित्र जाणा। पर्वकाळीं दाना देऊं नये।।तु.गा.क्षे.२६१.०२।।

डिवी लात्री बुजे बहु नेदी दुध। मुखीं नाहीं शुद्ध विष्ठा खाय।।तु.गा.क्षे.२६१.०३।।

परंतु ते गाय पवित्र हो जाणा। पर्वकाळीं दाना देऊंजेते।।तु.गा.क्षे.२६१.०४।।

ब्राह्मणें ब्राह्मणा सद्‌गुरु करावा। परी न करावा शूद्रादिक।।तु.गा.क्षे.२६१.०५।।

तुका म्हणे देवें सांगितली सोय। म्हणोनि त्याचे पाय धरिलें जीवें।।तु.गा.क्षे.२६१.०६।।

पसरोनि मुखें। कैसे धालों बा हारिखें।।तु.गा.क्षे.२६२.०१।।

ब्रह्मादिकां दुर्लभ वांटा। आम्हां फावला रानटा।।तु.गा.क्षे.२६२.०२।।

गोड लागे काय तरी। कृपावंत झाला हरी।।तु.गा.क्षे.२६२.०३।।

उडती थेंबुटें। अमृताहुनी गोमटे।।तु.गा.क्षे.२६२.०४।।

गोडाहुनी गोड। जिव्हा नाचे वाटे कोड।।तु.गा.क्षे.२६२.०५।।

खुणावुनी तुका। दावी वर्म बोलों नका।।तु.गा.क्षे.२६२.०६।।

पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ।।तु.गा.क्षे.२६३.०१।।

कनकाचे पाही आलंकार केले। कनकत्वा आलें एकपणें।।तु.गा.क्षे.२६३.०२।।

मृतिकेचे घट झाले नानापरी। मृत्तिका अवधारीं एकपणें।।तु.गा.क्षे.२६३.०३।।

तुका म्हणे एक एक ते अनेक। अनेकत्वीं एक एकपणा।।तु.गा.क्षे.२६३.०४।।

पडली घोर रजनी। संगीं कोणी नसेचि।।तु.गा.क्षे.२६४.०१।।

पाहा हो कैसें चालविलें। पिसें गोवलें लावुनी।।तु.गा.क्षे.२६४.०२।।

कोठें लपविलें तें अंग। होता संग दिला तो।।तु.गा.क्षे.२६४.०३।।

मज कधीं नव्हतें ठावें। दोहीं भावें वाटोळें।।तु.गा.क्षे.२६४.०४।।
तुका म्हणे कैंची उरी। दोहोंपरी नाडिलें।।तु.गा.क्षे.२६४.०५।।
नीत सांडोनि अवनीत चाले। भंडउभंड भलतेंचि बोले।।तु.गा.क्षे.२६५.०१।।
त्यांत कोणाचें काय बा गेलें। ज्याचें तेणें अनहित केलें।।तु.गा.क्षे.२६५.०२।।
ज्यासी वंदावें त्यासी निंदी। मैत्री सांडोनि होतसे दंदी ।।तु.गा.क्षे.२६५.०३।।
आन यातीचे संगती लागे । संतसज्जनांमध्ये ना वागे ।।तु.गा.क्षे.२६५.०४।।
केल्याविण पराक्रम सांगे। जेथें सांगे तेथेंचि भीक मागें।।तु.गा.क्षे.२६५.०५।।
करी आपुलाचि संभ्रम । परि पुढें कठीण फार यम ।।तु.गा.क्षे.२६५.०६।।
तुका म्हणे कांहीं नित्य नेम। चित्तीं न धरी तो अधम।।तु.गा.क्षे.२६५.०७।।
तुम्ही साधु संत कैवल्यसागर। मोक्षाचें आगर तुम्हां घरीं।।तु.गा.क्षे.२६६.०१।।
तेथें मतिमंद काय बोलों वाणी। अमृताचे धणी पाणी कां घ्या।।तु.गा.क्षे.२६६.०२।।
कोटि भानु तेजीं खद्योत बापुडें। तैसा तुम्हां पुढें काय बोलों।।तु.गा.क्षे.२६६.०३।।
तुम्ही अवघे चिंतामणी कल्पतरूचीं वने। त्यापुढें धावणें मशकांनीं।।तु.गा.क्षे.२६६.०४।।
वाराणसी क्षेत्र गंगा वाहे कोड। काय तेथें पाड कोंकणाचें।।तु.गा.क्षे.२६६.०५।।
पल्लवाचा वारा हिम करीं काय। गगनावरी छाय कोण करी।।तु.गा.क्षे.२६६.०६।।
समुद्राची तृषा हरी ऐसा कोण। जगाची जी तान्ह निववितो।।तु.गा.क्षे.२६६.०७।।
मेरूचा पाठार अवघी ते क्षिती। मशकाचे हातीं मुष्टि फावे।।तु.गा.क्षे.२६६.०८।।
सिंहापुढें काय जंबूक आरोळी। मोतियांचे वोळी कांच काय।।तु.गा.क्षे.२६६.०९।।
कापुरासी काय लावूनी उटावें। काय ओंवाळावें दीपकासी।।तु.गा.क्षे.२६६.१०।।
तसे तुम्ही निरे ज्ञानाचे भरीव। तेथें म्यां बोलावें पाड काय।।तु.गा.क्षे.२६६.११।।
कृपानिधी तुम्ही बोलविले बोला। सुखें न्याय केला तुमचा मी।।तु.गा.क्षे.२६६.१२।।
अज्ञान मी वेडें म्हणवितों बाळ। माझा प्रतिपाळ करणें तुम्हां।।तु.गा.क्षे.२६६.१३।।
बोबडें बोलणें न धरावा कोप। क्षमा करा बाप कृपासिंधु।।तु.गा.क्षे.२६६.१४।।

तुका म्हणे तुम्ही संत बापमाय। भयें धरिले पाय कृपानिधि ।।तु.गा.क्षे.२६६.१५ ।।
तुझ्यांपाशीं आम्ही येउनियां काय। वृथासीण आहे चालण्याचा ।।तु.गा.क्षे.२६७.०१ ।।
मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर। वस्त्रासी हे थार चिंध्या बिदीं ।।तु.गा.क्षे.२६७.०२ ।।
निद्रेसी आसन उत्तम पाषाण। बरी आवरण आकाशाचें ।।तु.गा.क्षे.२६७.०३ ।।
तेथें काय करणें कवणाची आस। वायां होय नाश आयुष्याचा ।।तु.गा.क्षे.२६७.०४ ।।
राजगृहा यावें मानाचिया आसे। तेथें काय वसे समाधान ।।तु.गा.क्षे.२६७.०५ ।।
रायाचिये घरीं भगवंता मान। इतरां सामान्यां मान नाहीं ।।तु.गा.क्षे.२६७.०६ ।।
देखोनियां वस्त्रें भूषणाचें जन। तात्काळ मरण येतें मज ।।तु.गा.क्षे.२६७.०७ ।।
ऐकोनियां मानाल उदासतां जरी। तरी आम्हां हरि उपेक्षीना ।।तु.गा.क्षे.२६७.०८ ।।
आतां हेंचि तुम्हां सांगणें कौतुक । भिक्षेऐसें सुख नाहीं नाहीं ।।तु.गा.क्षे.२६७.०९ ।।
तपव्रतयाग महा भले जन । आशाबद्ध हीन वर्तताती ।।तु.गा.क्षे.२६७.१० ।।
तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे । पूर्वीच दैवाचे हरिभक्त ।।तु.गा.क्षे.२६७.११ ।।
तुळसीवृंदावनीं उपजला कांदा। नावडे गोविंदा कांहीं केल्या ।।तु.गा.क्षे.२६८.०१ ।।
तैसें वंशामध्यें झाले जे मानव। जाणावें दानव अभक्त ते ।।तु.गा.क्षे.२६८.०२ ।।
केवड्या मधील निर्गंध कणसें। तैशीं तीं माणसें भक्तिहीन ।।तु.गा.क्षे.२६८.०३ ।।
तुका म्हणे जेवीं चंदनांतील आळी। न चढे निढळीं देवाचियां ।।तु.गा.क्षे.२६८.०४ ।।
तुटे मायाजाळ विघडे भवसिंधू। जरि लागे छंदु हरिनामें ।।तु.गा.क्षे.२६९.०१ ।।
येर कर्म धर्म करितां ये कळीं। माजी तरला बळी कोण सांगा ।।तु.गा.क्षे.२६९.०२ ।।
न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध। नामाचे प्रबंध पाठ करा ।।तु.गा.क्षे.२६९.०३ ।।
न साधवे योग न करवे वैराग्य। साधा भक्तिभाग्य संतसंगें ।।तु.गा.क्षे.२६९.०४ ।।
नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान। करावी सोपान कृष्णकथा ।।तु.गा.क्षे.२६९.०५ ।।
तुका म्हणे वर्म दावियेलें संतीं। यापरती विश्रांति आणिक नाहीं ।।तु.गा.क्षे.२६९.०६ ।।
तुझें रूप पाहतां देवा। सुख झालें माझ्या जीवा ।।तु.गा.क्षे.२७०.०१ ।।

हें तों वाचे बोलवेना। काय सांगों नारायणा।।तु.गा.क्षे.२७०.०२।।
जन्मोंजन्मींचें सुकृत। तुझे पायीं रमे चित्त।।तु.गा.क्षे.२७०.०३।।
जरी योगाचा अभ्यास। तेव्हां तुझा निजध्यास।।तु.गा.क्षे.२७०.०४।।
तुका म्हणे भक्त। गोड गाऊं हरीचें गीत।।तु.गा.क्षे.२७०.०५।।
तुझे पाय माझें भाळ। एकत्रता सर्व काळ।।तु.गा.क्षे.२७१.०१।।
हेंचि देई विठाबाई। पांडुरंगे माझे आई।।तु.गा.क्षे.२७१.०२।।
नाहीं मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड।।तु.गा.क्षे.२७१.०३।।
सदा संग सज्जनांचा। नको वियोग पंढरीचा।।तु.गा.क्षे.२७१.०४।।
नित्य चंद्रभागे स्नान। करी क्षेत्रप्रदक्षण।।तु.गा.क्षे.२७१.०५।।
पुंडलिक पाहोनि दृष्टीं। हर्षें नाचों वाळवंटीं ।।तु.गा.क्षे.२७१.०६।।
तुका म्हणे पांडुरंगा। तुझें स्वरूप चंद्रभागा।।तु.गा.क्षे.२७१.०७।।
तुझें नाम मुखीं असो देवा। विनवितो राघवा दास तुझा।।तु.गा.क्षे.२७२.०१।।
तुझ्या नामबळें तरलें पतित। म्हणोनि माझें चित्त तुझें पायीं।।तु.गा.क्षे.२७२.०२।।
तुका म्हणे तुझें नाम हें सादर। गातां निरंतर सुख वाटे।।तु.गा.क्षे.२७२.०३।।
दो दिवसांचा पाहुणा चालसी उताणा। कां रे नारायणा न भजसी।।तु.गा.क्षे.२७३.०१।।
तूं अखंड दुश्चिता तुज नेती अवचितां। मग पंढरिनाथा भजसी केव्हां।।तु.गा.क्षे.२७३.०२।।
तुका म्हणे ऐसें आहेत उदंड। तया केशव प्रचंड केवीं भेटे।।तु.गा.क्षे.२७३.०३।।
देहीं असोनियां देव। वृथा फिरतो निर्दैव।।तु.गा.क्षे.२७४.०१।।
देव आहे अंतर्यामीं। व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं।।तु.गा.क्षे.२७४.०२।।
नाभीं मृगाचे कस्तुरी। व्यर्थ हिंडे वनांतरीं।।तु.गा.क्षे.२७४.०३।।
साखरेचें मूळ ऊंस। तैसा देहीं देव दिसे।।तु.गा.क्षे.२७४.०४।।
दुधीं असतां नवनीत । नेणें तयाचे मथित।।तु.गा.क्षे.२७४.०५।।
तुका सांगे मूढजना। देहीं देव कां पाहाना।।तु.गा.क्षे.२७४.०६।।

देवासी पैं भांडो एकचित्त करूनी। आम्हांसी सज्जनी सांगितलें ।।तु.गा.क्षे.२७५.०१ ।।
आम्हां काय आतां देवें आडोपरी। भेटी नेदी तरी सुखें नेदो ।।तु.गा.क्षे.२७५.०२ ।।
तोचि नांदो सदा हरि पैं वैकुंठीं। आम्हां देशवटी देवो सुखें ।।तु.गा.क्षे.२७५.०३ ।।
देवें अभिमान चित्तांत धरिला। तरी तो एकला राहो आतां ।।तु.गा.क्षे.२७५.०४ ।।
चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षें गाऊं गीत गोविंदाचे ।।तु.गा.क्षे.२७५.०५ ।।
तुका म्हणे सर्व देवाची नष्टाई। आम्हीं सुखें पाहीं डुलतसों ।।तु.गा.क्षे.२७५.०६ ।।
देवा ऐसा शिष्य देई। ब्रह्मज्ञानी निपुण पाही ।।तु.गा.क्षे.२७६.०१ ।।
जो का भावाचा आगळा। भक्तिप्रेमाचा पुतळा ।।तु.गा.क्षे.२७६.०२ ।।
ऐशा युक्ति ज्याला वाणे । तेथें वैराग्याचे ठाणें ।।तु.गा.क्षे.२७६.०३ ।।
ऐसा झाला हो शरीरीं। तुका लिंबलोण करी ।।तु.गा.क्षे.२७६.०४ ।।
देव आतां आम्ही केला असे ऋणी। आणिकां वांचूनि काय गुंता ।।तु.गा.क्षे.२७७.०१ ।।
एकाचें आर्जव करूं एकनिष्ठ। आणिकांचा बोभाट कामा नये ।।तु.गा.क्षे.२७७.०२ ।।
बहुतांचे आर्जव केलिया खटपट। नाहीं हा शेवट शुद्ध होत ।।तु.गा.क्षे.२७७.०३ ।।
पुरता विचार आणोनी मानसीं। अंतरलों सर्वांसी पईं देखा ।।तु.गा.क्षे.२७७.०४ ।।
तुका म्हणे देवा चरणीं असो भाव। तेणें माझा जीव संतोषे हा ।।तु.गा.क्षे.२७७.०५ ।।
दारिद्राने विप्र पीडिला अपार। तया पोटीं पोर एक असे ।।तु.गा.क्षे.२७८.०१ ।।
बाहेर मिष्टान्न मिळे एके दिशीं। घेऊनी छंदासी त्याची बैसें ।।तु.गा.क्षे.२७८.०२ ।।
क्षुधाकाळीं रडे देखिलें तें मागें। कांहीं केल्या नेघे दुजें कांहीं ।।तु.गा.क्षे.२७८.०३ ।।
सहज कौतुकें बोले बापमाये। देवापाशीं आहे मागशी तें ।।तु.गा.क्षे.२७८.०४ ।।
तेव्हां तुजलागीं स्मरे नारायणा। जीवींच्या जीवना पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.२७८.०५ ।।
लागली हे क्षुधा जात असे प्राण। काय हें निर्वाण पाहातोसी ।।तु.गा.क्षे.२७८.०६ ।।
ब्रह्मांडनायक विश्वाचा पालक । वरी तिन्ही लोक पोसितोसी ।।तु.गा.क्षे.२७८.०७ ।।
प्राण हा उत्कर्ष जाहला विव्हळ। तेव्हां तो कृपाळ धांव घाली ।।तु.गा.क्षे.२७८.०८ ।।

सांडुनि वैकुंठ धांव घाली तई। आळंगिला बाहीं कृपावंतें ।।तु.गा.क्षे.२७८.०९ ।।
तुका म्हणे दिला क्षीराचा सागर। राहे निरंतर तयापासीं ।।तु.गा.क्षे.२७८.१० ।।
दामाजीपंताची रसद गुदरली। लज्जा सांभाळिली देवरायें ।।तु.गा.क्षे.२७९.०१ ।।
तयाचें चरित्र परिसा हो सादरें। करितों नमस्कार संत जनां ।।तु.गा.क्षे.२७९.०२ ।।
मंगळवेढा असे वस्ति कुटुंबेंसी। व्यापारी सर्वांसी मान्य सदा ।।तु.गा.क्षे.२७९.०३ ।।
कर्म काय करी ठाणाचा हवाला। तो कांहीं पडला कठिण काळ ।।तु.गा.क्षे.२७९.०४ ।।
धान्याचीं भांडारें होती तीं फोडिलीं। पंढरी रक्षिली दुष्काळांत ।।तु.गा.क्षे.२७९.०५ ।।
दुबळीं अनाथ तींही वांचविलीं। राष्ट्रांत ते झाली कीर्ति मोठी ।।तु.गा.क्षे.२७९.०६ ।।
मुजुम करीत होता कानडा ब्राह्मण। फिर्याद लिहून पाठविली ।।तु.गा.क्षे.२७९.०७ ।।
अविंदाचें राज्य बेदरीं असतां। कागद पाहतां तलब केली ।।तु.गा.क्षे.२७९.०८ ।।
दामाजी पंतासि धरोनि चालविलें। इकडे या विठ्ठले माव केली ।।तु.गा.क्षे.२७९.०९ ।।
विकते धारणे सवाईचें मोल। धान्याचें सकळ द्रव्य केलें ।।तु.गा.क्षे.२७९.१० ।।
दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त। लिहून खलेती मुद्रा केली ।।तु.गा.क्षे.२७९.११ ।।
विठो पाडेवार भक्तां साह्य झाला। बेदरासी गेला रायापासी ।।तु.गा.क्षे.२७९.१२ ।।
जोहार माय बाप पुसती कोठिला। तंव तो म्हणे स्थळ मंगळवेढें ।।तु.गा.क्षे.२७९.१३ ।।
दामाजीपंतानीं रसद पाठविली। खलेती ओतिली अर्जदास्त ।।तु.गा.क्षे.२७९.१४ ।।
देखोनियां राजा संतोष पावला। म्हणे व्यर्थ त्याला तलब केली ।।तु.गा.क्षे.२७९.१५ ।।
काय तुझें नांव पुसती यंत्रधारी। तो म्हणे बेगारी विठा कीं जी ।।तु.गा.क्षे.२७९.१६ ।।
पावल्याचा जाब द्यावा मायबाप। करोनि घेतों माप म्हणती तें ।।तु.गा.क्षे.२७९.१७ ।।
पावल्याचा जाब दिधला लिहून। तसरीफ देऊन पाठविला ।।तु.गा.क्षे.२७९.१८ ।।
छत्री घोडा शिबिका आभरणांसहित। दिला सवें दूत पाठवूनीं ।।तु.गा.क्षे.२७९.१९ ।।
वाटे चुकामुक झाली याची त्यांची । ते आले तैसेचि मंगळवेढीं ।।तु.गा.क्षे.२७९.२० ।।
दामाजीपंतासी बेदरासी नेलें। राजा म्हणे झाले कवतुक ।।तु.गा.क्षे.२७९.२१ ।।

काल गेला विठा बेगारी देऊन। तसरीफ देऊन जाब दिला ।।तु.गा.क्षे.२७९.२२ ।।
काय तुमचें काज सांगा जी सत्वर। बोलाजी निर्धार वचनाचा ।।तु.गा.क्षे.२७९.२३ ।।
कैंचा विठा कोण पाठविला कधीं। काढोनिया आधीं जाब दिला ।।तु.गा.क्षे.२७९.२४ ।।
पाहातांचि जाब हृदय फुटलें। नयन निडारले राजा देखे ।।तु.गा.क्षे.२७९.२५ ।।
सांवळें सकुमार रूप मनोहर। माथां तेणें भार वाहियेला ।।तु.गा.क्षे.२७९.२६ ।।
दामाजीपंतासी रायें सन्मानिलें। तो म्हणे आपुलें कर्म नव्हे ।।तु.गा.क्षे.२७९.२७ ।।
आतां तुमची सेवा पुरें जी स्वामिया। शिणविलें सखया विठोबासी ।।तु.गा.क्षे.२७९.२८ ।।
निरोप घेऊनी आला स्वस्थळासी। उदास सर्वांसीं होतां झाला ।।तु.गा.क्षे.२७९.२९ ।।
दामाजीपंतांनीं सेविली पंढरी। ऐसा त्याचा हरि निकट वृत्ति ।।तु.गा.क्षे.२७९.३० ।।
तुका म्हणे विठो अनाथ कैवारी। नुपेक्षी हा हरि दासालागीं ।।तु.गा.क्षे.२७९.३१ ।।
आतां आम्हां हेंचि काम। वाचे स्मरों रामराम ।।तु.गा.क्षे.२८०.०१ ।।
ऐसी मोलाची हे घडी। धरूं पायांची आवडी ।।तु.गा.क्षे.२८०.०२ ।।
अमृताची खाणी। तये ठायीं वेचूं वाणी ।।तु.गा.क्षे.२८०.०३ ।।
तुका म्हणे पांडुरंगा। माझ्या जीवींच्या जिवलगा ।।तु.गा.क्षे.२८०.०४ ।।
आतां एक योग साधवा हा नीट। भल्याचा तो वीट मानूं नये ।।तु.गा.क्षे.२८१.०१ ।।
जेणें योगें तुम्हां घडों पाहे दोष। ऐसा हा सायास करूं नये ।।तु.गा.क्षे.२८१.०२ ।।
निंदक दुर्जन संग्रहीं असती। त्यांची युक्ति चित्तीं आणूं नका ।।तु.गा.क्षे.२८१.०३ ।।
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक। विवेकाविवेक पाहोनियां ।।तु.गा.क्षे.२८१.०४ ।।
सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा। अनाथांच्या काजा साह्य व्हावें ।।तु.गा.क्षे.२८१.०५ ।।
हेंचि ऐकोनियां चित्त समाधान। आणिक दर्शनें चाड नाहीं ।।तु.गा.क्षे.२८१.०६ ।।
घेऊनियां भेटी कोण हा संतोष। आयुष्याचे दिस गेले गेले ।।तु.गा.क्षे.२८१.०७ ।।
एकदोनी कर्मे जाणोनियां वर्मे। आपुलिया भ्रमें राहूं आतां ।।तु.गा.क्षे.२८१.०८ ।।
कल्याणकारक अर्थ याचा एक। सर्वां भूतीं देख एक आत्मा ।।तु.गा.क्षे.२८१.०९ ।।

भूषण पंडितराय विद्याधन। वैद्यराजा नमन माझें असे ।।तु.गा.क्षे.२८६.०५ ।।
पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनी। विवंचोनी श्रवणीं घाला तया ।।तु.गा.क्षे.२८६.०६ ।।
सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ।।तु.गा.क्षे.२८६.०७ ।।
यथास्थित निरोप सांगणें हा राया। अर्थ पाहा वायां जाऊं नेदा ।।तु.गा.क्षे.२८६.०८ ।।
भिडेसाठीं बोला गाळूनी अर्थातें। अनर्थकारी तुमतें होईल तेणें ।।तु.गा.क्षे.२८६.०९ ।।
तुका म्हणे तुम्हां नमन अधिकाऱ्यां। सांगणें ते राया पत्र माझें ।।तु.गा.क्षे.२८६.१० ।।
आतां नेम जाला। याच कळसी विठ्ठला ।।तु.गा.क्षे.२८७.०१ ।।
हातीं न धरीं लेखणी। काय भुसकट ते वाणी ।।तु.गा.क्षे.२८७.०२ ।।
जाणें तेणें काळ। उरला सारीन सकळ ।।तु.गा.क्षे.२८७.०३ ।।
तुका म्हणे घाटी। चाटूं कोरडा शेवटीं ।।तु.गा.क्षे.२८७.०४ ।।
अखंडकर्मा कर्मप्रकाशका। मजसाठीं कां रे झालासी मुका। धर्माधर्मप्रतिपालका। सर्वचाळका सर्वातीता ।।तु.गा.क्षे.२८८.०१ ।।
न देखसी वर्णाश्रममर्यादा। त्याचा सर्वस्वें करिसी कामधंदा। कधीं न लाजसी तूं गोविंदा। कां रे मुकुंदा बोल आतां ।।तु.गा.क्षे.२८८.०२ ।।
मत्स्यकूर्मादि अवतारांसाठीं। श्रमले असतील जगजेठी। करितां घडामोड सृष्टी। झालासी कष्टी काय जाणें ।।तु.गा.क्षे.२८८.०३ ।।
किती म्यां विनवावें श्रीपती। पुन्हां पुन्हां यावें काकुळती। पुरे आतां तुझी संगति। करुणामूर्ति काय झालें ।।तु.गा.क्षे.२८८.०४ ।।
काय म्यां तुजसी आतां। कां रे कोपलासी पंढरीनाथा। सकळ दुःखनिवारिता। पावन पतिता तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.२८८.०५ ।।
अनंत जुगाचा देव्हारा। निजबोधाचा घुमारा। अवचित भरला वारा। या मल्लारी देवाचा ।।तु.गा.क्षे.२८९.०१ ।।
शुद्धसत्वाचा कवडा मोठा। बोधबिरडें बांधला गांठा। गळां वैराग्याचा पट्टा। वाटा दावूं भक्तीच्या ।।तु.गा.क्षे.२८९.०२ ।।
हृदय कोटंबा सांगातें। घोळ वाजवूं अनुहातें। ज्ञानभंडाराचें पोतें। रितें नव्हे कल्पांतीं ।।तु.गा.क्षे.२८९.०३ ।।
लक्ष चौऱ्याशीं घरें चारी। या जन्माची केली वारी। प्रसन्न झाला देव मल्लारी। सोहंभावीं राहिलों ।।तु.गा.क्षे.२८९.०४ ।।
या देवाचे भरतां वारें। अंगीं प्रेमाचें फेपरें। गुरगुरू करी वेडे चारें। पाहा तुकें भूंकविलें ।।तु.गा.क्षे.२८९.०५ ।।
अनाथाचा सखा ऐकिला प्रताप। होसी कृपावंत मजवरी ।।तु.गा.क्षे.२९०.०१ ।।
माझिया गा चित्त करीं शिकवण। जेणें तुझे चरण जोडतील ।।तु.गा.क्षे.२९०.०२ ।।
जोडोनियां कर येतों काकुलती। रखुमाईच्या पति कृपावंता ।।तु.गा.क्षे.२९०.०३ ।।

हरुषें निर्भर करीं माझें मन। दाखवीं चरण पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.२९०.०४ ।।

तुझे भेटीविण जन्म गेला वायां। भजन कराया शक्ति नाहीं ।।तु.गा.क्षे.२९०.०५ ।।

न घडे तुझी सेवा न घडे पूजन। जन्मोनि निष्कारण जाऊं पाहे ।।तु.गा.क्षे.२९०.०६ ।।

तुका म्हणे हरि करावें या काय। भजनासी साह्य होईं बापा ।।तु.गा.क्षे.२९०.०७ ।।

अतित्याई देतां जीव। नये कींव देवासी ।।तु.गा.क्षे.२९१.०१ ।।

थोड्यासाठीं राग आला। जीव दिला गंगेंत ।।तु.गा.क्षे.२९१.०२ ।।

त्यासी परलोकीं नाहीं मुक्ति। अधोगति चुकेना ।।तु.गा.क्षे.२९१.०३ ।।

तुका म्हणे कृष्णराम। स्मरतां श्रम वारती ।।तु.गा.क्षे.२९१.०४ ।।

अगा ये मधुसूदना माधवा। अगा ये कमळापति यादवा। अगा श्रीधरा केशवा। अगा बांधवा द्रौपदीच्या ।।तु.गा.क्षे.२९२.०१ ।।

अगा विश्वव्यापका जनार्दना। गोकुळवासी गोपिकारमणा। अगा गुणनिधि गुणनिधाना। अगा मदना कंसाचिया ।।तु.गा.क्षे.२९२.०२ ।।

अगा सर्वोत्तमा सर्वेश्वरा। गुणातीता विश्वंभरा। अगा निर्गुण निराकारा। अगा आधारा दीनाचिया ।।तु.गा.क्षे.२९२.०३ ।।

अगा उपमन्यु सहाकारा। अगा शयना फणिवरा। अगा काळकृतांत असुरा। अगा अपारा अलक्षा ।।तु.गा.क्षे.२९२.०४ ।।

अगा वैकुंठनिवासा। अगा अयोध्यापति राजहंसा। अगा ये पंढरीनिवासा। अगा सर्वेशा सहज रूपा ।।तु.गा.क्षे.२९२.०५ ।।

अगा परमात्मा परमपुरुषा। अगा अव्यया जगदीशा। अगा कृपाळुवा आपुल्या दासा। तोडी भवपाशा तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.२९२.०६ ।।

अगा पंढरीराया। वेगीं येईं तूं सावया ।।तु.गा.क्षे.२९३.०१ ।।

दीनबंधु तुझें नाम। देईं आपुलें आम्हां प्रेम ।।तु.गा.क्षे.२९३.०२ ।।

जीवनकळा तूं विश्वाची। तूंचि माउली अनाथाची ।।तु.गा.क्षे.२९३.०३ ।।

तुका म्हणे पुंडलिका। ठेवीं मस्तकीं पादुका ।।तु.गा.क्षे.२९३.०४ ।।

अखंड क्षीराब्धी भरितें आलें। अध्यात्मविद्येचें भांडार उघडिलें। सूर्यकोटीस तेज फांकलें। ध्यानीं प्रगटिलें भक्तांचिया ।।तु.गा.क्षे.२९४.०१ ।।

अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज। श्रवणीं अवचित पडलें सहज ।।तु.गा.क्षे.२९४.०२ ।।

महामंत्र मंगळनिधि। सत्संग दर्शनें प्रगटलें आधीं। वैराग्यविवेकाची बुद्धि। नामामृत सिद्धि साधिलें तें ।।तु.गा.क्षे.२९४.०३ ।।

क्षमा दया शांतीचें निजसुख। सच्चित्सुखें बोलिला पुंडलिक। अनंत सुखाचा हरिख। उगवला देख पंढरिये ।।तु.गा.क्षे.२९४.०४ ।।

नेणें भवभक्तीची निरपेक्षता। नेणें भूतदयेची ममता। तुका म्हणे पंढरीनाथा। संग साधुसंता देईं आतां ।।तु.गा.क्षे.२९४.०५ ।।

आले सुरवर नाना पक्षी झाले। सकळ अवतरलें श्वापदवेषें।।तु.गा.क्षे.२९५.०१ ।।
श्वानखररूपी होउनियां आले। उच्छिष्ट कवळ वेंचिताती।।तु.गा.क्षे.२९५.०२ ।।
होउनियां दीन हात पसरिती। मागोनियां घेती उष्टावळी।।तु.गा.क्षे.२९५.०३ ।।
अभिमान आड घालोनि बाहेरी। तया म्हणे हरी घ्यारे धणी।।तु.गा.क्षे.२९५.०४ ।।
तुका म्हणे धणी लाधली अपार। तया सुखा पार काय सांगों।।तु.गा.क्षे.२९५.०५ ।।
आम्हीं हरिचे हरिचे । शूर कळिकाळा यमाचे ।।तु.गा.क्षे.२९६.०१ ।।
नामघोष बाण साचे । भाले तुलसीमंजरीचे ।।तु.गा.क्षे.२९६.०२ ।।
आम्ही हरिचे हरिचे दास । कळिकाळावरी धालूं कास ।।तु.गा.क्षे.२९६.०३ ।।
आम्ही हरिचे हरिचे दूत । पुढें पळती यमदूत ।।तु.गा.क्षे.२९६.०४ ।।
तुका म्हणे आम्हांवरी । सुदर्शन घरटी करी ।।तु.गा.क्षे.२९६.०५ ।।
आम्हीं आलों गांवगुंड। अवघ्या पुंड भूतांसी।।तु.गा.क्षे.२९७.०१ ।।
दुसरें तें खेळों आलें। एका बोलें तो मियां।।तु.गा.क्षे.२९७.०२ ।।
अवघियांचा येऊं लाग। नेदूं अंग शिवाय।।तु.गा.क्षे.२९७.०३ ।।
तुका म्हणे खुंटूं नाद। चिंतूं वाद सर्तीनें।।तु.गा.क्षे.२९७.०४ ।।
आम्हां हेंचि काम। वाचे गाऊं तुझें नाम।।तु.गा.क्षे.२९८.०१ ।।
आयुष्य मोलाची हे घडी। धरूं पायांची आवडी।।तु.गा.क्षे.२९८.०२ ।।
अमृताची खाणी। याचे ठायीं वेंचू वाणी।।तु.गा.क्षे.२९८.०३ ।।
तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवाच्या जिवलगा।।तु.गा.क्षे.२९८.०४ ।।
आमुचे दंडवत पायांवरी डोई। व्हावें उतराई ठेवूनियां।।तु.गा.क्षे.२९९.०१ ।।
कराल तें कांहीं नव्हे जी विठ्ठला। चित्त द्यावें बोला बोबडियां।।तु.गा.क्षे.२९९.०२ ।।
तुका म्हणे आम्ही लडिवाळें अनाथें। म्हणोनि दीनानाथें सांभाळावें।।तु.गा.क्षे.२९९.०३ ।।
आपुल्या पोटासाठीं। करी लोकांचिया गोष्टी।।तु.गा.क्षे.३००.०१ ।।
जेणें घातलें संसारीं। विसरला तोचि हरी।।तु.गा.क्षे.३००.०२ ।।

पोटा घालीं अन्न । न म्हणे पतितपावन ।।तु.गा.क्षे.३००.०३ ।।
मी कोठिल आणि कोण । हें न कळे ज्या लागून ।।तु.गा.क्षे.३००.०४ ।।
तुका म्हणे नरस्तुति । करितों भाट त्रिजगतीं ।।तु.गा.क्षे.३००.०५ ।।
उपजला प्राणी न राहे संसारीं । बैसला शेजारीं काळ उभा ।।तु.गा.क्षे.३०१.०१ ।।
पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका । तैसा काळ लोकां नेत असे ।।तु.गा.क्षे.३०१.०२ ।।
खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहे । कसाबाची गाय वांचे कैसी ।।तु.गा.क्षे.३०१.०३ ।।
तुका म्हणे कांहीं करा काढाकाढी । जाती ऐसी घडी पुन्हां न ये ।।तु.गा.क्षे.३०१.०४ ।।
उधानु काटीवरी  चोपडूची आस । नवरा राजस मिरवतसे ।।तु.गा.क्षे.३०२.०१ ।।
जिव्हाळ्याच्या कांठीं उबाळ्याच्या मोठा । नवरा चोहटा मिरवतसे ।।तु.गा.क्षे.३०२.०२ ।।
तुळशीची माळ नवरीचे कंठीं । नोवरा वैकुंठीं वाट पाहे ।।तु.गा.क्षे.३०२.०३ ।।
तुका म्हणे ऐशी नोवऱ्याची कथा । परमार्थ वृथा बुडविला ।।तु.गा.क्षे.३०२.०४ ।।
उदार कृपाळ पतितपावना । ब्रिदें नारायणा जाती वायां ।।तु.गा.क्षे.३०३.०१ ।।
वर्णिताती श्रुति नेणें तुझा पार । राहे मौनाकार नेति ऐसें ।।तु.गा.क्षे.३०३.०२ ।।
तेथें माझा धांवा पावे कोणीकडे । अदृष्ट हें पुढें वोढवलें ।।तु.गा.क्षे.३०३.०३ ।।
कोण ऐसा भक्त लाधला भाग्यासी । आठवण ऐसी द्यावी तुज ।।तु.गा.क्षे.३०३.०४ ।।
तुका म्हणे नको पाहों माझा अंत । जाणोनि हे मत उडी घालीं ।।तु.गा.क्षे.३०३.०५ ।।
उच्चारूं यासाठीं । आम्हीं नाम तुझें कंठीं ।।तु.गा.क्षे.३०४.०१ ।।
येसी धांवत धांवत । माउलिये कृपावंते ।।तु.गा.क्षे.३०४.०२ ।।
पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ।।तु.गा.क्षे.३०४.०३ ।।
तुका म्हणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगे ।।तु.गा.क्षे.३०४.०४ ।।
अनाथांचा नाथ पतितपावन । दीनांचे रक्षण करीतसे ।।तु.गा.क्षे.३०५.०१ ।।
ऐसें जाणोनियां नामीं विश्वासलों । भीमातीरा आलों धांवतचि ।।तु.गा.क्षे.३०५.०२ ।।
स्नान हे करितां त्रिताप निवाले । महाद्वारा आलें मन माझें ।।तु.गा.क्षे.३०५.०३ ।।

तेथें अणुमात्र रीग नव्हे याचा। परतलों साचा तेथूनियां ।।तु.गा.क्षे.३०५.०४ ।।
पुंडलिकापाशीं येऊनि पुसलें। चिन्मय दाटले जनार्दन ।।तु.गा.क्षे.३०५.०५ ।।
तुका म्हणे आतां दुजा धर्म नाहीं। बाप तरी आई तोचि विठो ।।तु.गा.क्षे.३०५.०६ ।।
अपराध झाले जरी असंख्यात। तरी कृपावंत नाम तुझें ।।तु.गा.क्षे.३०६.०१ ।।
तुझें लडिवाळ तुज कृपा यावी। म्यां वाट पहावी कवणाची ।।तु.गा.क्षे.३०६.०२ ।।
मायबाप माझा रुक्मादेवीवर। हा दृढ निर्धार अंतरींचा ।।तु.गा.क्षे.३०६.०३ ।।
तुका म्हणे कोणे गोष्टीचें संकट। न घालीं मज भेट नारायणा ।।तु.गा.क्षे.३०६.०४ ।।
एकली वना चालली राना। चोरुनि जना घराचारी ।।तु.गा.क्षे.३०७.०१ ।।
कोणी नाहीं संगीसवें। देहभावें उदास ।।तु.गा.क्षे.३०७.०२ ।।
जाउनि पडे दुर्घट वनीं। श्वापदांनीं वेढिली ।।तु.गा.क्षे.३०७.०३ ।।
मार्ग न चले जातां पुढें। भय गाढें उदेलें ।।तु.गा.क्षे.३०७.०४ ।।
मागील मार्गें अंतरलीं। पुढील चाली खोळंबा ।।तु.गा.क्षे.३०७.०५ ।।
तुका म्हणे चिंती यासी। हृदयस्थासी आपुल्या ।।तु.गा.क्षे.३०७.०६ ।।
ऐसा मी अपार पार नाहीं अंत। परि कृपावंत भाविकांचा ।।तु.गा.क्षे.३०८.०१ ।।
दुर्जना चांडाळा करीं निर्दाळण। करीं संरक्षण अंकिताचें ।।तु.गा.क्षे.३०८.०२ ।।
भक्त माझे सखे जिवलग सांगाती। सर्वांग त्यांप्रती वोडवीन ।।तु.गा.क्षे.३०८.०३ ।।
पीतांबरछाया करीन त्यावरी। सदा त्यांचे घरीं दारीं उभा ।।तु.गा.क्षे.३०८.०४ ।।
माझे भक्त मज सदा जे रातले। त्यां घरीं घेतलें धरणें म्यां ।।तु.गा.क्षे.३०८.०५ ।।
कोठें हें वचन ठेविलें ये वेळे। तुका म्हणे डोळे झांकियले ।।तु.गा.क्षे.३०८.०६ ।।
एकमेकीं घेती थडका। पाडी धडका देऊनी ।।तु.गा.क्षे.३०९.०१ ।।
एकमेकां पाठीवरी। बैसोनी करिती टवाळी ।।तु.गा.क्षे.३०९.०२ ।।
हात हात हाणे लाही। पळतां घाई चुकविती ।।तु.गा.क्षे.३०९.०३ ।।
तुका म्हणे लपणी चपणी। एका हाणी पाठीवरी ।।तु.गा.क्षे.३०९.०४ ।।

एक प्रेमगुज ऐकें जगजेठी। आठवली गोष्टी सांगतसें ।।तु.गा.क्षे.३१०.०१।।
एक मृगी दोन्ही पाडसांसहित। आनंदें चरत होती वनीं।।तु.गा.क्षे.३१०.०२।।
अवचितां तेथें पारधी पातला। घेउनियां आला श्वानें दोन्ही।।तु.गा.क्षे.३१०.०३।।
एकीकडे त्याणें चिरिल्या वाघुरा। ठेविलें श्वानपुत्रां एकीकडे।।तु.गा.क्षे.३१०.०४।।
एकीकडे तेणें वोणवा लाविला। आपण राहिला एकीकडे।।तु.गा.क्षे.३१०.०५।।
चहूंकडोनियां मृगें वेढियेलीं। स्मरों तीं लागली नाम तुझें।।तु.गा.क्षे.३१०.०६।।
रामा कृष्णा हरी गोविंदा केशवा। देवांचिया देवा पावें आतां।।तु.गा.क्षे.३१०.०७।।
कोण रक्षी आतां ऐशिये संकटीं। बापा जगजेठी तुजविण।।तु.गा.क्षे.३१०.०८।।
आइकोनि तुम्ही तयांचीं वचनें। कृपाअंतःकरणें कळवळिलां।।तु.गा.क्षे.३१०.०९।।
आज्ञा तये काळीं केली पर्जन्यासी। वेगीं पावकासी विझवावें।।तु.गा.क्षे.३१०.१०।।
ससें एक तेथें उठवुनि पळविलें। तया पाठीं गेलीं श्वानें दोन्ही।।तु.गा.क्षे.३१०.११।।
मृगें चमकोनी सत्वर चाललीं। गोविंदें रक्षिलें म्हणोनियां।।तु.गा.क्षे.३१०.१२।।
ऐसा तूं कृपाळु दयाळू आहेसी। आपुल्या भक्तांसी जीवलग।।तु.गा.क्षे.३१०.१३।।
ऐसी तुझी कीर्ति जीवीं आवडती । रखुमाईच्या पती तुका म्हणे।।तु.गा.क्षे.३१०.१४।।
एक ते गाढव मनुष्याचे वेष। हालविती पुंस पुढें दाढी।।तु.गा.क्षे.३११.०१।।
निंदा हें भोजन जेवण तयांसी। जोडी घरीं रासी पातकांच्या।।तु.गा.क्षे.३११.०२।।
तुका म्हणे सुखें बैसोनियां खाती। कुंभिपाकीं होती नर्कवासी।।तु.गा.क्षे.३११.०३।।
उभय भाग्यवंत तरीच समान। स्थळीं समाधान तरीच राहे।।तु.गा.क्षे.३१२.०१।।
युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा। सांचवणी जळापरी नाश।।तु.गा.क्षे.३१२.०२।।
लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ। नांवाचा पालट दगड खरा।।तु.गा.क्षे.३१२.०३।।
तुका म्हणे अवघे विनोदाचे ठाव। एकात्मक भाव नाहीं तेथें।।तु.गा.क्षे.३१२.०४।।
करोनि स्नान आणि देवधर्म। क्रिया नित्य नेम तुजसाठीं।।तु.गा.क्षे.३१३.०१।।
तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें। सकळहीं व्रतें तुजलागीं।।तु.गा.क्षे.३१३.०२।।

सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती। आवडसी प्रीती नारायणा ।।तु.गा.क्षे.३१३.०३।।
तुका म्हणे याहो पवित्राच्या राया । प्राण विसाविया पांडुरंगा।।तु.गा.क्षे.३१३.०४।।
कटावरी कर कासया ठेविले। जननी विठ्ठले जीवलगे।।तु.गा.क्षे.३१४.०१।।
शंखचक्रगदा कमळमंडित। आयुधें मंडित कृष्णाबाई।।तु.गा.क्षे.३१४.०२।।
क्षण एक धीर होत नाहीं चित्ता। केव्हां पंढरीनाथा भेटशील।।तु.गा.क्षे.३१४.०३।।
तुका म्हणे हेंचि करीं देई क्षेमा। तईंच विश्रामा पावईन।।तु.गा.क्षे.३१४.०४।।
कवण दिस येईल कैसा। न कळे संपत्तीचा भरंवसा।।तु.गा.क्षे.३१५.०१।।
चौदा चौकडिया लंकापति। त्याची कोण झाली गति।।तु.गा.क्षे.३१५.०२।।
लंकेसारिखें भुवन। त्याचे त्यासी पारखें जाण।।तु.गा.क्षे.३१५.०३।।
तेहतीस कोटी बांदवडी। राज्य जातां नलगे घडी।।तु.गा.क्षे.३१५.०४।।
ऐसें अहंतेनें नाडिलें। तुका म्हणे वायां गेले।।तु.गा.क्षे.३१५.०५।।
ओले मातीचा भरवंसा । कारे धरिशी मानसा ।।तु.गा.क्षे.३१६.०१।।
डोळे चिरीव चांगलें । वृद्धपणीं सरक्या झाले ।।तु.गा.क्षे.३१६.०२।।
नाक सरळ चांगलें । येउन हनुवटी लागलें ।।तु.गा.क्षे.३१६.०३।।
तुका म्हणे आलें नाहीं । तंव हरिला भज रे कांहीं ।।तु.गा.क्षे.३१६.०४।।
ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे। हे त्या करुणा आहे हृदयस्थाची।।तु.गा.क्षे.३१७.०१।।
नहों केविलवाणे नाहीं आम्ही दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ।।तु.गा.क्षे.३१७.०२।।
नहों केविलवाणें नाहीं आम्ही दीन । आणिकांची कथा काय तेथें।।तु.गा.क्षे.३१७.०३।।
तुझी भेट घेणें काय हें मागणें। आशेचें हें शून्य केलें आम्हीं।।तु.गा.क्षे.३१७.०४।।
निराशेचा गांव दिधला आम्हांसी। प्रवृत्तिभागासी सांडियेलें।।तु.गा.क्षे.३१७.०५।।
पतिव्रतेचें हें मन पति भेटो। तैसें आम्हीं विठोमाजी नांदों।।तु.गा.क्षे.३१७.०६।।
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझेंही तयामाजी।।तु.गा.क्षे.३१७.०७।।
तुजही विठ्ठल ऐसेंचि वाटलें। परि एक आलें आडवें हें।।तु.गा.क्षे.३१७.०८।।

सद्गुरुश्रीरामदासाचें भूषण। तेथें घालीं मन चळों नको।।तु.गा.क्षे.३१७.०९।।
बहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां। रामदास्य तेव्हां घडे कैसें।।तु.गा.क्षे.३१७.१०।।
तुका म्हणे बापा चातुर्यसागरा। भक्तिभाव तारा भाविकांसी।।तु.गा.क्षे.३१७.११।।
कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें। तेणें हातां आलें हरीदास्य।।तु.गा.क्षे.३१८.०१।।
रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन। कायावाचामन भगवंतीं।।तु.गा.क्षे.३१८.०२।।
ऐसिया प्रेमळा म्हणताती वेडा। संसार रोकडा बुडविला।।तु.गा.क्षे.३१८.०३।।
एकवीस कुळें जेणें उद्धरिलीं। हे तो न कळे खोली भाग्यमंदा।।तु.गा.क्षे.३१८.०४।।
तुका म्हणे त्याचें पायधुळी मिळे। भवभय पळे वंदितांचि।।तु.गा.क्षे.३१८.०५।।
कैसी करूं तुझी सेवा। ऐसें सांगावें जी देवा। कैसा आणूं अनुभवा। होसी ठावा कैशापरी।।तु.गा.क्षे.३१९.०१।।
कर्मभ्रष्ट माझें मन। नेणें जप तप अनुष्ठान। नाहीं इंद्रियांसी दमन। नव्हे मन एकविध।।तु.गा.क्षे.३१९.०२।।
नेणें यातीचा आचार। नेणें भक्तीचा विचार। मज नाही संताचा आधार। नाहीं स्थिर बुद्धि माझी।।तु.गा.क्षे.३१९.०३।।
न सुटे मायाजाळ। नाहीं वैराग्याचें बळ। न जिंकवती सबळ। काम क्रोध शरीरीं।।तु.गा.क्षे.३१९.०४।।
आतां राख कैसें तरी। मज नुपेक्षावें हरी। तुझीं ब्रीदें चराचरीं। तैसीं साच करी तुका म्हणे।।तु.गा.क्षे.३१९.०५।।
कीर्तनाचा विकरा मातेचें गमन। भाड खाई धन विटाळ तो।।तु.गा.क्षे.३२०.०१।।
हरिभक्ताची माता हे हरिगुण कीर्ति। इजवर पोट भरिती चांडाळ ते।।तु.गा.क्षे.३२०.०२।।
अंत्यज हा ऐसें कल्पांतीं करीना। भाड हे खाईना जननीची।।तु.गा.क्षे.३२०.०३।।
तुका म्हणे त्याचें दर्शनही खोटें। पूर्वजांसी नेटें नरका धाडी ।।तु.गा.क्षे.३२०.०४।।
किती लाजिरवाणा। मरे उपजोनि शहाणा।।तु.गा.क्षे.३२१.०१।।
एका घाईं न करीं तुटी। न निघें देवासोई भेटी।।तु.गा.क्षे.३२१.०२।।
सोसूनि आबाळी। घायाळ तें ढुंग चोळी।।तु.गा.क्षे.३२१.०३।।
सावध करी तुका। म्हणे निजले हो आइका।।तु.गा.क्षे.३२१.०४।।
किडा अन्नाचें माणूस। त्याचा म्हणविल्या दास।।तु.गा.क्षे.३२२.०१।।
तेही त्यासी उपेक्षीना। बोल आपुला सांडिना।।तु.गा.क्षे.३२२.०२।।

तो तूं नराचा नरेंद्र। तुजपासूनि इंद्र चंद्र।।तु.गा.क्षे.३२२.०३।।
तुका म्हणे विश्वंभर। तुज वर्णी फणीवर।।तु.गा.क्षे.३२२.०४।।
कासयासी व्यर्थ घातले संसारीं। होतें तैसें जरी तुझें चित्तीं।।तु.गा.क्षे.३२३.०१।।
तुझिये भेटींची थोर असे आस। दिसोनी निरास आली मज।।तु.गा.क्षे.३२३.०२।।
आतां काय जिणें झालें निरर्थक। वैकुंठनायक भेटेचि ना।।तु.गा.क्षे.३२३.०३।।
आडलासी काय कृपेच्या सागरा। रखुमादेवीवरा सोइरिया।।तु.गा.क्षे.३२३.०४।।
तुका म्हणे देईं चरणाची सेवा। नुपेक्षी केशवा मायबापा।।तु.गा.क्षे.३२३.०५।।
काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन। पंढरीची जाण एक यात्रा।।तु.गा.क्षे.३२४.०१।।
काशी देह विटंबणें द्वारके जाळणें। पंढरीसी होणें ब्रह्मरुप।।तु.गा.क्षे.३२४.०२।।
अठरापगडयाती सकळही वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसी ।।तु.गा.क्षे.३२४.०३।।
तुका म्हणे असो अथवा नसो भाव। दर्शनें पंढरीराव मोक्ष देतो।।तु.गा.क्षे.३२४.०४।।
काय मागें आम्ही गुंतलों काशानीं। पुढें वाहो मनीं धाक देवा।।तु.गा.क्षे.३२५.०१।।
कीर्ति चराचरी आहे तैशी आहे। भेटोनियां काय द्यावें आम्हां।।तु.गा.क्षे.३२५.०२।।
घेऊनी धरणें बैसती उपवासी। हट आम्हांपासी नाहीं तैसा।।तु.गा.क्षे.३२५.०३।।
तातडी तयांनीं केली विटंबना। आम्हां नारायणा काय उणें।।तु.गा.क्षे.३२५.०४।।
नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा। जीवभाव आमुचा देऊं तुज।।तु.गा.क्षे.३२५.०५।।
तुका म्हणे काय मानेल तें आतां। तूं घेई अनंता सर्व माझें।।तु.गा.क्षे.३२५.०६।।
काय पाहातोसी कृपेच्या सागरा। नराच्या नरेंद्रा पांडुरंगा।।तु.गा.क्षे.३२६.०१।।
नामाचा प्रताप ब्रिदाचा बडिवार। करावा साचार नारायणा।।तु.गा.क्षे.३२६.०२।।
कलीमाजी देव बौद्धरूप झाला। जगाचिया बोला लागूं नका।।तु.गा.क्षे.३२६.०३।।
माय पुत्रा काय मारूं पाहे कळी। जगाची ढवाळी काय काज।।तु.गा.क्षे.३२६.०४।।
तुका म्हणे याहो कृपेच्या सागरा। रखुमादेवीवरा मायबापा।।तु.गा.क्षे.३२६.०५।।
कां रे दाटोन होतां वेडे। देव आहे तुम्हांपुढें।।तु.गा.क्षे.३२७.०१।।

ज्यासी पाठ नाहीं पोट। करी त्रैलोंक्याचा घोंट।।तु.गा.क्षे.३२७.०२।।
तुमची तुम्हां नाहीं सोय। कोणाचें बा काय।।तु.गा.क्षे.३२७.०३।।
तुका गातो नामीं। तेथें नाहीं तुम्ही आम्ही।।तु.गा.क्षे.३२७.०४।।
कां रे पुंड्या मातलासी। उभें केलें विठ्ठलासी।।तु.गा.क्षे.३२८.०१।।
वस्ति क्षीरसागरवासी। आला उभ्या पंढरीसी।।तु.गा.क्षे.३२८.०२।।
भक्ति देखोनि निकट। देवें सोडियेलें वैकुंठ।।तु.गा.क्षे.३२८.०३।।
तुका म्हणे बळी। तूंचि एक भूमंडळीं।।तु.गा.क्षे.३२८.०४।।
कामिनीसी जैसा आवडे भ्रतार। इच्छीत चकोर चंद्र जैसा।।तु.गा.क्षे.३२९.०१।।
तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं। लागलीया नाहीं गर्भवास।।तु.गा.क्षे.३२९.०२।।
दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन। आणिक जीवन तृषाक्रांता।।तु.गा.क्षे.३२९.०३।।
कामातुर जैसा भय लज्जा सांडोनि। आवडे कामिनी सर्वभावें।।तु.गा.क्षे.३२९.०४।।
तुका म्हणे तैसी राहिली आवडी। पांडुरंग थडी पाववील।।तु.गा.क्षे.३२९.०५।।
कामक्रोध आड पडले पर्वत। राहिला अनंत पलीकडे।।तु.गा.क्षे.३३०.०१।।
नुलंघवे मज न सांपडे वाट। दुस्तर हा घाट वैरियांचा।।तु.गा.क्षे.३३०.०२।।
आतां कैंचा मज सखा नारायण। गेला अंतरोन पांडुरंग।।तु.गा.क्षे.३३०.०३।।
तुका म्हणे व्यर्थ मोलाचे शरीर। गेलें हा विचार कळों आला।।तु.गा.क्षे.३३०.०४।।
नाहीं संसाराची चाड। गाऊं हरिचे नाम गोड।।तु.गा.क्षे.३३१.०१।।
हो कां प्राणाचाही घात। परि हा न सोडीं अनंत।।तु.गा.क्षे.३३१.०२।।
जन्मोजन्मीं हाचि धंदा। संतसंग राहो सदा।।तु.गा.क्षे.३३१.०३।।
तुका म्हणे भाव । तो हा जाणा पंढरीराव।।तु.गा.क्षे.३३१.०४।।
नाहीं संतांशीं शरण। काय वाचोनी पुराण।।तु.गा.क्षे.३३२.०१।।
म्हणे विठ्ठलाचा दास। देखोनी परनारीस हांसे।।तु.गा.क्षे.३३२.०२।।
करिती विठोबाची भक्ति। दयाधर्म नाहीं चित्तीं।।तु.गा.क्षे.३३२.०३।।

तेथें नाहीं माझा देव। व्यर्थ श्रमवी हा जीव।।तु.गा.क्षे.३३२.०४।।
अंगीं नाहीं क्षमा दया। म्हणती भेट पंढरीराया।।तु.गा.क्षे.३३२.०५।।
नाहीं धर्माची वासना। काय करोनी प्रदक्षिणा।।तु.गा.क्षे.३३२.०६।।
ऐसें नव्हे भक्तिवर्म। तेथें नाहीं माझा राम।।तु.गा.क्षे.३३२.०७।।
नये कृपा कांहीं केल्या। नये घाम जीव गेल्या।।तु.गा.क्षे.३३२.०८।।
जैसी खड्गाची धार। विठ्ठलचरणीं तुका शूर।।तु.गा.क्षे.३३२.०९।।
नाहीं रिकामीक परि वाहे मनीं। तया चक्रपाणी साह्य होय।।तु.गा.क्षे.३३३.०१।।
उद्वेग जिवासी पंढरींचें ध्यान। तया नारायण साह्य करी।।तु.गा.क्षे.३३३.०२।।
शरीरासी बळ नाहीं स्वता भाव। तया पंढरीराव साह्य करी।।तु.गा.क्षे.३३३.०३।।
असो नसो बळ राहे पराधीन। तरी अनुमान करूं नका।।तु.गा.क्षे.३३३.०४।।
तुका म्हणे येणें करोनीं चिंतन। तया नारायण जवळीक।।तु.गा.क्षे.३३३.०५।।
नामाचा डांगोरा फिरवीं घरोघरी । म्हणा हरी हरी सर्व भावें ।।तु.गा.क्षे.३३४.०१।।
नामें हरती कर्मे वैकुंठीची पैं वस्ति । संनिध श्रीपति सदोदित ।।तु.गा.क्षे.३३४.०२।।
नामाचा महिमा बहुतां कळला । नामें उद्धरिला अजामेळ ।।तु.गा.क्षे.३३४.०३।।
गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती । नामेंचि श्रीपति पावलासे ।।तु.गा.क्षे.३३४.०४।।
तुका म्हणे नाम घेतां मुक्ति आहे । नामें सर्व पाहें आकळिलें ।।तु.गा.क्षे.३३४.०५।।
नाम पावन पावन। त्याहूनि पवित्र आहे कोण।।तु.गा.क्षे.३३५.०१।।
शिव हालाहालें तापला। तोही नामें शीतल झाला।।तु.गा.क्षे.३३५.०२।।
शिवास नामाचा आधार। केला कळिकाळ किंकर।।तु.गा.क्षे.३३५.०३।।
मरण झालें काशीपुरीं। तेथें नामचि उद्धरी।।तु.गा.क्षे.३३५.०४।।
तुका म्हणे अवघीं चोरें। एक हरिनाम सोईरें।।तु.गा.क्षे.३३५.०५।।
नाम तारक भवसिंधु। विठ्ठल तारक भवसिंधु।।तु.गा.क्षे.३३६.०१।।
नामधारक तया अरि मित्र । समता त्यागुनिया लोभु ।।तु.गा.क्षे.३३६.०२।।

नामधारक तया। कदापि न घडे विषयाचा बाधु ।।तु.गा.क्षे.३३६.०३ ।।
ज्या नामें तरलें शुकादिक। नारद संत मुनिजन साधु ।।तु.गा.क्षे.३३६.०४ ।।
जाणूनियां जें नसरे। तें नेणती जैसा गज अंधु ।।तु.गा.क्षे.३३६.०५ ।।
सहज तुकया। नामचि जपतां स्वरूपीं वेधु ।।तु.गा.क्षे.३३६.०६ ।।
नव्हे हें कवित्व टांकसाळी नाणें। घेती भले जन भले लोक ।।तु.गा.क्षे.३३७.०१ ।।
लागलासे झरा पूर्ण नवनीतें। सेविलिया हित फार होय ।।तु.गा.क्षे.३३७.०२ ।।
तुका म्हणे देवा केला बलात्कार। अंगा आलें फार महंतपण ।।तु.गा.क्षे.३३७.०३ ।।
नव्हे निष्ठावंत तुज काय बोल। सेवेविण मोल मागतसें ।।तु.गा.क्षे.३३८.०१ ।।
न घडे भजन शुद्धभावनिष्ठा। आपुल्या अदृष्टावरी बोल ।।तु.गा.क्षे.३३८.०२ ।।
पूर्वी झाले भक्त असंख्य विरक्त। कामक्रोधअहंते निर्दाळिले ।।तु.गा.क्षे.३३८.०३ ।।
ऐसी अंगवण नाहीं मज देवा। करीतसे हेवा भेटावया ।।तु.गा.क्षे.३३८.०४ ।।
कृपा करोनियां पुरवीं असोसी। आपुल्या ब्रीदासी राखावया ।।तु.गा.क्षे.३३८.०५ ।।
तुका म्हणे एक बाळक अज्ञातें। त्यासी हे पोसितें मायबापें ।।तु.गा.क्षे.३३८.०६ ।।
न म्हणे वो आम्ही आपुलेनि चित्तीं। नि:शेष अतिप्रीति विषयीं तो ।।तु.गा.क्षे.३३९.०१ ।।
खोटा तो विटाळ। म्हणोनि गावाळ सांडियेलें ।।तु.गा.क्षे.३३९.०२ ।।
भांगतमाखूचा चित्ताचा आदर। कोरडें उत्तर चाटावें तें ।।तु.गा.क्षे.३३९.०३ ।।
तुका म्हणे आम्हीं नव्हों फजितखोर। तुटीचा व्यापार करावया ।।तु.गा.क्षे.३३९.०४ ।।
नरदेह वायां जाय। सेवीं सद्गुरूचे पाय ।।तु.गा.क्षे.३४०.०१ ।।
सांडोनिया अहंभाव। वरी भक्ति पूजीं देव ।।तु.गा.क्षे.३४०.०२ ।।
थोराचिये वाटे। जातां भवशोक आटे ।।तु.गा.क्षे.३४०.०३ ।।
प्रह्लादातें तारी। तुका म्हणे कंठीं धरीं ।।तु.गा.क्षे.३४०.०४ ।।
नको विद्या वयसा आयुष्य फारसें। नाहीं मज पिसें मुक्तीचेंही ।।तु.गा.क्षे.३४१.०१ ।।
रामकृष्ण म्हणतां जावो माझा प्राण। हेंचि कृपादान मागतसें ।।तु.गा.क्षे.३४१.०२ ।।

नको धन मान न वाढो संतान। मुखीं नारायण प्राण जावा ।।तु.गा.क्षे.३४१.०३ ।।
तुका म्हणे दीन काकुलती येतों। तुज निरवितों पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.३४१.०४ ।।
नको येऊं लाजे होय तूं परती। भजों दे श्रीपती सखा माझा ।।तु.गा.क्षे.३४२.०१ ।।
तुझे संगतीनें मोठा झाला घात। झालों मी अंकित दुर्जनाचा ।।तु.गा.क्षे.३४२.०२ ।।
तुका म्हणे रांडे येईन काटीवरी। धनी सहाकारी राम केला ।।तु.गा.क्षे.३४२.०३ ।।
न कळे महिमा वेद मौनावले। जेथें पांगुळले मनपवन ।।तु.गा.क्षे.३४३.०१ ।।
चंद्र सूर्य ज्याचें तेज वागविती। तेथें माझी मती कोणीकडे ।।तु.गा.क्षे.३४३.०२ ।।
काय म्यां वानावें तुझ्या थोरपणा। सहस्त्रवदना वर्णवेना ।।तु.गा.क्षे.३४३.०३ ।।
तुका म्हणे आम्ही बाळ तूं माउली। कृपेची साउली करीं देवा ।।तु.गा.क्षे.३४३.०४ ।।
धरोनियां फरश करीं। भक्तजनांचीं विघ्ने वारी ।।तु.गा.क्षे.३४४.०१ ।।
ऐसा गजानन महाराजा। त्याचे चरणीं हालों लागो माझा ।।तु.गा.क्षे.३४४.०२ ।।
सेंदूर शमी बहु प्रिय ज्याला। तुरा दुर्वांचा शोभला ।।तु.गा.क्षे.३४४.०३ ।।
उंदिर असे जयाचें वाहन। माथां जडितमुगुट पूर्ण ।।तु.गा.क्षे.३४४.०४ ।।
नागयज्ञोपवीत रूळे। शुभ्र वस्त्र शोभित साजिरें ।।तु.गा.क्षे.३४४.०५ ।।
भावमोदक हराभरी। तुका भावें हे पूजा करी ।।तु.गा.क्षे.३४४.०६ ।।
धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ।।तु.गा.क्षे.३४५.०१ ।।
लावीन निशाण जावया वैकुंठा । माजवीन पेठा कीर्तनाच्या ।।तु.गा.क्षे.३४५.०२ ।।
नामाचिया नौका करीन सहस्त्रवरि । नावाडा श्रीहरी पांडुरंग ।।तु.गा.क्षे.३४५.०३ ।।
भाविक हो येथें धरा रे आवांका । म्हणे दास तुका शुद्ध याती ।।तु.गा.क्षे.३४५.०४ ।।
धन्य त्या गौळणी इंद्राच्या पूजनीं। नैवेद्य हिरोनि खातो कृष्ण ।।तु.गा.क्षे.३४६.०१ ।।
अरे कृष्णा इंद्र अमर इच्छिती। कोण तयांप्रति येईल आतां ।।तु.गा.क्षे.३४६.०२ ।।
तुका म्हणे देव दाखवि विंदान। नैवेद्य खाऊन हांसों लागे ।।तु.गा.क्षे.३४६.०३ ।।
धन्य झालों हो संसारीं। आम्ही देखिली पंढरी ।।तु.गा.क्षे.३४७.०१ ।।

चंद्रभागें करूं स्नान । पुंडलीकाचें दर्शन ।।तु.गा.क्षे.३४७.०२ ।।
करूं क्षेत्रप्रदक्षिणा। भेटू संत या सज्जना।।तु.गा.क्षे.३४७.०३ ।।
उभे राहूं गरुडपारीं। डोळे भरुनी पाहों हरी।।तु.गा.क्षे.३४७.०४ ।।
तुका म्हणे वाळवंटीं। महालाभ फुकासाठीं।।तु.गा.क्षे.३४७.०५ ।।
पाप ताप माझे गुणदोष निवारी। कृष्णा विष्णु हरी नारायणा।।तु.गा.क्षे.३४८.०१ ।।
काम क्रोध वैरी घालोनी बाहेरी। तूं राहें अंतरीं पांडुरंगा।।तु.गा.क्षे.३४८.०२ ।।
करिशील तरी नव्हे काई एक। निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें।।तु.गा.क्षे.३४८.०३ ।।
समर्थासी काय आम्हीं शिकवावें। तुका म्हणे यावें पांडुरंगा।।तु.गा.क्षे.३४८.०४ ।।
प्रपंचाची पीडा सोसितो अघोरी। जया क्षणभरी नाम नये।।तु.गा.क्षे.३४९.०१ ।।
नाम नाठवितो आत्मया रामाचें। धिग जिणें त्याचें भवा मूळ।।तु.गा.क्षे.३४९.०२ ।।
मूळ तें पापाचें आचरण तयाचें। नाहीं राघवाचें स्मरण त्या।।तु.गा.क्षे.३४९.०३ ।।
स्मरण भजन नावडे जयासी। आंदणीया दासी यमदूता।।तु.गा.क्षे.३४९.०४ ।।
चिंतन रामाचें न करी तो दोषी। एकांत तयासी बोलों नये।।तु.गा.क्षे.३४९.०५ ।।
नये त्याचा संग धरूं म्हणे तुका। धरितां पातकां वाटेकरी।।तु.गा.क्षे.३४९.०६ ।।
पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार झाला। विठोबा भेटला निराकार।।तु.गा.क्षे.३५०.०१ ।।
भांवगिरिपाठारी वस्ति जाण केली। वृत्ति थिरावली परब्रह्मीं।।तु.गा.क्षे.३५०.०२ ।।
निर्वाण जाणोनि आसन घातलें। ध्यान आरंभिलें देवाजीचें।।तु.गा.क्षे.३५०.०३ ।।
सर्प विंचू व्याघ्र आंगासी झोंबलें। पीडूं जे लागलें सकळिक ।।तु.गा.क्षे.३५०.०४ ।।
दीपकीं कर्पूर कैसा तो विराला। तैसा देह जाला तुका म्हणे।।तु.गा.क्षे.३५०.०५ ।।
पंढरीस जाऊं म्हणती। यम थोर चिंता करिती।।तु.गा.क्षे.३५१.०१ ।।
या रे नाचों ब्रह्मानंदें। विठ्ठल नामाचिया छंदें।।तु.गा.क्षे.३५१.०२ ।।
धरिली पंढरीची वाट। पापें रिगालीं कपाट।।तु.गा.क्षे.३५१.०३ ।।
केलें भीवरेचें स्नान। यमपुरीं पाडिलें खान।।तु.गा.क्षे.३५१.०४ ।।

वाटतें शेवटीं झालासी निष्ठुर। न देसी उत्तर तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.३५६.०४ ।।
पूर्वी बहुतांचे केले प्रतिपाळ। तें मज सकळ श्रुत आहे।।तु.गा.क्षे.३५७.०१ ।।
अज अविनाश निर्गुण निरामय। विचारिलें काय त्यांचे वेळे ।।तु.गा.क्षे.३५७.०२ ।।
तयांचिये वेळे होसी कृपावंत। माझाचि कां अंत पाहतोसी ।।तु.गा.क्षे.३५७.०३ ।।
नारद प्रह्लाद उपमन्यु धुरू। त्यांचा अंगीकार कैसा केला ।।तु.गा.क्षे.३५७.०४ ।।
अंबऋषीसाठीं गर्भवास झाले। कां गा मोकलिलें कृपासिंधु ।।तु.गा.क्षे.३५७.०५ ।।
धर्माचें उच्छिष्ट अर्जुनाचीं घोडीं। आणीक सांकडीं किती एक ।।तु.गा.क्षे.३५७.०६ ।।
झालासी लुगडीं तया द्रौपदीचीं। न ये कां आमुची कृपा कांहीं ।।तु.गा.क्षे.३५७.०७ ।।
तुका म्हणे कां गा झालासी कठीण। माझा भाग सीण कोण जाणें ।।तु.गा.क्षे.३५७.०८ ।।
पापाची वासना नको दावूं डोळां। त्याहूनि अंधळा बराच मी ।।तु.गा.क्षे.३५८.०१ ।।
निंदेचें श्रवण नको माझे कानीं। बधिर करोनि ठेवीं देवा ।।तु.गा.क्षे.३५८.०२ ।।
अपवित्र वाणी नको माझ्या मुखा। त्याजहुनि मुका बराच मी ।।तु.गा.क्षे.३५८.०३ ।।
नको मज कधीं परस्त्रीसंगति। जनांतून माती उठता भली ।।तु.गा.क्षे.३५८.०४ ।।
तुका म्हणे मज अवघ्याचा कांटाळा। तूं एक गोपाळा आवडसी ।।तु.गा.क्षे.३५८.०५ ।।
पाण्या निघाली गुजरी। मन ठेविलें दो घागरीं। चाले मोकळ्या पदरीं। परी लक्ष तेथें ।।तु.गा.क्षे.३५९.०१ ।।
वावडी उडाली अंबरीं। हातीं धरोनियां दोरी। दिसे दुरिच्या दुरी। परी लक्ष तेथें ।।तु.गा.क्षे.३५९.०२ ।।
व्यभिचारिणी नारी। घराश्रम करी। परपुरुष जिव्हारीं। परी लक्ष तेथें ।।तु.गा.क्षे.३५९.०३ ।।
तुका म्हणे असों। भलतिये व्यापारीं। लक्ष सर्वेश्वरीं। चुकों नेदी ।।तु.गा.क्षे.३५९.०४ ।।
पक्षीयांचे घरीं नाहीं सामुगरी। त्यांची चिंता करी नारायण ।।तु.गा.क्षे.३६०.०१ ।।
अजगर जनावर वारुळांत राहे। त्याजकडे पाहे पांडुरंग ।।तु.गा.क्षे.३६०.०२ ।।
चातक हा पक्षी नेघे भूमिजळ। त्यासाठीं घननीळ नित्य वर्षे ।।तु.गा.क्षे.३६०.०३ ।।
तुका म्हणे आम्ही पिप्पलिकांची जात। पुरवीं मनोरथ पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.३६०.०४ ।।
पाहावा नयनीं विठ्ठलचि एक। कांहीं तरी सार्थक संसाराचें ।।तु.गा.क्षे.३६१.०१ ।।

कोठें पाहों तुज कां गा लपालासी। कांहीं बोल मशीं नारायणा।।तु.गा.क्षे.३६१.०२।।
वाटतें उदास मज दाहीं दिशा। तुजविण हृषीकेशा वाचोनियां।।तु.गा.क्षे.३६१.०३।।
नको ठेवूं मज आपणा वेगळें। बहुत कळवळे तुजलागीं।।तु.गा.क्षे.३६१.०४।।
तुका म्हणे भेटी देईं नारायणा । घडी कंठवेना तुजविण।।तु.गा.क्षे.३६१.०५।।
पहावया तुझा जरी बोलें अंत। तरी माझे जात डोळे देवा।।तु.गा.क्षे.३६२.०१।।
स्तंभीं तुज नाहीं घातलें प्रह्लादें। आपुल्या आनंदें अवतार।।तु.गा.क्षे.३६२.०२।।
भक्तांचिया काजा झालासी सगुण। तुज नाहीं गुण रूप नाम।।तु.गा.क्षे.३६२.०३।।
ऐसा कोण देवा अधम यातीचा। निर्धार हा साचा नाहीं तुझा।।तु.गा.क्षे.३६२.०४।।
तुका म्हणे बोलें कवतुकें गोष्टी । नेदी येऊं पोटीं राग देवा।।तु.गा.क्षे.३६२.०५।।
सकळ तीर्थांहुनि। पंढरी हे मुगुटमणि।।तु.गा.क्षे.३६३.०१।।
काय सांगों तेथिल शोभा। रमावल्लभ जेथें उभा।।तु.गा.क्षे.३६३.०२।।
न लभे व्रततीर्थदानीं। तें या विठ्ठलदर्शनीं।।तु.गा.क्षे.३६३.०३।।
साधुसंत गाती नाम। सकळ भूतांचा विश्राम।।तु.गा.क्षे.३६३.०४।।
तुका म्हणे स्तुती। करूं काय सांगों किती।।तु.गा.क्षे.३६३.०५।।
सकळ तीर्थांहुनि। पंढरीनाथ मुगुटमणी।।तु.गा.क्षे.३६४.०१।।
धन्य धन्य पंढरी। जे मोक्षाची अक्षयपुरी।।तु.गा.क्षे.३६४.०२।।
विश्रांतीचा ठाव। तो हा माझा पंढरीराव।।तु.गा.क्षे.३६४.०३।।
तुका म्हणे सांगें स्पष्ट। दुजी पंढरी वैकुंठ।।तु.गा.क्षे.३६४.०४।।
सकळ हे माया नागवे कवणा। भांबाविलें जना दाही दिशा।।तु.गा.क्षे.३६५.०१।।
आशा तृष्णा दंभ लागलीं ही पाठीं। नेदी बैसों हाटीं मोह ठायीं।।तु.गा.क्षे.३६५.०२।।
काम क्रोध घरा लावितील आगी। निंदा हिंसा दोघी पळतां खाती।।तु.गा.क्षे.३६५.०३।।
लाज पुढें उभी राहिली आडवी। ते करी गाढवी थोर घात।।तु.गा.क्षे.३६५.०४।।
तुका म्हणे चिंता घाली गर्भवासीं । ओढोनियां पाशीं चहूंकडे।।तु.गा.क्षे.३६५.०५।।

सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल। तेणें गळां माळ घालूं नये।।तु.गा.क्षे.३६६.०१।।
ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति। तेणें अंगीं विभूति लावूं नये।।तु.गा.क्षे.३६६.०२।।
जयासी न कळे भक्तीचें महिमान। तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये।।तु.गा.क्षे.३६६.०३।।
ज्याचें मन नाहीं लागलें हातासी। तेणें प्रपंचासी टाकूं नये।।तु.गा.क्षे.३६६.०४।।
तुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ति। तेणें भगवें हातीं धरूं नये।।तु.गा.क्षे.३६६.०५।।
सांडियेला गर्भ उबगोनी माउली। नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध।।तु.गा.क्षे.३६७.०१।।
उष्ण तान भूक एवढिये आकांतीं। ओसंगा लाविती काय म्हूण।।तु.गा.क्षे.३६७.०२।।
खांद्यावरी शूळ मरणाचिये वाटे। अन्यायही मोठे केले साच।।तु.गा.क्षे.३६७.०३।।
हातींचा हिरोनि घातला पाठीसी। तुका म्हणे ऐसी परी झाली।।तु.गा.क्षे.३६७.०४।।
शिकवणेसाठीं वाटतें तळमळ। पुढें येईल काळ फोडों डोई।।तु.गा.क्षे.३६८.०१।।
तेव्हां त्यासी काय देशील उत्तर। मेळवूनि अंतर ठेवितोसी।।तु.गा.क्षे.३६८.०२।।
येथींचिया सोंगें भोरपियाचे परी। होईल तें दुरी शृंगारिलें।।तु.गा.क्षे.३६८.०३।।
तुका म्हणे कां रे राखिलें खरकटें। रागेल्याचे तंट रागेलें कां।।तु.गा.क्षे.३६८.०४।।
शिव शक्ति आणि सूर्य गणपति। एकचि म्हणती विष्णूसही।।तु.गा.क्षे.३६९.०१।।
हिरा गार दोनी मानिती समान। राजस भजनें वायां जाती।।तु.गा.क्षे.३६९.०२।।
अन्य देवतांसी देव म्हणऊन। तामस जीवन तमो योग्या।।तु.गा.क्षे.३६९.०३।।
वायां जायासाठीं केलासे हव्यास। अन्य देवतांस देवपण।।तु.गा.क्षे.३६९.०४।।
आपुलिया मुखें सांगतसें धणी । नव्हे माझी वाणी पदरींची।।तु.गा.क्षे.३६९.०५।।
धन्य ते वैष्णव भजती केशव। सात्विक हे जीव मोक्षा योग्य।।तु.गा.क्षे.३६९.०६।।
तुका म्हणे मोक्ष नाहीं कोणापासीं। एका गोविंदासी शरण व्हा रे।।तु.गा.क्षे.३६९.०७।।
शिष्या सांगे उपदेश। गुरुपूजा हे विशेष।।तु.गा.क्षे.३७०.०१।।
दावी आचार सोंवळे। दंड कमंडलु माळे।।तु.गा.क्षे.३७०.०२।।
छाटी भगवी मानसीं। व्यर्थ म्हणवी संन्यासी।।तु.गा.क्षे.३७०.०३।।

तुका म्हणे लोभ। न सुटे नाहीं लाभ ।।तु.गा.क्षे.३७०.०४ ।।
शेवटीची विनंती। ऐका ऐका कमळापती ।।तु.गा.क्षे.३७१.०१ ।।
काया वाचा मन। चरणीं असे समर्पण ।।तु.गा.क्षे.३७१.०२ ।।
जीवपरमात्मा ऐक्यासी। सदा वसो हृदयेंसी ।।तु.गा.क्षे.३७१.०३ ।।
तुका म्हणे देवा। कंठीं वसावें केशवा ।।तु.गा.क्षे.३७१.०४ ।।
वृद्धपणीं आली जरा। शरीर कांपे थरथरा ।।तु.गा.क्षे.३७२.०१ ।।
आयुष्य गेलें हें कळेना। स्मरा वेगें पंढरिराणा ।।तु.गा.क्षे.३७२.०२ ।।
दांत दाढा पडिल्या ओस। हनुवटी भेटे नाकास ।।तु.गा.क्षे.३७२.०३ ।।
हात पाय राहिले कान। नेत्रां पाझर हाले मान ।।तु.गा.क्षे.३७२.०४ ।।
अंगकांति परतली। चिरगुटा ऐसी झाली ।।तु.गा.क्षे.३७२.०५ ।।
आड पडे जिव्हा लोटे। शब्द नये मुखा वाटे ।।तु.गा.क्षे.३७२.०६ ।।
लांब लोंबताती अंड। भरभरा वाजे गांड ।।तु.गा.क्षे.३७२.०७ ।।
तुका म्हणे आतां तरी। स्मरा वेगीं हरी हरी ।।तु.गा.क्षे.३७२.०८ ।।
वृद्धपणीं न पुसे कोणी। विटंबणी देहाची ।।तु.गा.क्षे.३७३.०१ ।।
नव द्वारें झाली मोकळीक। गांड सरली वाजती ।।तु.गा.क्षे.३७३.०२ ।।
दंत दाढा गळे थुंका। लागे नाका हनुवटी ।।तु.गा.क्षे.३७३.०३ ।।
शब्द नये मुखावाटा । करिती चेष्टा पोरें तीं ।।तु.गा.क्षे.३७३.०४ ।।
तुका म्हणे अजून तरी। स्मरें श्रीहरि सोडवील ।।तु.गा.क्षे.३७३.०५ ।।
माय बाप बंधु सोयरा सांगाती । तूंचि माझी प्रीति गण गोत ।।तु.गा.क्षे.३७४.०१ ।।
शरण आली त्यांचीं वारिलीं दुरितें । तारिलें पतित असंख्यात ।।तु.गा.क्षे.३७४.०२ ।।
इतर कोण जाणे पावले विश्रांती । न येत तुजप्रति शरणागत ।।तु.गा.क्षे.३७४.०३ ।।
तयामध्यें मज ठेवी नारायणा । लक्ष्मीरमणा सोइरिया ।।तु.गा.क्षे.३७४.०४ ।।
तुका म्हणे देईं दर्शनाचा लाभ । जे पाय दुर्लभ ब्रह्मादिकां ।।तु.गा.क्षे.३७४.०५ ।।

मिथ्या आहे सर्व अवघें हें मायिक । न कळे विवेक मज कांहीं ।।तु.गा.क्षे.३७५.०१।।

सर्व बाजागिरी वाटती ही खरी । पाहतां येथें उरी कांहीं नाहीं ।।तु.गा.क्षे.३७५.०२।।

आतां मज दु:ख वाटतें अंतरीं । उपाय झडकरी सांग मज ।।तु.गा.क्षे.३७५.०३।।

पुढें कोण गति न कळे सर्वथा । तुझे पायीं माथा ठेवियेला ।।तु.गा.क्षे.३७५.०४।।

करणें तें करीं सुखें आतां हरी । तुज म्यां निर्धारीं धरियेलें ।।तु.गा.क्षे.३७५.०५।।

स्वहित ते काय न कळे सर्वथा । तारी तूं अनंता तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.३७५.०६।।

माझें कोण आहे तुजविण देवा । मुकुंदा केशवा नारायणा ।।तु.गा.क्षे.३७६.०१।।

वाट पाहतसें कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.३७६.०२।।

साच करीं हरी आपुली ब्रीदावळी । कृपेनें सांभाळी महाराज ।।तु.गा.क्षे.३७६.०३।।

क्षमा करी सर्व अपराध माझा । लडिवाळ मी तुझा पांडुरंग ।।तु.गा.क्षे.३७६.०४।।

साह्य होसी तरी जाती साही वैरी । मग सुखें अंतरीं ध्यान तुझें ।।तु.गा.क्षे.३७६.०५।।

कृपा करोनि देईं दया क्षमा शांती । तेणें तुझी भक्ति लाभईल ।।तु.गा.क्षे.३७६.०६।।

माझें हें सामर्थ्य नव्हे नारायणा । जरी कांहीं करूणा येईल तुज ।।तु.गा.क्षे.३७६.०७।।

तुका म्हणे मज कैसें आपंगा जी । आपुलेंसें करा जी पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.३७६.०८।।

सुखें सती इंद्रियें जाती । आणिक नेणें भाव भक्ती ।।तु.गा.क्षे.३७७.०१।।

देवा हेचि दोन्ही पदें । येर गाइलीं विनोदें ।।तु.गा.क्षे.३७७.०२।।

चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ।।तु.गा.क्षे.३७७.०३।।

माझिया जिवाचा मज निरधार । न करीं उत्तर जनांसवें ।।तु.गा.क्षे.३७८.०१।।

आपुलें कारण साधो जी विचार । करावा हा धीर धरूनियां ।।तु.गा.क्षे.३७८.०२।।

काय कराविया आणिका या युक्ति । काय नव्हे भक्ति विठोबाची ।।तु.गा.क्षे.३७८.०३।।

एक पुढें गेले वाट दावूनियां । मारग तो वायां कोण सांडी ।।तु.गा.क्षे.३७८.०४।।

तुका म्हणे माझी विठोबासी चिंता । भेईना सर्वथा न घडे तें ।।तु.गा.क्षे.३७८.०५।।

यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आम्हां दीनानाथें रक्षियेलें ।।तु.गा.क्षे.३७९.०१।।

यम नेता तुम्हां रक्षिल हें कोण । तुम्हां धन्य धन्य कोण म्हणती ।।तु.गा.क्षे.३७९.०२।।
संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति । त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ।।तु.गा.क्षे.३७९.०३।।
तेंचि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासी पापरी हाणे आतां ।।तु.गा.क्षे.३७९.०४।।
येईं गे विठ्ठले विश्वजीवनकले । सुंदर घननीळे पांडुरंगे ।।तु.गा.क्षे.३८०.०१।।
येईं गे विठ्ठले करूणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ।।तु.गा.क्षे.३८०.०२।।
नलगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ।।तु.गा.क्षे.३८०.०३।।
तुका म्हणे धांव घाली कृष्णाबाई । क्षेम चहूंबाहीं देईं मज ।।तु.गा.क्षे.३८०.०४।।
विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ति ।।तु.गा.क्षे.३८१.०१।।
युक्तिचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेसी ।।तु.गा.क्षे.३८१.०२।।
ऐसा तुझा प्रेमा कळे कांहीं एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ।।तु.गा.क्षे.३८१.०३।।
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचें कीं ।।तु.गा.क्षे.३८१.०४।।
व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनी मोकळा जालासी तूं ।।तु.गा.क्षे.३८१.०५।।
हा हेत लागला आमुचिये भेटी । पत्रामाजीं गोष्टी हेचि थोर ।।तु.गा.क्षे.३८१.०६।।
याचें हें उत्तर ऐक गा भूपति । लिहिली विनंती हेताची हे ।।तु.गा.क्षे.३८१.०७।।
अरण्यवासी आम्ही फिरों उदासीन । दर्शनही हीन अमंगळ ।।तु.गा.क्षे.३८१.०८।।
वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ।।तु.गा.क्षे.३८१.०९।।
रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ।।तु.गा.क्षे.३८१.१०।।
तुका म्हणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ।।तु.गा.क्षे.३८१.११।।
वर्णाश्रम करिसी चोख । तरी तूं पावसी उत्तम लोक ।।तु.गा.क्षे.३८२.०१।।
परि तें तुज नाहीं ठावें । जेणें अंगें ब्रह्म व्हावें।।तु.गा.क्षे.३८२.०२।।
जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ।।तु.गा.क्षे.३८२.०३।।
गासी तान मान बंध । हाव भाव गीत छंद ।।तु.गा.क्षे.३८२.०४।।
जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ।।तु.गा.क्षे.३८२.०५।।

साधनाच्या ओढी । डोळियांच्या मोडामोडी ।।तु.गा.क्षे.३८२.०६।।
तुका म्हणे देहीं । संत जाहाले विदेही ।।तु.गा.क्षे.३८२.०७।।
वाटीभर विष दिलें प्रह्लादासी । निर्भय मानसीं तुझ्या बळें ।।तु.गा.क्षे.३८३.०१।।
भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन झालें तुझ्या ।।तु.गा.क्षे.३८३.०२।।
नामाच्या चिंतनें विषाचें तें आप । जाहालें देखत नारायणा ।।तु.गा.क्षे.३८३.०३।।
तुका म्हणे ऐसे तुझे बडिवार । शिणला फणीवर वर्णवेना ।।तु.गा.क्षे.३८३.०४।।
वाराणसीपर्यंत असों सुखरुप । सांगावा निरोप संतासी या ।।तु.गा.क्षे.३८४.०१।।
येथूनियां आम्हां जाणें निजधामा । सवें असे आम्हां गरुड हा ।।तु.गा.क्षे.३८४.०२।।
कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसों माहेरीं तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.३८४.०३।।
लोहो परिसासीं रुसलें । सोनेंपणासी मुकलें ।।तु.गा.क्षे.३८५.०१।।
येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ।।तु.गा.क्षे.३८५.०२।।
गंगा आली आळशावरी । आळसी देखोनि पळे दुरी ।।तु.गा.क्षे.३८५.०३।।
गांवा खालील ओहळे । रागें गंगेसी न मिळे ।।तु.गा.क्षे.३८५.०४।।
तुका केशवाचा दास । गुरुसीं न भजे शिष्य ।।तु.गा.क्षे.३८५.०५।।
लाडें भाकितों करुणा । तूं रे उदारांचा राणा ।।तु.गा.क्षे.३८६.०१।।
करिसी आमुचा सांभाळ । तूं रे माउली स्नेहाळ ।।तु.गा.क्षे.३८६.०२।।
नाहीं चिंता रे आम्हांशीं । तूंचि भार चालविशी ।।तु.गा.क्षे.३८६.०३।।
आम्ही झालों उदासीन । तूंचि करिशी जतन ।।तु.गा.क्षे.३८६.०४।।
आम्हां नाहीं जीवनास । तूंचि पुरविशी आस ।।तु.गा.क्षे.३८६.०५।।
तुका म्हणे भलते सवें । जातां मागें मागें धांवें ।।तु.गा.क्षे.३८६.०६।।
लटिका प्रपंच वांझेची संतति । तत्वज्ञा हे भ्रांति बाधूं नेणें ।।तु.गा.क्षे.३८७.०१।।
सूर्यबिंबीं काय अंधार रिघेल । मृगजळें तिंबेल नभ काई ।।तु.गा.क्षे.३८७.०२।।
तैसा दृश्यभास नाढळेचि डोळां । प्रकाश सोहळा भोगीतसे ।।तु.गा.क्षे.३८७.०३।।

करिती स्मरण पार्वतीशंकर । तेथें मी किंकर कोणीकडे ।।तु.गा.क्षे.३९३.०२।।
सहस्रमुखेंसी घोष फणिवराचा । मज किंकराचा पाड काय ।।तु.गा.क्षे.३९३.०३।।
चंद्र सूर्य आणि सर्व तारांगणें । करिती भ्रमण प्रदक्षिणा ।।तु.गा.क्षे.३९३.०४।।
तुका म्हणे त्यांसी स्वरूप कळेना । तेथें मज दीना कोण पुसे ।।तु.गा.क्षे.३९३.०५।।
यातिगुणें रूपें काय ते वानर । तयांच्या विचारें वर्ते राम ।।तु.गा.क्षे.३९४.०१।।
ब्रह्महत्यारासी पातकी अनेक । तो वंद्य वाल्मीक तिहीं लोकीं।।तु.गा.क्षे.३९४.०२।।
तुका म्हणे नव्हे चोरीचा व्यापार । म्हणा रघुवीर वेळोवेळीं ।।तु.गा.क्षे.३९४.०३।।
भोगीयेल्या नारी । तरी तो बाळ ब्रह्मचारी ।।तु.गा.क्षे.३९५.०१।।
ऐसी ज्याचें अंगीं कळा । पार न कळे वेदाला ।।तु.गा.क्षे.३९५.०२।।
बळी बळी थोर थोर । मोडोनियां केले चूर ।।तु.गा.क्षे.३९५.०३।।
वांकडी कुबजा । सरसी आणियेली वोजा ।।तु.गा.क्षे.३९५.०४।।
मल्ल रगडिला पायीं । गज झुगारिला बाहीं ।।तु.गा.क्षे.३९५.०५।।
जिवें मारियेला मामा । धांवे भक्ताचिया कामा ।।तु.गा.क्षे.३९५.०६।।
तुका म्हणे पूर्ण । दावीं भक्तीचीं विंदानें ।।तु.गा.क्षे.३९५.०७।।
भूत नावरे कोणासी । पुंडलीकें खिळिलें त्यासी ।।तु.गा.क्षे.३९६.०१।।
समचरण असे विटे । कटीं कर उभें नीट ।।तु.गा.क्षे.३९६.०२।।
वाळुवंटीं नाचती संत । प्रेमामृतें डुल्लत ।।तु.गा.क्षे.३९६.०३।।
तुका म्हणे पुंडलिका । भक्तिबळें तूंचि निका ।।तु.गा.क्षे.३९६.०४।।
भीमातीरवासी । तेथें निश्चयेसी काशी ।।तु.गा.क्षे.३९७.०१।।
मुख्य मुक्तीचें माहेर । ऐसें जाणा पंढरपूर ।।तु.गा.क्षे.३९७.०२।।
घडे भीवरेंसी स्नान । त्याशी पुन्हां नाहीं जन्म ।।तु.गा.क्षे.३९७.०३।।
भाव धरोनि नेटका । मोक्ष जवळी म्हणे तुका ।।तु.गा.क्षे.३९७.०४।।
भीमातिरींचा नाटक । यानें लावियेलें चेटक ।।तु.गा.क्षे.३९८.०१।।

मन बुद्धि झाली ठक । नेणें संसाराची टुक ।।तु.गा.क्षे.३९८.०२।।
कैशी प्रासंगिक वाणी । प्रत्यादर कडसणी ।।तु.गा.क्षे.३९८.०३।।
तुका म्हणे मोठा ठका । जेथें तेथें उभा ठाके ।।तु.गा.क्षे.३९८.०४।।
क्षीराब्धिवासा शेषशयना । लीलाविग्रहा गोपिकारमणा । सगुणस्वरूप भक्तभूषणा । गुणनिधाना गुप्तरूपा ।।तु.गा.क्षे.३९९.०१।।
अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया । अमरपालका देवराया । हरी भवभया भक्तांचिया ।।तु.गा.क्षे.३९९.०२।।
सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा । भोळ्या भक्तांसी सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचिना ।।तु.गा.क्षे.३९९.०३।।
चित्तचालका चैतन्यघना । भक्तकैवारी असुरमर्दना । भक्ताभिमानी नारायणा । जगज्जीवना पांडुरंगा ।।तु.गा.क्षे.३९९.०४।।
ब्रह्मादिकांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता । अणुरेणुव्याप्यभरिता । पावनपतिता तुका म्हणे ।।तु.गा.क्षे.३९९.०५।।
हीनवर बीजवर दोघी त्या गडणी । अखंड कहाणी संसाराची ।।तु.गा.क्षे.४००.०१।।
माझा पति बहु लहानचि आहे । खेळावया जाय पोरांसवें ।।तु.गा.क्षे.४००.०२।।
माझें दु:ख जरी ऐकशील सई । म्हातारा तो बाई खोकतसे ।।तु.गा.क्षे.४००.०३।।
खेळे सांजवरी बाहेरी तो राहे । वाट मी वो पाहें सेजेवरी ।।तु.गा.क्षे.४००.०४।।
पूर्व पुण्य माझें नाहीं बाई नीट । बहु होती कष्ट सांगों काई ।।तु.गा.क्षे.४००.०५।।
जवळ मी जाते अंगा अंग लावूं । नेदी जवळ येऊं कांटाळतो ।।तु.गा.क्षे.४००.०६।।
पूर्व सुकृताचा हाचि बाई ठेवा । तुका म्हणे देवा काय बोल ।।तु.गा.क्षे.४००.०७।।
हेंचि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ।।तु.गा.क्षे.४०१.०१।।
शांति दया अंत:करणीं । रंगो रामनामीं वाणी ।।तु.गा.क्षे.४०१.०२।।
मूळ द्वंद्वाचें विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ।।तु.गा.क्षे.४०१.०३।।
तुका म्हणे हरी । आतां आपुलेंसें करीं ।।तु.गा.क्षे.४०१.०४।।
होईं आतां माझ्या भोगाचा भोगिता । सकळ अनंता शुभाशुभ ।।तु.गा.क्षे.४०२.०१।।
आठवुनी पाय राहिलों हृदयीं । निवारली तईं सकळ चिंता ।।तु.गा.क्षे.४०२.०२।।
अचळ न चळे देहाचें चळण । आहे हें वळण प्रारब्धेंचि ।।तु.गा.क्षे.४०२.०३।।
तुका म्हणे झालें एकचि वचन । केलिया कीर्तन आराणूक ।।तु.गा.क्षे.४०२.०४।।

हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं । प्रेत अलंकारीं मिरवत ।।तु.गा.क्षे.४०३.०१।।
देवाविण शब्द व्यर्थचि कारण । भांड रंजवण सभेसी गा ।।तु.गा.क्षे.४०३.०२।।
आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ।।तु.गा.क्षे.४०३.०३।।
तुका म्हणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ।।तु.गा.क्षे.४०३.०४।।
हातीं धरिलियाची लाज । देवा असों दे गा तुज ।।तु.गा.क्षे.४०४.०१।।
आहें अमंगळ दुर्बळ । होईं दीन तूं दयाळ ।।तु.गा.क्षे.४०४.०२।।
बाळ शेंबडें मातेसी । काय नावडे तियेसी ।।तु.गा.क्षे.४०४.०३।।
तुका म्हणे जाणें । करीन देहाचें सांडणें ।।तु.गा.क्षे.४०४.०४।।
भ्रतारअंगसंगें सुखाची वेवस्था । आधीं तों सांगतां नये कोणा ।।तु.गा.क्षे.४०५.०१।।
तथापि सांगणें कुमारिकेपाशीं । ते काय मानसीं सुख मानी ।।तु.गा.क्षे.४०५.०२।।
तैसा आत्मबोध आधीं बोलों नये । बोलासी तो काय सांपडेल ।।तु.गा.क्षे.४०५.०३।।
तथापि सांगणें बहिर्मुखाशीं । तो काय संतोषासी मूळ होय ।।तु.गा.क्षे.४०५.०४।।
तुका म्हणे संत सुखाचे विभागी । ब्रह्मानंद जगीं साधुरूपें ।।तु.गा.क्षे.४०५.०५।।
भवाचिया संगें बहुत नाडिले । कळिकाळें पाडिलें तोंडघसीं ।।तु.गा.क्षे.४०६.०१।।
तया भवसंगें गुंतलासी वायां । धन पुत्र जाया भुलों नको ।।तु.गा.क्षे.४०६.०२।।
जे जे घडी जाय ते ते काळ खाय । प्राण्या तरणोपाय काय केला ।।तु.गा.क्षे.४०६.०३।।
तुका म्हणे करीं सर्वही तूं त्याग । अर्पीं हें सर्वांग जगदीशीं ।।तु.गा.क्षे.४०६.०४।।
भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ।।तु.गा.क्षे.४०७.०१।।
उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातीचे ।।तु.गा.क्षे.४०७.०२।।
येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ।।तु.गा.क्षे.४०७.०३।।
तुका म्हणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ।।तु.गा.क्षे.४०७.०४।।
भक्तिवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ।।तु.गा.क्षे.४०८.०१।।
एक एक योनी कोटि कोटि फेरा । मनुष्यदेहवारा मग लागें ।।तु.गा.क्षे.४०८.०२।।

वीस लक्ष योनि वृक्षांमाजी घ्यावा । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ।।तु.गा.क्षे.४०८.०३।।
अक्रा लक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या । दश लक्ष भोगाव्या पक्षांमध्यें ।।तु.गा.क्षे.४०८.०४।।
तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवांभीतरीं चार लक्ष ।।तु.गा.क्षे.४०८.०५।।
तुका म्हणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ।।तु.गा.क्षे.४०८.०६।।
भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योति । पंचप्राण जीवेंभावें ओवाळूं आरती ।।तु.गा.क्षे.४०९.०१।।
ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा । दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेवीन माथा ।।तु.गा.क्षे.४०९.०२।।
काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहातां जाती ।।तु.गा.क्षे.४०९.०३।।
राही रखूमाई दोन्ही दों बाहीं । मयूरपिच्छचामरें ढाळिती ठायीं ठायीं ।।तु.गा.क्षे.४०९.०४।।
तुका म्हणे दीप घेउनि उन्मन ती शोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ।।तु.गा.क्षे.४०९.०५।।

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ॐ | तु.गा.३३३९.००२ | आतां माझ्या मना होई सावधान। ॐ पुण्याची जाण कार्यसिद्धि |
| २ | ॐ | तु.गा.३७४१.००१ | हरि ॐ तत्सदिती सूत्राचें जें सार। कृपेचा सागर पांडुरंग |
| ३ | ॐ | तु.गा.३७४१.००२ | हरि ॐ दत्त उदात्त अनुदात्त। प्रचुररहित पांडुरंग |
| ४ | ॐकार | तु.गा.३७७१.००६ | गातां तूं ॐकार टाळी नादेश्वर। नाचावया थार नाहीं कोठें |
| ५ | ॐकाराचें | तु.गा.३९२८.००३ | ॐकाराचें बीज। हातीं आमुचें तें निज |
| ६ | अंक | तु.गा.१३३७.००३ | अंक तो पडिला हरिचा मी दास। भेद पंगतीस करूं नये |
| ७ | अंक | तु.गा.३८४९.००३ | पापपुण्य कैसे भांजिले अंक। दशकाचा एक उरविला। जाणोनियां काय होतोसी नेणता। शून्य ठाव रिता नाहीं नाहीं |
| ८ | अंकित | तु.गा.००२६.००९ | त्यांचा हा अंकित सर्व भावें हरी । तुका म्हणे करी सर्व काज |
| ९ | अंकित | तु.गा.००३७.००१ | भाव दावी शुद्ध देखोनियां चित्त । आपल्या अंकित निजदासां |
| १० | अंकित | तु.गा.००६९.००६ | जिहीं म्हणविलें हरिचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी |
| ११ | अंकित | तु.गा.००७०.००१ | म्हणविती भक्त हरीचे अंकित । करितो अनंत हित त्यांचें |
| १२ | अंकित | तु.गा.००९२.००४ | सकळही केलीं आपुलीं अंकित। राहे गोपीनाथ मथुरेसी |
| १३ | अंकित | तु.गा.०१०८.००५ | चतुरांच्या राया मी तुझे अंकित। जालों शरणागत देवदेवा |
| १४ | अंकित | तु.गा.०२६८.००४ | तुका म्हणे भोळियांचा। देव साचा अंकित |
| १५ | अंकित | तु.गा.०३५४.००७ | चरणीं ठेवा चित्त। म्हणवा देवाचें अंकित |
| १६ | अंकित | तु.गा.०३५६.०९८ | होती जीव त्याचे सकळही जंत। परि ते अंकित संचिताचे |
| १७ | अंकित | तु.गा.०७२१.००५ | म्हणोनि झालों शरणागत। तुझा दास मी अंकित। यास न लगे संचित। झालों निश्चिंत तुका म्हणे |
| १८ | अंकित | तु.गा.०७२५.००५ | राखे दारवंटा बळीचा। सारथी झाला अर्जुनाचा। दास सेवकांचा। होय साचा अंकित |
| १९ | अंकित | तु.गा.०७३६.००४ | गांढ्या तरी भावाचा अंकित। बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत। ओंगळ तरी कुब्जेशीं रत। भ्याड अनंत बहु पापा |
| २० | अंकित | तु.गा.०७४४.००४ | तुका म्हणे अंकित केला। खालीं आला वचनें |
| २१ | अंकित | तु.गा.०७७८.००१ | तुझा शरणागत। जन्मोजन्मींचा अंकित |
| २२ | अंकित | तु.गा.०८२०.००३ | दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा |
| २३ | अंकित | तु.गा.१५२०.००१ | तुझा दास मज म्हणती अंकित। अवघे सकळिक लहान थोर |
| २४ | अंकित | तु.गा.१५२२.००४ | पीडों नेदी पशु आपुले अंकित। आहे जें उचित तैसें करा |
| २५ | अंकित | तु.गा.१५४४.००३ | इंद्रियांचीं आम्ही पांगिलों अंकित। त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसें |
| २६ | अंकित | तु.गा.१६४२.००१ | तुझा शरणागत जालों मी अंकित। करीं माझें हित पांडुरंगा |
| २७ | अंकित | तु.गा.१७०६.००२ | जालों अंकित अंकिला। तुमचा मुकलों मागिला |

| | | | |
|---|---|---|---|
| २८ | अंकित | तु.गा.१७९९.००५ | अंकित अंकिला दास तुझा देवा। संकल्प हा जीवा तुका म्हणे |
| २९ | अंकित | तु.गा.१९७६.००२ | जाला हाहाकार। आले अंकित जुंझार। शंखचक्रांचे शृंगार। कंठीं हार तुळसीचे |
| ३० | अंकित | तु.गा.२०११.००२ | ब्रह्मांडनायक मी त्याचा अंकित। काय यमदूत करिती काळ |
| ३१ | अंकित | तु.गा.२०३८.००५ | तुका म्हणे जालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे |
| ३२ | अंकित | तु.गा.२०७९.००१ | बळियाचे अंकित । आम्ही जालों बळिवंत |
| ३३ | अंकित | तु.गा.२०८५.००६ | तुका म्हणे ज्याच्या नामाचे अंकित। राहिलों निश्चिंत त्याच्या बळें |
| ३४ | अंकित | तु.गा.२१९४.००५ | ऐसें जाणा हो निभ्रांत । देव वैष्णवांचा अंकित । अलिप्त अतीत । परमित त्यासाठीं |
| ३५ | अंकित | तु.गा.२२४८.००५ | नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून |
| ३६ | अंकित | तु.गा.२२९८.००१ | हरिजनां प्राण विकली हे काया । अंकित मी तया घरीं झालों |
| ३७ | अंकित | तु.गा.२३०६.००३ | नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित |
| ३८ | अंकित | तु.गा.२५३९.००२ | त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित |
| ३९ | अंकित | तु.गा.२६१८.००७ | भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ । म्हणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि |
| ४० | अंकित | तु.गा.२८३५.००४ | रसनाशिश्नाचे अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत |
| ४१ | अंकित | तु.गा.२९५२.०१० | तुका म्हणे झाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते |
| ४२ | अंकित | तु.गा.२९५३.००१ | कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित निरंतर |
| ४३ | अंकित | तु.गा.३०२५.००४ | तुका म्हणे चित्त। नाहीं जयाचें अंकित |
| ४४ | अंकित | तु.गा.३२४५.००६ | तया दंडी यमदूत । झाले तयाचे अंकित । तुका म्हणे व्रत । एकादशीं चुकलिया |
| ४५ | अंकित | तु.गा.३३६७.००२ | तुझे भिडे माझें बहु झाले घात। केलों या अंकित दुर्जनाचा |
| ४६ | अंकित | तु.गा.३६७७.००२ | ऐसा भक्ताचा अंकित। लागे तैसी लावी प्रीत |
| ४७ | अंकित | तु.गा.क्षे.०४८.०४ | हरीचे अंकित असती विरळागत। तयांसी अच्युत कृपा करी |
| ४८ | अंकित | तु.गा.क्षे.०६७.०८ | म्हणविसी देवा दासांचा अंकित। मनाचा संकेत पाहोनियां |
| ४९ | अंकित | तु.गा.क्षे.१८५.०३ | नाहीं आणिकांचा गुमान। ज्याचें अंकित त्यावांचून |
| ५० | अंकित | तु.गा.क्षे.२१५.०४ | काय तूं एकाचा आहेसी अंकित। होईल कृपावंत तुका म्हणे |
| ५१ | अंकित | तु.गा.क्षे.३४२.०२ | तुझे संगतीनें मोठा झाला घात। झालों मी अंकित दुर्जनाचा |
| ५२ | अंकिता | तु.गा.००८३.००२ | अंकिता सावध केलें नारायणें। गोपाळ गोधनें सकळही |
| ५३ | अंकिता | तु.गा.१४३१.००३ | वंशपरंपरा दास मी अंकिता। तुका मोकलितां लाज कोणा |
| ५४ | अंकिता | तु.गा.२६४३.००३ | याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणीक वेव्हार चालतीना |

| | | | |
|---|---|---|---|
| ५५ | अंकिता | तु.गा.३४८८.००३ | अंकिता ऐसिया। होईल पावविलें ठाया |
| ५६ | अंकिताचा | तु.गा.१६३५.००५ | अंकिताचा भार वागवावा माथां। परिसावी अनंता विज्ञापना |
| ५७ | अंकिताचा | तु.गा.१८५०.००३ | अंकिताचा असे अभिमान देवा। समर्पूनि हेवा असों पायीं |
| ५८ | अंकिताची | तु.गा.१८०९.००२ | पुरवीं वासना साच सर्व जाणा। आम्हां नारायणा अंकिताची |
| ५९ | अंकिताची | तु.गा.२३७५.००५ | तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हां लाज थोरी अंकिताची |
| ६० | अंकिताचें | तु.गा.क्षे.३०८.०२ | दुर्जना चांडाळा करीं निर्दाळण। करीं संरक्षण अंकिताचें |
| ६१ | अंकिताच्या | तु.गा.२०८४.००२ | आइतें भोजन खेळणें अंतरीं। अंकिताच्या शिरीं भार नाहीं |
| ६२ | अंकितासी | तु.गा.००८३.००१ | समागमें असे हरि नेणतियां। नेदी जाऊं वायां अंकितासी |
| ६३ | अंकितासी | तु.गा.३९१९.००३ | बळिवंत जेणें रचिलें सकळ। आम्हां त्याचें बळ अंकितासी |
| ६४ | अंकिला | तु.गा.०७८३.००१ | सिद्धिचा दास नव्हे श्रुतीचा अंकिला। होईन विठ्ठला दास तुझा |
| ६५ | अंकिला | तु.गा.०७८३.००६ | तुका म्हणे तुझा होईन अंकिला। न भें मी विठ्ठला कळिकाळासी |
| ६६ | अंकिला | तु.गा.०८२०.००३ | दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा |
| ६७ | अंकिला | तु.गा.११११.००२ | जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं |
| ६८ | अंकिला | तु.गा.१५२१.००३ | तुझा दास म्हणवीन मी अंकिला। भोगितां विठ्ठला गर्भवास |
| ६९ | अंकिला | तु.गा.१७०६.००२ | जालों अंकित अंकिला। तुमचा मुकलों मागिला |
| ७० | अंकिला | तु.गा.१७९९.००५ | अंकित अंकिला दास तुझा देवा। संकल्प हा जीवा तुका म्हणे |
| ७१ | अंकिला | तु.गा.२२४१.००१ | प्रमाण त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला |
| ७२ | अंकिलीं | तु.गा.२११९.००३ | कृपेचीं पोसणीं ठायींचीं अंकिलीं। म्हणऊनि लागली त्यास चिंता |
| ७३ | अंकिले | तु.गा.१११४.००५ | तुका म्हणे आम्ही मृत्यूलोकीं भले । तुझेचि अंकिले पांडुरंगा |
| ७४ | अंकिलेपणें | तु.गा.०७१८.००६ | अंकिलेपणें आनंदरूप। आतळों नये पुण्यपाप। सारूनि ठेविले संकल्प। तुका म्हणे आपेंआप एकाएकीं |
| ७५ | अंकीत | तु.गा.००११.०१० | केली नारायणें आपुलीं अंकीत । तोचि त्यांचें हित सर्व जाणे |
| ७६ | अंकुनियां | तु.गा.१३९३.००४ | तुका म्हणे आतां आहे तेथें असो। अंकुनियां बसों पायांपाशीं |
| ७७ | अंकुर | तु.गा.०९४०.००३ | बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन तें सार करायाची |
| ७८ | अंकुर | तु.गा.११९८.००३ | संयोगें विस्तार। वाढी लागतो अंकूर |
| ७९ | अंकुर | तु.गा.३०७९.००४ | तुका म्हणे कैंचि लवी । ठेंग्या केवीं अंकुर |
| ८० | अंकुर | तु.गा.३१९४.००३ | बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर। गुणाचे प्रकार ज्याचे तया |
| ८१ | अंकुर | तु.गा.३४८५.००२ | बीज तो अंकुर आच्छादिला पोटीं। अनंता शेवटीं एकाचिया |

| | | | |
|---|---|---|---|
| ८२ | अंकुर | तु.गा.३८७०.००२ | मग कासयानें पुन्हा संवसार। बीजाचे अंकुर दग्ध होती |
| ८३ | अंकुर | तु.गा.३९२५.००४ | बीज तो अंकुर पत्र शाखा फळ। प्राप्तबीज मूळ अवघें नासे |
| ८४ | अंकुर | तु.गा.४०६२.००४ | कईं नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वी जळ सागर । वाहाती पूर आनंदाचे |
| ८५ | अंकुश | तु.गा.३४०५.००४ | तुका म्हणे मना पाहिजे अंकुश। नित्य नवा दिस जागृतीचा |
| ८६ | अंकुशाचा | तु.गा.११९०.००२ | ऐरावत रत्न थोर। त्यासी अंकुशाचा मार |
| ८७ | अंग | तु.गा.००४७.००३ | मागें सरे माय पाऊलापाऊलीं । आपलेंच घाली धाकें अंग |
| ८८ | अंग | तु.गा.००४७.००४ | अंग राखोनियां माय खेद करी । अंतरीं हें हरी जाणवलें |
| ८९ | अंग | तु.गा.०१०९.०२० | अनुतापें झाल्या संतप्त त्या बाळा। टाकिती विव्हळा धरणीं अंग |
| ९० | अंग | तु.गा.०११८.००३ | मागें बहुतांचा अंतरला संग। मुळें जयाचिया तेणें केला त्याग। पैल पाहातां ते हरपलें अंग। खुंटली वाट नाहींसें झालें जग वो |
| ९१ | अंग | तु.गा.०१३१.००१ | विरहतापें फुंदे छंद करित जाती। हा गे तो गे सावधान सर्वेचि दुश्चिती। न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं। वेगळीच पडों पाहे कुळाहुनि याती वो |
| ९२ | अंग | तु.गा.०१३३.००१ | खेळतां मुरारी जाय सरोवरातिरीं। तंव नग्नचि नारी तेथें देखियेल्या। मांडिलें विंदान ख्याल सुखाचें संधान। अंग लपवूनी मान पिलंगत चाले |
| ९३ | अंग | तु.गा.०१५८.००१ | भोजनाच्या काळीं। कान्हो मांडियेली आळी। काला करी वनमाळी। अन्नें एकवटा। देईं निवडूनी। माते म्हणतो जननी। हात निपटूनी मेदिनी। वरी अंग घाली |
| ९४ | अंग | तु.गा.०१५८.००४ | त्याचें तयाकुन। करवितां तुटे भान। तंव झालें समाधान। उठोनियां बैसे। मातें बरें जाणविले। अंग चोरूनी आपुलें। तोडियेलें एका बोलें। कैसें सुखदु:ख |
| ९५ | अंग | तु.गा.०३३९.००८ | तुका म्हणे नटें दावूनियां सोंग। लवों नेदीं अंग भक्तिभावें |
| ९६ | अंग | तु.गा.०३७८.००२ | पाईक तों जाणे मारितें अंग। पाइकासी भंग नाहीं तया |
| ९७ | अंग | तु.गा.०४२८.०२३ | चित्त मिले तो सब मिले। नहिं तो फुकट संग। पानी पाथर एक ठोर। कोरा न भिजे अंग |
| ९८ | अंग | तु.गा.०४६३.००३ | करूनियां मर्दन सारिलें पाणी। न्हाले देव अंग पुसी भवानी |
| ९९ | अंग | तु.गा.०६६५.००३ | नादें लुब्ध झाला मृग। देह विसरला अंग |
| १०० | अंग | तु.गा.०७१७.००५ | करूनि नातळों संसारा। अंग भिन्न राखिला पसारा। कळवळा तो जीवनीं खरा। बीजाचा थारा दुरी आघात |
| १०१ | अंग | तु.गा.०७४५.००२ | गाऊं नाचूं टाळी वाहूं गीत छंदें। डोलवूं विनोदें अंग तेणें |
| १०२ | अंग | तु.गा.०७९८.००२ | विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे छाया माझी मज |
| १०३ | अंग | तु.गा.०८३४.००३ | येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें |

| | | | |
|---|---|---|---|
| १०४ | अंग | तु.गा.०८६१.००१ | बेगडाचा रंग राहे कोण काळ । अंग हें पितळ न देखतां |
| १०५ | अंग | तु.गा.०८६२.००३ | तुम्हां निमित्यासी सांपडलें अंग । नेदावा हा संग विचारिलें |
| १०६ | अंग | तु.गा.०८८२.००४ | आपुलेंचि अंग तुम्ही वोडविलें । त्याचें निवारलें महादु:ख |
| १०७ | अंग | तु.गा.०९५२.००१ | उद्वेगासी बहु फांकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें |
| १०८ | अंग | तु.गा.११०३.००३ | भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परी संगें नव्हे तैसा |
| १०९ | अंग | तु.गा.११५७.००१ | वोढविलें अंग। आतां करूनि घ्यावें सांग |
| ११० | अंग | तु.गा.११९४.००३ | फेडा आतां पांग। अंगीं लपवुनी अंग |
| १११ | अंग | तु.गा.१४५०.००३ | सेवा तरी इच्छा सांग। चोरिलें अंग साहेना |
| ११२ | अंग | तु.गा.१६४९.००३ | यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग। उणें पडतां अंग क्षोभ घडे |
| ११३ | अंग | तु.गा.१६७५.००३ | अंगें अंग मेळउनी। करी धणी फेडावया |
| ११४ | अंग | तु.गा.१७९५.००४ | तुका म्हणे आम्हां गोवळ्याचा संग। राखावें तें अंग जाणतसों |
| ११५ | अंग | तु.गा.१८७६.००२ | करितां घायाळाचा संग। अंगें अंग माखावें |
| ११६ | अंग | तु.गा.१८८४.००३ | नेणती भागली। कडे घेतां अंग घाली |
| ११७ | अंग | तु.गा.१९३३.००२ | देह उपचारें पोळतसे अंग। विषतुल्य चांग मिष्टान्न तें |
| ११८ | अंग | तु.गा.२०५४.००४ | तुका म्हणे पांडुरंगे । अंग संगें कवळिलें |
| ११९ | अंग | तु.गा.२०७७.००३ | त्याचिया अन्यायें भोगा माझें अंग। सकळही लाग घ्यावा लागे |
| १२० | अंग | तु.गा.२०९८.००४ | तुका म्हणे कुर्वाळितां। अंग सत्ता संगाची |
| १२१ | अंग | तु.गा.२१६३.००२ | जालें दर्पणाचें अंग। ज्याचा त्यासीं दावी रंग |
| १२२ | अंग | तु.गा.२१९२.००२ | अवघें घडे येणें सांग। भक्त देवाचें तें अंग |
| १२३ | अंग | तु.गा.२२३०.००१ | नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी |
| १२४ | अंग | तु.गा.२२७१.००३ | पाप पुण्य त्यांचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्व भावें |
| १२५ | अंग | तु.गा.२२८०.००१ | संतसेवेसी अंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी |
| १२६ | अंग | तु.गा.२३३६.००१ | चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग |
| १२७ | अंग | तु.गा.२३५०.००२ | नाहीं कोठें रितें अंग । नित्य रंग नवाचि |
| १२८ | अंग | तु.गा.२३५४.००४ | न संडी मारग । येथें न चोरूनि अंग |
| १२९ | अंग | तु.गा.२४०७.००३ | असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती |
| १३० | अंग | तु.गा.२४०९.००३ | नये आळसें मोडूं अंग । कथें कानवडे ढुंग । हेळणेचा रंग । दावील तो चांडाळ |

| | | | |
|---|---|---|---|
| १३१ | अंग | तु.गा.२४१७.००१ | कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप |
| १३२ | अंग | तु.गा.२४९३.००३ | काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय |
| १३३ | अंग | तु.गा.२६०४.००२ | अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग |
| १३४ | अंग | तु.गा.२७३१.००२ | हेंचि शूरत्वाचें अंग । हारि आणिला श्रीरंग |
| १३५ | अंग | तु.गा.२७३३.००१ | कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरीचें चांग |
| १३६ | अंग | तु.गा.२७९३.००३ | राख लावुनि अंग मळी । वायां टोके मी एक बळी । वासने हातीं बांधवी नळी । त्यासी येऊनी काळ गिळी उगळी रे विठ्ठल |
| १३७ | अंग | तु.गा.२८९२.००१ | कथें उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा |
| १३८ | अंग | तु.गा.२९४७.००१ | उरा लावी ऊर आळंगितां कांता । संतांसी भेटतां अंग चोरी |
| १३९ | अंग | तु.गा.३००२.००३ | भुलल्याचें अंग आपणा पारिखें । छंदाचें सारिखें वर्ततसे |
| १४० | अंग | तु.गा.३०३१.००३ | काळेंकुट पितळ सोनें शुद्ध रंग। अंगाचेंच अंग साक्षी देतें |
| १४१ | अंग | तु.गा.३०४४.००४ | तुका म्हणे नाचती पोरें। खोडितां येरें अंग दुःखें |
| १४२ | अंग | तु.गा.३०६८.००३ | न कळे विंचासी कुरवाळिलें अंग। आपले ते रंग दावीतसे |
| १४३ | अंग | तु.गा.३०७१.००३ | स्मरणाचा राग। क्रोधे विटाळलें अंग |
| १४४ | अंग | तु.गा.३०८०.००२ | तार्किकाचें अंग आपणा पारिखें। माजिऱ्यासारिखे वाईचाळे |
| १४५ | अंग | तु.गा.३०८३.००१ | दुर्जनाचें अंग अवघेंचि सरळ। नर्काचा कोथळ सांठवला |
| १४६ | अंग | तु.गा.३०८९.००६ | तुका म्हणे किती सांगावें पृथक। अंग कुंभीपाक दुर्जनाचें |
| १४७ | अंग | तु.गा.३२३६.००२ | एक सुत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपडितां अंग कांपे |
| १४८ | अंग | तु.गा.३२८१.००४ | तुका म्हणे गेल्या षड्ऊर्मी अंग। सांडुनियां मग ब्राह्मण तो |
| १४९ | अंग | तु.गा.३२९९.००२ | मग त्याचें जाणें निकें। अंग वोढवीं कौतुकें |
| १५० | अंग | तु.गा.३३८६.००१ | ओलें मूळ भेदी खडकाचें अंग। अभ्यासासी सांग कार्यसिद्धि |
| १५१ | अंग | तु.गा.३४०९.००३ | मनाच्या तळमळें। चंदनेंही अंग पोळे |
| १५२ | अंग | तु.गा.३४४६.००३ | दर्शनाची उरी। अवस्थाचि अंग धरी |
| १५३ | अंग | तु.गा.३४७९.००२ | मिळालिया संतसंग। समर्पितां भलें अंग |
| १५४ | अंग | तु.गा.३५०१.००१ | मागील ते आटी येणें घडे सांग। सुतविलें अंग एका सूत्रें |
| १५५ | अंग | तु.गा.३५२०.००३ | अवघें साकरेचें अंग। नये व्यंग निवडितां |
| १५६ | अंग | तु.गा.३५३३.००३ | मेळवितां अंगें अंग। प्रेमरंग वाढतो |

| | | | |
|---|---|---|---|
| १५७ | अंग | तु.गा.३५९२.००२ | तारूं भला पांडुरंग। पाय भिजों नेदी अंग |
| १५८ | अंग | तु.गा.३६८७.००४ | उजवे वाम भाग। तुका म्हणे एकचि अंग |
| १५९ | अंग | तु.गा.३७०३.००२ | येर येरां जडलें कैसें। जीवा अंग जैसें तैसें |
| १६० | अंग | तु.गा.३७२३.००२ | नेदी मग फिरों मागें। अंगा अंग संचरे |
| १६१ | अंग | तु.गा.३७४२.००३ | जाणिवेचें नेदी अंग। दिसों रंग निवडेना |
| १६२ | अंग | तु.गा.३७६१.००३ | उदकावरील तरंग। तरंग उदकाचें अंग |
| १६३ | अंग | तु.गा.३७९१.००१ | मुसावलें अंग। रंगीं मेळविला रंग |
| १६४ | अंग | तु.गा.३७९७.००१ | तेणें सुखें माझें निवविलें अंग। विठ्ठल हें जग देखियेलें |
| १६५ | अंग | तु.गा.३८००.००१ | पदोपदीं दिलें अंग। झालें सांग कारण |
| १६६ | अंग | तु.गा.३८६०.००१ | माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया। अंग आणि छाया जयापरी |
| १६७ | अंग | तु.गा.३८९२.००३ | लपविलें अंगें अंग। दिला संग होता तो |
| १६८ | अंग | तु.गा.३९४४.००१ | आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें |
| १६९ | अंग | तु.गा.३९५२.००२ | ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला |
| १७० | अंग | तु.गा.३९५४.००३ | विसांवलें अंग दिसे । सरिसें सरिसें अनुभवें |
| १७१ | अंग | तु.गा.४०२४.००२ | भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग |
| १७२ | अंग | तु.गा.४१३०.००५ | शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग। त्याचें चिरलें अंग ठायीं ठायीं। जाचउनि प्राण घेतला मागें। पुढें न पाहतां कांहीं |
| १७३ | अंग | तु.गा.क्षे.०३६.०३ | नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग । सेंदुरविलेपनें चांग । मुगुटीं नाग मिरविला |
| १७४ | अंग | तु.गा.क्षे.२६४.०३ | कोठें लपविलें तें अंग। होता संग दिला तो |
| १७५ | अंग | तु.गा.क्षे.२९७.०३ | अवघियांचा येऊं लाग। नेदूं अंग शिवाय |
| १७६ | अंग | तु.गा.क्षे.४००.०६ | जवळ मी जाते अंगा अंग लावूं । नेदी जवळ येऊं कांटाळतो |
| १७७ | अंगकांति | तु.गा.१७९०.००२ | पुष्ट झाली अंगकांति। आनंद न समाये चित्तीं। कवतुकें प्रीती। गाऊं नाचों उल्हासें |
| १७८ | अंगकांति | तु.गा.१८९१.००३ | कोमळ कंटक तीक्षण अगरीं। पोचट ते वरी अंगकांति |
| १७९ | अंगकांति | तु.गा.२५३६.००३ | प्रेमरसें झाली पुष्ट अंगकांति । त्रिविध नासती ताप क्षणें |
| १८० | अंगकांति | तु.गा.क्षे.३७२.०५ | अंगकांति परतली। चिरगुटा ऐसी झाली |
| १८१ | अंगकांती | तु.गा.०४८२.००१ | सुंदर अंगकांती मुख भाळ सुरेख। बाणली उटी अंगीं टिळा साजिरा रेख। मस्तकीं मुगुट कानीं कुंडलें तेज फांके। आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके |
| १८२ | अंगकांती | तु.गा.३७४८.००२ | कर दोनी कटीं राहिलासे उभा। सांवळी हे प्रभा अंगकांती |

| | | | |
|---|---|---|---|
| १८३ | अंगण | तु.गा.२२२८.००३ | तुमची उष्टावळीं तें माझें भोजन । झाडावें अंगण केरपुंजे |
| १८४ | अंगण | तु.गा.क्षे.१६५.०२ | अंगें झाडीन अंगण। त्याचें दास्यत्व करीन |
| १८५ | अंगणा | तु.गा.०२६४.००१ | जननिया बाळका रे घातलें पाळणा। पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा। अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा। वैखरी धरूनि हातीं भाव दावी खेळणा |
| १८६ | अंगणीं | तु.गा.०८३१.००३ | जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझें नाहीं मनीं मानसीं हें |
| १८७ | अंगणीं | तु.गा.१०९९.००१ | सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवांचे न्हाणीं होईन किडा |
| १८८ | अंगणीं | तु.गा.१११४.००४ | करूनि कामारी दास दीनाहुनी । आपुल्या अंगणीं ठाव मज |
| १८९ | अंगणीं | तु.गा.११२६.००५ | तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचें घरीं |
| १९० | अंगणीं | तु.गा.१७९९.००३ | लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं। पाहेन भरोनि डोळे मुख |
| १९१ | अंगणीं | तु.गा.२०१४.००१ | घालूनी लोळणी पडलों अंगणीं। सिंचा सिंचवणी तीर्थवरी |
| १९२ | अंगणीं | तु.गा.२२९७.००१ | सोलीव जें सुख अतिसुखाहुनी । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या |
| १९३ | अंगणीं | तु.गा.२२९८.००३ | आस करूनियां राहेन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी |
| १९४ | अंगणीं | तु.गा.३२१७.००२ | उभी कामधेनु मांगाचें अंगणीं । तिशी काय ब्राह्मणीं वंदूं नये |
| १९५ | अंगणीं | तु.गा.क्षे.१२९.०३ | धन्य यशोदेचें प्रारब्ध। नाचे अंगणीं गोविंद |
| १९६ | अंगणीच्या | तु.गा.२३८०.००१ | सर्वपक्षीं हरि साहे सखा जाला । ओल्या अंगणीच्या कल्पलता त्याला |
| १९७ | अंगबळें | तु.गा.३१६८.००४ | सेलडेरा आणि निसरभोवंडी। उचली बाळे धोंडी अंगबळें |
| १९८ | अंगभूत | तु.गा.२३८१.००२ | मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति |
| १९९ | अंगभूत | तु.गा.३०३३.००३ | अंगभूत म्हूण पूजितो वाहाणा। म्हणतां शहाणा येईल कैसा |
| २०० | अंगभूत | तु.गा.३८०१.००१ | तुझें अंगभूत। आम्ही जाणतों समस्त |
| २०१ | अंगभूतां | तु.गा.४०६३.००४ | काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां |
| २०२ | अंगराख्या | तु.गा.१४६९.००१ | कां रे ना पवसी धांवण्या। अंगराख्या नारायणा |
| २०३ | अंगलग | तु.गा.०३९१.००३ | अवघे अंगलग तुझे वधियेले वीर। होईं शरणागत किंवा युद्धासी सादर |
| २०४ | अंगवण | तु.गा.४१३७.०२८ | केवढी ये रांडेची अंगवण। भ्रमविले अवघें जन। याती अठरा चाऱ्ही वर्ण। कर्दम करूनि विटाळिले |
| २०५ | अंगवण | तु.गा.क्षे.३३८.०४ | ऐसी अंगवण नाहीं मज देवा। करीतसे हेवा भेटावया |
| २०६ | अंगसंग | तु.गा.००८१.००८ | समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुर्वाळितां अंगसंग |
| २०७ | अंगसंग | तु.गा.०१०६.००२ | गाती धणीवरी केला अंगसंग। पाहिला श्रीरंग डोळेभरी |
| २०८ | अंगसंग | तु.गा.०३०२.००३ | बळियाचा अंगसंग झाला आतां। नाहीं भय चिंता तुका म्हणे |

| | | | |
|---|---|---|---|
| २०९ | अंगसंग | तु.गा.०३०८.००३ | तुका म्हणे अंगसंग एके ठायीं। असों जेथें नाहीं दुजें कोणी |
| २१० | अंगसंग | तु.गा.०९५८.००३ | कृपा झाली मग नलगे अंगसंग । निजध्यासें रंग चढताहे |
| २११ | अंगसंग | तु.गा.०९६६.००३ | सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग |
| २१२ | अंगसंग | तु.गा.११५२.००३ | हरिजनासी भेटी। नहो अंगसंग तुटी |
| २१३ | अंगसंग | तु.गा.२०१६.००४ | करीन अंगसंग बाळकाचे परी। बैसेन तो वरी नुतरें कडिये |
| २१४ | अंगसंग | तु.गा.३०८९.००५ | दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग। बोलिलासे त्याग देशाचा त्या |
| २१५ | अंगसंग | तु.गा.३५१८.००२ | सर्व जाण माझा स्वामी पांडुरंग। तया अंगसंग गोपाळासी |
| २१६ | अंगसंगा | तु.गा.१०१७.००४ | तुका म्हणे पांडुरंगा । अंगसंगा भिन्न करा |
| २१७ | अंगसंगा | तु.गा.२७४०.००२ | माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठेवी अंगसंगा । विश्वासिया जवळी |
| २१८ | अंगसंगाचीं | तु.गा.१०४३.००२ | अंगसंगाचीं उत्तरें । सलगीसेवनें लेंकुरें |
| २१९ | अंगसंगीं | तु.गा.२३४८.००२ | करितों पायाशीं सलगी । नये बैसों अंगसंगीं |
| २२० | अंगसंगें | तु.गा.००६१.००१ | भारवाही नोळखती या अनंता । जवळी असतां अंगसंगें |
| २२१ | अंगसंगें | तु.गा.००६१.००२ | अंगसंगें तयां न कळे हा देव । कळोनि संदेह मागुताला |
| २२२ | अंगसंगें | तु.गा.००७६.००५ | मुखें भक्तांचिया बोलतो आपण । अंगसंगें भिन्न नाहीं दोघां |
| २२३ | अंगसंगें | तु.गा.००८४.००१ | अनुसरे तया फिरों नेदी मागें। राहे अंगसंगें समागमें |
| २२४ | अंगसंगें | तु.गा.००८४.००२ | अंगसंगें असे कर्मसाक्ष देव। जैसा ज्याचा भाव तैसें फळ |
| २२५ | अंगसंगें | तु.गा.०११३.००४ | चिंता करितां हरिली नारायणें। अंगसंगें मिनतां दोघेंजणें। सुखें निर्भर झालियें त्याच्या गुणें। तुका म्हणे खुंटलें येणें जाणें वो |
| २२६ | अंगसंगें | तु.गा.०२४४.००६ | रोमांच गुडिया डोलविती अंगें। भावबळें खेळविती सोंगें रे। तुका म्हणे कंठ सद्गदित दाटे। या विठोबाच्या अंगसंगें रे |
| २२७ | अंगसंगें | तु.गा.०२८०.००२ | आतां करी कां रे हाकारा। सहस्त्रनामें एकसरा। दवडिते खेचरा। अंगसंगें धरूनी |
| २२८ | अंगसंगें | तु.गा.०२८०.००६ | पांडवें बापुडीं। वांज केलीं फिरती वेडीं। धांवोनियां काढी। अंगसंगें त्राहाटविलीं |
| २२९ | अंगसंगें | तु.गा.०५२५.००५ | रोकडी पातली अंगसंगें जरा। आतां उजगरा कोठवरी |
| २३० | अंगसंगें | तु.गा.०७२२.००२ | आपुला न विचारी सीण। न धरी अंगसंगें भिन्न। अंगीकारिलें राखें दीन। देईं जीवन आवडीचें |
| २३१ | अंगसंगें | तु.गा.१७८५.००२ | कृपाळुवे पांडुरंगे। अंगसंगे जिवलगे |
| २३२ | अंगसंगें | तु.गा.२०६०.००२ | नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापूनियां |
| २३३ | अंगसंगें | तु.गा.२०८९.००३ | तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी। मज सवें मिठी अंगसंगें |
| २३४ | अंगसंगें | तु.गा.२५९९.००३ | पितृसेवापुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें |

| | | | |
|---|---|---|---|
| २३५ | अंगसंगें | तु.गा.२५९९.००४ | अंगसंगें रंग क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा |
| २३६ | अंगसंगें | तु.गा.२९५२.००७ | माझ्या अंगसंगें तुम्हांसी विश्रांती । मग धड गति नाहीं तुमची |
| २३७ | अंगसंगें | तु.गा.३५५०.००२ | कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी। दुधा नाहीं भेटी अंगसंगें |
| २३८ | अंगसंगें | तु.गा.३९७८.००२ | सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें कैसें शोभा देती |
| २३९ | अंगा | तु.गा.०१४८.००१ | उदासीना पावल्या वेगीं। अंगा अंगीं जडलिया |
| २४० | अंगा | तु.गा.०२४८.००२ | बहु अंगा आले डाव। स्थिर नाहीं कोठें पाव |
| २४१ | अंगा | तु.गा.०२८३.००२ | एकवीरा आली अंगा। आतां निवारील रोगा। माझ्या भक्तापाशीं सांगा। पूजा भावें करावी |
| २४२ | अंगा | तु.गा.०३२२.००२ | मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा। अंतर हें सांगा नेदी पुढें |
| २४३ | अंगा | तु.गा.०४१२.००२ | त्याचा विटाळ नको अंगा। पांडुरंगा माझिया |
| २४४ | अंगा | तु.गा.०५४२.००२ | करावा जतन आपुला विश्वास। अंगा आला रस आवडीचा |
| २४५ | अंगा | तु.गा.०५४५.००२ | ऐसें करी गा पांडुरंगा। प्रेम वोसंडेसें अंगा |
| २४६ | अंगा | तु.गा.०५५९.००४ | तुका म्हणे अंगा। कोण दशा आली सांगा |
| २४७ | अंगा | तु.गा.०७०८.००५ | होईल संचिताची सत्ता। अंगा येईल पराधीनता। ठाव तो न दिसे लपतां। बहु चिंता प्रवर्तली |
| २४८ | अंगा | तु.गा.०७१९.००४ | येती अंगा वसती लक्षणें। अंतरीं देवें धरिलें ठाणें। आपणचि येती तयाचे गुणें। जाणें येणें खुंटे ये वस्तीचें |
| २४९ | अंगा | तु.गा.०७७१.००१ | विश्वासिया नाहीं लागत सायास। अनायासे रंग अंगा येतो |
| २५० | अंगा | तु.गा.०९१८.००२ | कैसें समाधान राहे पांडुरंगा । नलगेचि अंगा आणी कांहीं |
| २५१ | अंगा | तु.गा.०९६०.००४ | बहुतांचे बहु पालटलों साळे । बहु आला काळें रंग अंगा |
| २५२ | अंगा | तु.गा.१०१८.००१ | लागों दिलें अंगा । ऐसें कां गा सन्निध |
| २५३ | अंगा | तु.गा.१०२३.००४ | तुका म्हणे नसतें अंगा । येत संगा सारिखे |
| २५४ | अंगा | तु.गा.१२६३.००२ | नाहीं लागों दिलें अंगा। आड ठाकलों मी जगा |
| २५५ | अंगा | तु.गा.१३३०.००४ | तुका म्हणे अंगा आली कठिणता। आमच्या अनंता तुम्हा ऐसी |
| २५६ | अंगा | तु.गा.१५४७.००३ | गाणें गीत आम्हां नाचणें आनंदें। प्रेम कोठें भेदें अंगा येतें |
| २५७ | अंगा | तु.गा.१५५२.००३ | अंधकार पुढें न चलवे वाट। लागतील खुंट कांटे अंगा |
| २५८ | अंगा | तु.गा.१५९०.००१ | कईं ऐसी दशा येईल माझ्या अंगा। चित्त पांडुरंगा झुरतसे |
| २५९ | अंगा | तु.गा.१६८०.००१ | आळस आला अंगा। धांव घाली पांडुरंगा |
| २६० | अंगा | तु.गा.१६८०.००६ | तुका म्हणे पांडुरंगा। दुरी धरूं नको अंगा |
| २६१ | अंगा | तु.गा.१८२८.००१ | कोठें देवा आलें अंगा थोरपण। बरें होतें दीन होतों तरी |

